॥ श्री ॥

श्रीमच्छंकराचार्यकृत

# सार्थ-लघुवाक्यवृत्ति.

## हंसराजस्वामींच्या ओवीबद्ध टीकेसह.

हा ग्रंथ

**बाळकृष्ण बच्चाजी जोशी**

मुक्काम नारंगी तालुके अलिबाग जिल्हा कुलाबा

यांनीं लिहिला.

तो



**त्र्यंबक हरी आवटे**

यांनीं

पुणें येथील आपल्या ‘ इंदिरा ’ छापखान्यांत छापून

प्रसिद्ध केला.

आनंदनामसंवत्सरे वैशाख शुद्ध ८ शके १८३६

सन १९१४



किंमत दोन रुपये.

विषयांत त्यांचे गुरु मोंगलाईंत एक परम सात्त्विक ब्रह्मनिष्ठ लक्ष्मणराव नामेंकरून मामलेदार होते, त्यांच्या संगतींत घालवूं लागले. पुढें ते माहुरास जाऊन धाराशिवावर गेले. नंतर पंढरपुरास जाऊन संन्यासाश्रम स्वीकारला. आश्रमांतील त्यांचें नांव नारायणतीर्थ होय. या वेळींच सखारामबोवा डोमगांवकर यांनीं त्यांची सेवा पत्करली; त्यामुळें नारायणतीर्थांच्या कृपेनें सखारामबोवा डोमगांवकर यांच्या वक्तृत्वांत प्रसाद उत्पन्न होऊन वारकरी कीर्तनांत त्यांची मोठी ख्याति झाली. पुढें थोडक्याच कालांत सखारामबोवा डोमगांवकर हैद्राबाद येथें समाधिस्थ झाले. तेव्हां नारायणतीर्थ—हंसराजस्वामी हे परांडा येथें जाऊन राहिले. तेथें ते आपल्या वयाच्या ५० व्या वर्षी, शके १८७७ च्या वैशाख शुद्ध ८ या दिवशीं समाधिस्थ झाले. यांनीं वेदांतविषयक अनेक ग्रंथ केले आहेत. त्यांतील शंकराचार्यांच्या लघुवाक्यवृत्ति या ग्रंथाच्या १८ श्लोकांवर जी टीका केली त्यासच हंसराजस्वामीची लघुवाक्यवृत्ति म्हणतात.

लघुवाक्यवृत्ति हा ग्रंथ आदि श्रीशंकराचार्यांचा असून, श्रीमद्भगवद्गीता अथवा ज्ञानेश्वरी या ग्रंथास जसे अठरा अध्याय आहेत, त्याप्रमाणें या ग्रंथाचे अवघे अठराच श्लोक आहेत. ह्या अध्यात्मविद्येच्या अठराच श्लोकांतील अर्थगांभीर्य व सिद्धांतभूत प्रमेयें इतकीं जगमान्य झालीं आहेत कीं, पृथ्वीच्या सर्व देशांतील सर्व धर्मांच्या मुमुक्षू साधकांस खरोखर अभ्यासविचारजन्य अनुभवानें स्वस्वरूपींच मिळण्याचा अधिकार तीं प्राप्त करून देतात ! ! ह्या ग्रंथाचे अठरा श्लोक संस्कृत भाषेंत आहेत. त्यावर हंसराज स्वामींनीं उत्तम प्रकारें ' जशी ज्ञानेश्वर महाराजांनीं गीतेवर टीका केली तशीच ' मराठी भाषेंत टीका केली आहे. सदहू टीका ओवीबद्ध असून तिच्या ५६०० ओव्या आहेत. ह्या ओव्या गुरुशिष्य संवादरूपानें प्रासादिक आहेत. त्यांचा सरळ अर्थ गुरुभक्तिपरायण बाळकृष्ण बच्चाजी जोशी यांनीं मराठींत उत्तम प्रकारें केला आहे. ह्या ग्रंथाच्या पारायणानें आध्यात्मिक विद्येचा लाभ होऊन गीता, भागवत, ज्ञानेश्वरी, सकलसंतांच्या गाथा, या वारकरी ग्रंथभांडाराच्या भाषेंतील आध्यात्मिक परिभाषेच्या कठीण शब्दांचा अर्थ जो नुसता प्रतिशब्द देऊन समजण्यासारखा नाहीं, तो वाक्यवृत्तींतील अनेक स्थलीं आलेल्या वाक्यार्थांनें वाचकांच्या सहज ध्यानांत येण्यासारखा आहे.

सदहू ग्रंथ दोन वर्षांपूर्वीं प्रकाशित करण्यास घेतला, परंतु मध्यंतरीं अनेक प्रकारच्या अडचणी आल्यामुळें तो वाचकांच्या हातीं वेळेवर देतां आला नाहीं. ह्या टीकारूप ग्रंथाचें भाषांतर शके १८१३ सालीं साधारण जीर्ण कागदावर लिहिलें असल्यामुळें ठिकठिकाणीं बरीच अस्पष्टता भासूं लागली होती, परंतु ती विचारानें नाहींशी झाली. तरी पण त्यांत कोठें कोठें चुकून अस्पष्टता राहिली असेल, तिजबद्दल वाचकांनीं ग्रंथाचें महत्त्व जाणून क्षमा करावी. आणि ज्याठिकाणीं अगदींच विपर्यास झालासें वाटत असेल तीं स्थलें दुरुस्त करून कृपेनें कळविण्याची तसदी घेतल्यास ती दुरुस्ती सुदैवानें दुसरी आवृत्ति काढण्याचा सुयोग आल्यास अवश्य करूं. असल्या ग्रंथाचे ग्राहक फारच थोडे असल्यामुळें खर्चाची विभागणी मर्यादित प्रतींवर करावी लागते, तेव्हां ग्रंथाची किंमत वाढती होऊं नये याकरितां बारीक टाईप वापरून जितका मजकूर अधिक घालतां आला तितका घातला आहे.

श्रीगुरु नानामहाराज साखरे यांच्या कृपेनें शके १८१७ सालीं इंदिरा छापखान्याची स्थापना झाली. त्यानंतर शके १८२३ सालीं श्रीतुकाराममहाराजांच्या अभंगांची गाथा विषयवर्गीकरण करून प्रकाशित केली. हाच आमचा पारमार्थिक ग्रंथप्रकाशनाचा पाया होय. हा ग्रंथ इतका लोकप्रिय झाला कीं, त्याच्या प्रती एक वर्षांतच संपून गेल्या व सन १९०४ सालीं सदहू ग्रंथाचा तर्जुमा प्रसिद्ध मुद्रणकलाप्रवीण निर्णयसागर छापखान्याचे मालक यांनीं करून अनेक प्रती पसार केल्या. नंतर शके १८२७ सालीं ब्रह्मीभूत श्रीनानामहाराज साखरे यांनीं सांगितलेली ज्ञानेश्वरी प्रकाशित केली. पुढें याच वर्षी श्रीनानामहाराज साखरे यांचे चिरंजीव विनायकबोवा साखरे यांनीं केलेला सार्थ व सटीक अमृतानुभव प्रकाशित केला. हे दोन्ही ग्रंथ फार लोकमान्य झाले, तेव्हां अमृतानुभवाची दुसरी आवृत्ति शके १८२९ सालीं काढावी लागली. शके १८३० सालीं गाथापंचक म्हणजे श्रीज्ञानदेवगाथा, श्रीनामदेवगाथा, श्रीएकनाथगाथा, श्रीतुकारामगाथा, श्रीनिळोबागाथा व श्रीसंतगाथा हे ग्रंथ विषयवर्गीकरण करून प्रकाशित केले. पुढें शके १८३२ सालीं हरिभक्तिपरायण विनायकबोवा साखरे यांनीं सार्थ ज्ञानेश्वरी आमचेकडे प्रकाशित करून प्रसार करण्याचें कार्यही आमच्याकडे दिलें. सांप्रत ह्या ज्ञानेश्वरीच्या सर्व प्रती खपत आल्या आहेत. साखरेकृत

ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हे ग्रंथ इतके मान्य झाले आहेत कीं, त्यांचें निरनिराळ्या भाषेंत भाषांतरें असावींत असें वाटत असल्यामुळें नर्मदा परिक्रमावासी ब्रह्मविद् मायानंद ब्रह्मचारी यांनीं सदहू ग्रंथांचीं हिंदी भाषांतरें करून आम्हांकडे प्रकाशनार्थ पाठविलीं. त्यांपैकीं सार्थ अमृतानुभव मराठी–हिंदी सन १९१२ सालीं प्रकाशित केला व हल्लीं सन १९१४ सालीं सार्थ लघुवाक्यवृत्ति हा ग्रंथ प्रकाशित केला आहे. ह्याप्रकारें आजपावेतों आम्ही अध्यात्मिकविषयक ग्रंथप्रकाशनरूपी सेवा छापखान्यांतील इतर प्रकाशनाचे व्यवसाय सांभाळून केली. हें काम मी शके १८१७ पासून करूं लागल्यास २० वें वर्ष सुरू झालें. इतक्या अवधींत छापखान्यांतील सर्व प्रकारच्या छपाईच्या कामाच्या तपासणीचें ( प्रुफें–तपासणीचें ) काम मीच रात्रंदिवस करीत असल्यामुळें सांप्रत माझी नजर फारच कमी पडली. यामुळें आतां यापुढें हें काम मजकडून रेटलें जाईल असें वाटत नाहीं. दुसऱ्यांकडून करवून घ्यावें तर सांप्रतचें छापखान्याचें कायदारूपी बंधन व धंदेवाल्यांची परस्पर चढाओढ विशेष असल्यामुळें हीही बाब साधारण छापखानेवाल्यास वाढती मजुरी सोसून करणें कठीण जाणार आहे. अशा प्रकारें नजरेमुळें मी हतवीर्य झालों. आतां यापुढें हा व्यवसाय नेटानें चालविणें स्वतःच्या शक्तीबाहेर झालें आहे. तरी पण अध्यात्मिक ग्रंथांपैकीं माझ्या आवडीच्या ग्रंथाचें प्रकाशन म्हटलें म्हणजे सार्थ एकनाथी भागवत, हिंदी सार्थ ज्ञानेश्वरी व मराठी सार्थ ज्ञानेश्वरी ( लोकांच्या अनेक प्रकारच्या सूचनेवरून मोठा टाईप टीपा कथानकें वगैरे देऊन तयार केलेली ) आणि वृत्तिप्रभाकर हीं कामें प्रकाशित व्हावयाचीं आहेत व तीं प्रकाशनास घेण्याचा लवकरच विचार करीत आहें. तरी अध्यात्मिकग्रंथवाचक ग्राहकांस एवढीच विनंती आहे कीं, पुढील प्रकाशनकार्याचें महत्त्व जाणून सांप्रतच्या या लघुवाक्यवृत्ति ग्रंथास उदार आश्रय देऊन मला पुढील प्रकाशनास उत्तेजन द्यावें.

शेवटीं ज्या सद्गुरू नानामहाराजांच्या कृपाकटाक्षेंकरून हा ग्रंथ प्रकाशित झाला, ती त्यांची कृति त्यांच्या चरणीं लीन होऊन त्यांनाच प्रेमपुरस्सर अर्पण करितों.

मिती वैशाख शु. ८
रोज रविवार ता. ३ मे
सन १९१४.

आपला
**त्र्यंबक हरी आवटे,** प्रकाशक.
मालक इंदिरा प्रेस, पुणें सिटी.

# अनुक्रमणिका.

# सार्थ वाक्यवृत्ति.

## [ हंसराजस्वामीच्या टीकेसहित. ]

जय जय स्वामी सद्गुरू । शंकराचार्य करुणाकरू । मोक्षध्वजा परपारू । पाववीं निज दासा ॥ १ ॥
मी अज्ञान सागरीं पडिलों । माया डोहींच सांपडलों । ममता मगरीनें गिळिलों । येथून कष्टें न सुटें ॥ २ ॥
साधनेंही उदंड केलीं । कर्मधर्मादि जीं आपुलीं । परि तीं असती साह्य जालीं । अविद्येसी ॥ ३ ॥
जपतपादि पुरश्चरणें । अथवा व्रतें नाना दानें । तीर्थयात्रा संतर्पणें । उद्यापनें शांति ॥ ४ ॥
इतुकेंही आदरें करितां । परी उपशम नसेचि चित्ता । मात्र अधिकच वाढे अहंता । म्यां केलें म्हणोनी ॥ ५ ॥
मी अमुक एक रविदत्त । माता पिता जें नाम ठेवित । हाचि देह मी असें निभ्रांत । सर्वदा दृढ ॥ ६ ॥
परि मी पूर्वीं असें कवण । जन्मलों आतां आलों कोठोन । मरतां कोणे स्थळा जाईन । हें नेणें मी सहसा ॥ ७ ॥
परी आपण कोण हें जाणावें । ऐसा हेतु उद्भवला जीवें । येर साधन जितुकें आघवें । तृणतुल्य जालें ॥ ८ ॥
यास्तव देवी देव धुंडिले । अति निग्रहें प्रसन्न झाले । तंव ते वर माग म्हणों लागले । देहबुद्धिच बळावया ॥ ९ ॥
मग मी सर्वांसी उपेक्षून । गेलों सदाशिवासी शरण । तिहीं स्वप्नामाजीं येऊन । सांगितलें मज ॥ १० ॥
कीं उठीं उठीं गा रविदत्ता । तूं भवभयाची न करीं चिंता । सद्गुरूसी शरण जाईं आतां । ममाज्ञेवरुनी ॥ ११ ॥
प्रस्तुत मीच जगदोद्धारा । प्रगटलों असें निर्धारा । ऐसिया अज्ञान कली माझारा । श्रीशंकर नामें ॥ १२ ॥
तस्मात् तया शंकरस्वामीसी । शरण जाऊनि या समचासी । उपदेश धरूनिया मानसीं । अज्ञान जिंकीं ॥ १३ ॥
ऐशिया स्वप्नांतीं जागृती । पावोनी विस्मयापन्न जालों चित्तीं । मग धांवोनी आलों सत्वरगती । शरण श्रीचरणा ॥ १४ ॥

---

श्रीशंकराचार्यांनीं जनास परमात्म्याचा बोध व्हावा व तेणेंकरून जन्ममरणापासून त्यांनीं सुटावें म्हणून अनेक बोधपर ग्रंथ केलेले आहेत. त्यांपैकींच हा लघुवाक्यवृत्ति या नांवाचा अठराश्लोकी गुरुशिष्यसंवादक ग्रंथ आहे. यांत रविदत्त कोणी एक शिष्य कल्पिलेला आहे, व तो शंकराचार्यस्वामीस शरण जाऊन त्यांची प्रार्थना करून म्हणतोः-

हे स्वामी, मी अज्ञानसमुद्रांत पडलों आहें, व त्या समुद्रांतील मायाडोहांत सांपडलों आहें, त्या डोहांतील ममता-मगरीनें मला गिळिलें आहे. मीं त्या मगरीचे हातून सुटण्याकरितां कर्मधर्म आदिकरून पुष्कळ साधनें केलीं, त्यांचेयोगानें सुटका न होतां तीं साधनें उलटीं अविद्येस मात्र साह्य झालीं. चित्तास उपशम व्हावा, म्हणून मीं जप, तप, पुरश्चरणें, व्रतें, अनेक प्रकारचीं दानें, तीर्थयात्रा, संतर्पणें, उद्यापनें, शांति इत्यादि साधनें केलीं. पण त्यांचे योगानें चित्तास उपशम न होतां, मीं अमुक साधनें केलीं असा उलटा अभिमान मात्र वाढला; व आईबापांनीं रविदत्त हें देहास नांव ठेविलेला मनुष्य तो हा मी आहें, अशी दृढता झाली. वास्तविक मी पूर्वीं कोण होतों, आतां जन्मास जो आलों तो कोठून आलों व मेलों म्हणजे पुढें कोणते ठिकाणीं जाईन, हें मला कांहीं कळत नाहीं. मी कोण हें ओळखण्याची इच्छा होऊन मीं पुष्कळ साधनें केलीं. त्यांचे योगानें कार्य होईना, म्हणून देव किंवा देवी ह्यांच्या प्रसन्नतेकरितां त्यांचा शोध करून मोठ्या निग्रहानें भक्ति केली. तेव्हां ते देव प्रसन्न होऊन त्यांनीं वर दिला, तेणेंकरून देहबुद्धि दृढतर होणार, हें चांगलें नव्हे, म्हणून मी तशा देवास सोडून शंकरास शरण गेलों. तेव्हां शंकर स्वप्नांत येऊन, त्यांनीं सांगितलें कीं, हे रविदत्ता, ऊठ, तूं संसारभयाची चिंता करूं नको; कारण तुझी सर्व चिंता शंकराचार्यस्वामी नाहींशी करतील; करितां त्यांस तूं शरण जा. प्रस्तुत मीच जगदोद्धार करण्याकरितां या कलीयुगांत शंकराचार्य या नांवानें प्रगटलों आहें; तरी तूं शरण आलास म्हणजे मी तुझें अज्ञान, ज्ञानाचा बोध करून घालवीन. याप्रमाणें स्वप्नांतील शंकराच्या भाषणाचें जागें झाल्यावर स्मरण झालें, तेव्हां मला मोठें आश्चर्य वाटलें; व जर शंकर स्वतः आपणास शंकराचार्यांस शरण जाण्यास सांगतात, तर आपण आतां विलंब न लावतां शरण जावें. असें योजून, स्वामीस शरण गेला आणि म्हणतोः-

आतां सद्गुरुरांया मज । अंगीकारावें महाराज । धन्य धन्य हा सुदिन आज । देखिले चरण ॥ १५ ॥
हा देह आणि मन । गुरुचरणीं केलें अर्पण । यांत किमपि जरी घडे प्रतरण । तरी चूर्ण होवो मस्तक ॥ १६ ॥
जरी वाणी हे आणिका स्तवी । तरी ते तत्क्षणीं तुटावी । चित्तें जरी अन्य कांहीं आठवी । तरी घडावी ब्रह्महत्या ॥ १७ ॥
या रीतींकरुनी निर्धार । साष्टांग घालित नमस्कार । तारीं तारीं हा निज किंकर । स्वकीय ब्रीद रक्षुनी ॥ १८ ॥
ऐसा अधिकारी पाहुनी । विचारें परीक्षिती अंतःकरणीं । हा चतुष्टयसंपन्नत्व पावोनी । शरण आला असे ॥ १९ ॥
सत्य मिथ्या यासि कळलें । म्हणोनि असत्यासी मन विटलें । हेंचि नित्यानित्य विचारिलें । सत्य कळावें इच्छितां ॥ २० ॥
ब्रह्म जाणावें जे इच्छा होणें । हेचि मुमुक्षुत्वाचीं लक्षणें । आणि इह पर भोगासि उबगणें । हेचि विरक्ति ॥ २१ ॥
अन्य मनाचे सांडोनि तर्क । आत्मा वोळखून धरावा एक । हाचि शम निश्चयात्मक । इंद्रियनिग्रह तो दम ॥ २२ ॥
सर्वांपासून तो परतला । हाचि असे कीं उपरम झाला । न भी कदां सुखदुःखाला । हेचि तितिक्षा ॥ २३ ॥
सद्गुरुवचनापरतें कांहीं । यासि दुजेंच उरलें नाहीं । हेहि श्रद्धा निःसंदेही । समाधान एकाग्रता ॥ २४ ॥
तस्मात् साधन चतुष्टयता । अर्थात् आली याचिया हातां । ऐशिया अधिकारिया उपदेशिता । दोष हा कवण ॥ २५ ॥
प्रज्ञा जरी मंद असे । तरी उपदेशावें सद्भ्यासें । वृत्ति खालितां दृढ विश्वासें । अपरोक्षता बाणे ॥ २६ ॥
ऐसा हेत ठेऊनि अंतरीं । उठविती रविदत्ता करीं । नाभी नाभी बोलती उत्तरीं । मनोरथसिद्धि होय ॥ २७ ॥
परी आम्ही उपदेशूं आतां । तें दृढ विश्वासें धरी चित्ता । आणि अभ्यासें हें वृत्ति खालितां । अपरोक्ष पावसी ॥ २८ ॥
अपरोक्ष म्हणजे आपण कोण । तें निजरूप अंगेंचि होणें । परोक्ष म्हणजे आपण । ओळखावें आपणा ॥ २९ ॥

स्वामी, आपणास मी शरण आलों आहें. तरी हे सद्गुरु तुम्ही माझा अंगिकार करा. आजचा दिवस सुदीन म्हणूनच मीं आज हे चरणकमल पाहिले. मी पुष्कळ दिवस संसारचिंता घालविण्यास उपाय करीत होतों. परंतु आपल्यासारखे समर्थ मिळाल्याशिवाय चिंता दूर होत नाहीं, म्हणून मी आपणास शरण आलों आहें, व मीं आपले चरणीं देह, वाचा, व मन अर्पण केलें आहे. हें माझें बोलणें जर प्रतारणेचें दिसेल, तर माझा मस्तक तुटून पडो, व ही वाचा जर तुमच्यावांचून दुसऱ्या कोणाचें स्तवन करील, तर माझी जीभ झडो, व मन जर तुमच्यावांचून दुसरें कांहीं आठवील तर मला ब्रह्महत्त्या घडल्याप्रमाणें होवो. याप्रमाणें मी निर्धार करून आपणास शरण येऊन साष्टांग नमस्कार घालीत आहें. तरी स्वामी तुम्ही आपलें ब्रीद राखून तुमचा दास जो मी त्या माझा उद्धार करा.

## शिष्याची अधिकाराविषयीं परीक्षा.

हा शिष्य साधनचतुष्टयसपन्न आहे असें दिसतें, म्हणूनच हा अधिकारी आहे. अधिकारी आहे, म्हणूनच हा शरण आला. याचें मन असत्याविषयीं विटलेलें आहे, यावरून यास सत्यमिथ्या कळलें असें दिसतें. यानें सत्य कळावें म्हणून नित्य काय, अनित्य काय याचा विचार केला असें दिसतें. यास ब्रह्म जाणण्याची जी इच्छा झाली आहे हीच याची मुमुक्षुता; इहपर भोगांविषयीं उबग वाटत आहे हीच याची विरक्ति; मनाच्या अनेक प्रकारच्या कल्पना नाहींशा होऊन आत्म्यास ओळखणें हाच येथें शम; याचे इंद्रियांचा जो निग्रह आहे तोच याचा दम; सर्वांचा त्याग करून हा शिष्य ब्रह्माकडे वळलेला आहे हाच याचा उपरम; हा सुखदुःखास भीत नाहीं हीच याची तितिक्षा; सद्गुरु वचनावर विश्वास हीच याची श्रद्धा व एकाग्रता हेंच याचें समाधान. याप्रमाणें साधन-चतुष्टयाचीं लक्षणें याचे आंगीं आहेत म्हणून हा अधिकारी आहे.

## अधिकारी शिष्य रविदत्त यास स्वामी उपदेश करितात.

सज्जन साधन चतुष्टय अधिकाऱ्यास उपदेश करितात, त्याप्रमाणें हा शिष्य साधन चतुष्टय आहे म्हणून यास उपदेश केला असतां कोणत्याही प्रकारचा दोष नाहीं. आतां याची बुद्धि जर मंद असेल तर यास अभ्यासासह उपदेश करावा. विश्वासानें वृत्तीचा खल दृढ झाला असतां, अपरोक्षता दृढ बाणते; असा सर्व प्रकार ध्यानांत आणून स्वामी रविदत्तास हातानें उठवून म्हणतात—हे रविदत्ता, तूं भिऊं नको, तुझे मनोरथ सिद्धीस जातील; परंतु तुला इतकेंच केलें पाहिजे कीं, आम्ही जो तुला उपदेश करूं तो तूं दृढ विश्वासानें चित्तांत धर, आणि जसा अभ्यास सांगूं तसा वृत्तीचा खल कर म्हणजे तुला दृढ अपरोक्षता प्राप्त होईल.

**अपरोक्ष** म्हणजे आपलें जें निजरूप तें आपण स्वतः होणें.

**परोक्ष** म्हणजे आपलें आपणास ओळखणें.

गुरुवचनीं विश्वास । तरी पाविजे परोक्ष ज्ञानास । तस्मात् श्रद्धा असावी चित्तास । तरी आत्मत्व ओळखसी ॥ ३० ॥
मात्र अपरोक्ष ज्ञान व्हावया । विचार पाहिजे शिष्यराया । तोही अभ्यासें पावेल उदया । निःसंशय आपणची ॥ ३१ ॥
प्रस्तुत तुज परोक्षज्ञान । उपदेशिजे घे ओळखून । तेंचि विश्वासें दृढ करून । अभ्यास करीं ॥ ३२ ॥
तूं हेतु धरोनि जो आलासी । कीं जाणावें आपआपणासी । तो तूं कोण या समयासीं । बोलिजे अवधारीं ॥ ३३ ॥
चहूं वेदांचीं वाक्यें चार । याचा अर्थ तो एक साचार । कीं जीव ब्रह्म ऐक्य निर्धार । हा विषय वेदांतींचा ॥ ३४ ॥
त्यांत उपदेश वाक्य तत्त्वमसी । तें विचारून घ्यावें गुरूपाशीं । मग अहंब्रह्मास्मि या वाक्यासी । वृत्तीनें दृढ धरावें ॥ ३५ ॥
तरी अवधारीं एकाग्रभावें । तें तूं ब्रह्म असती स्वभावें । अहंकारादि देहांत आघवें । आपण नव्हे सत्य सत्य ॥ ३६ ॥
मी ब्रह्म आत्मा स्वतःसिद्ध । एकरूप असंग अभेद । वोळखून घेई प्रमाद । देहबुद्धीचा सांडुनी ॥ ३७ ॥
हेचि अहंब्रह्मास्मि निश्चिती । वाक्यार्थाची जे अनुभूती । ऐशी वृत्ति ते वाक्यवृत्ती । हा वृत्तीसी अभ्यास ॥ ३८ ॥
कायिक वाचिक मानसिक । शास्त्रीय अथवा जी लौकिक । कर्मे घडतांही अनेक । परी अभ्यास सोडूं नये ॥ ३९ ॥
अभ्यास म्हणजे मी ब्रह्म आपण । या अर्थाचें अनुसंधान । कदापि न पडावें विस्मरण । अहर्निशीं सदां ॥ ४० ॥
तूं म्हणसी आत्मा ब्रह्मपूर्ण । याचें किमात्मक असे लक्षण । तें यथार्थ ओळखिल्यावांचून । अनुसंधान केवीं घडे ॥ ४१ ॥
तरी अवधारावें निश्चित । अहंकारादि जितुकें देहांत । यांत आत्माही झाला मिश्रित । अज्ञान वसें कडोनी ॥ ४२ ॥
यासी विवेचन पाहिजे झालें । देहादि मिथ्यात्व जरी त्यागिलें । तरी आत्मत्व जाय निवडिलें । त्रिविधा प्रतीतीनें ॥ ४३ ॥
तेंचि विवेचन म्हणसी कैसें । बोलिजेत असे अपैसें । तरी सावधान असावें मानसें । दुश्चित्त न होतां ॥ ४४ ॥
जैसा माळेंतून तंतु निवडावा । कीं मणीच तंतूवरील ओढावा । तैसा देहादिकाहून ओळखावा । आत्मा भिन्न ॥ ४५ ॥
अथवा देहादिक हे ओळखूनी । भिन्न करावे आत्मयाहूनी । हें सर्व कळेल निरूपणीं । अती सावधान जरी होसी ॥ ४६ ॥
ऐसें बोलतां आचार्य माउली । रविदत्तें वृत्ति सावध केली । शब्दासरिसी झेंप घाली । मनें अर्थावरी ॥ ४७ ॥
रविदत्त एक उपलक्षण । परी जे जे असती अधिकारी पूर्ण । तेही असावें सावधान । आचार्य गुरुवचनीं ॥ ४८ ॥

---

परोक्ष ज्ञान पावण्यास गुरुवचनीं विश्वास असला पाहिजे. गुरुवचनीं विश्वास अशी जी श्रद्धा, ती असली तरच आत्मत्व ओळखलें जाईल. अपरोक्ष ज्ञान होण्यास विचार पाहिजे, तो विचार अभ्यासाचे योगानें निःसंशय उत्पन्न होईल. प्रस्तुत तुला परोक्ष ज्ञानाचा उपदेश करूं; त्याची आतां तूं ओळख करून घे. तेंच विश्वासानें दृढ करून अभ्यास कर. आपण कोण हें जाणावें असा हेतु धरून जो तूं आलास तो तूं कोण आहेस तें मला सांग.

चार वेदांचीं चार महावाक्यें आहेत. त्या चोहोंचा अर्थ जीव आणि ब्रह्म यांचें ऐक्य हा एक आहे. व हाच वेदांताचा विषय आहे. यांत तत्त्वमसि हें महावाक्य उपदेशकारक आहे. त्याचा गुरुपाशीं विचार करून तें नीट समजावून घे. आणि मग अहंब्रह्मास्मि हें वाक्य वृत्तीनें दृढ धर. मग तें तूं ब्रह्म सहजी आहेस. त्याखेरीज अहंकारापासून देहापर्यंत सर्व मिथ्या, तें मी नव्हे, मी स्वतःसिद्ध ब्रह्मात्मा, एकरूप, असंग, अभंग, भेदरहित आहें; हें देहबुद्धीचा प्रमाद टाकून ओळखून घे. हाच अहंब्रह्मास्मि या महावाक्याचा अनुभव आहे. याप्रमाणें अनुभव घेणारी जी वृत्ति तीच वाक्यवृत्ति. हा वृत्तीचा अभ्यास कायिक, वाचिक, मानसिक, शास्त्रीय अथवा लौकिकी जीं अनेक प्रकारचीं कर्मे घडतील तीं घडोत, त्यामुळें अभ्यास सोडूं नको.

**अभ्यास**——म्हणजे मी आपण स्वतः ब्रह्म, या अर्थाचें अनुसंधान कधींही विस्मरण न होतां असावें.

**शंका**——तूं म्हणशील कीं, आत्मा पूर्ण ब्रह्म याचें लक्षण काय ? तें यथार्थ ओळखिल्यावांचून त्याचें अनुसंधान कसें घडेल ?

**उत्तर**——अहंकारापासून देहापर्यंत जे पदार्थ, त्यांत अज्ञानानें आत्मा मिश्रित झाला आहे. म्हणून याविषयींचें विवेचन होऊन देहादिक मिथ्या समजून त्यागिशील, तरच त्रिविधा प्रतितीनें आत्मत्व निवडिलें जाईल.

### आत्मतत्त्व निवडण्याविषयींचें विवेचन.

माळेंतून जसा तंतू निवडावा, किंवा तंतूवरील मणी ओढावा, तसा देहादिकांपासून आत्मा भिन्न आहे हें ओळखावें, किंवा देहादिक ओळखून तीं आत्म्याहून भिन्न समजून निराळीं करावीं. हें सर्व निरूपणाचे वेळीं कळेल, असें शंकराचार्यांनीं सांगितलें. तेव्हां रविदत्तानें आपली वृत्ति सावध केली. आणि गुरूच्या मुखांतील शब्द ऐकण्याबरोबर त्याचें लक्ष अर्थाकडे जाऊं लागलें. जसा रविदत्त गुरुवचनीं सावध होता, त्याप्रमाणें सर्वांनीं आपआपले गुरूचें वचन ऐकण्याविषयीं सावध असावें.

चातकासाठीं वर्षे घन । परी सर्वांसीच होय जीवन । तेवीं रविदत्ताचे निमित्तें कडोन । सर्वही अवधारा ॥ ४९ ॥
परी भूमीचा सांडून चारा । जो घन लक्षी तो चातक खरा । तेवीं देहादि विषय हे अव्हेरा । तेव्हां वचनरहस्य जोडे ॥ ५० ॥
तस्मात् जयासी खरें सुटावे । वाटें तेणें विषय हे टाकावे । तरीच कार्य हें साधावें । श्रवण मननें ॥ ५१ ॥
आतां सर्वी सावधान । आचार्य बोलले कृपाघन । वाक्यवृत्तीचें निरूपण । रविदत्ता करिती ॥ ५२ ॥
प्रथम घडावें विवेचन । यास्तव देहत्रयाचें कथन । कीजे श्लोकार्थी निरूपण । आदरें ऐकावें ॥ ५३ ॥

**स्थूलोमांसमयोदेहःसूक्ष्मःस्याद्वासनामयः ।**
**ज्ञानकर्मेंद्रियैःसार्धंधीः प्राणौतच्छरीरगौ ॥ १ ॥**

स्थूलदेह मांसमयाचा । सूक्ष्म तोचि वासनात्मक साचा । तेथें प्रकार असे सत्रा तत्वांचा । इंद्रिय प्राणें मन बुद्धी ५४
स्थूलदेह मांसमय कैसा । विस्तार बोलिजे अल्पसा । पंचीकृत भूतांचा सहसा । जो का उभारला ॥ ५५ ॥
भूतांपासोनियां जालें । जें का अपंचीकृत पहिलें । तेंचि एकमेकांसी वांटिलें । हेंचि पंचीकृत ॥ ५६ ॥
अंतःकरण व्यान श्रवण । वाचा शब्द हें आकाश पूर्ण । ययाचे भाग केले दोन । ईक्षणमात्रें ईशें ॥ ५७ ॥
मुख्य अंतःकरण अर्धभाग । तो आकाशींच ठेवून मग । उरल्या अर्धभागाचे विभाग । चतुर्धा केले ॥ ५८ ॥
व्यान श्रोत्र वाचा शब्द । हे चहूंसी दिधले प्रसिद्ध । व्यान वायूसी दिधला स्तब्ध । श्रोत्र तेजास ॥ ५९ ॥
वाचा दिधली आपासी । शब्द दिधला पृथ्वीसी । एवं आकाश विभागिलें पांचांसीं । आतां वायु ऐकें ॥ ६० ॥
मन समान त्वचा पाणी । स्पर्श विषय पांचवा मिळुनी । वायूच बोलिजे चंचलपणीं । हाही द्विधा केला ॥ ६१ ॥
एक भाग अर्धा तो समान । हा वायूंत मौनेंचि ठेवून । उरला अर्ध भाग तो विभागून । चतुर्धा केला ॥ ६२ ॥
मन दिधलें आकाशासी । त्वचा दिधली तेजासी । पाणी दिधला अपासी । पृथ्वीसी स्पर्श ॥ ६३ ॥
बुद्धि उदान चक्षु पाद । रूप विषय मिळून पंचविध । तेजच बोलिजे तें विषद । हेंही द्विभाग केलें ॥ ६४ ॥
एक भागाचा चक्षु तो तेजीं । तेजींचा ठेविला सहजीं । अन्य भूतांलागीं विभाजी । उरला अर्ध ॥ ६५ ॥
बुद्धि आकाशासी देत । उदान वायूसी समर्पित । पाद आपासी अर्पित । पृथ्वीसी रूप ॥ ६६ ॥
चित्त प्राण जिव्हा उपस्थ रस । हें पंचविध आप सुरस । हें द्विविध करूनि ईश । वांटिता हे ॥ ६७ ॥
एक भाग उपस्थ आपाचें । आपामध्येंच ठेविलें साचें । येर चार उरल्या भागाचें । वांटी येर चहूंसी ॥ ६८ ॥
चित्त आकाशा दिधलें । प्राणासी वायूंत ठेविलें । तेजासी जिव्हेसी समर्पिलें । पृथ्वीसी रस ॥ ६९ ॥
अहंकार अपान घ्राण । गुद गंध हे पांच मिळोन । पृथ्वीचीं असतीं लक्षणें । हेंही द्विविधा केलें ॥ ७० ॥
गंध भाग जो कां असे एक । तो पृथ्वींत ठेवी निश्चयात्मक । उरला अर्ध भाग जो आणिक । येर चहूंसी वांटी ७१
आकाशा दिधला अहंकार । अपान वायूंत ठेवी निर्धार । घ्राण तेजा दिधलें साचार । आपासी गुद ॥ ७२ ॥
एवं एक एक भूत द्विधा केलें । ज्याचे त्यांत एकेक भाग ठेविले । येर एकाचे चार चार केले । ते ते दिधले येरां भूतां
ऐसा भूतकर्दम हा करोनी । स्थूल देहाची केली उभवणी । तेच कैसी अल्पवचनी । बोलिजेत आहे ॥ ७४ ॥
शब्द स्पर्श रूप रस गंध । हे पांचाचे अंश पंचविध । पृथ्वींत मिळतां पृथ्वी प्रसिद्ध । स्पष्ट जाली असे ॥ ७५ ॥
हे पांच पृथ्वीसी जेव्हां मिळाले । तेव्हां जडत्वें हे पांच प्रगटले । अस्थि मांस त्वचा नाडी रोम जाले । स्थूळाचे साहित्य
वाचा पाणी पाद उपस्थ गुद । हे आपीं मिळतां पांचाचे प्रसिद्ध । आप स्पष्ट होऊन सिद्ध । पांच जाले द्रवत्वें ॥७७॥
शुक्र शोणित लाळ मूत्र स्वेद । हे आपाचे गुण पंचविध । प्रगटले असती प्रसिद्ध । पातळपणीं ॥ ७८ ॥
श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा घ्राण । हे पांचापासून पांच होऊन । तेजामाजी मिळतां भासकपण । पांच प्रकार जाले ७९
क्षुधा तृषा आळस निद्रा मैथुन । हे तेजाचे पांच अंश पूर्ण । स्थूलीं उमटले येऊन । पंचीकरण होतां ॥ ८० ॥
व्यान समानोदान प्राणापान । हे पांचांपासून पांच होऊन । ते वायूंत राहिले असतां येऊन । तेणें वायु स्पष्ट जाला
तेणें पांच प्रकार चळण वळण । प्रसरण आकुंचन निरोधन । हे उत्पन्न होती वायूपासून । स्थूल चळावया ॥ ८२ ॥
अंतःकरण मन बुद्धि चित्त । अहंकार हे आकाशीं रहात । परी हे पांचांपासून पांच होत । अपंचीकृत पहिलें ॥८३॥
हे पांच आकाशीं मिळतां क्षणीं । या पांचांची जाली उभवणी । काम क्रोध लोभ मोहपणीं । पांचवें भय ॥ ८४ ॥
असो ऐसें पंचीकृत होतां । स्थूलाची उभवणी जाली समस्तां । हेचि माया देवीनें व्यवस्था । ईशसत्तें केली ॥८५॥

मेघ चातकाकरितांच वृष्टी करितो, परंतु तें पाणी सर्वांस मिळतें. तसें शंकराचार्यांचें निरूपण रविदत्ताचे निमित्तानें आहे. तें सर्व अधिकाऱ्यांचे उपयोगास येईल. करितां सर्व लोकहो, तें निरूपण ऐका. जसा चातक भूमीवरचा चारा खावयाचा टाकून मेघाकडे पहात असतो, तोच खरा चातक. तसें, अधिकारी हो, तुम्ही देहादिक विषय टाकाल तेव्हांच तुम्हांस खरे अधिकारी म्हणूं; व तुम्ही तसे बनाल, त्यावेळीं तुम्हांस वचनाचें रहस्य कळेल. ज्याला या संसारापासून खरें सुटावें असें वाटेल, त्यानें विषयाचा त्याग करावा. मग सहजच त्यास परमार्थ प्राप्त होईल. शंकराचार्य स्वामी, रविदत्तास वाक्यवृत्तीचें निरूपण करीत आहेत, त्यांत प्रथम विवेचन घडावें म्हणून देहत्रयांचें कथन श्लोकार्थानें करीत आहेत. तो श्लोकार्थ हे अधिकारी हो, तुम्ही सावध राहून ऐका.

**अर्थ.**—स्थूल देह मांसमय, व सूक्ष्म देह हा वासनात्मक; इंद्रियें, प्राण, मन, बुद्धि, या सत्रा तत्त्वांचा आहे. त्यांत स्थूल देह मांसमय कसा ? तें सांगतों.

**पंचीकृत.**—पांच भूतांचे विभाग करून ते विभाग कांहीं प्रमाणांनीं एकमेकांस वांटून जीं पुढें स्पष्ट भूतें झालीं, त्या स्पष्ट भूतांस पंचीकृत म्हणतात.

स्थूल देह पंचीकृताचा आहे. तें पंचीकृत ईश्वरानें आपल्या ईक्षणमात्रें प्रत्येक भूताचे दोन दोन समान भाग करून एक भाग त्या त्या भूतांत ठेवून दुसऱ्या भागाचे पुन्हा समान चार भाग करून ते बाकी राहिलेल्या चार भूतांस प्रत्येकास एकेक या प्रमाणानें वांटून केलें. पंचीकृतांत कोणत्या भूताचा कोणता भाग कोणत्या भूतांत मिळून तें तें स्पष्ट भूत कसें बनलें, हें कळण्याकरितां खालीं कोष्टक दिलें आहे. त्या कोष्टकांत जें स्पष्ट भूत झालें त्याचाच अर्धाभाग त्यांत कोणता आहे हें कळण्याकरितां त्या भागाचे मागें एकाचा अंक घातला आहे.

## पंचीकृताचें कोष्टक.

| भूतें | आकाश | वायु | तेज | आप | पृथ्वी | भूतास आलेले जे भाग त्यांचे धर्म |
|---|---|---|---|---|---|---|
| आकाशाचे भाग | १ १/२ अंतःकरण | १/८ व्यान | १/८ श्रोत्र | १/८ वाचा | १/८ शब्द | स्तब्धता |
| वायूचे भाग | १/८ मन | १ १/२ समान | १/८ त्वचा | १/८ पाणी | १/८ स्पर्श | चंचलत्व |
| तेजाचे भाग | १/८ बुद्धि | १/८ उदान | १ १/२ चक्षु | १/८ पाद | १/८ रूप | भासकत्व |
| आपाचे भाग | १/८ चित्त | १/८ प्राण | १/८ जिव्हा | १ १/२ उपस्थ | १/८ रस | द्रवत्व |
| पृथ्वीचे भाग | १/८ अहंकार | १/८ अपान | १/८ घ्राण | १/८ गुद | १ १/८ गंध | जडत्व |

मायेनें ईश्वराचे सत्तेनें स्थूल देहांत पंचभूतांपासून जे पदार्थ उत्पन्न केले त्यांचें कोष्टक खालीं दिलें आहे.

## स्पष्ट भूतांपासून उत्पन्न झालेल्या पदार्थांचें कोष्टक.

| पृथ्वीपासून | आपापासून | तेजापासून | वायूपासून | आकाशापासून |
|---|---|---|---|---|
| अस्थि | शुक्र | क्षुधा | चळण | काम |
| मांस | शोणित | तृषा | वळण | क्रोध |
| त्वचा | लाळ | आळस | प्रसरण | लोभ |
| नाडी | मूत्र | निद्रा | अकुंचन | मोह |
| रोम | स्वेद | मैथून | निरोधन | भय |

अस्थिमांसादि पांच मिळोनि । शुक्लितादि मेळविलें पाणी । कालवोनि सांदोसांदीं बंधोनी । उभविला गर्भी ॥ ८६ ॥
प्राण संचारें चळण वळण । होतां पूर्ण होऊन पावे जनन । पुढें क्षुधा तृषादिकें येणें । पोषण होय ॥ ८७ ॥
कामक्रोधादि जेव्हां उमटले । तेव्हां देहाचें रक्षण जालें । येणेंपरी स्थूळ उभविलें । पंचीकृत भूतांचें ॥ ८८ ॥
भूतांपासोनि जालें म्हणोनी । भौतिकत्व नाम या लागोनी । परी निर्मित जनक जननी । पासाव पुढें ॥ ८९ ॥
रक्त रेत मिळतां जठरीं । अवयवेंही होतीं सारीं । उभयांची सप्तविध जाली परी । सप्तकोशीक देहा ॥ ९० ॥
अस्थि नाडी मज्जा नख । हे पित्याचे साडेतीन खुरेख । मांस त्वचा रक्त केश अशेख । मातेच्या रक्ताचे ॥ ९१ ॥
या रीतीं हा मांसमय । अन्नापासोनियां होय । अन्नेंकडून वांचे उपाय । दुजा असेना ॥ ९२ ॥
आणि लय जो होय याचा । तो अन्नरूप पृथ्वींत साचा । म्हणोनि कोश बोलिजे वाचा । अन्नमय शब्दें ॥ ९३ ॥
असो स्थूळदेह जो ऐसा । आत्मा हाचि होईल कैसा । पुढें होईल याचिया निरासा । प्रस्तुत जड सांगितला ॥९४॥
जया वासनेनें स्थूळ निर्मिला । कीटकें कवडा जेवीं केला । तया वासनारूप वृद्धीला । लिंगदेह बोलिजे ॥ ९५ ॥
या लिंगदेहीं कोश तीन । प्राण मन आणि विज्ञान । या सत्रा तत्वांचें निरूपण । पुढें कीजे ॥ ९६ ॥
प्रस्तुत वासनेचें रूप । प्रांजळ कीजताहे अल्प । श्रोतीं सावधान साक्षेप । असिलें पाहिजे ॥ ९७ ॥
आकाशीं जेवीं वायु चळे । तेवीं ब्रह्मीं स्फूर्ति चंचळे । समष्टितादात्म्यें तयेशीं निवळे । माया नाम ॥ ९८ ॥
तेचि व्यष्टींत विभागली । एका पिंडीं तादात्म्य पावली । अभिमान माथां घेऊन बैसली । तिहीं अवस्थांचा ॥९९॥
दों अवस्थेंत कर्मे घडतीं । ते म्यां केलीं असतीं निश्चितीं । तेचि भोगीन पुढता पुढती । तेचि वासना ॥ १०० ॥
सुषुप्तीमाजीही नेणिवेचा । अभिमान घेतला असे साचा । अभाव नव्हेचि कर्तृत्वाचा । लीनत्वें जरी ॥ १ ॥
उत्थान होतांच मी देह स्फुरे । म्यां अमुक केलें करीन सारें । ऐसी अभिमानें जे हुंबरें । तेचि वासना ॥ २ ॥
सुषुप्तींत मात्र गुप्त होती । नेणीव गोचर राहे वृत्ति । तेथील आठव घेऊन येती । स्फूर्ति उत्थान कालीं ॥ ३ ॥

---

स्पष्ट पृथ्वीपासून झालेल्या अस्थिमांसादि पदार्थांत आपापासून झालेले शुक्रशोणित इत्यादि पदार्थ घालून कालवून त्या कर्दमानें सांधी सांधी लिंपून गर्भ तयार झाला. त्या तयार झालेल्या शरीरांत वायूपासून झालेले प्राणाचे चलनवलनादि व्यापार होऊं लागले. ते व्यापार होऊं लागतांच तो गर्भ पूर्ण होऊन प्राणी जन्मास आला. तेव्हां त्याचे तेजापासून होणारे क्षुधा तृषा इत्यादिकांचे योगानेंच पोषण होऊं लागलें व आकाशापासून होणारे काम क्रोध इत्यादि पदार्थांपासून देहाचें रक्षण होऊं लागलें. याप्रमाणें स्थूळ देह पांच भूतांपासून झाले, म्हणून त्यास भौतिक म्हणतात. स्थूळ देह भूतांपासून झाला खरा, तरी त्याची उत्पत्ति स्त्रीपुरुषांपासून आहे. स्त्रीचे उदरांतील रक्तांत पुरुषाचें रेत मिळण्याबरोबर त्याचे सात प्रकार झाले. म्हणून त्या सात प्रकारांनीं होणाऱ्या सावयव देहास सप्तकोशिक म्हणतात. पुरुषाचे रेताचे साडेतीन धातु; अस्थी, नाडी, मज्जा, नख हे आहेत. स्त्रीचे रक्तापासून साडेतीन धातु; मांस, त्वचा, रक्त, केश हे आहेत. दोहों मिळून सात धातु होतात. नख आणि केश हे धातु अर्धाले मानितात. स्थूळ देह अन्नरूप पृथ्वीपासून उत्पन्न होतो, तो वांचतो व लय पावतो, म्हणून त्यास अन्नमयकोश म्हणतात. याप्रमाणें जड जो स्थूळ देह तो आत्मा कसा होईल? वासनेनें स्थूळ देह उत्पन्न केला. त्या वासनारूप वृत्तीस लिंगदेह किंवा सूक्ष्मदेह म्हणतात. त्या लिंगदेहांत सत्रा तत्त्वें मिळून होणारे प्राण, मन, आणि विज्ञान, हे तीन कोश आहेत.

## वासनेचें रूप.

आकाशांत जसा वायु चळतो, तशी ब्रह्माचे ठायीं स्फूर्ति चळते. त्या स्फूर्तीस समष्टितादात्म्यानें माया हें नांव देतात. तीच स्फूर्ति व्यष्टींत विभागून एका पिंडीं तादात्म्य पावली, व तीही अवस्थेचा अभिमान धरून बसली. त्यांत दोन अवस्थेंत होणारीं कर्में तीं मीं केलीं, म्हणून तीं मला भोगिलीं पाहिजेत. असा अभिमान धरते तिलाच वासना म्हणतात. सुषुप्तींत तीच स्फूर्ति नेणिवेचा अभिमान धरून राहते. सुषुप्तींत ती वास्तविक लीन असते, परंतु कर्तृत्वाचा अभाव होत नाहीं. कारण उत्थान झाल्यावर मी देह असें आठवनें, व मीं अमुक केलें, आणि पुढेंही सर्व कांहीं करीन. अशा अभिमानानें जी वागत असते, तीच वासना. सुषुप्तींत ही स्फूर्ति गुप्त होती; त्या वेळीं, ती वृत्ति, नेणीवगोचर होती. तीच, स्फूर्तीचें उत्थान झाल्याबरोबर तेथचें स्मरण घेऊन आली.

तेथें अभाव जरी असता । तरी उत्थानीं प्राप्त न होता । तस्मात् वासनारूपें अहंता । इचा सुषुप्तींत अभाव नाहीं ॥४
हे असो सुषुप्तीची कथा । परी मृत्युकाळीं हानी नोहे सर्वथा । सर्वही घेऊन बैसली माथां । अनंत जन्मींचें केलें ॥५॥
जेवीं घोकिलें जन्मवरी । न म्हणतां न विसरे तिळभरी । तेवीं वासनेमाजी सामग्री । अनंत जन्मींची असे ॥ ६ ॥
स्वरूपाहून वेगळी पडली । तधीं पासून जीं जीं कर्में केलीं । तीं तीं माथां घेऊन बैसली । तया नांव संचित ॥७॥
जोंवरी ज्ञान नोव्हे प्राप्त । तों काळ हें न जळे संचित । भोगणेंचि लागे अकस्मात् । जें विभागा जे क्षणीं ॥ ८ ॥
एका देहीं शत योनींचें । कर्म केलें पापपुण्याचें । तितुकें एकदाचि भोगा नवचे । एकेक भोगावें लागे ॥ ९ ॥
शतांतील नव्याण्णव रहाती । एक योनीसी एक घेऊन येती । तेथेंही शत योनींचीं कर्में होतीं। त्यांतीलही एक भोगासी ये ११०
ऐसें अनंत जन्मींचें सांचलें । भोगा येऊन जें जें उरलें । तितुकें वासनेमाजी गुप्त राहिलें । तया नांव संचित॥११॥
देहा येऊन जें जें करी । तें तें क्रियमाण निर्धारी । प्रस्तुत भोगुनियां सारी । तें प्रारब्ध देहारंभक ॥ १२ ॥
एवं प्रारब्ध संचित क्रियमाण । कर्तेपणें बैसलीसे घेऊन। हेचि वासना बैसली बळाऊन। अनंत कल्पें जरी आतां १३
कल्पांतींही अभाव नसतां । या मृत्यु सुप्तींत कायसी वार्ता । एवं ऐसी वासनारूप अहंता। इचेंचि नाम सूक्ष्म देह१४
ऐसिया लिंगदेहावांचून । स्थूळदेहासी कैंचें वर्तन । म्हणोनि वासनायोगें जन्ममरण । प्राणियां होय ॥ १५ ॥
पूर्ववासनेनें देह केला । तो प्रारब्ध सरतांचि पुन्हां मेला । पुढें दुसरा देह अवलंबिला । मृत्युकाळीं ॥ १६ ॥
अळिका जेवीं पुढील पाय । धरोनि मागील सोडिती होय । तेवीं पुढील देह धरोनि जाय । हा देह सोडूनी ॥ १७ ॥
ऐसे अनंत जन्म नानायोनी । किती जाले कोण वाखाणी । पुढें होणार तेंही लेखनीं । नये कवणाच्या ॥ १८ ॥
जेधवां आपुलें अज्ञान फिटेल । स्वस्वरूप ज्ञान प्राप्त होईल । तेधवांचि हे वासना निमेल । येरवीं न नासे ॥ १९ ॥
कल्पवरी अग्नींत जळेना । पाणिया माजी विघुरेना । बहुत कासयासी वल्गना । सहस्रधा योगेंही न निमे ॥ १२० ॥

---

तेथें जर तिचा अभाव असता, तर स्फूर्तीचें उत्थान झाल्यावर आठव स्मरला नसता. तो आठव स्मरतो म्हणून वासनारूप अहंतेचा सुषुप्तींत अभाव नाहीं. झोंपेची ही गोष्ट असो; परंतु मृत्युकाळींही हिचा अभाव नाहीं. ही अनंत जन्मींचें केलेलें माथीं घेऊन बसली. जसें घोकिलेलें जन्मपर्यंत म्हटलें नाहीं तरी तिळभर विसरत नाहीं. तशी वासनेमध्यें अनंत जन्मींची सामग्री जमलेली आहे.

**संचित**—स्फूर्ति स्वरूपापासून जेव्हां वेगळी झाली, तेव्हांपासून जीं जीं कर्में केलीं तीं तीं माथीं घेऊन बसली, याला संचित म्हणतात.

जोंपर्यंत ज्ञान प्राप्त झालें नाहीं, तोंपर्यंत हें संचित जळावयाचें नाहीं. तें जेव्हां जेव्हां जसें जसें वांट्यास आलें तसें तसें तेव्हां तेव्हां भोगिलेंच पाहिजे. एका देहांत शंभर योनींचें पापपुण्यात्मक कर्म घडतें. इतकें एकदांच भोगास येत नाहीं, तर त्यांतील एकेक भोगावें लागतें. एका देहीं केलेल्या शंभर योनींच्या कर्मांपैकीं एक भोगिलें असतां, बाकी नव्याण्णव योनींचें कर्म राहिलें. एका योनींत एक योनीचें कर्म भोगीत आहे तों त्या योनींत पुन्हां शंभर योनींचें कर्म होईल, त्यांपैकीं एक योनीचें भोगास येऊन बाकीचीं नव्याण्णव योनींचीं कर्में शिल्लक रहातील. याप्रमाणें भोगास येऊन अनंत जन्मींचीं जीं कर्में सांचलेलीं उरतात तीं सर्व वासनेंत गुप्त आहेत. त्यांस संचित असें म्हणतात.

**क्रियामाण**—देहास येऊन जें जें करितो त्यास क्रियमाण म्हणतात.

**प्रारब्ध**—देहाचे आरंभापासून अंतापर्यंत जें कर्म भोगून सरवितो किंवा एका देहाचे भोगवट्यास संचितापैकीं जें कर्म येतें त्यास प्रारब्ध म्हणतात.

संचित क्रियमाण आणि प्रारब्ध यांचा कर्तेपणाचा अभिमान घेऊन हीच वासना अनंत कल्पें बसली अशी जी वासनारूप अहंता, हिलाच सूक्ष्मदेह म्हणतात. सूक्ष्मदेहावांचून स्थूलदेह वर्तत नाहीं. म्हणून वासनेचे योगानें प्राण्यास जन्ममरण प्राप्त होतें. पूर्वीच्या वासनेनें देह उत्पन्न होतो; तो प्रारब्ध सरतांच मरतो. पुढें मेल्यावर दुसरा देह धरितो. जशी कीड पुढचे पाय धरिते तेव्हां मागचे पाय सोडिते, तशी वासना दुसरा देह धरिते तेव्हां मागला देह सोडिते. याप्रमाणें अनंत योनींत अनंत जन्म होतात. त्यांची गणना करितां येत नाहीं. जेव्हां आपलें अज्ञान नाहींसें होईल, व स्वस्वरूपाचें ज्ञान होईल तेव्हांच ही वासना नाहींशी होईल, येरव्हीं व्हावयाची नाहीं. या वासनेस कल्पपर्यंत जरी अग्नींत घातलें तरी ती जळावयाची नाहीं. तसेंच तीस कल्पपर्यंत पाण्यांत ठेविलें तरी ती वितुळावयाची नाहीं. फार काय सांगूं, ही घालविण्याकरितां ज्ञानावांचून हजारों उपाय केले तरी ही नाहींशी होणार नाहीं;

असो ऐसी वासना दृढ । हाचि सूक्ष्म देह वाड । वर्तवित असे स्थूळ जाड । जो जो प्राप्त ज्या क्षणीं ॥ २१ ॥
ऐसिया लिंगदेहाचे प्रकार । सत्रा भिन्न भिन्न साचार । तेचि ऐकावे सविस्तर । बोलिजे असे ॥ २२ ॥
एका वृत्तीचे प्रकार दोन । एक बुद्धि दुजें मन । संकल्प जो होणें । हें मनाचें रूप ॥ २३ ॥
पुढें निश्चय करी ते बुद्धि । ऐसे दोन प्रकार जाले आधीं । यांत जाणतेपणा जो त्रिशुद्धी । आला असे ॥ २४ ॥
याचि नांवें ज्ञानशक्ति । भोक्ता सत्वगुणात्मक वृत्ती । याचेही प्रकार पांच होती । व्यापारभेदें ॥ २५ ॥
श्रोत्रेंद्रियासी येऊनि । ऐकूं लागे शब्दालागुनी । तयासी श्रोत्र बोलिजे वचनीं । द्वार निर्गमाचें ॥ २६ ॥
त्वचाद्वारें स्पर्श घेणें । तयासी त्वगिंद्रिय म्हणणें । चक्षुद्वारां जयां पहाणें । तोचि चक्षु ॥ २७ ॥
जिव्हेंद्रियें रस घेणें । सुगंध निवडिजे घ्राणें । एवं पांचही बहिःकरणें । मन बुद्धीचीं ॥ २८ ॥
आंतील इंद्रिय अंतःकरण । ज्ञानेंद्रिया नाम बहिःकरण । यवं सातही जालीं लक्षणें । वृत्तिरूप ज्ञानाचीं ॥ २९ ॥
स्फूर्तींत जाणीव जे होती । तिचे प्रकार बोलिले असती । आतां चळणरूप जे जे वावरती । तेचि प्राण ॥ ३० ॥
जाणीव मन बुद्धीकडे गेली । नुसती जडता जे उरली । ते नाडीद्वारा फिरों लागली । तोचि प्राण ॥ ३१ ॥
व्यापारभेदें तोचि प्राण । पंचधा जाला संपूर्ण । व्यान समान उदान प्राण । अपान पांचवा ॥ ३२ ॥
अधो वाहे तो अपान । ऊर्ध्व वाहे तोचि प्राण । उभयांची ग्रंथी तो समान । नाभिस्थानीं ॥ ३३ ॥
कंठीं उदान रहातसे । व्यान सर्वांगीं विलसे । या पंचप्राणांच्या सहवासें । कर्मेंद्रियां चळण ॥ ३४ ॥
वाचा पाणी आणि पाद । चवथें उपस्थ पाचवें गुद । एवं हीं कर्मेंद्रियें प्रसिद्ध । क्रियारूप प्राणा ऐसीं ॥ ३५ ॥
पाणी पाद उपस्थ गुद । हीं चार तों कर्मेंद्रियें प्रसिद्ध । परी वाणी माजी द्विविध । ज्ञान क्रिया असे ॥ ३६ ॥

---

असो. अशी जी दृढ वासना हाच सूक्ष्म देह हा देह ज्या ज्या वेळीं जो जो प्राप्त होणारा जड स्थूळ देह त्यास वागवितो.

### लिंग देहाचे सत्रा तत्वांचें विवेचन.

एका वृत्तीचे दोन प्रकार; एक मन, दुसरी बुद्धि. संकल्प विकल्प होतो, त्यास मन म्हणतात. जी वृत्ति निश्चय करिते, तीस बुद्धि म्हणतात. मन आणि बुद्धि ह्या दोहोंत जाणतेपणा आहे यालाच ज्ञानशक्ति म्हणतात. मन बुद्धि ही सत्वगुणात्मकवृत्ति, ही भोक्ता आहे. ह्या सत्वगुणात्मक वृत्तीचे व्यापारभेदानें पांच प्रकार होतात.

**श्रोत्र**—जी वृत्ति कानांत येऊन त्या कानाचे द्वारानें शब्द ऐकूं लागते तीस श्रोत्र म्हणतात.

**त्वगेंद्रिय**—कातडींत येऊन तिचे द्वारानें जी वृत्ति स्पर्श घेते तीस त्वगेंद्रिय म्हणतात.

**चक्षुरिंद्रिय**—जी वृत्ति नेत्रांत येऊन नेत्रांचे द्वारानें रूप पहाते तीस चक्षुरिंद्रिय म्हणतात.

**जिव्हेंद्रिय**—जी वृत्ति जिभेचे योगानें रस चाखते तीस जिव्हेंद्रिय म्हणतात.

**घ्राणेंद्रिय**—जी वृत्ति नाकांत येऊन नाकाचे द्वारें सुगंध दुर्गंध घेते तीस घ्राणेंद्रिय म्हणतात.

मन, बुद्धि हीं आंतील इंद्रियें म्हणून यांस अंतःकरण म्हणतात, व वरील पांच ज्ञानेंद्रियें हीं बाहेरील इंद्रियें म्हणून यांस मन बुद्धीचीं बहिःकरणें म्हणजे बाहेरील क्रिया करावयाचीं साधनें असें म्हणतात. मन, बुद्धि व पांच ज्ञानेंद्रियें मिळून वृत्तीपासून ज्ञानाचीं सात लक्षणें होतात. याप्रमाणें स्फूर्तींत जी जाणीव आहे तिचे हे सात प्रकार झाले. आतां चंचळपणानें जे वावरतात त्यांस प्राण म्हणतात.

**प्राण**—स्फूर्तींतील जाणीव मन बुद्धीकडे गेल्यावर जी जडता उरते ती नाडीद्वारानें फिरूं लागते. तेव्हां तीस प्राण असें म्हणतात.

प्राणाचे व्यापारभेदानें पांच प्रकार झाले आहेत. १ व्यान २ समान ३ उदान ४ प्राण ५ अपान.

**व्यान**—जो वायु सर्वांगांत राहून नाडी द्वारानें वावरून तृप्ति देतो तो व्यान.

**समान**—जो वायु नाभीचे ठिकाणीं राहून सांधे हालवितो व जो केवळ प्राण आणि अपान यांची गांठच तो समान.

**उदान**—जो वायु कंठीं राहून क्षुधा तृषा उत्पन्न करितो तो उदान.

**प्राण**—जो वायु हृदयांत राहून वर वाहत असतो त्याचे योगानें जीवास सुख होतें, तोच प्राण.

**अपान**—जो वायु खालीं वहात असून मलोत्सर्ग करितो तोच अपान.

पांच कर्मेंद्रियें १ वाचा २ पाणी ३ पाद ४ उपस्थ ५ गुद यांस पांच प्राणांचे योगानें चलन आहे म्हणून हींही प्राणासारखींच क्रियारूप आहेत. परंतु त्यांत वाणी-खेरीज बाकीचीं कर्मेंद्रियेंच आहेत. पांचवी वाणी ही क्रियारूप व ज्ञानरूप अशी दोन प्रकारची आहे म्हणून ती कर्मेंद्रियांत व केव्हां ज्ञानेंद्रियांतही मोडते.

वैखरी जे शुद्ध बोलणें । हें तों क्रियारूप होणें । मध्यमेमाजी असती लक्षणें । ज्ञान क्रिया दोन्ही ॥ ३७ ॥
परा आणि दुजी पश्यंती । ह्या दोन्ही ज्ञानरूप असती । तेथें क्रियेची समाप्ति । असे सहसा ॥ ३८ ॥
एवं मन बुद्धि ज्ञानेंद्रिय । पंचप्राण कर्मेंद्रिय । हा सत्रा तत्वांचा समुदाय । लिंगदेह बोलिजे ॥ ३९ ॥
इतुकीं सत्रा तत्वें बोलिलीं । हीं सर्व वासनेचीं विभागलीं । परी हीं भूतांपासून जालीं । यास्तव भौतिक ॥ १४० ॥
भूतांचे जे गुण तीन । तेच द्रव्य शक्ति क्रिया ज्ञान । द्रव्य शक्ति जो तमोगुण । तींच विषय भूतें ॥ ४१ ॥
आतां क्रिया ज्ञान दोन्ही शक्ति । भूतांपासून केवीं होती । हेच लिंगदेहाची उत्पत्ति । अपंचीकृत बोलिजे ॥ ४२ ॥
गुण भूतें कालवलीं । जे अष्टधा बोलिजे पहिलीं । तेचि सत्रा तत्वें पसवली । ईक्षणें ईशाचे ॥ ४३ ॥
आकाशाचा सत्व गुण । श्रोत्रेंद्रिय जालें निर्माण । त्वगिंद्रिय होय उत्पन्न । वायु सत्वांशाचें ॥ ४४ ॥
चक्षु तेज सत्वांशाचें । जिव्हेंद्रिय तें आप सत्वाचें । घ्राण तें पृथ्वी सत्वांशाचें । ज्ञानेंद्रियें पांच ऐसीं ॥ ४५ ॥
पांचांपासून पांच वेगळाले । जाले तें असाधारण कार्य बोलिलें । आतां साधारण कार्य उभवलें । भूत सत्वांशाचें ॥ ४६ ॥
पांचांचें येकदांचि काढिलें । सत्वांशें जें कां द्रव्य निघालें । तेंचि अंतःकरण विभागलें दों प्रकारें ॥ ४७ ॥
मन बुद्धि प्रकार दोन । व्यापारभेदें अभिधान । एवं ज्ञानशक्तीचें सप्तधा लक्षण । भूत सत्वांशाचें ॥ ४८ ॥
आतां भूतरजांशाची उत्पत्ति । जाली असे ते बोलिजेती । तेही साधारण असाधारण असती । शक्ति क्रियात्मक ॥ ४९ ॥
आकाश रजांशाची वाचा । पाणी वायु रजांशाचा । पाद तो तेज रजाचा । उपस्थ आप रजाचें ॥ १५० ॥
पृथ्वी रजाचें गुद । एवं पंचकर्मेंद्रियें प्रसिद्ध । हें असाधारण बोलिजे सिद्ध । वेगळालें म्हणोनी ॥ ५१ ॥
आतां साधारण रजोभूतांचा । येकदांच काढिला सर्वांचा । तोचि प्राण पंचधा साचा । व्यापारभेदें जाला ॥ ५२ ॥
हृदयीं वाहे तो प्राण । तेणें सुख होय जीवालागून । विसर्ग करी तो अपान । अधोगामी ॥ ५३ ॥
समान तो संधी हालवी । उदान तो क्षुत्पान करवी । सर्व नाडीद्वारा वृत्ति यावी । वावरून व्यानें ॥ ५४ ॥
एवं पंचप्राण कर्मेंद्रिय । हा दशधा भूतरजाचा समुदाय । पहिले सात मिळून अन्वय । सत्रातत्वें ॥ ५५ ॥
ऐसें हें भूतांपासून जालें । अपंचीकृत भौतिक पहिलें । पुढें पंचीकृत करून जें निर्मिलें । स्थूळ देहासी ॥ ५६ ॥

वाणी चार प्रकारची आहे. १ परा २ पश्यंति० ३ मध्यमा ४ वैखरी. वैखरी ही क्रियारूप आहे. परा व पश्यंतिवाचा ज्ञानरूप आहेत, व मध्यमावाचा ज्ञान व क्रिया अशा दोन प्रकारची आहे.

मन, बुद्धि, पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें व पांच प्राण मिळून सत्रा तत्त्वें यांस लिंगदेह म्हणतात. हा सत्रा तत्वांचा लिंगदेह वासनेचा विभागलेला आहे. परंतु हीं वरील सत्रा तत्वें भूतांपासून झालेलीं आहेत. ह्मणून यांस भौतिक ह्मणतात. भूतांची जी द्रव्यशक्ति तोच तमोगुण. क्रियाशक्ति तोच रजोगुण. ज्ञानशक्ति तोच सत्वगुण. तमोगुणद्रव्यशक्ति तेच पंचविषय. हे भूतांपासून झालेले आहेत. यांखेरीज ज्या दोन क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति ह्या भूतांपासून होत नाहींत, ह्मणून लिंगदेहाची उत्पत्ति अपंचीकृत आहे. तीन गुण व पंचभूतें मिळून होणारी अष्टधाप्रकृति, ही ईश्वराचे ईक्षणानें सत्रा तत्त्वें व्याली. त्यांत साधारण कार्य व असाधारण कार्य असे दोन प्रकार आहेत. जें वेगवेगळाले भूतापासून वेगळालें कार्य उत्पन्न झालें आहे ह्मणून त्यास अपंचीकृत असाधारण कार्य ह्मणतात व पांच भूतांपासून एकदम जें कार्य उत्पन्न झालें त्यास साधारण कार्य ह्मणतात. भौतिकाचे दोन प्रकार. एक पंचीकृत व एक अपंचीकृत. पंचीकृत भौतिक स्थूळदेह, व अपंचीकृत भौतिक सूक्ष्मदेह. गुण व भूतें यांपासून साधारण कार्य व असाधारण कार्य हीं कोण कोण कशीं कशीं उत्पन्न झालीं, हें कळण्याकरितां खालीं कोष्टक दिलें आहे.

**अष्टधा प्रकृतीचें साधारण व असाधारण कार्याचें कोष्टक.**

| | असाधारण कार्य. | | | | | | साधारण कार्य. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| भक्ति. | गुण. | आकाशा. | वायूपा. | तेजापा. | आपापा. | पृथ्वीपा. | पांचांपासून एकदम |
| ज्ञानशक्ति सात प्रकारची. | सत्वगुणापासून. | श्रोत्र. | त्वचा. | चक्षु. | जिव्हा. | घ्राण. | मन बुद्धि. |
| क्रियाशक्ति दहा प्रकारची. | रजोगुणापासून. | वाचा. | पाणी. | पाद. | उपस्थ. | गुद. | पंचप्राण. |

तया स्थूळदेहा माझारीं । सत्रा घेऊन राहिलीं सारीं । मन प्राण हे राहती अंतरीं । गोलकीं दशेंद्रियें ॥ ५७ ॥
इतुकीं मिळून एक वासना । विभागली ते बोलिली वचना । व्यापार याचे ते वर्णना । पुढें करणें ॥ ५८ ॥
असो वासना तिकडे सत्रा जाती । झोंपेंत तरी गुप्त राहती । जडत्वें प्राण मात्र वावरती । क्रियेवांचून ॥ ५९ ॥
जेव्हां प्राण प्रयाणसमय । तेव्हां वासना जो जो धरी काय । ते समयीं हा सर्व समुदाय । जाय तिकडे तिकडे ॥ १६० ॥
देहांत प्राण जेव्हां प्रगटती । मन बुद्धि तेथें उमटती । आणि इंद्रियें हीं वावरती । स्वस्वव्यापारीं ॥ ६१ ॥
म्हणोनि ज्ञान कर्मेंद्रियांसहित । प्राण मन बुद्धि विख्यात । हे लिंगदेहग सर्व असत । वासना तिकडे सत्रा ॥ ६२ ॥
एवं स्थूळ सूक्ष्म देह दोन । याचें केलें निरूपण । आतां तिसरें याचें कारण । शरीर केवीं तें बोलिजे ॥ ६३ ॥

**अज्ञानकारणं साक्षि बोधस्तेषां विभासकः ।**
**बोधाभासो बुद्धिगतः कर्ताऽस्यात्पुण्यपापयोः ॥ २ ॥**

अज्ञान हेंचि कारण शरीर । यासी आत्मा साक्षी भासकर । बुद्धि प्रतिबिंबरूप विकार । तो बोधाभास जीव ॥ ६४ ॥
तोचि पुण्यपापाचा कर्ता । सुखदुःख भोगी तत्वतां । एक माथां घेऊन अहंता । देहबुद्धीची ॥ ६५ ॥
देहद्वय जालें जें निर्माण । कांहीं निमित्तास्तव होय दर्शन । तेंचि कारण शरीर अज्ञान । कल्पावें लागे ॥ ६६ ॥
जेवीं अंधारीं सर्प दिसे । हा कासयानें जाला असे । तया कल्पावें लागे अपैसें । दोरीचें न कळणें ॥ ६७ ॥
सर्पावरून न कळणें भावावें । परी तयासी रूप नोव्हे । तेवींच अज्ञान आहेसें कल्पावें । देहद्वय दिसतां ॥ ६८ ॥
अज्ञान म्हणजे न कळणें । निजरूपाचें विस्मरणें । हें आधीं जालियाविणें । देहद्वय भासतीना ॥ ६९ ॥
हें अज्ञान म्हणसी कोणा । तरी नव्हे आत्मया आपणा । जेवीं दोरीचिये अज्ञाना । दोरिसी नाहीं ॥ १७० ॥
दोरीहून दोरीस पाहणार । जयासी होय मंदांधकार । न कळणियाचा विकार । तयासी जाला ॥ ७१ ॥
तेवीं स्वस्वरूप जें असंग । पहिलें स्वतःसिद्ध अभंग । तेथें स्फूर्ति हें माया सोंग । न होऊन जालें ॥ ७२ ॥
जालें तें जरी सत्य असतें । तरी मायानामें कां उच्चारितें । तस्मात् जालेंच नसतां तयातें । जालेंसें कल्पिलें ॥ ७३ ॥
स्फूर्ति म्हणजे अहंब्रह्म-स्फुरण । उगीच आपआपली आठवण । जेवीं वायूची झुळूक उत्पन्न । गगना नातळतां उठे ॥ ७४ ॥
तेवीं स्वरूपाची स्फूर्ति । उठे परी स्वरूपा आरती । असो तया स्फुरणीं असती । ज्ञानाज्ञानें ॥ ७५ ॥

---

स्थूळदेहाचे आंत मन, बुद्धि व प्राण हे रहातात, व दश इंद्रियें त्या देहाचे बनलेल्या गोलकांत रहातात. याप्रमाणें सत्रा तत्त्वांचा सूक्ष्मदेह, स्थूलदेहांत राहिला, तो सत्रा तत्वांचा सूक्ष्मदेह वासनेचा आहे. ह्मणून वासना जिकडे जाईल तिकडे तीं सत्रा तत्त्वें जातात. झोंपेंत प्राण मात्र जडत्वानें क्रियेवांचून वावरतात व बाकीचीं तत्त्वें गुप्त असतात. जेव्हां, प्राणप्रयाण समय येतो, तेव्हां वासना जो देह धरिते तिकडे तीं सत्रा तत्वें जातात. ज्या वेळीं देहांत प्राण येतात त्यावेळीं मन, बुद्धि, इंद्रियें हीं येतात व तीं आपापले व्यापार करूं लागतात.

## कारणशरीराचें वर्णन.

**अर्थः—**अज्ञान हेंच कारणशरीर, यास भासविणारा व साक्षी आत्मा आहे व बुद्धि प्रतिबिंबरूपविकार तो बोधाभास जीव आहे, तो पुण्यपापाचा कर्ता आहे, तोच सुखदुःख देहबुद्धीची अहंता घेऊन भोगतो. स्थूल सूक्ष्म हे दोन देह अकल्पित उत्पन्न झाले, म्हणून त्यास उत्पन्नकर्ते कारण शरीर अज्ञान हें कल्पावें लागलें. जसें अंधारांत सर्प भासला म्हणजे तो दोरीचे न कळण्यामुळें भासला हें उघड आहे. सर्पभासामुळें दोरीचें न कळणें जसें मानावें लागलें, तसें दोन देहांमुळें अज्ञान आहेसें कल्पावें लागलें. न कळण्यास जसें रूप नाहीं, तसें अज्ञानासही रूप नाहीं. अज्ञान म्हणजे न कळणें, निजरूपाचें विस्मरण हें झाल्यावांचून दोन देह भासावयाचे नाहींत. हें अज्ञान आपण जो आत्मा त्यास नाहीं. जसें दोरीचें अज्ञान दोरीस नाहीं, तर तिला पहाणारा जो तिसरा गृहस्थ ज्यास मंद अंधकारामुळें दोरी कळली नाहीं, त्यास आहे. तसें स्वस्वरूप जें ब्रह्म त्याच्या ठायीं स्फूर्ति हें सोंग न होऊन झालें. तें जर खरें असतें तर त्यास माया असें कोणी म्हणतेना. झालेंच नाहीं, त्याला झालेंसें कल्पिलें, तीच माया होय.

स्फूर्ति म्हणजे अहंब्रह्मस्फुरण म्हणजे उगीच आपापली आठवण. जशी वायूची झुळूक आकाशास न लागतां उठते, तशी स्फूर्ति स्वरूपास न लागतां तेथूनच उठते, पण ती स्वरूपाच्या अलीकडची आहे, व तींत ज्ञान व अज्ञान हीं आहेत.

स्फूर्तीत स्फूर्तीचें कळणें । तयासी नाम ठेविलें ज्ञान । येर स्वरूप जें चिद्घन । विस्मरण जें तया ॥ ७६ ॥
त्या विस्मरणा अज्ञान नांव । तस्मात् स्फुरणासि आली नेणीव । आणि ज्ञानही तेथेंचि आठव । रूप जालें असे ॥ ७७ ॥
स्वरूपीं वृत्तीच असेना । विस्मरण कैंचें जें आठवीना । यास्तव अतीत तें ज्ञानाज्ञाना । असे तैसें आहे ॥ ७८ ॥
स्फुरण होतांच तेथें उठलें । ज्ञानाज्ञान उत्पन्न जालें । तें ज्ञान परि न जाय कल्पिलें । चिद्रूपासम ॥ ७९ ॥
पाणियामाजी सूर्य बिंबला । तेथें प्रकाशही दिसों लागला । परी तो सूर्याचा नोव्हे भास जाला । मिथ्या उपाधीस्तव ॥ १८० ॥
तेवींच चिद्रूपता अनंताची । स्फुरणीं प्रति भासली मिथ्याची । ते मानिजेना स्वस्वरूपाची । कवणेंही काळीं ॥ ८१ ॥
तस्मात् ज्ञानही असेना जेथें । तरी केवीं कल्पावें अज्ञान तेथें । हें विचारवंतें जाणावें समर्थें । व्यर्थचि येरां ॥ ८२ ॥
असो स्फुरणीं जें ज्ञानाज्ञान । तींच विद्या अविद्या ह्या दोन । आवरणशक्ति अविद्या म्हणून । विक्षेपशक्ति विद्या ॥ ८३ ॥
दोरीचें जें आवरक । तें आवरण शक्तीचें रूपक । सर्पाचें जें उत्पादक । ते विक्षेपशक्ति ॥ ८४ ॥
तेवींच स्वस्वरूपाचें आच्छादन । तें आवरण शक्तीचें लक्षण । जगाचें जें उत्पादन । ते विक्षेपशक्ति ॥ ८५ ॥
असो विद्येंत जें प्रतिबिंबित । चित्ता ऐसा भास दिसत । तो ईश्वर कर्ता सर्व जगांत । नाम ठेविलें ॥ ८६ ॥
अविद्या प्रतिबिंबित जीव । चिदाभास उमटला स्वभाव । हाचि भोक्ता जाला सर्व । सुखदुःखाचा ॥ ८७ ॥
परी हा देहद्वय न होतां । अज्ञानगर्भी जाला राहता । गुप्त असून जगा समस्ता । उपादान-कारण असे ॥ ८८ ॥
प्रतिबिंबयुक्त अविद्या माया । उपादान कारण जगा यया । तेवींच निमित्तकारण शिष्यराया । विद्यासह ईश ॥ ८९ ॥
नेणिवेचा जो जडपणा । आणि विद्यारूप विक्षेप जाणा । या उभयांस्तव जाली रचना । चंचळ जडाची ॥ १९० ॥
तेंचि ऐकावें कैसें कैसें । उत्पन्न जालें असे जैसें । मुळीं स्फुरण तों येकचि असे । ज्ञानाज्ञान रूप ॥ ९१ ॥
ज्ञानाचा जाला सत्वगुण । अज्ञानाचा तमोगुण । उभयात्मकें रजोगुण । जाला असे ॥ ९२ ॥
स्फुरणींच जें छिद्र पडिलें । म्हणजे चिद्घन असतां स्फुरण जालें । तया अवकाशा नाम ठेविलें । आकाश ऐसें ॥ ९३ ॥

---

**ज्ञान**—स्फूर्तीत स्फूर्तीचें कळणें त्यास ज्ञान म्हणतात.

**अज्ञान**—स्वरूपाचें विस्मरण त्यास अज्ञान म्हणतात.

वरील ज्ञानअज्ञानाचे लक्षणावरून ज्ञानअज्ञान हें स्फुरणास आहे. स्वरूपीं वृत्तीच नाहीं तेव्हां त्या वृत्तीस स्मरण किंवा विस्मरण कोठून असेल ? स्मरणविस्मरण नाहीं, म्हणूनच तें ज्ञानाज्ञानातीत आहे, असें समजावें. स्फूर्तींतील ज्ञान हें चिद्रूपासमान नाहीं. जसा पाण्यांत सूर्य बिंबला असतां प्रकाश दिसतो, परंतु तो प्रकाश सूर्याचा नव्हे, तर खोटा, उपाधीमुळें भास झाला. तसें चिद्रूपाचें ज्ञान स्फुरणांत प्रतिभासलें तें आत्म्याचें आहे, असें मानूं नये. तर तें स्फुरण उपाधीमुळें भासलें, तें खोटें, असें समजावें. तेव्हां स्वरूपाचे ठिकाणीं ज्ञान नाहीं, मग अज्ञान कोठून असेल !

**विद्या**—स्फुरणांतील जें ज्ञान त्यास विद्या म्हणतात.

**अविद्या**—स्फुरणांतील जें अज्ञान त्यास अविद्या म्हणतात.

अविद्या आवरणशक्ति व विद्या विक्षेपशक्ति आहे.

**आवरणशक्ति**—दोरीला जी आच्छादणारी तीस आवरणशक्ति म्हणतात.

**विक्षेपशक्ति**—दोरी न समजूं देतां दोरीचे ठिकाणीं सर्प दाखविणारे शक्तीस विक्षेपशक्ति म्हणतात.

स्वरूपाला आवरणारी अशी जी अविद्या ती आवरणशक्ति व स्वस्वरूपास न समजूं देतां जग दाखविणारी अशी जी विद्या ती विक्षेपशक्ति.

**कर्ता**—विद्येंत जो प्रतिबिंबणारा ईश्वर ज्याचा चित्तासारखा भास आहे तो कर्ता होय.

**भोक्ता**—अविद्येंत प्रतिबिंबणारा, ज्याचा चित्तासारखा भास आहे तो सुखदुःखाचा भोक्ता जीव होय.

जोंपर्यंत दोन देह उत्पन्न झाले नाहींत, तोंपर्यंत जीव गुप्तरूपानें अज्ञानगर्भात सर्व जगास उपादान कारण होत आहे. याप्रमाणें प्रतिबिंबरूपयुक्त अविद्या सर्व जगास उपादान कारण आहे, व विद्येसह ईश्वर सर्व जगास निमित्त कारण आहे.

**जड**—नेणिवेचा जो जडपणा त्यास जड म्हणतात.

**चंचल**—विद्यारूप विक्षेप त्यास चंचळ म्हणतात.

## जडचंचळ यांच्या रचनेचें विवेचन.

प्रथम ज्ञानाज्ञानरूप स्फुरण, त्या स्फुरणांतील जें ज्ञान, त्याचा सत्वगुण झाला. व त्यांतील अज्ञानाचा तमोगुण झाला. सत्वगुण आणि तमोगुण मिळून रजोगुण झाला. चित्घन असतां स्फुरण झालें हेंच त्याचें ठिकाणीं छिद्र झालें. या छिद्ररूपी अवकाशास आकाश म्हणतात.

स्फुरणाचा जो चंचळपणा । तो वायूचे पावला अभिधाना । भासलें स्फुरण तें वचना । तेज बोलिजे ॥ ९४ ॥
मृदु स्फुरण तेंचि आप । कठिण अज्ञान पृथ्वीचें रूप । एवं हे अष्टाधा सूक्ष्मत्वें अल्प । स्फुरणींच असे ॥ ९५ ॥
पुढें तमोगुणापासून । स्पष्टत्वा आलीं भूतें संपूर्ण । एकेक भूत भिन्न भिन्न । दिसूं लागलें ॥ ९६ ॥
शब्दामुळें आकाश जालें । कीं अवकाशीं शब्दा स्फुरणत्व आलें । तेंचि आकाश नाम पावलें । शब्द विषय तन्मात्रा ॥ ९७ ॥
स्पर्शामुळें वायु जाला । वायूमुळें स्पर्श उठिला । यास्तव वायु हा नाम पावला । स्पर्श विषय तन्मात्रा ॥ ९८ ॥
रूपामुळें तेज जालें । रूपही भासकत्वें उठिलें । यास्तव तेज नाम त्या ठेविलें । रूप विषय तन्मात्रा ॥ ९९ ॥
रसामुळें जालें आप । आपास्तव रसासी रूप । तस्मात् आप हा तयासी जल्प । रस विषय तन्मात्रा ॥ २०० ॥
गंधामुळें पृथ्वी जाली । पृथ्वींत गंधता उमटली । यास्तव पृथ्वी हें नाम पावली । गंध विषय तन्मात्रा ॥ १ ॥
आकाशीं अवकाश धर्म । सच्छिद्रता असे कर्म । शब्द गुण हा असे नेम । त्यापासून वायु ॥ २ ॥
शब्द स्पर्श वायु द्विगुण । धर्म जयाचा चंचळपण । कर्म हेंचि सर्वत्रीं विहरण । त्यापासाव तेज ॥ ३ ॥
शब्द स्पर्श रूप त्रिगुण तेज । दहन-कर्म हा सतेज । पचन-कर्म हें असे सहज । त्यापासून आप ॥ ४ ॥
शब्द स्पर्श रूप रस गुण । द्रवत्व धर्म आपीं संपूर्ण । क्लेदनत्व कर्म हें गहन । त्यापासाव पृथ्वी ॥ ५ ॥
शब्द स्पर्श रूप रस गंध । हे पांचही पृथ्वींत प्रसिद्ध । कठिण धर्म हा विशुद्ध । धारणा कर्म ॥ ६ ॥
एवं तन्मात्रासहित भूतें । तमोगुण द्रव्यशक्ति जे ते । हेंचि स्थूळ रहावया चराचर रातें । त्रिभुवनात्मक जालें ॥ ७ ॥
ऐसी ये भूततमाची उत्पत्ति । सांगितली अल्प रीती । भूत रजसत्वाची जी जी होती । ती सांगितली मागां ॥ ८ ॥
जो लिंगदेह सत्रा कळांचा । मागें विस्तार बोलिला त्याचा । तेवीं प्रकार पंचीकरणाचा । बोलिला असे ॥ ९ ॥

---

**वायु**—स्फुरणाचा जो चंचळपणा त्यास वायु म्हणतात.

**तेज**—स्फुरण भासलें त्यास तेज म्हणतात.

**पाणी**—मृदु स्फुरण तेंच पाणी.

**पृथ्वी**—कठीण अज्ञान तीच पृथ्वी.

याप्रमाणें ही तीन गुण व पांच भूतें मिळून होणारी अष्टधाप्रकृति सूक्ष्मरूपानें स्फुरणांतच आहे. पुढें तमोगुणांपासून पंचभूतें स्पष्ट होऊन निरनिराळीं दिसूं लागलीं. शब्दामुळें आकाश झालें किंवा अवकाशांत शब्द स्फुरण पावला. तेंच शब्दविषयतन्मात्रा आकाश. स्पर्शामुळें वायु किंवा वायुमुळें स्पर्श उत्पन्न झाला. तोच वायु स्पर्शरूप तन्मात्रा वायु होय. रूपामुळें तेज झालें. रूपही भासकत्वानें उत्पन्न झालें. म्हणून तें रूपविषयतन्मात्रातेज समजावें. रसामुळें आप झालें, किंवा आपामुळें रसास रूप आलें. तेंच रसविषयतन्मात्रा आप समजावें. गंधामुळें पृथ्वी झाली, किंवा गंधांत पृथ्वी उत्पन्न झाली. तीच गंधविषयतन्मात्रा पृथ्वी समजावी.

## पंचभूतांचे धर्म, कर्म आणि गुण यांविषयीं कोष्टक.

| | आकाशाचे. | वायूचे. | तेजाचे. | आपाचे. | पृथ्वीचे. |
|---|---|---|---|---|---|
| धर्म. | अवकाश. | चंचळपणा. | दहन. | द्रवत्व. | कठीणपणा. |
| कर्म. | सच्छिद्रता. | सर्व ठिकाणीं विहार. | पचन. | क्लेदनत्व. | धारणा. |
| गुण. | शब्द. | शब्द, स्पर्श. | शब्द, स्पर्श, रूप. | शब्द, स्पर्श, रूप, रस. | शब्द स्पर्श रूप रस गंध. |

वर सांगितलेलीं तन्मात्रासहित भूतें हीच तमोगुण द्रव्यशक्ति. हिचेंच हें त्रिभुवनात्मक स्थूळ चराचर रहाण्याकरितां उत्पन्न झालें. याप्रमाणें तमोगुण द्रव्यशक्ति हिची ही उत्पत्ति आहे. पंचभूतें आणि रजोगुण व पंचभूतें आणि सत्वगुण यांपासून होणाऱ्यांची उत्पत्ति मागें सांगितलीच आहे. सत्रा तत्वांचा लिंगदेह त्याचें वर्णन मागें सांगितलें. त्याचप्रमाणें पंचीकरणाचाही प्रकार मागें सांगितला आहे.

पंचीकृत स्थूळदेहाची । उभवणी केली चौखाणींची । त्यांत लिंगदेह प्रवेशतांची । चळण होतें जालें ॥ २१० ॥
परी इतुकें जें उत्पन्न जालें । तितुकियासी दोन कारणें आथिलें । नेणीव तादात्म्य चैतन्य बोलिलें । तें उपादानकारण ॥ ११ ॥
उपादान म्हणजे त्याचेंच जालें । होऊन त्यामध्येंच वर्तलें । शेवटीं अज्ञानीं लया गेलें । रज्जु सर्पापरी ॥ १२ ॥
कोणी म्हणेल ब्रह्मचि कारण । तरी तें शुद्ध विकारी नव्हे पूर्ण । तेथेंचि वाउगें उठे जें अज्ञान । त्यासह कारण बोलिजे ॥ १३ ॥
जेवीं रज्जूच एकटी सर्पासी । कारण नव्हे निश्चयेंसी । न कळणें मिळतां तयासी । प्रयोजन सर्पा ॥ १४ ॥
तैसेंचि अज्ञानसह अधिष्ठान । जगासी उपादान कारण । आणि विद्येसहित आभास ईशान । निमित्त कारण असे । १५
निमित्त म्हणजे मात्र ईक्षण । इच्छेसरिसें होय निर्माण । एवं गुणादि देहांत जें उत्पन्न । ईशें केलें ॥ १६ ॥
विद्या अविद्या प्रतिबिंबें दोन । जें मागें सांगितलें लक्षण । परी प्रवेश नसतां भिन्न भिन्न । नसती किंचित् ॥ १७ ॥
ऐसे उभयतांही आभासपणीं । येकत्रचि असतां दोन्ही । प्रवेशकाळीं अज्ञान घेऊनी । प्रवेशला पिंडीं ॥ १८ ॥
एवं ईक्षणादि प्रवेश अंतीं । इतुकी ईशें केली उत्पत्ति । प्रवेशानंतर जीवकृति । होती जाली ॥ १९ ॥
स्थूळदेह हाचि घट । लिंगदेह पाणी हें दाट । त्यांत जीव प्रतिबिंब अवीट । लिंगदेह जोंवरी ॥ २२० ॥
अज्ञानसहित जीव आभास । देह द्वयांत याचा प्रवेश । हाच पिंड तादात्म्य सावकाश । घेऊन बैसला ॥ २१ ॥
मुळीं अहंब्रह्म जे स्फूर्ति । ज्ञानाज्ञानात्मक होती । ते स्पष्ट जाली प्रवेशांतीं । देहामाजी ॥ २२ ॥
ते स्फूर्ति निजरूपा विसरली । पुढें जालें तें पाहों लागली । तेचि विक्षेपशक्ति बोलिली । वासनात्मक ॥ २३ ॥
त्या वासनेचे सत्रा प्रकार । पूर्वी सांगितला विस्तार । तया लिंगदेहाचें बिढार । तो स्थूळ मांसमय ॥ २४ ॥
एवं वासनेंत जें प्रतिबिंबलें । चैतन्य जें त्यास जीव नाम आलें । तें देहद्वयासी पाहों लागलें । परी विसरलें निजरूपा ॥ २५ ॥
सर्प जेवीं भाविला असतां । रज्जूचें न कळणें जालें चित्ता । तेवीं देहद्वय स्फुरूं लागतां । अज्ञान जालेंसें कल्पावें ॥ २६ ॥
यासि कार्यानुमेय म्हणावें । कीं कार्य देहद्वयास्तव कल्पावें । येऱ्हवीं अज्ञानारूप नव्हे । अमुकसें म्हणून ॥ २७ ॥

---

पंचीकृत स्थूळदेहांत म्हणजे त्याचे प्रकार ज्या चार खाणी त्यांत लिंगदेह प्रवेशतांच चलन उत्पन्न झालें. यांस दोन कारणें आहेत, एक उपादान कारण व दुसरें निमित्त कारण. नेणीव तादात्म्यचैतन्य म्हणजे अविद्येसह जीव, उपादानकारण, व विद्येसह आभास ईश्वर, निमित्तकारण.

**उपादान**—त्याचेंच होऊन त्यांतच राहून शेवटीं त्यांतच लयास जाणें त्यास उपादान ह्मणतात.

**निमित्त**—ह्मणजे केवळ पहाणें इच्छेबरोबर उत्पन्न होणें यास निमित्त ह्मणतात.

सर्प जसा दोरीचाच झाला, दोरीवरच होऊन राहिला. पुढें दोरींतच लय पावला, त्याप्रमाणें सर्व अज्ञानाचें झालें, अज्ञानांत होऊन राहिलें व शेवटीं अज्ञानांतच लय पावलें. सर्पाचे उत्पत्तीस नेणिवेसह दोरी जशी कारण आहे, तसें जगाचे उत्पत्तीस अज्ञानासह ब्रह्म उपादान-कारण आहे. ईश्वराचे इच्छेनें जग उत्पन्न झालें ह्मणून जगाचे उत्पत्तीस ईश्वर निमित्तकारण आहे.

मागें विद्येंत व अविद्येंत बिंबलेलीं प्रतिबिंबें सांगितलीं, तीं जोंपर्यंत प्रवेश नव्हता तोंपर्यंत भिन्न नव्हतीं, तर आभासपणानें दोन्हींही एकत्रच होतीं. प्रवेशकाळीं अज्ञान घेऊन पिंडांत प्रवेश केला तेव्हां जीवकृति उत्पन्न झाली, त्याचेपूर्वी, पहाण्यापासून प्रवेशापर्यंत गुण आदि करून सर्व ईश्वरनिर्मित आहे.

**दृष्टांत**—स्थूळदेह हा घट, त्यांत लिंग देह हें पाणी; जोंपर्यंत लिंगदेहरूपपाणी त्या स्थूळदेहरूपघटांत आहे, तोंपर्यंत त्यांत प्रतिबिंबित जीव आहे. ह्या अज्ञानासह जीवाभासाचा दोन देहांत प्रवेश, हाच पिंडतादात्म्य. या तादात्म्यास तो धरून बसलेला आहे. जेव्हां जीवाचा दोन देहांत प्रवेश झाला तेव्हां ज्ञानाज्ञानात्मक जी मूळची अहंब्रह्मस्फूर्ति होती तीच प्रवेशाबरोबर देहामध्यें स्पष्ट झाली. तेव्हां ती स्फूर्ति निजरूपास विसरली आणि पुढें झालें तें पाहूं लागली. हिलाच वासनात्मक विक्षेप-शक्ति ह्मणतात. ह्या वासनेचे सत्रा प्रकार त्यास लिंग-देह ह्मणतात. त्या लिंगदेहाचें स्थूळदेह हें बिऱ्हाड आहे.

वासनेंत जें प्रतिबिंबलेलें चैतन्य त्यास जीव ह्मणतात. हा जीव निजरूपास विसरून दोन देह पाहूं लागला. सर्प कल्पना करण्याबरोबर जसें रज्जूचें न कळणें चित्तास उत्पन्न झालें, त्याप्रमाणें दोन देह दिसल्यावरून अज्ञान झालेंसें कल्पावें, याला कार्यानुमेय ह्मणतात. ह्मणजे कार्यावरून अज्ञानाचें अनुमान करावयाचें; वास्तविक अज्ञानास रूप नाहीं.

तें सत् म्हणों तरी ज्ञानें नासे । असत् तरी कार्य दिसे । असो अनिर्वचनीय जें ऐसें । तें कारण शरीर ॥ २८ ॥
देहद्वयाचें उत्पत्तिस्थान । या हेतु म्हणावें कारण । नाश पावत असे म्हणोन । शरीर बोलिजे ॥ २९ ॥
परी हा देह कल्पूं नये । देह पाहतां असती द्वय । स्थूळदेह हा बिढार होय । सूक्ष्म व्यवहारात्मक ॥ २३० ॥
एवं स्थूळ सूक्ष्म कारण । जीवासहित हे तीन । निजरूपीं उपाधी उत्पन्न । जाहली असे ॥ ३१ ॥
रविदत्ता तूं म्हणसी ऐसें । जे हे उपाधि जाली असे । यांत मुख्य निजरूप नसे । तरी अवधारीं ॥ ३२ ॥
घट गाडगें जें जें निर्माण । तें तें व्यापून असे गगन । तैसें स्फुरणादि देहांत संपूर्ण । व्यापून ब्रह्म असे ॥ ३३ ॥
सच्चिदानंद ब्रह्मघन । तेंचि अस्ति भाति प्रिय पूर्ण । ऐसीं तिन्ही जीं लक्षणें । येथें प्रगट असती ॥ ३४ ॥
अस्तित्व मायेनें लोपवावें । तरी कासयावरी प्रगटावें । चिद्रूप जरी आच्छादावें । तरी व्यवहारावें कैसें ॥ ३५ ॥
सुखमात्र आच्छादिल्या ऐसें । वाटे परी तेंही आच्छादिलें नसे । जरी आच्छादिलेंच तरी होतसे । आवडीचें भान केवीं ॥ ३६ ॥
घटीं जेवीं आकाश व्यापलें । तेवीं पिंडीं ब्रह्म पूर्ण दाटलें । जयावरी सर्व हें कल्पिलें । तें अस्तित्वरूप ॥ ३७ ॥
जयाचिया भासा भासती । तोचि आत्मा साक्षी चिन्मूर्ति । निर्विकारत्वें असंग स्थिती । उपाधिमाजी असे ॥ ३८ ॥
सर्व प्रियता जयासाठीं । तेचि सुखरूपता गोमटी । एवं तिन्ही लक्षणें उठाउठी । अस्ति भाति प्रियता ॥ ३९ ॥
यांत सद्रूप आनंदरूप दोन । याचें पुढें असे विवेचन । प्रस्तुत आतां चिद्रूप पूर्ण । बोलिजे अल्प रीतीं ॥ २४० ॥
मुळीं अहंब्रह्म जें स्फुरण । विद्याविद्यात्मक शक्ती दोन । हे जयाच्या भासा भासमान । तो साक्षि बोधरूप आत्मा ॥ ४१ ॥
जयेसी वासना हें अभिधान । जयेतें वृत्ति नाम अंतःकरण । हे जयाच्या भासा भासमान । तो साक्षि बोधरूप आत्मा ॥ ४२ ॥
मन बुद्धि चित्त अहंकरण । आणि तेथें उमटले त्रिगुण । हे जयाच्या भासा भासमान । तो साक्षि बोधरूप आत्मा ॥ ४३ ॥
श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा घ्राण । वाचादि क्रिया आदिकरोन । हे जयाच्या भासा भासमान । तो साक्षि बोधरूप आत्मा ४४
हस्तपादादि मस्तक संपूर्ण । गोलकादि नख शिख निर्माण । हे जयाच्या भासा भासमान । तो साक्षि बोधरूप आत्मा ॥ ४५ ॥

तें सत् म्हणावें तर नाश पावतें, व असत् म्हणावें तर त्याचें दोन देह हें कार्य दिसतें. यावरून तें सत् नव्हे व असत् नव्हे तर त्यास अनिर्वचनीय असें म्हणावें. हें अज्ञान दोन देहांचें उत्पत्तीचें स्थान आहे, म्हणून त्यास कारण म्हणतात. व तें अज्ञान नाश पावतें, म्हणून त्यास शरीर ह्मणतात. याप्रमाणें अज्ञानास कारणशरीर म्हणतात. परंतु हा देह नाहीं. वास्तविक देह म्हटलें म्हणजे दोनच आहेत, त्यांत पाहिला स्थूळदेह हें बिऱ्हाड, व दुसरा सूक्ष्म देह हा व्यवहार करणारा. स्थूल, सूक्ष्म, कारण आणि जीव ही निजरूपाचे ठायीं उपाधि उत्पन्न झाली. रविदत्ता, तूं म्हणशील कीं, या उपाधींत मुख्य निजरूप नाहीं, तरी या उपाधींत तें कसें आहे तें सांगतों ऐक.

## उपाधींत ब्रह्माची व्याप्ति.

आकाश जसें घट गाडग्यास व्यापून आहे, तसें ब्रह्म स्फुरणापासून देहापर्यंत सर्व व्यापून आहे. ब्रह्माची अस्ति, भाति, प्रिय हीं लक्षणें प्रगट आहेत. अस्तित्व जर मायेनें नाहींसें करावें तर तिनें कशावर प्रगटावें ? बरें तिनें चिद्रूप किंवा भातित्व नाहींसें करावें तर तिचा व्यवहार कसा व्हावा ? प्रकाशावांचून व्यवहार व्हावयाचा नाहीं व दिसावयाचाही नाहीं. प्रियत्व ह्मणजे सुख हें मायेनें आच्छादिलें असें म्हणावें तर तिचे व्यवहारांत जी प्रीति उत्पन्न होते ती कोठची ? मूळचें सुख आहे म्हणून येथें व्यवहारांत प्रीति उत्पन्न होते यावरून मायेनें अस्ति, भाति, प्रिय या तिहींचाही लोप केला नाहीं असें समजावें. आकाश जसें घटास व्यापून आहे, तसें ब्रह्म पिंडास व्यापून आहे. ज्यावर हें सर्व जगत् कल्पित आहे, तेंच त्या ब्रह्माचें अस्तित्व आहे. सर्व ज्याच्या प्रकाशानें भासतें तोच चिद्रूप आत्मा. ज्याच्यामुळें सर्वांच्या ठायीं प्रियता आहे तेंच आनंदरूप–प्रियलक्षण होय.

## आत्म्याचें चिद्रूपलक्षण सर्वांत कसें व्याप्त आहे तें सांगतों.

अहंब्रह्म स्फुरणाच्या विद्याअविद्याशक्ति ह्या ज्याच्या प्रकाशानें भासतात तो साक्षि बोधरूप आत्मा.

जिला वासना ह्मणतात, जिला वृत्तिनामक अंतःकरण म्हणतात, ती ज्याच्या प्रकाशानें भासतात तो साक्षि बोधरूप आत्मा.

अंतःकरणपंचक, मन, बुद्धि, चित्त, अहंकार आणि तीन गुण हे ज्याच्या प्रकाशानें भासतात तो साक्षि बोधरूप आत्मा.

पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें व यांच्या क्रिया ज्याच्या प्रकाशानें भासतात तो साक्षि बोधरूप आत्मा.

हा इतुका समुदाय उत्पन्न । जितुका जड चंचळ संपूर्ण । हे जयाच्या भासा भासमान । तो साक्षि बोधरूप आत्मा ॥४६॥
इतुकियांची क्रिया जे जे होणें । आणि पंचविषय तमोगुण । हे जयाच्या भासा भासमान । तो साक्षि बोधरूप आत्मा ॥४७॥
विषयांत स्फुरणापासोन । उत्पत्ति स्थिति लय होणें । हे जयाच्या भासा भासमान । तो साक्षि बोधरूप आत्मा ॥४८॥
लयंही जो सर्वांचा पाहे । ऐसी देखणी दशा आहे । द्रष्टयाचे दृष्टीचा नाश नव्हे । कवणेही काळीं ॥ ४९ ॥
सामान्यत्वें सर्वां प्रकाशित । उत्पत्ति स्थिति जो भासवित । आणि लय जाणोनि तिष्ठत । जैसा तैसा ॥ २५० ॥
ऐसिया देखणें दशेसी । नामें तीन ओळखिसी । जो कां जाणतसे दृश्यासी । तोचि द्रष्टा ॥ ५१ ॥
चंचळ भासासि जो जाणे । तया साक्षी नांव हीं वचनें । जो कां लयसाक्षी पूर्णपणें । त्या नांव ज्ञप्ति ॥ ५२ ॥
एवं ती प्रकारें जाणणें एक । तें कधीं नव्हे न्यूनाधिक । तेंचि चिद्रुप निश्चयात्मक । मुख्य रूपाचें ॥ ५३ ॥
मुख्य स्वरूप देहीं व्यापलें । जेवीं घटीं आकाश संचलें । निर्विकारें पूर्ण दाटलें । तया संकेत कूटस्थ ॥ ५४ ॥
उपाधींत जो सघन । परि उपाधीहून विलक्षण । तया प्रत्यगात्मा अभिधान । परब्रह्मासी ॥ ५५ ॥
अगा रविदत्ता तो कवण म्हणसी । तरी तूंचि कीं गा निश्चयेंसी । सामान्यत्वें सर्वां प्रकाशी । सूर्य जेवीं जगा ॥ ५६ ॥
आकाशीं जैसा सूर्य असे । सहजत्वें सर्वां प्रकाशितसे । ऊर्णतंतु तोही भासे । आणि जडरूप भिंतीही ॥ ५७ ॥
आंगणें माड्या परवरें । बळदें खोल्या तळघरें । एकदांचि प्रकाशित सारें । तेवीं कूटस्थ भासवी ॥ ५८ ॥
स्थूलरूप जडत्वें भिंती । सूक्ष्मादि तळघरें असती । हें असो मुख्य जे कां स्फूर्ति । ऊर्णतंतूचे परी ॥ ५९ ॥
तेही जयाच्या भासें । मा स्थूळ चंचळ कां न दिसे । ऐसा आत्मा सर्वत्रीं असे । साक्षी बोधरूप ॥ २६० ॥
सूर्याचा जो दृष्टांत दिधला । येथें अन्यथा भाव ज्यासी कल्पिला । कीं आत्मा देहाहून दूर असे राहिला । गगनीं जेवीं रवि॥६१
एवं आत्मा ऐसा दूर भावितां । अति दूषण असे तत्वता । देहादि ठाव जाला रिता । मग व्यापकत्वा बाध आला ॥ ६२ ॥
आणि देहामाजी जरी नसे । तरी तें साधका प्राप्त कैसें । येणें श्रुती अनुभवा आला असे । बाध हा थोर ॥ ६३ ॥

---

हातापायांपासून मस्तकापर्यंत गोलकादि नखशिखांपर्यंत जे सर्व देहाचे ठायीं उत्पन्न झालेले ते ज्याच्या प्रकाशानें भासतात तो साक्षि बोधरूप आत्मा.

हा सर्व जडचंचळ समुदाय उत्पन्न झालेला ज्याच्या प्रकाशानें भासतो तो साक्षि बोधरूप आत्मा.

सर्वांची क्रिया व तमोगुणद्रव्यशक्ति, जे पंचविषय, हीं ज्याच्या प्रकाशानें भासतात तो साक्षि बोधरूपआत्मा.

स्फुरणांपासून विषयांपर्यंत जो उत्पति, स्थिति, लय होतो तो ज्याच्या प्रकाशानें भासतो तो साक्षि बोधरूप आत्मा.

सर्वांचा लय पहाणारा तोच साक्षि बोधरूप आत्मा.

सामान्यत्वेंकरून सर्वांस प्रकाशितो, जो उत्पत्ति,स्थिति भासवितो आणि लय जाणून राहतो, अशा देखणेदशेस तीन नांवें आहेत.

**द्रष्टा**—जो दृश्याला जाणतो तो द्रष्टा.

**साक्षि**—जो चंचळभासास जाणतो तोच साक्षि.

**ज्ञप्ति**—जो लयसाक्षि त्यास ज्ञप्ति म्हणतात.

याप्रमाणें तीन प्रकारांनीं जें जाणणें तें एकच आहे, तें कधीं अधिकउणें होत नाहीं. तेंच मुख्य स्वरूपाचें चिद्रूप लक्षण आहे. जसें घटामध्यें आकाश निर्विकारत्वानें व्यापलेलें आहे, तसें मुख्य स्वरूप निर्विकारत्वानें देहांत व्यापलेलें आहे, त्यास कुटस्थ म्हणतात.

**प्रत्यगात्मा**—उपाधीमध्यें जो सघन ( घनदाट भरलेला ) परंतु उपाधीहून विलक्षण त्या ब्रह्मास प्रत्यगात्मा म्हणतात.

वर जो प्रत्यगात्मा सांगितला तोच रविदत्ता, तूं प्रत्यगात्मा. जसा सूर्य सर्व जगास सामान्यत्वें प्रकाशितो त्याप्रमाणें प्रकाशित आहेस.

जसा सूर्य आकाशांतून सहज सूक्ष्म ऊर्णतंतूपासून स्थूळ भिंती, आंगणें, माड्या, परवरें, बळदें, खोल्या, तळघरें, यांस एकदांच प्रकाशितो, त्याप्रमाणें स्थूळ देह ह्याच जडत्वानें भिंती, लिंगदेह, तळघरें, ऊर्णतंतूप्रमाणें सूक्ष्मदेह व मुख्य स्फूर्ति यांस, आपल्या प्रकाशानें कूटस्थ प्रकाशितो, मग त्यास स्थूळ चंचळ कां दिसणार नाहींत ? सहजच दिसतील. याप्रमाणें आत्मा सर्वांत साक्षि बोधरूपानें आहे. सूर्याचे दृष्टांतावरून तो आकाशांत राहून जसा पृथ्वीवर प्रकाश पाडतो तसा आत्मा देहाहून दूर असून प्रकाश पाडीत असेल, अशी कल्पना करिशील. परंतु तशानें देहादिक पदार्थ आत्म्यावांचून रिकामे आहेत असें होईल, व ते रिकामे ठरल्यानें आत्म्याचे व्यापकतेस बाध येईल. व आत्मा देहांत नाहीं असें मानिलें, तर साधकास तो प्राप्त कसा होईल, तो प्राप्त झाला नाहीं तर श्रुतिअनुभवास बाध येतो,

तस्मात् नसे सूर्या ऐसा । उपमिला असे येथें सहसा । याचा भाव अनारिसा । बोलिजे तो ॥ ६४ ॥
सूर्य जेवीं सामान्य प्रकाशी । तेवीं आत्मा भासवी सर्वांसी । परी नपवे विकारासी । सूर्यासम आत्मा ॥ ६५ ॥
सामान्यामुळें सूर्य घेतला । तरी दूर भाव न जावा कल्पिला । यास्तव पूर्वीच असे दृष्टांत दिधला । आकाशापरी ॥ ६६ ॥
आकाश जैसें घटीं व्यापलें । तैसें आत्मत्व देहीं संचलें । परी तें असंगत्वें राहिलें । सर्वां भासऊनी ॥ ६७ ॥
उगाचि प्रकाश मात्र सर्वां । लय उत्पत्तीसी करावा । परी त्या त्या विकाराचा न घ्यावा । भाव किमपि ॥ ६८ ॥
तरी विकारासी कोण पावला । कोण पुण्य पापाचा कर्ता जाला । ऐसा भाव जरी असे बुजला । तरी अवधारावें ॥ ६९ ॥
सूर्य प्रतिबिंबाची झळ झळ । विशेषत्वें भासे केवळ । तैसा बुद्धीमाजी जो सफळ । प्रतिबिंबित जीव ॥ २७० ॥
ज्ञाना ऐसा बुद्धींत बिंबला । बोधाभास नाम तयाला । तो सत्य नव्हे पाहिजे कळला । परी दिसे साचा ऐसा ॥ ७१ ॥
चित्रासी रंगाचें वस्त्र केलें । तया वस्त्राभास नाम जालें । कीं दर्पणीं मुखा ऐसें दिसलें । त्या नांव मुखाभास ॥ ७२ ॥
ऐसाचि बुद्धींत प्रतिबिंबत । तो जीव चिदाभास विख्यात । यावत् बुद्धि तों काल दिसत । वृत्ति अभावीं मरे ॥ ७३ ॥
सूर्य प्रकाशीं दर्पण ठेविलें । त्यांत सूर्याचें प्रतिबिंब पडलें । तें भिंतीवरी विशेष दिसलें । सामान्य आच्छादुनी ॥ ७४ ॥
तैसाच बुद्धि आरसियांत । आत्मा सूर्य प्रतिबिंबित । तेणें विषयादि स्फुरविली भिंत । आच्छादुनी सामान्या ॥ ७५ ॥
हें विशेषत्वें जीवाचें रूप । सामान्य आत्मा तो चिद्रूप । ययाचें निरूपण साक्षेप । पुढें बहुधा असे ॥ ७६ ॥
परी अल्पमात्रें येथें बोलिलें । सामान्य विशेष निवडिलें । सामान्य तें सदा संचलें । निर्विकारत्वें ॥ ७७ ॥
विशेषत्वें जो हा जीव । बोधा ऐसा उमटला भाव । तोचि एका अभिमानास्तव । कर्ता जाला ॥ ७८ ॥
आपण तरी नाहीं जन्मला । उगाचि सताचा आहेपणा घेतला । आपण आहेसा भाव कल्पिला । आत्मा नाहींसा करोनी
आत्मा असता तरी दिसता । मी दिसें म्हणोन आहें तत्वतां । मीच असें कीं सर्वां देखता । आत्मा जड न पाहे ॥ २८० ॥
मी आपआपणा असे प्रिय । आत्मा दुःखरूप अप्रिय । एवं अस्ति भाति प्रिय जो होय । तें आपणा भाविलें ॥ ८१ ॥
आपण जो असज्जड दुःखरूप । तो आत्म्यावरी केला आरोप । ऐसा अन्योन्या ध्यास आपेआप । कल्पिला बळें ॥ ८२ ॥

---

म्हणून आत्मा सूर्यासारखा दूर आहे असा हा या सूर्याचे दृष्टांताचा भाव नाहीं. तर सूर्य जसा निर्विकारत्वानें सामान्य प्रकाशितो तसा आत्मा निर्विकारत्वानें सर्वांस भासवितो. व्यापकपणाविषयीं सूर्याचा दृष्टांत दिला नाहीं, निर्विकारत्वाविषयीं दिला आहे. व्यापकपणाविषयीं पूर्वीच आकाशाचा दृष्टांत दिला आहे. आकाश जसें सर्व घटांस व्यापून निर्विकारत्वानें आहे, तसा आत्मा देहादिक सर्वांस निर्विकारत्वानें व्यापून आहे. तो आपल्या प्रकाशानें लय, उत्पत्ति व स्थिति दाखवितो. परंतु त्यांचा विकार घेत नाहीं, मग विकार कोण पावला ? पापपुण्याचा कर्ता कोण झाला ? अशी कल्पना करशील, तर जशी सूर्यप्रतिबिंबाची, झळझळ विशेषत्वें भासते, तसा बुद्धीमध्यें प्रतिबिंबित जीव हा ज्ञानासारखा बिंबलेला आहे, म्हणून त्यास बोधाभास म्हणतात. तो खऱ्यासारखा दिसतो. परंतु तो खरा नव्हे, हें कळलें पाहिजे. चित्रास रंगाचें वस्त्र दिलें, त्यास वस्त्राभास असें म्हणतात; तसेंच आरशांत मुखासारखा भास दिसला, त्यास मुखाभास असें म्हणतात. प्रत्यक्ष मुख म्हणत नाहींत. तसा बुद्धींत प्रतिबिंबित जो जीव ज्यास चिदाभास म्हणतात, तो जोंपर्यंत बुद्धीनें आहे तोंपर्यंत दिसतो. बुद्धीचा अभाव झाला म्हणजे मग तो मरतो.

सूर्याचे प्रकाशांत आरसा ठेविला म्हणजे त्यांत सूर्याचें प्रतिबिंब पडतें, तें सामान्यप्रकाश आच्छादून भिंतीवर विशेषत्वें दिसतें. तसा बुद्धीरूप आरशांत आत्मारूपी सूर्य प्रतिबिंबला आहे. त्यानें सामान्य चिद्रूप आच्छादून विषयरूपी भिंत दाखविली. विशेषत्व भासणारें तें जीवाचें रूप. सामान्य, तो चिद्रूप आत्मा. विशेषत्वानें प्रकाशणारा असा जो जीव तोच अभिमानामुळें कर्ता झाला. तो स्वतः जन्मला नाहीं, तर आत्म्याचा जो सत् म्हणजे आहेपणा तो अभिमानानें घेऊन उगीच आपण आहें, असा भाव कल्पिला आणि आत्मा नाहीं असें मानिलें. तो असें म्हणतो कीं, जर आत्मा असता तर दिसता. तो दिसत नाहीं आणि मी दिसतों म्हणून आत्मा नाहींच मींच आहें. मी सर्वांस पहातों. आत्मा जड त्यास पहातां येत नाहीं, म्हणून तो जड व मी चिद्रूप. मी मला आवडता आहें. आत्मा प्राप्त होत नाहीं म्हणून तो दुःखरूप आहे, व मी प्रिय आहें. याप्रमाणें अस्तिभातिप्रिय जो आत्मा त्या आत्म्याचीं आपले ठायीं लक्षणें कल्पून आपलीं असत्जडदुःखरूप लक्षणें आत्म्यावर आरोपिलीं असा अन्योन्यध्यास बळें कल्पिला.

याचि नांवें ग्रंथि पडिली । आत्मरूपता आभासें घेतली । आपुली अनात्मता घातली । आत्मयावरी ॥ ८३ ॥
ऐसा भाव जीवें कल्पिला । परी तो आत्मत्वीं नाहीं स्पर्शला । आत्मा जैसा तैसाचि संचला । अस्ति भाति प्रियात्मक
देखोनि गुंजा पुंज रक्त । अन्यें भाविला असे जळत । त्या कल्पनेनें भस्म पावत । काय तो ढोंग ॥ ८५ ॥
ऐसा आत्मा सच्चिद्घन । असे तैसा असे पूर्ण । जेणें भाविला तो जन्म मरण । पावला मात्र ॥ ८६ ॥
असो ऐसा जीव असत् असोनी । सत्यत्वचि आपणातें मानी । देहद्वयाचे अभिमानीं । तादात्म्य पावे ॥ ८७ ॥
स्थूलदेह मांसमयाचा । नेणोनि भाव तयाचा । मीच ह्मणोनि गर्जे वाचा । त्याचे धर्मही माथां घे ॥ ८८ ॥
मी जन्मलों वाढूं लागतों । आहें आणि तरुण होतों । वृद्धाप्य पावोनी मरतों । पुन्हां जन्मेन पुढें ॥ ८९ ॥
मी अमुक कुळीं जन्मलों । मी अमुक आश्रमातें पावलों । मी अमुक मेळवून राहिलों । सुखी वडिलां ऐसा ॥ २९० ॥
तैसेचि इंद्रियांचे धर्म । आपुले माथां घेतसे परम । मी बहिरा आंधळा कीं सूक्ष्म । ऐकें आणि देखें ॥ ९१ ॥
अजिव्ह कीं असे रसज्ञ । निर्नासिक कीं सघ्राण । अस्पर्श कीं स्पर्शज्ञ । असे पूर्वकर्मी ऐसा ॥ ९२ ॥
मी बोलका चालका दानी । मीच भोगीं बहु कामिनी । मीच शौच सारीं अनुदिनीं । मजहूनि दुजा नसे ॥ ९३ ॥
मजचि क्षुधा तृषा लागे । तेव्हां पितों खातों निजांगें । एवं प्राणाचेही धर्म वेगें । घे अभिमानें माथां ॥ ९४ ॥
म्यां अमुकीया वचन दिधलें । कीं तुज रक्षीन सामर्थ्यें आपुलें । तरी मीं प्राणांतींही उपेक्षिलें । न जाय तया ॥ ९५ ॥
म्यां घोकिलें तें विसरेना । कधींही आळस मज असेना । किती रीतीं मज होती कल्पना । तें माझा मीच जाणें ॥ ९६ ॥
माझा निश्चय किती जाडा । येर झुडतार कोण बापुडा । मी आठव करणार केव्हडा । आपुले ठायीं ॥ ९७ ॥
एवं देहेंद्रिय प्राण कर्म । अथवा अंतःकरणाचे धर्म । आपुलेचि माथां घेऊन अधम । बैसला बळें ॥ ९८ ॥
जागृतीमाजी इतुक्यांचा । अभिमान घेतसें मीच साचा । कर्म धर्म वर्ण आश्रमांचा । कीं व्यापार लौकिकीं ॥ ९९ ॥
हा मी आणि हें हें माझें । घेऊन बैसला तें न सांडी ओझें । हाचि विश्वाभिमानी बुझे । नाम जीवासी ॥ ३०० ॥

---

यालाच ग्रंथी म्हणतात. ही ग्रंथी आभास जो जीव यानें आत्मरूपता घेऊन आपली अनात्मता आत्म्यावर घातली, त्यामुळें पडली. तरी आत्म्याचें कांहीं बदललें नाहीं. तो जशाचा तसा अस्तिभातिप्रियरूप आहे.

गुंजांची रास पाहून कोणी ती जळत आहे अशी कल्पना करील, तर त्या कल्पनेनें त्या गुंजांचा ढीग जळेल काय ? तसा, आत्मा जीवानें असज्जड दुःखात्मक आहे असें मानिलें तरी तो तसा होईल काय ? तो तर तसा न होतां जशाचा तसा अस्तिभातिप्रियरूप आहे. त्यास जो असज्जड दुःखात्मक मानितो तो मात्र जन्ममरण पावतो.

### विश्वाभिमान.

जीव असत् असून तो आपणास सत् मानून दोन देहांच्या अभिमानानें तादात्म्य पावला व मांसमयाचा स्थूल देह त्याचा भाव न जाणून त्यालाच मी म्हणतों व त्याचे धर्मही माथीं घेतो. तें असेः मी जन्मलों, वाढूं लागलों, मी आहें व त्यांतही तरुण आहें, पुढें वृद्ध होऊन मरेन व पुनः जन्मेन, मी अमुक कुळीं जन्मलों, मी अमुक आश्रमीं आहें, अमुक मिळवून मी वडिलांसारखा सुखी राहिलों आहें.

जीव, इंद्रियांचे धर्म माथीं घेतो, तें असेः कानानें ऐकूं येत नाहींसें झालें म्हणजे मी बहिरा असें मानितों, तसेंच डोळ्यांनीं दिसत नाहींसें झालें म्हणजे मी आंधळा असें मानितों, तसेंच मी अजिव्ह किंवा रसज्ञ, मी निर्नासिक किंवा मला नाक आहे, मी स्पर्श जाणणारा किंवा मला स्पर्श कळत नाहीं, मी बोलकाचालका, मी दान देणारा, मी बहु कामिनी भोगणारा, मीच वारंवार मलविसर्ग करणारा, माझ्याहून श्रेष्ठ दुसरा कोणी नाहीं.

जीव, प्राण, कर्म, अंतःकरणपंचक, यांचे धर्म अभिमानानें माथीं घेऊन म्हणतो, मला क्षुधा, तृषा लागते, तेव्हां मी खातों, पितों, मीं अमक्याला वचन दिलें कीं, मी आपल्या सामर्थ्यानें तुला वांचवीन. त्याची प्राणांतींही उपेक्षा करीत नाहीं. मी घोकिलेलें कधीं विसरत नाहीं, मला कधीं आळस नाहीं, किती प्रकारानें माझ्या मला कल्पना होतात त्या माझ्या मीच जाणतों, माझा निश्चय केवढा मोठा ! इतरांचे निश्चय तुच्छ समजावे, मी आठवणीचा मोठा आहें, मला विसर नाहीं. याप्रमाणें देहेंद्रियें, प्राण, कर्म, अंतःकरण यांचे धर्म, मूर्ख माथीं घेऊन बसलेला आहे.

जागृतीमध्यें देह, इंद्रियें, प्राण, अंतःकरण, कर्म, धर्म, वर्ण, आश्रम किंवा लौकिकी व्यापार, यांचा खरोखर अभिमान मीच घेतों असें जीव मानितो. याप्रमाणें हा मी व हें माझें असें अभिमानाचें ओझें घेऊन बसला, तें सोडून देत नाहीं म्हणून जीवास विश्वाभिमान म्हणतात.

तेवींच स्वप्नीं स्वप्न दृश्यासी । पाहतसे कल्पून मानसीं । त्यांत आपण एक असे तयासी । कल्पूनी पाहे ध्यासें ॥ १ ॥
दृश्य आणि आपणाही कल्पिलें । परि हाचि मी त्या दृढ धरिलें । हे हे अन्य ते परते वाटले । मज सुख दुःख देती ॥ २ ॥
एवं स्वप्नांत जो अभिमान धर्ता । तोचि तैजसाभिमानी तत्त्वता । पुढें झोंपही जरी लागतां । मीपणा न त्यागी ॥ ३ ॥
मी काय बहु वेळ निजेलों । होतों अन्य किमपि न स्मरलों । सुखदुःखासी न होतों स्पर्शलों । आणि कांहींच नेणें ॥ ४ ॥
कांहीं विषय इच्छा नाहीं केली । नर्किंचित्स्वप्न-अवस्था देखिली । ते जागें जालिया आठवली । परी अनुभविली नेणीव
तेथें मीपणा जरी नसता । तरी जागृतींत अनुभवा न येता । एवं नेणिवेचा अभिमान धर्ता । तो प्राज्ञ अभिमानी ॥ ६ ॥
एवं जागृति स्वप्न सुषुप्ति । ऐसिया तिन्ही अवस्थांप्रती । मीच म्हणोनि दृढ प्रतीति । तया बोधाभासाची ॥ ७ ॥
या तीन अवस्था स्वाभाविक । परी अन्य असती आगांतुक । तेथेंही मीपणा आवश्यक । उणा नोव्हे ॥ ८ ॥
मुद्गल प्रहारें मूर्च्छा आली । तेव्हां मज मूढत्वें पडली भुली । हेही सावधानीं आठवली । परी तेथें मीपण होतें ॥ ९ ॥
तैसेंच मरण जेव्हां पातलें । तेंही मी मेलों ऐसें भाविलें । परी अभिमानाचें उणें जालें । नाहीं रोम ॥ ३१० ॥
हें असो समाधींत बैसतां । मीपणासि नये उणिवता । मी सुखी बैसलों सांडून परता । विषय चिंतनादि ॥ ११ ॥
ऐसा मीपणा धरिला जेणें । तोच जीव आभास वोळखणें । असो देह क्रिया जे जे होणें । ते ते म्हणे म्यां केली ॥ १२ ॥
स्नान संध्या स्वधर्म कर्म । नित्य नैमित्तिक यज्ञ होम । दान अथवा नित्य नेम । कर्ता मीच पुण्यासी ॥ १३ ॥
शास्त्रीय जें कां न करावें । तें जरी केलें स्वभावें । तेंचि अभिमानें माथां घ्यावें । पाप केलें म्हणोनी ॥ १४ ॥
अथवा लोकरीती विषय । जैसा जैसा वर्ते काय । तें तें माथां घेत जाय । पुण्य पाप म्हणोनी ॥ १५ ॥
विचार पाहतां जीवासी । करणें नाहीं आभासासी । परी मी कर्ता बुद्धि जरी ऐसी । तरी तें भोगावें लागे ॥ १६ ॥

---

## तैजस अभिमान.

स्वप्नामध्यें स्वप्न दृश्यास मनामध्यें कल्पून त्यांत मी एक आहें असें आपणास मोठ्या ध्यासानें पहातों. त्यांतही कल्पिलेला देह तो मीच व हें इतर कल्पिलेलें दृश्य माझें व त्या कल्पिलेल्यांपैकींच कांहीं इतर तें मला दुःख देणारें, असा स्वप्नामध्यें जो अभिमान धरणारा तो तैजस अभिमानी जीव.

## प्राज्ञाभिमान.

स्वप्न सरल्यावर झोंप लागली, तरी जीव मीपणा टाकीत नाहीं. तो झोंपेमध्यें मी पुष्कळ वेळ दुसरें कांहीं न आठवितां व सुखदुःख न भोगितां, कांहीं न जाणतां, विषयइच्छा न करितां, स्वप्नावस्था न पहातां, उगाच सुखानें निजलों होतों, असें जागें झाल्यावर सांगतो. झोंपेमध्यें त्यानें नेणिवेचा वर सांगितल्याप्रमाणें अनुभव घेतला. तो अनुभव घेण्यास तेथें जर मीपणा नसता तर तेथचा नेणिवपणाचा अनुभव जागें झाल्यावर त्यास सांगतां आला नसता. ज्यापेक्षां तेथचा अनुभव सांगतां येतो, त्यापेक्षां तेथें अभिमानी होता. तोच नेणिवेचा अनुभव सांगणारा प्राज्ञाभिमानी.

जागृति, स्वप्न, सुषुप्ति या तीन अवस्थेंत मीच अशी दृढ प्रतीति त्या बोधाभास जीवाची आहे. हें असो. या स्वाभाविक अवस्थांखेरीज ज्या दुसऱ्या अगांतुक अवस्था आहेत त्यांतही जीवाचा मीपणा कमी होत नाहीं. मुद्गलाचे प्रहारानें मूर्छा आली म्हणजे मला मूढत्वानें भूली पडली असें सावध झाल्यावर आठवितो, ह्मणून तेथें मीपणा होता. तसेंच, जेव्हां मरण येतें, तेव्हां मी मेलों असें कल्पितो, म्हणून तेथेंही मीपणा गेला नाहीं. समाधींत सुख भोगितो व तिचें उत्थान झाल्यावर मी विषयचिंतनादि गोष्टींखेरीज नुसता सुखी होतो असा अनुभव सांगतो. यावरून तेथेंही अभिमान आहे. याप्रमाणें मीपणाचा अभिमान धरणारा तोच जीवाभास समजावा. तो जीव देहाची जी जी क्रिया होते ती ती मीं केली असें म्हणतो. स्नानसंध्या, स्वधर्म, कर्म, नित्य-नैमित्तिक, यज्ञ, होम, दान अथवा नित्यनेम इत्यादि पुण्यकर्म मीच कर्ता, शास्त्रानें जें निषेधिलेलें तें केलें ह्मणजे पाप मीं केलें असें मानितो. तसेंच लोकरीतीनें विषयांत शरीर जसें जसें वर्तेल त्याप्रमाणें पुण्य किंवा पाप मानून तें माथीं घेतो. वास्तविक जीवाभास कांहींच करीत नाहीं. परंतु मी कर्ता अशी जर त्याची बुद्धि आहे तर त्यास तें पापपुण्य भोगिलेंच पाहिजे.

देह इंद्रिय आणि प्राण । कर्म आणि अंतःकरण । हें इतुकें मिळतां संपूर्ण । करणें घडे ॥ १७ ॥
देह नसतां प्राण इंद्रिय । चित्तें कर्में करणें ही काय । इंद्रियांविण करणें न होय । देहादिही असतां ॥ १८ ॥
प्राणेंविण इंद्रिय देहे । मन कर्म जरी आहे । तरी कर्म निफजूं न लाहे । शुभ कीं अशुभ ॥ १९ ॥
एकलें अंतःकरण नसतां । देह प्राणादि चारी असतां । कर्में नुद्भवती तत्त्वतां । तस्मात् कर्ता कोण ॥ २० ॥
होणें कर्म नाहीं उदेलें । जरी मन इंद्रियादि असलें । तरी कर्में न घडतील जाणिलें । पाहिजे विचारें ॥ २१ ॥
जीव तरी बुद्धि आंत । मिथ्यात्वें प्रतिभास दिसत । तेथें करणियाचा संकेत । उपाधिविण केवीं ॥ २२ ॥
एवं सर्व हे भिन्न भिन्न । परी कोठेंचि नाढळे कर्तेपण । उगेंचि भाविलें न कळून । अभिमानें मी कर्ता ॥ २३ ॥
नेणें देह इंद्रिय प्राण । नेणें कर्म अंतःकरण । नेणें जीवाचें काय लक्षण । उगाचि सर्वा मी म्हणे ॥ २४ ॥
एवं तया मीपण योगें । अन्याचें कर्म तें म्यां केलें अंगें । तया ध्यासेंचि लागवेगें । मज भोगणें लागे मानी ॥२५॥
पुण्य केलें तेणें मज । पुढें सुख होईल सहज । पापें घडलीं जीं जीं सहज । तेणें दुःख होय पुढें ॥ २६ ॥
ऐसें जें जें कर्म जालें । तें तें कर्तेपणें दृढ भाविलें । तितुकें ध्यास अंतरीं बैसलें । हा देह पडिला जरी ॥ २७ ॥
मरणकाळीं ऐशी वासना । दृढ धरून पावे अवसाना । तयाचि ध्यासें पावे जनना । भलतेहि योनी ॥ २८ ॥

**सएवसंसरेत्कर्मवशाल्लोकद्वयेसदा ॥**

ऐसा जो चिदाभास जीव । जेणें मीपणाचा घेतला भाव । तोचि जन्ममरणा पावे स्वयमेव । अध कीं उर्ध्व लोकीं
मीपणध्यासें एक देह सोडी । एक देहा पावे परवडी । सदां फिरतचि असे आवडी । कर्मफलाचे धरोनी ॥३०॥
जेव्हां पुण्यकर्माचा उदय । तेव्हां स्वर्गस्थ होय स्वयें । पाप उद्भवतां अधोगती जाय । नाना नीच योनी ॥ ३१ ॥
अंतकाळीं जे आठवण । तैसा देह पुढें होणें । ऐसा कर्मवशें कढून । पुनः पुनः जन्मे मरे ॥ ३१ ॥
जन्ममरणा नाम संसृति । हें भ्रमण न चुके कल्पांतीं । मा असो अधम कीं उत्तम गति । परी भोगी अचुक ॥ ३३ ॥
उत्तमामागें अधम । कीं अधमामागें उत्तम । हा कांहीं न संभवे नेम । कर्मा ऐसें होय ॥ ३४ ॥

---

**कर्म घडण्यास लागणारे तत्त्वांची माहिती.**

१ देह २ इंद्रियें ३ प्राण ४ कर्म ५ अंतःकरण. हीं पांच तत्त्वें मिळालीं असतां कर्म होतें. यांपैकीं एक जर कमी असलें तर कर्म होत नाहीं. मग यांत वास्तविक कर्ता कोण? जोंपर्यंत कर्म होणें उत्पन्न झालें नाहीं तोंपर्यंत बाकीचीं चार काय करतील? बुद्धीमध्यें मिथ्याप्रतिभास जो जीव तो एकटा असला तरी उपाधीवांचून तो कर्म कसें करील? देहच नाहीं तर बाकीचीं चार काय करतील? देह हें जर कर्माचें अधिष्ठान आहे तर त्यावांचून कर्म कसें होईल? असें जरी आहे तरी एकटा देह कर्म करूं शकणार नाहीं. इंद्रियें नसल्यानें बाकींचीं चार तत्वें किंवा नुसतींच इंद्रियें कर्म करूं शकत नाहींत. एकट्या प्राणाचे योगानें किंवा प्राणाखेरीज बाकींच्या चार तत्वांनीं कर्म होत नाहीं. एकट्या मनबुद्धीनें किंवा तीखेरीज बाकींच्या चारांनीं कर्म होत नाहीं. तर पांच जेव्हां मिळतील तेव्हांच कर्म होतें, एरव्हीं कर्म घडतच नाहीं. याप्रमाणें सर्व भिन्न भिन्न असूनही, कोणाचेच ठायीं कर्तेपण दिसत नाहीं. असें असतां उगीच न कळून अभिमानानें मी कर्ता असें जीवानें मानिलें. पण देह कशाला म्हणावें, प्राण म्हणजे काय, मन म्हणजे काय, इंद्रियें म्हणजे काय, कर्म म्हणजे काय, जीव कोणाला म्हणावें, हें न जाणून उगीच सर्वांस मी म्हणतों. अशा त्याच्या मीपणाचे योगानें वरील पांचांनीं केलेलें कर्म तें मीं केलें, तेव्हां मला तें भोगावें लागेल, मीं पुण्य केलें तर त्याचेयोगानें मला सुख होईल, पाप केलें तर त्याचेयोगानें दुःख होईल, याप्रमाणें जें जें कर्म झालें तें तें कर्तेपणानें दृढ मानिलें. ते ध्यास, अंतरांत देह पडला तरी बसलेले आहेत.

**कर्मविपाक.**

प्राणी पापपुण्याच्या कर्तेपणाची वासना मरणसमयीं दृढ धरून मरतो. म्हणूनच भलत्या योनींत जन्मतो. जेव्हां मीपणा धरणारा चिदाभास जीव, कर्मफलाची आशा धरून त्याचे ध्यासानें राहून मरतो, तेव्हां तो अध किंवा ऊर्ध्व लोकीं जन्मतो. याप्रमाणें सर्व योनींत फिरत असतो. पुण्य पुष्कळ झालें तर स्वर्गलोकास जातो. पाप पुष्कळ झालें तर नीच योनीस जातो. अंतकाळीं जी आठवण होते तसा पुढें देह होतो. याप्रमाणें कर्मवशेंकरून पुनः पुनः जन्मतो मरतो.

**संसृति**—जन्ममरणास संसृति म्हणतात.

प्राणी कोणत्याही योनींत असो त्यास जन्ममरण न चुकतां भोग भोगावे लागतात. उत्तम देह प्राप्त झाल्यावर अधम देह येईल. किंवा अधम देह प्राप्त झाल्या-

उत्तमाचा उत्तमची । कीं अधमाचा अधमची । हा नेम न संभवे कांहींची । परी जन्मे कर्मवशें ॥ ३५ ॥
मनुष्यापासून कीटकांत । वृक्षादि हे अधम समस्त । तैसाचि मानवापासोन देवांत । उत्तम योनी ॥ ३६ ॥
यास्तव मानवदेह हा मध्यम । येथें पुण्य पाप असे सम । यातळीं ते सर्व अधम । उत्तम ते ऊर्ध्व ॥ ३७ ॥
देव गंधर्व यक्ष स्वर्गवासी । तेथून जरी सत्यलोकवासी । हे उत्तम गति असे जीवासी । परी संसृति न चुके ॥ ३८ ॥
सलोकता समीपता । तिसरी ते मुक्ति स्वरूपता । चौथी सगुण ही सायुज्यता । परी भ्रमणें न चुके ॥ ३९ ॥
सायुज्यांतें जे ऊर्ध्व गति । तयाही म्हणावी संसृति । मा अधमत्वें जे मरती जन्मती । तेथें बोलणें नको ॥ ३४० ॥
जोंवरी अज्ञान न फिटे । जंव स्वरूपज्ञान नव्हे गोमटें । तोंवरी संसृति न पालटे । जन्ममरणरूप ॥ ४१ ॥
जन्मतां साकार प्रगटावा । मरता वासनेंत गुप्त असावा । ऐसा लोकद्वयीं हा फिरावा । सदां जीव ॥ ४२ ॥
देह प्रगटतां सत्रा प्रकार । प्रगटती करिती व्यवहार । तेथेंही स्वप्न किंवा जागर । फिरे या लोकद्वयीं ॥ ४३ ॥
मग असो देव कीं मानव । अथवा कीटक गो अश्व । परी स्वप्न जागरीं दोन्ही ठाव । असे भ्रमणें ॥ ४४ ॥
जन्ममरण हे संसृति । कीं फिरणें स्वप्नीं जागृतीं । एवं भ्रमणें जें जीवाप्रती । चुके ना कीं ॥ ४५ ॥
अथवा संसृति हा संसार । ह्मणजे देहद्वयाचा व्यापार । केव्हां स्वप्न केव्हां जागर । या लोकद्वयीं संचरे ॥ ४६ ॥
तया व्यापाराचे पांच प्रकार । होत असती सविस्तर । त्यांत येकेक व्यापारीं साचार । पांच पांच तत्त्वें ॥ ४७ ॥
तेचि व्यापार कैसे कैसे । बोलिजेत असती अल्पसे । मुमुक्षें अवधरितां मानसें । विवेचन घडे ॥ ४८ ॥
पूर्वीं अपंचीकृत उद्भवलीं । तेचि तत्त्वें पंचीकृत जालीं । एकेकांत पांच पांच राहिलीं । पुढें प्रवेशलीं देहीं ॥ ४९ ॥
व्यापार जेधवां होत । तेव्हां येकेकांतून एकेक निघत । पांचांचे पांच जेव्हां मिळत । तेव्हां व्यापार एक होय ॥ ३५० ॥
गगन तत्त्वाचा व्यापार होणें । मुख्य आकाशाचें अंतःकरण । वायूंतून निघे व्यान । तेजांतून श्रोत्र ॥ ५१ ॥
वाचा आपाचें कर्मेंद्रिय । पृथ्वीचा शब्द विषय । या पांचातत्त्वें व्यापारद्वय । होय ऐकणें बोलणें ॥ ५२ ॥
ऐकणें श्रोत्र ज्ञानेंद्रियाचें । बोलणें वाचा कर्मेंद्रियाचें । दोहींसी काज शब्दाचें । असे व्यापारा ॥ ५३ ॥
दोहींशीं आधार चळणासी । व्यान वायू निश्चयेंसी । जाण तें तत्त्व निवडावयासी । अंतःकरण ॥ ५४ ॥

---

वर उत्तम देह येईल हा कांहीं नेम नाहीं. तर कर्माप्रमाणें प्राण्यास जन्म होतो. मनुष्यापासून किड्यापर्यंत व वृक्षादि स्थावरांपर्यंत सर्व अधम योनी. मनुष्यापासून देवापर्यंत ही उत्तम योनी. मनुष्य प्रत्येकाचे आरंभीं आहे, म्हणजे तो दोहोंकडे आहे, म्हणून मनुष्य ही मध्यम योनि आहे. मनुष्यदेह पापपुण्य समान झाल्यावांचून प्राप्त होत नाहीं. अधःपाती म्हणजे मनुष्यापासून खालच्या योनी, उत्तम ते मनुष्यापासून पुढचे ( वरचे ) देव, गंधर्व, यक्ष, हे स्वर्गवासी व त्यांपुढचे सत्यलोकवासी. स्वर्गापासून सत्यलोकापर्यंत वास होणें ही जीवाला उत्तम गति आहे. परंतु त्याची संसृति चुकत नाहीं. प्राण्यास १ सलोकता २ समीपता ३ स्वरूपता ४ सगुण सायुज्यता ह्या जरी मुक्ति प्राप्त झाल्या तरी जन्ममरण चुकत नाहीं. मग अधम गतींत जन्म येईल किंवा मरण येईल याची शंकाच नको. जोंपर्यंत अज्ञान नष्ट झालें नाहीं व जोंपर्यंत पूर्ण स्वरूपज्ञान झालें नाहीं तोंपर्यंत जन्म-मरण चुकावयाचें नाहीं. प्राणी जन्मतांच साकार प्रगट होतो व तो मरतांच साकार वासनेंत गुप्त रहातो. अशा प्रकारें दोन लोकांत हा जीव फिरतो. मग तो प्राणी, देव, दानव, किंवा मनुष्य, अथवा किडा, गाय, घोडा, इत्यादि नीच योनी असोत, तो स्वप्न व जागृति या दोन अवस्थेंत फिरतो, किंवा जन्ममरणांत फिरतो. संसृति म्हणजे हा संसार म्हणजे देहद्वयाचा व्यापार, केव्हां स्वप्नांत जावें केव्हां जागृतींत जावें असा जो व्यापार त्या व्यापाराचे पांच प्रकार आहेत. व त्या व्यापारास लागणारीं तत्त्वें पांच आहेत. पूर्वीं अपंचीकृत तत्वें उत्पन्न झालीं तींच पुढें पंचीकृत झालीं. म्हणजे एकेकांत पांच पांच मिळालीं आणि देहांत प्रवेशलीं. जेव्हां कांहीं व्यापार होऊं लागतो तेव्हां एकेकांतून एकेक निघतें. याप्रमाणें पांचांतून पांच निघालीं म्हणजे एक व्यापार होतो. एकेका भूताचे पांच पांच भाग करून पांचांस पंचीकरणाचे वेळीं वांटले. ते भाग त्या त्या तत्त्वांतून निघाले म्हणजे ते ज्याचे भाग आहेत त्या तत्त्वाचा व्यापार होतो. जसें पंचीकृताचे वेळीं आकाशाचे १ अंतःकरण २ व्यान ३ श्रोत्र ४ वाचा ५ शब्द हे पांच भाग करून पांचांस वांटले, तेच भाग प्रत्येक भूतांतून निघाले असतां, आकाशतत्त्वाचा बोलणें व ऐकणें हा व्यापार होतो. याचप्रमाणें अन्य तत्त्वांच्या व्यापाराविषयीं जाणावें. प्रत्येक भूताचे दोन दोन व्यापार एक ज्ञानरूप व दुसरा क्रियारूप असे होतात. त्यांत ज्ञानरूप ज्ञानेंद्रियानें व क्रियारूप कर्मेंद्रियानें होतो. व्यापार होतांना चलन होण्यास वायु लागतो. जाणण्याकरितां अंतःकरण लागतें व दोन्ही व्यापारांस विषय लागतो. याप्रमाणें पांचांचे योगानें एका तत्वाचे दोन व्यापार होतात. याप्रमाणें कोणाचे कोणते व्यापार कोणत्या तत्त्वांमिळून होतात हें स्पष्ट कळण्याकरितां खालीं कोष्टक दिलें आहे.

आतां वायुतत्त्वाचा व्यापार होता । गगनांतून मन निघे तत्त्वतां । समानवायु हा आपण स्वतां । त्वचा तेजाची ५५
आपाचें पाणी कर्मेंद्रिय पृथ्वीचा स्पर्श हा विषय । एवं पांच मिळतां व्यापारद्वय । स्पर्श देणें घेणें ॥ ५६ ॥
त्वचा ज्ञानेंद्रियाचें स्पर्शणें । पाणी कर्मेंद्रियाचें देणें घेणें । समान वायूचें चळण होणें । मन जाणतें तत्त्व ॥ ५७ ॥
ज्ञानेंद्रियद्वारा जाणावें । कर्मेंद्रियद्वारा करावें । दोहींचा स्पर्श विषय व्हावे । व्यापार दोन ॥ ५८ ॥
होतां तेजतत्त्वाचा व्यापार । बुद्धि आकाशाची साचार । उदान वायूंतून अपार । स्वरूपे तेजाचा चक्षु ॥ ५९ ॥
आपांतून घेतला पाद । पृथ्वींतून रूप विशद । हे पांच मिळून व्यापारभेद । पहाणें चालणें दोन ॥ ३६० ॥
चक्षुज्ञानेंद्रियें पाहणें । पादकर्मेंद्रियें चालणें । दोहींचा विषय रूप होणें । भोग्यरूप ॥ ६१ ॥
उदानवायु चळणा आधार । जाणतें तत्त्व बुद्धि सुंदर । एवं हा जाला विस्तार । तेज तत्त्वाचा ॥ ६२ ॥
आपतत्त्वाचा व्यापार होत । आकाशांतून घेतसे चित्त । प्राणवायूंतून निघत । जिव्हा तेजाची ॥ ६३ ॥
आपाचें उपस्थ सुरस । पृथ्वींतून विषय रस । हे पांच मिळून होती बहुवस । अशनरती ॥ ६४ ॥
जिव्हा ज्ञानेंद्रियें रस घेणें । उपस्थकर्मेंद्रियें भोगणें । दोहींचा विषय रस होणें । ग्रहणरूप ॥ ६५ ॥
दोहींस आधार चळणा प्राण । जाणावया चित्त संपन्न । एवं व्यापार पांचांचे होती दोन । आपतत्त्वाचे ॥ ६६ ॥
पृथ्वीतत्त्वाचा व्यापार । आकाशाचा अहंकार । अपानवायूचा निर्धार । तेजाचें घ्राण ॥ ६७ ॥
गुद तें आपांतून निघालें । गंधासी पृथ्वींतून काढिलें । या पांचांयोगें व्यापार जाले । गंधग्रहण विसर्ग ॥ ६८ ॥
घ्राणज्ञानेंद्रियें गंधग्रहण । गुदकर्मेंद्रियें विसर्ग करणें । मुख्य विषय दोहींचा होणें । गंध हा भोग्य ॥ ६९ ॥
दोहींसी आधार चळणा अपान । जाणतें तत्त्व अहंकरण । एवं व्यापार जे होती दोन । पृथ्वीतत्त्वाचे ॥ ३७० ॥
ऐसे हे पांच तत्त्वांचे । व्यापार होती पांचांचे । या पांचांत अधिष्ठान त्रिगुणांचें । तिहीं शक्तिरूपें ॥ ७१ ॥
अंतःकरण पंचक सत्वगुण । हे ज्ञानशक्ति संपूर्ण । बरें कीं वाईट निवडणें । यास्तव भोक्ता ॥ ७२ ॥

## पंचभूतांच्या व्यापाराचें कोष्टक.

| | व्यापाराचे प्रकार. | व्यापारास लागणारीं तत्वें. | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | १ ज्ञानरूपव्यापार. २ क्रियारूप व्यापार. | देह | जीवअविद्या | ईशविद्या | अंतःकरणस्फूर्ति | मन, बुद्धि, चित्त, अहंकार |
| पंचमहाभूतें | व्यापार | आकाशांतून नि. | वायूंतून निघा. | तेजांतून निघा. | आपांतून निघा. | पृथ्वींतून निघा. |
| आकाशाचे | १ ऐकणें २ बोलणें | अंतःकरण | व्यान | श्रोत्र | वाचा | शब्द |
| वायुतत्वाचे | १ स्पर्श २ ( देणें घेणें) | मन | समान | त्वचा | पाणी | स्पर्श |
| तेजतत्वाचे | १ पहाणें २ चालणें | बुद्धि | उदान | चक्षु | पाद | रूप |
| आपतत्वाचे | १ खाणें २ रति | चित्त | प्राण | जिव्हा | उपस्थ | रस |
| पृथ्वीतत्वाचे | १ गंधग्रहण २ विसर्ग | अहंकार | अपान | घ्राण. | गुद | गंध |
| पांच तत्वांच्या दहा व्यापारांस त्रिगुणांचें तीन शक्तीरूपानें अधिष्ठान आहे १ ज्ञानशक्ति २ क्रियाशक्ति ३ द्रव्यशक्ति ह्या बरेवाईट निवडण्यास उपयोगी. | सत्वगुणी अंतःकरणपंचक (ज्ञानशक्ति) भोक्ता. | रजोगुणाची ज्ञानेंद्रियपंचक, कर्मेंद्रियपंचक व प्राणपंचक अशा तीन प्राकारानें क्रियाशक्ति ही तिन्ही भोग घेण्याचीं भोक्त्याचीं साधनें आहेत. | | | | तमोगुणाची द्रव्यशक्ति पंचविषय हे भोग्य. |

ज्ञानेंद्रियें सत्वगुण असतां परी हे निर्गम द्वार तत्त्वता । म्हणोनि यासी क्रियारूपता । साधन भोक्त्याचें ॥ ७३ ॥
तस्मात् ज्ञानेंद्रियपंचक । दुजें कर्मेंद्रिय क्रियारूपक । प्राणपंचक मिळोनि एक । क्रियाशक्ति बोलिजे ॥ ७४ ॥
एवं त्रिपंचकें रजोगुण । हें क्रियाशक्तीचें लक्षण । भोग्या घ्यावयाचीं साधनें । उपकरणें भोक्तियाचीं ॥ ७५ ॥
पंच विषय तमोगुण ॥ हे द्रव्यशक्ति भोग्य संपूर्ण । एवं त्रिपुटीनें होय ग्रहण । सुखदुःख जीवा ॥ ७६ ॥
जयाविषयीं नुसता शब्द । तो श्रोत्रद्वारा होय वेद्य । जेथें शब्द स्पर्श द्विविध । तें वेद्य श्रोत्रत्वाचे ॥ ७७ ॥
जेथें शब्द स्पर्श रूप तीन । तें श्रोत्र त्वचा चक्षुसि ग्रहण । शब्द स्पर्श रूप रस चतुर्गण । तें श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हेसी ॥७८
शब्द स्पर्श रूप रस । जेथें गंधादि पांच सुरस । तें श्रोत्र त्वक् चक्षु जिव्हा घ्राणास । विषय वेद्य होय ॥ ७९ ॥
एवं भाग्य तमोगुणद्रव्यशक्ति । त्रिपंचकें रजक्रियाशक्ति । अंतःकरण सत्वज्ञानशक्ति । हे भाग्य भोगणें भोक्ता ॥३८०॥
प्रत्यक्ष विषय स्थूलासी । भोग जो घडे निश्चयेंसी । हे जागृति अवस्था जीवासी । घडे साभिमानें ॥ ८१ ॥
विषय इंद्रियांवांचून । कल्पनेनें विषय कल्पून । सुख दुःख भोगी अभिमान । ते स्वप्नअवस्था ॥ ८२ ॥
एवं जागृति स्वप्न स्थानीं दोहीं । जीव संचरे दों लोकीं पाही । सुषुप्तींत मात्र संचार नाहीं । परी नेणिवेंत गुप्त ॥८३॥
ऐसा एक देह पावत असतां । तों काळ देहद्वयीं संचरतां । प्राणवियोगें मृत्यु पावतां । उत्तमाधमयोनीं ॥ ८४ ॥
ह्या लोकद्वयीं संचरे जीव । अनंत कर्मफल भोगास्तव । हें भ्रमण चुके ऐसा उपाव । त्रिभुवनीं नाहीं ॥ ८५ ॥
जैसा प्रवाहीं कीटक पडे । तया आवर्तीहून आवर्ती जाणें पडे । विसावा क्षणभरी आतुडे । ऐसा काळ नाहीं ॥ ८६ ॥
तैसा एक देह जरी त्यागावा । तों दुजा तेव्हांच अवलंबावा । तोही क्षय पावतां धरावा । तिजा उत्तम कीं अधम ८७॥
जेधवां अज्ञानें भिन्न पडिला । जीव हा मी मानून बैसला । तेव्हांपासून प्रवाहीं सांपडला । जन्ममृत्यूच्या ॥ ८८ ॥
निमिष्य एक विसावा घेतां । सुखा मागें दुःख होय भोक्ता । कीं दुःखा मागें सुख मागुता । भ्रमें कीटकापरी ॥ ८९ ॥
दैवें जरी किडा नदीतीरा । येतां कोणी देखिला नेत्रा । तेणें काढिला वोढून त्वरा । दयाळूपणें जरी ॥ ३९० ॥
तरी तो वृक्षछाये तळवटीं । कीटक विश्रामे उठाउठी । ऐसीच सद्गुरूची होय भेटी । यया जीवासी जरी ॥ ९१ ॥
परी तो हृदयशुद्धीचे कडे । आला पाहिजे कोडें । त्याचेंचि बोधद्वारा सांकडें । फेडिती गुरु ॥ ९२ ॥
जन्ममृत्यूच्या प्रवाहांतून । काढिती तया बोधून ज्ञान । सुखें विश्रामें स्वरूपाभिन्न । कीं पुन्हां सुखदुःखा नातळे ॥ ९३ ॥

ज्ञानेंद्रियें सत्वगुणात्मक आहेत. परंतु त्यांचें ज्ञान निर्गमद्वारानें आहे म्हणून हीं ज्ञानेंद्रियें ज्ञानरूप नाहींत तर क्रियारूप आहेत. ज्ञानेंद्रियांनीं १ ऐकणें २ स्पर्श घेणें ३ पहाणें ४ खाणें ५ गंध ग्रहण करणें हे व्यापार होतात. कर्मेंद्रियांनीं,१बोलणें,२ देणें, घेणें ३ चालणें ४ रति भोगणें ५ विसर्ग करणें हे व्यापार होतात. म्हणून तेजाचीं व आपाचीं तत्वें व्यापार करणारीं. अंतःकरणपंचक जाणण्याविषयीं उपयोगी. वायुपंचक चलनास आधार, विषयपंचक दोन्ही व्यापारांस भोग्य, म्हणजे व्यापार विषयपंचकाशीं होतो. म्हणजे व्यापारानें विषयपंचकाचें ग्रहण होतें. म्हणजे विषयपंचकाच्या ग्रहणाकरितांच व्यापार होतात. एरव्हीं होत नाहींत.

भोक्ता, साधनें, आणि भोग या त्रिपुटीनें जीवास सुखदुःखाचें ग्रहण होतें.

**जागृति**—स्थूलाचा प्रत्यक्ष विषयांशीं भोग घडतो इला जागृति अवस्था म्हणतात.

**स्वप्नावस्था**—विषय व इंद्रियें यांवांचून कल्पनेनें विषय इंद्रियें कल्पून अभिमानानें सुखदुःख भोगितो, तिला स्वप्नावस्था म्हणतात.

या दोन अवस्थेंत ( लोकांत ) जीव फिरतो व झोपेंमध्यें न फिरतां नेणिवेंत गुप्त रहातो. जोंपर्यंत देह आहे तोंपर्यंत दोन देहांत म्हणजे अवस्थेंत फिरतो. मेला म्हणजे उत्तम किंवा अधम योनींत फिरतो. याप्रमाणें हें जीवाचें भ्रमण, अनंत-कर्म-फल-भोगांमुळें चुकत नाहीं.

किडा प्रवाहांत पडला असतां, त्यास विसावा न मिळतां एका भोंवऱ्यांतून दुसऱ्या भोंवऱ्यांत जावें लागतें. तें त्याचें जाणें जसें चुकत नाहीं, तसा जीवास एक देह टाकिला म्हणजे दुसरा धरावा लागतो, तो टाकिला म्हणजे तिसरा धरावा लागतो. हा जीव अज्ञानानें जेव्हां ब्रह्मापासून निराळा झाला आणि हा मी जीव असें मानून बसला, तेव्हांपासून तो जन्ममृत्यूचे प्रवाहांत सांपडला. तो एक निमिष विसांवा न घेतां सुखामागें दुःख व दुःखामागें सुख भोगीत किड्याप्रमाणें भ्रमतो. किडा दैवानें नदीतीरास येतांना कोणीं पाहिला, तेव्हां त्यानें दयालुत्वानें त्वरेनें जर ओढून काढिला तर तो वृक्षाच्या छायेखालीं जाऊन जसा त्वरित विसांवा पावेल तसा जीव त्यास सद्गुरूची भेटी जर होईल तर तो अभिन्नपणें स्वस्वरूपीं विसांवा पावेल, परंतु तो जन्ममरणरूप नदी, हिची हृदयशुद्धि ही कड, या कडेकडे आला पाहिजे. मग त्याचें संकट सद्गुरु ज्ञानानें नाहींसें करतील. ( म्हणजे त्याला ज्ञानाचा बोध करून जन्ममृत्यूचे प्रवाहांतून काढितील. मग त्यास सुखदुःख प्राप्त होणार नाहीं. )

येऱ्हवीं गुरुराज न भेटतां । अभिन्न ज्ञान न होतां । अन्य कोटि साधनें करितां । हा प्रवाह न निमे ॥ ९४ ॥
रविदत्ता हें सत्य वचन । कदां नोव्हे अप्रमाण । ऐसी गुरुवाणी ऐकोन । येरू साष्टांग घाली ॥ ९५ ॥
वारंवार प्रदक्षिणा । वारंवार वंदी चरणा । कंठ दाटला अश्रुनयना । फुटेना शब्द ॥ ९६ ॥
तैसाच गद्गद वाणी करून । त्राहि त्राहि बोले वचन । सोडवीं सोडवीं भवापासून । अन्य मी प्रार्थूं नेणें ॥ ९७ ॥
जय गुरु जय जय गुरु । कृपाघन करुणासागरु । मज दीनाचा करीं अंगीकारु । न करीं उपेक्षा ॥ ९८ ॥
मी काया वाचा मनेंसी । शरण शरण श्रीचरणासी । दयाळा संरक्षून बीदासी । उचित तें करा ॥ ९९ ॥
मागुतीं करून साष्टांग । चरणीं पडला दृढ अभंग । मग शंकरें उठवून लगबग । गाढ आलिंगिला ॥ ४०० ॥
नाभि नाभि हे रविदत्ता । तुझा भव हा सारूं परता । तूं कोण असती तया आतां । भेटवूं ज्ञानें ॥ १ ॥
नदीमाजीं कीटक पडिला । ऐसा जो कां दृष्टांत दिधला । तैसाचि जीव हा प्रवाहीं सांपडला । तो सत्य भाविला तुवां ॥ २ ॥
हा खराच जरी वाहवता । तरी ज्ञानाच्या बापें न निघता । तस्मात् जाणे हा विचारें पुरता । भ्रमें वाहवला दिसे ॥ ३ ॥
भ्रमें वाहवला असे कैसा । तो बोलूं सावध हो मानसा । यासी साम्य दृष्टांत असे जैसा । तो अवधारीं ॥ ४ ॥
एकं महानदी सखोल वाहत । थोर वृक्ष एक असे तींत । त्यावरी पुरुष एक निवांत । बैसला असे ॥ ५ ॥
तो सुखरूप असतां बैसला । सहज अधोमुखें पाहता जाला । यया वृक्षासहित आपणाला । देखे पडिलों प्रवाहीं ॥ ६ ॥
आपण जो वृक्षासहित अचळ । तया स्वकीयत्वा विसरला सकळ । प्रवाहीं प्रतिबिंब कांपे चळचळ । तोचि मी भाविलें
मी पडिलों बोंबलत । कोणी काढारे काढा त्वरित । वाहूनि चालिलों काय न देखत । रूपेंसहित कोणी ॥ ८ ॥
तैसा कूटस्थ निर्विकार । जो कां आपण ब्रह्मपर । या विकाराहून अति दूर । यांताचि असोनी ॥ ९ ॥
वृत्तीपासोनि तत्त्वें सत्रा । हें पाणी देखे द्रष्टा । नेला त्यांत बिंबला तया अन्यत्रा । जीवा मी कल्पिलें ॥ ४१० ॥
हाचि मी जीव प्रवाहीं पडिलों । जन्ममरण रूप वाहवलों । येथून केवीं जाय सुटलों । कवण्या साधनें ॥ ११ ॥
कैवारी देव कोणी असे । तोचि तारील रूपेंसरिसें । म्हणून अट्टहास्यें पाहतसे । कर्म हेंचि बोंबलणें ॥ १२ ॥
तो जरी खरा प्रवाहीं पडता । तरी देवासीही काढितां येता । जैसे जन ऐकोनि होती हेलसिता । तेवीं उपेक्षी देव ॥ १३ ॥
कोणी हांसोनि नदींत गळ । टाकोनि धुंडित पात्र सकळ । तेवीं वेदवाणी साधनें पुष्कळ । बोले जीव उद्धारा ॥ १४ ॥
ऐसीं साधनें कल्पकोटी । केलीं जरी कल्पूनि मोटीं । तरी कां जीव हा उठाउठी । ज्ञानेंवीण मुक्त होय ॥ १५ ॥

---

सद्गुरु भेटून त्यांनीं ज्ञानाचा बोध केल्यानें अभिन्न ज्ञान प्राप्त होतें, तें ज्ञानावांचून इतर कोटी साधनें केलीं तरी जीवाला हा जन्ममरणरूप प्रवाह नाहींसा होत नाहीं. रविदत्ता, वर जीव प्रवाहीं पडला असें दाखविलें तें तुला खरें वाटलें. परंतु तो जर खरा प्रवाहीं वाहवता तर ज्ञानाच्या बापाच्यानेंही निघाला नसता. आतां वहावलासा दिसतो तो भ्रमानें वहावलेला कसा दिसतो तें स्पष्ट दाखवितों.

## जीवाचा संसृतिभ्रम व त्या भ्रमाचे निवृत्तीचा उपाय.

एक मोठी खोल नदी वहात होती. तिचे कांठीं एक मोठा वृक्ष होता, त्यावर एक पुरुष निवांत बसला होता. कांहीं वेळानें त्यानें खालीं पाण्यांत पाहिलें तों, वृक्षासहवर्तमान मी प्रवाहीं पडलों असें त्यास दिसलें. आपण जो वृक्षासहित अचळ, त्या आपणास विसरला, आणि प्रवाहांत प्रतिबिंब चळचळ कांपत आहे, तोच मी, अशी कल्पना केली. आणि मी पडलोंरे, पडलों ! कोणी मला त्वरित काढा, मी वहात आहें हें तुम्ही पहात नाहीं काय ? असा तो बोंबलत आहे. तसा कूटस्थ, निर्विकार जो आपण परब्रह्म, देहविकाराहून दूर त्यांतच असून आहे. येथें वृत्ति आदिकरून सत्रा तत्वें हेंच पाणी. त्यांत बिंबलेलें जें आपलें प्रतिबिंब त्यास पहाणारा द्रष्टा, मी अशी कल्पना करून राहिला, आणि म्हणतो कीं, हाच मी जीव जन्ममरणरूप प्रवाहांत वहावलों. यांतून कोणत्या साधनानें कसा सुटेन, कोणी कैवारी देव असेल तोच रूपेनें मला तारील. असें मोठ्या अट्टाहास्य कामकर्मरूप बोंबलण्यानें देवास विनंती करीत आहे. तो खरा संसृतींत पडता; तर त्या प्रवाहांतून देव त्यास काढता. परंतु तो खरा पडलेला नाहीं. वृक्षस्थ, जसा खरा पडलेला नसतां, उगाच बोंबलत आहे, असें म्हणून त्याची उपेक्षा लोक करितात, तशीच या जीवाची, देव उपेक्षा करितो. वृक्षस्थाचे बोंबलण्यास हंसून, लोक त्याच्या समजुतीकरितां नदींत गळ टाकून शोधितात, त्याप्रमाणें जीवाच्या उद्धाराकरितां वेदवाणी, पुष्कळ साधनें सांगते. तीं अनेक प्रकारचीं साधनें उद्धार करतील, अशी कल्पना करून कोटी कल्पपर्यंत जरी काम्यबुटीनें केली, तरी हा जीव ज्ञानावांचून मुक्त व्हावयाचा नाहीं.

खरा जरी पडिला असता । कांहीं तरी उपाय चालता । येथें भ्रमें मानिलें तया सोडविता । ज्ञानेंविण कवण ॥१६॥
ऐसें ज्ञान गुरुविण कवण । बोधील बापुडा जरी देव येऊन । तस्मात् नाथिलिया दुःखांतून । काढिता सद्गुरु ॥१७
परी जयासी तया विवेक असिला । तरीच बोधें जाय सुटला । नाहीं तरी गुरुही अनधिकारियाला । उपेक्षून जाती
तो विवेक कोणता म्हणसी । तरी अवधारीं निश्चयेंसी । म्यां केले जितुकें मागां सायासीं । त्याचें फळ काय प्राप्त ॥
नदींत धुंडिती ते आपण पाहे । परी एकही पडिला न लाहे । तैशीं साधनें करितां लवलाहें । मी सुटलों न वाटे ॥२०
आणि मी बोंबलें हाका मारीं । परी कोणी धांवेना कैवारी । तैसा मी दिननिशीं भजन करीं । परी देव कां न भेटे॥२१॥
जरी मी खरा वाहवतों । तरी केवीं रडतों बोंबलतों । केवीं तारी तारी उच्चारितों । मी अज्ञान जरी ॥ २२ ॥
आणि पडला पडिलिया न दिसे । हें तों मज साग्रत्वें दिसे । दिसे तरी मी पडिलों नसें । या नांव विवेक ॥ २३ ॥
तैसा मी अंतःकरणापासून । देहापर्यंत जितुकें संपूर्ण । जाणतसें सर्वांलागून । तरी मी वाहवें केवीं ॥ २४ ॥
जरी प्रवृत्तींत वाहवतों । तरी मी आपआपणा न पाहतों । मनादि विषयांत अवलोकितों । तरी मी हा नव्हें ॥ २५ ॥
जरी मीच आपआपणा । अमुक अमुकसा दिसेना । तरी मज कृपाळू गुरुराणा । दावील अपरोक्ष ॥ २६ ॥
ऐसा रविदत्ता विवेक जयासी । असेल अंतरीं निश्चयेंसी । तयासीच सद्गुरु उपदेशी । येरां उपेक्षी ॥ २७ ॥
वृक्षीं बैसोनि पडिलों मानी । तयासी खरेपणें सांगे कोणी । कीं तूं न पडतां स्वस्थानीं । अससी वृक्षीं ॥ २८ ॥
परी तयासी सत्य वाटतें । पडिलों निर्दय न काढी मातें । तैसाचि मी देह वाटे जयातें । जन्मतों मरतों खरा ॥ २९ ॥
तयासी शास्त्र आणि गुरु सांगती । कीं देह नव्हेसी तूं आत्मा चिन्मूर्ती । परी तो सत्य न मानी मूढमती । तया उपाय काय

---

वृक्षस्थ जर खरा पडता तर त्यास काढण्याविषयीं कांहीं तरी उपाय चालता, परंतु मी पडलों असें भ्रमानें मानिलेलें आहे. त्यास ज्ञानावांचून सोडविण्यास दुसरें साधन नाहीं. तसेंच भ्रमानें मी जीव असें मानिलें आहे, त्यास मुक्त होण्यास ज्ञानावांचून दुसरें साधन नाहीं. व हें ज्ञान गुरूवांचून देव आदिकरून सर्व असले तरी सांगण्यास समर्थ नाहींत. देव जेव्हां मानवी अवतार धरून गुरुत्व पतकरितो तेव्हांच हें ज्ञान सांगतो. म्हणून सद्गुरुवांचून ज्ञानाचा उपदेश करणारें दुसरें कोणी नाहीं. आत्मज्ञानाचा उपदेश करणारा त्यास सद्गुरु म्हणतात. व बाकीच्या उपदेष्ट्यांस गुरू म्हणतात. हे असले गुरु मुक्त करूं शकत नाहींत. तर हे उलटे बंधनांतच पाडितात. करितां अशा उपदेष्ट्यांस शरण जाऊं नये. जे आत्मज्ञानानें मुक्त करितील त्यांसच शरण जावें. मग ते सद्गुरु त्या जीवास ज्ञानाचा बोध करून जन्ममरणापासून सोडवितील. परंतु ज्याचा त्यास विचार असला पाहिजे, तरच तो बोधानें सुटेल, आणि तो विचार नसला तर गुरु, तो अनधिकारी असें समजून त्याची उपेक्षा करितो.

## विचार.

विचार हाच असला पाहिजे कीं, मीं आजपर्यंत मोठे श्रम करून जें कर्म केलें, त्याचें काय फळ प्राप्त झालें ? वृक्षस्थास लोक नदींत शोधण्याकरितां धुंडितात, तें तो पहातो व त्यांस कांहीं पडलेला सांपडला नाहीं हेंही पहातो. तशीं मीं पुष्कळ साधनें केलीं पण सुटलों असें वाटत नाहीं. वृक्षस्थ बोंबलतो, हांका मारितो, तरी त्यास काढण्याविषयीं जसा कोणी कैवारी धांवत नाहीं, तसा देव, मी त्याचें रात्रंदिवस भजन करीत असतांही मला भेटत नाहीं. वृक्षस्थ जर खरा वाहावला, तर बोंबलता व रडता कसा ? तसा मी जर अज्ञान आहें तर मला तारा मला तारा हें कसें म्हणतों ? पडलेला पडलेल्यास म्हणजे (ज्याचा त्यास) दिसत नाहीं. आणि वृक्षस्थास तर मी पडलेला असें साग्रत्वें दिसतें. ज्यापेक्षां दिसतें त्यापेक्षां मी पडलों नाहीं असें वृक्षस्थानें जाणणें, यालाच विचार म्हणतात. हा विचार जीवानें असा केला पाहिजे कीं, अंतःकरणापासून देहापर्यंत सर्व मी जाणतों, तर मी वहावलों कसा ? जर मी प्रवृत्तींत वहावतों तर मीं आपणास पाहिलें नसतें. तसेंच मी मनादि विषयांस पहातों तेव्हां मनादि विषय मी नाहीं, असें वाटतें. पण माझा मला मी अमुक असा दिसत नाहीं. तर तें दाखविणारे सद्गुरूच आहेत, असा ज्याचा विवेक निश्चयानें अंतरीं असेल त्यालाच सद्गुरु उपदेश करितात. तसा नसेल तर त्याची उपेक्षा करितात.

## उपदेश.

वृक्षस्थ वृक्षावरच बसलेला असून जो मी पडलों असें मानितो त्याला कोणीं खरेपणानें सांगितलें कीं, तूं पडला नाहींस जागच्या जागींच आहेस, तर तें त्याला खरें वाटत नाहीं. तो म्हणतो कीं, मी पडलों असून मला हे निर्दय काढीत नाहींत. तसें ज्याला मी देह असें वाटतें व मी जन्मतों मरतों असें वाटतें, त्याला शास्त्र आणि गुरु सांगतात कीं, तूं देह नाहींस, आत्मा आहेस. तेव्हां तो मूर्ख जीव, तें शास्त्राचें व गुरूचें वचन खरें मानीत नाहीं. याला कोणता उपाय आहे ?

तयाची उपेक्षाचि गुरु करी । कारण कीं योग्य नव्हे अधिकारी । रविदत्ता ऐसें मानिसी अंतरीं । कीं गुरु निर्दय ॥ ३१ ॥
बुडतिया पाहून काढीना । भवव्याघ्रें धरिलें सोडवीना । तरी निर्दयामाजीं काय उणा । येविषयीं ऐकें ॥ ३२ ॥
प्रवाहीं जरी खरा पडता । निर्दय म्हणावा त्या उपेक्षिता । बैसला पाहून वृक्षावरुता । त्यागितां दोष नाहीं ॥ ३३ ॥
तैसा आत्मा सर्वगत असोनी । परिपूर्ण असंग भिन्नपणीं । कदा न स्पर्शे जन्ममरणीं । सुखदुःखें नातळे ॥ ३४ ॥
येणें मात्र भ्रमें मानिलें । कीं जन्ममरण मज लागलें । परी सद्गुरु जाणती आपुले । ठाई आपण ॥ ३५ ॥
खरें बुडती तरी तारावें । खरें बांधिलें तरी सोडवावें । ऐसिये निश्चयें पाहोनि जावें । तया उपेक्षुनी ॥ ३६ ॥
कोणासीच नाहीं बंधन । कवणा नाहीं जन्ममरण । उगेंचि मानिती पामर जन । त्या उपेक्षितां बाध काय ॥ ३७ ॥
ऐसियासी बळें उपेक्षितां । गुरूसी न संभवे निर्दयता । तस्मात् ऐक बापा रविदत्ता । सत्य वचन आमुचें ॥ ३८ ॥
विवेकीयासी उपदेश करूं । अविवेकिया हातीं न धरूं । मागूनिही हाचि निर्धारु । चालत आला ॥ ३९ ॥
आणि वर्तमानीं पुढें होणार । परि ज्ञात्याचा हाचि निर्धार । अंगीकारावें जया अधिकार । येरां उपेक्षावें ॥ ४४० ॥
आणिकही मानिसी तूं ऐसें । कीं अन्य साधन सांगावें त्या ऐसें । तरी अवधारावें मानसें । दृष्टांतासहित ॥ ४१ ॥
पडलियासी टाकून गळ । प्रवाहीं धुंडिती जन बरळ । परि जे सम नसती बाष्कळ । ते अनुमोदन देती ॥ ४२ ॥
तैशीं व्रतें तपें अनुष्ठानें । दानें तीर्थाटनें पारणें । यज्ञ याग पुरश्चरणें । इत्यादि क्रिया ॥ ४३ ॥
अर्चन प्रतिमादिकांचें । अथवा भजन आवडत्या देवाचें । ऐसें साधन नाना परीचें । मोक्षा अनुपयोगी ॥ ४४ ॥
हेंचि नानाशास्त्रें प्रतिष्ठिती । पुराणेंही गलबला करिती । बहु कासया वेदही गाती । परी तो अर्थवाद ॥ ४५ ॥
येणें जीव हा बंधांतून । न सुटे हें सत्य सत्य प्रमाण । ऐसें ज्ञाते जाणती पूर्ण । कीं हें निरर्थक ॥ ४६ ॥
तस्मात् ज्ञाते अन्य साधना । कदां न सांगती मुमुक्षु जना । मुमुक्षु नसतां येरां ही प्रेरणा । सहसा न करिती ॥ ४७ ॥
ते तों करितची असती सर्वें । तेंचि कासया प्रयोजावें । इतुकियापासून जें परतावें । हृदयशुद्धि होऊनि ॥ ४८ ॥
जे सर्व कर्मांपासून परतले । तेचि अंतर शुद्धीतें पावले । पुढें सद्गुरूसी शरण गेले । करूं लागले श्रवण ॥ ४९ ॥
श्रवणापरतें साधन कांहीं । अज्ञान निरासा दुजें नाहीं । तेंही श्रवण वेदांताचें पाहीं । जेथें ब्रह्मात्मा ऐक्य ॥ ४५० ॥

अशाची गुरू उपेक्षा करितात. कारण तो योग्य अधिकारी नाहीं. तूं म्हणशील कीं, सद्गुरु निर्दय आहेत. ते बुडणारास पहात असतां काढीत नाहींत, व संसाररूपी वाघानें धरलें असतां त्यापासून जो सोडवीत नाहीं, तो कमी निर्दय आहे असें कसें म्हणावें ? तरी याविषयीं सांगतों तें ऐक. वृक्षस्थ प्रवाहांत जर खरा पडता, तर त्याची उपेक्षा जो करील तो निर्दय ठरता. परंतु वृक्षस्थ वृक्षावरच आहे. तर त्याची उपेक्षा केली असतां कांहीं दोष नाहीं. तसा आत्मा सर्वगत असून परिपूर्ण असंग आहे, तो कधींही भिन्नपणानें जन्ममरणास स्पर्शत नाहीं, व सुखदुःखास लिप्त होत नाहीं. यानें मात्र भ्रमानें मानिलें कीं, मला जन्ममरण लागलें आहे, तें चुकत नाहीं. वास्तविक कोणासच जन्ममरण नाहीं, असें सद्गुरु जाणतात. खरे बुडतील तर तारावे. खरें बांधलें असेल तर सोडवावें. असें नसेल आणि कोणी उगाच मानील तर त्याला उपेक्षून जावें. कोणासच बंधन नाहीं व कोणासच जन्ममरण नाहीं. असें असून मूर्ख लोक उगाच मानितात. त्यांची उपेक्षा केली असतां कोणता बाध आहे? सद्गुरूनें अशांची बळें उपेक्षा केली तरीही त्यांस निर्दयता संभवत नाहीं.

भूत, भविष्य, वर्तमान काळांतील ज्ञाते, ज्याला अधिकार त्याचाच अंगिकार करितात व इतरांची उपेक्षा करितात. तूं असें म्हणशील कीं, त्यांस योग्य अशीं अन्य साधनें सांगावीं, तरी याविषयीं दृष्टांत सांगतों तो ऐक. वृक्षावर बसलेला मी पडलों असें मानितो. म्हणून त्यास काढण्याकरितां मूर्ख लोक गळ टाकून प्रवाह धुंडितात. परंतु जे शहाणे ते गळ टाकून शोधीत बसावें असें कबूल करीत नाहींत. तशीं व्रतें, तपें, अनुष्ठानें, दानें, तीर्थाटणें, पारणें, यज्ञयाग, पुरश्चरणें, प्रतिमांची पूजा, भजन अशीं नाना प्रकारचीं साधनें मोक्षास उपयोगी नाहींत. अनेक शास्त्रें, तशींच पुराणें व वेदपर सांगितलेलीं साधनें सांगतात, परंतु हा अर्थवाद. याचे योगानें जीव बंधांतून सुटत नाहीं, असें ज्ञाते जाणतात. म्हणून हीं वर सांगितलेलीं साधनें मुमुक्षूस ज्ञाते कधींही सांगत नाहींत. जो मुमुक्षू नाहीं त्यास बोध करीत नाहींत. कारण वर सांगितलेलीं साधनें सर्व करितात तेव्हां आपण सांगण्यांत काय अधीक आहे ? व्रतें, तपें इत्यादि साधनें निष्काम केलीं असतां चित्तशुद्धि होते. जे सर्व कर्मांपासून सुटले ते अंतर शुद्धीला पावतात. तेच सद्गुरूस शरण जाऊन त्यांचे मुखानें ब्रह्मात्म्याचें ज्यांत ऐक्य अशा वेदांताचें श्रवण करितात. अज्ञान घालविण्यास वेदांताच्या श्रवणासारखें दुसरें साधनच नाहीं.

वृक्षाग्राचिया पुरुषासी । अन्य वाक्यें न येती उपयोगासी । एकचि वाक्य कीं प्रवाहीं न पडसी । अससी वृक्षीं स्वस्थ
तैसें परोक्षही सच्चिदानंद । ब्रह्म एक आहे विशुद्ध । तेणें वाक्यें नव्हे बोध । अधिकारी जरी ॥ ५२ ॥
तूंचि प्रत्यक्ष ब्रह्म असशी । वेदाचीं वाक्यें जीं ऐशीं । तींच गुरु बाणविती शिष्यासी । विवेचनद्वारा ॥ ५३ ॥
ऐसें हें जें वाक्य अपरोक्ष । तेणेंचि ज्ञान होय प्रत्यक्ष । तेव्हांचि अधिकारिया होय मोक्ष । अज्ञान नासोनी ॥ ५४ ॥
ऐसेंही वाक्य जरी बोधिलें । आणि शिष्याप्रतिही विश्वासलें । परी विवेचन न होतां व्यर्थ गेलें । जाले पाषांडी ॥ ५५ ॥
गुरूनेंचि ब्रह्म म्हणतां । देहादिकांसी मानिली आत्मता । तस्मात् पाखांडी ययापरता । दुजा कोण असे ॥ ५६ ॥
हें ज्ञान नव्हे अधिक अज्ञान । वाढलें दृढ जालें बंधन । ऐसा पाखांडी कोटि कल्पेंकरून । न सुटे कदां ॥ ५७ ॥
तस्मात् खरें जयासी तरणें । तेणें विवेचन सांग करणें । सर्व आभासाहून ओळखणें । यथार्थ आत्मत्व ॥ ५८ ॥
आतां तेंचि विवेचन कैसें । बोलिजे तें सावधान मानसें । अगा हे रविदत्ता ग्रहण करी तैसें । विवेचून यत्नें ॥ ५९ ॥

**बोधाभासाच्छुद्धबोधो विविच्येदतियत्नतः ॥**

बोधाभासाहून शुद्ध बोध । विवेचून घेइजे प्रसिद्ध । तोचि आत्मा ब्रह्म विशुद्ध । बोधाभास अनात्मा ॥ ४६० ॥
एकदां विवेचनें नाहीं कळलें । परी वारंवार पाहिजे विवेचिलें । यास्तव अति प्रयत्नें म्हणितलें । सत्य सत्य त्रिवाचा ॥६१॥
वृक्षीं बैसला तो मुख्य बिंब । प्रवाहीं दिसे तो प्रतिबिंब । हे दोन परी असती स्वयंभ । एक सत्य एक मिथ्या ॥ ६२ ॥
जें दिसे तें सत्य नाहीं । उगेंच पडिलें वाटे प्रवाहीं । न दिसे जें पाहे सर्वांही । तें प्रवाहा वेगळें ॥ ६३ ॥
तेवींच स्फूर्तीपासून देहांत । जितुकीं तत्त्वें हीं समस्त । तितुकींही जाणतिया दिसत । परी तीं असत्य सर्व ॥ ६४ ॥
जो सर्वत्रांसी स्वप्रकाशें । साधनेंविण जाणतसे । परी तो कळेना कवणा अल्पसें । आणि आपणा न देखे ॥ ६५ ॥
तोचि आत्मा ब्रह्म निश्चयेंसी । विलक्षण असे या सर्वांसी । जन्ममरणा पापपुण्यासी । देहकृता नातळे ॥ ६६ ॥
जो प्रतिबिंबरूप आभास । जो मागें बोलिला बहुवस । आणि पुढेंही बोलिजे तयास । तोचि कर्ता भोक्ता ॥ ६७ ॥
ऐसा आभास जो मिथ्या दिसे । तो तिहीं काळींही सत्य नसे । जो देखणा तो तिहीं काळीं असे । तोचि आत्मा आपण

वृक्षावर बसलेला गृहस्थ नदींत पडलों असें पहातो, त्यास एकच वाक्य सांगावयाचें कीं, तूं प्रवाहांत पडला नाहींस, वृक्षावरच जशाचा तसा स्वस्थ आहेस. तसें जो जो अधिकारी शिष्य आहे त्यास परोक्ष एक सच्चिदानंद ब्रह्म आहे या वाक्यानें बोध होत नाहीं, म्हणून तें वाक्य न सांगतां तूंच प्रत्यक्ष ब्रह्म आहेस अशीं जीं वेदांचीं महावाक्यें, तींच महावाक्यें गुरु शिष्याचे ठायीं विवेचनानें बाणवितात. तूं ब्रह्म आहेस, असें जें अपरोक्ष वाक्य त्यानेंच प्रत्यक्ष ज्ञान होतें. मग सहजच अधिकाऱ्याचें अज्ञान नासून त्यास मोक्ष प्राप्त होतो. पण तें अपरोक्ष वाक्य त्यास मान्य होऊन त्याचें विवेचन झालें पाहिजे. तें न होईल तर वाक्य व्यर्थ जाऊन शिष्य पाषांडी होतो, म्हणजे तो देहासच आत्मा मानितो. हें त्याचें ज्ञान नव्हे, तर अधिक अज्ञानच वाढलें, असें समजलें पाहिजे. कारण अशानें तो सुटला जात नाहीं, तर दृढ बंधनांत पडतो. असा जो पाषांडी तो, कोटी कल्प जरी असला तरी मुक्त होत नाहीं. यांकरितां ज्याला खरें तरणें असेल त्या मुमुक्षूनें सांग विवेचन करावें आणि सर्व आभासाहून खरें आत्मतत्त्व ओळखावें.

**अर्थ**–बोधाभासाहून शुद्ध बोध विवेचून घ्यावा तोच शुद्ध ब्रह्मात्मा आहे व बोधाभास अनात्मा आहे. याविषयीं विवेचन एकदां झाल्यानें कळलें नाहीं, तर वारंवार विवेचन केलें पाहिजे. म्हणूनच श्लोकांत अतिप्रयत्नतः असें वाक्य घातलें आहे.

**आत्मा कोण व आभास कोण यांविषयीं विवेचन.**

वृक्षावर बसलेला तो मुख्य बिंब. जो प्रवाहांत दिसतो तें प्रतिबिंब. हे दोन प्रकार. त्यांत एक सत्य, एक मिथ्या. जें दिसतें तें खोटें; वृक्षस्थास मी प्रवाहांत पडलों असें दिसतें तें खोटें; व वृक्षावर असून जो दिसत नाहीं परंतु सर्वांस पहातो, तो प्रवाहांतील प्रतिबिंबाहून वेगळा आहे. तसें स्फूर्तीपासून देहापर्यंत सर्व जितकीं तत्त्वें तितकीं जाणणाऱ्यास दिसतात, म्हणून तीं मिथ्या. जो सर्वांस आपल्या प्रकाशानें साधनावांचून जाणतो, तो कोणास यत्किंचितही कळत नाहीं, व तो आपणासही पहात नाहीं. तोच आत्मा, ब्रह्म, या सर्वांहून विलक्षण आहे. तो देहकृत पाप, पुण्य, जन्म, मरण यांस लिप्त होत नाहीं. तर प्रतिबिंबरूप जो आभासजीव तोच कर्ता, भोक्ता, जो मिथ्या दिसणारा आभास तो तिन्ही काळींही सत्य नाहीं. तर या आभासास पहाणारा तो तिन्ही काळीं आहे. तोच आपण आत्मा.

आत्मा म्हणिजे आपणा म्हणावें । येर सर्व तें आपण नव्हे । ऐसें जाणोन अंगें व्हावें । देह असतां ब्रह्मरूप ॥ ६९ ॥
आत्माचि कैसा ब्रह्मरूप । ऐसा असे जरी आक्षेप । तरी सावधान असावें साक्षेप । उभयांचीं लक्षणें बोलूं ॥ ४७० ॥
जगउत्पत्ति-स्थिति-लय । मायेस्तव होत जाय । परि तिहीं काळीं जें अद्वय । अबाधित तें सद्रूप ॥ ७१ ॥
सृष्टीपूर्वीं सद्रूप होतें । यास्तव अधिष्ठानें या भ्रमातें । सत्यावीण अन्यथा भासातें । दिसणें न घडे ॥ ७२ ॥
एवं सृष्टिपूर्वीं आहेच आहे । सृष्टि होतां माजी राहे । म्हणोनि सर्वा आहेपणा लाहे । घटीं मृत्तिका जेवीं ॥ ७३ ॥
पुढें नासूनी जातां सर्व । उरे तें सद्रूप स्वयमेव । जेवीं घट भंगतां रूप नांव । मृत्तिका उरे ॥ ७४ ॥
एवं सृष्टीच्या आदि अंतीं उरे । मध्येंही असे निर्विकारें । तेंचि सद्रूप ब्रह्म साचारें । अविनाश सदां ॥ ७५ ॥
जेवीं तिहीं काळीं सत् न नासे । तेवीं सदोदित ज्ञानही असे । तेंचि चिद्रूप निर्विशेषें । शून्य देखणें ॥ ७६ ॥
माया असतां प्रकाशावी । माया निमतां अवलोकावी । तया नाहींपणाची प्रतीति घ्यावी । तेचि ज्ञप्ति चिद्रूप ॥ ७७ ॥
एवं सत्‌चित्‌लक्षणें दोन । तेवींच तिसरें आनंदघन । सर्वथा सुखदुःखविहीन । आनंदरूप ॥ ७८ ॥
स्फुरणापासून अलीकडे । दिसती सुखदुःखाचें सांकडें । यास्तव आनंदरूपता न जोडे । सुखदुःखाभावीं सिद्ध ॥ ७९ ॥
ऐसें सच्चिदानंद ब्रह्म । तिहीं लक्षणीं सर्वदां सम । तोचि हा कूटस्थ आत्माराम । निर्विकाररूप ॥ ४८० ॥
तेंचि लक्षणें आत्मत्वीं असतीं । यास्तव ब्रह्मचि आत्मा चिन्मूर्ति । श्रुति युक्ति आणि अनुभूति । तिहीं प्रतीतीं सिद्ध ॥
हेंचि लक्षण आत्मत्वीं कैसें । प्रस्तुत बोलिजे असे तैसें । तें लक्षण असतां विश्वासे । मन हें साधकाचें ॥ ८२ ॥
सच्चिदानंद ब्रह्म बोलिलें । तेंचि आत्मत्वीं असे पाहिलें । जें कां अस्ति भाति प्रिय म्हणितलें । अपर पर्यायें ॥ ८३ ॥
अस्ति म्हणजे आहेपणा । तेंचि सद्रूप पूर्णपणा । भाति म्हणजे चिद्रूप देखणा । प्रिय रूप आनंद ॥ ८४ ॥
एवं अस्ति भाति प्रियरूप आत्मा । तोचि सच्चिदानंद परमात्मा । येथें भेद नाहीं एक नामा । वाचून कांहीं ॥ ८५ ॥
सूर्य भानु नामें दोन । परि द्विधा नव्हे सहस्रकिरण । तैसाचि आत्मा ब्रह्म पूर्ण । नामभेदें एकरूप ॥ ८६ ॥
असो अस्ति भाति आणि प्रिय । याचा पिंडीं कैसा प्रत्यय । तेंचि बोलिजे यथान्वय । दृष्टांतासहित ॥ ८७ ॥
मी आहें जो सर्व जनांसी । आहेच आहे दिवा कीं निशीं । मी नाहीं हा संशय कोणासी । कधींही नव्हे ॥ ८८ ॥

आत्मा म्हणजे आपण. त्याखेरीज बाकीचीं आपण नाहीं असें जाणून देह असतांही ब्रह्मरूप व्हावें.

### आत्मा ब्रह्मरूप कसा याविषयीं विवेचन.

**सद्रूप**—म्हणजे आहेपणा. मायेमुळें जगाचा उत्पत्ति-स्थिति-लय होतो, परंतु अद्वयपणानें तिन्ही काळीं नाश पावणारें, तें सद्रूप.

खोट्याला खऱ्यावांचून रहाण्यास जागा नाहीं. तसें, सृष्टीरूप जो भ्रम तो भासण्यास सद्रूपावांचून कोणी नाहीं. म्हणून सृष्टीपूर्वीं सद्रूप होतें. सृष्टी आहे तेव्हां तें आहेच व सृष्टीलयानंतरही तेंच आहे. जसें माती घटापूर्वीं होती. घट असतांना माती आहेच. घट भंगल्यानंतर नांव रूपानें मातीच उरते. याचप्रमाणें सृष्टीच्या आदी, अंतीं, मध्यें उरतें तेंच अविनाशी सद्रूप ब्रह्म. जसें सद्रूप तिन्ही काळीं अविनाशी आहे तसेंच तिन्ही काळीं ज्ञान अविनाशी आहे.

**चिद्रूप**—म्हणजे ज्ञान. माया असतां प्रकाशावी ती नाश पावत असतां पहावी आणि तिच्या नाहींपणाचा अनुभव सांगून जें निर्विशेष शून्यें जाणून उरणारें, तेंच ज्ञप्ति चिद्रूप होय. आनंदरूप म्हणजे जें सुखदुःखांवांचून सदोदीत आहे तें आनंदरूप.

स्फुरणापासून अलीकडे दुःख आहे. सुखदुःख आहे तोंपर्यंत आनंदरूपता प्राप्त होत नाहीं. सत्, चित्, आणि आनंद अशा तीन लक्षणांनीं सच्चिदानंद ब्रह्म आहे. तोच निर्विकाररूप कूटस्थ आत्मा. या आत्म्याचींही हींच लक्षणें पर्यायानें आहेत म्हणून आत्मा श्रुति, युक्ति, अनुभवानें ब्रह्म आहे. आत्म्याचीं अस्ति, भाति, प्रिय हीं लक्षणें आहेत. हीं सच्चिदानंद पदाचीं निराळीं पर्यायानें नांवें आहेत. अस्ति म्हणजे आहेपणा. तेंच सद्रूप. भाति म्हणजे प्रकाशक. तेंच चिद्रूप. प्रिय म्हणजे आनंदरूप. याप्रमाणें अस्ति, भाति, प्रिय या तीन लक्षणांचा आत्मा तोच सच्चिदानंदरूप परमात्मा म्हणजे ब्रह्म. येथें नांवावांचून दुसरा भेद नाहीं. सूर्य आणि भानु हीं नांवें मात्र दोन पण वस्तु एकच. तसें आत्मा आणि ब्रह्म एकच.

### अस्ति, भाति, प्रिय यांचा पिंडांतील अनुभव.

**अस्ति**—मी रात्रंदिवस सदोदीत आहेंच आहें. मी नाहीं असा कोणास कधींही संशय उत्पन्न होत नाहीं.

सर्वत्रांसी पुसोनि पहावें । कीं सखया असती कीं नव्हे । तरी तो म्हणे हें काय बोलावें । नलगे असतां ॥ ८९ ॥
जरी मी नाहीं उगेंच बोलतां । लाज वाटे तयाचे चित्ता । आणि अहाचि वाटे समस्तां । हंसून भाविती भ्रम ॥ ४९० ॥
ऐसा आहेपणा जो आपुला । सर्वत्रीं असे संचला । येथें संशय नाहीं कोणाला । हा अस्तित्वें आत्मा ॥ ९१ ॥
हा आहेपणा जागृतींत असे । स्वप्नींही भास देहीं वसे । बहु बोलणें कासया अपैसें । आहे झोंपेमाजी ॥ ९२ ॥
झोंपीं गेला परी मी नाहीं । ऐसा प्रत्यय नसे कवणाही । मी निजेलों होतों निःसंदेहीं । या रीती आहे हा प्रत्यय ॥ ९३ ॥
एवं आहेपणा सांगितला ऐसा । आतां चिद्रूप भातित्वें असे कैसा । तोही बोलिजे सावध असा । निरूपणासी ॥ ९४ ॥
कर्णीं शब्द हा जाणतसे । त्वचीं स्पर्शातें ओळखीतसे । शब्द स्पर्श हे दोन्ही भिन्नसे । परी ज्ञान दोहींचें एक ॥ ९५ ॥
शब्द स्पर्श जाणिले जया ज्ञानें । तेणेंचि रूपातें अनुभवणें । रस गंधातेंही ओळखणें । ज्ञानें ययाची ॥ ९६ ॥
श्रोत्र ऐके परि देखेना । डोळा देखे परि ऐकेना । एवं इंद्रियांचे धर्म घेववतीना । एकाचे एकासी ॥ ९७ ॥
परि पांचांतें जाण एकलें । तें कधींही न जाय लोपलें । जरी ते विषय वेगळाले । परी ज्ञान एक ॥ ९८ ॥
हे असो कर्मेंद्रियांची क्रिया । जाणणेंचि होय ज्ञाना यया । अथवा जडत्वें पंचविषयां । जाणे तेंचि ज्ञान ॥ ९९ ॥
एवं जागृतीचे जितुके व्यापार । बहुधा परी पांचची प्रकार । तितुकेही जाणे सविस्तर । स्वप्रभें ज्ञान ॥ ५०० ॥
अनेकधा व्यापार असतां । एकचि ज्ञान जाणे समस्तां । अंधार कीं प्रकाश न म्हणतां । जाणे देहक्रिया ॥ १ ॥
ऐसें सर्व जागृतींत जाणे । स्वप्नही ओळखावें तेणें । तें दुजें जरी मानिजे कोणें । तरी जागरीं नाठवी ॥ २ ॥
स्वप्नींहि विषय भासती । प्रत्यक्षाविण बुद्धीच कल्पिती । ते ते भासरूपें उमटती । परी विषय पांच ॥ ३ ॥
तेथें आपणही आहे एक । येर अन्य सुखदुःखदायक । त्या उभयांसीही प्रकाशक । एकलें ज्ञान ॥ ४ ॥
याचि रीतीं स्वप्न जागर । जाणिले ज्या ज्ञानें सविस्तर । तेंचि ज्ञान निर्विकार । जाणे सुप्तीतें ॥ ५ ॥
सुप्तींत जाणणेंचि नाहीं । ऐसें न कल्पावें कोणीं कांहीं । हें बोलणें पुढें सर्वही । कळे अनुक्रमें ॥ ६ ॥
प्रस्तुत दोनी अवस्था जेणें । जाणल्या असती ज्ञानें । तेणेंच सुप्ती अनुभवणें । बोलली एकरूपता ॥ ७ ॥
ऐसिया नित्य अवस्था तीन । होत असती जीवालागून । परी तैं एकलेंचि जाणे ज्ञान । आपुल्या प्रकाशें ॥ ८ ॥

---

कोणाही मनुष्यास विचारावें कीं, तूं आहेस किंवा नाहींस, तर तो म्हणेल कीं, मी असून नाहीं असें कसें म्हणूं ? मी नाहीं असें जर म्हणूं, तर त्याची मला लाज नाहीं का वाटणार ? व लोक मला हंसून भ्रमिष्ट नाहींका म्हणणार ? सहज म्हणतील. तेव्हां मी आहे हेंच खरें आहे. याप्रमाणें आपला आहेपणा जो सर्वांत संचलेला आहे, त्याविषयीं कोणालाही संशय नाहीं. हा अस्तित्वें आत्मा. या आत्म्याचा आहेपणा जागृतींत आहे. तसाच स्वप्नांत भासदेहाचे ठायींही आहे. तसाच झोंपेंतही आहे. झोंप लागली असली तरी मी नाहीं असें कोणासही वाटत नाहीं. कारण मी निजलों होतों हा अनुभव सर्वांस आहे. हा झोंपेंतील आहेपणा.

भाति—कानानें शब्द ऐकतो. त्वचेनें स्पर्श ओळखतो. शब्द, स्पर्श हे दोन्ही भिन्न आहेत, परंतु दोहोंचें ज्ञान एकच आहे. ज्या ज्ञानानें शब्द, स्पर्श जाणतो त्याच ज्ञानानें रूप, रस, गंध जाणतो. कान ऐकतो, पहात नाहीं. डोळा पहातो, पण ऐकत नाहीं. या प्रमाणें इंद्रियांचे धर्म एकमेकांस घेववत नाहींत; परंतु पांचांचें ज्ञान किंवा जाणणें एक आहे. तें कधीं लोपत नाहीं. विषय जरी वेगळाले आहेत, तरी त्यांस जाणणारें ज्ञान एकच आहे. याच ज्ञानानें कर्मेंद्रियाची क्रिया जाणली जाते. अथवा जडत्वानें पंच विषयांस जाणणें तेंच ज्ञान. जागृतीचे पुष्कळ व्यापार आहेत. त्या व्यापारांचे प्रकार पांच आहेत. ते सविस्तर ज्ञानच जाणतें. ज्या ज्ञानानें जागृति जाणतो, त्याच ज्ञानानें स्वप्न जाणतो. कोणी स्वप्नांतील जाणणें दुसरें आहे असें म्हणेल, तर स्वप्न गेल्यावर तें आठवूं नये, असें असून जर तें आठवतें, तर दोहोंचें ज्ञान एक आहे, दुसरें नाहीं.

स्वप्नांत जे विषय भासतात ते कल्पित आहेत, प्रत्यक्ष नाहींत. हे कल्पित विषय भासरूपानें उत्पन्न होतात. हे स्वप्नांतील विषय पांचच आहेत. स्वप्नांत आपला व लोकांचा देह कल्पून पहातो. तें पहाणारें ज्ञान एकच आहे. ज्या ज्ञानानें स्वप्न आणि जागृती जाणली जाते, तेंच ज्ञान सुषुप्तीस जाणतें. सुषुप्तींत जाणणें नाहीं, असें कोणी म्हणेल, परंतु तींतही जाणणें आहे. त्याविषयीं पुढें वर्णन करूं. येथें इतकेंच सांगतों कीं, तिन्ही अवस्थेंत जाणणें एकच आहे.

जीवाला नित्य जागृति, स्वप्न, सुषुप्ति, अशा तीन अवस्था होतात. त्या तिहींस एकटें ज्ञान आपल्या प्रकाशानें जाणतें.

नैमित्तिक मूर्च्छा समाधि । होय जरी केव्हां कधीं । परी तयासीही ज्ञान आधीं । जाणतचि असे ॥ ९ ॥
अमुक ज्ञाना कळल्याविण । किंचित्कार्य नव्हे आन । होयसें नायकों न देखों पूर्ण । तिहींही लोकीं ॥ ५१० ॥
दिवसा ज्या ज्ञानें जाणिलें । प्रकाशामाजीं अनुभाविलें । त्याचि ज्ञानें निशीतें ओळखिलें । सूर्याभावीं ॥ ११ ॥
जेणें आजि जाणिलें सर्वें । तो उद्यां जाणेल स्वयमेवें । कालीचें शिळें आजीचें नवें । नव्हे सहसा ॥ १२ ॥
रविवारीं तें मंदवारीं । बीज पौर्णिमा एकसरी । शुक्ल कृष्ण पक्षां भेद परी । ज्ञान तें एक ॥ १३ ॥
बारा मास वर्षें साठी । वाउगी नामाची परिपाठी । परंतु शत वर्षांही शेवटीं । एकलें ज्ञान जाणे ॥ १४ ॥
गर्भीं जाणे जाचणीसी । तेंच ओळखीतसे जन्मासी । बाळ तारुण्य वृद्धपणासी । एकलें ज्ञान जाणे ॥ १५ ॥
एवं मरणांत एक देह जाणिला । दुजिया होतांच पाहूं लागला । मध्यें संधीही ओळखिला । एकले ज्ञानें ॥ १६ ॥
ऐसे अनंत देह होऊन गेले । बहुधा चतुर्युगही लोटले । ऐसे कल्पही उदंड जाले । परि ते जाणिलें ज्ञानें ॥ १७ ॥
नित्य कल्प नित्य कल्पाचा संधी । जाणत असे ज्ञान निरवधी । महाकल्पाचे लयाही कधीं । जाणिल्याविण न राहे॥१८॥
ऐसें ज्ञान जें सदोदीत । उपकरणाविण प्रकाशित । तिहीं काळीं जें अबाधित । चिद्रूप एक ॥ १९ ॥
कधींही नाश नाहीं जयासी । तरी चिद्रूपचि कीं अविनाशी । तेंचि सद्रूप या दो लक्षणांसी । भेद सहसा नाहीं ॥५२०॥
एवं सद्रूप तें चिद्रूप । तयासि अस्ति भाति हे जल्प । आतां तिसरें जें कां आनंदरूप । प्रियताही बोलिजे ॥ २१ ॥
हेंही स्वरूपलक्षण तिसरें । जें सर्वांचें अनुभावानुकारें । तेंचि बोलिजे रविदत्ता अरे । अल्प संकेतें ॥ २२ ॥
सर्वांसी सर्व प्रिय असती । ते कवणाचे निमित्तें आवडती । ते विवेकें पाहतां कळों येती । कीं आपणाप्रीत्यर्थ ॥ २३ ॥
ते ते जरी आवडती खरे । तरी क्षणक्षणां न विटती सारे । आपणा उबग येतां येरे । भोग्यजाता उपेक्षी ॥ २४ ॥
पति स्त्रियेची आवडी धरी । क्षणां विटून परती सारी । तिनें प्रार्थितांही चाड न धरी । छाळितां अधिक त्रासे ॥ २५ ॥
स्त्रियेसी भोगइच्छा नसतां । बळात्कारें भोगही घडतां । आवडी उपजे कदां चित्ता । इच्छी तरी प्रिय वाटे ॥ २६ ॥
पुत्र प्रिय मातापितरां । यास्तव चुंबिती त्या लेंकुरा । त्यांचे प्रीतीस्तव तरी तें अवसरा । कंटाळून रडे ॥ २७ ॥

तसेंच नैमित्तिक ज्या मूर्च्छा, समाधि वगैरे अवस्था आहेत, त्यांसही तेंच ज्ञान जाणतें. अमुक एक गोष्ट ज्ञानाला कळल्यावांचून राहिली किंवा घडली असें आम्हीं तिन्ही लोकीं ऐकिलें नाहीं, व पाहिलेंही नाहीं. दिवसास सूर्याचे प्रकाशांत ज्या ज्ञानानें जाणिलें त्याच ज्ञानानें सूर्य नसतां रात्रींत जाणिलें. ज्या ज्ञानानें आज जाणिलें, त्याच ज्ञानानें उद्यां जाणील. कालचें ज्ञान तें शिळें व आजचें ज्ञान तें नवें असें नाहीं, तर दोन्ही दिवसांचें ज्ञान एकच. जें आदित्यवारीं तेंच सोमवारीं. पौर्णिमेस तेंच बिजेस. जें ज्ञान शुक्लपक्षांत तेंच कृष्णपक्षांत.

बारा महिने साठ सवत्सरें हीं कालमानानें नांवें मात्र अनेक आहेत. परंतु शंभर वर्षें जरी झालीं तरी जाणणें एक. जें ज्ञान गर्भांत जाचणीस जाणतें तेंच ज्ञान जन्मास जाणतें. बालपण, तरुणपण, वृद्धपण यांस तेंच ज्ञान जाणतें. देह जन्मल्यापासून मरेपर्यंत ज्या एका ज्ञानानें जाणिलें. त्याच ज्ञानानें दुसरा देह झाल्यावर पाहूं लागला. दोन देहांची जी मध्यसंधी त्या संधीसही याच ज्ञानानें जाणिलें. याप्रमाणें अनंत देहांत याच ज्ञानानें जाणलें. फार काय सांगूं, चार युगें असें अनंत कल्प जरी गेले, तरी सर्वांत जाणणें एक. नित्यकल्प, नित्यकल्पाचा संधि, तसेंच महाकल्प, महाकल्पाचा लय एकटें ज्ञान जाणतें. याप्रमाणें साहित्यावांचून जें सदोदित तिन्ही काळीं अबाधित प्रकाशतें, तेंच एक चिद्रूप. या चिद्रूपाचा कधींही नाश नाहीं. म्हणून हें अविनाशी चिद्रूप. जें अविनाशी सद्रूप तेंच अस्तिभातिप्रिय सर्वांस सर्व आडवतें, तें कोणाचे निमित्तानें, याचा विचार केला म्हणजे कळतें कीं, आपल्यामुळें. आपल्याखेरीज बाकीचे सर्व पदार्थ आवडले असते तर ते वारंवार नकोसे झाले, नसते. आपणास एकदां त्यांचा उबग आला म्हणजे मग सर्व भोग्यजाताची उपेक्षा करितो. पुरुष स्त्रियेची आवडी धरितो. परंतु क्षणांत विटून तीस दूर घालवितो. मग तिनें प्रार्थना केली तरी तिचें ऐकत नाहीं. असें असून तिनें फारच आग्रह करून छळ करण्यास आरंभ केला तर तो त्रास पावतो. त्याचप्रमाणें स्त्रियेस भोगेच्छा नसतां बलात्कारानें भोग घडला, तर तिचे चित्तास आवडी उत्पन्न होत नाहीं. पण तीच जर भोगाची इच्छा करीत आहे तर तो भोग तीस प्रिय होतो. आईबापांस मुलगा प्रिय म्हणून तीं त्याचें चुंबन घेतात, परंतु पुत्र, चुंबनाचे त्रासानें कंटाळून रडतो.

मायबापें आपणा रक्षिती । म्हणून आपणानिमित्त आवडती । आपणासि जे उपेक्षिती । त्यांची आवडी कोणा ॥२८॥
ऐसेंचि भ्राता मित्र स्वजन । पशु वृत्ति राज्यादि धन । आपणासाठीं भोग संपूर्ण । आवडते होती ॥ २९ ॥
दुर्ब्राह्मण्य आपुलें जावें । यास्तव वेदशास्त्र पढावें । अति प्रेमें देवासी भजावें । परी सुखी व्हावें आपण ॥ ५३० ॥
मोक्षप्राप्ति आपणा व्हावी । यास्तव गुरुपदीं आवडी धरावी । श्रवणादि साधनेंही करावीं । आपुलिया हेतु ॥ ३१ ॥
ऐसे जागृती आदि मोक्षावरी । आपणा निमित्त आवडी सारी । तस्मात् ते ते प्रियताचि नव्हे खरी । उगी वरी वरी धरियेली
आपुलें कार्य जोंवरी होणें । तोंवरी अन्यासी प्रीति करणें । तूं मज आवडता जीवेंप्राणें । परी तें उपरोधिक ॥ ३३ ॥
उपरोधिका म्हणावें खोटें । खोटें तें कधीं जाय पालटे । ऐशी आपुली आवडी कोठें । अन्या निमित्त ॥ ३४ ॥
निमित्तावांचून सहज आवडी । आपुली आपणा असे गाढी । स्फूर्तिही न होतां धडफुडी । आहे तैशी आहे ॥ ३५ ॥
स्फूर्ति म्हणजे मी किती आवडता । ऐसा भाव उत्पन्न न होतां । निरिच्छ आवडी असे तत्त्वतां । अकृत्रिमपणें ॥ ३६ ॥
भाव उठे जया प्रीतीसी । अकृत्रिम न म्हणावें तिसी । अन्यत्वीं उमटे ते आपैसी । नाशही पावे ॥ ३७ ॥
उठे जे स्त्रियादिकांचे ठाईं । त्या प्रीतीसी राग नाम पाहीं । अप्राप्त वस्तूचे समुदायीं । इच्छा शब्दें बोलिजे ॥ ३८ ॥
यागादि कर्मीं ते श्रद्धा । त्या आवडीसी नांव सुबुद्धा । गुरुदेवाचे चरणीं जे मेधा । प्रीति ते भक्ति ॥ ३९ ॥
ऐशीं उठिल्या प्रीतीसी नांवें । चारीही भिन्न भिन्न अपूर्वें । हीं असती सहेतुक सर्वें । म्हणून कृत्रिमरूप ॥ ५४० ॥
तैशी आवडी आपुली नसे । अभावीं भावीं सारखी असे । तस्मात् आत्मप्रियता ते वसे । अकृत्रिमपणें ॥ ४१ ॥
उत्पन्न होय तें नाश पावे । म्हणोनि उद्भवे तें प्रीति नव्हे । उत्पन्न न होतां जें स्वभावें । तेंचि प्रिय निर्हेतुक ॥ ४२ ॥
ऐशी प्रियता आत्मरूपाहुनी । दुजी नाहीं नाहीं सत्य सत्य वाणी । जरी देहांत वृत्तीपासोनी । आवडी परी आत्मार्थ॥४३॥
देहादिकांचीही जे प्रीति । वाउगीच ते पुढें बोलिजेती । प्रस्तुत येथें ममत्व रीती । निषेधिली पुत्रादिकांची ॥ ४४ ॥
असो आपुली जे आत्मप्रियता । जे निर्हेतुक अकृत्रिमता । हाचि आनंद असे तत्त्वतां । लक्षण तिचें ॥ ४५ ॥

---

आईबापें आपलें रक्षण करितात म्हणून तीं आपणाकरितांच आवडतात. जीं आपली उपेक्षा करितात त्यांची कोणास आवड नसते. भाऊ, मित्र, स्वजन, पशु, राज्य, धन इत्यादि सर्व भोग्यजात आपल्यामुळें आवडते होतात. आपणास ब्राह्मण्य नाहीं तें वाढवावें म्हणून वेदशास्त्र पढतात. आपण सुखी व्हावें म्हणून अति प्रेमानें देवास भजतात. आपणास मोक्ष प्राप्त व्हावा म्हणून गुरुपदीं आवडी धरून श्रवणादि साधनें करितात. याप्रमाणें जागृतीपासून मोक्षापर्यंत सर्व आवडी आपणाकरितां आहे.

भोग्यजातांत प्रीति दिसते ती वरवरची. ती वास्तविक प्रीतिच नव्हे. जोंपर्यंत आपलें कार्य आहे तोंपर्यंत दुसऱ्यावर प्रीति करितों; तें कार्य संपलें म्हणजे प्रीति करीत नाहीं, म्हणून, या प्रीतीस उपरोधिक प्रीति म्हणतात. जें उपरोधिक तें खोटें, तें पालटतें, व नाहींसें होतें; याचप्रमाणें उपरोधिक प्रीति खोटी ती जाते व पालटते. आपली आवडी अन्यनिमित्त दिसली तरी ती आपणाच निमित्त आहे असें समजावें. निमित्तावांचून आपली आपणास आवड सहज आहे. ती आहे किंवा नाहीं याचें स्मरणही नसतें. जी स्मरणावांचून निरिच्छ अकृत्रिम आवडी आहे, तीच खरी प्रीति. तिच्याखेरिज दुसऱ्यावर प्रीति करण्याचा भाव उत्पन्न होतो तो अकृत्रिम नव्हे तर कृत्रिम आहे. जो कृत्रीम आहे तो नाश पावणारा आहे असें समजावें.

**राग**—स्त्रीपुत्रादिकांवर जी प्रीति उत्पन्न होते तीस राग म्हणतात.

**इच्छा**—प्राप्त न होणाऱ्या किंवा प्राप्त नसलेल्या वस्तूवर जी प्रीति तिला इच्छा म्हणतात.

**श्रद्धा**—यज्ञयागादिक कर्म यांचें ठायीं जी प्रीति तिला श्रद्धा म्हणतात.

**मेधा** ( भक्ति )—गुरु किंवा देव यांचे ठायीं जी प्रीति तिला मेधा किंवा भक्ति म्हणतात.

प्रीतीस कांहीं कारणानें निरनिराळीं चार नांवें प्राप्त झालीं. जिला, कारणानें निरनिराळीं नांवें मिळतात ती प्रीति कृत्रिम आहे असें समजावें. तशी आपली आवडी नाहीं, ती भाव किंवा अभाव यांत सारखीच असते, म्हणून आत्मप्रियता अकृत्रिम आहे. जें उत्पन्न होतें तें नाश पावतें म्हणून उत्पन्न होणारी ती प्रीति नव्हे. जी उत्पन्न न होतां सहज असते तीच निर्हेतुक प्रीति. ही प्रीति आत्मरूपाहून निराळी नाहीं. आपल्यामुळेंच ही प्रीति वृत्तीपासून देहापर्यंत आहे. देहादिकांवर जी प्रीति ती व्यर्थ असें पुढें सांगूं. सध्या येथें पुत्रादिकांवर जी ममत्वरीति प्रीति तिचा निषेध केला. व अकृत्रिम जी आत्मप्रियता ती सांगितली. हिलाच आनंद म्हणतात.

आनंदलक्षणही कल्पांतीं । अविनाश पूर्ण सहज गती । तस्मात् हेंचि सद्रूप निश्चितीं । चिद्रूपही तेंचि ॥ ४६ ॥
एवं अस्ति भाति प्रियरूप आत्मा । हाचि सच्चिदानंद परमात्मा । याहून भिन्न त्या त्या रूप नामा । भ्रम हा बोलिजे॥ ४७ ॥
जैसा वृक्षीं बैसला तो आहे खरा । तोचि पहातसे पडिलिया नीरा । तोचि आवडता सहजत्वें सारा । अकृत्रिमपणें ॥४८॥
पडिला तो दिसे परी नाहीं । पाहेसा वाटे परी व्यर्थ तेंही । मजला काढा ऐशी प्रीति कांहीं । आभासा नसे ॥ ४९ ॥
वृक्षीं बैसल्याचा आहेपणा । त्यास्तव त्यासम दिसे जाणा । नेत्र उघडून जाला देखणा । परी तो वृक्षास्तव॥ ५५० ॥
तैसाचि आत्मा सहजगति सच्चिदानंद चिन्मूर्ति । त्याचें प्रतिबिंब पाडिलें वृत्तीं । तो हा जीव आभास ॥ ५१ ॥
आत्मत्वाच्या आहेपणें । जीव आहेसा केला मनें । जें आत्मयाचें चिद्रूप देखणें । तेणें होय जाणता ॥ ५२ ॥
न कळून आपुली प्रियता । मीपणें मानी आभास स्फुरतां । एवं वाउगी उमटली आत्मता । नोळखोनि आत्मा ॥ ५३ ॥
तस्मात् येथें मुमुक्षूनें । स्वानुभवें विवेचन करणें । वास्तविक आत्मा तो अंग होणें । येर त्यागावा आभास ॥ ५४ ॥
हा मी जीवासह वृत्तीसी । जाणतसें उद्भवलयासी । उद्भव आणि लय जयासी । तो मी नव्हें सहसा ॥ ५५ ॥
जैसा पडिला पाडिलियानें । मी नव्हें ऐसें जाणावें मनें । हा मी वृक्षीं बैसून पाहें नयनें । पाडिलियासी ॥ ५६ ॥
यासी प्रयत्न दुजा नसे । अज्ञानें जालें तें ज्ञानें नासे । येथें विचाराचि पाहिजे मानसें । दृष्टतादृष्टांतीं ॥ ५७ ॥
पाहणें नको गळ घालून । तेवीं न लगती नाना साधन । एक विचार पाहिजे परिपूर्ण । अंतर्वृत्तीचा ॥ ५८ ॥
एकदां विचारें कळेना । तरी विवेचन करावें पुनः पुन्हां । आणि गुरुमुखें श्रवण मनना । ज्ञान होय तों करावें ॥ ५९ ॥
सतशास्त्र आणि सद्गुरु । आणि पाहिजे सद्विचारु । हीं तिन्हीही मिळतां वारंवारु । पाहिजे विवेचन ॥ ५६० ॥
अति प्रयत्नें जें म्हणितलें । तें इतुक्याच हेतु पाहिजे कळलें । एकदां न कळतां तरी पाहिलें । पाहिजे वारंवार ॥ ६१ ॥
अधिकार नसतां बळें आणावा । अचाट बुद्धीनें विचार करावा । सद्गुरु धुंडून ठाईं पाडावा । बोधक स्वानुभवीं ॥ ६२ ॥

---

हें आनंदरूपी स्वरूपाचें तिसरें लक्षण हें कल्पांतींही नाश न पावतां पूर्णपणें आहे. म्हणून हेंच सद्रूप व सद्रूप तेंच चिद्रूप म्हणून हें चिद्रूपही आहे. याप्रमाणें अस्ति भातिप्रिय आत्मा तोच सच्चिदानंदरूप परमात्मा. याच्याहून जें भिन्नरूप नांव त्यास भ्रम म्हणतात.

जसा वृक्षावर बसलेला जो कोणी आहे तो वृक्षावरच आहे, ह्मणून पाण्यांतील भासास पहातो तोच पहाणारा अकृत्रिम आवडता. जो पडलेला प्रतिभास तो दिसतो, परंतु तो खोटा. वृक्षस्थ पहातो ह्मणून प्रतिभासही पहातोसा दिसतो. परंतु तें पहाणें खोटें. मला काढा अशी प्रीति आभासास नाहीं. वृक्षावर बसलेल्याचें अस्तित्व आहे, ह्मणून त्याच्या सारख्या आभासाच्या क्रिया दिसतात. वृक्षस्थ डोळे उघडून पहात असला ह्मणजे तो प्रतिभासही डोळे उघडून पहातोसा दिसतो.

आत्म्याचें वृत्तींत प्रतिबिंब पडलें तोच जीवाभास. हा जीवाभास, मनानें आत्म्याचे आहेपणामुळें आहे असें मानिलें. तसेंच त्याच्या चिद्रूप लक्षणामुळें जीव जाणता आहे असें मानिलें. तसेंच आत्मप्रियता समजून आभास स्फुरण पावणें तोच मी. याप्रमाणें त्या आभासाचे ठायीं प्रियता मानिली. याप्रमाणें आत्म्यास न ओळखून जीवाचे ठायीं आत्मता उत्पन्न झाली. ह्मणून मुमुक्षूनें याविषयीं स्वानुभवानें विवेचन करून वास्तविक जो आत्मा तो आपण व्हावें, आत्म्याखेरीज जो जीवाभास त्याचा त्याग करावा.

हा मी जीव आणि वृत्ति यांच्या उद्भवलयास जाणतों, ह्मणून उद्भवलय ज्याला तो मी नव्हे. जसें वृक्षस्थानें पाण्यांत पडलेलें प्रतिबिंब तें मी नव्हे असें मनानें जाणावें. कारण हा मी वृक्षस्थ वृक्षीं असून डोळ्यांनीं पडलेल्यास पहातो. जो पडलेला तो पाहील कसा? ज्यापेक्षां मी पहातों त्यापेक्षां पडलेला तो मी नव्हे, असा येथें विचारच झाला पाहिजे. अज्ञानानें झालें त्यास घालविण्यास ज्ञानच पाहिजे. तसें येथें अंतरवृत्तीच्या विचारावांचून दुसरा प्रयत्नच उपयोगी नाहीं. वृक्षस्थ जो पाण्यांत पडलेला दिसतो त्यास शोधण्यास जसें गळ घालून पहाणें व्यर्थ, तसें जीवाचे शोधाविषयीं ज्ञानावांचून अनेक प्रकारचीं साधनें व्यर्थ आहेत.

एकदां विचारानें कळलें नाहीं तर, पुन्हा पुन्हा विवेचन करावें. तसेंच ज्ञान होईपर्यंत गुरुमुखानें श्रवण मनन करावें. सत्शास्त्र आणि सद्गुरु व सद्विचार हीं तिन्हीं मिळालीं असतां वारंवार विवेचन केलें पाहिजे. याविषयीं अधिकार नसला तर मुद्दाम आणावा. अचाट बुद्धीनें विचार करावा. स्वानुभवीबोधक असा सद्गुरु शोधावा.

पूर्ण अधिकार मुमुक्षूसी । सद्‌गुरु मिळे पूर्ण बोधासी । तरीही सत्‌शास्त्रेंवीण अन्यासी । भेद्‌शास्त्रा काज नसे ॥ ६३ ॥
जें कां अभेद प्रतिपादक । जेथें आत्मा परमात्मा एक । तेंचि सत्‌शास्त्र निश्चयात्मक । श्रवण करावें ॥ ६४ ॥
एवं सद्‌गुरुमुखें सत्‌शास्त्रश्रवण । स्वतां विचारें विवेचन । वारंवार करणें या नांव प्रयत्न । अतिशयें करावें ॥ ६५ ॥
असो तें विवेचन केवीं करावें । तरी रविदृत्ता सावध असावें । मुख्य आणि आभास निवडावे । सप्रतीतीनें ॥ ६६ ॥
आभास हा मिथ्या दिसे । बोधात्मा न दिसे परी असे । हा दृष्टांतद्वारा केला असे । कळे ऐसा संवाद ॥ ६७ ॥
येणें उपदेशें मुख्य अधिकारी । खुणेसि पावे तीव्रप्रज्ञ जरी । तथापि मंद जो मध्यम प्रकारी । तया प्रतीति न बाणे
तरी तयासी निरूपण । वारंवार पाहिजे श्रवण । सेवींच अंतरीं विवेचन । सर्वदां व्हावें ॥ ६९ ॥
विवेचन म्हणजे मुख्य आभास । निवडावें भिन्न उभयांस । मुख्य आत्मा आपण निश्चयास । सदृढ यावा ॥ ५७० ॥
आभास तो मिथ्यात्वें त्यागावा । त्याचा मीपणा किंचित् न घ्यावा । तरी तोचि संवाद ऐकावा । एकाग्र होउनी ॥७१॥
हा आभास कोठून कोठवरी । असे तो बोलिजे निर्धारीं । हें ऐकून तयाचा करी । त्याग मिथ्यात्वें ॥ ७२ ॥

## यो जागृत्स्वप्नयोरेव बोधाभास विडंबना ॥

स्थूलासहित ते जागृति । सूक्ष्मासह स्वप्नभ्रांति । यां दोहीं अवस्थेप्रति । आभास विडंबन ॥ ७३ ॥
आभास म्हणजे मिथ्या भासे । जळीं प्रतिबिंब व्यर्थ जेसें । तयामाजीं नांव आलें असे । जडासी जीववी ॥ ७४ ॥
स्थूलदेह हा जडात्मक । हस्तपादादि आनख मस्तक । जो मागां बोलिला पांचभौतिक पंचीकृत अन्नमय ॥ ७५ ॥
अपंचीकृत जीं तत्त्वें सत्रा । तोचि लिंगदेह स्थूलामाझारा । राहून करितसे देहव्यापारा । एकमेकां साह्यपणें ॥ ७६ ॥
स्थूलाविण लिंगदेहासी । घेतां नये भोग्यजातासी । सूक्ष्माविणही स्थूल जडासी । व्यापार कैचा ॥ ७७ ॥
म्हणून स्थूलदेहीं राहून । लिंगदेह करी विषयग्रहण । तया व्यापारा नामें दोन । स्वप्न आणि जागृति ॥ ७८ ॥
अंतःकरणवृत्ति ज्ञानेंद्रिय द्वारा । पंच विषयांचे येत सामोरा । भोक्ता जीव हा होय त्वरा । या नांव जागृति ॥ ७९ ॥

---

जर पूर्ण अधिकारी मुमुक्षू असला तर त्यास पूर्ण बोधाचा सद्गुरु मिळतो, पूर्ण बोधाचा सद्गुरु आणि पूर्ण अधिकारी मुमुक्षु असला तर त्यांनीं आत्मा परमात्मा एक असें जें अभेद प्रतिपादक सत्‌शास्त्र तेंच निश्चयानें श्रवण करावें. सद्‌गुरुमुखानें सशास्त्र श्रवण करणें आणि स्वतः विचारानें विवेचन करणें यालाच प्रयत्न म्हणतात.

**आभास कोण व आत्मा कोण याविषयीं विवेचन**

आपल्या अनुभवानें मुख्य कोण, व आभास कोण याचा निवाडा करावा. आभास हा दिसतो परंतु तो मिथ्या. बोधात्मा दिसत नाहीं परंतु तो आहे. अशा उपदेशानें तीव्र बुद्धीचा शिष्य आत्म्यास पावतो. पण जो मंदमति आहे त्यास अनुभव येत नाहीं, म्हणून त्यास श्रवण व विवेचन वारंवार पाहिजे. मुख्य तो आत्मा आपण आहे, असा दृढनिश्चय व्हावा, आणि जो जीव तो आभास मिथ्या त्याचा त्याग करावा. कधींही त्याविषयीं मीपणा घेऊं नये. म्हणूनच तो जीवाभास कोठपासून कोठपर्यंत आहे तें सांगतो.

**अर्थ**–स्थूलासह जागृति, सूक्ष्म देहासह स्वप्नभ्रांति या दोन अवस्थांस आभासविडंबन म्हणतात.

**आभास**–म्हणजे खोटा भास. जसें पाण्यांत प्रतिबिंब, तो आभास.

**जीव**–आभास, जडास जिववितो म्हणून त्यास जीव म्हणतात.

**स्थूळदेह**–जडात्मक पंचभौतिक पंचीकृत, अन्नमय हस्तपादनखमस्तकपर्यंत जो कोश तोच स्थूळ देह.

**लिंगदेह**–अपंचीकृत जीं सत्रा तत्वें तोच सूक्ष्म देह किंवा लिंग देह.

स्थूलावांचून लिंगदेहास भोग्यजात घेतां येत नाहीं, व सूक्ष्मावांचून स्थूल देह जड त्यास व्यापार करितां येत नाहीं, म्हणून लिंगदेह स्थूळ देहांत राहून विषय ग्रहण करितो, त्या व्यापारास दोन नांवें आहेत एक स्वप्न आणि दुसरी जागृति.

**जागृति**—अंतःकरण वृत्ती ज्ञानेंद्रियांचे द्वारानें पंच विषयांचे समोर येते तेव्हां जीव भोक्ता होतो, याला जागृति म्हणतात.

हे पांच तत्त्वांचे व्यापार पांच । कर्मेंद्रियांचीही क्रिया तैशीच । हें मागें सांगितलें आद्याच । स्पष्ट करोनी ॥ ५८० ॥
इंद्रियविषय प्रत्यक्ष नसतां । त्यांचा ध्यास घेऊन आतौता । बुद्धीच कल्पी जीव तया भोक्ता । ते अवस्था स्वप्न ॥८१
ऐसे हे स्वप्न जागृती दोन । व्यापार होती सर्व जीवांलागून । मिथ्यात्वें प्रतिभास असोन । भ्रांतीनें सत्य मानिले८२
अस्ति भाति प्रियरूप आपुलें।जें कां मुख्यात्म्याचें लक्षण बोलिलें । तेंचि या आभासासी मानिलें।बिंबाचें प्रतिबिंब जेवीं८३
या आभासाचें लक्षण। असज्जड दुःख संपूर्ण । हें टाकून आरोपी अज्ञान । अस्ति भाति प्रिय हेंचि॥ ८४ ॥
प्रतिबिंबित देहद्वयांत । तो जीवही नेणोनि भ्रांत । उगाची सर्वही संघात । मी म्हणोन बैसला ॥ ८५ ॥
आणि तया सर्व संघाता । अस्ति भाति आरोपी प्रियता । हेंचि जाण विडंबन तत्त्वतां । असे तें त्यागिलें ॥ ८६ ॥
हस्त आहे पाद आहे । उदर कंठ मस्तक आहे । नख केश सर्व आहे । हेंचि विडंबन ॥ ८७ ॥
श्रोत्र आहे त्वचा आहे । चक्षू जिव्हा घ्राण आहे । वाचा पाणी पाद आहे । हेंचि विडंबन ॥ ८८ ॥
उपस्थ गुदही मीच आहें । प्राण अपान व्यान आहें । उदान आहें समान आहें । हेंचि विडंबन ॥ ८९ ॥
उपप्राणादि वायु आहें । अहंकार चित्त मीच आहें । बुद्धि मन अंतःकरण आहें । हेंचि विडंबन ॥ ५९० ॥
गुण असती वृत्ति आहे । जीव असे सर्वही आहे । एवं अस्तित्वरूप सर्वा पाहे । हेंचि विडंबन ॥ ९१ ॥
नेसोंचि हस्तासी अंधारीं कळे । पाद नखासी लागतां कळे । उदर कंठा बोटासी कळे । हेंचि विडंबन ९२ ॥
नख शिख अवघियांस कळे । दृष्टीसी पार्श्वभागासी कळे । मागें पुढें अधोर्ध्व कळे । हेंचि विडंबन ॥ ९३ ॥
श्रोत्रासी शब्द कळतसे । त्वचा हे स्पर्शा जाणतसे । डोळा रूपा ओळखीतसे । हेंचि विडंबन ॥ ९४ ॥
जिव्हा हे रसातें जाणे । सुगंध जाणून घेतसे घ्राणें । वाचा बोलोनियां जाणें । हेंचि विडंबन ॥ ९५ ॥
पाणी जाणे घेणें देणिया । उपस्थ जाणे मैथुनक्रिया । गुद जाणे विसर्गा यया । हेंचि विडंबन॥ ९६ ॥
प्राण जाणे व्यान जाणें । उदान समान अपान जाणे । उपप्राणांसही होय जाणणें । हेंचि विडंबन ॥ ९७ ॥
अहंकार सर्वा जाणतसे । चित्त चिंतना ओळखीतसे । मन बुद्धि जाणे अपैसें । हेंचि विडंबन॥ ९८ ॥
वृत्ति जाणे गुण जाणती । जीव तो जाणे सहजगती । एवं हे अवघेचि जाणती ॥ हेंचि विडंबन ॥ ९९ ॥
ऐसें जडरूप सर्व असतां । ज्ञानरूपाचि मानिलें तत्त्वतां । कोणीच नाहीं जाणिल्या परता । हेंचि विडंबन ॥ ६०० ॥
येणेंचि रीतीं मी किती चांगुला । नखशिख आवडता जाला । हस्त पादादि शोभला । हेंचि विडंबन ॥ १ ॥
श्रोत्रांचें ऐकणें चांगुलें । आवडे त्वचेनें स्पर्शलें । आकर्ण नेत्रें शुद्ध देखिलें । हेंचि विडंबन ॥ २ ॥

---

**स्वप्नावस्था**—इंद्रिय, विषय प्रत्यक्ष नसतां त्यांचा आंत ध्यास घेऊन बुद्धीच जीवासह सर्वांची कल्पना करिते, तेव्हां तेथील जीव भोक्ता होतो त्याला स्वप्नावस्था म्हणतात.

जागृति आणि स्वप्नावस्था हे दोन व्यापार सर्व जीवांस होतात. प्रतिभास खोटा असून तो सत्य असें भ्रांतीनें म्हणतात. बिंबाचें लक्षण प्रतिबिंबास जसें लावणें तसें मुख्य आत्म्याची अस्ति भाति प्रिय हीं लक्षणें आभासास लावितात आणि वास्तविक जीं आभासाचीं असज्जड दुःखात्मक लक्षणें तीं आत्म्यावर लावितात. दोन देहांत प्रतिबिंबित जो जीव तो काय लक्षणाचा आहे हें न जाणून मूर्ख उगाच सर्व संघांस मी मानून बसला, आणि त्या सर्व संघातावर अस्तिभातिप्रियता आरोपितो, हेंच विडंबन कारण आहे.

**विडंबन**-मूळ वस्तूस भलतेंच मानणें त्यांस विडंबन म्हणतात.

१. हात, पाय, पोट, कंठ, मस्तक, नख, केश, दशइंद्रियें पंचप्राण व पंच उपप्राण, अंतःकरणपंचक, तीन गुण, वृत्ति, जीव हीं सर्व आहेत असें पहातो हेंच विडंबन.

२. वर सांगितलेला समुदाय जड असतां पृथक् पृथक् आपापला जाणण्याचा किंवा पहाण्याचा व्यापार करितो, म्हणून सर्व समुदाय ज्ञानरूपच आहे. त्यांत कोणीही जाणिल्यावांचून रहात नाहीं. असें सर्वांस चिद्रूपत्वानें ( भातित्वानें ) पहातो हेंच विडंबन.

३. वर सांगितलेला सर्व संघ व त्याची क्रिया यांचे ठायीं चांगुलपणा पहाणें हेंच प्रियत्वें विडंबन.

माझे कान फार चांगलें ऐकतात. त्वचा स्पर्श उत्तमप्रकारें जाणते. डोळे सुरेख पहातात.

रसनेची गोडी अति सुरस । अति चांगुला घेणें सुवास । माझें बोलणें किती नवरस । हेंचि विडंबन ॥ ३ ॥
ग्रहण दाना हस्त चांगुले । गमन गती सरळ पाद भलें । उपस्थ गुद किती शोभलें । हेंचि विडंबन ॥ ४ ॥
पंचप्राण चांगुले असती । अहंकार तो उत्तम अति । सावधानता चांगुली चित्तीं । हेंचि विडंबन ॥ ५ ॥
बुद्धि निश्चया अति उत्तम । मनही चांगुलें असे परम । अंतःकरण गुणही होती सम । हेंचि विडंबन ॥ ६ ॥
माझें करणें वर्तणें आचरणें । पाप कीं पुण्य न म्हणे । चांगुलें म्हणून भावी मनें । हेंचि विडंबन ॥ ७ ॥
ऐसे जागृतीचे व्यापार । वाईट कीं असोत सुंदर । परी चांगुलेचि सविस्तर । हेंचि विडंबन ॥ ८ ॥
एवं अस्ति भाति प्रिय या रीतीं । जागृतींत आरोपी भासाप्रती । तैसेंचि स्वप्नीं भावी ध्यासावरुती । हेंचि विडंबन ॥९॥
भासदेह जो मनें कल्पिला । तो आहे जाणे चांगुला । येरा भासा हर्षे कीं म्याला । हेंचि विडंबन ॥ ६१० ॥
या रीतीं स्वप्न आणि जागृती । माजीं अस्ति भाति जे प्रीति । आपुलीं लक्षणें आभासावरुतीं । स्थापी बळें ॥ ११
जैसा वृक्षीं बैसलियाचा । पाहणें प्रीति आहेपणा साचा । तो पडिलियावरी आरोप त्याचा । स्थापी बळें ॥ १२ ॥
हस्तपादादि मस्तक आहे । पाडिला कैसा टकमकां पाहे । आवडी त्याची धरोनि राहे । तेव्हां काढा म्हणे ॥ १३ ॥
तैसाचि हाही वृत्तीपासोन । देहांत मीच ऐसा मानून । सोडवा म्हणे बंधांतून । हें विडंबन नव्हे ॥ १४ ॥
अगा हे रविदत्ता तुजसी । निरोपिलें कळलें कीं मानसीं । एक तें सांगितलें अविनाशी । एक हें मिथ्या ॥ १५ ॥
अस्ति भाति प्रियरूपता।जे मागील श्लोकीं बोलिली तत्त्वतां।तिहीं काळीं ज्या लक्षणा समता। तो सत्य आत्मा ब्रह्म १६
आतां या श्लोकीं आभास जीव।ज्याचा असज्जड दुःखात्मक स्वभाव।परी आरोपिलें अस्ति भाति प्रियत्व।हा मिथ्या प्रतिबिंब
ऐसे सत्य मिथ्या हे दोन । पदार्थ असती वेदांत प्रमाण । तिसरा नाहीं जरी नाना संपूर्ण । तरी अंतर्भूत दोहींत ॥ १८ ॥
आत्मा ब्रह्म सच्चिदानंद । द्रष्टा साक्षी अद्वय अभेद । ऐसे नामाचे अनेकधा भेद । परी आब्रह्म एक ॥ १९ ॥
माया गुण वृत्ति अंतःकरण । मनादि प्राण बहिःकरण । देहादि जीव आदिकरून । मिथ्या पदार्थ एक ॥ ६२० ॥
तस्मात् दोन पदार्थचि असती।सत्य मिथ्या मुख्य आभास भ्रांति।यास्तव मुमुक्षूनें विचारें निश्चितीं।सत्य मिथ्या निवडावें २
निवडणें म्हणजे विवेचन । सत्य तें सत्यत्वें घ्यावें आपण । मिथ्या तें मिथ्यात्वें त्यागून । सुखी व्हावें ॥ २२ ॥
देह नासे इंद्रियें नासती । प्राण वाहती ते नासून जाती । मनादि तीं क्षणक्षणां पावती । स्वतांचि नाश ॥ २३ ॥

---

जिव्हा फार चांगली गोडी घेते. नाक फार चांगला वास घेतें वांचा सरळ बोलते. हात देणें-घेणें सुरेख करितात. पाय सरळ चालतात. उपस्थगुद फार सुरेख दिसतें. पंचप्राण फार चांगले आहेत. अहंकार उत्तम आहे. चित्त फार सावध रहातें. बुद्धि चांगला निश्चय करिते. मन चांगलें आहे. गुण चांगले व सम आहेत. माझें करणें, वर्तणें, आचरणें हें चांगलें आहे. याप्रमाणें जागृतीचे सर्व, वाईट किंवा सुंदर व्यापार चांगले आहेत, असें मानितो हेंच विडंबन.

जागृतींत भासावर अस्तिभातिप्रियता आरोपितो. तसेंच स्वप्नांत ध्यासावर आरोपितो तें असें, स्वप्नांत मनानें भासदेह कल्पितो. नंतर तो आहे असें मानितो. तो हर्षखेदादि जाणतो असें मानितो, व त्या देहाचे अवयवादि सर्व चांगले आहेत असें मानितो हेंच विडंबन.

जसा वृक्षस्थ, पडलेल्याची आवडी धरून मला काढा म्हणतो. तसा जीव, वृत्तीपासून देहापर्यंत सर्व मीच असें मानून मला बंधांतून सोडवा असें म्हणतो. हें विडंबन नव्हे काय ?

## सत्यमिथ्या पदार्थांचें विवेचन.

अस्तिभातिप्रियरूपता ज्याची तिन्ही काळीं समान, तो ब्रह्मात्मा सत्य होय. ज्याचा असज्जड दुखात्मक स्वभाव असतां ज्यानें आपणावर अस्तिभातिप्रियरूपता आरोपिली असा जो आभास जीव, तोच मिथ्या. याप्रमाणें वेदांतांत सत्य मिथ्या असे दोन पदार्थ प्रमाण आहेत तिसरा नाहीं. असें असतां कोणी तिसरा पदार्थ आहे असें मानील, तरी त्याचा दोहोंत अंतरभाव होतो. जसें—आत्मा, ब्रह्म, सच्चिदानंद, द्रष्टा, साक्षि, अद्वय, अभेद असे नांवाचे अनेक प्रकारचे भेद आहेत, परंतु आत्मा एक. याचप्रमाणें माया, गुण, वृत्ति, अंतःकरण, मनादि प्राण, बहिःकरण, देहादि जीव आदिकरून मिथ्या पदार्थ एक.

**विवेचन**—सत्यमिथ्या निवडणें.

देह नाश पावतो इंद्रियें नाश पावतात. प्राण नाश पावून जातात. मन स्वतःच क्षणक्षणा नाश पावून जातें.

वृत्तीसहित जीव हारपे । जेवीं सतोय प्रतिबिंब लोपे । तस्मात् हा केवीं होईल सद्रुपे । उद्भव लय जया ॥ २४ ॥
ऐसा विचारून यया मिथ्याचा । आहेपणा जो असे सत्याचा । काढून निर्धार करावा साचा । अहमात्मा आभास त्यागें
जेवीं वृक्षस्थावांचून । पडिलिया कैंचें आहेपण । तैसा आत्मा जो सच्चिद्घन । तयाचें अस्तित्व यया ॥ २६ ॥
आतां कळणें जें या सर्वांसी । देहादिकां वाटे आभासासी । परी जयाचिये प्रकाशीं । प्रकाशमान हें ॥ २७ ॥
शब्दस्पर्शादि देहचि जाणत । तरी निद्रिस्थाचा देह पडे प्रेत । मागें पुढें असतां नेणत । स्त्री कीं सर्प ॥ २८ ॥
श्रोत्र असतां नायकती । स्पर्श न कळे त्वचेप्रति । नेत्र उघडे तरी न देखती । तम कीं प्रकाश ॥ २९ ॥
जिव्हेवरी साकर असतां । गोडी न कळे कीं तत्त्वतां । कस्तुरी नासिकीं बांधितां । सुगंध नेघे ॥ ३० ॥
वाचादि कर्मेंद्रियें सर्व । व्यापार न करिती स्वयमेव । वाणी बरळे जरी जाणीव । नसे त्या शब्दाची ॥ ३१ ॥
प्राण जरी देहीं वावरती । परी वस्त्रें हरितां ते नेणती । तस्मात् जडत्व प्राणाप्रती । स्वतःसिद्ध असे ॥ ३२ ॥
मन बुद्धि चित्त अहंकार । जरी हीं जाणती तत्त्वें चत्वार । तरी करून पाहतां विचार । परप्रकाशक ॥ ३३ ॥
जैसें उपनेत्रें स्पष्ट दिसे । परी आंधळिया काय असे । तैसें आत्मत्वाचीये प्रकाशें । विण वृत्ति व्यर्थ ॥ ३४ ॥
एकीकडे वृत्ति लागतां । दुसरिया पदार्था समस्तां । न जाणती सन्निध असतां । म्हणोनि परप्रकाश ॥ ३५ ॥
अथवा वृत्ति विषयीं धांवे । तेधवांचि साक्षित्वा पहावें । साक्षीपरततां स्वभावें । मग वृत्ति विषय नेघे ॥ ३६ ॥
आदळून जडत्वें पडे । परी आमुक हें न निवडे । ऐसें विचारितां हे जडे । प्रत्यया येती ॥ ३७ ॥
या एका वृत्तीचे प्रकार । कार्यपरत्वें चत्वार । मन बुद्धि चित्त अहंकार । भिन्न भिन्न दिसती ॥ ३८ ॥
संकल्प विकल्प नव्हे आहे । संशयात्मकें निश्चय न लाहे । तेंचि मन ओळखून पाहे । परप्रकाश ॥ ३९ ॥
निश्चय करी जो एक । होय कीं नव्हे हे अमुक । हेंचि बुद्धीचें रूपक । परप्रकाश ॥ ६४० ॥
दृष्ट श्रुत पदार्थांचा । छंद घेतसे चिंतनाचा । तेंचि चित्त नामें साचा । परप्रकाश ॥ ४१ ॥
अमुक करीन कीं न करीं । हाचि अहंकार निर्धारी । हेंही जाणतें तत्त्व परी । परप्रकाश ॥ ४२ ॥

---

जसें-पाण्यासहवर्तमान प्रतिबिंब नाहीसें होतें, तसा वृत्तीसह जीव नाहीसा होतो. याकरितां ज्याला उद्भव लय आहे तो सद्रूप कसा होईल ? तो सद्रूप होत नाहीं म्हणून मिथ्यावर जो सत्याचा आहेपणा आहे तो काढून, वर सांगितल्याप्रमाणें मिथ्याचा विचार करून, तो मिथ्या आभास टाकावा, आणि अहमात्मा याचा निर्धार करावा.

वृक्षस्थावांचून पाण्यांत पडलेला प्रतिभास दिसला त्यास आहेपणा जसा नाहीं, तसें जीवास आत्म्यावांचून अस्तित्व नाहीं. मागें जो देहादि संघ जाणतो असें जीवास वाटतें म्हणून सांगितलें; परंतु तें त्या संघाचें जाणणें ज्याच्या प्रकाशानें होतें, तो आत्मा त्यांहून वेगळा आहे. देह जाणता असता तर झोंप लागल्यावर जवळ स्त्री आहे कीं सर्प आहे हें जाणता. पण त्यास तें कळत नाहीं म्हणून देह जाणता नाहीं. पंच ज्ञानेंद्रियें असून तीं झोंपेंत आपापले व्यापार करीत नाहींत. तसेंच पंच कर्मेंद्रियें आपापले व्यापार करीत नाहींत म्हणून तीं जाणती नव्हत. कर्मेंद्रियांपैकीं वाचेनें कधीं कधीं झोंपेंत बरळतो, परंतु त्याचा अर्थ कांहीं नसतो. व ते जाणतेपणाचेही शब्द नसतात. म्हणून वाचा ही जाणती नव्हे. प्राण झोंपेंत जडत्वानें वहात असतात. परंतु त्यांस नेसूंचें वस्त्र सोडून नेलेलें कळत नाहीं, म्हणून तेही जाणते नव्हत. अंतःकरणपंचक हेंही परप्रकाशक आहे. तें स्वतः जाणूं शकत नाहीं. जसें-आरशानें स्पष्ट दिसतें परंतु आंधळ्यांस तिचा काय उपयोग आहे ? तशी आत्म्याचे प्रकाशावांचून वृत्ती व्यर्थ आहे. वृत्ती एकीकडे लागली असतां तिचे जवळ जरी पुष्कळ पदार्थ असले तरी त्यांस ती घेत नाहीं, म्हणजे जाणूं शकत नाहीं, म्हणून ती परप्रकाशक. तसेंच वृत्ती विषयांकडे गेली म्हणजे ती गेली असें जो जाणणारा साक्षि त्या साक्षीकडे पाहूं लागलें म्हणजे वृत्ती विषय घेत नाहींशी होते. आणि आदळून जडत्वानें पडते. परंतु हें अमुक असा तिला निवाडा करितां येत नाहीं म्हणून ती जड,

एक वृत्ति परप्रकाशक । कळतां जरी निश्चयात्मक । तरी चारीही भासला एक । कळे निर्धारें ॥ ४३ ॥
गुण तरी अंतःकरणाचे । कामादि धर्म तयाचे । यासीं जडत्व बोलणें साचें । नलगे वेगळें ॥ ४४ ॥
आतां वृत्तीमाजी जो पडे । प्रतिबिंबत्वें जीव आतुडे । परी यासही ज्ञान जोडे । आत्मप्रभेवीण ॥ ४५ ॥
जेवीं आदित्य गगनीं नसलिया । प्रतिबिंबाचि न पडे आरासिया । मा झळझळ पडे कोठोनियां । भिंती वरुती ॥४६..
तैसें मन जाऊन पदार्थीं आदळे । तया स्फुरवी किंचित् उजाळें । परी आदि अंतीं प्रकाशामुळें । मध्यें उठोनि निमे
हें बोलणें पुढें असे । सामान्य विशेष निवडे ऐसें । प्रस्तुत येथें समजावें मानसें । कीं परप्रकाश जीव ॥ ४८ ॥
तस्मात् देहापासून जीव । पर्यंत हें जडचि सर्व । जाणती वाटती ते अपूर्व । व्यर्थ विडंबन ॥ ४९ ॥
जेवीं वृक्षस्थाचा हात पाय हाले । डोळे फिरती मान डोले । तोचि पडिलियावरी उमटले । कीं प्रत्यक्ष हालती ॥ ६५०
तेवीं सामान्य साक्षी बोधात्मा । स्वप्रकाशक चिदात्मा । त्याचा आभास हा जीवात्मा । तद्भासें तद्वत् ॥ ५१ ॥
एवं या रीतीं हा जीव खरा । चिद्रुप नव्हे हा भास सारा । तसोंचि प्रियत्वही विचारा । यया नसे ॥ ५२ ॥
पूर्वीं प्रियत्व सर्वांचें । निषेधिलें स्त्रीपुत्रादिकांचें । कीं आत्मार्थ प्रिय असती साचे । तेव्हां प्रियतर स्वयें ॥ ५३ ॥
येथें कोणी मंदमती । मानील कीं आपुली देहाकृति । सर्व आभासाही शास्त्रें म्हणती । आत्मा म्हणोनि ॥ ५४ ॥
तस्मात् अनात्मिया आत्मा म्हणणें । हीं चार्वाकाचीं लक्षणें । देहात्म वादादि निरसणें । युक्ति स्वानुभवें ॥ ५५ ॥
देह जरी हा सर्व आवडे । तरी यांतही तारतम्य निवडे । नखें केश वाढतां कोंडें । छेदिती स्वयें ॥ ५६ ॥
अंगुलीस्तव सडे जरी हात । तरी अंगुली छेदिती त्वरित । तस्मात् अंगुलीवरील प्रीत । व्यर्थ म्हणावी ॥ ५७ ॥
हस्त तोडितां नेत्र येती । ऐसें कोणी वैद्य सांगती । तरी तत्क्षणीं हस्त तोडिती । तेव्हां डोळा आवडे ॥ ५८ ॥

---

एका वृत्तीचे कार्यपरत्वें चार प्रकार झाले आहेतः १ मन २ बुद्धि ३ चित्त ४ अहंकार.

**मन**—संकल्प विकल्प, होय नाहीं असा संशय करणारें तें मन.

**बुद्धि**—हें अमुक होय किंवा नाहीं असा निश्चय करणारी ती बुद्धि.

**चित्त**—दृष्ट श्रुत पदार्थाचा छंद घेऊन चिंतन करणारें तें चित्त.

**अहंकार**—करण्या न करण्याचा अभिमान घेणारा तो अहंकार.

वृत्ती परप्रकाश असें पूर्वीं वर्णन केलें आहेच. त्यावरून त्या वृत्तीचे जे चार प्रकार तेही सहजच परप्रकाशक होत. अंतःकरण परप्रकाशक आहे म्हणून त्याचे तीन गुण, ज्यांचे कामादिक धर्म आहेत, तेही परप्रकाशक जड. जसा सूर्य आकाशांत नसला म्हणजे आरशांत प्रतिबिंब पडत नाहीं; मग त्या प्रतिबिंबाची झळझळ भिंतीवर कशी पडेल. तसा आत्मा नसतां वृत्तींत जीव कसा भासेल ? तो जीव वृत्तींत भासला नाहीं म्हणजे मग तो विषय कसा जाणील ? याप्रमाणें जीव जाणण्याविषयीं समर्थ नाहीं म्हणून तो परप्रकाशक. याप्रमाणें न जाणणारा देहापासून जीवापर्यंत सर्वसंघ आहे हा जाणतोसें वाटतें हेंच विडंबन आहे.

ज्याप्रमाणें वृक्षस्थाचा हातपाय हालूं लागला, डोळे फिरूं लागले, मान डोलूं लागली, तर पाण्यांत पडलेल्या प्रतिभासाचेही हातपाय हालूं लागतात, डोळे फिरूं लागतात, मान डोलूं लागते. याप्रमाणें सर्वच त्याच्या क्रिया वृक्षस्थाप्रमाणें होतात. त्याप्रमाणें आत्म्याचे प्रकाशानें जीव प्रकाशित होऊन मग तो मन बुद्धि इत्यादिकांस प्रकाशितो म्हणून तो संघ व जीव चिद्रूप नव्हे व प्रियही नव्हे. पूर्वीं स्त्रीपुत्रादि सर्वांचे प्रियत्व आपल्यामुळें आहे म्हणून सर्व अप्रिय व आपण प्रिय असें ठरविलें, आतां जीवही अप्रिय ठरेल.

**शंका**—कोणी मंदमति म्हणेल कीं, आपल्या देहाकृतीस आत्मा म्हणावें. कारण शास्त्रें आभासास आत्मा म्हणतात. तेव्हां देहास आत्मा म्हणण्यास हरकत नाहीं.

**उत्तर**—अनात्म्यास आत्मा म्हणावें, हें देहात्मवादी जे चार्वाक त्यांचें मत आहे. परंतु हें मत युक्तीनें व अनुभवानें खोटें आहे असें ठववावें. तें असें-देह जर आत्मा आहे तर तो प्रिय वाटला पाहिजे. तसेंच त्या देहाचे भाग जे नखें व केश तेही प्रिय वाटले पाहिजेत. आतां ते प्रिय आहेत असें म्हणावें, तर त्यांस कोणीही तोडून टाकतेना, ज्यापेक्षां ते तोडितात त्यापेक्षां ते प्रिय नव्हत ! अंगुलीमुळें जर हात सडत आहे तर ती अंगुली लागलीच तोडितात. म्हणून बोटावरची प्रीति खोटी **समजावी.** डोळ्यांनीं दिसेनासें झालें तेव्हां वैद्यानें सांगितलें **कीं,** हात तोडशील तर डोळे येतील, तेव्हां हात तोडितो.

काहीं अपराधें चक्रवर्ती । शिरच्छेदाची आज्ञा करीती । तेव्हां कोणी वांचवी तयाप्रति । नेत्र कर्ण काढोनी ॥ ५९॥
नेत्र कर्ण जरी गेले । परी प्राण वांचतां भलें जालें । सुखी होय म्हणे निरसलें । अरिष्ट मोठें ॥ ६६० ॥
ऐखादे अपकीर्तीस्तव । विष भक्षून देती जीव । कीं मरणाहून अधिक स्वभाव । अपकीर्तीचा ॥ ६१ ॥
अपकीर्ति कल्पना मनाची । म्हणजे अंतःकरणचतुष्टयाची । तस्मात् अधिक प्रियता साची । मनाची प्राणाहून ॥ ६२॥
झोंप किंवा समाधि घेतां । तेथें मन वाउगें चिंतितां । विक्षेप वाटे आपणा तत्त्वतां । म्हणे मज हें सुख नेदी ॥ ६३॥
तस्मात् अंतःकरणाची प्रीति । आपुल्या प्रियत्वापुढें विटती । येथें खरी आवडी निश्चितीं । कोणाची तें पाहा ॥६४
वृत्तीचीच अनावडी होतां । मा प्रतिबिंब पडे जें ती आतौता । तयाची प्रीति असे केउता । जे नासे वृत्तीसवें ६५
सर्व स्फूर्तीपासून तृणांत । जितुकें उत्पन्न ईशानिर्मित । यावरी जीवाचें असे कल्पित । त्रिप्रकारोंचि ॥ ६६ ॥
उपेक्ष्य द्वेष्य आणि प्रिय । जीव कल्पित प्रकार त्रय । एक मणीच त्रिधा होय । हेतु तिघांचे ॥ ६७ ॥
लाभे तया हर्ष उपजे । तयासी प्रिय होय सहजें । अलाभें कोपती दुजे । तयां होय द्वेष्य ॥ ६८ ॥
तिसरा उदास जरी देखतां । सहजत्वें होय उपेक्षिता । एवं तीन प्रकार मण्यावरुता ॥ तिघीं केला ॥ ६९ ॥
तस्मात् एक वस्तु त्रिप्रकारें ॥ कल्पित असे व्यभिचारें । यांत कोणतें एक मानावें खरें । प्रिय कीं द्वेष्य उपेक्ष्य ॥६७०॥
प्रिय द्वेष्य नसावें उपेक्ष्यासी । प्रिय उपेक्ष्य नुठावें द्वेष्यासी । उपेक्ष्य द्वेष्य न व्हावें प्रियासी । होतां व्यभिचार ७१
जेथें हा व्यभिचार होय । तेथें एकही त्या मानूं नये । ऐसा हा व्यभिचाररूप न्याय । असे युक्तीचा ॥ ७२ ॥
येथें म्हणसी मण्यावरी । तिघांची कल्पना ते नव्हे खरी । तरी बोलिजेत असे निर्धारी । एका होती त्रिविध ॥ ७३ ॥
व्याघ्रादि द्वेष्य असतां । उपेक्ष्य होती दुरोन जातां । तेचि कुर्वाळिती पाळितां । तस्मात् द्वेष्य ते न होती ॥ ७४ ॥
तृण पाषाण उपेक्ष्य सहज । परी प्रिय होय पडतां काज । रुपतां लागतां द्वेष्यरूप सहज । तेव्हां ते उपेक्ष्य न होती
पुत्रादि सहज प्रिय असती । परी अनकूल नसतां द्वेष्य होती । न मानितां तयां उपेक्षिती । तस्मात् पुत्र प्रिय नव्हे ७६
हाचि न्याय स्थूलापासून । वृत्तीपावेतों संपूर्ण । व्यभिचार होतां निश्चयें कडून । प्रियता त्या नसे ॥ ७७ ॥

---

याप्रमाणें डोळे कान इत्यादि अवयव तसेंच प्राण नाहींसे करितात. तेव्हां त्यावरची प्रीति खोटी समजावी. काहीं एक अपकीर्तिमुळें विष भक्षून जीव देतात. तेव्हां जिवावरची प्रीति खोटी समजावी. अपकीर्ति ही मनाची कल्पना म्हणजे अंतःकरण चतुष्टयाची कल्पना आहे. म्हणून प्राणापेक्षां मन विशेष प्रिय. तें मन झोंप किंवा समाधि घेत असतां वाउगीच कल्पना करितें; तेव्हां म्हणतो कीं हें मन उगाच त्रास देत आहे. यावरून अंतःकरणावरचीही प्रीति खोटी समजावी. वृत्तीची प्रीति जर खोटी आहे तर तींत प्रतिबिंबणारा जीव त्याचीही प्रीती खोटी समजली पाहिजे. कारण वृत्ती नाहींशी झाली असतां प्रतिबिंबही नाहींसें होतें. याप्रमाणें आत्म्याखेरीज सर्व अप्रिय आहेत. एकटा आत्मा मात्र प्रिय आहे.

स्फूर्तीपासून तृणापर्यंत सर्व जितकें उत्पन्न झालेलें तितकें ईश्वरानें केलेलें. त्यावर जीव उपेक्ष्य, द्वेष्य, प्रिय, अशा तीन प्रकारानें कल्पना करितो. जसें एक प्रकारचा मणी आहे तो तिघांचे हेतूनें तीन प्रकारचा होतो तो असा–ज्याला तो मिळतो त्याला प्रिय होतो. ज्याला मिळत नाहीं ते त्याचा द्वेष करितात. ज्याला गरज नाहीं असा जो उदासीन तो त्याची उपेक्षा करितो. तेव्हां यांत खरें कोणतें ? एका कल्पनेचे वेळीं राहिलेल्या दोन कल्पना व्यर्थ होतात म्हणून हा व्यभिचार समजावा. ज्यांत व्यभिचार घडतो तें खोटें समजावें.

वर तिघांची एका वस्तुविषयीं कल्पना सांगितली. आतां एकाचीच एका वस्तूवर तीन प्रकारें कल्पना कशी होते तें सांगतों. वाघ सहजीं द्वेष्य आहे. त्यास दुरून पाहून जातात म्हणून तो उपेक्ष्य. तोच पाळून ठेविला असतां कुरवाळितों म्हणून प्रिय. प्रथमतः तृण पाषाण उपेक्ष्य आहेत. गरज लागली म्हणजे तेच प्रिय होतात. रुपले म्हणजे तेच द्वेष्य होतात. प्रथमतः स्त्रीपुत्रादि प्रिय आहेत. तींच अनुकूल नसलीं तर द्वेष्य होतात. तींच मानीनात अशीं झालीं म्हणजे उपेक्ष्य होतात. हाच न्याय स्थूलापासून वृत्तीपर्यंत सर्वांस लावून पहावा. ज्यांवर वरीलप्रमाणें व्यभिचार घडतो तीं अप्रिय समजावीं.

मुख्यात्मा जो वृत्ति अधिष्ठान । तोचि प्रियतर सर्वांहून । तेथें व्यभिचाराचें दूषण । किमपि नुठे ॥ ७८ ॥
प्रियत्वाचीही वृत्ति नुठे । मा द्वेष्य उपेक्ष्य कोठें । निर्वृत्तिक सुख गोमटें । संचलें असे ॥ ७९ ॥
म्हणसी आत्मा जना जाणवेना । तेव्हां उपेक्षा येतसे अनुमाना । आणि विष भक्षून देती प्राणा । तेव्हां द्वेष्य होय॥
तरी अवधारीं बोलिजे । जगीं आत्मा उपेक्षिजे । परी सुख व्हावें वाटे जें । तें आत्मयास्तव ॥ ८१ ॥
जैसा वृक्षस्थचि जळीं पडला । वाटे तोचि जावा वांचला । त्याहून भास जरी समजला । तरी तो मरो कीं वांचो
तैसें आपण हेंच वाटे मनीं । म्हणोनि दुजा आत्मा नसे जनीं । इकडील आपली प्रियता धरोनी । तया उपेक्षिलें॥
तो म्हणजे आपणाहून वेगळा । मानूनि उपेक्षितसे हेळा । आपुले प्रियत्वाचा सोहळा । असे तो कवणा ॥ ८४ ॥
तैसेंचि विष भक्षून प्राण देती । धिक्कार असो मज म्हणती । परी जनीं न व्हावी अपकीर्ति । हे आवडी अकृत्रिम
तुम्ही असा फार चांगुले । मीही न निकृष्ट ऐसा बोले । तें उपरोधिक जाण वाहिलें । परी अंतर्हेतु भिन्न ॥ ८६ ॥
हें मुमुक्षूनें पुरतें विचारावें । आत्मा प्रिय द्वेष्य कधीं नव्हे । तस्मात् प्रियतमत्व जाणावें । मुख्य आत्मयाचें ॥ ८७॥
इतुकीयाही निरूपणावरी । जो मूढ न समजे अंतरीं । तया पाषाणा शास्त्रें सारीं । आणि गुरुही करी काय ॥ ८८ ॥
असो रविदत्ता अव्यभिचार । आत्मा पूर्ण प्रियतर । तोचि चिद्रूपही साचार । आणि अस्तित्वें तोचि ॥ ८९ ॥
येर हा अवघा आभास । देहादि जीवांत फोस । येथें अस्तित्व ना नसे सुरस । प्रिय न चिद्रुप ॥ ६९० ॥
हेंचि आहे आवडे जाणतें । ऐसें अज्ञाना व्यर्थ वाटतें । परि हेंचि विडंबन बोलिजेतें । यथार्थ विचारें पहा ॥ ९१ ॥
तथापि ऐशिया निरूपणें । संशय न त्यागिजे मनें । तरी सावधान अंतःकरणें । दुजा न्याय बोलूं ॥ ९२ ॥
जागृतीमाजी प्रत्यक्ष देहाचें । अस्ति भाति प्रियत्व रुचे । तें स्वप्नामाजी उरे कैंचें । विचारें पहा ॥ ९३ ॥
स्वप्नामाजीही भास दुसरा । या ऐसाचि कल्पी अंतरा । हाचि मी या भास विषयमात्रा । भोगी सुखदुःखा ॥ ९४ ॥

---

आत्म्यावर व्यभिचार होत नाहीं म्हणून तो प्रिय. आत्म्यावर प्रियत्वाची वृत्तीही उठत नाहीं, मग तो द्वेष्य, उपेक्ष्य, कसा वाटेल ? वरील तीन प्रकार वृत्ती उलटल्यामुळें होतात. आत्म्याचे ठायीं निर्वृत्तिकसुख आहे तें वृत्ती कसें घेईल ? तें तिला घेतां येत नाहीं म्हणूनच तें अविनाशी प्रियरूप आत्मा.

**शंका**—आत्मा लोकांस कळत नाहीं, म्हणून तो उपेक्ष्य. कोणी विष भक्षून प्राण देतात म्हणून तो द्वेष्य.

**उत्तर**—लोक आत्म्याची उपेक्षा करितात म्हणून म्हणतोस पण आपणास सुख व्हावें असें जें वाटतें तें आत्म्यामुळें. जसें–वृक्षस्थच पाण्यांत पडलेला देसतो, तोच वाचला पाहिजे, पाण्यांत पडलेला भास देसतो तो मरो किंवा वांचो त्याची गरज नाहीं. तसें सर्व संघ हाच मी असें वाटतें. म्हणून माझ्यावांचून दुसरा आत्मा कोणी नाहीं असें मानितो. याप्रमाणें संघाची प्रीति धरून आत्म्याची उपेक्षा करितो. पण आत्मा कोणी एक माझ्याहून निराळा आहे, त्याची मला गरज नाहीं तसें म्हणत नाहीं तसें मानील तर आत्मप्रियता कोणास होईल ? विष भक्षून प्राण देतात व मला धिःकार असो असें म्हणतात. परंतु लोकांमध्यें अपकीर्ति होऊं नये हें जें वाटतें तें कोणाला ? सर्व संघाला वाटतें तर तो आपला नाश कां करून घेतो ? ज्यापेक्षां संघाचा नाश झाला तरी वाईट वाटत नाहीं. त्यापेक्षां संघाहून कोणीतरी अपकीर्तीचे भय बाळगणारा असला पाहिजे. ज्याच्या प्रीतीमुळें भय बाळगतो तोच आत्मा, तुम्ही फार चांगले आहां. मी हीन निकृष्ट आहें, असें जे बोलतो तें बोलणें उपरोक्षिक, परंतु त्याचा अंतरहेतु निराळा आहे. याचा मुमुक्षूनें पुरा विचार करावा आणि आत्मा प्रिय उपेक्ष्य द्वेष्य नाहीं तर तो प्रियतम आहे. याप्रमाणें निरूपण होऊन, मूर्ख जर समजणार नाहीं तर त्यास गुरु व शास्त्रें काय करतील ? वास्तविक आत्मा अस्तिभाति प्रियरूप आहे, देहअस्तिभाति प्रिय नाहीं, परंतु हा संघ आहे, हाच जाणतो व हाच प्रिय आहे, असें अज्ञानास उगाच वाटतें, हेंच विडंबन.

## संघांत अस्तिभातिप्रियत्व नाहीं याविषयीं न्याय.

जागृतीमध्यें प्रत्यक्ष देहाचें अस्तिभातिप्रियत्व आहे असें वाटतें, तें स्वप्नामध्यें कोठें आहे ? स्वप्नामध्यें याच्यासारखा दुसरा संघाचा भास कल्पून हाच मी असें मानून भास विषयांचे योगानें सुखदुःख भोगतो, वास्त-

मुख्य देह अस्तरणीं पडिला । तया न स्मरे आहे कीं मेला।आभास स्वप्नींचा आहेसा केला।तेव्हां निस्तत्त्व प्रत्यक्ष जो
भास देहची भास विषयांसी । देखत असे त्या समयासी । इकडे पडे जो त्याचे त्वचेसी । मृदु कठिणही कळेना ॥९६
प्रत्यक्षा सर्पे जरी वेष्टिलें । तयाचें भयही नाहीं वाटलें । स्वप्नीं व्याघ्रें जें आभास धरिलें । तेणें आक्रंदोनि रडे ॥९७॥
स्थूलाचें प्रियत्वचि असतें । तरी सर्पें धरितां कां उपेक्षितें । आणि हें चिद्रुपचि जरी होतें । तरी जाणतें निजलिया९८
तेथें आहेपणा जरी असता । तरी स्वप्नदेहांत कासया येता । असो आस्ति भाति तिजी•प्रियता । स्वप्नींचिया भासा आली
आस्तित्व तिकडे गेलें । इकडे निस्तत्वें मढें पडियलें । जाणतेपण स्वप्नांत आलें । इकडे उरे जडत्व ॥ ७०० ॥
प्रियत्वही गेलें स्वप्नभासा । इकडे अप्रियता उरे सहसा । एवं असज्जडदुःखरूप जैसा । परोक्ष कोणी ॥ १ ॥
तोचि आपण असता जरी । तरी कां त्यागिता परोक्षापरी । तस्मात् आपण आत्मा निर्विकारी । हा अनात्मा देह २
आतां स्वप्नभासासी जें आलें । आस्ति भाति प्रियत्व उमटलें । कीं मी हा आणि म्यां देखिले । कल्पित विषय ॥ ३॥
हाचि मी आणि भास विषया । देखत असें काळीं यया । आणि प्रियरूपही मानिलें तया । सूक्ष्मदेहासी ॥ ४ ॥
तरी हेही असज्जड दुःखात्मक । ऐसा करणें जरी विवेक । तरी हाचि न्याय निश्चयात्मक । स्थूलापरी पहावा ॥ ५ ॥
जैसा स्थूल नाहीं स्वप्नामाझारीं।तेवींच सुप्तींत निमती सत्रा सारीं । जया संघासी बोलती उत्तरीं । सूक्ष्मदेह भासरूप॥

### सुप्तौतु तल्लये बोधः शुद्धो जाड्यं प्रकाशते ॥

सुषीप्च्या ठांई तया देहाचा । लय होतसे समूळ साचा । नुसधी नेणीव उरे तयाचा । शुद्ध बोधें प्रकाश करी ॥ ७ ॥
सुप्ति म्हणजे लागतां झोंप । किंचित् दुजें नुरे अल्प । एक नेणीव मात्र असद्रूप । उरे कारण ॥ ८ ॥
जया आज्ञानास्तव । देहद्वया आलें रूप नांव । तोचि याचा विश्रांतिठाव । तेथेंचि विश्रामती ॥ ९ ॥
जैसा श्येनपक्षी विहार करी । दशदिशीं आहारादि सारी । शिणतां नीडीं प्रवेशे माघारीं । पंक्ष संकोचोनी ॥ ७१० ॥
तैसा सूक्ष्म देहासहित । जीव हा जागर स्वप्नीं क्रिडत । तेथें सुखदुःखें शीण पावत । तेव्हां विश्रांति घ्यावी वाटे ११
मग ज्ञान क्रियाशक्ति दोन्ही । मनबुद्धींत आकर्षोनी । विषय दशदिशा उपेक्षूनी । करणाकडे फिरे ॥ १२ ॥

---

विक मुख्य देह हा अंथरुणावर पडलेला आहे, तो मेला किंवा जिवंत आहे हें आठवत नाहीं. स्थूल देहाचा आहेपणा स्वप्नांतील आभासाकडे गेला, म्हणून प्रत्यक्ष देह निःस्तत्व झाला, व त्याचें पहाणें जाणणें आभासाकडे गेलें. तेव्हां भासदेह, भासविषयांस पाहूं लागला. इकडे पडलेल्या देहाचे त्वचेस मऊ किंवा कठीण हें कांहींच कळत नाहीं. अशा वेळीं प्रत्यक्ष देहास जरी सर्पानें वेढिलें, तरी त्याचें भय वाटत नाहीं. स्वप्नांत भासदेहास वाघानें धरिलें, म्हणून मोठ्यानें ओरडून रडतो. स्थूलदेहाचें प्रियत्व खरें असतें तर सर्पानें धरिलें असतां ह्या देहाची उपेक्षा कां करिता ? आणि तो देह जाणता असता तर आपल्या प्रकाशानें सर्पानें धरिलें आहे असें जाणता. तो देह जर अस्तित्वानें असता तर स्वप्नदेहांत कशाला येता ? त्या देहाची स्वप्नांत स्वप्नदेहीं अस्तिभातिप्रियता गेली, तेव्हां तो निस्तत्व जडत्व अप्रियत्व असा उरला. म्हणजे असज्जडदुःखरूप कोणी एक परोक्ष असतो तसा उरला. तोच आपण आत्मा असता तर, परोक्षासारखा त्याचा त्याग कां करिता ? ज्यापेक्षां त्याग करितो त्यापेक्षां हा देह अनात्मा, व आपण निर्विकारी आत्मा आहे. आतां स्वप्नभासास अस्तिभातिप्रियत्व आलें, तेव्हां भासदेह मी आणि म्यां भासविषय पाहिले. आणि भासदेह जो सूक्ष्मदेह तोच प्रीय होय. या सूक्ष्मदेहास स्थूल देहाप्रमाणें असज्जडदुःखात्मक आहे असें ठरवितां येतें. जसा स्थूळदेह स्वप्नांत नाहीं तसा सत्रा तत्वांचा लिंगदेह झोपेंत नाहीं. झोपेंत नुसती नेणीव रहाते, ती नेणीव शुद्धबोध आपल्या प्रकाशानें दाखवितो.

ज्या अज्ञानापासून दोन देह उत्पन्न झाले त्या अज्ञानांतच ते लय पावतात. जसा श्येन पक्षी भक्षाकरितां दहाही दिशा हिंडून श्रम पावल्यावर आपल्या घरट्यांत पंख संकोचून विश्रांति करिता शिरतो, तसा सूक्ष्मदेहासह जीव, जागृति स्वप्नांत क्रीडा करून सुखदुःखानें श्रम पावला म्हणजे विश्रांतीकरितां अज्ञानाकडे येऊन ज्ञान आणि क्रिया अशा दोन शक्ति मन आणि बुद्धी यांत आकर्षून दहादिशा म्हणजे येथें त्यांऐवजीं विषय यांस सोडून अज्ञानांत लीन होतो.

मनामाजी इंद्रियें येतां । शून्य पडे विषयां समस्तां । आणि देहही पडे निचेष्टिता । मृत्युप्राय ॥ १३ ॥
प्राण मात्र जडत्वें वावरती । तेणें मृत्यूची नव्हे भ्रांति । हा निजेला ऐसें म्हणती । पाहूनि लोक ॥ १४ ॥
परी मी हा निजलों असें । निद्रिस्त जाणेना अल्पसें । प्राणही वावरती जैसे । तेंही न स्मरे ॥ १५ ॥
मन बुद्धि एकत्र जाली । किंचित् जरी कल्पना स्फुरली । तरी ते स्वप्नभासाची भुली । तेही निमेल यांत ॥ १६ ॥
ऐखादे वेळे स्वप्न होतें । केव्हां जागृति सरतां गाढ होतें । कल्पित विषयाही समस्तांतें । उपेक्षून बुद्धि ॥ १७ ॥
ते बुद्धि वृत्ति अज्ञानीं मिळे । किंचित् न स्मरे सुखदुःख सोहळे । मी अज्ञान हेंही न कळे । जाड्य मात्र उरे ॥ १८ ॥
ऐशी गाढ सुषुप्ति जालिया । अभाव होतसे देहद्वया । जागृति स्वप्नकाळीं तया । निःशेष निमती ॥ १९ ॥
मनादि वृत्ति कीं ज्ञानेंद्रिय । प्राण कीं देह ना कर्मेंद्रिय । प्रत्यक्ष कीं भासरूप विषय । हे सर्वही मावळती ॥ ७२० ॥
नुसती जाड्यता जे नेणीव । उरे होऊन सर्व अभाव । ऐसिये समयीं तो स्वयमेव । आत्माचि एक ॥ २१ ॥
दुजेवीण आनंदघन । सच्चिद्रूप आत्मा पूर्ण । परी नेणीव न फिटे कारण । म्हणोनि ते झोंप ॥ २२ ॥
पहिली नेणीव जे आपुली । तेचि देहद्वया कारण जाली । त्या देहद्वयाची उपाधि सरली । परी नेणीव न फिटे ॥ २३
जैसें तृणादि वरचील नासलें । परी भूमिपोटीं बीज उरलें । तेणेंचि वार्षिक विरूढलें पूर्ववत् जैसें ॥ २४ ॥
अथवा वृक्षस्थळें डोळे झांकितां । जळीं पडिला न दिसे तत्वतां । परी तें मिथ्यात्वें न कळतां । उघडितां मानी मी पडिलों
तैशी नेणीव मात्र बीजरूपें । उरली सेविना संकल्पें । म्हणोनि उत्थानीं पूर्वरूपें । अन्यथात्वें उठे ॥ २६ ॥
जागृति स्वप्नीं जरी ज्ञान । पदार्थभासाचें विपरीत भान । परी तें निजात्मयाचें अज्ञान । न फिटे वृत्तीचें ॥ २७ ॥
तेविं स्मरणरूप विशेष वृत्ति । उभय व्यापारी क्रीडत होती । तेचि लयकाळीं नेणीव पुढती । सामान्यत्वें उरे ॥ २८ ॥
उरे ते अमुकसी आहे । ऐसा आहेपणा न लाहे । परी अनुमानें जाणावी कीं राहे । कार्य उत्पत्तीमुळें ॥ २९ ॥
असो ऐशी जे मूढवृत्ति । उरली जे जाड्यता तयेप्रति । अस्ति भाति प्रियरूप निश्चितीं । सहजगति आले ॥ ७३० ॥

---

इंद्रियें मनांत शिरल्यावर विषय शून्यवत् होतात व देह मेल्याप्रमाणें निचेष्टित होतो. परंतु प्राण जडत्वानें वावरतात म्हणून मृत्यू नव्हे, तर तो निजलेला आहे असें म्हणतात. पण मी निजलों होतों हें निजलेल्यास कळत नाहीं. तसेंच प्राण वावरतात किंवा नाहीं व ते वावरत असल्यास कसे वावरतात हेंही कळत नाहीं.

मन बुद्धि एकत्र झाल्यावर किंचित् कल्पना उठली तर, तीस स्वप्नभास म्हणतात. तो स्वप्नभास झोंप लागली म्हणजे नाहींसा होतो, जागृति सरतांच स्वप्न पडतें, किंवा गाढ झोंप लागते. ज्यावेळीं गाढ झोंप लागते, तेव्हां बुद्धि कल्पित विषयांस सोडून सुखदुःख न स्मरतां अज्ञानांत मिळते. पुढें अज्ञानांत मिळाली तरी मी अज्ञान आहें, असेंही न जाणतां नुसती जाड्यता उरते, याप्रमाणें गाढ झोंप लागली असतां दोन देह त्यांच्या अवस्था ( व्यापार ) त्या व्यापारांचीं साधनें हीं सर्व नाहींशीं होतात. म्हणजे मनादिक वृत्ति किंवा ज्ञानेंद्रियें, प्राण, देह, किंवा, कर्मेंद्रियें, तसेंच प्रत्यक्ष किंवा भासविषय, हे सर्वही नाहींसे होतात, तेव्हां स्वयमेव आत्माच उरतो. परंतु अशा वेळीं अज्ञान असतें म्हणून त्या स्थितीस झोंप म्हणतात. आपली पहिली नेणीव, दोन देह उत्पन्न होण्यास कारण झाली. दोन देहांची उपाधी गेली तरी नेणीव जात नाहीं. जसें गवत वरून नासून गेलें तरी बीं भूमींत उरल्यामुळें पावसाळ्यांत तें पूर्ववत् उगवतें.

जसा वृक्षस्थानें डोळे झांकिले म्हणजे जळांत पडलेला प्रतिभास त्यास दिसत नाहीं. तेव्हां तें पडणें खोटें, असें न जाणून, डोळे उघडल्यावर मानितो कीं, मी पडलों, तशी नेणीव बीजरूपानें संकल्पावांचून उरली म्हणून जागे झाल्यावर पहिल्याप्रमाणें अन्यथात्वें उठतो. जागृतीमध्यें व स्वप्नामध्यें पदार्थभासाचें विपरीत भान हेंच ज्ञान आहे. यानें निजआत्म्याचें, वृत्तीस अज्ञान आहे, तें नाहींसें होत नाहीं. तर जी विस्मरणरूप विशेष वृत्ती, दोन्ही व्यापारांत खेळत होती. तीच नेणीव, लय काळीं सामान्यत्वानें रहाते. पण ती अमुक प्रकारची उरली आहे असा तिचा आहेपणा सांगतां येत नाहीं. परंतु अनुमानानें जाणतां येतें कीं. कार्याची उत्पत्ती आहे तेव्हां ती नेणीव आहे. असो, वर सांगितल्याप्रमाणें मूढवृत्तीरूप जाड्यता उरली (झोंप आली) तिला अस्तिभातिप्रियरूपता आली. ती कशी आली तें सांगतों.

जाड्यता आहे आणि भासे । आवडीही तेथेंचि वसतसे । देहद्वय होती फोसे । निस्तत्त्वपणें ॥ ३१ ॥
निस्तत्त्व ह्मणजे नाहींपणा । नाहीं तें कदां असेना । त्याची आवडी तरी होय कोणा । वंध्यापुत्रापरी ॥ ३२ ॥
भ्रमें आहे होतें वाटलें । मंदांधकारीं सर्प उमटले । ते गाढ अंधारीं निमाले । तेवीं सुप्तींत देहद्वय ॥ ३३ ॥
स्थूलदेह तो जागृतीसहित । निमाला असे स्वप्नांत । तें स्वप्नींही नासोनि जात । सुषुप्तीमाजीं ॥ ३४ ॥
असज्जड अप्रियता । देहद्वयाची अकृत्रिमता । जरी हे अस्तिभातित्वें असतां । तरी नासती कासया ॥ ३५ ॥
अस्तित्व होतें तें जाऊनी । निस्तत्त्व आलें दोहींलागुनी । चिद्रूप प्रिय तींही मावळुनी । जड दुःख आलें ॥ ३६ ॥
नेणिवेसी आली अस्तिता । तेथेंचि वसिन्नली चिद्रूपता । आणि स्वकीयत्वें प्रियता । तेथेंचि आली ॥ ३७ ॥
आतां तेंचि आस्तित्वादि नेणिवेचें । कैसें तें पुढें निरोपिजे साचें । प्रस्तुत ज्ञान सुप्तींत जें नवचे तेंचि आधीं साधूं ३८

**बोधः शुद्धो जाड्यं प्रकाशते ॥ ४ ॥**

जे-का सामान्यत्वें ज्ञान । शुद्ध ह्मणिजे नेणिवेवीण । जाड्यता नेणिवे तें आपण । प्रकाशीत असे ॥ ३९ ॥
तें शुद्ध ज्ञान आत्मयाचें । तें पुढें विरून कळे साचें । प्रस्तुत ठाईं या सुषुप्तीचें । ज्ञान कैसें ऐके ॥ ४० ॥
सुप्तिकाळीं वृत्तीचा लय । जाणिला असे प्रकाशें स्वयें । जरी जाणिला नसता तो समय । उत्थानीं न स्मरतां ॥ ४१ ॥
आतां जेधवां असे स्मरला । कीं लय अमुक वेळ होता जाला । तस्मात् तो अनुभव घेतला । तेव्हां आतां स्मरे ॥ ४२ ॥
विशेष वृत्तीचें स्मरण नव्हेतें । परी सामान्यत्वें जाणे नेणिवतें । आतां विशेषत्वें पाहिलें त्यातें । तेव्हां जाणिलें म्हणोनि ४३
जैसा स्वसुखी पुरुष कोणी एक । बैसला निवांत सकौतुक । तया पुढून जातां लोक । परी तो विशेषें देखेना ॥ ४४ ॥
आपुले ऐश्वर्यसुखें कोंदला । हा अमुक वृत्तीसी नाहीं कळला । नेत्र उघडून पाहे तयाला । सामान्य गती ॥ ४५ ॥
मागून येणारे तया पुसिलें । कीं या मार्गीं अमुकसें गेलें । तंव तो स्मरून यथा बोले । कीं गेलेंसें वाटे ॥ ४६ ॥
सामान्यत्वें देखिलें होतें । तें स्मरून सांगतसे तयातें । जरी तेणें पाहिलेंचि नसतें । तरी सांगता काय ॥ ४७ ॥
तस्मात् अनुभविला विषय आठवी । नानुभूताचि स्मृति न व्हावी । हें सत्यसत्य अन्यथा न घडावी । युक्ति न्यायाची ४८

---

ज्याड्यता आहे ती भासतें व तिच्याच ठायीं प्रियत्व आहे म्हणून झोंपेंत दोन देह निस्तत्वपणानें फोस ( निष्फळ ) होतात. निस्तत्व म्हणजे नाहींपणा. हा नाहींपणा दोन देहांस आला. जें नाहीं तें कधींही असत नाहीं मग त्या दोन देहांची प्रीति वंध्यापुत्राप्रमाणें कोणास होणार आहे? मंद अंधःकारामुळें जसे सर्प दिसले व ते गाढ अंधकारांत नाहींसे झाले. तसें भ्रमानें दोन देह आहेत असें वाटलें. ते गाढ झोंपेंत नाहींसे झाले. त्यांत प्रथम स्थूलदेह जागृतीसहवर्तमान स्वप्नांत नाहींसा झाला. पुढें स्वप्न झोंपेंत नाहींसें झालें. तेव्हां दोन देहांची असज्जड दुःखरूपता अप्रियता अकृत्रिम आहे असें दिसलें. जर त्यांची अस्तिभातिप्रियता असती तर ते नाहींसे कां होते? ज्यापेक्षां ते नाहींसे होतात त्यापेक्षां ते निस्तत्व समजावे. दोन देह निस्तत्व झाल्यावर नेणिवेस अस्तिभातिप्रियता कशी आली, तें पुढें सांगूं. सध्या सुप्तींत जें ज्ञान कळत नाहीं तेंच सांगतों.

नेणिवेवांचून जी सामान्यत्वें शुद्ध ज्ञानरूपी जाड्यता ती नेणिवेस प्रकाशित. तें आत्म्याचें शुद्धज्ञान पुढें सांगूं तेव्हां कळेल. सध्यां झोंपेंतील ज्ञान सांगतों. झोंपेंत वृत्तीचा लय आत्म्यानें आपल्या प्रकाशानें जाणिला आहे. जर झोंपेची वेळ जाणली नसती, तर ती वेळ उत्थान झाल्यावर आठवली नसती. जेव्हां अमुक वेळ लय झाला होता असें आठवतें तेव्हां तो अनुभव घेतला, ह्मणून जागें झाल्यावर आठवलें; त्यावेळीं विशेष वृत्तीचें स्मरण नव्हतें. परंतु सामान्यत्वें नेणिवेस जाणत होता. आतां विशेषत्वें त्याच नेणिवेस पाहिलें ह्मणून जाणण्याचा अनुभव सांगतां आला जसा कोणी एक पुरुष आपल्याच सुखांत निमग्न असतां त्यापुढून कोणी मनुष्य गेलें, तेव्हां तो विशेषत्वें पहात नव्हता, म्हणून हा अमुक असें मात्र त्यास कळलें नाहीं. पण तो डोळे उघडे असल्यामुळें त्यास सामान्यत्वें पहात होता. जर तो सामान्यत्वें न पहातां, तर त्यास येथून कोणी गेलें काय, असें विचारिलें असतां सांगतो कीं, गेलें खरें. पण कोण गेलें कोण जाणे. आतां त्यानें गेलें असें जें सांगितलें तें सामान्यत्वें पाहिल्यावांचून सांगितलें नाहीं. सामान्यत्वें पाहिलें होतें म्हणूनच आठवून कोणी गेलें असें सांगितलें. जी अनुभवलेली गोष्ट असते ती सांगतां येते, न अनुभविलेली गोष्ट सांगतां येत नाहीं. हें अनुमान.

हें अनुमान परी सत्य असे । नदीसी पूर जेव्हां आलासे । तेव्हां उगमीं पर्जन्य पडिलासे । यांत संदेह नाहीं ॥ ४९ ॥
तैसा ज्ञानाचा अनुभव । झोंपेंत घेतला स्वयमेव । ह्मणून आतां करी आठव । तया समयाचा ॥ ७५० ॥
लय सामान्यत्वें देखिला । होता तो उत्थानीं आठविला । तस्मात् नेणिवेचा अनुभव घेतला । शुद्ध साक्षिज्ञानें ॥ ५१ ॥
ह्मणसी सर्वांचा होतां । साक्षीचा लय होय त्या सहिता । तरी साक्षीच्या लयाचा पाहता । असे कोण साक्षी ॥ ५२ ॥
असाक्षी कीं लय मानूं नचे । हें सत्य सत्य यथान्यायें । मागुतीं ह्मणसी कीं सर्वांचा क्षय । जालया साक्षी कोण ५३
तरी पाहे शुद्ध साक्षी ज्ञान । सर्वांचा लय पाहे आपण । तस्मात् सर्वांचा लय जो होणें । हे अन्यथा नव्हे ॥ ५४ ॥
जैसा सर्वांचा लय साक्षी जाणे । ह्मणून सत्य सत्य सर्वां लय होणें । तैसा साक्षीचा लय पाहिला कोणें । हें बोले विचारूनी ५५
म्हणसी सर्वांचा लय अनुमानिला । तेवींच अनुमानावा साक्षी निमाला । तरी जैसा सामान्य साक्षी उरला । तैसा उरे कोण ५६
दीप नेत्र दोन्ही मिळतां । पदार्थां देखतसे समस्तां । त्यांतील दीप जरी मावळता । तरी डोळा देखे अंधार ॥ ५७ ॥
अंधार नेत्रें देखिला । म्हणोनि सत्य दीपाचा लय जाला । तैसा डोळा जरी असे गेला । तो देखिला कोणें ॥ ५८ ॥
तथापि लय जो साक्षीचा । मानिसी अनुमानें साचा । तरी साक्षी जो अनुमानिला साक्षीचा । तो हाच कीं दुजा ५९
डोळियाचा लय डोळा देखे । कीं दुजा डोळा तया ओळखे । तेवीं साक्षीचा लय साक्षी निरिखे । कीं चिद्रूप दुसरें ७६०
साक्षीचा लय साक्षीनें देखिला । तरी आपणा देखतां आपण मेला । कीं डोळाचि पाहे डोळा गेला । हा तों असंभव ६१
दुसरिया ज्ञानें हें ज्ञान । निमालें म्हणतां तें ज्ञान कोण । डोळा गेला तो पाहे अन्य । डोळियानें तो डोळा कोणता ६२
तस्मात् ज्ञान ही दुसरें नाहीं । कीं ज्ञान लया होय पाहीं । डोळाचि दुसरा नसे कांहीं । कीं डोळा गेला देखे ॥ ६३ ॥
ऐसिया विरोधामुळें पाहतां । साक्षीचा लय नये मानितां । ह्मणोनि साक्षीज्ञान असे तत्त्वतां । लयकाळीं लय साक्षी ६४
मागुतीं ह्मणसी कीं लय नव्हे साक्षीचा । परी अनुभव कां नसे तयाचा । तरी सांग बापा अनुभव नेणिवेचा । कोण घेतला

---

परंतु तें खरें आहे. जसें, नदीला पूर आला म्हणजे सहजच तिच्या उगमाचे ठायीं पाऊस पडला होता हें सिद्ध होतें, तसा ज्ञानाचा अनुभव झोंपेंत घेतला म्हणून त्या वेळची आतां आठवण करितो. सामान्यत्वें जो लय पाहिला होता तो जागे झाल्यावर आठवला; ह्मणून अज्ञानाचा अनुभव शुद्ध साक्षीनें घेतला. आतां सर्वांचे लयाबरोबर साक्षीचा लय होतो, अशी तुझी कल्पना होईल, तर तूं मला असें सांग कीं, साक्षीचा लय पहाणारा असा दुसरा कोण साक्षी आहे? तूं ह्मणशील कीं, लय झाला त्याचा साक्षीच नाहीं. तरी असें म्हणूं नको. तूं ह्मणशील कीं, सर्वांचा लय झाल्याचा साक्षी कोण आहे? तरी ऐक: शुद्धसाक्षीज्ञान सर्वांचा लय पहातें, म्हणून सर्वांचा लय होतो हें खोटें नाहीं. जसें, सर्वांचा लय साक्षी जाणतो, म्हणून सर्वांचा लय झाला हें खरें म्हणतां येतें; तसा साक्षीचा लय कोणीं पाहिला तें सांग. तूं ह्मणशील कीं, सर्वांच्या लयाचें अनुमान करिता, तसेंच साक्षीच्या लयाचें अनुमान करावें. तरी जसा सामान्य साक्षी उरला तसा साक्षीचा लय पाहणारा कोण उरला तें सांग. दिवा आणि डोळे असले ह्मणजे सर्व पदार्थ पहातां येतात. त्यांत एक दिवा मालविला तर डोळा अंधार पहातो. डोळ्यांनीं अंधार पाहिला ह्मणून दिव्याचा खरोखर लोप झाला, हे सांगतां आलें. तसा डोळा गेला असला तर तो कोणीं पाहिला तें सांग बरें? साक्षीचा लय अनुमानिला तरी जो साक्षीचा साक्षी अनुमानिला तो हा किंवा दुसरा? डोळ्याचा लय डोळा पहातो किंवा दुसरा डोळा लय जाणतो; तसें साक्षीचा लय साक्षी पहातो किंवा दुसरा कोणी चिद्रूप पहात आहे. जर साक्षीचा लय साक्षीनें पाहिला तर आपणा देखत आपण मेला असें होईल. डोळ्यानेंच डोळा गेला असें पहाणें संभवत नाहीं. दुसऱ्या ज्ञानानें हें ज्ञान नाहींसें झालें असें म्हणावें तर तें ज्ञान कोणतें? डोळा गेला तो दुसऱ्या डोळ्यानें पाहिला तो डोळा कोणता? असें दुसरें ज्ञानच नाहीं कीं, जें ज्ञानाचा लय पाहील. असा दुसरा डोळाच नाहीं कीं, जो डोळ्याचा लय पाहील. ह्या वरील विरोधामुळें साक्षीचा लय मानितां येत नाहीं. म्हणून लयकाळीं लय जाणणारें ज्ञानच साक्षि. साक्षीचा लय नाहीं, तर त्याचे अस्तित्वाचा अनुभव कां येत नाहीं, असें तूं म्हणशील, तर नेणिवेचा अनुभव कोणीं घेतला?

हे म्यां नेणीव असे पाहिली । म्हणसी जरी ऐसिया बोली । तरी नेणीव जे तुवां देखिली । आपुली कीं पराची सांग॥६६
हा अन्य गृहस्थ असे निजला । जडत्वें घोरतसे उगला । तरी त्याचा तुला अनुभव जाला । कैसा तो नकळे ॥६७॥
अरे पराचें जागें असतां मन । काय कल्पितें न कळे पाहून । मानिजेल्याचे नेणिवेचें ज्ञान । तुज जालें हा असंभव ६८
आतां ह्मणसी नेणीव आपुली । झोंपेमाजीं प्रत्यक्ष पाहिली । तरी पाहें पाहे गोष्ट साधली । आमुच्या पक्षाची ॥ ६९ ॥
तुवां वृत्ति समूळ नसतां । आपुली नेणीव पाहिली ह्मणतां । अनुभवून कीं होसी बोलता । हा अनुभविता साक्षी ७७०
अरे ऐसा टळटळीत अनुभव । लय साक्षी हा स्वयमेव । तयासी कोठें असे नेणीव । नेणिवेचा प्रकाशक ॥ ७१ ॥
लय काळींही जया ज्ञानाचा । नाश नाहीं प्रकाशाचा । जागृतीं स्वप्नीं तो अभाव तयाचा । नाहींच नाहीं ॥ ७२ ॥
एवं तिहीं काळींही नासेना । हेंचि सद्रूपत्व असे ज्ञाना । सद्रूप तेंचि चिद्रूप आपणा । आत्मयाचें सिद्ध ॥ ७३ ॥
जैसें सद्रूप चिद्रूप आत्मयाचें । असे तें निरोपिलें वाचें । आतां तिजें लक्षण कां साचें । तें प्रियत्व बोलिजे ॥ ७४ ॥
मागें मिथ्यात्मा गौणात्मा । निषेधून जो कां मुख्यात्मा । तो आवडता प्रत्यगात्मा । अव्यभिचारें बोलिला ॥ ७५ ॥
तोचि आत्मा सुषुप्तीमाजीं । सुखरूप जैसा असे सहजीं । तोचि बोलिजे जेथें दुजी । अनुभववृत्ति नसे ॥ ७६ ॥
जागृतिमाजी सुखदुःख होणें । तें एका संकल्पाच्या गुणें । तेवींच स्वप्नीही सुखदुःख दूणें । संकल्पमात्रें ॥ ७७ ॥
झोंपेंत संकल्पाचि निमतां । सुखदुःखाची नुरे वार्ता । तस्मात् सुखदुःखेंचि नसतां । तत्त्वतां निजसुख ॥ ७८ ॥
जें सुख वृत्तींत उत्पन्न होणें । तयासी नाश होय श्रुति ह्मणे । जें नुद्भवेना नसे सहजपणें । या नांव निजसुख ॥७९॥
तया सुखासी घेईना वृत्ति । ह्मणून नोहेचि अनुभूति । परी अनुभाव्यरूपी चिन्मूर्ति । आहे तैसा असे ॥ ७८० ॥
आहेपणा तेंचि चिद्रूप ज्ञान । तोचि आत्मा आनंदघन । हीं तिन्हीही महालक्षणें । एकत्र असती ॥ ८१ ॥
येथें रविदत्ता मानिसी ऐसें । कीं जडासी सुखदुःखही नसे । आणि आहेपणा तो तेथें वसे । तरी असे जडत्वीं सुख ८२
काष्ठ पाषण मृत्तिका । येथेंचि आनंद असे निका । तरी याचें उत्तर ऐका । बोलिजेत असे ॥ ८३ ॥
जडीं सुखदुःखाचा अभाव । ह्मणणें हाचि कीं असंभव । जें जें उत्पन्न जालें रूपनांवें । जड कीं चेतनविकार ॥८४॥
विकारी म्हणजे उत्पन्न जालें । जालें तें वाईट कीं चांगुलें । तयासी सुखदुःख नाहीं वाटलें । परी सुखदुःखरूप ॥ ८५ ॥

---

मीं नेणीव पाहिली असें म्हणशील तर नेणीव जी तूं पाहिलीस, ती तूं आपली किंवा दुसऱ्याची ? दुसरा मनुष्य जागा असतां त्याचें मन काय कल्पना करितें हें सांगतां येत नाहीं. मग तो निजला असतां त्याचा अनुभव तुला कसा येईल? आतां तूं आपली नेणीव झोंपेंत वृत्ती नसतां अनुभवून बोलतोस तो अनुभवणारा साक्षीच आहे. असा लयसाक्षी तूं, त्या तुला नेणीव कोठची ? तूं नेणीवेचा प्रकाशक आहेस. ज्या ज्ञानरूपी प्रकाशाचा सुप्तींत लोप नाहीं, मग जागृतीस्वप्नांत तर त्याचा अभाव नाहींच नाहीं. ह्याप्रमाणें जो तिन्हीं काळीं नासत नाहीं, तेंच प्रकाशरूपी ज्ञान स्वतः सद्रूप आहे व तेंच चिद्रूपही आहे. तसेंच आनंदरूपही तें आहे असें आतां सांगतोः मागें मिथ्यात्मा तसेंच गौणात्मा याचा निषेध करून मुख्यात्मा आवडता असें सांगितलें. तोच आत्मा झोंपेंत कसा सुखी आहे तें सांगतोः जागृतीमध्यें सुखदुःख होतें तें एका संकल्पामुळें होतें. तसेंच स्वप्नांतही संकल्पामुळेंच सुखदुःख होतें. झोंपेंत संकल्प नाहींसा होतो; म्हणून तेथें सुखदुःख नसतें. तर नुसतें निजसुख असतें.

**निजसुख**—जें सुख उत्पन्न होत नाहीं, व नासत नाहीं. त्यास निजसुख म्हणतात.

वृत्तींत जें सुख उत्पन्न होतें त्याचा नाश होतो असें श्रुती म्हणते. निजसुखास वृत्ती घेऊं शकत नाहीं म्हणून त्याचा अनुभव येत नाहीं. परंतु तें अनुभाव्यरूप सुख आहे तसेंच आहे. त्याचा आहेपणा तेंच चिद्रूप ज्ञान व तोच आत्मा. याप्रमाणें आत्म्याचीं अस्ति, भाति व प्रिय हीं तिन्हीं लक्षणें एकेच ठिकाणीं आहेत.

**शंका**—जडास सुखदुःख नाहीं, पण त्याचा आहेपणा तेथें वसत आहे. तर जडामध्यें निजसुख आहे. लांकूड दगड माती यांत आनंद आहे असें म्हणशील तर त्याचें उत्तर ऐकः या जडांत सुखदुःख नाहीं, हें बोलणेंच असंभवनीय आहे. जड किंवा चेतन जें जें विकारी नांवरूप उत्पन्न झालें, तें तें वाईट किंवा चांगलें असो, त्याला सुखदुःख नाहीं असें वाटतें; परंतु तें सुखदुःखरूपच आहे.

फोडिती तोडिती फेंकिती । एक स्थानीं ठेऊन पूजिती । हीं काय तेथें तुज न दिसती । सुखें आणि दुःखें ॥ ८६ ॥
तथापि सुखदुःखें तेणें । अनुभविलीं नाहींत मानिसी मनें । तरी निजसुखही असे कवणें । रीतीं तेथें ॥ ८७ ॥
तेथें सुख आहे तें तुज कैसें । कळलें तें सांगे पां आपैसें । तेथें हर्ष किंवा ग्लानि दिसे । अनुमानाजोगें ॥ ८८ ॥
ह्मणसी निजेलिया कोणतें चिन्ह । कीं सुख आहे करावा अनुमान । तरी पाहें त्याचें मुख विकासमान । हर्ष खेद नसतां ८९
तस्मात् सुषुप्तीमाजीं निजानंद । वृत्तीविण सुखाचा कंद । जडा नसतांही हर्ष खेद । सुख तेथें नसे ॥ ७९० ॥
तथापि सुख आहेच ह्मणसी । तरी कोण पावे त्या सुखासी । मिळणी होतां सुख समरसीं । जीव हा सुखी होय ॥ ९१ ॥
हा अनुभव सर्वत्रांचा । सुखींच विश्रामती साचा । उत्थानीं बोलताती वाचा । कीं काय हो सुखी होतों ॥ ९२ ॥
जरी कोणें बळें उठविलें । तें वैरियापरी वाटतें जालें । आहा महत्सुख होतें तें गेलें । तेव्हां तळमळी ॥ ९३ ॥
उठलिया क्षणभरी । त्या सुखाचि येतसे लहरी । पुढें मग येतसे जागरीं । हळूहळू व्यापारा ॥ ९४ ॥
आहेपणा तेथें सुख असे । मानिलें जें तुवां मानसें । परी जेथें विकार हा उमसे । सुखदुःखाचा ॥ ९५ ॥
तेथें आनंद हा लोपत । सुखदुःखेंचि होऊनि निभ्रांत । मग असो कोणतीही वस्तुजात । जड कीं चेतन ॥ ९६ ॥
जैसें विकार सुषुप्तीमाजीं । सुखदुःखरूप नसती दुजी । केवळ निजसुखाचि सहजीं । असे तैसें आहे ॥ ९७ ॥
आणीक येक करिसी कल्पना । शय्यादि असती सुखसाधना । परी ते आरंभीं मात्र वृत्तीचे ग्रहणा । होय कीं मी एक सुखी
परी गाढ जेव्हां झोंप लागली । मग त्या सर्वां वृत्ति विसरली । एका निजसुखीं मिळणी जाली । तेव्हां शय्यादि सुख कैचें ९९
हें असो मृदु आस्तरणें । झोंप येतां कठिणही न म्हणे । जेथें पाहिजे तेथें पडणें । विश्रांति घ्यावया ॥ ८०० ॥
तस्मात् कांहीं साधनाविण । सुषुप्तिसुख असे गहन । अमुक एक प्रयोजन । पाहिजे ऐसें नाहीं ॥ १ ॥
जैसी पतिसंगें पतिव्रता । सुखैक भोगितसे तत्त्वतां । व्यापार सर्वही नेणतां । बहिरंतरींचे ॥ २ ॥
घरधंदा हे बहिर्व्यापार । आंतील तांबूलादि शृंगार । या दोहींचाही पडे विसर । मैथुनकाळीं ॥ ३ ॥

---

त्या जडास कोणी फोडितात, तोडितात, फेंकितात, किंवा त्याची पूजा करितात. हींच त्यास सुखदुःखें आहेत, असें असून तूं म्हणशील कीं, त्यानें तीं सुखदुःखें अनुभवलीं नाहींत. जर तीं सुखदुःखें जड अनुभवीत नाहीं, तर तेथें निजसुख कशा प्रकारें आहे, तें सांग व तें तेथें आहे असें तुला कसें कळलें ? तें कळण्याला हर्ष किंवा ग्लानी काय दिसलें ? तूं म्हणशील कीं, निजलेला असतांना त्याला सुख होतें हें काय चिन्हावरून अनुमान करावें ? उत्तर–त्याचें मुख हर्ष खेद नसतां प्रफुल्लित दिसतें म्हणून झोंपेमध्यें निजसुख वृत्तीवांचून आहे, तसें जडामध्यें हर्षखेद नाहीं व निजसुख नाहीं. आणि तूं निजसुख जडास आहे असें म्हणशील, तर त्या सुखास कोण पावेल ? जीव सुखांत मिळाला म्हणजे सुखी होतो. सर्व सुखांत विश्रांती पावतात. हा सर्वांचा अनुभव आहे. कारण जागें झाल्यावर बोलतात कीं, मी कायहो सुखी होतो. त्यास कोणी मुद्दाम उठविलें तर उठविणारा त्यास वैरी असा होतो व मीं सुखांत होतों तें माझें सुख गेलें म्हणून तळमळतो. त्यास उठल्यावर क्षणभर त्या सुखाची लहर येते. मग जागा होतो. तूं, आहेपणा तेथें सुख आहे असें मानितोस, परंतु जड किंवा चेतन वस्तूंस सुखदुःख उत्पन्न होतें, म्हणून तेथील निजसुखाचा लोप होतो. जसें, झोंपेंत सुखदुःख नसून केवळ निजसुख असतें. आतां झोंप येण्यास शय्या आदिकरून सुख देणारीं साधनें आहेत असें मानशील परंतु तीं प्रथम वृत्तीस मी सुखी असें ग्रहण करण्यास म्हणजे मानण्यास उपयोगी पडतात. एरवीं त्या साधनांचा उपयोग नाहीं. कारण गाढ झोंप लागल्यावर वृत्ती त्यांस विसरते; आणि तिची एक निजसुखीं मिळणी होते. तेव्हां शय्यादि सुख कोठचें ? झोंप आल्यावर कठिण किंवा मृदु अस्तरणें न म्हणतां विश्रांतीकरितां जेथें पाहिजे तेथें निजतो, म्हणून साधनावांचून झोंपेंत सुख आहे. तें प्राप्त करून घेण्यास अमक्याचें प्रयोजन आहे असें नाहीं. जशी पतिव्रता पतीबरोबर सुख भोगते, त्या वेळीं ती आंत बाहेरचे व्यापार जाणत नाहीं. घरधंदा, हा बाहेरील व्यापार, व आंतील तांबुल आदिकरून शृंगार हा आहे. या दोहोंचाही मैथूनकाळीं विसर पडतो.

तैसा जागृतीचा व्यापार वृत्तीनें । आणि स्वप्नींचाही भास नेणें । एक आत्मसुखीं समरसणें । त्यागून द्वैता ॥ ४ ॥
मैथुनकाळीं कामिनीसी । अंतर्बाहिर्नेणवे शब्दासी । तेवीं आलिंगन पडे वृत्तीसी । स्वप्न जागर न स्मरे ॥ ५ ॥
हेंही बोलणें द्वैताचें । सुषुप्तींत सुखग्रहण तरी कैंचें । एक निवर्तन नव्हे नेणिवेचें । म्हणोनि बोलावें ॥ ६ ॥
असो रविदत्ता या निरोपणीं । सावध अससी कीं अंतःकरणीं । अस्ति भाति प्रियत्व तिन्ही । सुषुप्तींत आले ॥ ७ ॥
स्वप्न जागृती दोन्ही नसती । भाति प्रियांतही मावळती । तरी त्या अवस्था सत्य होती । कोणें काळीं तरी ॥ ८ ॥
तस्मात् जागृति स्वप्न असतां । उभयांसीही न ये सत्यता । अस्तित्वेंवीण भाति प्रियता । असे कवणासी ॥ ९ ॥
भ्रमेंच जरी आहेसें मानिलें । तरी काय तेथें सत्यत्व आलें । वृक्षस्थें पडिलियां जरी देखिलें । तरी काय जळीं खरा ॥८१०
डोळे झांकिता पडिला न दिसे । तेव्हां मावळून वृक्षस्थीं समरसे । मा पाहतां काय जळीं असे । खरा पडिला ॥ ११ ॥
तैसी जागृति स्वप्नव्यापारा । सत्यता नये सुप्तीमाझारा । मा असतां काय हा भास खरा । सत्यत्वें जाला ॥ १२ ॥
हे असो स्वप्नजागृति । जालीच नाहीं ना होणार पुढती । तरी काय वास्तविक हे सुषुप्ति । होईल तिहीं काळीं ॥ १३ ॥
कार्य जें का प्रत्यक्ष दिसलें । तें विवेकें मिथ्या केलें । मा त्याचें कारण जें अनुमानिलें । तें सत्य कैसें ॥ १४ ॥
कारण अज्ञान तों निःशेष नसे । कार्यामुळें मानिजे आहेसें । तें कार्यचि जालिया वायसें । तरी कारण तें कोठें ॥१५
देहादिकां आपणसें मानिलें । तेव्हां जाणावें विस्मरणआपुलें । त्या देहद्वयाचें मीपण त्यागिलें । तरी उरे कैंवी अज्ञान१६
जळीं पडिलाचि नाहीं खरा । तरी नेणपणासी कैंचा थारा । तेवीं मिथ्यत्व येतां उभय व्यापारा । अज्ञान नाहींच ॥१७
परी सत्य आपण नेणिवेपरता । वृत्तीस कळावें अपरोक्षता । तेव्हांचि हे देहद्वय असतां । मिथ्या स्फुरती ॥ १८ ॥
जरी गुरु शास्त्राचे वचनीं । मिथ्या मानिलें विश्वास ठेवूनी । तरी तें नव्हे मिथ्या असोनी । स्वानुभवावीण ॥ १९ ॥
तो स्वानुभव जागृतींत यावा । आपण निजात्मा हा प्रत्यय व्हावा । तरीच देहाचा मीपणा जावा । निपटूनियां ॥८२०
तें निरोपण पुढें तुज । कीजेल तया रीती समज । येथें बोलिलें असे सहज । सत्य मिथ्या कळावया ॥ २१ ॥

---

तसें वृत्ती जागृतीचे व स्वप्नींचे व्यापार सोडून एक आत्मसुखीं समरसते. जशी पतिव्रता मैथुनकाळीं आंत बाहेरील शब्द जाणत नाहीं, तशी वृत्ती, जागृती, स्वप्न, झोंपेंत स्मरत नाहीं. तेथें नेणीव आहे, म्हणून वृत्ती झोंपेंत सुख घेते असें बोलतां येतें. ती नेणीव नसती, तर हें बोलतांच आलें नसतें.

जागृती स्वप्न यांची अस्तिभातिप्रिय हीं लक्षणें सुषुप्तीस आलीं. जागृति स्वप्न ह्या दोन्ही अवस्था झोंपेंत नाहींत म्हणून त्यांचीं अस्तिभातिप्रिय हीं लक्षणें गेलीं. वरील लक्षणेंच नाहींशीं होतात, तर त्या अवस्था खऱ्या कशा मानाव्या ? जर जागृति स्वप्न ह्या अवस्था खऱ्या नाहींत, तर त्यांचीं भ्रमानें मानिलेलीं वरील लक्षणेंही खरीं कसचीं ? वृक्षस्थानें आपणास पाण्यांत पडलेलें पाहिलें, परंतु तो खरा पडलेला आहे काय ? त्यानें डोळे झांकिले म्हणजे त्यास पाण्यांत पडलेला दिसत नाहीं. तेव्हां इकडील दिसणें नाहिसें होऊन आपण वृक्षस्थ बनतो, आणि पाहूं लागला कीं पडलेला दिसतो. यावरून तो खरा पडला आहे काय ? तसे जागृति आणि स्वप्न यांचे व्यापार झोंपेंत खरे होत नाहींत. मग त्या अवस्था असतां त्यांचे व्यापार खरे कसे मानावे ? हें असो. स्वप्न जागृति झाली नाहीं व पुढें होणार नाहीं, तर झोंपही खरी कशी होईल ? कार्यच जर विचारानें खोटें ठरतें, तर त्याचें अनुमानिलेलें कारण तें खरें कसें असेल ? झोंपेचीं जागृति आणि स्वप्न हीं दोन कार्यें आहेत. तीं कार्यें खोटीं ठरलीं. मग त्याचें कारण खरें कसचें ? स्थूल आणि सूक्ष्म या दोन देहरूपी कार्यामुळें त्यांचें कारण अज्ञान आहे अशी कल्पना केली. तें कार्यच विचारानें खोटें ठरलें, तर त्यांचें कारण अज्ञान अनुमानिलेलें तें खरें कसचें असणार ? जेव्हां देहास आपण असें मानिलें, तेव्हां आपल्या आत्मस्वरूपाचें विस्मरण झालें असें समजावें. आतां ज्यांच्या अभिमानानें विस्मरण झालें, त्या दोन देहांचा अभिमान टाकिला म्हणजे अज्ञान रहाणार नाहीं. जसें वृक्षस्थास पाण्यांत पडल्याची भ्रांतीच वाटत नाहीं; तर त्यांस आपणाविषयींचे अज्ञान कसें राहील. तसें दोन अवस्था खोट्या ठरल्यावर अज्ञान रहाणार नाहींच, परंतु आपण अज्ञानाहून निराळा आहें हें वृत्तीला अपरोक्ष कळलें, म्हणजे तेणेंकरून दोन देह असले तरी ते मिथ्या असें वाटेल. गुरु किंवा शास्त्र यांच्या वचनावर विश्वास ठेवून दोन देह मिथ्या असें मानिलें, तरी ते मिथ्या असतां आपल्या अनुभवावांचून मिथ्या होत नाहींत तरी त्यांचें मिथ्यत्वाचा स्वानुभव जागृतींत आला पाहिजे तसेंच आपण आत्मा आहे हाही स्वानुभव आला पाहिजे. तो येईल तरच देहाचा निःशेष मीपणा जाईल.

तिहीं काळीं जें एकरूप आहे । तो आत्मा सत्य विवेकें पाहे । केव्हां असे केव्हां न राहे । तें तें मिथ्या अनात्मा॥२२॥
जागृतीमाजी जागृति खरी । तेव्हां स्वप्न झोंप नसोनि निर्धारी । सुप्ति जागर स्वप्नामाझारीं । मावळून जाती ॥ २३ ॥
सुप्तीमाजीं स्वप्नजागृति । निःशेषच हरपून जाती । तस्मात् एक होतां दोन्ही मावळती । ह्मणोनि अवस्था मिथ्या२४
आत्मा जो अस्ति भाति प्रिय । तिहीं अवस्थेंत एकला अद्वय । तस्मात् सत्य आत्मा हा निश्चय विवेकें निवडावा२५
एवं अज्जसडदुःखरूप अनात्मा । वृत्त्यादि देहांत भास जीवात्मा । आणि एक मुख्य ब्रह्मप्रत्यगात्मा । अस्तिभातिप्रियामत्क
ऐसे सत्य मिथ्या दोन्ही । यथार्थ निवडिले निरूपणीं । हेंचि विवेचन मुमुक्षूंनीं । अत्यादरें करावें ॥ २७ ॥
येथेंही रविदत्ता कोणाची । आशंका असे मंदप्रज्ञाची । तेचि अवधारी आधीं साची । पुढें उत्तर बोलूं ॥ २८ ॥
दोनचि पदार्थ निवडिले । सत्यमिथ्या हे वेगळाले । या दोहींतून अज्ञान जालें । तेंचि कवणा ॥ २९ ॥
दृष्टांतही जो दिधला । जळीं बुडे आणि वृक्षीं बैसला । हेही दोनाचि परी विस्मर जाला । वृक्षीं बैसणारा ॥ ८३० ॥
जळीं पडला तो नाहींच खरा । तेथें भाव नसे स्मरविस्मरा । तस्मात् वृक्षीं जयासी असे थारा । तोचि विसरला आपणा
तसें स्थूलादि तों हें जड असे । वृत्त्यादि चंचल पाणिया ऐसें । त्यांत प्रतिबिंब जीव हा आभासे । हें तरी मिथ्यां३२
तयासी जाणणें कोठें खरें । कीं तो मुख्य आत्मया विसरे।तस्मात् मुख्य आत्मा जो निर्विकारें।तयासीच अज्ञान॥३३॥
आत्मा आपआपणा विसरला । जीवाकडे पाहूं लागला । त्यासीच मी ह्मणून बैसला । तस्मात् अज्ञान आत्मा॥३४॥
ऐशी मंदप्रज्ञाची आशंका । येणें निर्विकारा आला झोंका । तरी याचें उत्तर सावध ऐका । जे जे श्रवणार्थी ॥ ३५ ॥
हें निरूपण उपक्रमीं । प्रांजळ केलें असें आह्मी । तथापि हा संशय अंतर्यामीं । फिटावया बोलूं ॥ ३६ ॥
वृक्षीं बैसलिया जाली विस्मृति । हे सत्य परी पहावी पुरती । पाहिली सर्वांगदेखणी दशा होती । नेत्र झांकितां कीं उघडितां
आंधारीं आपआपणा । प्रत्यक्ष जरी दिसेना । परी नखशिखांत असे देखणा । हा मी ह्मणोनी ॥ ३८ ॥
ऐसिया सामान्य देखणिया । विशेष देखणेंही बोलणें वांया । तेथें विस्मरण पडलें कैसिया । परी सांगा ॥ ३९ ॥
सामान्य नखाशिख जो देखता । तेथें नेत्र उघडोनि जाहला पाहता । तेंचि एकदेशी पाहणें खालुता । मुख्य सामान्य हें नव्हे ॥
ऐसें एकदेशी पाहणें उद्भवलें । तया पाहण्यासी विस्मरण जाहलें । हे दोन्हीही असती नाथिले । पुरुषाच्या ठायीं ॥४१॥
ऐसें एकदेशी जरी पाहतसे । परी बैसला त्याचें विस्मरण नसे । विसरेच तरी मुंगी कळतसे । स्पर्शतां ते कवणा ॥ ४२ ॥

---

येथें तिन्ही काळीं जें एक रूप तो सत्य आत्मा. व केव्हां असतो व केव्हां नसतो तो अनात्मा. मिथ्या. एका अवस्थेचे वेळीं दोन अवस्थांचा अभाव असतो, म्हणून अवस्था खोट्या. आत्मा तिन्ही काळीं अवस्थातीत अद्वयतेनें असतो म्हणून तो सत्य. असज्जड दुःखरूप जो वृक्षापासून देहापर्यंत भास तो जीवात्मा, तोच अनात्मा आहे. आणि मुख्य एक ब्रह्म प्रत्यगात्मा. याप्रमाणें दोन सत्य मिथ्या पदार्थ निरूपणाचे योगानें निवडले हेंच विवेचन मुमुक्षूनें मोठ्या प्रीतीनें करावें.

**शंका**––सत्यमिथ्या असे वेगळाले दोनच पदार्थ निवडिले यांत अज्ञान कोणास झालें ? वृक्षावर बसणारा व पाण्यांत दिसणारा हे दोनच. यांत वृक्षावर बसणारास विस्मरण झालें; जो पाण्यांत पडलेला तो खरा नाहींच; म्हणून त्यास स्मरण किंवा विस्मरण हीं दोन्हीही नाहींत. तेव्हां जो वृक्षावर बसलेला आहे तोच आपणास विसरला. तसें स्थूलदेह जड आहे. वृत्ती आदिकरून चंचल पाण्यासारखी, त्यांत प्रतिबिंबित जो जीव, हा मिथ्या. त्याचें जाणणें खरें नाहीं, म्हणून तो मुख्य आत्म्यास विसरत नाहीं. तेव्हां हें अज्ञान मुख्य निर्विकारी आत्म्यासच झालें. आत्मा आपल्यास विसरला आणि जीवाकडे पाहून म्हणतो कीं, मी जीव आहें, यावरून आत्म्यासच अज्ञान झालें.

**उत्तर**––वृक्षावर बसणारास विस्मृति झाली खरी, परंतु प्रथम सर्वांगदेखणी दशा होती ती डोळे उघडल्यावर किंवा मिटल्यावर काळोखांत आपल्याला जरी प्रत्यक्ष पहात नाहीं, तरी नखापासून शेंडीपर्यंत हा मी असें आपणास जाणतो. अशा सामान्य पहाणान्यास विशेष पहाणें हें बोलणें व्यर्थ आहे. मग त्यास विस्मरण कसें पडेल. नखशिखांत आपणास जाणणें हें सामान्य पहाणें. व डोळे उघडून जें पहाणें तें विशेष पहाणें. अशा एकदेशी पहाण्यास विस्मरण झालें. स्मरण व विस्मरण हीं दोन्हीही पुरुषाचे ठायीं खोटीं आहेत. वृक्षस्थ एकदेशी पहात असला तरी आपण जो बसलेला त्याचें विस्मरण नाहीं. जर विस्मरण असतें तर मुंगी चावली असतां ती कोणास कळते.

मी पडलों मज काढा म्हणे । विसरे तरी केवीं होय बोलणें । तस्मात् सर्वांगीं जें असे देखणें । तया लोप नाहीं ॥ ४३ ॥
तस्मात् सामान्य देखणेंदशेसी । विकार नव्हे निश्चयेंसी । आणि जळीं ही पडलियासी । स्मर ना विस्मर ॥ ४४ ॥
मध्येंच तिसरें जालें उत्पन्न । तेंचि कीं पडणारासी कारण । हाचि दृष्टांत तेवीं द्राष्टांत समान । विचारें पहावा ॥ ४५ ॥
किंचित वृत्तीचें स्फुरण नसतां । वृत्ति अभावाचा जो जाणता । तेथें ज्ञान कीं अज्ञान वार्ता । लावी कवणा ॥ ४६ ॥
तेथें न होऊन स्फुरण जालें । जैसे रज्जूवरी सर्प उमटले । तेचि माया तयें नाथिले । पण अनादि ॥ ४७ ॥
निर्विकार जो सामान्य देखणा । जैसा तैसा परिपूर्णपणा । त्या अनंतरूपी माया स्फुरणा । उद्भव जाला ॥ ४८ ॥
जितुकें स्वरूप सच्चिद्धन । तितकें जरी होतें स्फुरण । तरी हें स्वरूपाचें लक्षण । म्हणों येतें ॥ ४९ ॥
समुद्रामध्यें जैशी राई । इतुकी स्फूर्तीची असे नवाई । तेही वंध्यापुत्राची आई । जाहली ना होणार पुढें ॥ ८५० ॥
एकेकाहून दशगुणें वाड । सप्तावरणात्मक हें ब्रह्मांड । येवढें विस्तीर्ण तें असे झाड । या मायाबीजाचें ॥ ५१ ॥
येवढी विस्तीर्ण जे पृथ्वी । उदकाचे एकदेशीं जाणावी । तिच्याही दशगुणें बोळखावी । ब्रह्मांडरचना ॥ ५२ ॥
त्यामाजीं स्वर्ग मृत्यु पातळ । वसिन्नले हे सकळ । अवघा मिळून हा भूगोळ । सप्तद्वीप असे ॥ ५३ ॥
त्या द्वीपामाजीं जंबुद्वीप । त्यांत नवखंडें अल्प अल्प । त्यांत भरतखंडामाजीं जल्प । नाना ग्रामें पुरें ॥ ५४ ॥
त्यांत एका ग्रामा एक घर । त्या घरायेवढेंही नाहीं शरीर । तया शरीरीं उमटला प्रकार । स्फूर्तिविकाराचा ॥ ५५ ॥
हें असो देह मानवाचा । परी अत्यंत सान जो कीटकाचा । त्यांतही विकार या वृत्तीचा । उमटे इतुकाची ॥ ५६ ॥
एवं स्फूर्ति ब्रह्मादिकांपासून । कीटकांत विभागली संपूर्ण । तितुक्याचि देहासी मी म्हणून । बैसली असे ॥ ५७ ॥
एवं स्फूर्तीचा सानपणा ऐसा । स्वरूपाचे एकदेशीं अल्पसा । तेथेंचि ज्ञानाज्ञानाचा ठसा । उमटला असे ॥ ५८ ॥
ब्रह्मात्मयाचें स्वरूप केव्हडें । कीं जयाच्या एकेदेशीं ब्रह्मांडें । आकाशही जेथें बापुडें । समुद्रीं राई ॥ ५९ ॥
जयाचा अंताचि नलगे किती । शेवटचि नाहीं जयाप्रति । पुरी समजावया दृष्टांतीं । कांहींसें आकाश ॥ ८६० ॥
आकाशाचाही अंत न लगे । तैसाचि ब्रह्मात्मा निजांगें । गगनावीण नसती रिते जागे । तेवीं आत्मा सघन ॥ ६१ ॥
परी आत्मा असे ज्ञानघन । आकाश शब्दगुणीं अज्ञान । म्हणोनि भेद हा भिन्नभिन्न । स्वरूप गगनांचा ॥ ६२ ॥

---

मी पडलों, मला काढा, असें म्हणतो; तो जर आपणास विसरता तर काढा असें त्यास बोलतांच आलें नसतें. ज्यापेक्षां बोलतो, त्यापेक्षां सर्वांग देखण्यास ( देखणेदशेस ) लोप नाहीं व विकारही नाहीं. तसेंच पाण्यांत पडलेल्यास स्मरण नाहीं व विस्मरणही नाहीं. मध्येंच तिसरें उत्पन्न झालें. तेंच पडणारास कारण आहे. ज्यास वृत्तीचें स्फुरण नसतां वृत्तीचा अभाव जाणणारा त्यास, सज्ञान किंवा अज्ञान कोण म्हणेल ? त्या आत्म्याचे ठायीं न होऊन स्फुरण झालें तेंच माया. हें स्फुरण दोरीचे ठायीं सर्प दिसावे त्याप्रमाणें खोटें उत्पन्न झालें. जेवढें स्वरूप तेवढें स्फुरण झालें असतें तर त्यास स्वरूपच म्हटलें असतें. समुद्रांत जशी मोहरी तशी स्वरुपाचे ठायीं माया, ती ही वंध्यापुत्राचे आईप्रमाणें मिथ्या, जी झाली नाहीं व पुढें होणार नाहीं. तीच माया.

एकेकापेक्षां दसपट असें सप्तावर ब्रह्मांड, हें मायाबीजाचें झाड एवढी ही पृथ्वी पाण्याचे एकदेशी आहे. अशा पृथ्वीच्या दसपट ब्रह्मांड रचना आहे. त्यांत स्वर्ग मृत्यु, पाताळ सर्व वसलेले आहेत. वासकट हा भूगोल सप्तद्वीप आहे. त्या द्वीपांत एक जंबुद्वीप आहे. त्या जंबुद्वीपांत लहान लहान नऊ खंडें आहेत. त्या नऊ खंडांपैकीं भरत खंडांत लहान लहान शहरें व गांवें आहेत. त्या गांवांपैकीं एका गावीं एक घर, त्या घराएवढेंही शरीर नाहीं. अशा शरीरांत स्फूर्तिरूप विकाराचा प्रकार उत्पन्न झाला. हें असो. मनुष्याचे देहापेक्षां किड्याचा देह लहान, त्यांतही तितकीच वृत्ती उत्पन्न होते. याप्रमाणें स्फूर्ति ब्रह्मदेवापासून किड्यापर्यंत विभागलेली आहे. ती तितक्याच देहास मी मानून बसली. याप्रमाणें स्फूर्तीचा लहानपणा स्वरूपाचे एकदेशीं आहे. त्यांतच ज्ञान अज्ञान उत्पन्न झालें.

ब्रह्मात्म्याचें स्वरूप इतकें मोठें आहे कीं, आकाशही त्याचे ठायीं समुद्रांत मोहरी इतपत आहे. स्वरूपाचा अंतच लागत नाहीं. परंतु आकाशाचे दृष्टांतानें समजावें कीं, आकाशाप्रमाणें तें व्याप्त आहे. जशी आकाशावांचून रिकामी जागा नाहीं, तसा तो परिपूर्ण भरलेला आहे. आत्मा ज्ञानघन आहे. आकाश शब्दगुणी अज्ञान आहे. म्हणून आत्मा आणि आकाश यांत फरक आहे.

आकाशीं पोकळपणा वसे । स्वरूप सघन भरलें असे । आकाश अवकाशरूप भासे । निराभास ब्रह्म ॥ ६३ ॥
परी आकाशाचा पोकळपणा । वाउगी करीतसे कल्पना । दृष्टीसी बैसले पदार्थ नाना । ते ते घन वाटती ॥ ६४ ॥
इकडे तिकडे पदार्थ असे । मध्यें भावी कांहीं नसे । उगाचि पोकळपणा दिसे । परी तें पोकळ न ह्मणावें ॥ ६५ ॥
आकाश जरी कोठें नसावें । तरी पोकळ ऐसें ह्मणों यावें । सर्वव्यापक असतां स्वभावें । अवकाश कैंचा ॥ ६६ ॥
तस्मात् आकाशही व्यापक पूर्ण । तैसाचि ब्रह्मात्मा सघन । दोहींचा अंत पाहणें । कवणा न घडे ॥ ६७ ॥
आकाशीं गड एक निर्मिला । त्यांतही अवकाश सांठवला । बाहेरी तो किती अंत लागला । न वचे कवणा ॥ ६८॥
तैसाचि ब्रह्मात्मा परिपूर्ण । त्यामाजीं ब्रह्मांड झालें निर्माण । त्या ब्रह्मांडीं आत्मा हा सघन । बाह्य तो अमर्याद ६९
मठउपाधीमुळें गगना । आंत बाहेरी जाहली कल्पना । गगनामाजीं गडाची रचना । तया मठीं आकाश ॥ ८७० ॥
तैशीच ब्रह्मांड उपाधि जाहली । त्यास्तव अंतर्बाह्य कल्पना केली । ब्रह्मीं ब्रह्मांडरचना उद्भवली । ब्रह्मांडीं ब्रह्म ॥ ७१ ॥
मठामाजीं घट भिन्न भिन्न । त्या घटा आंत बाहेर गगन । आकाशामाजीं घट तोही पूर्ण । गगनें भरिला ॥ ७२ ॥
तैसें ब्रह्मांडीं नाना पिंड । त्या आंत बाहेरी आत्मा वाड । आत्मयामाजीं देहाचा पवाड । कीं देहीं आत्मा ॥ ७३ ॥
जो ब्रह्मांडीं तोचि पिंडीं असे । येकचि घटीं मठींही आकाश जैसें । राईसम स्थळ रितें नसे । आत्मया गगनाविण ॥७४॥
पाहें पाहें रविदृत्ता येवढा । आत्मा सघन पूर्ण उघडा । त्यांत देहाचा साकार बापुडा । त्यामाजीं ते स्फूर्ति ॥ ७५ ॥
इतुकी सानसी हे वृत्ति । सर्व जगातें जाली कल्पिती । म्हणोनि हेंचि कारण सर्वांप्रती । इसीच माया हें नाम ॥ ७६ ॥
इचा सानपणा तरी येवढा । परी उठतां गवसणी घाली ब्रह्मांडा । परंतु ब्रह्मात्मा जो किती उघडा । इसी जाणवेना ७७
तो जाणे यया स्फुरणासी । परी हे न जाणे बापुडी तयासी । इचिया आद्यमध्यअवसानासी । स्वप्रकाशें जाणे ॥७८॥
जेधवां हे उत्पन्न नव्हती । तेधवां स्वप्रकाश चिन्मूर्ति । ज्ञान कीं अज्ञान नसतां चित्तीं । स्वसंवेद्य असे ॥ ७९ ॥
तोचि अविनाश ज्ञानघन । आनंद अनंत परिपूर्ण । तयाचें यथार्थ केलें निरूपण । तुज यथामति मार्गां ॥ ८८० ॥
तो आत्माचि असे अज्ञान । मानीत असती मूर्ख जन । तयाचें व्हावया निरसन । बोलणें लागे ॥ ८१ ॥
ब्रह्मात्मा कैसा किती केवढा । तयाचा साकल्य जाला निवाडा । वृत्त्यादि देहांत हा बापुडा । उद्भवही कळला ॥ ८२ ॥
आतां ज्ञान अज्ञान हें कवणासी । बोलिजेत आहे निश्चयेंसी । जें कां मायास्फुरण एकदेशी । तेथेंचि हे दोन्ही ॥ ८३ ॥
स्फुरण होतांचि हें सहजीं । ब्रह्मात्मा व्यापून आला त्यामाजीं । तोचि जाणता आणि हे दुजी । स्फूर्ति चंचळ ॥ ८४ ॥

---

आकाश पोकळ, आत्मा घनदाट, आकाश अवकाशरूप भासते, ब्रह्म निराभास. आपणास जे पदार्थ दिसतात ते घन वाटतात, म्हणून आपण आकाश पोकळ म्हणतों. ह्या आंगाला त्या आंगाला पदार्थ असले म्हणजे मध्यें कांहीं नाहींसें भावून पोकळपणा मानितों. परंतु आकाश पोकळ नाहीं. आकाश जर कोठें नसतें तर त्यास पोकळ म्हणतां आलें असतें. जें सर्व व्यापक आहे त्यास अवकाश कोठचा? त्यास अवकाश नाहीं म्हणून आकाश पूर्ण व्यापक. तसाच ब्रह्मात्मा सघन. आकाश व आत्मा या दोघांचा अंत पहातां येत नाहीं. आकाशांत पर्वताची कल्पना केली. त्यांत अवकाश आहे. त्याखेरीज बाहेर किती अवकाश आहे याचा अंतच लागत नाहीं. तसा ब्रह्मात्मा परिपूर्ण. त्यांत एक ब्रह्मांड उत्पन्न झालें, त्या ब्रह्मांडांत आत्मा भरलेला असून बाहेर अमर्याद उरलेला आहे. आकाशांत मठ. उपाधीमुळें आकाश आंत बाहेर आहे असें बोलतां आलें. आकाशामध्यें गड. त्या गडांत मठ. त्या मठांत आकाश. तशी ब्रह्मांत ब्रह्मांड उपाधि झाली, म्हणून आंत बाहेर ही कल्पना केली. ब्रह्माचे ठायीं ब्रह्मांडरचना किंवा ब्रह्मांडांत ब्रह्म, मठामध्यें जसे निरनिराळे घट त्या घटाचे आंत बाहेर आकाश, आकाशामध्यें घट हा आकाशानें भरलेला; तसें ब्रह्मांडांत अनेक पिंड त्या पिंडांच्या आंत बाहेर आत्मा आहे. देहीं आत्मा किंवा आत्म्यांत देह. जो ब्रह्मांडीं तोच पिंडीं. जसें घटांत व मठांत आकाश एक त्यावांचून मोहरी इतकें रितें स्थळ नाहीं. एवढा मोठा आत्मा त्यांत साकार देह. त्या देहांत स्फूर्ति, अर्थात स्फूर्ति लहानच आहे, तरीही ती सर्व जगाची कल्पना करिती झाली. म्हणून सर्वांच्या उत्पत्तीस हीच कारण झाली. हिलाच माया म्हणतात. ही एवढी लहान असतां ब्रह्मांडास गवसणी घालिते. तरी ब्रह्मात्मा किती केवढा हें तिला जाणवत नाहीं. तो इला जाणतो. तसेंच हिची उत्पत्ति स्थिति लय तोच जाणतो. जेव्हां ही उत्पन्न नव्हती तेव्हां हा ज्ञानी किंवा अज्ञान नसतां स्वप्रकाश चिन्मूर्ति आत्मा होता. आतां ज्ञान अज्ञान हें कोणाला लावावें? माया स्फुरण त्याला. हें ज्ञानअज्ञान स्फुरण झाल्याबरोबर त्यांत ब्रह्मात्मा आला. तो स्फुरणांत सांपडलेला ब्रह्मात्मा जाणता. व स्फूर्ति ही चंचळ.

सर्वांग जो असे देखणा । तो जाणेचि उठतां स्फुरणां । परी त्या जाणणिया आणि चळणा । उत्पत्ति नाश आहे॥ ८५ ॥
म्हणोनि तें शबलब्रह्म म्हणावें । प्रकृति पुरुष हीं याचीं नांवें । चंचलत्व तें प्रकृतिरूप जाणावें । जाणणें तो पुरुष ॥८६॥
हेंचि शिवशक्ति सविशेष । अर्धनारीनटेश्वर विशेष । या उभयांचा परस्परें संतोष । आणि साह्य एकमेकां ॥ ८७ ॥
ऐशी द्विविध रूपें एक स्फूर्ति । ज्ञान अज्ञान आलें तिजप्रति । इकडे स्फुरणा जाणे सहजगति । हेंचि ज्ञान ॥ ८८ ॥
स्फुरणा इतुकेंचि जाणणें उठिलें । तयासीच ज्ञान ऐसें बोलिलें । याविरहित जें पूर्ण संचलें । तें जाणिलें नाहीं ॥ ८९ ॥
तया न जाणणिया नांव अज्ञान । स्फुरण जाणिलें तेंचि ज्ञान । जोंवरी हे दोन्ही न होती उत्पन्न । तों काल ज्ञाता ना अज्ञाता
इकडे कळणें उद्भवतां स्फुरणाचें । तिकडे न कळणें होय स्वस्वरूपाचें । तस्मात् एका स्फुर्तीमुळें उभयांचे । विकार जाहले
तेथून जें जें उत्पन्न जालें । तें तें जड चंचल नाचिलें । स्फुरणा अधिष्ठान जें संचलें । तें सत्य निर्विकारी ॥ ९२ ॥
या उभयांसी ज्ञान ना अज्ञान । तस्मात् मध्यें स्फूर्तीसी हे दोन । तेंचि या सर्व जगासी कारण । सत्य सत्य त्रिवाचा
ज्ञान हा विकार वृत्तीचा । तैसा उद्भव हा न कळणियाचा । स्वरूपीं विकारचि नसतां ज्ञानाचा । मा अज्ञान कासयाचें
आत्मत्वीं अज्ञानचि असतें । तरी सुषुप्तींत नेणीव केवीं प्रकाशितें । लय साक्षित्वें अनुभवितें । हें निरोपिलें मागां ॥ ९५ ॥
तस्मात् आत्मा जाणता ना नेणता । ज्ञानघन उभयांपरता । ज्ञातता आणि दुजी अज्ञातता । एका वृत्तीसी दोन्ही ॥९६॥
असो स्फूर्तीचें जें जाणणें । तेंचि ज्ञानविद्या ही म्हणणें । तेचि विक्षेपशक्तीचीं लक्षणें । निमित्त कारण तेंचि ॥ ९७ ॥
तयेमध्यें शुद्ध जाणणें आलें । तेंचि प्रतिबिंबरूपें कल्पिलें । तयासी ईश नाम ठेविलें । नियंतृत्व सर्वांचें ॥ ९८ ॥
स्फुरणामाजीं जे नेणीव । न कळे स्वस्वरूप स्वयमेव । तेचि अविद्या अज्ञानही नांव । आणि आवरणशक्ति ॥ ९९ ॥
तयामाजीं जाणणें आलें । त्या प्रतिबिंबा जीव नांव ठेविलें । तेंचि सुखदुःखा भोगूं लागलें । तेव्हां जन्मे मरे ॥ १०० ॥
एवं मुळीं जे अहंब्रह्मस्फूर्ति । ते स्वरूपातें जाली विसरती । येथेंही कोणी शंका करिती । कीं ईश सर्वज्ञ कैसा ॥ १ ॥
जरी नेणणें मूळपुरुषासी । तरी ईशासी सर्वज्ञता कैशी । तरी तुसधी विद्या उपाधि जयासी । तेणें जाणें सर्वांतें ॥ २ ॥
स्फुरणापासून जें जें जालें । ब्रह्मादि तृणांत उद्भवलें । तें तें जाणें ईक्षणें आपुलें । म्हणोनि सर्वज्ञ ॥ ३ ॥
न जाणणें जें कां ब्रह्मीचें । तें तों सर्वपणांत नवचे । त्याविरहित होणें जितुकियाचें । जाणणें घडे ॥ ४ ॥
मागुतीं म्हणसी ब्रह्म आसिकें । ईशासी न कळे निकें । तरी जीव केवीं जाणे कौतुकें । तरी अवधारीं ॥ ५ ॥

---

सर्वांग देखणा आत्मा. तो स्फुरण उठतांच त्यास जाणतो, परंतु त्या जाणण्यास व स्फूर्तीच्या चळणास उत्पत्ती नाश आहे, म्हणून त्यास शबलब्रह्म म्हणावें. यालाच प्रकृतिपुरुष म्हणतात. चंचलपणा ती प्रकृति व जाणतेपणा तो पुरुष. यालाच अर्धनारी नटेश्वर म्हणतात व यालाच शिवशक्ति म्हणतात.

प्रकृतिपुरुष या दोघांचा परस्पर संतोष व हीं एकमेकांस साह्यही आहेत. याप्रमाणें दोन प्रकारची एक स्फूर्ति तिच्यांत ज्ञान-अज्ञान आलें. ती स्फुरणास जाणते हेंच ज्ञान. हें जाणणें स्फुरणाइतकेंच उत्पन्न झालें, यास ज्ञान म्हणतात. स्फुरणाखेरीज जें राहिलें त्यास जाणिलें नाहीं, त्या न जाणण्यास अज्ञान म्हणतात. जोंपर्यंत हीं दोन्ही नव्हतीं तोंपर्यंत ज्ञाता नाहीं व अज्ञाता नाहीं. स्फुरणाचें कळणें उत्पन्न झाल्याबरोबर स्वरूपाचें न कळणें उत्पन्न झालें, म्हणून एका स्फूर्तीमुळें दोन विकार झाले. स्फुरणापासून जें जें झालें तेंच जड, चंचल, खोटें. स्फुरण ज्यावर उत्पन्न झालें, तो निर्विकारी सत्य आत्मा होय. अनात्म्यास ज्ञान व अज्ञान हीं दोन्हीही नाहींत, तर हीं स्फूर्तीस आहेत. हीं जगउत्पत्तीस कारण आहेत. वृत्तीचे ज्ञान अज्ञान हे विकार आहेत. स्वरूपीं ज्ञानाचा विकार नाहीं, मग अज्ञानाचा विकार कोठून असेल? आत्म्याचे ठायीं अज्ञान असतें त्यानें झोंपेंत नेणीव कशी प्रकाशिली असती? आत्मा नेणीव प्रकाशितो किंवा नाहीं हें मागें लयसाक्षित्वें अनुभवणारा कोण असें दाखविलें आहे. म्हणून आत्मा जाणता ना नेणता. तो या दोहोंहून विलक्षण आहे म्हणून ज्ञातता व अज्ञातता हे एका वृत्तीचे विकार होत. स्फूर्तीचें जाणणें तेंच ज्ञान. तीच विद्या. तीसच विक्षेपशक्ति म्हणतात. तेंच निमित्त कारण. वृत्तींत शुद्ध जाणण्याचें जें प्रतिबिंब त्यास ईश्वर म्हणतात. हा सर्वांचा नियंता आहे. स्फुरणामध्यें जी नेणीव, म्हणजे स्वरूपाचें न कळणें तेंच अज्ञान. तीच अविद्या. तीच आवरणशक्ति. या शक्तींत जें शुद्ध जाणणें प्रतिबिंबलें त्यास जीव म्हणतात. तोच सुखदुःख भोक्ता म्हणून तो जन्मतो आणि मरतो. वर सांगितल्या प्रकारची जी मूळ स्फूर्ति तीच स्वरूपाला विसरली.

शंका—जर मूळ पुरुषासच अज्ञान आहे तर ईश्वर सर्वज्ञ कसा होईल? विद्या उपाधीमुळें ईश्वर सर्वांस—म्हणजे स्फुरणापासून ब्रह्मादि तृणापर्यंत उत्पन्न झालेल्यास—आपल्या ईक्षणानें जाणतो म्हणून तो सर्वज्ञ. ब्रह्मीचें न जाणणें हें सर्वज्ञपणांत येत नाहीं. याखेरीज जें जें होतें तें जाणतां येतें. पुन्हां म्हणतोस कीं, ब्रह्म पूर्ण आहे तें ईश्वरास कळत नाहीं, मग जीव कसा जाणेल?

स्फुरणापासून जे त्रिगुण । त्या त्रिगुणांचे अंशें ईशान । देह धरिता जाला आपण । मानसिक साकार ॥ ६ ॥
पुढें चारी खाणीही होती । पांचवी मानसिक योनी निश्चित्ती । एवं जे जे देवादि कीटकांत उद्भूति । इतुकीही साकार
इतुक्याही आकारीं प्रवेश । जीवरूपें करी ईश । तेव्हां ज्ञानाज्ञान हें विशेष । प्रगटतें जालें ॥ ८ ॥
विष्णु सदाशिव हे दोन्ही । तेथें अज्ञान नसे निपटूनी । स्वस्वरूपज्ञान ऐक्यपाणी । अपसयाची जाहलें ॥ ९ ॥
नाहीं गुरु ना सच्छास्त्र । उत्पन्न होतांचि स्वरूप निर्धार । होता जाला कीं निर्विकार । अहंब्रह्मास्मिरूपें ॥ १० ॥
ऐसें स्वयेंचि ज्ञान जालें । किंचित् नेणणें तें निपटून गेलें । तयासी नित्यमुक्त असें बोलिलें । सृष्ट्यादिही व्यापारीं ॥११॥
पुढें गुरुमुखें एकमेकां । ज्ञानानुभूति निश्चयात्मका । प्रगटती जाली तया कौतुका । जीवन्मुक्ति नाम ॥ १२ ॥
तस्मात् जो कोणी विचारवंत । गुरुमुखें ज्ञान आकळित । तयाचें अज्ञान सर्व नासत । ब्रह्मात्मत्वीं । ऐक्य पावे ॥ १३ ॥
जया वृत्तीसी अज्ञान आलें । तया वृत्तीसीच ज्ञान उद्भवलें । त्या दोन्हीसहित स्फुरण मावळलें । पुढें अभिन्नता ऐशी १४
कोणताही पदार्थ पाहतां । आरंभीं त्याची अज्ञातता । तो अमुक ऐसा वृत्तीसी कळतां । अज्ञान नासे ॥ १५ ॥
अज्ञान नासून ज्ञान जालें । तेंही ज्ञान स्फूर्तिरूप मावळलें । पुढें पदार्थमात्र स्वयें उरलें । हा स्वभावचि वृत्तिचा॥१६॥
तैशी गुरुमुखें बहिर्मुखता । वृत्तीची मोडून तत्त्वतां । होय जेव्हां स्वरूपाकारता । अंतर्मुखत्वें ॥ १७ ॥
तेव्हां निजरूपाचें अज्ञान । फिटोन वृत्तीसी होय ज्ञान । ते ज्ञानस्फूर्तीही मावळून । केवळ ब्रह्मात्मा उरे ॥ १८ ॥
यासीच बोलिजे अभिन्नता । हेचि बापा जीवन्मुक्तता । तस्मात् जीवही पावे अपरोक्षता । तेथें संदेह नाहीं ॥ १९ ॥
एकदां सांगतां नाहीं कळलें । तरी वारंवार पाहिजे श्रवण केलें । तैसेंचि मनन निदिध्यासन आपुलें । केलेंचि पुन्हां करावें
याचि हेतु अतिप्रयत्नेंशीं । अभ्यासावें दिवा कीं निशीं । मागें बोलिलों आह्मीं तुजसीं । तस्मात् मुमुक्षें यत्न करावा
ऐसें गुरुमुखें वचन ऐकतां । रविदत्त घाली दंडवता । अति सप्रेमें झाला विनविता । जी जी ताता सद्गुरु ॥ २२ ॥
अहो धन्य मी सर्व उपेक्षून । श्रीचरणा आलों शरण । आतां कृतकृत्य जालों हें अप्रमाण । न घडे कल्पांतीं ॥ २३ ॥
कामधेनूचें वासरूं । भुकेलें न राहे निर्धारु । तेवीं मज बोळलासी सद्गुरु । आतां सांकडें काय ॥ २४ ॥
मी जरी मंदप्रज्ञ असे । तरी वारंवार श्रवण अभ्यासें । ऐक्यता पावेन कृपेसरिसें । मज चिंता कासया ॥ २५ ॥
मज पुसावें काय न पुसावें । हेंहीं कळेना स्वभावें । परी गुरुमायेनें लेवावें । अपत्या वाक्यनगें ॥ २६ ॥
तथापि आर्षपणें तें लेंकरूं । छंद घे भलताचि अलंकारू । भलते स्थानीं परिकरू । लेववीं ह्मणे ॥ २७ ॥
तें स्थान नव्हे त्या नगाचें । परी जननीस कौतुक बाळाचें । तेवीं माझिये आर्षप्रश्नाचें । कोडें पुरवावें ॥ २८ ॥

---

**उत्तर**—स्फुरणापासून त्रिगुण झाले. त्या त्रिगुण अंशानें ईश्वर मानसिक साकार देह धरिता झाला. पुढें चार खाणी व पांचवी मानसिक योनी याप्रमाणें देवापासून किड्यापर्यंत जी उत्पत्ति तितकी साकार झाली. इतक्या आकारांत ईश जीवरूपानें प्रवेश करितो. तेव्हां विशेष ज्ञानअज्ञान प्रगटलें. विष्णु आणि शंकर स्वस्वरूपज्ञानाचे ऐक्यपणानें आपोआपच झाले. त्यांस गुरु किंवा सच्छास्त्र नसतां ते उत्पन्न झाल्याबरोबर त्यांस अहंब्रह्मास्मि रूपानें निर्विकारस्वरूप निर्धार झाला. याप्रमाणें ते ज्ञानवान् होते. त्यांचें किंचित् नेणणें होतें तें निःशेष गेलें. मग तें सृष्टि आदिकरून व्यापार करीत होते, तरी त्यांस नित्यमुक्त म्हणतात. पुढें त्यांस एकमेकांच्या गुरुमुखानें निश्चयात्मक ज्ञानाचा अनुभव झाला. त्यास जीवनमुक्ति म्हणतात. याकरितां जो विचारवंत गुरुमुखानें ज्ञान प्राप्त करून घेतो त्याचें सर्व अज्ञान नासून ब्रह्माशीं ऐक्य होतें. ज्या वृत्तीस अज्ञान आलें त्याच वृत्तीस ज्ञान झालें. ज्ञानअज्ञानासह स्फुरण मावळलें म्हणजे पुढें अभिन्नता उरते.

कोणताही पदार्थ पाहिला असतां प्रथमतः त्याची अज्ञातता असते. ते अमुक असें वृत्तीस कळल्यावर अज्ञान नासतें. पुढें अज्ञान नासून ज्ञान होतें. तें स्फूर्तीरूपज्ञान मावळतें. मग पदार्थमात्र उरतात. हा वृत्तीचा स्वभाव आहे. तशी गुरुमुखानें वृत्तीची बहीर्मुखता मोडून स्वरूपाकार अंतर्मुखता जेव्हां होते, तेव्हां निजरूपाचें अज्ञान जाऊन वृत्तीस ज्ञान होतें. ती ज्ञानस्फूर्ति मावळून केवळ ब्रह्मात्मा उरतो. यालाच अभिन्नता म्हणतात. हिलाच जीवनमुक्ति म्हणतात. म्हणून जीव अपरोक्षता पावतो, याविषयीं संशय नाहीं. हें निरूपण एकदां सांगितल्यानें कळलें नाहीं तर वारंवार ऐकावें. तसेंच मनन व निदिध्यासन वारंवार करावें. मुमुक्षूनें रात्रंदिवस यत्नानें अभ्यास करावा.

जागृति नाहीं स्वप्नाआंत । स्वप्न नसे सुषुप्तींत । तेवींच सुषुप्तिही नसे दोहींत । तेव्हां अवस्था मिथ्या ॥ २९ ॥
अस्ति भाति प्रिय आत्मा । याची तिहीं अवस्थेंत गरिमा । तोचि सत्य या रूपनामा वास्तवपणा नसे ॥ १३० ॥
जागृतींत अथवा स्वप्नामाजीं । आत्मा ज्ञानघन असे सहजीं । परी विशेषत्वें जें वृत्ति दुजी । ते आच्छादि सामान्या
सुषुप्तींत जरी सामान्य प्रगटे । वृत्तींचें विशेषत्व वोहटे । परी अनुभवासी न भेटे । प्रत्यक्ष वृत्तीसी ॥ ३२ ॥
वृत्तीसी न कळतां सघन । केवीं जाईल हें अज्ञान । भ्रांतीच न फिटतां अन्यथा भान । न जाय सहसा ॥ ३३ ॥
एवं जागर स्वप्नीं विशेषामुळें । सच्चिदानंद वृत्तीसी न कळे । सुप्तींत तों स्वानुभवाचे डोळे । असून अनुपयोग ॥ ३४ ॥
तस्मात् सच्चिद्घन आत्मयाचें । वृत्तीसी ज्ञान केधवां साचें । होय यया बरळ प्रश्नाचें । सांकडे फेडावें जी ॥ ३५ ॥
ऐशी रविदत्ताची ऐकतां वाणी । स्वामीसी अति हर्ष जाला मनीं । ह्मणती भला अससी अवधानी । प्रश्नही करिसी नेटका
आतां असावें सावधान । जागृतीमाजीं सच्चिद्घन । दाखवूं ऐकावें निरूपण । एकाग्रभावें ॥ ३७ ॥

## जागरेपि धियस्तूष्णीं भावः शुद्धेन भास्यते ॥

जागृति कालींही उगें असतां । गुणादि विकार किंचित् नसतां । आत्मस्वरूप सामान्यता । शुद्धभावें भासे ॥ ३८ ॥
परी गुणाचे विकार समजावे । जे किमपि जेथें नसावे । तरीच उगेपणाचें रूप फावे । उदासवृत्ति नामें ॥ ३९ ॥
सत्व रज तम तिन्ही गुण । यांचें अंतःकरणीं आरोहण । होतां भाव होती भिन्न भिन्न । एकल्या वृत्तीसी ॥ १४० ॥
परी एक येतां दोन जाती । तिहींची एकत्र नसे वस्ती । जेवीं दोन खालीं एक वरती । कांटे सराटियाचे ॥ ४१ ॥
तेवीं सत्वगुण उभयतां । रजतमा तळवटी खालुता । रजचि जेव्हां उदया येतां । तम सत्वा उठों नेदी ॥ ४२ ॥
तम जेव्हां येतां उदया । उद्भवूं नेदी यया उभयां । ऐसे गुणाचे स्वभाव वृत्तीचिया । ठायीं असती ॥ ४३ ॥
तया तिहींचे स्वभाव तीन । भिन्न भिन्न तिहींचें लक्षण । घोर मूढ शांत विचक्षण । विवंचून पाहती ॥ ४४ ॥
घोर म्हणजे रजाची वृत्ति । मूढ तेचि तयाची गति । सत्वगुणाची असे शांति । परी विकाररूपें ॥ ४५ ॥
त्यांत घोरवृत्तीचे विकार । बोलिजताति सविस्तर । येणेंचि जन्ममरण वेरझार । जीवाची न चुके ॥ ४६ ॥
अमुक पदार्थ मज असावा । अप्राप्त तो प्राप्त व्हावा । दृष्ट श्रुत तो यत्नें साधावा । या इच्छा नांवीं काम ॥ ४७ ॥
त्यासी प्रतिबंध जेणें केला । मग तो असो थोर धाकुला । परी तो वैरी वधीन पहिला । या नांव क्रोध ॥ ४८ ॥
प्रारब्धें प्राप्त जे जे विषय । यांचा कधींही न व्हावा क्षय । अति आवडीनें करी संचय । या नांव लोभ ॥ ४९ ॥
ऐसे हे काम क्रोध लोभ तिन्ही । जीवासी व्याघ्राचि अविद्यारानीं । बळें घोळसून जन्ममरणीं । कल्पांत बंधनीं घालिती

---

जागृतींत किंवा स्वप्नांत सामान्य प्रकाशक आत्मा आहे. परंतु विशेषें प्रकाशणारी जी दुसरी वृत्ती ती त्या प्रकाशास आच्छादिते. झोंपेंत विशेष प्रकाश नसतां सामान्य प्रकाश आहे, परंतु त्याचा वृत्तिस अनुभव नाहीं. जोंपर्यंत वृत्तीस अनुभव नाहीं, तोंपर्यंत अज्ञान कसें जाईल? भ्रांति फिटल्यावांचून अन्यथा भान जात नाहीं. याप्रमाणें जागृति आणि स्वप्न या दोन अवस्थेंत विशेषामुळें आत्मा वृत्तीस कळत नाहीं. झोंपेंत स्वानुभवाचे डोळे आहेत परंतु ते असून निरुपयोगी; म्हणून तिन्ही अवस्थेंत वृत्तीस आत्म्याचा अनुभव नाहीं, तर तो केव्हां होईल? असा प्रश्न येतो. जागृत अवस्थेंत स्तब्ध रहातां किंचित् गुणादि विकार नसतां-सामान्यता आत्मस्वरूप शुद्ध भावानें असतें. जिला उगेपणा किंवा उदासवृत्ति म्हणतात ती गुणाचे विकार नसतां साधते. म्हणून अगोदर गुणाचे विकार सांगतोंः सत्व, रज, तम हे गुण अंतःकरणांत आले म्हणजे एका वृत्तीचे भिन्न भिन्न भाव होतात. एक गुण आल्यावर दोन जातात, (दोन गुण कमी पडतात) त्या तीन गुणांचीं तीन लक्षणें रजो गुणाची घोरवृत्ति, सत्व गुणाची शांतवृत्ति, तमोगुणाची मूढवृत्ति. ज्या वृत्तीचे योगानें जिवाचें जन्म-मरण चुकत नाहीं. त्या घोरवृत्तीचे प्रकार सांगतों.

१ काम--अमुक पदार्थ मला असावा न मिळणारा पदार्थ मिळावा, दृष्टश्रुत तो यत्नानें साधावा, अशा इच्छेस काम म्हणतात.

२ क्रोध--कामास ज्यानें अडथळा केला, तो लहान किंवा मोठा असो, तो वैरी समजून त्यास मारीन असा भाव उत्पन्न होतो त्यास क्रोध म्हणतात.

३ लोभ--प्रारब्धानें जे जे विषय प्राप्त व्हावयाचे, त्याचा कधींही क्षय होऊं नये, असें मानून मोठ्या आवडीनें त्याचा संचय करितो, त्यास लोभ म्हणतात.

काहीं न सुचावें तो मोहो । बहु संशय तो संदेहो । वचनें न मानी तो दुराग्रहो । निग्रह ही घोरवृत्ती ॥ ५१ ॥
दंभ तोचि जनीं दाखवावा । आपुला चांगुलपणा मद जाणावा । मत्सर द्वेष साभिमान घ्यावा हेही घोरवृत्ति ॥ ५२ ॥
स्वजनाचा कळवळा ते प्रीति । क्रीडा विहार विषयासक्ति । नटनाट्यादि आवडती । हेही वृत्ति घोर ॥ ५३ ॥
कामना असूया तिरस्कार । फलाविषयीं बहु आदर । प्रपंचाविषयीं बहु सादर । हेही घोरवृत्ति ॥ ५४ ॥
भय लज्जा निंदा प्रयत्न । शोक साक्षेप कृतघ्न । आर्जव मैत्री बहुभाषण । हेही घोर वृत्ति ॥ ५५ ॥
ऐसें कोठवरी बोलावें । प्रपंचाचें लक्षण बरवें । दान कर्म धर्म ही आघवे । रजोगुणीं घोरवृत्ति ॥ ५६ ॥
आतां तमोगुण तो निरर्थक । प्रपंच ना परमार्थ ना लौकिक । वृथामात्र आयुष्याचा घातक । मूढवृत्ति ॥ ५७ ॥
सदां आळस असावा । असावधता प्रमाद जाणावा । किंवा काळ निद्रेंत जावा । हे मूढवृत्ति ॥ ५८ ॥
सत्वगुणाची शांतवृत्ति । क्षमा तितिक्षा दया शांति । विरक्ति श्रद्धादि संपत्ति । शम दम प्रकार ॥ ५९ ॥
श्रवण मनन सारासार । मुमुक्षुता परमार्थ उद्गार । त्यागचि करी सर्व संवसार । हेचि शांतवृत्ति ॥ ९६० ॥
सदा सत्संग आवडे । सच्छास्त्राचें अति कोडें । सर्वभूतीं आत्मता जोडे । हेचि शांतवृत्ति ॥ ६१ ॥
ऐसें हें चिन्ह शांतवृत्तीचें । हेलावे उठती सत्वगुणाचे । परी ते दानी उत्पन्न सुखाचे । नाश पावतां दुःख ॥ ६२ ॥
तयासी केवळ सुख न म्हणावें । सुखदुःख वृत्तीनें शीण पावे । तस्मात् हे विकार जाणावे । सत्ववृत्तीचे ॥ ६३ ॥
हे वृत्ति रज तमा निर्दाळी । पाडी परमार्थाचिये सुकाळीं । उद्भवतां मात्र होय वेगळी । निमतां मेळवी सुखा ॥६४॥
तस्मात् उद्भवतां होतसे विकार । यास्तव केवळ सुख नोव्हे निर्विकार । एवं घोर मूढ शांत प्रकार । तीन त्रिगुणांचे ॥६५॥
जोंवरी उद्गार त्रिगुणांचे । घोर मूढ कीं शांतवृत्तीचे । हे दायक असती सुखदुःखाचे । तों काल कैचें आत्मसुख ॥६६॥
या तिहीं वेगळी उदास वृत्ति । उगीच समान वृत्तीची स्थिति । त्रिगुणाचीही नव्हेचि उत्पत्ति । सहजपणें स्तब्धता ॥६७॥

---

४ मोह—जो कांहीं सुचूं देत नाहीं, तो मोह.

५ संदेह—फार संशय, त्यास संदेह म्हणतात.

६ दुराग्रह—यथार्थ वचनें मानीत नाहीं, त्यास दुराग्रह म्हणतात.

मद—आपला चांगलेपणा मानणें, तो मद.

प्रीति—स्वजनांचा कळवळा बाळगणें ती प्रीति.

९ निग्रह १० दंभ ११ मत्सर १२ द्वेष १३ क्रीडा १४ विहार १५ विषयासक्ति १६ नटनाट्य आवडणें १७ कामना १८ असूया १९ तिरस्कार २० फलेच्छा २१ प्रपंचाविषयीं तत्परता २२ भय २३ लज्जा २४ निंदा २५ प्रयत्न २६ शोक २७ साक्षेपता २८ कृतघ्नपणा २९ आर्जव ३० मैत्री ३१ बहु भाषण ३२ दान ३३ कर्म ३४ धर्म इत्यादि चांगलीं किंवा वाईट प्रपंचाचीं लक्षणें ही रजोगुणी घोरवृत्ति.

काम, क्रोध, लोभ जे हे तिन्ही, जीवांस घोळसून जन्ममरणांत घालितात.

तमोगुणाची मूढवृत्ति. ही प्रपंच ना परमार्थ ना, लौकीक. वृथा आयुष्याची घातक आहे. हिचे विकार १ सदा आळस २ असावधता म्हणजे प्रमाद, ३ निद्रेंत काळ घालविणें.

सत्वगुणाची शांतवृत्ति. हिचे विकार—१ क्षमा २ तितीक्षा ३ दया ४ शांति ५ विरक्ति ६ श्रद्धा ७ शम ८ दम ९ श्रवण १० मनन ११ सारासार १२ मुमुक्षुता १३ परमार्थ १४ सर्व संसारत्याग १५ सत्संगाची आवडी १६ सत्शास्त्राची प्रीति १७ सर्व भूतीं आत्मता.

सत्वगुणाची शांतवृत्ति ही उत्पन्न झाली असतां सुख देते, व ती नाश पावली म्हणजे दुःख होतें. म्हणून ही वृत्ति केवळ सुख नव्हे, तर हा विकारच आहे. शांतवृत्ति रजतमास नाहींशी करिते, व परमार्थाचा सुकाळ करिते. ती उत्पन्न झाली म्हणजे वेगळी होते. आणि निमाल्यावर सुखास नेते, ती उत्पन्न झाली असतां विकार होतो म्हणून तें केवळ निर्विकार सुख नव्हे.

याप्रमाणें तीन गुणांचे तीन प्रकार जोंपर्यंत त्रिगुणाच्या वृत्ति आहेत, तोंपर्यंत त्या सुखदुःखदात्या आहेत व त्या आहेत तोंपर्यंत आत्मसुख प्राप्त होत नाहीं. वर सांगितलेल्या तीन वृत्तीखेरिज चवथी उदासवृत्ति आहे. तिच्यांत उगीच समान वृत्तीची स्थिति आहे, व जींत तीन गुण उत्पन्न होत नाहींत, अशी सहजपणें असणारी तीच उदासवृत्ति किंवा स्तब्धता.

इंद्रियविषयांचे विस्मरण । विवेकादिकांही नातळे मन । आळसादि नसतां सावधान । हे उदासवृत्ति ॥ ६८ ॥
स्तब्धता परी जड नव्हे । सावध परी न हेलावे । उगेपणही न स्मरावें । हे उदासवृत्ति ॥ ६९ ॥
ऐसिया सामान्य वृत्तीमाजीं । निजात्मसुख प्रगटे सहजी । ते काळीं अनुभवावया दुजी । वृत्ति नसे ॥ १७० ॥
सुखाकार वृत्ति गोचर । अनुभवितसे तदाकार । तेथें हेंचि सुख ऐसा उद्गार । तरी तया सुखा मुके ॥ ७१ ॥
तेथें सुखरूप होऊनि असावें । आठवूं जातां भिन्न पडावें । परी तें सामान्यवृत्ती अनुभवे । मौनेंचि अंतरीं ॥ ७२ ॥
पुढें वृत्ति उद्भवतां करी मनन । म्हणे काय होतों सुखसंपन्न । तया सुखांतून हेलावून । वृत्ति उमटे ॥ ७३ ॥
जीवनावरून वायु जातां । किंचित् दूर धांवे शीतळता । तेवीं उगेपणापासून निघतां । वृत्ति सुखाकार निघे ॥ ७४ ॥
अन्यपदार्थां वृत्ति धरी । तेव्हां तें सुख हरपे निर्धारी । वायु जेवीं जातां बहु दुरी । शीतळता लोपे ॥ ७५ ॥
जरी तैशींच वृत्ति हेलावून । पुन्हां त्या सुखीं होय लीन । न अवलंबी पदार्थ आन । तरी तें सुख न लोपे ॥ ७६ ॥
जरी वायु जळींच भ्रमे । तरी शीतळता न गमे । तेवीं वारंवार अनुक्रमें । वृत्ति उठे विरे सुखीं ॥ ७७ ॥
तरी सुख तें न वोहटे । तदाकारत्वें स्वयें भेटे । वृत्ति हेलावून पुन्हां आटे । तया सुखामाजीं ॥ ७८ ॥
परी हा अभ्यास पाहिजे केला । तरीच साधका जाय अनुभवला । तो अभ्यास पुढें असे बोलिला । तेणें रीतीं कळे ॥७९॥
असो जागृतीमाजी ही बुद्धिवृत्तीचा । उगेपणा होय जेव्हां साचा । तत्काळीं स्वात्मसुखाचा । अनुभव होय ॥१८०॥
जरी वृत्ति होय गुणाकार । तरी त्या सुखाचा पडे विसर । सुखदुःखें शिणे विकार । धरी अन्याचा ॥ ८१ ॥
रविदत्ता तूं ऐसें म्हणसी । कीं सुख होतसे शांतवृत्तीसी । परी नाश होय जेव्हां तयेसी । म्हणोनि विकारी ॥ ८२ ॥
तैशीच उदासवृत्ति हे स्वयमेव । तेथें स्वसुखाचा अनुभव । इचाही नाश होय सदैव । तरी त्या यातें अंतर कोणतें ॥८३॥
उगेपणा जे उदासवृत्ति । आणि सत्वगुणाची शांतवृत्ति । उद्भव सुखाचा दोहींप्रती । आणि नाशही सारिखा ॥ ८४ ॥
तस्मात् तिशीं इशीं कोण अंतर । कल्पिसी ऐसा एक निर्धार । तरी पाहें पुरतें महदंतर । तया ययासी ॥ ८५ ॥
सत्वगुणाची जे शांतवृत्ति । विकारसुखें सुखी होती । अथवा विवेकें जरी सुखानुभूति । घेऊन मी सुखी भावी ॥ ८६ ॥

---

**उदास वृत्तीचीं लक्षणें**–१ इंद्रिय विषय यांचें स्मरण न होणें. २ विवेकासही मन नातळणें. ३ आळस नसतां सावधान असणें. ४ जड नाहीं अशी स्तब्धता. ५ हेलावे नसतां सावधपणा. ६ उगेपणही न स्मरणें.

वर सांगितलेल्या उदासवृत्तींत ( सामान्य वृत्तींत ) निजात्मसुख सहज प्रगटतें, तेव्हां अनुभवण्यास दुसरी वृत्ति नसते तर तदाकारतावृत्तिगोचर जी सुखाकारता ती ती अनुभविते. तेथें हेंच सुख असा उद्गार निघाला कीं तें सुख प्राप्त होत नाहीं. तेथें सुखरूप होऊन असावें. परंतु तें आठवू लागलें कीं, ह्या सुखापासून वृत्ति भिन्न होते, म्हणून तें सुख सामान्यवृत्तीनें मौनतेनेंच अंतरीं अनुभवावें.

वृत्ति उत्पन्न झाली कीं, मनन होऊं लागतें. ते असें: मी किती सुखी होतों, याप्रमाणें त्या सुखांत वृत्ति न हेलावतां उठते. पाण्यावरून वारा गेला ह्मणजे त्याची शीतलता किंचित् दूर धांवते; त्याप्रमाणें उगेपणापासून वृत्ति निघाली असतां ती सुखाकार निघते. वृत्ती दुसऱ्या पदार्थास धरते तेव्हां तें सुख हरपतें. जसा वारा फार दूर गेला असतां शितळता जाते. जर तशीच वृत्ती हेलावून पुन्हां त्या सुखांत लीन होईल, आणि दुसरा पदार्थ न अवलंबील तर तें सुख लोपत नाहीं. जर वारा पाण्यावरच फिरला तर त्याची शितळता नाहींशी होत नाहीं. त्याप्रमाणें वृत्ति वारंवार अनुक्रमें सुखांत उठते व नाहींशी होते, तरी तें सुख कमी होत नाहीं. तर तदाकारत्वें स्वतःच तें भेटतें. वृत्ति हेलावून पुन्हां त्या सुखांत आटते. परंतु हा अभ्यास केला पाहिजे. तरच साधकास अनुभव येईल. अभ्यास पुढें सांगूं. आतां जागृतींत जेव्हां बुद्धीवृत्तीचा खरोखर उगेपणा होतो तेव्हां स्वात्मसुखाचा अनुभव होतो. वृत्ती जर गुणाकार झाली तर त्या सुखाचा विसर पडतो. याप्रमाणें गुणाचे विकार धरून जीव सुखदुःखानें शिणतो, म्हणून त्याची ती समानवृत्ती न राहातां गुणाकारच होते.

**शंका**—पूर्वी शांतवृत्तीचें सुख ती नाहींशी होते, तेव्हां जातें; म्हणून ती विकारी असें ठरविलें. आतां उदासवृत्तींत स्वात्मसुख होतें परंतु तिचाही नाश होतो, तर तींत व हींत फरक काय आहे ?

**उत्तर**—दोन्हीं वृत्तींत सुखाचा उद्भव व नाश सारखाच, असें मानशील तर, दोहींत महदंतर आहे. शांतवृत्तींत जें सुख ग्रहण केलें जातें तें सुख आणि त्या सुखास अनुभवणारी वृत्ति हीं भिन्न रहातात, ऐक्य पावत नाहींत. कारण वृत्ति मी सुखी होते असें विचारानें जाणते, म्हणूनच तें सुख अनुभाव्यरूप उरत नाहीं. तर वृत्तीच्या अनुभवापुरतेंच मानिलें जातें, म्हणून तें क्षणीक व विकारी समजावें.

तें सुख मीं घेतलें । मींच सुखरूप ऐसें भाविले । परी तें सुख नव्हे जें संचलें । अनुभाव्यरूप ॥ ८७ ॥
मानिलें तें क्षणभरी राहे । पुन्हां दुःखरूपता लाहे । तस्मात् शांतवृत्तींत सुख आहे । म्हणे कवणु ॥ ८८ ॥
तैशी नव्हे उदासवृत्ति उगेपणें त्या सुखा आतौती । मिळोन जाय सहजगति । वेगळी न निघे ॥ ८९ ॥
मी सुखी आहें हा उद्गार । नाहींच नेघे अणुमात्र । परी मी असें तत्सुखाकार । हेंही नाहीं ॥ ९९० ॥
क्षणभरी तरी स्थिर राहे । परी त्या सुखीं ऐक्यता लाहे । उठोन जरी हेलावे पाहे । तरी विकार न घेतां मिळे ॥९१॥
उठतांही अन्य सुखाचा विकार । नेघे ह्मणोनि निर्विकार । पुन्हां होता तत्तदाकार ॥ ऐक्यत्वा मिळे ॥ ९२ ॥
मागुती ह्मणसी कीं विकार पावतां । तें सुखा न जाय तत्वता । परी पाहें अंतरीं पुरता । तें न नासे वृत्ति नासे ॥९३॥
पहिलें सुख अखंड भरलें । वृत्ति सुखदुःखीं तरी संचलें । मात्र वृत्तीसीच सुखदुःख जालें । वेगळी पडली ह्मणानी॥९४॥
जेव्हां वृत्तीनें विकार सांडिला । तिहीं गुणाचा अभाव जाला । सहजगति उगेपणा उरला । तेव्हां मिळे त्या सुखीं ९५
क्षणभरीं सुखीं समरसली । तदाकारत्वा अनुभूति बोलिली । पुन्हां तेथोनि विकार पावली । तें सुख त्यागोनी ॥९६॥
ह्मणोनि सुख वृत्तीचें हरपलें । परी निजसुख नाहीं उणें झालें । तें नासे तरी विकार जातां भेटलें । वृत्तीसी सुख केवीं
तस्मात् तें सुख असे निबिड । जें सुप्तीमाजीं निरोपिलें वाड । तेथेंच जागृतीमाजीं होतसे पवाड । उदासवृत्तीचा९८
तैसें शांतवृत्तींत कोठें । वाउगी सुखाचि ह्मणून उठे । परी तें सुख नव्हे मानिलें गोमटें । तेही आटे सुखदुःखें ॥ ९९॥
तस्मात् तिन्हीही वृत्ति त्यागून । बुद्धिवृत्तींचें उगेपण । त्या उदासवृत्तीच्या भावें कडून । जागरी सुख भेटे ॥१०००॥
हें जागर सुप्तीचें मध्यस्थान । गाढ झोंप ना नव्हे जागरण । ते समयीं वासनेसी आविर्भवणें । निजात्मसुख ॥ १ ॥
तयासी म्हणावें वासनानंद । गाढ सुप्तींत ब्रह्मानंद । हे उभय सांगितलें विशद । दोहीं ठाईं ॥ २ ॥
जागें असतांही उगेपणाचा । भाव जो कां असे साचा । तोचि ठाव मध्य स्थानाचा । उभयां भेद नाहीं ॥ ३ ॥
आरंभीं झोंपेचे जागर नसतां । सुख आविर्भवे तत्त्वतां । पुढें गाढ झोंप जेव्हां लागतां । केवळ ब्रह्मानंद उरे ॥ ४॥
म्हणोनि वासनेचा परिणाम । तो ब्रह्मानंदचि परम । तैसा कोठें म्हणसी आराम । जागरीं उगेपणा ॥ ५ ॥
तरी अभ्यासें उदासवृत्ति । चिरकाळ राहे स्थिरत्व गति । तरी लीनत्वें जें सुख सुप्तीं । तेंचि होय येथें ॥ ६ ॥

---

कारण मानिल्याचें सुख गेल्यावर वृत्तीस दुःखरूपता प्राप्त होते, म्हणूनच शांतवृत्तींत सुख आहे. असें ज्ञाते म्हणत नाहींत. शांतवृत्तीसारखी उदासवृत्ति नाहीं. ती सुखास सोडून वेगळी न राहतां उगेपणानें त्या सुखांत ती मिळून जाते. मी सुखी आहें असेंही ती दर्शवीत नाहीं व मी तत्सुखाकार झालें हाही अनुभव दाखवीत नाहीं; तर ती क्षणभर स्थीर राहिली असतां त्या सुखांत ऐक्यता पावते; आणि उठून जर ती हेलावूं लागली तर विकार न घेतां पुन्हां त्या सुखांत मिळते. याप्रमाणें ती दुजेपणानें सुखाचा अनुभव घेत नाहीं म्हणून ती उदासवृत्ति निर्विकारी समजावी. अशी ही उदासवृत्ति पुन्हा तदाकार झाली म्हणजे ऐक्यत्व पावते पण केव्हां केव्हां ती वृत्ती विकार पावते, तेव्हां सुखाचा नाश न होतां वृत्तीचाच नाश होतो. उदासवृत्तींत निजसुख अखंड भरलेलें आहे तें तसेंच असून वृत्ति मात्र ऐक्यता सोडून सुखदुःखास झळंबूं लागली म्हणजे ती सुखदुःखाकार होते. आतां ती वृत्ति जर विकार पावणार नाहीं म्हणजे निजसुखास सोडून रहाणार नाहीं तर सहजच तिन्हीं गुणांची बाधा तिला होणार नाहीं. याप्रमाणें वृत्ति निर्बाध झाली असतां तेथें उदासवृत्ति उत्पन्न होते, उदासवृत्ति किंवा उगेपणा प्राप्त झाला म्हणजे वृत्ति निजसुखांत समरसते. ती सुखांत समरसली म्हणजे तदाकारता प्राप्त होते. वृत्ति जेव्हां सुखास सोडून विकार पावूं लागते, तेव्हां तिचें तें निजसुख हरपतें; असें जरी ती ऐक्यता सोडून दूर जाऊं लागल्यामुळें निजसुख हरपतें तरी तें नाहींसें होत नाहीं; तर ती पुन्हा जेव्हां ऐक्यता पावेल तेव्हां तें तिला प्राप्त होतें. म्हणून निजसुख अखंड भरलेलें आहे. तें झोंपेंत जसें संचलेलें आहे तसें जागृतींतील उदासवृत्तींत अखंड असलेलें सुख वृत्तीचें ऐक्य झाल्यावर प्राप्त होते.

उदासवृत्ति ही, जागृती आणि झोंप यांचें मध्यस्थान आहे. जेथें गाढ झोंप नाहीं व जागेपणाही नाहीं तेथें वासनेस निजात्मसुख प्राप्त होतें. म्हणून त्याला वासनानंद म्हणतात. गाढ झोंपेंत ब्रह्मानंद आहे. जेव्हां जागेपणा नाहीं व गाढ झोंप नाहीं तेव्हां वासनानंद असतो. तोच गाढ झोंप लागल्यावर ब्रह्मानंद होतो. म्हणून वासनेचा परिणाम ब्रह्मानंद आहे जागेपणांत उदासवृत्ति चिरकाल स्थिरत्व पावली म्हणजे जें लीनत्वें झोंपेंत सुख होतें तेंच हींत प्राप्त होतें. म्हणून उदासवृत्तीचा परिणाम ब्रह्मानंद आहे.

तस्मात् परिणाम उदासवृत्तीचा । ब्रह्मानंदाचि असे साचा । येथें भेदभाव कल्पनेचा । सहासा न करावा ॥ ७ ॥
येथेंही तूं शंका करिसी । कीं जैसा परिणाम उदासवृत्तीसी । तैसाचि भाव शांतवृत्तीसी । कां न म्हणावा ॥ ८ ॥
शांतवृत्तीचा ब्रह्मानंद । परिणाम नव्हे परि विशद । उदासवृत्ति होऊन पुढें शुद्ध । मुख्य निजसुख उरे ॥ ९ ॥
तरी हे परंपरेनें सुखातें पावे । यासी नाहीं म्हणे कोण बरवें । परी मुख्य ब्रह्मानंद तो नव्हे । परिणाम शांतवृत्तीचा
ऐसाचि परंपराद्वारा । घोरवृत्तीसी होय थारा । मा शांतवृत्तीसी तो खरा । विवेक असे ॥ ११ ॥
काम हे घोरवृत्ती रजाची । जे इच्छा होणें अप्राप्त विषयाची । तो जरी विषय प्राप्त होतांची । सुखाचि उफाळे ॥ १२
काय हो केव्हडा लाभ जाला । न होणें तेंचि प्राप्त मजला । ऐसा उद्गार जो वृत्तीनें घेतला । आरंभीं हर्षाचा १३
तोचि हर्ष उद्गारतस्त्वतां । जिरे हळूहळू चिरकाल होतां । विषय असे परी उगेपणा आंतौता । परिणाम पावे १४
उद्गार नसतांही वासनेसी । सुखाकारता अनायासीं । विषयानंद म्हणावें तयासी । वासनानंद नव्हे ॥ १५ ॥
एवं सुप्तिकाळींचा ब्रह्मानंद । उदासवृत्तींत वासनानंद । तिसरा जाणिजे विषयानंद । हे तीनच सर्व जगीं ॥१६ ॥
चौथा आनंद तिहीं लोकीं । जालाचि नाहीं नानात्व अनेकीं । येथें आशंका करिसी निकी । कीं असती सुखें बहु
अद्वैतानंद आत्मानंद । निजानंद परमानंद । सहजानंद विद्यानंद । ऐसे प्रकार बहु ॥ १८ ॥
परी अद्वैत आत्मा निजानंद । परमानंदादि नामभेद । तस्मात् एकचि ब्रह्मानंद । जो सुप्तिकालाचा ॥ १९ ॥
सहजानंद तोचि विशद । जया बोलिजे वासनानंद । जो उदासवृत्तीचा स्वाद । जागृतीमाजीं ॥ १०२० ॥
विद्यानंद राज्यानंद । आदिकरून विरंचिपद । तो एकचि जाणिजे विषयानंद । बहु नामभेद जरी ॥ २१ ॥
शांतवृत्तीचा जो विवेक । तो विद्यानंदची कौतुक । तयासीच विषयानंद एक । नाम बोलिजे ॥ २२ ॥
जरी विवेकें ब्रह्मसुख ग्रहण । परी वृत्ति घेतसे विषय म्हणोन । तस्मात् होय तो विषयानंद पूर्ण । निःसंशयें ॥ २३ ॥
तस्मात् ब्रह्मानंद आणि वासना । तिजा विषयानंद जाणा । या तिहीं वेगळा चौथा असेना । आनंद जगीं ॥ २४ ॥
या तिन्हीही आनंदांसी । दृष्टांत देऊं सावध मानसीं । श्रोत्रिय बालानंद तिजयासी । राज्यानंद नाम ॥ २५ ॥

---

जसा उदासवृत्तीचा परिणाम ब्रह्मानंद तसा शांतवृत्तीचा कां नाहीं? असें वाटेल तर शांतवृत्तीचा परिणाम ब्रह्मानंद नाहीं. कारण शांतवृत्ति ही उदासवृत्ति झाल्यावर मग तिचा ब्रह्मानंद परिणाम होतो. म्हणजे शांतवृत्तीचा प्रत्यक्ष परिणाम ब्रह्मानंद नाहीं. तर परंपरेनें आहे. असा परंपरेनें घोरवृत्तीचाही परिणाम ब्रह्मानंद होतो, मग शांतवृत्तीचा होईल यांत काय आश्चर्य आहे! शांतवृत्तींत विचार आहे त्याचे योगानें सहजच ती उदासवृत्ति होऊन ब्रह्मानंद प्राप्त होईल. तसा घोरवृत्तीस उगेपणारूप उदासवृत्तीचें स्वरूप आलें असतां त्या उदासवृत्तींत मग ब्रह्मानंद प्रगट होईल. घोरवृत्ती म्हणजे अप्राप्तविषयीं इच्छारूपी काम. तो काम विषयाची प्राप्ती झाल्यानें वृत्तीस सुखरूपता उत्पन्न होते. त्यायोगानें मला हा केवढा लाभ झाला, न होणें तें मला प्राप्त झालें असा तिनें हर्षोद्गार घेतला. हा हर्षोद्गार जर चिरकाल राहील, तर तो जिरून त्याचा परिणाम विषय असतांही आंत उगेपणा होतो. उगेपणा झाला कीं त्याचा ब्रह्मानंद होऊं शकतो. पण असें होणें मात्र अघटमान आहे. कारण चिरकाल हर्षोद्गाराचे स्थिरतेमुळें जरी उगेपणा आला तरी वासनेस उद्गारावांचूनच सुखाकारता वाटते. ती सुखाकारता वाटली म्हणजे जो आनंद होतो, तो ब्रह्मानंद नव्हे व वासनानंद नव्हे. तर त्यास विषयानंद म्हणतात. हा विषयानंद जागृती व स्वप्न या दोन अवस्थेंत प्राप्त होतो. उदासवृत्तींत वासनानंद प्रगटतो व झोंपेंत ब्रह्मानंद प्राप्त होतो. असे तीन प्रकार आनंदाचे आहेत ते जागृती, स्वप्न, सुषुप्ती, यांत अनुभवास येतात.

शंका—पुष्कळ सुखें असल्यामुळें आनंदास पुष्कळ नांवें आहेत. परंतु सर्वांचा आंतर्भाव तिहींत होतो.

१ अद्वैतानंद. २ आत्मानंद. ३ निजानंद. ४ परमानंद हे सर्व मिळून एक ब्रह्मानंद.

१ सहजानंद तोच वासनानंद, २ विद्यानंद, ३ राज्यानंद, इत्यादि यांस विषयानंद म्हणतात. शांतवृत्तीचा विद्यानंद. यास विषयानंद म्हणतात; कारण शांतवृत्तीचे योगानें ब्रह्मसुख ग्रहण होते. परंतु वृत्ती विषय समजून घेते, म्हणून त्यास विषयानंद म्हणतात. या तीन प्रकारच्या आनंदास तीन दृष्टांत.

१ श्रोत्रिय. २ बालानंद. ३ राज्यानंद. श्रोत्रिय म्हणजे ज्ञानी त्याचे ज्ञान आणि ब्रह्मात्मा एक; आत्म्याच्या सुखाचा लोप नाहीं. तसा ज्ञान्याच्या सुखाचाही लोप नाही. ज्ञान्याचें तसेंच आत्म्याचें झोंपेंतील सुख त्रिपुटीरहित आहे. तेंच ते होऊन राहिले; म्हणून श्रोत्रियसुख आणि ब्रह्मानंद हे एकसारखेच. श्रोत्रियसुखाची

श्रोत्रियाचें सुख ऐसें । सुप्तींत ब्रह्मानंद विलसे । वासनानंद तो बाल जैसें । स्तनांध सान ॥ २६ ॥
राज्यानंद तो विषयानंद । हे तों ऐंकाचि नसे भेद । आतां हेचि वेगळाले विशद । करूनि दाऊं ॥ २७ ॥
श्रोत्रिय म्हणावें ज्ञानियासी । ज्ञान तें ब्रह्मात्मा एकरसीं । कोणतेही अवस्थेंत यासी । सुखाचा लोप नाहीं ॥ २८ ॥
जें सुख सुप्तीचें वर्णिलें । जें कां त्रिपुटीरहित संचलें । तेंचि निजांगें होऊन धालें । पुन्हां वोहटे ना ॥ २९ ॥
एवं श्रोत्रियसुख ब्रह्मानंदासी । क्रौं उपमिला अनदं श्रोत्रियासी । हा दृष्टांत दार्ष्टांत येकरसीं । परी देणें कळावया ३०
अति बाल स्तन पिऊनी । तृप्त होऊन मृदु आस्तरणीं । निजविलें जें सुखें शयनीं । तें सहजें हंसें ॥ ३१ ॥
विधिनिषेध ना हर्ष शोक । क्षुधा तृषा ना वृत्यात्मक । सहजीं सहजत्वें कौतुक । हांसे स्वानंद ॥ ३२ ॥
जो तूष्णीभाव जागृतीचा । तोचि सहज हर्ष बालाचा । दृष्टांत दिधला परी साचा । एकरूप असे ॥ ३३ ॥
महाराजा चक्रवर्ती । निर्वैर राज्य सर्व जगती । अव्याहताज्ञा तो सुखमूर्ति । तिष्ठे स्वानंदें ॥ ३४ ॥
अमुक करणें उरलें नाहीं । पावावयाचें पावलें तेंही । तोचि विषयानंद पाहीं । जो राज्यानंद ॥ ३५ ॥
एवं तिन्ही आनंदा तीन उपमिले । या तीहींतून दोन जाती नासले । ब्रह्मानंदीं परिणाम पावले । वासना आणि विषय
चक्रवर्तीचें सुख तें पाहतां । नाश पावे परें पीडितां । अथवा देवादिकांचें सुख इच्छितां । तुच्छ करी स्वसुख ॥३७॥
बालही दिवसेंदिवस वाढे । मनें सुखदुःखीं पवाडे । तेव्हां तें सहज सुख विघडे । वासनानंदरूप ॥ ३८ ॥
तैसें श्रोत्रियाचें सुख नसे । जें एकदां अभिन्न बाणलें जैसें । तें कालत्रयींही न नासे । भलतेही व्यापारीं ॥ ३९ ॥
धनाढ्य किंवा निष्कांचन । एकटा किंवा बहु स्वजन । धाला किंवा उपोषण । परी तो आनंदरूप ॥ ४० ॥
वस्त्रालंकारी कीं उघडा । मंचकीं किंवा पडे उकरडां । पट्टनीं किंवा वनीं धडकुडा । परी तो आनंदरूप ॥ ४१ ॥
भलता आश्रम भलता वर्ण । भलता धर्म भलतें आचरण । जागृतीं स्वप्नीं कीं सुषुप्तीं पूर्ण । परी तो आनंदरूप ४२
एवं ब्रह्मानंद तो ऐसा । मायादि तृणांत उमटो ठसा । उद्भवो राहो कीं पावो नाशा । परी तें जैसें तैसें ॥ ४३ ॥
आतां वासना विषयानंद दोनी । जे नासती परोक्ष म्हणोनी । तेही विचारें पावती मिळणीं । अभ्यासें ब्रह्मानंदा ४४
विवेकवैराग्याचेनि बळें । विषय तितुका सर्व निवळे । विवेचनें जरी मीपण गळे । तेव्हां भोग्य भोक्ता आटे ॥ ४५ ॥

---

ब्रह्मानंदास किंवा ब्रह्मानंदाची श्रोत्रीयसुखास जी उपमा दिली; ती केवळ कळण्याकरितां दिली, एरव्हीं दृष्टांत व द्राष्टांत एकच आहेत.

मूल पोटभर स्तनपान करून तृप्त झालें असतां व त्यास मऊ अंथरुणावर निजविलें असतां तें सहज हंसतें. वास्तविक त्यास हंसण्याला कारण, विधिनिषेध नाहीं. हर्षशोक नाहीं तसेंच वृत्यात्मक भूक तहान नाहीं. असें असून तें केवळ सहज स्वानंदानें व कौतुकानें हंसतें. मुलाचा हर्ष आणि जागृतीचा तूष्णीभाव हे एकरूपच. चक्रवर्ती महाराजा सर्व पृथ्वीचें राज्य करीत असतां त्याला कांहीं करणें राहिलें नाहीं व जें पावावयाचें तें पावलें.त्यास विषयानंद म्हणतात. तोच राज्यानंद आहे. ब्रह्मानंदांत वासनानंद आणि विषयानंद हे परिणाम पावलेले आहेत म्हणून पहिले दोन व्यर्थ आहेत. व तिसरा ब्रह्मानंद सत्य आहे. राज्यानंदाचें सुख पाहिलें असतां राजास शत्रूनें पीडा दिली म्हणजे तें सुख नाहींसें होतें. अथवा देवादिकांचें सुख पाहिलें म्हणजे राजाचें सुख तुच्छ वाटतें. तसेंच वासनानंद म्हणजे सहजानंद हा, मुलगा मोठा होऊन मनानें जेव्हां सुखदुःख जाणतों तव्हां व्यर्थ होतो. श्रोत्रिय किंवा ब्रह्मानंद हा अनुकूल किंवा प्रतिकूल पदार्थ असतां नाश न पावतां तो आनंदरूप असतो. कारण त्या श्रोत्रियास एकदा अभिन्न ज्ञान बाणलें कीं तें कालत्रयींही भलते व्यापार झाले तरी नासत नाहीं. म्हणून तो आनंदरूप आहे हेंच निरुपण करितो.

१ श्रोत्रिय हा धनाढ्य किंवा भिकारी २ एकटा किंवा पुष्कळ लोकांसह ३ वस्त्रालंकारी भूषित किंवा उघडा ४ पलंगावर किंवा उकिरडयावर पडलेला ५ शहरांत किंवा रानांत असलेला ६ पाहिजे तो आश्रम, वर्ण, धर्म, आचरण, अवस्था, उद्भव, लव, स्थिति होते ७ तो श्रोत्रिय तृप्त झाला किंवा उपवासी असला तरी तो आनंदरूपच.

वासनानंद आणि विषयानंद हे परोक्ष आहेत, व हे नाश पावतात; परंतु हेही विचारानें व अभ्यासानें ब्रह्मानंदांत मिळतात. विवेकवैराग्याचे योगानें विषय निवळून विवेचनानें जेव्हां मीपण गळेल, तेव्हां भोग्य भोक्ता भोग ही त्रिपुटी नाहींशी होते.

देहाचें सुखदुःख समान । हर्षखेदें भंगे ना मन । मग सहजत्वें वृत्ति उदासीन । मिळे वासनानंदीं ॥ ४६॥
गुणाचे विकार मावळती । सुखरूप राहे सहजगती । या रीतीं विषयानंदाची समाप्ति । उदासवृत्तीमाजीं ॥ ४७ ॥
तैशीच उदासवृत्ति ही स्वभावें । जे सुखाकारें हेलावे । तेही अभ्यासें ऐक्य पावे । ब्रह्मानंदीं ॥ ४८ ॥
तो अभ्यास आणि विवेचन । कैसें तें पुढें निरूपण । तेणें रीतीं करावें अभ्यसन । मंदप्रज्ञें मुमुक्षें ॥ ४९ ॥
येथें सहजगती उगेपण होतां । तें सुख उमटे जागृती आंतौता । सांगितलें अगा रविदत्ता । सहज असे म्हणोनी५०
हेंही असो तूष्णी स्थिति । सुख असेंचि असे सहजगती । परी व्यापारामाजीं ही सामान्याप्रती । लोप नाहीं ॥५१ ॥
तेंचि कैसें व्यापाराआंत । या सर्वत्रां सामान्य भासवीत । आणि जागरी तिन्ही अवस्था उमटत। तेंही ध्वनितार्थें बोलूं

**धीव्यापाराश्चतद्भास्याश्चिदाभासे न संयुताः ॥**

बुद्धींचे व्यापार अनारिसे । चिदाभासासहित विलसे । हें चिद्रूपें भासविल्या भासे । धर्म कीं धर्मी ॥ ५३ ॥
जें निर्विकारीं चळण । वाउगें जालें न होऊन । जें मागां बोलिलें ज्ञानाज्ञान । विद्याअविद्यात्मक ॥ ५४ ॥
तेंचि अंतःकरणाची स्फूर्ति । जीवप्रतिबिंबासह वृत्ति । उमटली सगुणा अव्याकृति । हेतु या जगा ॥ ५५ ॥
तिचेच विभाग जाहले दोन । येक बुद्धि येक मन । तया दोन वृत्तींचें निर्गमन । पांचा द्वारां ॥ ५६ ॥
हेचि पांच ज्ञानेंद्रिय । येणें ग्रहण कीजे पंचविषय । परी मन बुद्धींत होती उभय । कळणें आणि चळणें ॥ ५७ ॥
त्यांतून कळणें ज्ञानेंद्रियद्वारा । निघोनि भोगी पंचतन्मात्रा । चळण तेंचि राहिलें अंतरा । ते पंचप्राण ॥ ५८ ॥
तेणें स्थूळाची क्रिया होणें । तोचि पांच कर्मेंद्रियाभिधानें । एवं दशधा व्यापार उद्भवणें । एका बुद्धीचे ॥ ५९ ॥
जीवही ज्ञानाचा आभास । ज्ञानाऐसा जो प्रतिभास । विषयापर्यंत सहवास । असे निर्गमाचा ॥ १०६० ॥
असो ऐसे एका वृत्तीचे । जीवासहित विकार साचे । सत्रा प्रकार व्यापार भेदाचे । जितुके होती ॥ ६१ ॥
तितुके धर्म धर्मीसहित । जो आपुले भासा भासवीत । जीव हा आपणासम प्रतिबिंबित । त्यातेंही प्रकाश करी ६२

---

तो देहाचें सुखदुःख समान मानितो, त्याचें हर्षखेदानें मन भंगत नाहीं, मग सहजत्वें उदासीनवृत्ति वासनानंदांत मिळते, गुणांचे विकार मावळतात व सहजगति तो सुखरूप रहातो, याप्रमाणें विषयानंदाची समाप्ति उदासवृत्तीमध्यें होते, तशीच उदासवृत्ति ब्रह्मानंदांत ऐक्य पावते, तो अभ्यास आणि विवेचन पुढें सांगूं. सध्या सहजगति उदासीन झालें असतां तें सुख जागृतींत येतें तें तुला सांगितलें.

तूष्णीभावांत सहजगति सुख आहेच, परंतु व्यापारांत सामान्याचा लोप होत नाहीं. तो सामान्य व्यापारांत सर्वत्रांस भासवितो, तें व जागृतींत तिन्ही अवस्था उद्भवतात तें संक्षेपानें सांगतों.

बुद्धीचे व्यापार निरनिराळे व चमत्कारिक आहेत. अशी ही चिदाभासासह विलासणारी बुद्धि, ही चिद्रूपानें भासविलेल्या प्रकाशानें धर्मधर्मीयांस प्रकाशिते.जे निर्विकारी चळण न होऊन झालें तीच अंतःकरणाची स्फूर्ति. जीव प्रतिबिंबासह जी वृत्ति, तीच सगुण अव्याकृति माया. ही सर्व जगाचे उत्पत्तीस कारण आहे. अशी ही गुणांसह माया उमटली. तिचे ( वृत्तीचे ) मन, बुद्धि असे दोन भाग झाले. त्या दोन वृत्तींचें निर्गमन पांच द्वारांनीं होतें, तींच पंचज्ञानेंद्रियें. या ज्ञानेंद्रियांनीं पंचविषयांचें ग्रहण होतें. परंतु मन-बुद्धींत कळणें आणि चळणें असे दोनच व्यापार होतात, त्यांत कळणें ज्ञानेंद्रियद्वारानें निघून पंचविषय तन्मात्रास भोगितें, व चळण अंतरांत राहिलें तेच पंचप्राण. ह्या प्राणापासून स्थूळाची क्रिया घडते, म्हणून त्या क्रिया करणारे इंद्रियांस कर्मेंद्रियें म्हणतात. याप्रमाणें एका बुद्धीवृत्तीचेच दहा प्रकारचे व्यापार उत्पन्न झाले.

ज्ञानासारखा प्रतिभास ज्याचा, असा जो जीव, त्या जीवाचाही विषयापर्यंत वावर आहे. असो. एका वृत्तीचे जीवासह, सत्रा प्रकार व्यापारभेदानें झाले. तितके धर्म-धर्मीसह, जो आपले भासानें भासवितो, तोच आत्मा.

स्फूर्ति आणि स्फूर्तीचें चळण । होचि धर्म आणि धर्मी दोन । संकल्पासहित उद्भवलें मन । त्यातेंही प्रकाश करी ६३
बुद्धि आणि बुद्धिनिश्चया । पंचप्राण प्राणांच्या क्रिया । वचनादि सह कर्मेंद्रियां । त्यातेंही प्रकाश करी ॥ ६४ ॥
श्रोत्र ऐकणें त्वचा स्पर्शणें । चक्षू देखणें जिव्हा रस घेणें । घ्राण आणि सुगंध घेणें । त्यातेंही प्रकाश करी ॥ ६५ ॥
एवं धर्मधर्मीसहित । सत्रा प्रकार हे उमटत । जीवही त्यांत प्रतिबिंबत । त्यातेंही प्रकाश करी ॥ ६६ ॥
हे असो देहविषय । जडत्वेंहि जो समुदाय । सन्निध दूर व्यष्टिसमष्टिमय । त्यातेंही प्रकाश करी ॥ ६७ ॥
अंतःकरणवृत्ति वायूच्या चळणें । पंचज्ञानेंद्रियद्वारा विषय घेणें । पंचक्रियेसहित जे जागृति म्हणणें । त्यातेंही प्रकाश करी ॥
प्रत्यक्ष स्थूलविषय त्यागून । अंतरीं वृत्तीचें सध्यास मनन । तया कल्पनेसी नांव स्वप्न । त्यातेंही प्रकाश करी ॥६९॥
कांहींही व्यापार न व्हावे । उगेंचि स्तब्धपणें असावें । सुषुप्ति बोलिजे याचि नांवें । त्यातेंही प्रकाश करी ॥ १०७० ॥
उगाचि प्रकाश मात्र करावा । त्याचा विकार न घ्यावा । अथवा हें प्रकाशिलें म्यां सर्वा । हा हेतुही नसे ॥ ७१ ॥
हेंचि स्वप्रकाश चिद्रूप । तें सविकल्पना निर्विकल्प । जें जें महान अथवा अल्प । प्रकाशवावें ॥ ७२ ॥
दशधा व्यापार ते जागृति । नुसती कल्पना ते स्वप्नस्थिति । उगेपणा नेणीव ते सुषुप्ति । एवं जागरीं तिन्ही अवस्था
ऐसिया कोणत्याही व्यापारा । जीवासहित या आभासमात्रा । प्रकाश करितसे निर्धारा । येकलें ज्ञान सामान्य ॥ ७४ ॥
येथें आशंका करिसी ऐशी । किंचित्प्रभा प्रकाशी सर्वांशीं । तरी जीवें कीजे कोण कार्यासी । वृत्तींत प्रतिबिंबोनी
तरी ऐकें दृष्टांतयुक्त । बोलिजे जीवाचें जें कृत । आणि पराचे प्रकाशें वर्तत । तेंही स्पष्ट कळे ॥ ७६ ॥

**वन्हितप्तं जलं तापयुक्तं देहस्य तापकं । चिद्भास्याधस्तिदाभास युक्तान्यानभासयेत्तथा ॥**

वन्हीनें जें जळ तापलें । तें उष्णयुक्त देहा तापक जाहलें । तैसें चिद्भास्या बुद्धीनें भासविलें । आनान आभासयुक्तें ॥
चिद्रूप सामान्य ज्ञानेंकडून । सर्व पदार्थ होती प्रकाशमान । परी अन्यथा अमुक अमुक म्हणून । कल्पनेविण न दिसती
जैसा अग्निसन्निधीं देह पोळे । परी ओला नोव्हे विना जळें । तेवीं प्रकाशिलें परी न निवळे । आनान कल्पनेविण
म्हणून कल्पनारूप जे वृत्ती । मन बुद्धि नाम जयेप्रती । संशयात्मक मन निश्चिती । निश्चयात्मक बुद्धि ॥ १०८० ॥
हे उभयरूपें एक कल्पना । अमुक अमुक कल्पी नाना । अन्यथा विपरीतपणें आनाना । नामरूपा कल्पी ॥ ८१ ॥
परी ते जड प्रकाशरहित । प्रकाशीना कवणा किंचित । जळ जैसें शीतळ अत्यंत । कवणा पोळवीना ॥ ८२ ॥
स्वतां चंचळ परी प्रकाशहीन । ते कल्पना जेव्हां ज्ञानसंपन्न । तेचि जाणिजे भासमान । परप्रकाशें ॥ ८६ ॥

---

**धर्मधर्मीः**—स्फूर्ति आणि स्फूर्तीचें चळण यास धर्म-धर्मी म्हणतात, यांत स्फूर्ति ही धर्मी म्हणजे चळण हा धर्म जिचा आहे ती.

धर्मधर्मीस व संकल्पासहित मन, यांस आत्मा प्रकाशितो, बुद्धीस बुद्धीचे निश्चयास, पंचप्राण पंचप्राणाचे क्रियेस, कर्मेंद्रियें व त्यांच्या क्रियेस, ज्ञानेंद्रीयें व त्यांच्या क्रियेस, तसेंच जीवास देहासह विषयांस, जागृतीस सुषुप्तीस, जो प्रकाशितो, तोच स्वप्रकाश चिद्रूप आत्मा. तो सविकल्प नाहीं व निर्विकल्पही नाहीं, इतकेंच कीं, त्यानें लहान अथवा मोठे पदार्थ प्रकाशवावे.

दहा प्रकारचे व्यापार ती जागृति, नुसती कल्पना ती स्वप्नस्थिति, उगेपणा, नेणीव ती झोंप याप्रमाणें जागृतींत तीन अवस्था आहेत. कोणत्याही व्यापारास, तसेंच जीवासह आभासास, एकटें सामान्य ज्ञान प्रकाशितें.

**शंकाः**—सर्व जर सामान्य ज्ञान प्रकाशतें. तर जीवाचा काय उपयोग? **उत्तर**-दृष्टांत अग्नीनें जें पाणी तापलें त्या उष्ण पाण्यानें देह तापविला, तसें सामान्य ज्ञानानें बुद्धीस प्रकाशिलें व त्या बुद्धीनें आभासास प्रकाशिलें. चिद्रूप सामान्य ज्ञानानें सर्व पदार्थ प्रकाशमान झाले परंतु ते अमुक आहेत, अशा अन्यथा कल्पनेवाचून दिसत नाहींत.

जसा विस्तवाबरोबर देह पोळतो, परंतु पाण्यावांचून तो ओलसर होत नाहीं, तसें सामान्यानें सर्व प्रकाशिलें परंतु निरनिराळ्या कल्पनेवाचून सर्व पदार्थ कळत नाहींत, म्हणून मन बुद्ध्यात्मक कल्पनारूप जी वृत्ति, ही दोन प्रकारें एकच कल्पना करिते; ती अन्यथा नामरूपें कल्पिते, परंतु ती प्रकाशरहित जड आहे. ती कोणासही प्रकाशित नाहीं. दृष्टांत—जसें फार थंडपाणी तें कोणास पोळीत नाहीं, तशी वृत्ति स्वतः चंचळ परंतु ती प्रकाशहीन आहे, ती जेव्हां ज्ञानसंपन्न होते तेव्हां सर्व पदार्थ जाणते.

जैसें शीतळ जळ पोळूं लागे । तरी तें तप्त जालें अग्निसंगें । तैशी बुद्धि जाणे नानात्वा प्रसंगें । तरी हे चिद्रूपें भासविली
ऐशी बुद्धि चिद्रूपेंकडून । भासली तें चिद्भास्या लक्षण । ते कल्पना आभासयुक्त होऊन । नानात्व कल्पी ॥ ८५ ॥
बुद्धिमाजीं ज्ञानासमान । ज्ञान उमटलें भासमान । तयासीच कल्पित नामाभिधान । बोधाभास जीव ॥ ८६ ॥
तापरूप अग्नि जैसा । जळही पोळवीत असे सहसा । तो उष्णभास जल सहवासा । तेवी जीव कल्पनेआंत ॥ ८७ ॥
असो ऐसिया चिदाभासासहित । युक्त होऊनि बुद्धि विख्यात । नामारूपात्मक वस्तु समस्त । अन्यथात्वें भासवी ८८
जल तप्त पोळवी देहासी । फोड येती जाळी अवयवांसी । आभासयुक्त बुद्धिहि तैशी । नामरूपें कल्पी ॥ ८९ ॥
अग्नि तैसा प्रकाशक आत्मा । पाणियापरी बुद्धि या नामा । उष्णभास तैसा आभास जीवात्मा । हे तिन्ही स्पष्ट जालें
परप्रकाशबुद्धि कळली । चित्प्रभा स्वप्रकाशें संचली । आभास मिथ्या हे प्रतीति आली । यया दृष्टांतें ॥ १०९१ ॥
परी येथें कल्पना करिसी । कीं अन्यथा भासवणें शक्ति जीवासी । तापल्या जळीं प्रभा तैशी । कोठें अन्या प्रकाशक
तरी याचें उत्तर ऐकावें । सूर्यकिरणें जळ तप्त व्हावें । आणि जळीं प्रतिबिंबही पडावें । तेणें झळझळिती भिंती ॥९३
अग्नि सूर्य तो एकरूप । तया भेद न कीजे अल्प । तैसा आत्मा स्वप्रकाश चिद्रूप । असा वादित्यो ब्रह्म ॥ ९४ ॥
यया आत्मसूर्याचे प्रकाशीं । ठेविलें स्थूलदेहघटासी । बुद्धि पाणी आभासता जीवासी । प्रतिबिंबत्वें आली ॥ ९५ ॥
तया प्रतिबिंबरूप जीवानें । नानात्व अन्यथा भासवणें । जळीं उमटलें जें मिथ्यापणें । तेणें भिती झळझळिती ॥९६
सूर्य तैसा आत्मा प्रकाशक । सामान्यत्वें भासवी सकळिक । आभासयुक्त बुद्धि हे अनेक । भासवी जळ प्रभा जेवीं
एवं आत्मा सच्चिद्घन । बुद्धि आभास हे मिथ्या दोन । हे तिन्हीही स्पष्टत्वें भिन्नभिन्न । दृष्टांतयुक्त सांगितले ॥ ९८ ॥
आतां बुद्धीनें कोणती कल्पना । करून दाखविली असे नाना । आणि त्या विकल्पीं आत्मा देखणा । असे तेंही बोलूं

**रुपदौ गुणदोषादि विकल्पाबुद्धिगाः क्रियाः ॥ ताःक्रियाविषयैःसार्धं भासयंती चितिर्मता ॥**

रूपरसादि दोषगुण । विकल्प हे बुद्धीचे विकार होणें । त्या क्रिया आणि विषय संपूर्ण । ज्ञान चित्प्रभा भासवी ११००
क्रिया व्यवहार जितुके । बहुधाही बुद्धीचे तितुके । जीव आभासरूपें सर्व निकें । भासविलिया होती ॥ १ ॥
पूर्वींचे ईश्वरनिर्मित । रूपादि हे पदार्थजात । जयासी ईक्षणादि प्रवेशांत । म्हणे श्रुति ॥ २ ॥

---

जसें पाणी हें जात्या थंड परंतु तें जर पोळील, तर तें अग्नीचे संगानें तापलेलें आहे असें समजावें. तशी बुद्धि अनेक पदार्थ दाखविते, तर ती चिद्रूपानें भासविली आहे असें समजावें. चिद्रूपानें बुद्धीस प्रकाशिलें नंतर ती बुद्धि आभासयुक्त होऊन नानात्व कल्पिते. बुद्धीमध्यें ज्ञानासारखें भासमान ज्ञान उत्पन्न झालें त्यास कल्पित बोधाभास जीव हें नांव आहे. जसा तापरूप अग्नी पाणी तापवितो तेव्हां त्या तप्ततेस ऊष्णाभास असें म्हणतात. तसा जीव कल्पनेमुळें आहे तोच बोधाभास जीव.

जसें तापलेलें पाणी देहास पोळवितें तेणेंकरून फोड येतात, अवयवांस भाजतें, तशी आभासयुक्त बुद्धि नामरूपें कल्पिते. जसा अग्नि, तसा आत्मा प्रकाशक. पाणी तशी बुद्धि. ऊष्णाभास तसा जीवाभास. चित्प्रभा स्वप्रकाशक आहे, व बुद्धि ही परप्रकाशक आहे. त्यांत आभास हा खोटा.

**शंका**--जीवास जशी अन्यथा भासविण्याची शक्ति आहे. तसें तापलेलें पाणी कोठें इतरास प्रकाशितें?

**उत्तर**—सूर्यकिरणानें पाणी तापावें, आणि पाण्यांत प्रतिबिंब पडावें; व त्याचे योगानें भिंती झळझळाव्या; सूर्य आणि अग्नि एकरूप, आत्मारूपी सूर्याचे प्रकाशांत स्थूळ देहरूपी घट ठेविलेला, त्यांत बुद्धि हें पाणी आहे, त्या पाण्यांत प्रतिबिंब जीवाभास आहे, त्या प्रतिबिंबरूप जीवानें खोटें नानात्व भासवावें. जसें—पाण्यांतील प्रतिबिंबानें भिंती झळझळवाव्या; जसा सूर्य तसा आत्मा प्रकाशक, तो सर्व पदार्थ सामान्यत्वानें भासवितो, जशी जळप्रभा, तशी आभासयुक्त बुद्धि अनेक भासविते, त्यांत आत्मा ब्रह्म, सत्यबुद्धि आणि आभास हे दोन मिथ्या. हे तिन्हीही स्पष्टपणें निरनिराळे दृष्टांतयुक्त सांगितलें. यांत बुद्धीनें कोणती कल्पना करून नानात्व दाखविलें आणि त्या विकल्पांत आत्मा देखणा कसा आहे; तें सांगतों.

बुद्धि रसरूप आदिकरून सर्व पदार्थांवर गुणदोष कल्पिते. हा बुद्धीचा विकार. परंतु त्या क्रिया आणि सर्व विषय, ज्ञानरूपी चित्प्रभा भासविते. सर्वही व्यवहार ते बुद्धीचे आहेत. ते आभासरूपी जीव यानें भासविल्यावांचून होत नाहींत. रूपादि सर्व पदार्थजात पूर्वी ईश्वरनिर्मित होते, त्यांना श्रुति ईक्षणादि प्रवेशांत म्हणते;

ईक्षण म्हणजे अवलोकन । करी मायावी ईशान । तया इच्छेसरिसें निर्माण । होतें जालें ॥ ३ ॥
गुण भूतें निर्माण जालीं । जयेतें अष्टधा प्रकृति बोलिली । ते अविद्याचि जडत्वा आली । स्थूल सूक्ष्म ॥ ४ ॥
आकाश वायु तेज आप । पांचवें पृथ्वीचें रूप । यया भूतांपासून नामरूप । बहुधा जालें ॥ ५ ॥
भूतांपासून जें जालें । भौतिकत्व वेगळालें । परी तें भाग्य भोक्तृत्वें निवडिलें । चंचल जड ॥ ६ ॥
जडत्वें चारी खाणी होती । साकारत्वें भिन्न भिन्न व्यक्ति । ब्रह्मादि तृणांत जगतीं । सान कीं थोर ॥ ७ ॥
हें पंचीकृत भूतांचें जालें । जें पूर्वीं उपक्रमीं सांगितलें । त्यांत अपंचीकृत मिळालें । सूक्ष्म तत्व ॥ ८ ॥
इतुकेंही ईशें पाहून । ह्मणे हें सर्व जड मजविण । चलन न पावती तरी आपण । प्रवेशावें अंतरीं ॥ ९ ॥
मग ईश्वरें रूप आपुलें । आच्छादुनी जीवत्व घेतलें । तेंचि चहूंखाणींत प्रवेशलें । तेव्हां व्यापारती सर्व ॥ १० ॥
ते व्यापार तितुके जीवाचे । पुढें अनुक्रमें बोलिजे वाचे । परी प्रवेश होय तों निर्मित ईशाचें । ईक्षणापासूनी ॥ ११ ॥
आकाशीं शब्द स्पर्श वायूचा । तेजाचें रूप रस विषय आपाचा । गंध तो जाणावा पृथ्वीचा । एवं हीं पंचभूतें ॥ १२
भौतिकत्वें ज्या चारी खाणी । अथवा तृणांत आदिकरूनी । या सर्वांमाजीं विषयश्रेणी । पंचधा असती ॥ १३ ॥
साकार जितुकें रूपासि आलें । तें नेत्रासी दृश्य जाहलें । म्हणोनि रूपादिनाम असें ठेविलें । रूप तेथें चारी ॥ १४ ॥
नाम कल्पना असे जीवाची । परी ओळखी व्हावी लागे रूपाची । म्हणोनि बोलावें वाउगेंची । अमुक नामें म्हणोनि
रूप तेथें शब्द असे । स्पर्शही तेथेंच वसतसे । वास्तव्य केलें गंधरसें । म्हणोनि भौतिकत्व ॥ १६ ॥
श्रोत्रामुळें शब्द हें नाम । त्वचेस्तव स्पर्शासी उद्गम । चक्षूसाठीं रूपाचा अनुक्रम । रस जिव्हे प्रीत्यर्थ ॥ १७ ॥
घ्राणामुळें गंध जाला । एवं पंचधा भाव जीवें कल्पिला । परी ईश्वरें पदार्थमात्र निर्मिला । तेथें पंचविषया वस्ती ॥ १८ ॥
स्वर्ग मृत्यु लोक पाताळीं । जितुकें ब्रह्मांड अधोर्ध्व स्थळीं । सर्वीं या पंचभूतां वेगळी । अणुही असेना ॥ १९ ॥
पांचांवेगळा पदार्थ सहावा । नाहींच नाहीं न दिसावा । तस्मात् ब्रह्मगोळ जो हा आघवा । पंचभूतात्मक ॥ २० ॥

---

ईक्षण म्हणजे पहाणें, हें पहाणें मायावी ईश्वराचें झालें. तेव्हां त्याचे इच्छेबरोबर सर्व उत्पन्न झालें.

**अष्टधा प्रकृति.**—पंचभूतें व तीन गुण मिळून अष्टधाप्रकृति.

ही अष्टधाप्रकृति जडत्वास स्थूल सूक्ष्मरूपानें अविद्याच आलेली आहे. पृथ्वी, आप इत्यादि पंचविषयांपासून नामरूप झालें. जें भूतांपासून झालें त्यास भौतिक म्हणतात. त्या भौतिकांत भोग्यभोक्तृत्वाचे संबंधानें चंचळ, जड असें निवडिलें आहे. जडत्वानें चार खाणी ज्या साकारत्वानें भिन्नभिन्न व्यक्ति ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत लहान मोठ्या झाल्या तीच जगति. हें भूतांपासून झालेलें सर्व पूर्वीं उपक्रमांत सांगितलें आहे. त्यांत सूक्ष्मतत्व अपंचिकृत मिळालें. याप्रमाणें सर्व मिळणी झालेली ईश्वरानें पाहून म्हटलें कीं, हें सर्व जड आहे. हें मजवांचून चलन पावणार नाहीं. म्हणून त्यांत आपण शिरावें असें मनांत आणून ईश्वरानें आपलें रूप आच्छादून जीवत्व घेऊन चार खाणींत प्रवेश केला, तेव्हां सर्वांचा व्यापार होऊं लागला. हे सर्व व्यापार जीवाचे आहेत, त्याचे अगोदरचे सर्व ईश्वरनिर्मित आहे.

आकाशांत शब्दविषय, वायूंत स्पर्शविषय, तेजांत रूप, आपांत रस, पृथ्वींत गंध, याप्रमाणें हीं पंचविषयात्मक पंचभूतें व भौतिकत्वें चार खाणी, व ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत सर्व पदार्थांत पांचच विषय आहेत. जितकें साकार रूपास आलें तितकें रूप नेत्रास दृश्य झालें; म्हणून श्लोकांत रूपादि असें म्हटलें आहे. कारण रूप तेथें चारी विषय आहेत. रूप ओळखण्याकरितां जीवानें नामाची कल्पना करून हें अमुक असें उगाच नांव ठेविलें. रूप तेथें शब्द आहे, स्पर्श आहे, रस आहे व गंध आहे, सर्वांनीं तेथें वस्ती केली म्हणून त्यास भौतिक म्हणतात. साकारांत श्रोत्रामुळें शब्द हे नांव आलें. त्वचेमुळें स्पर्श उत्पन्न झाला. चक्षूमुळें रूप नांव आलें. रस जिव्हेमुळें नांव आलें. घ्राणामुळें गंध हें नांव आलें. याप्रमाणें पांच प्रकारचा भाव जीवानें कल्पिला. याप्रमाणें ईश्वरानें जे जे पदार्थ उत्पन्न केले, तेथें पंच विषयांची वस्ती आहे. स्वर्ग, मृत्यु, पाताळ या लोकांत, खालीं वर जितकें ब्रह्मांड आहे तितक्यांत, पंचभूतांवाचून अणुरेणूही नाहीं व पांच भूतांखेरीज सहावा पदार्थ ब्रह्मां-

पृथ्वी आदि हीं मुख्य भूतें । आणि भूतांपासून भौतिकें समस्तें । हे उभयही अनुक्रमें राहते । जाले ब्रह्मगोळीं ॥ २१ ॥
असो इतुकेंही ईशनिर्मित । रूपादि विषयात्मक समस्त । हें दृश्य परी अबाधित । अतीत बंध मोक्ष ॥ २२ ॥
कवणासी बांधी ना सोडवी । उगीच निर्बाधरूपें असावी । यावरी बंधनरूपता उभवावी । कल्पित जीवें ॥ २३ ॥
सहजरूपादि हें निर्माण । याच्या ठायीं जीव हा आपण । उभविता जाला दोषगुण । तेणेंचि बंध पावला ॥ २४ ॥

## गुणदोषादिविकल्पाबुद्धिगाःक्रियाः ॥

जीवकृत म्हणजे बुद्धीनें केलें । व्यापारादि नामभेद कल्पिले । तेंचि किमात्मक पाहिजे ऐकिलें । मुमुक्षें त्यागार्थ ॥ २५ ॥
गुण म्हणजे हें हें चांगुलें । हें ओंगळ तें तें दूषिलें । येणेंरीतीं जीवें कल्पिलें । गुणदोषात्मक ॥ २६ ॥
हे प्रिय पदार्थ हे अप्रिय । हें सुखकर हें दुःखद होय । हे अनुपयोगी हे हे उपाय । हे गुणदोष कल्पना ॥ २७ ॥
हे पुण्यात्मक असती । हे पापात्मक ओळखिती । हे ग्राह्य हे अग्राह्य असती । हे गुणदोष कल्पना ॥ २८ ॥
हें वंद्य निंद्य उंच नीच । हे सफळ हे निर्फळ आहाच । हे थोर हे सानसे उगेच । हे गुणदोष कल्पना ॥ २९ ॥
हे सुंदर हे ओखटे । हे हे श्रीमान हे करंटे । हे वडील हे असती धाकुटे । हे गुणदोष कल्पना ॥ ३० ॥
हे सजातीय हे विजातीय । हे चंचल हा जड प्रकार होय । ही स्त्री नपूंसक पुरुष होय । हे गुणदोष कल्पना ॥ ३१ ॥
हे स्वकीय हे परके । हे आप्त माझे हे येर असिके । हा मी तो तूं हें हें निकें । हे गुणदोष कल्पना ॥ ३२ ॥
हे स्वामी हे सेवक । हा राजा हे येर रंक । हा अधर्मी हा धार्मिक । हे गुणदोष कल्पना ॥ ३३ ॥
हे कीटक ओंगळ अधम । हे पतंगादि मध्यम । हे पानकिडे किती उत्तम । हे गुणदोष कल्पना ॥ ३४ ॥
हे हिवरादि वृक्ष अधम । बोरी बाभळी हे मध्यम । धात्री शमी पिंपळ उत्तम । हे गुणदोष कल्पना ॥ ३५ ॥
काउळे होले हे पक्षी अधम । चिमण्या साळ्यादि मध्यम । रांवे नीळकंठादि उत्तम । हे गुणदोष कल्पना ॥ ३६ ॥
हे श्वानशुकरादि अधम । हे अश्वमहिषादि मध्यम । हे गायहरिणादि उत्तम । हे गुणदोष कल्पना ॥ ३७ ॥
हे अंत्यजादि अधम । हे शूद्र गोपादि मध्यम । हे विप्र आणि द्विज उत्तम । हे गुणदोष कल्पना ॥ ३८ ॥
हे दैत्यराक्षसादि अधम । हे पितरगंधर्वादि मध्यम । हे देव सर्वांत उत्तम । हे गुणदोष कल्पना ॥ ३९ ॥
यक्षगंधर्वादि अधम । इंद्रादि देव हे मध्यम । विष्णु आदि हे उत्तम । हे गुणदोष कल्पना ॥ ११४० ॥
ऐसेचि तृण पाषाणाआंत । अथवा संपूर्ण वस्तुजात । उत्तमाधम भाव संकेत । हे गुणदोष कल्पना ॥ ४१ ॥

---

डांत नाहीं. पृथ्वी अदिकरून पंचभूतें आणि भूतापासून झालेलीं भौतिकेंही दोन्ही ब्रह्मांडांत आहेत. इतके सर्व रूपादि विषयात्मक सर्व दृश्य ईश्वरनिर्मित आहे, व तें अबाधित, बंधमोक्षातीत आहे. तें कोणास बांधीत नाहीं व सोडवीत नाहीं. त्यावर बंधनरूप कल्पना जीव कल्पितो. रूपादिक सहज निर्माण झाले आहेत. यांवर जीव, दोष व गुण पहातो त्याचे योगानें जीव बंधन पावतो.

जीवकृत म्हणजे बुद्धीनें केलेले व्यापारादिक, नामभेद तिनें कल्पिलेले आहेत, ते कशा प्रकारचे आहेत, हें जाणून त्यांचा त्याग मुमुक्षूनें केला पाहिजे; म्हणून येथें ते सांगतों. गुण म्हणजे हें अमुक एक चांगलें हें अमुक एक वाईट याप्रमाणें जीवानें गुणदोषात्मक कल्पना केलेली आहे.

**गुणदोष कल्पना—( जीवकृत )**—१ प्रिय व अप्रीय २ सुखदायक व दुःखदायक ३ अनुपयोगी व उपयोगी ४ पुण्यात्मक व पापात्मक ५ ग्राह्य व अग्राह्य ६ वंद्य व निंद्य ७ उंच व नीच ८ सफळ व निष्फळ ९ थोर व लहान १० सुंदर व वाईट ११ श्रीमंत व गरीब १२ वडील व धाकटे १३ सजातीय व विजातीय १४ चंचल व जड १५ स्त्रीपुरुष व नपूंसक १६ हे आप्त व हे परके १७ हा मी व तो तूं १८ हे स्वामी व हे सेवक १९ हा राजा व हा रंक २० हा धर्मी हा अधर्मी २१ हा पानकिडा उत्तम व हे पतंग मध्यम हा किडा ओंगळ २२ हिंवर, अधम, बोरी बाभळी मध्यम, धात्री शमी पिंपळ हे उत्तम २३ कावळे अधम, चिमण्या मध्यम, पोपट उत्तम २४ हे कुत्रे, डुकर अधम, घोडे, टोणगे मध्यम, गाय, हरीण उत्तम २५ हे महार अधम, शूद्र गोपादिक मध्यम, विप्रादिक उत्तम २६ हे दैत्य अधम, हे पीतर गंधर्वादि मध्यम, हे देव उत्तम २७ यक्ष गंधर्वादि अधम, इंद्रादि देव मध्यम, विष्णुआदि देव हे उत्तम २८ अशी ही उत्तम, मध्यम, अधम त्रिप्रकारें कल्पना आहे.

येथें शंका ऐसी करिसी । कीं हे निर्माणचि जाली ऐशी । जैसियासी कल्पना करिता तैशी । दोष तो कोणता ॥४२॥
तरी ययाचें उत्तर ऐकावें । जाले असती तैसे स्वभावें । तयावरीच वाउगे भाव कल्पावे । उत्तमाधम मध्यम ॥ ४३ ॥
पाहेपां एकचि पाणी असतां । हे ओहळ अधम मध्यम सरिता । भागीरथी आदि उत्तम तत्वतां । हेचि गुणदोष ॥ ४४ ॥
प्रेताग्नि तो असे अधम । सहज अग्नि तो मध्यम । होमादिकांचा तो उत्तम । हेचि गुणदोष ॥ ४५ ॥
हा कर्कश वायु अधम । हा समान् वायु मध्यम । हा मंदवायु शीतळ उत्तम । हेचि गुणदोष ॥ ४६ ॥
हें मेघें आकाश दूषिलें । हें पहा कैसें असे स्वच्छ जालें । या रीती एकासीच भाविलें । हेचि गुणदोष ॥ ४७ ॥
हे भूमि किती पवित्र । हे पहा कुश्चळ अपवित्र । तैसेंचि कुग्राम हें क्षेत्र । हेचि गुणदोष ॥ ४८ ॥
ऐसेंचि अवघें कर्म धर्म क्रिया । आश्रम गुण विद्या अविद्या । हें हें चांगुलें हें हें वायां । हेचि गुणदोष ॥ ४९ ॥
हा सुदिन हा दुर्दिन । कुमुहूर्त भाऊन । उगाचि संशयीं पडे आपण । हेचि गुणदोष ॥ ५० ॥
असो ऐसें किती बोलावें । धरणीही लिहितां न पुरवे । परी अल्प संकेतें समजावें । सर्वही गुण दोषात्मक ॥ ५१ ॥
येथें हें कल्पिसी ऐसें । गुणदोष वेदेंचि सांगितले जैसे । तैसेंचि जीवही भावीतसे । तरी बाध तो कोणता ॥ ५२ ॥
तरी याचें उत्तर ऐकावें । जीवें आवडतें उत्तर घ्यावें । न आवडे तें तें अव्हेरावें । वेदवचन जरी ॥ ५३ ॥
वेदवचनें गुणदोष केले । म्हणोनि तेंचि असे स्वीकारिलें । तरी काय हें वचन नाहीं ऐकिलें । तें कां न घ्यावें ॥ ५४ ॥
गुणदोष पाहणें तो दोष । गुणदोष न पाहणें हा गुण विशेष । तरी या वचनें कां निर्दोष । होऊन न परतावें ॥५५॥
येथें भाविसी अंतःकरणीं । का बहुवचनें गुणदोषालागुनी । येखादें वचन असतां निवर्तनी । प्रमाण कैसें घ्यावें ५६
तरी गोत्रज मरता सुतक धरावें । ऐसें कश्चित वचन असेल स्वभावें । जें जनीं बळकट धरावें । स्वप्नीं न विसरतां ५७
आणि ब्रह्मचि जीव अभिन्नपणीं । अनंत या वाक्याच्या आयणी । तरी कां सहसा न मानिती कोणी । तस्मात आवडे तें शास्त्र
असो पदार्थमात्रासी गुणदोष । कल्पून घेतसे शोक हर्ष । हेचि बुद्धीची कल्पना विशेष । निर्मित जीवाचें ॥ २९ ॥

---

शंका–जसे उत्पन्न झाले त्यास तशी कल्पना केली असतां दोष कोणता आहे असें म्हणशील तर ते पदार्थ तसे झाले आहेत खरे, परंतु त्यांवर उत्तम, अधम, मध्यम कल्पना करणें; हाच गुणदोष आहे. एकच पाणी असतांना ओहोळ अधम, नदी मध्यम, भागीरथी उत्तम २९ प्रेताग्नि अधम, सहज अग्नि मध्यम, होमाग्नि उत्तम ३० कर्कष वायू अधम, समान वायू मध्यम, मंद शीतळ वायू उत्तम ३१ मेघानें व्याप्त आकाश अधम, थोडे मेघ सुटे तें आकाश मध्यम, स्वच्छ आकाश उत्तम ३२ कुश्चळ भूमि अधम, साधारण भूमि मध्यम, पवित्र भूमि उत्तम ३३ कुग्राम अधम, ग्राम मध्यम, क्षेत्र उत्तम ३४ हें चांगलें उत्तम, हे मध्यम मध्यम, हे वाईट वाईट ३५ सुदीन उत्तम, दुर्दीन मध्यम, कुदीन अधम ३६ कुमुहूर्त अधम, मुहूर्त मध्यम, सुमुहूर्त उत्तम.

उत्तम वाईट ही गुणदोषकल्पना मनुष्यादि सर्व प्राण्यांवर, दैत्य,राक्षस,देव,पीतर,गंधर्व, यक्ष, यांवर, तृण पाषाणादी सर्व वस्तूंवर, कर्म,धर्म, किंवा आश्रम गुण विद्या, अविद्या यांवर जीव करितो.

शंका–अशी कल्पना होईल कीं वेदानेंच गुणदोष वर्णिले आहेत, तेव्हां याची जीवास बाधा कां ?

उत्तर–जीव, वेदवचन असतांही न आवडेल तर त्याचा त्याग करितो व वेदवचन असतांही आवडेल तर तें घेतो. म्हणजे वेदवचन असतांही मनास वाटेल तें करितो. यावरून वेदवचनाचा तरी आधार दाखवून काय उपयोग. गुणदोष पहाणें तो दोष; न पाहाणें तो गुण. असें असतां गुण घेऊन निर्दोष कां होत नाहीं. ज्यापेक्षां निर्दोष होत नाहीं, त्यापेक्षां, जीवाकडे दोष आहे. कारण वेदानें गुणदोष पाहूं नये असें सांगितलें असतां तें वचन घेत नाहीं. तूं कदाचित् असें म्हणशील कीं, निषेधाचीं वचनें थोडीं, पण स्विकाराचीं वचनें पुष्कळ आहेत म्हणून तसें करण्यांत दोष नाहीं.

गोत्रज मेल्यास सुतक धरावें, असें कोठें एखादें ठिकाणीं वाक्य असतां तें रात्रंदिवस सर्वांचे ध्यानींमनीं असतें, पण जीव ब्रह्म आहे याबद्दल शेकडों वाक्यें असतांही कोणी मानीत नाहींत. यावरून मनुष्यें आवडतेंच शास्त्र घेतात. तशानें त्यांचें सशास्त्र करणें कसें होईल ? जर सशास्त्र करणें होत नाहीं तर दोष लागेलच.

जीव गुणदोष कल्पितो हें एक जीवकृत. दुसरें त्या गुणदोषानें शोक हर्ष मानितो, हीच बुद्धीची विशेष कल्पना; व हेंच जीवानें निर्मिलेलें.

पूर्वी ईशनिर्मित जितकें । भोगाचे उपेगा आणी तितुकें । हेंचि जीवाचें करणें असिकें । कल्पनायोगें ॥ ११३० ॥
जैशी बापें कन्या निर्मिली । ते भर्त्यासी भोग्य जाली । तैशी ईश्वरें सर्व सृष्टि केली । ते भोगा आली जीवाचे ३१
येक स्त्री निर्मिली ईश्वरें । तेथें कल्पना हे करिती सारे । त्यांत कवणाचें मानावें खरें । हें बरें पहा ॥ ३२ ॥
बंधु ह्मणे हे माझी भगिनी । पुत्र ह्मणे हे माझी जननी । भर्ता ह्मणे हे माझी पत्नी । भोग्य क्रीडेसी ॥ ६३ ॥
देवर म्हणे भ्रातृभार्या । पितरें म्हणताति कन्या तया । सासू जाली असे जांवया । विहिण व्याह्याची ॥ ६४ ॥
ऐसे कितेक कितेकापरी । बोलताती स्वजनें सारीं । परंतु एकाचि असे जे नारी । ते भेदावली नाहीं ॥ ६५ ॥
परी हे माझी माझी म्हणून बैसले । सदृढ प्रेमाचें बंधन पडिलें । ते मेलिया रडती आपणही मेले । सुखदुःखें शिणोनी
परी अज्ञानें वासना बेडी । पडिली ती न सुटे सांकडी । उगीच जन्मती मरती बापुडीं । उंच नीच योनी ॥ ६७ ॥
येथें तुझी होईल भावना । कीं जीवें उगीच केली कल्पना । परी दुजी कोणती केली रचना । ईशनिर्मितावरी ॥ ६८
पहिली स्त्री असतां खरी । येणें कोणती निर्मिली दुसरी । आणि भावनेनें सुखदुःखा माझारी । कैसा पडे ॥ ६९ ॥
तरी या आक्षेपाचें उत्तर । दिधलें पाहिजे साचार । आधीं जीवें निर्मिलें तो प्रकार । पुढें बंधनरूप बोलूं ॥ ११७०॥
ईशें निर्मिली मांसमयी । ते गोचर असे इंद्रियसमुदायीं । दुजी जीवें ही मनोमयी । निर्मिली अंतरीं ॥ ७१ ॥
मांसमयी सान्निध नसतां । अथवा ते मरोनिही जातां । परी मनोमयीच वासने आंतौता । स्मरतां उभी राहे ॥ ७२ ॥
मांसमयी चक्षूनें पहावी । मनोमयी मनें आठवावी । ते भासतांचि तळमळी जीवीं । आहा भेटेल कधीं ॥ ७३ ॥
त्या तळमळीनें परमार्थ नातुडे । आणि येथें स्त्रीसुख न जोडे । परी मरतांचि पुनःपुन्हां सांकडें । जन्ममृत्यूचें ७४ ॥
मांसमयीनें येथें बांधिलें । सोडून न जाती कांहीं केलें। मनोमयीनें बंधन पडिलें । परलोकाचें ॥ ७५ ॥
तस्मात् मनोमय निर्मित जीवाचें । भिन्न निर्मिताहून ईशाचें । आणि याहूनही जीवसृष्टीचें । प्रत्यक्षपण असे ॥ ७६
तृण पाषाणाचीं घरें करावीं । मृत्तिकेच्या धातु निपजवीं । धातूचीं पात्रें नगें घडावीं । बहु कारागिरीनें ॥ ७७ ॥

---

जीव, ईश्वरानें उत्पन्न केलेल्या वस्तूपैकीं जितकी भोगाचे उपयोगीं येणारी वस्तू तितकी-वर तो कल्पना करितो. जसें:–बापानें कन्या उत्पन्न केली ती नवऱ्यास भोग्य झाली; तशी ईश्वरानें सर्व सृष्टि केली ती जीवास भोगावयास उपयोगी झाली. ईश्वरानें एक स्त्री उत्पन्न केली तिच्यावर किती कल्पना झाल्या त्या पहा.—यांत खरी कोणाची मानावी ? भाऊ म्हणतो माझी बहीण, मुलगा म्हणतो माझी आई, नवरा म्हणतो माझी बायको, दीर म्हणतो माझी वहिनी, आईबाप म्हणतात आमची मुलगी, जांवई म्हणतो माझी सासू, व्याही म्हणतो माझी विहीण, याप्रमाणें तीवर अनेक प्रकारें नातीं आलीं तरी ती निरनिराळी झाली नाहीं. पण नातेवाईक तिला माझी म्हणून बसले, त्यामुळें त्यांस प्रेमाचें दृढबंधन पडलें. म्हणून ते ती स्त्री मेल्यावर रडतात व आपणही सुखदुःखानें शिणून मरतात. परंतु अज्ञानानें वासनेची बिडी पडली ती सुटत नाहीं. यामुळें त्यांस मेल्यावर उंच नीच योनींत जन्म घ्यावा लागतो.

**शंका**—तूं म्हणशील कीं जीवानें उगीच कल्पना केली. पण ईशनिर्मिताप्रमाणें दुसरी तर उत्पन्न केली नाहीं ना ? मग तो भावनेनें सुखदुःखीं कसा पडेल ?

**उत्तर**–(जीवकृत)–ईश्वरानें मांसमयी स्त्री उत्पन्न केली, ती सर्व इंद्रियांस गोचर होते, त्यामुळें तिचे ध्यासानें जीवानें अंतरीं दुसरी मनोमयी कल्पिली. तिचें स्मरण झालें असतां ती तत्क्षणींच वासनेंत उभी रहाते. तेव्हां मांसमयी स्त्री जवळ असो अगर नसो किंवा मरून जावो; तिची, त्यावेळीं स्मरण करण्यास गरज लागत नाहीं. मांसमयी डोळ्यानें पहावी आणि मग मनोमयी मनानें आठवावी. आठवून भासल्यावर ती कधीं भेटेल अशी तळमळी वाटावी, असा साहजिक धर्म आहे. यापासून येथें स्त्रीसुखही प्राप्त होत नाहीं व परमार्थ घडत नाहीं; इतकेंच नव्हे तर तिला आठवून मेलें असतां पुन्हां पुन्हां जन्ममृत्यु प्राप्त होतात. मांसमयीनें येथेंच बांधिलें, परंतु मनोमयीनें परलोकींही बंधन पडलें. म्हणून ईशनिर्मिताहून मनोमयी जी, जीवनिर्मित सृष्टि, ती फारच बाधक. कल्पित जशी जीवसृष्टि सांगितली, अशीच जीवसृष्टि प्रत्यक्षही आहे. ती ही कीं, तृणपाषाणांचीं घरें, मृत्तिकेच्या धातूचीं पात्रें मोठ्या कारागिरानें तयार केलीं;

अनेकापरीचें करणें नाना । कल्पनेनें करिती रचना । तितुकें बोलतां तें सरेना । कर्तव्यता जीवाची ॥ ७८ ॥
परी जितुकें स्थूलानें निर्मिलें । तेणें जीवासी नाहीं बांधिलें । निर्बाध असती पदार्थ जेतुले । ईश सृष्टापरी ॥ ७९ ॥
मनोमयाची जे प्रीति । हेचि जीवासी बंधनरूप असती । हेंचि सांगू एका दृष्टांतीं । निर्बाध बाधक ॥ ११८० ॥
पुत्र देशांतरा गेला । तो स्वतःसिद्ध सुखरूप असिला । परी कोणीं वंचकें सांगितलें कीं मेला । तेव्हां रडे अट्टहास्यें ८१
अथवा पुत्र मृत्यूही पावतां । नायकें जोंवरी त्याची वार्ता । तोंवरी न रडे सुखें वर्ततां । दुःख तें नव्हो ८२
पुत्राचा मृत्यु नव्हे दुःखकारी । अथवा वांचणें नव्हे सुखकारी । तस्मात् कल्पनाचि मात्र सारी । सुखदुःखप्रद ॥ ८३ ॥
कल्पनेनें कांहीं एक भावावें । तेव्हांचि सुखदुःखादि व्हावें । ना तरी पदार्थ असतां न घडावें । सुखदुःख कदा ॥८४॥
निद्रेंत कवणाचे पुढें मागें । स्त्री सर्प दोनी असतां प्रसंगें । परी ते कल्पनेवीण दंगे । सुखदुःखाचे न होती ॥ ८५ ॥
एवं जीवसृष्टि तेचि बाधक । ईशसृष्टि निर्बाधक । हें जाणिजे निश्चयात्मक । सत्य सत्य त्रिवाचा ॥ ८६ ॥
एतदर्थ तितीर्षु साधक जन । अनेकधा श्रवणादि अभ्यासेंकडून । करिती जीवद्वैताचें हनन । तेव्हांचि सुखी होती ॥
निःशेष हानि जीवद्वैताचि । हेचि पराकाष्ठा जीवनन्मुक्तीची । मिथ्यात्वदृष्टि ईशसृष्टाची । निःशेष हानि नको ॥ ८८ ॥
ईशसृष्टीचे पदार्थ जितुके । परी ते द्विविध असती तितुके । मिथ्यात्वें पाहणें तेचि निर्बाधकें । साधकें गुरुशास्त्रें ८९
गुरु सच्छास्त्रावीण कांहीं । साधका तरणोपाय नाहीं । म्हणोनि साधकत्व तया पाहीं । उपयोगी परमार्थी ॥ ९० ॥
तैशीच जीवसृष्टि दोन रीती । शास्त्रीय अशास्त्रीय म्हणविती । शास्त्रीय अहंब्रह्मास्मि अनुभूति । आणि संपत्ति श्रवणादि
हे जीवसृष्टि परी उपयोगी । मुक्ति येणेंचि जीवालागी । यावीण अशास्त्रीय जे वाउगी । त्यागावी साधकें ॥ ९२ ॥
अशास्त्रीयाचेही प्रकार द्विविध । एक मंद एक तीव्र द्वंद्व । तीव्र ते जाणावे कामक्रोध । मंद ते मनोराज्य ॥ ९३ ॥
मनोराज्य तें हे कल्पना । जे सांगितली उंच नीच भावना । तिचा परिणाम जे करी यातना । कामादि जीवासी ९४
तस्मात् कामादि आणि मनाची । कल्पनारूप सृष्टि जीवाची । त्यागिली पाहिजे अंतरींची । निपटूनि साधकें ॥९५ ॥
उंचनीच भावरूपें कल्पना । हें जागृतीचे विषयसुख नाना । अहंब्रह्मास्मि प्रतीति गहना । हे मोक्षप्रद सुखद ॥ ९६ ॥

---

तसेंच कल्पनेनें अनेक प्रकारचे पदार्थ तयार केले. यांत जितकें स्थूलानें केलें तितकें ईश्वरनिर्मिताप्रमाणें निर्बाधक आहे. पण मनोमयीची प्रीति हीच जीवास बंधनरूप कशी आहे, तें उदाहरणासह सांगतों.

**उदाहरण**–कोणा एकाचा मुलगा दूरदेशीं होता. तो तेथें सुखरूप असतां कोणी ठकानें येऊन सांगितलें कीं, तुमचा मुलगा अमुक ठिकाणीं होता तो मेला. तेव्हां त्याचे घरचीं सर्व मनुष्यें रडतात; अथवा तो मुलगा खराच मेला असून त्याचे मरणाची बातमी कळली नाहीं तोंपर्यंत सुखानें चैन करितात; यावरून पुत्राचा मृत्यु दुःखकारक नव्हे, व त्याचें वाचणें सुखकारक नव्हे, तर सुखदुःख देणारी कल्पनाच आहे. कल्पनेनें कांहीं एक भावना करावी तेव्हां सुखदुःख होतें. तसें न केलें म्हणजे पदार्थ असतांही कधीं सुखदुःख होत नाहीं. पहा, झोंपेंत कोणाच्याही मागें किंवा पुढें अथवा दोहों अंगांस प्रसंगोपात स्त्री किंवा सर्प यांपैकीं कोणीही जवळ असतां, एक कल्पना नसल्यामुळें स्त्रीपासून सुख व सर्पापासून दुःख हीं होत नाहींत. म्हणून मनोमयी जीवसृष्टि बाधक, व ईश्वरसृष्टि निर्बाधक आहे. याकरितां साधक हा जीवद्वैत घालवून सुखी होतो. जीवनमुक्तीची पराकाष्ठा हीच आहे कीं, जीवद्वैताची निःशेष हानि झाली पाहिजे. ईश्वरसृष्टीची हानी नको. तर तिजविषयीं मिथ्यादृष्टि पाहिजे.

जितके ईश्वरसृष्टीचे पदार्थ आहेत, तितके दोन प्रकारचे आहेत. ते मिथ्या पहाणें हेंच निर्बाधक. त्यांत गुरु, शास्त्रें साधकत्व गुरु, व सच्छास्त्र यांवाचून साधकास तरणोपाय नाहीं, म्हणून त्यास परमार्थ करण्यास साधकत्व उपयोगी आहे. जीवसृष्टि दोन प्रकारची, एक शास्त्रीय व दुसरी अशास्त्रीय. अहंब्रह्मास्मि अनुभव, व श्रवणादि संपत्ति ही शास्त्रीय. अशा प्रकारची जीवसृष्टि इचे योगानें जीवाला मुक्ति मिळते. म्हणून ही सृष्टि पाहिजे. अशास्त्रीय जी सृष्टि ती बाधक आहे, म्हणून ती नको. अशास्त्रीय सृष्टि दोन प्रकारची आहे. एक मंद व एक तीव्र. द्वंद्व काम क्रोधादिक ती तीव्र, मनोराज्यादिक ती मंद.

उंचनीच भावनारूप कल्पना तेंच मनोराज्य. ही मनोराज्यरूपी कल्पना जीवास कामादिकानें यातना करिते, म्हणून ही तीव्र सृष्टि साधकानें टाकिली पाहिजे. उंचनीच भावरूपानें जी कल्पना हें नानाप्रकारचें जागृतीचें सुख, व अहंब्रम्हास्मि प्रतीति हें मोक्ष देणारें सुख.

एवं जागृतीपासून जीवाची । मोक्षापर्यंत रचना साची । त्यांत त्यागणें आग्रहणाची । वेवादृणी सांगितली ॥ ९७ ॥
तैसेचि ईशसृष्ट पदार्थजात । ईक्षणापासोनि प्रवेशांत । रूपरसादि हे विख्यात । सांगितले स्पष्ट ॥ ९८ ॥
असो रूपरसादि या पदार्थांवरी । जीव कल्पनारूप क्रिया सारी । हे बुद्धिगत भावना खरी । नसोनि भावी जीव ९९

**ताःमतेःक्रियाःविषयैःसार्धंचितिःभासयंती ॥**

त्यां क्रिया ज्या बुद्धिवृत्तीच्या । विषयासहित कल्पना जीवाच्या । तितुक्या येकदांचि प्रकाशवी साच्या स्वप्रकाशें चिद्रूपता
विषय तेंचि रूपरसादिकें । साकारत्वें दृश्य जितुकें । ब्रह्मादि स्थावरांत अनेकें । सान थोर ईशजनित ॥ १ ॥
तयावरी जीवाची कल्पना । जे कां जीवसृष्टीची रचना । मनोमयात्मक भास नाना । प्रिय द्वेष्य उपेक्ष्य ॥ २ ॥
ऐसे जीव ईशसृष्ट दोनी । प्रकाशी आत्मप्रभा चित्खाणी । दुजें नसतां साह्य उपकरणी । येकपणी स्वतेजें ॥ ३ ॥
जैसा सूर्य आकाशींचा । दुजा साहाकारी तरी कैंचा । एकलाचि स्वप्रकाशें साचा । पदार्थमात्र प्रकाशी ॥ ४ ॥
भिंती माळवदें अंगणें । जैसा आकार त्रिचतुष्कोणें । त्यामाजी घट ठेविले भिन्नभिन्ने । सजळें भरोनी ॥ ५ ॥
त्या जळामाजीं प्रतिबिंबें पडतीं । दुसरे सूर्यऐशींची वाटती । त्याची झळझळ पडली भिंती । सामान्य प्रकाशावरी ६
असो भिंती आणि घट सजळ । प्रतिबिंब आणि भिंती झळझळ । येकदांचि प्रकाशी सकळ । सूर्य माध्यान्हींचा ॥७॥
तैसाचि आत्मा सूर्य जगाचा । स्थावर आदि जंगमाचा । जया तळीं सर्वा उत्पत्तीचा । प्रकार जाला ॥ ८ ॥
ऐसा ब्रह्मांडरूप हा मठ । भिंती रूपरसादि ह्या नीट । त्यामाजी चारी खाणी घट । लिंगजळें भरिलें ॥ ९ ॥
अथवा स्थूल मांसमय भिंती । त्यांत अविद्या घट अव्याकृति । जळ तेंचि बुद्धीची वृत्ति । आदिकरोनि सत्रा १२१०
त्या बुद्धीमाजी आत्मसूर्याचें । प्रतिबिंब पडलें जेवीं साचें । तेंचि रूप मिथ्यात्वें जीवाचें । चिदाभास नांवीं ॥ ११ ॥
त्या प्रतिभासाची झळझळ । रूपरसादिकांवरी पडे सकळ । तेचि कल्पना उंच नीच बरळ । भावना जीवाची ॥ १२ ॥
पहिलें रूपादि ईशनिर्मित । वरती जीवाचें भासरूप जनित । आणि बुद्धिआदि जीवासहित । भासवी चित्प्रभा ॥१३॥
जैसे भिंती घट जळासहित । प्रतिबिंब आणि भिंती झळकत । हें इतुकेंही एकदांचि प्रकाशित । निजतेजें सूर्य॥१४॥
तैशी स्थूल अविद्याबुद्धि । प्रतिभास जीवही त्यामधीं । रूपरसादि ईशजनित आधीं । त्यावरी कल्पना जीवाची १५॥
इतुक्यासहित जितुकें निर्माण । कार्य अथवा अज्ञान कारण । ज्ञान किंवा विपरीत ज्ञान । स्वयें प्रकाशी चित्प्रभा १६

---

याप्रमाणें जागृतीपासून मोक्षापर्यंत जीवसृष्टीची रचना सांगितली व त्यांत कोणती ग्राह्य व कोणती त्याज्य तेंही सांगितलें. तसेंच ईश्वरसृष्टि ईक्षणापासून प्रवेशापर्यंत, जी रूपरसादिकरून विख्यात आहे ती स्पष्ट सांगितली.

जीव रूपरसादि पदार्थांवर म्हणजे दृश्यावर अनेक प्रकारचे भासरूपानें व प्रिय, द्वेष्य, उपेक्षारूपानें मनोमयात्मक कल्पना करितो ती जीवसृष्टि व रूपरसादि ही ईशसृष्टि. ह्या सर्वांस चित्प्रभा आपल्या प्रकाशानें प्रकाशिते. ही चित्प्रभा जसा सूर्य आपल्या प्रकाशानें अनेक त्रिकोण चौकोनादि आकाराचे मठ त्या मठांच्या भिंती व मठांत ठेविलेले सजल घट व त्या घटांतील प्रतिबिंबित सूर्य व त्या सूर्याच्या भिंतीवरील झळझळी ह्या सर्वांस एकदांच प्रकाशितो, तसा स्वयंप्रकाश चिद्रूप आत्मा ह्या स्थावरजंगमात्मक ब्रह्मांडरूपी मठ त्यांच्या रूपरसादि ज्या भिंती त्यास व ब्रह्मांडमठांतील लिंग देहरूपी भरलेल्या चारी खाणीरूपी घटास व त्यांतील आत्मप्रतिबिंबरूपी जीवास व त्यांच्या उंचनीच मानणें ह्या झळझळीस चित्प्रभा एकदांच प्रकाशिते.

अथवा स्थूल मांसदेह भिंती, त्यांत अव्याकृति जी अविद्या, ते घट, त्या घटांत बुद्धिवृत्तीचे सत्रा प्रकार हेंच पाणी भरलेलें आहे, त्यांत आत्मारूपी सूर्य त्याचे प्रतिबिंब पडलें, त्यास चिदाभास म्हणतात; तेंच जीवाचें स्वरूप त्या प्रतिभासरूप जीवाची रूपरसादिकांवर झळझळ पडते, म्हणजे तो उंचनीच भावना करितो.

ईश्वरानें प्रथम रूपरसादि उत्पन्न केलें. त्यांवर जीवानें भासरूप उत्पन्न केलें. यास, व बुद्धि आणि जीव यांस, चित्प्रभा भासविते. जसें:—सूर्य, भिंती, घट, पाणी, प्रतिबिंब, आणि भिंतीची झळझळ हीं आपले तेजानें एकादांच प्रकाशितो; तसें स्थूल देह, त्यांतील अविद्या, बुद्धि, तींत दिसणारा प्रतिभास, रूपरसादिक व त्यावर भासरूप जीवानें कल्पिलेलें, यांसहित जितकें उत्पन्न झालेलें कार्य, अथवा अज्ञान कारण ज्ञान अथवा अज्ञान, यांस चित्प्रभा प्रकाशिते.

मूळ मायेपासून तृणांत । गुणविषय पंचभूत । ईश आणि ईशजनित । आत्मप्रकाशें भासती ॥ १७ ॥
बुद्धीपासून विषयांत कल्पना । व्यापार मनोमय जे नाना । जीवजनित आणि जीवपणा । आत्मप्रकाशें भासती १८॥
एवं साराही इतुका आभास । वाउगा अज्ञानें भासला भास । परी आत्मा हा येकदांचि सर्वांस । आत्मप्रकाशें भासवी१९
या श्लोकींचें निरूपण ऐसें । सत्यमिथ्या निवाडिलें असे । आणि ईश जीवांचें निर्मित जैसें। तेंही स्पष्ट जालें १२२०
मुख्य सामान्य आणि आभास। निवडिलें कळावया साधकास । आणि अज्ञानकाळींही चिद्रुपास। लोप नसे तें स्पष्ट जाहलें
ऐसें ऐकतांचि रविदत्त । साष्टांग घाली दंडवत । जी जी महाराज हर्षें स्तवित । प्रश्न हेतु ठेऊनी ॥ २२ ॥
द्वैत ईशाचें आणि जीवाचें । भिन्न भिन्न साकार मनोमयाचें । निरूपण जालें सकेतें त्याचें । परी अपेक्षा उरली २३
वेद आणि शास्त्रें सारीं । हे निर्माण जाहलीं बहुधा परी । यांसी ईश कीं जीव निर्माण करी । हें कळावें मज ॥२४॥
बहु बरें म्हणून श्रीगुरु । बोलते जाले करुणाकरु । यथार्थेंचि बोलिजे साचारु । निर्भीडपणें आतां ॥ २५ ॥
जीवही साकार असेना । मा साकारत्व कैसें ईशाना । हें न कळून करिती वल्गना । उभयां साकारत्वाची ॥ २६ ॥
पुरुषत्व आलें साकारत्वासी । श्वासही उत्पन्न तयासी । कल्पितां वेद होणें श्वासीं । आति विरोध कीं ॥ २७ ॥
जरी पुरीमध्यें राहिला । पुरुष नाम यास्तव जीवाला । तरीही तया अभासाला । अभाव श्वासाचा ॥ २८ ॥
तस्मात् श्वासापासून वेदाची । उत्पत्ति म्हणता साची । अपौरुषत्व यया वचनाची । हानि होय ॥ १९ ॥
म्हणोनि अज्ञानाची कल्पना । स्वीकारिली जरी वल्गना । तरी अनुभवा उणेपणा । आणी श्रुतीसी विरोध १३२०॥
यास्तव लोकवार्ता सांडावी । अनुभवें प्रतीति स्वीकारावी । तरीच हे भ्रांति निरसावी । येन्हवीं सदृढ ॥ ३१ ॥
असो स्वानुभवानुसार । बोलिजेत आहे सविस्तर । आधीं कैसा जीव कोण ईश्वर । पुढें वेद तो कैसा ॥ ३२ ॥
मागें तुजला ईशजीवाचें । रूप निवडून दिधलें साचें । परी तें तुजला कळलें नवचे । म्हणोनि पुन्हां सांगूं ॥ ३३ ॥
वृत्तिरूप माया उद्भवली । तेचि दोंप्रकारें विभागली । विद्या अविद्या जे सांगितली । ज्ञानाज्ञानरूप ॥ ३४ ॥
अविद्येंत जाणतेपणाचें । प्रतिभासलें रूप तें जीवाचें । विद्येंत प्रतिबिंब चिद्रुपाचें । तोचि ईश्वर ॥ ३५ ॥
अविद्या उपाधीमुळें जीवा । अन्यथात्वें भाव यावा । सूक्ष्मदेहाचा प्रकार व्हावा । विकार बुद्धिवृत्तीचा ॥ ३६ ॥

---

मूळ मायेपासून तृणापर्यंत गुण, विषय, पंचभूतें, ईश्वर आणि ईश्वरानें केलेलें सर्व आत्म्याचे प्रकाशानें भासतात. तसेंच बुद्धीपासून विषयापर्यंत कल्पना व नानाप्रकारचे मनोमय व्यापार हे जीवजनित पदार्थ व जीव यांस आत्मप्रभा भासविते. याप्रमाणें अज्ञानानें वावगा भासविलेला सारा आभास यांस आत्मा आपल्या प्रकाशानें प्रकाशितो.

वर सांगितलेल्या सातव्या श्लोकांत सत्यमिथ्या निवाडिलें आहे. तसेंच ईश्वर आणि जीव यांनीं केलेली सृष्टि स्पष्ट सांगितली. तसेंच सामान्य आणि आभास निवाडिले व ज्ञान काळीं चिद्रूपाचा लोप नाहीं हेंही स्पष्ट सांगितलें.

प्रश्न--वेद आणि शास्त्रें हीं ईश्वरानें उत्पन्न केलीं किंवा जीवानें केलीं ?--उत्तर--जीव साकार नाहीं, मग ईश्वर साकार कसा असेल. जीव व ईश्वर यांचे खरें स्वरूप न कळून त्यास साकार मानितात. साकारास पुरुषत्व येतें व त्यापासून श्वास उत्पन्न होतो व त्या श्वासापासून वेद उत्पन्न झाले, हें जगाचें बोलणें विरोधी आहे. कारण जीव पुरांत राहिला म्हणून त्यास पुरुष म्हणतात. तरी त्यास श्वासाचा अभाव आहे. आणि जन तर वेदाची उत्पत्ति श्वासापासून आहे असें म्हणलें, परंतु अपौरुषत्व हें वचन आहे. यास बाध येतो; करितां वर सांगितलेली अज्ञानाची श्वासापासून वेद झाले ही कल्पना जर घेशील तर अनुभव येणार नाहीं व श्रुतीस बाध येतो. म्हणून लोकांचें म्हणणें टाकावें, आणि अनुभवास येईल तें घ्यावें. म्हणूनच आम्ही स्वानुभवानुसार वरील वर्णन करितों, त्यांत प्रथम जीव कोणाला म्हणावें, ईश्वर कोणाला म्हणावें, व वेद कोणाला म्हणावें, तें सांगतों. पूर्वी तुला जीव आणि ईश्वर यांचें रूप सांगितलें; परंतु तुला तें चांगलें रीतीनें कळलें नाहीं म्हणून पुन्हां त्याचें रूप सांगतों.

### जीवाचें व ईश्वराचें रूप.

वृत्तिरूप माया उत्पन्न झाली तिचे दोन प्रकार एक विद्या, ज्ञानरूप, व दुसरा प्रकार अज्ञानरूप अविद्या. अविद्येंत जाणतेपणाचें प्रतिबिंब पडलें तोच जीव. व विद्येंत चिद्रूपाचें प्रतिबिंब पडलें तोच ईश्वर. जीवास अविद्या उपाधीमुळें अन्यथात्वें भाव आला. पुढें बुद्धीवृत्तीचा विकार जो सत्रा प्रकारचा सूक्ष्मदेह तो झाला.

बुद्धिवृत्तींत जें पडिलें । तें बुद्धि ऐसें न जाय कल्पिलें । तरी मग सत्रा प्रकारें जीवत्व जालें । कासयावरुनी ॥३७॥
बुद्धीचे विकार सत्रा असती । त्यांत प्राण जडत्वें पांच बोलती । त्या प्राणाचे श्वास उमटती । तरी ते न होती जीवाचे
अज्ञानास्तव मात्र जीवानें । देहासहित तादात्म्य धरणें । तया अभिमानत्रयाचें बोलणें । पुढें निरोपूं ॥ ३९ ॥
कल्पनारूप जीवें केलें । तें आतां जीवसृष्ट सांगितलें । जें जें योजना करून उभविलें । जागृतीपासून मोक्षांत ४०॥
असो जीवाचें रूप ज्ञानाऐसें । परी तें ज्ञान नव्हे प्रतिबिंब भासे । तें बुद्धीहूनही अनारिसें । कळावें साधका ॥ ४१ ॥
आतां ईश जो विद्यात्मकवृत्ति । त्यामाजीं प्रतिबिंबरूप वस्ती । जयाची तो सर्वज्ञ अमूर्ति । विद्येऐसाही नव्हे ॥४२॥
तया वृत्तीपासून बहु निर्मित । जालें परी तें विकारा न पावत । अन्यथा न होऊन निवांत । स्फूर्तिरूप स्फूर्ति असे ४३॥
विद्यास्फूर्ति विकारा न पवे । मा ईशें कैसें अन्यथा व्हावें । नुसधें विद्या उपाधीनें असावें । उत्पत्ति हेतु ठेउनी ४४ ॥
हिरण्यगर्भ सत्रा प्रकार । त्यांत या ईशाचें जरी बिढार । म्हणावें परी सर्वांचे विकार । सर्वज्ञा न लागती ॥ ४५ ॥
ऐसें ईशाचें जरी भासरूप । सांगितलें कळावया अल्प । तेथें श्वास ना नव्हे संकल्प । तरी योजना कैंची ॥ ४६ ॥
श्वास हे धर्म प्राणाचे । कल्पनारूप तें जीवाचें । श्वास संकल्पाविण ईशाचें । रूप नुसधें स्फूर्तिरूप ॥ ४७ ॥
तया स्फूर्तिज्ञानामुळें । भूत गुणादि जालीं सकळें । परी तें जीवेशाहून वेगळें । चंचळ जड दोन्ही ॥ ४८ ॥
आरंभीं ब्रह्मा निर्माण जाला । स्वयंभूव नामें बोलती त्याला । परी तो साकार जेणें निर्मिला । तया नांव स्वयंभू ४९
साकारावरीच दृष्टि जयाची । अज्ञानास्तव बोलतां तेची । कीं स्वयंभूव साकार विरिंचि । परी तें नव्हे ॥ १२५० ॥
अहं ब्रह्मस्फूर्ति मायेची । त्या चंचळपणीं वस्ती जाण त्याची । तेथेंचि इच्छा वसे बहुपणाची । कीं व्हावें बहुत ५१
ती इच्छा परी निर्हेतुक । मनसंकल्पादि नसती तर्क । नुसधी वृत्ति निर्विकल्पक । त्या इच्छेनें सर्व जाहलें ॥ ५२ ॥
मायास्फूर्तिसहित जाणीव । इच्छाबीजेंसी जो आठव । आदिनारायण तयाचें नांव । सविशेष स्वयंभू ॥ ५३ ॥
तयाचिये इच्छेसरिसे । भूतगुणादि होती अपैसे । चंचल तत्वादि होऊन सरिसे । स्थूळ जाला विरिंचीचा ॥ ५४ ॥
तया स्थूलामाजीं प्रवेशतां । ईशचि जाहला जीवत्वें स्वतां । मग चंचळ जड उभयतां । चळण पावले ॥ ५५ ॥

---

बुद्धीवृत्तींत प्रतिबिंबलेलें तें बुद्धीसारखें आहे असें कल्पितां येत नाहीं. मग जीवत्व सत्रा प्रकारचें झालें, हें कसें म्हणतां येईल ? जीवत्व सत्रा प्रकारचें आहे असें म्हणतां येत नाहीं मग त्या सत्रांच्या क्रिया जीवाच्या आहेत असें कसें म्हणतां येईल ?

बुद्धीचे सत्रा विकार आहेत. त्यांत पांच प्राण जडत्वानें वावरतात, तेव्हां त्या प्राणांचे श्वास उत्पन्न होतात; ते श्वास जीवाचे कसे होतील ? जीवानें अज्ञानामुळें देहासहवर्तमान, सर्वांशीं तादात्म्य धरिलें आहे, त्या तीन अभिमानांचें वर्णन पुढें करूं. सध्या कल्पनारूपजीवानें केलेली सृष्टि जागृतीपासून मोक्षापर्यंत उत्पन्न केली ती सांगितली. असो. जीवाचें रूप ज्ञानासारखें आहे. परंतु तें ज्ञान नव्हे, तर तो ज्ञानाचा प्रतिभास आहे. व तो बुद्धीवृत्तीहूनही निराळा आहे, असें साधकांस कळलें पाहिजे. आतां विद्येमध्यें चिद्रूपाचें प्रतिबिंब पडलें तोच ईश्वर, तो ईश्वर विद्येसारखा नाहीं. वृत्तीपासून पुष्कळ विकार उत्पन्न झाले त्यांचे विकाराबरोबर ईश्वर विकार पावत नाहीं. विद्यास्फूर्ति विकार पावत नाहीं, मग ईश्वर कसा अन्यथा होऊन विकार पावेल; इतकेंच आहे कीं, विद्याउपाधीनें उत्पत्तीचा हेतु ठेवून असावें, सत्रा प्रकारचा हिरण्यगर्भ, यांत जरी या ईश्वराचें बिऱ्हाड आहे, तरी सर्वांचे विकार त्यास लागत नाहींत. अशा ईश्वरास श्वास किंवा संकल्प आहे असें लावितां येत नाहीं, मग तो वेद कसे उत्पन्न करील श्वास हा प्राणाचा धर्म व कल्पना हें जीवाचें रूप आहे. ईश्वराचें रूप नुसतें स्फूर्तिरूप आहे. त्या स्फूर्तिज्ञानामुळें, पंचभूतें व तीन गुण झाले, त्यांपासून चंचळ जड झालें; हें जीवेशाहून निराळें आहे.

ब्रह्मदेव प्रथम उत्पन्न झाला, त्याला स्वयंभुव म्हणतात. परंतु त्याचा आकार ज्यानें उत्पन्न केला तो स्वयंभू व ज्या अज्ञानाची साकारावर दृष्टी आहे, ते साकार ब्रह्मदेवास, स्वयंभुव म्हणतात. परंतु तो स्वयंभुव नाहीं. अहंब्रह्मस्फूर्ति मायेची आहे, त्या मायेच्या चंचळपणांत जाणत्याची वस्ती आहे, त्यांतच बहु व्हावे अशी बहुपणाची इच्छा रहात आहे. ती निर्हेतुक इच्छा असल्यामुळें तेथें मनसंकल्प नाहीं. पण नुसती निर्विकल्पवृत्ती आहे, त्या इच्छेनें सर्व झालें. माया स्फूर्तिसहित जाणीव, इच्छाबीजेसह जो आठव त्यांस विशेष स्वयंभूव आदिनारायण म्हणतात. त्या नारायणाचे इच्छेबरोबर आपाप भूतें आणि गुण उत्पन्न झाले. पुढें चंचळ जड उत्पन्न होऊन त्याचेयोगानें ब्रह्मदेवाचा स्थूळ देह उत्पन्न झाला. मग त्या स्थूलामध्यें ईश्वरानें जीवत्वें प्रवेश केला. तेव्हां चंचळ, जड, चळण पावलें.

देहाचा चाळक तो प्राण । विषय निवडावया मन । तया संकल्पामाजीं जीवपण । आभासरूप असे ॥ ५६ ॥
पूर्वींचा जो निर्विकल्प हेतु । तोही असे बुद्धिआंतु । तोचि ईशान प्रवर्तवितु । संकल्पांसह सर्वां ॥ ५७ ॥
एवं मायेसहित ईश्वर । ससंकल्पजीव अनेश्वर । या उभयांनींही केलें बिढार । साकार सप्राण ॥ ५८ ॥
इतुका संघ जेव्हां मिळाला । देहीं प्राण वायु कळासिला । तेव्हां वर्णरूपें शब्द उठिला । ध्वनि नादासहित ॥ ५९ ॥
शब्दगुण तरी गगनाचा । परी हेलावा पाहिजे वायूचा । त्यावरी आंवाका भासरूप तेजाचा । वरी आपाचें द्रवत्व ६०
हे चाऱ्ही मिळतांही पृथ्वी पाहिजे । जडाच्या आधारें चळण पाविजे । तेव्हांचि हेलावियासरिसा उठिजे । शब्द हा वर्णात्मक
आरंभीं सामान्य ध्वनि । नादरूपें झाली उभवणी । तोचि आकार जेथून श्रेणी । पंन्नास मात्रांच्या होती ॥ ६२ ॥
अकारीं उकार मिळतां । ओकार उमटे पाहतां । मकार शेवटीं आदळतां । ॐ इति प्रगटे ॥ ६३ ॥
पहिली स्फूर्ति अर्थरूप । अहंब्रह्म जे निर्विकल्प । तेंचि प्राण आणि मनसंकल्प । मीनतां जडत्वा आली ॥ ६४ ॥
सोहं अक्षरें प्राणाच्या बळें । उठलीं त्यांत हेतु तो मिळे । तेणें सोहं शब्द हा उफाळे । हाच कीं प्रणव ॥ ६५ ॥
सकारशक्ति बीजाआंत । अकार उकार मकार मिश्रित । हे चंचळपणाचे प्रकार होत । देह उपाधीमुळें ॥ ६६ ॥
ध्वनीमाजीं चंचळ जाणता । ते अर्धमात्रा बोलिजे तत्वतां । तेथें मात्रेचा उच्चार न होतां । नुसधा नाद ॥ ६७ ॥
तिहीं मात्रांतही नाद असे । परी ते मात्राध्वनि भिन्न दिसे । त्या ध्वनींत नुसधा जाणता विलसे । तो बिंदुत्वें कल्पावा
एवं अर्धमात्रा बिंदु सहज । हाचि हकार पुरुषबीज । पहिला सकार तोचि समज । त्रिमात्रात्मक ॥ ६९ ॥
एवं अकार उकार मकार । अर्धमात्रा चौथा प्रकार । पांचवा तो बिंदु साचार । ऐशीं पांच अंगें प्रणवाचीं ॥ १२७०
परी सोहं अक्षरें जीं दोन । तेंचि प्रणव पंचांग संपूर्ण । हेंचि पहावें विचारून । साधकें अंतरीं ॥ ७१ ॥
ऐसा जो प्रणव उमटला । हाचि वेद स्वयंभ जाला । येकाक्षर ब्रह्म नाम जयाला । आणि मोक्षाचा सेतु ॥ ७२ ॥
वेद म्हणिजे जाणणिया । तें जाणतेपण या वेदराया । येर अक्षरां कल्पिणें वायां । वेद म्हणोनी ॥ ७३ ॥
तथापि शब्दाविण अर्थासी । जाणणें न घडे मुख्य जीवासी । म्हणोनी शब्दरचना व्हावयासी । पंन्नास मात्रा निर्मिल्या

---

देहाचा चालक प्राण आहे. व विषय निवडण्याकरितां मन आहे. त्या मनसंकल्पांत जीवपण आभासरूप आहे. तसेंच पूर्वींचा जो निर्विकल्पहेतु तो बुद्धींत आहे. तोच ईश्वर, संकल्पासह सर्वांस प्रवर्तवितो. याप्रमाणें मायेसहवर्तमान ईश्वर, व संकल्पासह जीव, या दोघांनीं साकार सप्राण देहांत बिऱ्हाड केलें. इतका समुदाय मिळाला व देहामध्यें प्राण कळाशिला. तेव्हां वर्णरूपानें शब्दध्वनी नादासहवर्तमान उत्पन्न झाला. शब्दगुण आकाशाचा आहे, परंतु तो चलन पावण्यास वायु पाहिजे, त्यावर तेजाचा आवांका पाहिजे व त्यावर आपाचे द्रवत्व पाहिजे, तसेंच चळणास आधार पृथ्वीचा पाहिजे. इतके मिळतील तेव्हांच हेलावल्याबरोबर वर्णात्मक शब्द उठतो. प्रथमतः नादरूपानें सामान्य ध्वनी झाली. तोच अकार त्या अकारापासून पंन्नास मात्रा उत्पन्न झाल्या. अकार उकार मिळाला म्हणजे ओमकार उत्पन्न होतो. त्यांत मकार मिळाला म्हणजे ॐ कार होतो. पहिली अर्थरूप जी अहंब्रह्मरूप निर्विकल्प स्फूर्ती तीच प्राण, मनसंकल्प मिळाल्याबरोबर जडत्वास आली. प्राणाबरोबर सोहं अक्षरें उठलीं त्यांत तो हेतु मिळाला. त्याचेयोगानें सोहं शब्द उत्पन्न झाला. हाच प्रणव. सकारशक्तीबीजांत, अकार, उकार, मकार, मिळाले म्हणजे देहउपाधीमुळें चंचलपणाचे प्रकार होतात. ध्वनीमध्यें चंचल जाणता, यास अर्धमात्रा म्हणतात. त्या अर्धमात्रेचा उच्चार न होतां नुसती नादरूप ती असते. अर्धमात्रेसारखा दुसरा तीन मात्रांत नाद आहे, पण तो मात्राध्वनी भिन्न दिसतो. ध्वनीमध्यें नुसता जाणता आहे. तो बिंदुप्रमाणें आहे, अशी कल्पना करावी. याप्रमाणें अर्धमात्रबिंदु हाच हकार व पहिला तीन मात्रेचा सकार.

अकार, उकार, मकार, अर्धमात्रा व बिंदु मिळून प्रणवाचीं पांच अंगें आहेत. परंतु त्यांचीं सोहं अशी दोन अक्षरें आहेत, हेंच प्रणवपंचांग. प्रणवपंचांग हाच स्वयंभूव वेद. यास एकाक्षरब्रह्म म्हणतात. हा वेद मोक्ष देणारा आहे. वेद, जाणण्याला म्हणतात, जाणतेपण या वेदाला आहे. त्याखेरीज इतर अक्षरें वेद असें म्हणणें व्यर्थ आहे. तरी शब्दावांचून जीवाला अर्थ जाणतां येत नाहीं, म्हणून शब्दउच्चार होण्याकरितां पंन्नास मात्रा उत्पन्न केल्या.

अकारादि सोळा वर्ण । कादिमांत पंचवीस गणन । तयासी स्पर्श म्हणती विचक्षण । जे स्पर्शोन उठती ॥ ७५ ॥
यरादि हे उष्मसांत । आणि हक्ष हे मुळींचे उद्भूत । एवं पंन्नासांची होय गणित । भिन्नभिन्न मात्रा ॥ ७६ ॥
इतुकियांतही प्रणवाची । व्याप्ति असे अन्वयाची । अकारावीण तो नव्हेची । उच्चार मात्रेचा ॥ ७७ ॥
भास तोचि उकाराचा । दिसणेपणा अक्षरांचा । दृश्यभास तो मकाराचा । परिणाम असे ॥ ७८ ॥
एवं त्रिमात्रात्मक ॐकार । तयापासूनीच पंन्नास अक्षरें । आणि सर्वांमाजींही निरंतर । व्याप्ति प्रणवाची ॥ ७९ ॥
तस्मात् इतुकियाही मातृकांसी । वेदचि म्हणावें अक्षरांसी । हे निर्माण झाले अंतरश्वासीं । साकार ब्रह्मयाचे ॥ १२८०
परा पश्यंती मध्यमा वैखरी । हींच स्थानें वेदाचीं चारी । चहूंपासून या येकसरी । उच्चार होतसे ॥ ८१ ॥
ह्याची मातृका पुढें मागें । होतां शब्द होती अनंत प्रसंगें । म्हणोनि आहे निजांगें । अनंता वै वेदा ॥ ८२ ॥
ऐसा वेद जो निर्माण जाला । तो साकार ब्रह्मयानें नाहीं केला । प्राणचि परिणामा पावला । परी न करी प्राण ८३
संकल्पासहित जो जीव । तयासीही कर्तृत्वाचा अभाव । म्हणोनि ईश्वर जो स्वयमेव । तेणेंचि केला ॥ ८४ ॥
मायेसहित जो मायावी । वाउगेंचि येकाचें येक दावी । जो शिवशक्ति नारायण नांवीं । तेणेंचि वेद निर्मिला ॥ ८५
हेंही मायेचेंचि करणें आघवें । जें अज्ञानास्तव वाउगें उभवावें । परी तें जड म्हणोनि आरोपावें । आभासरूप ईशावरी
जैसे बुद्धीनें केले जे जे संकल्प । ते ते जीवावरी कीजे आरोप । तैसेंचि मायेचें कृत्य मोठें कीं अल्प । तें ईश केलें म्हणावें
असो ऐसा शब्द ब्रह्मासहित । ब्रह्मा निर्माण जाला सृष्टिहेत । तो कल्पना जीवत्वें जेव्हां करीत । तेव्हां अनंत प्रजा निर्मिल्या
पशु पक्षी श्वापद कीटकें । स्थावर जंगमात्मक जितुकें । अवघें जोडेचि सकौतुकें । निर्माण होते जाले ॥ ८९ ॥
पुढें मैथुनसृष्टि उद्भवली । सर्वही येकापासून येक जाली । परी आरंभीं संकल्पें जे प्रगटली । ते मानसिकसृष्टि १२९०
येथेंही कोणी मंदमति । येकाचें येकचि भाविति । कीं मानसिक संकल्प जे होती । तें करणें ब्रह्मयाचें ॥ ९१ ॥

---

अपासून अःपर्यंत सोळा वर्ण, कपासून मपर्यंत पंचवीस वर्ण, त्यांस स्पर्श म्हणतात. कारण जें स्पर्शून उठतात. यपासून सपर्यंत सात यांस ऊष्ण म्हणतात आणि ह क्ष हे मूळचेच उत्पन्न झालेले आहेत. याप्रमाणें निरनिराळ्या पंन्नास मात्रा झाल्या. इतक्या सर्व मात्रांत अन्वयानें प्रणवाची व्याप्ती आहे, कशी ती सांगतों. मात्रेचा उच्चार अकारावांचून होत नाहीं. अक्षराचा दिसणेंपणा उकाराच्या भासकत्वांवांचून होत नाहीं. तसेंच मकारावांचून दृश्यभास होत नाहीं. याप्रमाणें सर्व मात्रामध्यें त्रिमात्रक ओंमकाराची व्याप्ती आहे. प्रणवाची व्याप्ती सर्व पंन्नास अक्षरांत आहे. म्हणून त्यासही वेद म्हणावे. हे वेद साकार ब्रह्मदेवाच्या अंतरश्वासापासून उत्पन्न झाले.

परा पश्यंती, मध्यमा, वैखरी या चार वाचा चार वेदांचीं चार स्थानें आहेत, त्या चारी स्थानापासून एकदांच उच्चार झाला. त्या मात्रा मागेपुढें लावून अनंतशब्द होतात. म्हणून वेदास अनंतावैवेदा असें म्हणतात. याप्रमाणें जो वेद उत्पन्न झाला तो साकार ब्रह्मदेवानें उत्पन्न केला नाहीं. तर त्याच्या प्राणाचा परिणाम आहे. परंतु प्राणही वेद उत्पन्न करण्यास समर्थ नाहीं. संकल्पासह जो जीव त्याला कर्तृत्वाचा अभाव असल्यामुळें तोही वेद उत्पन्न करूं शकत नाहीं. तर हा वेद स्वयमेव जो ईश्वर त्यानें केला.

मायेसहवर्तमान जो मायावी ईश्वर, जो उगाच एकाचे एक दाखवितो. त्याला शिवशक्तीनारायण म्हणतात. त्यानेंच वेद उत्पन्न केला. वास्तविक हें उत्पन्न करणें अज्ञानाला घेऊन मायेचेंच आहे. परंतु ती जड असल्यामुळें, या कर्तृत्वाचा आरोप आभासरूप ईश्वरावर करितात, जसें बुद्धीनें जे जे संकल्प करावे ते ते जीवानेंच केले असा आरोप करितात. त्याप्रमाणें मायेचें लहान किंवा मोठें करणें ईश्वरानेंच केलें असें म्हणतात. असो. याप्रमाणें शब्दब्रह्मासहवर्तमान सृष्टीउत्पन्नकर्ता ब्रह्मा उत्पन्न झाला. त्या ब्रह्मदेवानें जीवत्वानें जेव्हां कल्पना केली, तेव्हां अनंत प्रजा उत्पन्न झाल्या.

पशु, पक्षी, श्वापद, किडे, याप्रमाणें स्थावरजंगमात्मक जितके जोडे, तितके मोठ्या कौतुकानें आपाप उत्पन्न झाले. पुढें मैथुनसृष्टी उत्पन्न झाली. मग प्रत्येक जोड्यापासून सृष्टी उत्पन्न झाली. परंतु ती अगोदर एकापासूनच झाली व ती संकल्पापासून झाली म्हणून तीस मानसिक सृष्टी म्हणतात.

शंका–कोणी लोक म्हणतात, एकापासून एकच होतें. मानसिक संकल्प जे होतात, ते एकट्या ब्रह्मदेवाचें करणें आहे.

तो ब्रह्मदेवाचि ईश्वर म्हणावा । कारण कीं कर्ता जाहला सर्वां । जरी हा साकार जीव कल्पावा । तरी विरोध येतसे
भूतादि तृणांत निर्माण जितुकें । हें ईशाचें कर्तव्य असे तितुकें । आतां जीवें केलें म्हणतां निकें । तरी केवढा विरोध
ऐसिये आशंकेसी उत्तर । बोलिजेत आहे पहा विचार । जरी मानसिक करी अनेश्वर । तरी मैथुनसृष्टि ही जीवाची
स्त्रीपुरुषसंयोगें उत्पत्ति व्हावी । हे जीवाचे स्वाधीनाचि जरी असावी । तरी मग संतति नसतां जीवीं । तळमळ कासया
प्रतिसंगासी बाळें व्हावें । ऐसें तों कोठें न संभवे । मैथुन तों दिनानिशीं न सोडावें । परी पुत्रार्थ रडती ॥ ९६ ॥
तस्मात् करणें नव्हें जीवाचें । मैथुन जरी स्त्रीपुरुषांचें । जेव्हां प्रारब्ध उद्भवे होणाराचें । तेव्हां ईशसत्ते होतें ॥ ९७ ॥
कोणीकडे रक्तरेत । कोणीकडे साकार जन्मत । प्राण जीवही होय त्यांत । हें जीवाचे बापें नव्हे ॥ ९८ ॥
तैसाचि जीवसंकल्प ब्रह्मयाचा।परी करणें हा उपाय नव्हे त्याचा।जरी स्वाधीनाचि असता साचा । तरी घाबरता कासया
येकदां दुष्ट प्रजा निघाली । ती विरिंचीशीं मैथुना प्रवर्तली । तेव्हां पळतां भूमि थोडी जाली । कोणी कैवारीही नसे
मग त्या दूषित देहा त्यागिलें । शकलें स्त्रीपुरुष रूप जालें । तोचि स्वायंभूमनु नामें बोलिले । शतरूपा कामिनी ॥ १ ॥
ऐसें ब्रह्मदेवें कल्पितां । निर्माण होती प्रजा समस्ता । परी ते ब्रह्मयाची नव्हे सत्ता । सामर्थ्य ईशाचें ॥ २ ॥
जरी स्वसत्तेनें ब्रह्मदेव । उत्पन्न करिता प्रजा सर्व । तरी हें दुःखरूप अपूर्व । वाटतें कां तया ॥ ३ ॥
हे काय हो दुष्ट प्रजा जाली । तेव्हां खेदें नकोशी वाटली । मन्वादि पाहतां वृत्ति तुष्टली । तस्मात् खरी पराधीनता ॥ ४ ॥
ब्रह्मदेवें अमुकसें कल्पावें । तें ईश्वरें आणून उभें करावें । जैसें बाळानें छंदें रडावें । तें पुरवावें जननीनें ॥ ५ ॥
जें जें होणार तें तें कल्पिता । उत्पन्न होतसे ईशसत्ता । न होणार तें येणें दांत खातां । काय होतें ॥ ६ ॥
जेवी व्हावयाजोगा छंद घेतला । तो बाळाचा मातेनें पुरविला । न होणार छंदे तो ताडिला । मुखावरी करें ॥ ७ ॥

---

त्या ब्रह्मदेवास ईश्वर म्हणावा. कारण कीं, तो सर्वांचा कर्ता झाला आहे. जर हा साकारजीव सर्वांचा कर्ता म्हणावा तर मोठा विरोध येतो. अनादि तृणापर्यंत जितकें उत्पन्न झालेलें हें सर्व ईश्वराचें कर्तृत्व आहे असें सांगितलें, आणि आतां जीवानें केलें असें म्हणतां हें कसें ?

**उत्तर**–मानसिकसृष्टी ईश्वरानें केली, तरी मैथुनसृष्टी ही जीवाची आहे, असें म्हणावें तर स्त्रीपुरुषसंयोगानें उत्पत्ति व्हावी, पण हें जीवाचे स्वाधीन नाहीं. जर स्वाधीन असतें तर संतती नाहीं म्हणून तळमळ कां होते. मैथून तर रात्रंदिवस होत असतें त्या मानानें पुष्कळ संतति व्हावी, पण दैवीं नसलें म्हणजे जीवानें कांहीं केलें तरी होत नाहीं. याकरितां मैथून जरी स्त्रीपुरुषाचें आहे, तरी सृष्टी करणें जीवाचें नाहीं, तर होणाराचें जेव्हां प्रारब्ध उत्पन्न होतें तेव्हां ईश्वरसत्तेनें मैथुनसृष्टी उत्पन्न होते.

वास्तविक पहातां रक्तरेत तें काय; त्यापासून साकारदेह उत्पन्न होतो हें काय; व त्या देहांत प्राण जीव, उत्पन्न होतो कसा हें मोठें आश्चर्य आहे. व ह्या सर्वगोष्टी उत्पन्न करणें जीवाचे बापाच्यानेंही व्हावयाचें नाहीं. बरें, जीवसंकल्प ब्रह्मदेवाचा आहे तरी करणें हा त्याचा उपाय नाहीं. जर त्याचे स्वाधीन असतें तर काय करावें म्हणून घाबरता कां ? एकदां दुष्ट प्रजा उत्पन्न झाली ती ब्रह्मदेवाबरोबरच मैथून करण्यास तयार झाली, तेव्हां ब्रह्मदेवास पळतां पळतां जमीन थोडी झाली व कोणी त्यास कैवारीही भेटला नाहीं. तेव्हां ब्रह्मदेवानें दूषित देहास टाकलें, त्याचीं स्त्रीपुरुषरूप दोन शकलें झालीं, तोच स्वायंभूव मनु, ज्याच्या शतरूपास्त्रिया होत्या. याप्रमाणें ब्रह्मदेवानें कल्पना केली, तेव्हां सर्व प्रजा उत्पन्न झाल्या. परंतु ही सत्ता ब्रह्मदेवाची नव्हे, तर हें सामर्थ्य ईश्वराचें आहे. ब्रह्मदेव आपल्या सत्तेनें जर सर्व प्रजा उत्पन्न करता, तर त्यास हें दुःखरूप अपूर्व कां वाटतें. प्रथम ज्या वेळेस दुष्ट प्रजा उत्पन्न झाल्या तेव्हां त्या नकोशा झाल्या व त्याबद्दल ब्रह्मदेवास मोठा खेदही वाटला. पुढें मनु आदीकरून सृष्टीचे वृद्धीकर्तें उत्पन्न झाले, तेव्हां त्यास संतोष झाला. यावरून ब्रह्मदेवाचें पराधीनत्व सिद्ध होतें. ब्रह्मदेवानें अमुक व्हावें अशी कल्पना करावी, तेव्हां ईश्वरानें तें उत्पन्न करावें. जसें लहान मुलानें छंद घ्यावा तो आईनें पुरवावा. जें जें होणार त्याची ब्रह्मदेवानें कल्पना करावी, तेव्हां तें तें ईश्वरसत्तेनें उत्पन्न होतें, जें न होणारें तें ब्रह्मदेवानें दांत खाल्ले तरी होत नाहीं, जसें देण्याजोगा मुलानें छंद घेतला तर तो छंद आई पुरविते, व न देण्याजोगा छंद घेतला तर तो न पुरवितां उलटी तोंडांत मारिते.

जरी म्हणतील कोणी ब्रह्मयासी । न होणें हे वाणी कायसी । तरी पहा होणार जालियासी । पुढें खुंटली मानसिक ॥ ८ ॥
पुढें मैथुनसृष्टीच चालतां । मग मानसिका न ये उभवितां । होत असती जरी आतां । तरी प्रत्यया कां न येती ॥ ९ ॥
तस्मात् होणार तितुकें मात्र जालें । न होणारा कल्पना न चले । म्हणोनि हें ईशसृष्ट जितुलें । मैथुनी कीं मानसिक १३१०
कल्पित भावना ते जीवाची । जी मागें निरोपिली मनोमयाची । प्रत्यक्षता करणें जे तृणाची । ती ईशाची कृति ॥ ११ ॥
येथें विरोध तो असे कोण । भास तितुका जीवनिर्माण । प्रत्यक्ष होणें तो मायावी ईशान । करी मायिकत्वें ॥ १२ ॥
असो ब्रह्मदेवाचे कल्पनेस्तव । ईश्वरें निर्मिल्या प्रजा सर्व । तितुक्या ब्रह्मदेवापुढें स्वभाव । उभ्या तिष्ठती ॥ १३ ॥
पाहें रविदत्ता पूर्वींचा । प्रणवरूप जो वेद साचा । जो सांगितला पंच अंगांचा । त्याचाचि हा परिणाम ॥ १४ ॥
हे जितुकी मानससृष्टि । उंच नीच योनींची दाटी । ब्रह्मादि कीटकांत थाटी । वरी येका प्रणवाच्या ॥ १५ ॥
प्रणवरूप द्रव्याचें जाहलें । या इतुकियांत प्रणवेंचि व्यापिलें । तेंचि कैसें पाहिजे ऐकिलें । प्रणवचि येक अवघियां ॥ १६ ॥
सर्वांचा साकार जो दिसे । तो येक अकार मात्र विलसे । सर्वांचा लिंगदेह चळतसे । तो भासरूप उकार ॥ १७ ॥
सर्वही आपणातें न जाणती । यास्तव दों देहां जाहली उत्पत्ति । तोचि मकार अज्ञान भ्रांति । मात्रा तिसरी ॥ १८ ॥
पुढें प्रवृत्ति पाहते जाले । तेंचि ज्ञान अन्यथा भाविलें । तया ज्ञानाचे प्रकार विभागले । सामान्य विशेष ॥ १९ ॥
हे दोन्हीही कीटकांत असती । विशेष तया अर्धमात्रा बोलती । सामान्य प्रकाश बिंदु निश्चिती । एवं पंच अंगी प्रणव १३२०
ऐसा एकला प्रणव सर्वांमाजीं । ब्रह्मादि कीटकांत सहजीं । येथें परी नसे किमपि दुजी । सर्वही वेदरूप ॥ २१ ॥
ऐसा सर्वही वेद असतां । त्या कीटकादिकांच्या अतौता । जेथें प्राणवायु जाला चळता । तेथें सोहं शब्दही उठे ॥ २२ ॥
सोहं अक्षरें हाचि प्रणव । मागें निरोपिला वेदराव । तोचि या सर्वांत स्वयमेव । सर्वदां चाले ॥ २३ ॥
हें असो पुरुषदेह जितुके । देवऋषिमानवादिकें । तेथें मातृकासहित कौतुकें । शब्दब्रह्म प्रगटला ॥ २४ ॥
परा पश्यंति मध्यमा तिसरी । ह्या तीन वाणी कीटकांत निर्धारी । यया पुरुषदेहीं चौथी वैखरी । प्रगटती जाली ॥ २५ ॥
मागें पुढें मातृका उमटती । तयाचे शब्द अनंत होती । ऐसा अनंतरूप वेद निश्चिती । पुरुषदेहीं वसे ॥ २६ ॥

---

शंका—कोणी म्हणतील कीं, ब्रह्मदेवास काय उत्पन्न करितां येणार नाहीं, तो सर्व उत्पन्न करीलच.

उत्तर—जें होण्यासारखें होतें तें झालें न होण्यासारिखें होतें तें झालें नाहीं. जर सर्व होणें त्याचे हातीं असतें, तर मानसिक प्रजा एकदां उत्पन्न झाल्यावर पुढें कां बंद झाल्या. त्या कल्पना केल्यावर व्हावयाच्या होत्या. ज्यापेक्षां होत नाहींत, त्यापेक्षां सर्व उत्पन्नकर्ता ब्रह्मदेव नव्हे. मैथुनिक किंवा मानसिक जितकी ईश्वरानें उत्पन्न केलेली सृष्टी, तीवर जी कल्पित भावना, ती जीवाची कृति, व तृणादिक जी प्रत्यक्ष केलेली ती ईश्वरकृति.

प्रत्यक्ष सृष्टी, मायावी ईश्वरानें मायेच्या योगानें केली व भाससृष्टी जीवानें केली, जेव्हां ब्रह्मदेवानें प्रजा पुष्कळ व्हावी अशी कल्पना केली, तेव्हां ईश्वरानें सर्व प्रजा उत्पन्न केल्या, त्या प्रजा उत्पन्न होण्याबरोबर ब्रह्मदेवापुढें उभ्या राहिल्या. रविदत्ता, पूर्वीं जो प्रणवरूपवेद सांगितला त्याचाच हा परिणाम आहे. सर्व मानसिक अथवा मैथुनिक उंचनीच लहान मोठी सृष्टी एका प्रणवापासून आहे. ही प्रणवरूपद्रव्याची झालेली आहे. व हीस प्रणवानेंच व्यापिलें आहे. तें कसें तें सांगतो.

### सर्वांत प्रणवाची व्याप्ति.

सर्वांचा जो आकार दिसतो तीच अकारमात्रा. सर्वांचा लिंगदेह चलन पावतो तीच भासरूप उकारमात्रा. सर्व आपणांस जाणत नाहींत या अज्ञानामुळें दोन देह उत्पन्न झाले, तीच अज्ञान भ्रांतिरूप मकारमात्रा. दोन देह उत्पन्न झाल्यावर जे प्रवृत्ती पाहूं लागले तेंच अन्यथाज्ञान; त्या ज्ञानाचे सामान्य विशेष असे दोन प्रकार; हे दोन प्रकार ब्रह्मदेवापासून किड्यांपर्यंत सर्वांत आहेत; त्यांत विशेष प्रकारास अर्धमात्रा म्हणतात. व सामान्यज्ञानास बिंदु मानितात. याप्रमाणें सर्व सृष्टींत पंचअंगी प्रणवाची व्याप्ति आहे. म्हणून सर्व वेदरूपच आहे. पूर्वीं सांगितलेला सोहं या दोन अक्षरांचा प्रणवरूपी वेद, किड्यापासून ब्रह्मदेवापर्यंत जेथें प्राणवायु चलन पावतो तेथें चालतो. देव, ऋषि, मानव इत्यादि जे पुरुषदेह त्याचेठायीं मातृकांसह शब्दब्रह्म उत्पन्न झाला. म्हणजे त्याचेठायीं वैखरी वाचा उत्पन्न झाली. पुरुष देहाखेरीज जे प्राणी त्यांच्या देहीं, परा, पश्यंति, मध्यमा वाचारूप प्रणव उत्पन्न झाला. मागें पुढें मातृका जोडल्यानें अनंत शब्द होतात व हा अनंतरूप वेद पुरुष देहांत रहातो.

पहिला प्रणवरूप वेद । तो कीटकांत सोहं शब्द । परी तेथें प्रवृत्ति निवृत्ति विशद । दोन्हीं न होती ॥ २७ ॥
आहार निद्रा आणि मैथुन । पशुदेहीं हे व्यापार तीन । होत असती पराधीन । म्हणोनि ते निरुष्ट ॥ २८ ॥
पुरुषदेहीं मात्रा उमटल्या । वैखरीनें स्पष्ट जाल्या । तयाच्या श्रेणी प्रगटल्या । व्हावया प्रवृत्ति निवृत्ति ॥ २९ ॥
म्हणून पुरुषदेह उत्तम । प्रवृत्ति निवृत्तीचें धाम । जागृतिआदि मोक्षांत सम । करूं इच्छी तें घडे ॥ १३३० ॥
असो प्रणव आणि शब्दरूप । सांगितलें वेदाचें स्वरूप । या उभयांसी किंचित् अल्प । जीवकृत्यता नसे ॥ ३१ ॥
हा प्रणवरूप जो वेद साचा । हाचि ईश्वर प्रेरक सर्वांचा । तथापि कर्ताही त्रिमात्रांचा । ईशचि मायावी ॥ ३२ ॥
दुसऱ्या मात्रा पंन्नास असती । ज्या नादस्वगास्तव उमटती । हाही शब्द ब्रह्मयाची उद्भूति । ईश्वरापासुनी ॥ ३३ ॥
आतां तुझी आशंका मुख्य चित्ताची । कीं प्रवृत्तिनिवृत्तिरूप रचना ज्याची । तया मार्गप्रदर्शक वेदाची । उत्पत्ति कोणीं केली
हे जीवें केली तरी सामर्थ्यहीन । ईश करी तरी त्या नसे योजन । म्हणून या रचनेसी कर्ते आपण । उभयतां जीवेश ॥३५॥
तरी हेंचि कैसें तें ऐकावें । कवणेपरी वेदें प्रगटावें । बोलिजे तें जैसें स्वभावें । यथातथ्य असे ॥ ३६ ॥
जितक्यामानसिकप्रजाजाल्या । त्यांतपश्वादिस्वव्यापारालागल्या । पुरुषाकृतिजितक्याउरल्या । त्यातिष्ठतीब्रह्मयासमीप ३७
प्रजापति देव ऋषि संपूर्ण । मनु आदि मानवजन । ते ब्रह्मदेवासी कर जोडून । विनविते जाले ॥ ३८ ॥
तूंचि आमुचा मातापिता । तूंचि धाता स्वामी देवता । तरी आम्हांसी आज्ञापीं आतां । काय करावें तें ॥ ३९ ॥
करावें काय न करावें कोणतें । कोठें रहावें काय खावें तें । काय गावें काय ध्यावें चित्तें । आज्ञापिसी तें करूं ॥१३४०॥
हें ब्रह्मदेवें सर्वांचें ऐकोन । करिता जाला अंतरीं मनन । यासी काय सांगावें आपण । तें कृत्याकृत्य नेणें ॥ ४१ ॥
आणि हे मजलाचि कर्ता म्हणती । नेणती कवणाची सामर्थ्यशक्ति । आतां प्रवृत्तीच सांगूं या प्रति । तरी निवृत्ति कळे कैसी
निवृत्ती जरी सांगावी । तरी पुढें उत्पत्ति केवीं व्हावी । ऐसी रजोगुणें पडली गोवी । ब्रह्मदेवासी ॥ ४३ ॥
तेव्हां दुश्चितपणें स्तब्ध ठेला । कांहीं सुचेना वेडावला । तंव अंतरांतून भडाडिला । शब्दांचा बोध ॥ ४४ ॥
हे प्रेरणा नव्हे विरिंचीची । कल्पना तों खुंटली जीवाची । परी अंतर्यामीं मायावी ईशाची । वस्ती जे असे ॥ ४५ ॥

---

## वेदाचें स्वरूप.

वेद दोन प्रकारचा–एक प्रणवरूप व दुसरा शब्दरूप. प्रणवरूप वेद जो सोहं शब्दरूप आहे तो पुरुष देहाखेरीज इतर देहांत आहे. याचेयोगानें स्पष्ट प्रवृत्ति निवृत्ति-दोन्हीही होत नाहींत; पण फक्त पराधीनपणानें पशू देहांत आहार निद्रा मैथुन हे तीन व्यापार होतात.

पुरुष देहांत मात्रा उत्पन्न होऊन त्या वैखरी वाचेनें स्पष्ट झाल्यानंतर त्यांचे शब्द तयार झाले. याप्रमाणें प्रवृत्तिनिवृत्तिदर्शक शब्दरूप वेद पुरुष-देहांत प्रगटला. म्हणून पुरुष देह उत्तम व त्याखेरीज इतर देह पराधीन म्हणून तो निरुपयोगी किंवा निरुष्ट. पुरुषदेह हें केवळ प्रवृत्ती निवृत्तींचें घरच आहे. हा देह जागृतीपासून मोक्षापर्यंत जें करूं इच्छील तें करील.

प्रणवरूप वेद हाच सर्वांचा प्रेरक ईश्वर आहे, व याच ईश्वरापासून शब्दरूप वेद झालेला आहे. रविदत्ता, तुझा प्रश्न हा कीं, ज्याची प्रवृत्तीनिवृत्तीरूप रचना आहे त्या मार्गप्रदर्शक वेदाची उत्पत्ति कोणीं केली. जीवानें केली असें म्हणावें तर तो सामर्थ्यहीन आहे. ईश्वरानें केली असें म्हणावें तर त्यास प्रयोजन नाहीं. तेव्हां या रचनेस वास्तविक दोघे कर्ते झाले ते कसें तें सांगतों. मानसिक जितक्या प्रजा उत्पन्न झाल्या त्यांत पशु आदिकरून आपापल्या व्यापारास लागल्या आणि पुरुषाकृति ज्या उरल्या त्या ब्रह्मदेवासमोर उभ्या राहून त्याची प्रार्थना करूं लागल्या कीं, हे देवा, तूंच आमुचा मातापिता धाता स्वामी देवता आहेस, म्हणून तूं आम्हास काय करावें, काय न करावें, कोठें रहावें, काय खावें, गावें, चित्तानें काय ध्यावें, तें सांग. तूं जें सांगशील तें करूं. याप्रमाणें सर्वांचें बोलणें ब्रह्मदेव ऐकून विचार करिता झाला कीं, हे करावें काय न करावें काय हें जाणत नाहींत, यांस आपण काय सांगावें; ह्या कर्तृत्वाची कोणाची सामर्थ्यशक्ति आहे हें न जाणून मलाच कर्ता म्हणतात. आतां यांस प्रवृत्तीच जर सांगूं तर निवृत्ति कशी कळेल; निवृत्तीच जर सांगावी तर पुढे उत्पत्ती कशी होईल ? अशी ब्रह्मदेवास रजोगुणानें भ्रांति पडली. तेव्हां तो दुश्चितपणानें उगाच स्तब्ध राहिला. त्यास कांहीं सुचेनासें झालें. त्यावेळीं अंतरांतून शब्दाचा बोध भडाडला ही ब्रह्मदेवाची प्रेरणा नाहीं व जीवाचीही नाहीं. कारण जीवाची कल्पना खुंटली तेव्हां ही अंतर्यामीं असलेल्या मायावी ईश्वराची प्रेरणा समजली पाहिजे.

मुख्य स्फूर्ति जे निर्विकल्पक । त्यांत भासला जो प्रकाशक । जो कर्तेपणाचा मायिक । ईक्षणशक्ति जयाची ॥ ४६ ॥
तया ईश्वरापासून । उद्भवला हा वेद संपूर्ण । बुद्धि किंवा नसतां मन । संकल्पासहित ॥ ४७ ॥
संकल्पेंविण जीवत्व मंदलें । योजना कैशी कांहींच न चले । जैसें निजेलें मनुष्य वोसणलें । तें बोले परी कळेना ॥ ४८ ॥
तैसा ब्रह्मदेव संकल्पासहित । मूर्छितापरी जाहला भ्रांत । परी शब्द उठताति अनंत । जेवीं भरतें समुद्रा ॥ ४९ ॥
अनंत शब्द दाटले अपार । फुटों पाहे सर्व शरीर । एका मुखांतून नव्हे वार । म्हणून चौमुखीं निघती ॥ १३५० ॥
एकदांचि चौमुखांची गर्जना । होती जाली शब्दरचना । ते कवणें आकळावी अवधारणा । येवढी कवणाची ॥ ५१ ॥
परी तेही सर्व बुद्धिमंत । आकळिते जाहले शब्दजात । अर्थासी मात्र पारंगत । न होती कोणी ॥ ५२ ॥
असो ऐसा मार्गप्रदर्शक । निर्माण जाला वेद सकळिक । इतुक्याचा कर्ता तो एक । ईश अंतर्यामी ॥ ५३ ॥
आतां जीवाची कृति तेही कैशी । प्रस्तुत बोलिजे अल्पशी । सर्वीं ग्रहण करून शब्दासी । योजना करिते जाहले ॥ ५४ ॥
अमुक शब्दाचा अमुक अर्थ । अमुक नामाचा हा पदार्थ । ऐसें कल्पोनियां आवडता स्वार्थ । योजना करिती ॥ ५५ ॥
नाना लिंगभेद केले । नाना वित्पत्तीतें वाढविलें । नाना तर्कें विभक्तीतें स्थापिलें । न्यायव्याकरणादि करोनी ॥ ५६ ॥
छंद निरुक्त ज्योतिषादि । अंगें उपांगें नानाविधि । प्रतिपादिती निर्णयबुद्धि । करणें हें न करणें ॥ ५७ ॥
पुढें पुढें तों व्यासादिक । आचार्य जाहले अनेक । तेणें तो वेद सूत्रादि कौतुक । रचिला विस्तार ॥ ५८ ॥
हा ऋग्वेद हा यजुर्वेद । हा अथर्वण हा सामवेद । उदात्त अनुदात्तादि विशद । कल्पना केली ॥ ५९ ॥
ऐशी योजना जे जे कल्पनेची । अनेकधा रचनाही शब्दाची । तितुकीही कृति असे जीवाची । एवं द्विविध कर्ते यया १३६०
ऐसा वेद रचनात्मक । निर्माण जाला मार्गप्रवर्तक । त्यांत कर्मचि प्रतिपादून येक । निश्चयें बैसले ॥ ६१ ॥
उपासना कोणी श्रेष्ठ म्हणती । परी आवडी ऐशी भिन्न स्थापिती । एक म्हणती ज्ञानचि गति । परी ज्ञेय निर्धारा न ये ॥ ६२ ॥
पहिला प्रणवात्मक वेद । दुसरा मात्रात्मक शब्द । ययाची हेळणा करून प्रसिद्ध । म्हणती वेदाक्षरें खरें ॥ ६३ ॥
नाना वर्ण नाना आश्रम । विस्तारिले भिन्न अनुक्रम । ब्राह्मण क्षत्रिय वैश्य हे उत्तम । अधिकारी वेदाचे ॥ ६४ ॥
हे स्त्रीशूद्रादि अनधिकारी । अंत्यवसाई तो दूरीच्या दूरी । ऐशी कल्पनाच वाढवून अंतरीं । साभिमानें बद्ध होती ॥ ६५ ॥

---

त्या ईश्वरापासून मनबुद्धि नसतां वेद उत्पन्न झाला. मनाचें रूप संकल्पविकल्प तें नसल्यामुळें जीवत्व मंद झालें; तेथें योजना कसची त्यास कांहींच सुचेना. जसें निजलेलें मनुष्य घाबरून ओसणतें व कांहीं शब्द बोलतें त्याचा अर्थ कळत नाहीं, तसा ब्रह्मदेव संकल्पासहवर्तमान मूर्च्छिताप्रमाणें भ्रांत झाला, तरी त्याचे शरीरांतून अनंत-शब्द बाहेर पडले. ज्या वेळीं शब्द आंतून बाहेर पडूं लागले त्यावेळीं त्यांस एका मुखानें वाट मिळेना तेव्हां शरीर फुटतें कीं काय असें वाटूं लागलें. नंतर चार मुखांनीं शब्द बाहेर पडले. ते सर्व उभे राहिलेल्या प्रजांनीं ध्यानांत धरिले. परंतु त्यांचा अर्थ त्यांस कळेना. पुढें सर्वांनीं ते शब्द ध्यानांत धरून योजना केली. अमुक शब्दाचा अर्थ अमुक आहे. अमुक पदार्थास अमुक म्हणावें. याप्रमाणें आवडत्या स्वार्थाप्रमाणें त्यांनीं योजना केली. कोणी लिंगभेद केले, कोणी व्युत्पत्ति वाढविली, कोणी तर्कानें विभक्ति स्थापिली. याप्रमाणें न्याय, व्याकरणादिक छंद, निरुक्त, ज्योतिषादिक अंगउपांगासह बुद्धीच्या निश्चयानें स्थापिले. पुढें व्यासादिक अनेक आचार्य झाले त्यांनीं सूत्रादिकें करून वेदविस्ताराची रचना केली. ती अशी–हा ऋग्वेद, हा यजुर्वेद, हा अथर्वण, हा सामवेद, हा उदात्त, हा अनुदात्त, याप्रमाणें शब्दांच्या रचनेनें चार वेद तयार झाले. ही वेदाची केलेली रचना जीवकृतीची आहे. म्हणून प्रवृत्तीनिवृत्ती-प्रदर्शक वेदाचें कर्ते दोन; एक ईश्वर व दुसरा जीव. त्यांत जीवांपैकीं कित्येकांनीं कर्मच प्रतिपादून त्याचा निश्चय करून बसले. कित्येक उपासना श्रेष्ठ म्हणून बसले. कित्येक ज्ञान मुख्य मानून बसले. त्यांचा त्याविषयीं निर्धार होईना. कित्येक प्रणवात्मक वेद किंवा मात्रात्मक शब्द यांस वेद न मानून तें वेदाक्षर खरें मानितात.

वेदामध्यें अनेक प्रकारचे वर्ण अनेक प्रकारचे आश्रम यांचा अनुक्रमें विस्तार केलेला आहे. तसेंच उत्तम, मध्यम, कनिष्ठ असे अनुक्रमें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, हे वेदाचे अधिकारी आहेत असें वर्णन केलें आहे. तसेंच स्त्रीशूद्रादिक हे वेदाचे अधिकारी नाहींत; व अंत्यज हे तर या वेदापासून दूरच असले पाहिजेत. याप्रमाणें कल्पना करून ती स्थापून त्या अभिमानानें बद्ध झाले.

असो बहु बोलतां न सरे । हें अनावरचि असे सारें । परी जीवकल्पित बाधक निर्धारें । विचारावें मुमुक्ष ॥ ६६ ॥
तंव विनावितसे रविदत्त । जी जी निवाडिलें जीवेश द्वैत । परी ईशनामाचा संकेत । कवणासी असे ॥ ६७ ॥
चतुराननाचे अंतरांतून । शब्द प्रेरिता जाहला ईशान । येणें शब्दें ब्रह्मा आपण । ईश्वर नव्हे ॥ ६८ ॥
आणि पराधीनत्वें सृष्टि निर्मिली । तेव्हां ते स्वतंत्रत्वें कोणें केली । तया ईशासी व्यक्तता आली । किंवा अव्यक्त ॥ ६९ ॥
जनाचे तर्क तरी अनेक । तैसेचि स्थापिती शास्त्रकारक । कीं ईश्वर असे कोणी येक । तो चालक सर्वांचा ॥ १३७० ॥
परी तो रहात असे कोठें । सूत्रें केवीं हालवी नेटें । हें न कळे कवणा परी बोभाटे । प्राणिमात्र व्यर्थ ॥ ७१ ॥
उत्पत्ति करी चतुरानन । विष्णु जगाचें करी पालन । संहारीतसे रुद्र आपण । सर्वांलागीं ॥ ७२ ॥
त्यांत ब्रह्मदेवाचें पराधीनत्व । कळलें असे कीं आरोपितत्व । परी विष्णु सदाशिव स्वतंत्र अपूर्व । असती कीं कैसे ॥७३॥
ऐसा प्रश्न रविदत्ताचा । ऐकोन श्रीगुरु बोलती वाचा । अरे स्वतंत्रपणा कवणासी कैंचा । आकारा आले तयां ॥ ७४ ॥
साकारत्व जीवालागीं न ये । मा अवयवी ईश कैसा होय । जितुकें दृश्य तें भूतमय । जरी स्वतां प्रगटती ॥ ७५ ॥
स्वतां प्रगटती ते अयोनिसंभव । म्हणती परी तो मिथ्या गौरव । दृश्यासी कारणें असती सर्व । स्फुरणादि पृथ्व्यंत ॥७६॥
कारणासीच म्हणावें योनि । तेथून कार्याची उभवणी । तया संभवा मानावें अयोनि । तरी वृक्षादिकां न म्हणावें ॥७७॥
असो विष्णु आणि सदाशिव । गुणमायेचे स्वभाव । पालन संहार जगाचा सर्व । करणें हें परतंत्र ॥ ७८ ॥
विष्णु जरी पालनकर्ता । तरी होणारा स्वाधीन न होता । ऋषि यज्ञामाजीं प्रगटतां । अहंभोक्ता भाविलें ॥ ७९ ॥
तत्क्षणीं निजकरींचें सुदर्शन । तेणें स्वशिराचें जाहलें कृंतन । मग सर्वीं बैसविलें अश्वाचें आनन । तो हयग्रीव अवतार
तस्मात् स्वशरीर रक्षवेना । तो काय संरक्षी अन्य जना । म्हणोनि परतंत्रता चतुरानना । तेवींच विष्णूची ॥ ८१ ॥
कोणी म्हणेल अभिमान उठतां । न साहे किमपि भगवंता । म्हणोनि शिरच्छेद जाला तत्त्वता । स्वकीय इच्छेनें ॥८२॥

---

याप्रमाणें साधकबाधक पुष्कळ सांगितलेलें आहे. परंतु, त्यांत जीव कल्पित, बाधक आहे असें मुमुक्षूनें समजावें.

**प्रश्न**–सर्व ईश्वरनिर्मित आहेत, असें सांगितलें. तरी यांत ईश्वरनिर्मित सृष्टी करणारा तो कोणता ईश्वर ? ब्रह्मदेवाचे अंतरांतून ईश्वरानें शब्दांची प्रेरणा केली असें सांगितलें यावरून सहजच ब्रह्मदेव पराधीन आहे हें ठरलें, व तो ईश्वरही नाहीं असें ठरलें. आतां स्वतंत्रतेनें ज्यानें सृष्टी उत्पन्न केली तो ईश्वर व्यक्त आहे किंवा अव्यक्त आहे ? लोकांचे तर्क अनेक आहेत. त्याप्रमाणें शास्त्रकार स्थापितात कीं, कोणीएक ईश्वर आहे तोच या सर्वांचा चालक आहे. परंतु तो ईश्वर कोठें रहातो व सर्व सूत्रें कशीं हालवितो, हें कोणासही कळत नाहीं; परंतु सर्व प्राणी ईश्वराविषयीं व्यर्थ वल्गना करितात ते म्हणतात कीं, ब्रह्मदेव उत्पत्ती करितो. विष्णु त्या जगाचें पालन करितो. व त्याच जगाचा शंकर संव्हार करितो. यांत ब्रह्मदेवाचें पराधीनत्व कळलें. परंतु विष्णु व शंकर हे स्वतंत्र आहेत किंवा पराधीन आहेत ?

**उत्तर**–जें जें आकारास आलें त्यास स्वतंत्रपणा कसचा. जीवांस साकारत्व नाहीं. मग ईश्वरास कसें असेल ? विष्णु आदिकरून कित्येक स्वतां प्रगटले, तरी ते दृश्यांत आल्यामुळें भूतमयच आहेत. जे स्वतः प्रगटतात ते अयोनीसंभव आहेत असें म्हणतात. परंतु तो मिथ्या गौरव समजावा. दृश्याचे उत्पत्तीस स्फुरणापासून पृथ्वीपर्यंत कारणें आहेत. कारणास योनी म्हणावें. त्या कारणापासून कार्याची उत्पत्ति होते. तेव्हां त्यांस अयोनी कसें म्हणावें ? जर त्यांस अयोनी म्हणावें, तर वृक्षादिकही अयोनीसंभव ठरतील, तेव्हां ते अयोनीसंभव नव्हत.

विष्णु आणि शंकर हे गुण मायेचे स्वभाव आहेत. ते पालन व संव्हार सर्व जगाचा करितात. तरी ते परतंत्रानेंच करितात. विष्णु जर स्वतंत्रतेनें पालन करता; तर तो होणाराचे स्वाधीन न होता. विष्णूनें ऋषीयज्ञामध्यें मी भोक्ता असें आपणास मानिलें व पुढें त्यास हा आपणास अभिमान झाला असें वाटल्यावरून त्यानें लागलेंच आपले हातांतील सुदर्शनचक्रानें आपलें शीर कापिलें. पुढें सर्वांनीं त्यास घोडयाचें तोंड लाविलें. तोच हयग्रीव अवतार झाला. याप्रमाणें आपलें शरीर विष्णूंस रक्षवेना तो इतर जनांचें काय संरक्षण करील ? ज्यापेक्षां त्याचे हातून आपलें शिराचें रक्षण झालें नाहीं त्यापेक्षां तो ब्रह्मदेवाप्रमाणेंच परतंत्र समजावा.

**शंका**–कोणी म्हणतील कीं, आपणास अभिमान झाला तो देवास सहन झाला नाहीं; म्हणूनच त्यानें आपलें शीर कापिलें.

तरी पद्दा कल्पना कवणा जाहली। कवणाचे हेतूनें हानि जाहली। ज्याची सत्ता तो ईश येर हे भुली। कल्पनारूप जीवाची ८३
संहार करणें शिवाकडे। त्याचे सामर्थ्यें जाहलें हें कुडें। येणें अर्थें तों जालें उघडें। पराधीनत्व विष्णूचें ॥ ८४॥
आतां संहारा जरी सदाशिव। स्वतंत्र असे सर्वथैव। तरी त्रिपुरवधाचें अपूर्व। सांकडें कां पडतें॥ ८५॥
तस्मात् कोणीही स्वतंत्र नसे। ब्रह्मा विष्णु सदाशिव ऐसे। मा येर देव तों अपैसे। उघड परतंत्र॥ ८६॥
जरी म्हणेल कोणी कीं स्वतंत्र कोण। कोण करी उत्पत्ति लय पालन। तरी हे ईशाधीन गुण तीन। तेणें तिन्ही होतीं ॥८७॥
तेही गुण ज्याचे त्यापाशीं। ब्रह्मादि कीटकांत दिवानिशीं। असती एक येतां उदयासी। दोन आच्छादती॥ ८८॥
जाणणें तोचि सत्वगुण। जाण जाणों वांचती संपूर्ण। ऐसें सत्वगुणें होतें पालन। तोचि विष्णु॥ ८९॥
नेणणें तमोगुण विख्यात। नेणीव विस्मरणें प्राणी मरत। ऐसाचि रुद्र संहारित। तमोगुण रूपें॥ १३९०॥
जाणीव नेणीव समान जाहली। म्हणोनि रजोगुणें उत्पत्ति पावली। एवं सृष्टि ब्रह्मदेवें रचिली। रजोगुण रूपें॥ ९१॥
एवं रजःसत्व तमात्मक। त्रिगुण उत्पत्ति स्थिति लयकारक। यया तिन्ही गुणांसी प्रवर्तक। तो येक ईश्वर॥ ९२॥
तरी तो ईश्वर कोठें राहतसे। त्रिगुणांसी कैसा प्रेरितसे। म्हणाल तरी अवधारा अल्पसें। बोलोनि दावूं॥ ९३॥
ईश्वर जरी सावयय असता। तरी देहाबाहेरी म्हणों येता। जेवीं बुद्धि तेथें जीव ऐता। तेवीं स्फूर्ति तेथें ईश्वर ॥९४॥
बुद्धींत अविद्येस्तव पडिलें। प्रतिबिंब तें जीवत्वा पावलें। तेवींच विद्यामायेनें चैतन्य फळलें। स्फूर्तींत तो ईश्वर ॥९५॥
जीवांसी स्वतंत्रता असेना। कारण कीं कल्पिलें तैसें घडेना। म्हणून ईश्वर करीतसे प्रेरणा। प्रारब्ध उदया ऐशी ९६
प्रारब्धभोग असे जीवासी। तें सुखदुःख नव्हे ईश्वरासी। म्हणोनी जीव नव्हे तो स्वतंत्रत्वेंसी। प्रेरणा मात्र करी ॥९७॥
जीवाचें होणार नव्हे स्वाधीन। परतंत्रत्वें भोगी आपण। म्हणून प्रेरक एक असे ईशान। चाळक बुद्धीचा॥ ९८॥
असो जीव जैसा बुद्धिआंत। रहात असे सदोदित। तेवींच ईश्वर गुणांसहित। स्फूर्तींत वसे॥ ९९॥
ब्रह्मादि कीटकांत येकला। अंतर्यामित्वें हृदयीं राहिला। अलिप्तपणें नियंता सर्वांला। असे स्वसामर्थ्यें॥ १४००॥

---

**उत्तर**–शीर कापावें अशी कल्पना कोणाचे मनांत उत्पन्न झाली. ज्याची सत्ता तो ईश्वर आहे. व बाकीची कल्पनारूप ही सर्व भूली आहे संव्हार करणें शंकराचे हातीं आहे. या वचनावरून विष्णूचें पराधीनत्व सहजच स्पष्ट झालें. शंकर स्वतः संहार करण्याविषयीं समर्थ आहे तर त्यास त्रिपुरासुराचे वधाचे वेळीं संकट कां पडलें असतें? ज्यापेक्षां त्यांस संकट पडलें त्यापेक्षां तो स्वतंत्र नाहीं. शंकर, विष्णु व ब्रह्मदेव, हे पराधीन ठरले. मग इतर देव तर उघड पराधीन आहेत त्याविषयीं शंका नाहीं. कोणी म्हणतील कीं, तुम्ही सर्व देव पराधीन ठरविलेत; तेव्हां स्वतंत्र कोण उरलें. उत्पत्ति, पालन, संव्हार कोण करितो. उत्तर–ईश्वराचे स्वाधीन तीन गुण आहेत त्यांचेयोगानें तो तिन्ही क्रिया करितो. हे क्रिया करणारे गुण ब्रह्मदेवापासून किड्यांपर्यंत सर्वांत अखंड आहेत त्यांत एकाचा उदय झाला म्हणजे दोन आच्छादितात.—

जाणणें हाच सत्वगुण. सर्व जाणून वाचतात. याप्रमाणें सत्वगुणानें पालन होतें. हाच विष्णु. जें न जाणणें तोच तमोगुण. नेणीव विस्मरणानें प्राणी मरतात. याप्रमाणें तमोगुणानें संव्हार होतो. हाच शंकर. जाणीव आणि नेणीव समान असणें तो रजोगुण. रजोगुणांत दोन्ही समान आहेत म्हणून रजोगुणानें उत्पत्ति होते. हाच ब्रह्मदेव. रजोगुण, सत्वगुण व तमोगुण हे उत्पत्ति, पालन व संव्हार करणारे आहेत. त्यांस जो प्रवर्तक तोच एक ईश्वर. तो ईश्वर कोठें रहातो, तो त्रिगुणास कसा प्रेरितो, असें विचाराल तर तेंच आतां मी तुम्हांस सांगतों.

### ईश्वराचें वसतिस्थान

ईश्वर जर सावयवी असता तर तो देहाबाहेर आहे असें म्हणतां आलें असतें. परंतु तो बुद्धींत जसा जीव, तसा स्फूर्तींत आहे. व ती स्फूर्ति देहांत आहे. अविद्येंत प्रतिबिंब पडलें त्यास जीव म्हणतात. तसें स्फूर्तींत पडलेलें जें प्रतिबिंब तोच ईश्वर. जीवानें कल्पिलेलें घडत नाहीं, म्हणून तो स्वतंत्र नाहीं. जीव स्वतंत्र नाहीं, म्हणून ईश्वर प्रारब्धउदयासारखी प्रेरणा करितो. प्रारब्ध भोग जीवास आहे. त्या प्रारब्धभोगाचें सुखदुःख ईश्वरास नाहीं. म्हणून तो जीव नव्हे. तर ईश्वरच आहे. तो स्वतंत्रतेनें प्रेरणा मात्र करितो. जीवाचे स्वाधीन होणाऱ्या गोष्टी नाहींत. तो परतंत्रतेनें जें जें होईल तें तें भोगितो, म्हणून बुद्धीचा चालक प्रेरक एक ईश्वर आहे. जसा जीव बुद्धींत रहातो तसा ईश्वर गुणासहवर्तमान स्फूर्तींत रहातो. तो ईश्वर ब्रह्मदेवापासून किड्यांपर्यंत सर्वांच्या अंतर्यामित्वानें हृदयांत अलिप्तपणानें आपल्या सामर्थ्यानें नियंता होऊन राहिलेला आहे.

ज्याच्या भयें सूर्य चंद्र चालती। ज्याच्या भयें वायु प्राण वाहती। ज्याच्या भयें अग्नीसी ज्योति। मृत्यु धांवे ज्याच्या भयें १
भूमीतें धारण द्रवत्व आपीं। काळही युगादि क्षण मापी। ब्रह्मा विष्णु शिव प्रतापी। जयाच्या भयें ॥ २ ॥
ऐसा अंतर्यामी एकला। अंतरीं नियामकत्वें राहिला। सर्व नियंतियां करूं लागला। नियंतृत्व ॥ ३ ॥
सर्वांचें ज्या ज्या रीतीं होणार। त्या त्याचा प्रेरक निर्धार। त्यावांचून तृणही साचार। पडिलें न हाले ॥ ४ ॥
ऐसा नियंता सर्वांमाजीं। अलिप्तत्वें राहून सहजीं। प्रेरणा करी होणार जी जी। ब्रह्मादि कीटकांत ॥ ५ ॥
स्फूर्ति विद्याविद्या ज्ञानाज्ञान। मन बुद्धि इंद्रियें प्राण। हें ब्रह्मादि कीटकांत देहीं समान। असे जयापरी ॥ ६ ॥
तैसेंचि बुद्धींत प्रतिबिंब जयाचें। तो जीव जीवन करी जडाचें। वृत्तींत भासकत्व तया ईशाचें। नाम ईशान शक्तीस्तव
ईशन म्हणिजे प्रेरणा करावी। होणारा ऐसी बुद्धि योजावी। त्या रीतीं जीवें सुखदुःखें भोगावीं। पराधीनत्वें ॥८॥
स्वतंत्रपणें प्रेरणा करी ॥ परी कर्तृत्वाचा अभिमान न धरी ॥ म्हणून अलिप्त निरहंकारी। बंधन न पावे ॥ ९ ॥
जीवें तरी कांहीं न करितां। मीच होय या कर्माचा कर्ता। बळें मस्तकीं घेऊन अहंता। बंधनीं पडे ॥ १४१० ॥
ईश विद्यागुणें सर्वज्ञ जाहला। जीव अविद्यागुणें किंचिज्ज्ञत्व पावला। ईश प्रवर्तवीतसे गुणाला। जीव जाहला गुणाधीन
ईश आवरणी विक्षेप शक्तीतें। स्वाधीन ठेऊन वर्तवी सर्वांतें जीव आवरणविक्षेपें गुंते। भ्रांत होऊनी ॥ १२ ॥
तिहीं अवस्थांत भ्रमे जीव। तें तें तादात्म्य घेऊन सर्व। ईश त्यागून तो तो भाव अवस्थातीत असे ॥ १३ ॥
बुद्धिपासून जीव विषयांत। साभिमान घेऊन विरहत। नुसधी वृत्ति जे निर्विकल्प स्फुरत। त्यांत वसे संचाराविण १४
ईशें प्रेरणा मात्र करावी। जीवें ते ते मस्तकीं घ्यावी। यया उभयानें सृष्टि आघवी। व्यापिली असे ॥ १५ ॥
प्रतिबिंबा तरी एकरूपता। परी कर्मे भिन्न भिन्न तत्वतां। येक भोक्ता येक नियंता। यास्तव भेद जाहला ॥१६॥
असो हे दोन्ही सर्वां शरीरीं। असती ब्रह्मादि पिपीलिकांवरी। जीव बद्धता अभिमानें वरी। ईश मुक्तत्वें वसे ॥१७॥

---

ज्याच्या भयानें चंद्रसूर्य चालतात. ज्याच्या भयानें प्राणवायु वहातात. ज्याच्या भयानें अग्नि ज्योतिरूप आहे. ज्याच्या भयानें मृत्यु धांवतो. ज्याच्या भयानें पृथ्वीस धारणत्व आहे. पाण्यास द्रवत्त्व आहे. ज्याच्या भयानें काळ क्षण घटका इत्यादि युगापर्यंत गणना करितो. ज्याच्या भयानें ब्रह्मदेव, विष्णु, शंकर, हे प्रतापी आहेत. असा ईश्वर प्राण्याच्या हृदयांत एकटा नियामकत्वानें सर्व नियंत्यावर नियंतृत्व करूं लागला. ज्याचें जें जें होणें असेल त्या त्या होण्याचा हा ईश्वर प्रेरक आहे. याच्यावांचून पडलेलें गवतही हालत नाहीं. असा हा नियंता ब्रह्मदेवापासून किड्यांपर्यंत सर्वांत अलिप्तत्वानें राहून जें जें होणार त्याची सहज प्रेरणा करितो.

जसें—स्फूर्ति, विद्या, अविद्या, ज्ञान, अज्ञान, मन, बुद्धि, इंद्रियें, प्राण हे प्रकार ( विकार ) ब्रह्मदेवापासून किड्यांपर्यंत सर्व देहांत समान आहेत, तसें जडास जीवविणारा जीव व वृत्तींत भासकत्वानें असणारा ईश्वर आहे. ईशन म्हणजे प्रेरणा करणें, होणारासारखी बुद्धी योजावी; त्याप्रमाणें जीवानें पराधीनत्वानें सुखदुःखें भोगावीं; ईश्वर स्वतंत्रपणें प्रेरणा करितो, तरी कर्तृत्वाचा अभिमान धरीत नाहीं. म्हणून तो अलिप्त निरहंकारी व निरहंकारी म्हणूनच तो बंधन पावत नाहीं. जीव हा स्वतः कांहीं करीत नसून जें होतें त्याचा कर्ता मीच आहे असें बळें माथीं घेतो, म्हणूनच त्या अहंतेमुळें तो बंधनांत पडतो.

### ईश्वराच्या व जीवाच्या कर्तृत्वाची विरुद्धता.

ईश्वर विद्यागुणानें सर्वज्ञ आहे. जीव अविद्यागुणानें किंचिज्ज्ञ आहे. ईश्वर गुणास प्रवर्तवितो; जीव गुणाधीन रहातो; ईश्वर सर्वांस आवरण व विक्षेप या शक्तीस स्वाधीन ठेवून वर्तवितो; व जीव भ्रांत होऊन आवरण व विक्षेप यांचे योगानें गुंततो; जीव तिन्ही अवस्थेंत त्या त्या अवस्थेचें तादात्म्य पावून भ्रमतो; ईश्वर त्या त्या अवस्थेचा भाव त्यागून अवस्थातीत रहातो; जीव साभिमानानें बुद्धीपासून विषयापर्यंत सर्वांस घेऊन क्रीडा करितो; ईश्वर नुसती निर्विकल्प जी स्फुरणारी वृत्ति तींत संचारावांचून रहातो. ईश्वरानें प्रेरणा करावी, ती ती जीवानें मस्तकीं घ्यावी, याप्रमाणें या दोघांनींही सृष्टी सर्व व्यापिलेली आहे.

जीव आणि ईश्वर हीं एका ब्रह्माचीं प्रतिबिंबें आहेत. म्हणून हीं एकरूपच आहेत. परंतु एक भोक्ता, एक नियंता अशीं त्यांचीं कर्में भिन्न भिन्न आहेत. म्हणून एक जीव व एक ईश्वर असा भेद झाला. हे जीव आणि ईश्वर ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत सर्वांचे शरीरांत आहेत. त्यांत जीव अभिमानानें बद्धता वरतो व ईश्वर निरभिमानानें मुक्त रहातो.

उभय सर्वीं म्हणतां वस्ती । येथें कोणी कल्पना करिती । कीं निरहंकारी ईश स्वयंज्योति । देहावेगळा राहे ॥ १८ ॥
तरी देहावेगळी स्फूर्ति असेना । प्रतिबिंब तों वृत्तीवीण पडेना । तस्मात देहावीण जे करणें कल्पना । ते न संभवे सहसा १९
आणीक शंका कीं वृत्तींत बिंबलें । वृत्तीवीण स्थळ रितें पडलें । ईश तो सर्वव्यापी शास्त्र बोले । या विरोधा उत्तर देऊं २०
ईशसत्ता सर्वत्रीं असे । परी स्वतां ईश वृत्तींत वसे । जेवीं सार्वभौम राजधानी राहत असे । आज्ञा सर्व जगतीं ॥ २१ ॥
मागुती म्हणतील येकत्र असतां । अन्य स्थळीं उगीच चाले सत्ता । तरी एकाचि राजधानी साकारता । विष्णूची कां न ह्मणावी
कीटकांत अन्य देहीं जीव । राहे परी ईशाचा अभाव । विष्णूचे साकारीं ईश स्वयमेव । असे अभाव जीवाचा ॥ २३ ॥
तरी पहा कीटका माझारी । वृत्तीची स्फूर्ति नसे निर्धारी । वृत्ति असतां प्रतिबिंबता खरी । कैशी न ये बिंबा ॥ २४ ॥
विष्णूचे अंतरीं काय बुद्धि नसे । म्हणून जीवाचें प्रतिबिंब न दिसे । बुद्धीच नसतां व्यापारही कैसे । होतील देहाचे २५
बुद्धि तेथें जीवाचें प्रतिबिंब । वृत्ति तेथें ईशाचें डिंब । जडीं मात्र नसती आदिस्तंब । वृत्ति बुद्धि अभावीं ॥ २६ ॥
तस्मात साकार तितुका जडाविण । उत्तमाधम सप्राण । तयामाजीं वृत्ति बुद्धि दोन । असती निश्चयें ॥ २७ ॥
मग असो साकार शिवादिकांचा । अथवा देह कीटकाचा । वृत्ति बुद्धि या उद्भव दोहींचा । तेथें जीवेश असती ॥२८॥
जैसें सूर्याचे तळवटीं । जळ भरोन ठेविलें घटीं । त्यांत प्रतिबिंब पडेलच उठाउठी । मग सान थोर कीं बहुत ॥२९॥
तैसें ब्रह्मादि कीटकांत जितुकें । साकार सुबुद्धि वृत्ति तितुकें । त्यामाजीं जीवेश हे निकें । आभासरूप भासती ३०
येथेंही म्हणतील कोणी । कीं घटीं येक प्रतिबिंबा उभवणी । येथें प्रतिपिंडीं आभासती दोन्ही । कैसे ते अवधारा
उथळ जळीं स्पष्ट दिसतें । सखोल जळींचें दिसेना तें । आंतचे आंतचि झळफळितें । सूक्ष्म दृष्टीनें दिसे ॥ ३२ ॥
तैसें बुद्धिचें रूप उथळ । तेथें जीवत्व दिसे टळटळ । वृत्तीचें रूप सूक्ष्म केवळ । म्हणून प्रतिबिंब अस्पष्ट ॥ ३३ ॥

---

शंका–तुम्ही जीव आणि ईश्वर हे दोघे प्रत्येक शरीरांत आहेत असें म्हणतां पण निरहंकारी ईश्वर देहावेगळा रहातो.

उत्तर–स्फूर्ति देहावेगळी असत नाहीं व स्फूर्तीत पडणारें प्रतिबिंब स्फूर्तीवांचून असत नाहीं. म्हणून देहावांचून ईश्वर असतो असें म्हणणें संभवत नाहीं.

शंका–ईश्वराचें प्रतिबिंब वृत्तींत पडतें वृत्ति जेथें नसेल तेथें तें स्थळ रिकामें पडतें. आणि ईश्वर तर सर्वव्यापी आहे असें शास्त्र सांगतें; तेव्हां या गोष्टीस विरोध येतो.

उत्तर–ईश्वराची सत्ता सर्व ठिकाणीं आहे. परंतु तो ईश्वर स्वतः वृत्तींत रहातो; जसा सार्वभौम राजा आपल्या राजधानींत राहून सर्व ठिकाणीं आपली सत्ता चालवितो.

शंका–एके ठिकाणीं असून अन्य स्थळीं उगीच सत्ता चालते असें जर आहे; तर साकारता एकच राजधानी विष्णूची कां म्हणूं नये? किडे आदिकरून प्राण्यांचे देहांत जीव रहातो परंतु तेथें ईश्वराचा अभाव आहे व विष्णूचें देहांत ईश्वर आहे पण तेथें जीवाचा अभाव आहे.

उत्तर–किड्याचे देहांत वृत्ति नसती तर त्या ठिकाणीं ईश्वर नाहीं असें म्हणतां आलें असतें. परंतु सर्व प्राण्यांचे ठायीं स्फूर्तीची वृत्ति आहे; म्हणून किड्याचे देहांत ईश्वर आहे. जशी सर्वांचे देहांत वृत्ति आहे तशी बुद्धीही आहे; म्हणून विष्णूचे देहांत जीव आहे. कारण जीवत्व बुद्धीवाचून भासत नाहीं. व ती असल्यावर भासल्यावाचून रहात नाहीं. याकरितां जेथें बुद्धि तेथें जीव आहे. आतां विष्णूचे देहांत बुद्धीच नाहीं असें म्हटलें तर त्याचे देहाचे व्यापार कसे होतील. ज्यापेक्षां देहाचे व्यापार होतात त्यापेक्षां बुद्धि विष्णूचे देहांत आहे. तसेंच किड्याचे देहांत वृत्ति आहे. जर वृत्ति नसती तर बिंब ईश्वरत्वानें किंवा जीवत्वानें प्रतिबिंबास कसें आलें असतें! ज्यापेक्षां प्रतिबिंब आहे, त्यापेक्षां किड्याचे देहांत वृत्ति आहे. जडांत बुद्धि व वृत्ति नाहीं म्हणून तेथें जीवेश्वर नाहीं.

जडावांचून जितका सप्राण साकार, उत्तम, अधम, मध्यम आहे. त्यांत बुद्धि व वृत्ति ह्या दोन्ही आहेत. जेथें बुद्धीवृत्ती आहे, अशा शंकराच्या किंवा किड्याच्या साकारांत जीवेश आहेत. जसें सूर्याचे खालीं पाणी भरून घट ठेविले ते घट लहान, मध्यम, मोठे असले तरी त्यांत प्रतिबिंब पडेलच, तसें ब्रह्मदेवापासून किड्याचे देहापर्यंत बुद्धीवृत्ती आहे तेथें जीवेश आभासतीलच.

शंका–सजल घटांत सूर्याचें एकच प्रतिबिंब पडतें, आणि तुम्ही पिंडामध्यें दोन प्रतिबिंबें सांगतां हें कसें काय आहे, तें सांगा.

उत्तर–उथळ पाण्यांतलें प्रतिबिंब स्पष्ट दिसतें. खोल पाण्यांतले प्रतिबिंब आंतल्याआंत झळफळतें, तें स्पष्ट दिसत नाहीं तेंच जेव्हां सूक्ष्म दृष्टी लावावी तेव्हां दिसतें. तसें बुद्धीचें रूप उथल आहे म्हणून त्यांत जीवत्व टळटळीत दिसतें. वृत्तीचें रूप सूक्ष्म आहे म्हणून त्यांतील प्रतिबिंब दिसत नाहीं.

तैंही सूक्ष्म दृष्टीनें दिसे । कार्यावरून अनुमाना येतसे । बुद्धि विकल्पाहून जीवाचें जैसें । तैसें प्रेर्य प्रेरक समजावे ॥३४॥
प्रेर्य तो हा जीव वावरे । तेव्हां प्रेरिला असे ईश्वरें । यया जीवत्वाचेनि अनुकारें । ईशही असे ऐसा ॥ ३५ ॥
ती वृत्ति अनुभवावी बुद्धीवीण । त्यांत ईश होय भासमान । बुद्धीच्या योगें वृत्तीचें अभान । मा ईश कळे कैसा ३६
प्रेरक सामर्थ्याहून पहावा । बोलता शंका वाटेल जीवा । कीं विष्णु सामर्थ्यवान स्वभावा । तेथें ईशत्व प्रत्यया ये ३७
तैसें सामर्थ्य कीटकांत नसे । तरी ईशत्व तेथें कैसें असे । या आक्षेपीं बोलिजे अल्पसें । अवधारावें ॥ ३८ ॥
विष्णूचें सामर्थ्य जें दिसतें । तें तें जीवाचें जाणावें समस्तें । ईश सामर्थ्य न दिसे आहे तें । प्रेरणात्मक ॥ ३९ ॥
सिंहामाजी हत्ती विदारी । मांजर होऊन उंदीर मारी । हे उपाधीस्तव उंच नीच परी । परंतु जीवधर्म ॥ १४४० ॥
तैसें विष्णूच्या देहीं सामर्थ्य मोठें । कीटका तृण उचलितां नुठे । परी तें जीवाचें कर्म गोमटें । दोहीं ठायीं ॥ ४१ ॥
ईशासी कर्मचि असेना । उगीच जीवाची करी प्रेरणा । म्हणून ईश्वर स्थूल दृष्टी दिसेना । जीवत्व दिसे ॥ ४२ ॥
तस्मात ब्रह्मादि कीटकांत देहीं । जीवेश असती निःसंदेही । येक दिसे येक न दिसे पाहीं । स्पष्टास्पष्ट म्हणोनी ॥४३॥
हीं वचनें मानिती अप्रमाण । तरी या अर्था बहुत प्रमाण । गीतेमाजीं भगवान । अर्जुना सांगे ॥ ४४ ॥
ईश्वर हा यंत्रारूढ होऊन । हृदयीं सर्वां स्वतां राहून । सर्व भूतांतें स्वमायेकडून । प्रेरणा करी ॥ ४५ ॥
ऐसेंचि वृत्तींत शिव असे यासी । श्रुति प्रमाण निश्चयेंसी । माया आणि अविद्या ऐशी । आपुल्या आभासीं निर्मी दोघां
माया म्हणजे विद्यात्मक वृत्ति । अविद्या तेचि नेणीव स्फूर्ति । हे दोन्ही येकरूप असती । बुद्धि उद्भवेना तंव ॥ ४७ ॥
बुद्धि उद्भवतां बुद्धींत । जीवत्व प्रवृत्तीकडे येत । म्हणून स्पष्टत्वें दिसूं लागत । ईश नोव्हे तैसा ॥ ४८ ॥
विद्यास्फूर्तीस ईश्वर । ये बुद्धीसी विक्षेप करणार । बुद्धींत न येती निमित्तमात्र । असती म्हणोनी ॥ ४९ ॥
अविद्यात्मक जीव उपादान । विद्यात्मक ईश निमित्तकारण । जैसे कुलाल मृत्तिका दोन । घटकार्या असती ॥५०॥
घटामाजीं मृत्तिका येत । तेवीं उपादानत्वें जीव बुद्धींत । कुलाल घटाहून भिन्न राहत । तेवीं भिन्न राहे ईश ॥ ५१ ॥

---

पण सूक्ष्म दृष्टी लाविली तर तैंही दिसतें. तें असें, जीव हा प्रेर्य आहे व त्याचा प्रेरक ईश्वर आहे, जेव्हां प्रेर्य जीव, वावरतोसा दिसतो, तेव्हां प्रेरक ईश्वर सहजच आहे.

वृत्ति बुद्धीवांचून जाणिली पाहिजे. मग तींत ईश्वर भासमान होतो. बुद्धीच्यायोगानें वृत्ति दिसत नाहीं, मग ईश्वर कसा कळेल ? जीवाचा प्रेरक ईश्वर हा सामर्थ्यावरून ओळखावा.

**शंका**–सामर्थ्यावरून ईश्वर ओळखावा असें म्हटलें असतां, विष्णु सामर्थ्यवान दिसतो, म्हणून तेथें ईश्वर आहे असा अनुभव येतो. विष्णुसारखें सामर्थ्य किड्यांमध्यें नाहीं म्हणून तेथें ईश्वर नाहींच, असें समजलें पाहिजे. मग तुम्हीं किड्यांमध्यें ईश्वर आहे म्हणतां कसें ?

उत्तर–विष्णूचें सामर्थ्य जें दिसतें तें जीवाचेंच आहे. तेथें प्रेरणात्मक ईशसामर्थ्य दिसत नाहीं. जसें सिंह हत्तीस मारितो, मांजर उंदरास मारितें, ह्या क्रिया उपाधीमुळें लहानमोठ्या होतात. यामुळें हत्तीपेक्षां सिंह सामर्थ्यवान, उंदरापेक्षां मांजर सामर्थ्यवान आहे असें दिसतें. परंतु हा जीवधर्म आहे; तसें विष्णूच्या देहांत मोठेंसें सामर्थ्य आहे; किड्यास तितकें सामर्थ्य नाहीं. त्यास गवत उचलण्यास मोठे श्रम पडतात. तरी दोहों ठिकाणीं जीवाचेंच कर्म समजावें. ईश्वरास कर्मच नाहीं तो उगीच जीवाची प्रेरणा करितो. म्हणून ईश्वर स्थूल दृष्टीनें दिसत नाहीं. जीवत्व दिसतें. ब्रह्मदेवापासून किड्यांपर्यंत सर्वांचे देहांत जीव आणि ईश्वर आहेत. त्यांत जीव स्पष्ट म्हणून तो दिसतो; ईश्वर अस्पष्ट आहे म्हणून तो दिसत नाहीं. ईश्वर सर्वांचे शरीरीं आहे असें सांगितलेलें खोटें वाटतें, पण कृष्णानेंही भगवद्गीतेमध्यें अर्जुनास सांगितलें आहे कीं, 'ईश्वर सर्वांचे हृदयांत राहून यंत्रारूढ होऊन आपल्या मतें सर्व भूतांस प्रेरणा करितो असेंच वृत्तीमध्यें ईश्वर आहे, याविषयीं श्रुतिप्रमाण आहे. तो ईश्वर आपल्या अभावाचे वेळीं माया आणि अविद्या उत्पन्न करितो. जी विद्यात्मकवृत्ति तीच माया, व नेणीव स्फूर्ति तीच अविद्या. माया आणि अविद्या ह्या दोन्हीही जोंपर्यंत बुद्धि उत्पन्न झाली नाहीं तोंपर्यंत एकरूप आहेत. बुद्धि उत्पन्न झाली म्हणजे बुद्धीमध्यें जीवत्व प्रवृत्तीकडे येतें. म्हणून जीव स्पष्ट दिसूं लागतो, तसा ईश्वर स्पष्ट दिसत नाहीं. विद्या, स्फूर्तिसहवर्तमान ईश्वर, हा बुद्धीस विक्षेप करणारा आहे. तो निमित्तमात्र असल्यामुळें बुद्धींत येत नाहीं. अविद्यात्मक जीव उपादान व विद्यात्मक ईश्वर निमित्त कारण आहे. जसें घटकार्यास कुंभार आणि माती हीं निमित्त आणि उपादान कारण आहेत, त्याप्रमाणें जीव आणि ईश्वर कारण आहेत. जशी घटामध्यें माती येते तसा उपादानत्वें जीव बुद्धींत येतो. कुंभार घटाहून निराळा असतो; तसा ईश्वर देहाहून निराळा म्हणजे अलिप्त असतो.

विद्या जरी बुद्धींत प्रवेशे । परी ईशत्व न ये जीवसहवासें । अथवा विद्येसह ईश प्रतिभासे । तरी तो परिणाम ॥५३॥
प्रेरणाकार्थ ईशासी जोंवरी । ईशही सरूप सनाम तोंवरी । तें कार्य नसतां नाम ईश्वरीं । कोठें उरे ॥ ५३ ॥
बुद्धीमाजीं जरी येता । प्रेरणाकार्या होय त्यागिता । तैसाचि सुषुप्तिकाळ होतां । ईश सकार्य नाम सांडी ॥ ५४ ॥
जीव जैसा अज्ञानगर्भी उरे । तैसेंचि आनंदकोशीं ईशत्व स्थिरे । विज्ञानात्मा जीवा नाम बा रे । प्रज्ञानात्मा ईश ५५
हे दोन्ही कारणात्मा शुद्ध । त्यांतचि मिळून राहती अभेद । जेव्हां प्रवृत्तीचा उभारा विशुद्ध । तेव्हां दोघे उद्भवती ॥५६॥
जीवाच्या प्रारब्धदशेचा उभारा । तेव्हां बुद्धियोगें ये जागरा । तयाचा प्रेरक ईश हा खरा । तितुक्या विक्षेपकाळीं ॥५७॥
पुन्हां बुद्धीचे तरंग नाना । होत असती जे क्षणक्षणां । तेही ईश्वराची प्रेरणा । परी ते विकार जीवाचे ॥ ५८ ॥
तूं म्हणसी तो अंतर्यामी । ओळखीस न ये अनुक्रमीं । तरी तो अतिसूक्ष्म सुखधामीं । आहाच पाहतां न कळे ॥५९॥
पटामाजीं तंतु ओळखितां । प्रतीतीस येत असे तत्वतां । परी तंतूचे अंतरीं अंशु असतां । स्थूळदृष्टी दिसेना ॥ ६० ॥
तैसा बुद्धीचा आभास कळों येतो । परी विद्याप्रतिबिंबीं कळेना तो । तोही सूक्ष्म अनुभवा कळतो । अंशु सूक्ष्मदृष्टी जेवीं
पहा पहा बुद्धीविण जीव । जो नुसधा अविद्यात्मक भाव । तयाचाही नव्हे अनुभव । बहिर्मुखत्वें ॥ ६२ ॥
बुद्धिअभावीं जीव दिसेना । मा ईश कैसा ये अनुमाना । न कळे म्हणून न करावी कल्पना । जीवेश अभावाची ॥६३॥
बुद्धि उद्भवे आणि नासे । परी विद्याअविद्यात्मक वृत्ति न नासे । त्या दोहींमाजीं असतचि असे । जीवत्व ईशत्व ॥६४॥
तस्मात् जयासी पहावें वाटे । तेणें अंतर्मुख व्हावें नेटें । विशेष बुद्धीचा तरंग नुठे । तेव्हां वृत्ति अनुभवावी ॥ ६५ ॥
या वृत्तींत कळणें न कळणें । दोन्हीही असती समानें । तेचि विद्याअविद्येचीं लक्षणें । आवरण विक्षेपरूपें ॥ ६६ ॥
जया अधिष्ठानीं वृत्ति । उद्भवली तया होय नेणती । जाणूं लागे चंचल स्फूर्ति । सहित कार्य जें जें ॥ ६७ ॥
स्फूर्तिसी जाणे तेचि विद्या । येर न जाणे ते अविद्या । ह्या दोन्हीं समजाव्या आद्या । सूक्ष्मदृष्टी ॥ ६८ ॥
यांत चिद्रूप ज्ञानाऐसें । ज्ञान स्फुरे जें मिथ्या आभासें । तेचि जीवेश जाणावे अभ्यासें । तेव्हां कळती ॥ ६९ ॥

---

विद्या ही बुद्धींत प्रवेशली तरी जीवसहवासानें त्यास ईशत्व येत नाहीं. विद्येसहवर्तमान ईश्वर बुद्धींत प्रतिभासला तरी तो परिणाम आहे. ईश्वरास जोंपर्यंत प्रेरणा कार्य आहे तोंपर्यंत ईश्वरास रूप नांव आहे. तें कार्य सरलें म्हणजे मग ईश्वरास नाम कोठचें ? ईश्वर, प्रेरणा कार्य टाकून बुद्धींत येताना ? किंवा झोंप लागली असतां ईश्वर कार्यासह नांव टाकून जीव जसा अज्ञानगर्भात उरतो, तसा ईश्वर आनंदकोशांत उरतो. जीवास विज्ञान आत्मा म्हणतात. ईश्वरास प्रज्ञानआत्मा म्हणतात. जीव आणि ईश्वर हे दोघेही कारणात्मा आहेत. हे दोघे अभेदत्वानें त्यातच मिळून रहातात. ते जेव्हां प्रवृत्तीचा उभारा होतो तेव्हां उत्पन्न होतात. जीवाच्या प्रारब्धदशेचा उभारा होतो तेव्हां जीव बुद्धीचे योगानें जागृतीस येतो व त्याच्या तितक्या विक्षेप काळीं ईश्वर प्रेरक होतो. ईश्वराच्या प्रेरणेनें बुद्धीचे अनेक तरंग उठतात. तरी ते जीवाचेच विकार आहेत असें समजावें. जीवाचा प्रेरक अंतर्यामीं ईश्वर हा ओळखत नाहीं. असें म्हणशील तर तो फार सूक्ष्म ठिकाणीं आहे. म्हणून तो एकदम स्थूलदृष्टीनें पाहूं गेलें असतां दिसत नाहीं. जसा वस्त्रामध्यें तंतू पाहूं गेलें असतां अनुभवास येतो. परंतु तंतूमध्यें कापूस पाहूं गेलें असतां तो स्थूलदृष्टीनें दिसत नाहीं. तसा बुद्धींत आभासणारा जीव कळतो, पण विद्येंत प्रतिबिंबणारा ईश्वर कळत नाहीं. तो सूक्ष्मदृष्टीनें कळतो.

बुद्धीवांचून जीव केवळ अविद्यात्मक आहे. त्याचा बहिरमुखत्वें अनुभव येत नाहीं. जर बुद्धीवांचून जीव कळत नाहीं तर ईश्वर कसा कळेल ? जेव्हां जीव आणि ईश्वर हे क्रियात्मक आहेत हें कळत नाहीं. तेव्हां त्यांचे अभावाची कल्पना करितात. वास्तविक बुद्धि उत्पन्न होते व नाहींशी होते. पण विद्या अविद्यात्मकवृत्ति नासत नाहीं. ती जोंपर्यंत आहे तोंपर्यंत विद्याअविद्येंत जीव आणि ईश्वर हे आहेत. ते जीवेश्वर ज्याला पहावे असें वाटेल त्यानें अंतरमुख व्हावें. बुद्धीचा जेव्हां विशेष तरंग उठत नाहीं तेव्हां वृत्तीचा अनुभव घ्यावा त्या वृत्तीमध्यें कळणें आणि न कळणें हीं दोन्हीही समान आहेत त्याचें आवरण विक्षेपात्मक विद्या अविद्याआहेत.

वृत्ति ज्या अधिष्ठानीं उत्पन्न झाली, त्या अधिष्ठानास ती न जाणून, चंचल स्फूर्तीसहवर्तमान जें जें कार्य त्यास जाणूं लागली जी स्फूर्तीस जाणूं लागली तीच विद्या. जी जाणत नाहीं तीच अविद्या. ह्या दोन्ही सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां पुरातन आहेत. त्यांमध्यें चिद्रूपज्ञानासारखें ज्ञान, मिथ्या आभासतें. तेच जीव आणि ईश्वर. हे जीवेश्वर अभ्यासानें कळतील.

परी त्यांतही मुख्य बिंबात्मा । सामान्यत्वें ज्ञानघन आत्मा । तोचि जाणावा कारणात्मा । त्याहून भिन्न हे दोन्ही ॥७०॥
तो ब्रह्मप्रत्यगात्मा ज्ञानघन । ब्रह्मादि तृणांत अविच्छिन्न । जो स्वप्रकाशें भासवी संपूर्ण । आणि लयही जाणे ॥७१॥
जो या श्लोकीं निरोपिला । रूपादिसह बुद्धि व्यापाराला । बुद्धि आणि निर्विकल्प वृत्तीला । सहज प्रकाशी ॥ ७२ ॥
अविद्याविद्या जीवशीव । निर्माण तितुकें प्रकाशी सर्व । याहून प्रतिबिंबित जो स्वभाव । जिवेशांचा भिन्न ॥ ७३ ॥
जैसा सूर्य भिंती अंगणें घरें । घट जळ प्रतिबिंबादि सारें । एकदांचि प्रकाशी साचोकारें । तैसा आत्मा प्रकाशी ॥७४॥
घटजळीं जो बिंबला । तो सूर्याहून वेगळा जाहला । तैसा आभासरूपें वृत्तींत उमटला । तो स्वरूपाहून भिन्न ॥ ७५ ॥
वृत्तीचा उगाच चंचळपणा । त्यांत जाणिवेची बिंबित लक्षणा । येक चिद्रुपाचा व्यापकपणा । एवं दोन्हीही सत्यमिथ्या
सत्य तो व्यापक बिंबात्मा । मिथ्या तो प्रतिबिंब अनात्मा । हे दोन्ही जो निवडी महात्मा । विचारदृष्टीनें ॥ ७७ ॥
मिथ्यात्वें मिथ्याचा करी त्याग । सत्य तें सत्य होय अंगें । परी दोन्हीही समजावे अव्यंग । सत्य आणि आभास ७८
सूर्यदृष्टांतीं जळीं व्यापकता । नसे म्हणून न ये साम्यता । परी सत्यमिथ्या चिदाभासता । निवडून गेली ॥ ७९ ॥
आतां वृत्तींतचि येक प्रतिबिंब । दुसरें व्यापकत्वें चिद्रुप स्वयंभ । हें स्पष्ट कळावें सुलभ । ऐसा दृष्टांत देऊं ॥१४८०॥
घटीं जल घालितां भासत । आकाशापरी आभास दिसत । दुसरें शुद्ध गगन सर्व घटांत । न दिसतां व्यापून असे ८१
व्यापलें तें जला आदि अंतीं । आहे तैसें असे निश्चितीं । तैसा स्फूर्तींत व्यापक जो चिन्मूर्ति । वृत्ति अभावीं सत्य ८२
जलाभास जल तोंवरी दिसे । जल नसतां भासकता नासे । तेवीं वृत्तींत प्रतिबिंबरूप भासे । तें नासे वृत्तीसवें ॥८३॥
जें वृत्तिबुद्धींत प्रतिबिंबलें । चिद्रूपा ऐसें उगेंच भासलें । तया मिथ्यासी नाम ठेविलें । जीवेश दोन ॥ ८४ ॥
येक विकल्प दोष गुणाचा । करितो जीव बुद्धिगत साचा । दुजा प्रेरक जीवाचे कर्मांचा । नुसते वृत्तीचा आभास ॥८५॥
असो जीवें केलें तें जीवनिर्मित । ईशें केलें तें ईश्वरद्वैत । इतुकेंही कार्यरूप जगत । आणि जीवेश कारण ॥ ८६ ॥
इतुकियाही दृश्यभासाहून । स्वप्रकाश ब्रह्म आत्मा ज्ञानघन । वेगळा असे सर्वांत असून । निर्विकारें असंग ॥ ८७ ॥
जैसें घटजळीं असोन गगन । सर्वां वेगळें व्यापकपण । जळाचे विकार अनान । न स्पर्शती तया ॥ ८८ ॥
तैसेंचि सर्व जग जीवेशासहित । चंचळ जड दृश्य भास समस्त । इतुकियांमाजींही चित्प्रभा व्याप्त । परी वेगळी सर्वांहूनी
तेंचि आतां पुढील श्लोकीं । विवेचना कीजे निकी । येथें सावधान असावें साधकीं । यया निरूपणीं ॥ १४९० ॥

---

जीवेश्वर ज्याचीं प्रतिबिंबें तो ज्ञानघनात्मा त्यांचा कारणात्मा आहे व त्याहून ते दोघे भिन्न आहेत.

ज्ञानघन ब्रह्म, प्रत्यगात्मा हा ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत सर्वांत असून आपल्या प्रकाशानें प्रकाशितो. व त्यांचा लयही जाणतो. बुद्धि, निर्विकल्प वृत्ति, जीव, शीव, विद्या, अविद्या इत्यादि जितकें उत्पन्न झालेलें त्यास हा आत्मा प्रकाशितो. तसे जीवेश प्रकाशक नाहींत. सूर्य जसा भिंतीं, अंगणें, घरें, घट, जळ, त्यांतील प्रतिबिंब, यांस एकदांच प्रकाशितो; तसा आत्मा सर्वांस प्रकाशितो. घटांतील पाण्यांत जो दिसलेला तो, सूर्याहून निराळा आहे. तसा वृत्तींत उमटलेला आभास स्वरूपाहून निराळा आहे. जो मिथ्याभास अनात्मा म्हणून तो मिथ्या. व व्यापक जो बिंब प्रत्यगात्मा तो सत्य. मिथ्या आभासाचा मिथ्यत्वानें त्याग करून सत्य तें आपण स्वतः व्हावें.

घटामध्यें पाणी घातलें म्हणजे त्या पाण्यांत आकाशासारखें आकाश दिसतें व दुसरें घटांत पाणी घातलें नाहीं म्हणून आकाश दिसत नाहीं. पण त्यांत शुद्ध आकाश व्यापून आहे. याप्रमाणें व्यापक आकाश पाण्याचे अगदीं अंतीं आहे तसें आहे. तसा स्फूर्तींत व्यापणारा आत्मा वृत्तीच्या अभावींही सत्य आहे. जलाभास, जल आहे तोंपर्यंत भासतो. जल नसेल तर भासकता नाहींशी होते. तसें वृत्तींतील प्रतिबिंब वृत्ती आहे तों भासतें; वृत्ती नाहिशी झाली म्हणजे त्याचा नाश होतो. वृत्ती आणि बुद्धि यांत प्रतिबिंबलेलें चिद्रूप त्या मिथ्याभासास जीव आणि ईश्वर असें नांव ठेविलेलें आहे. बुद्धींत उमटून जो दोषगुण यांचा विकल्प करितो तो जीव. दुसरा जीवाचे कर्मांचा प्रेरक व वृत्तीचा आभासक असा ईश्वर. जीवानें केलेलें तें जीवकृत. आणि ईश्वरानें केलेलें तें ईश्वरकृत. मिळून सर्वही जग कार्यरूप आहे व त्या जगताचे जीवेश हे कारण आहेत. या सर्व दृश्यभासाहून स्वप्रकाशक आत्मा सर्वांत असून निर्विकारत्वानें असंग आहे. जसें आकाश घटांतील पाण्यांत असून व्यापकपणानें तें सर्वांवेगळें रहातें, त्यास जळाचे अनेक प्रकारचे विकार स्पर्शत नाहींत; तसें जीवेशासह सर्व जगत चंचल, जड, दृश्य भासमान आहे इतक्यांत चित्प्रभा व्याप्त असून सर्वांहून ती वेगळी आहे. हें निरूपण पुढील श्लोकांत सांगावयाचें आहे.

सर्व मागील आलोडून आलें । निरूपण जितुकें होऊन गेलें । सर्व पदार्थमात्र निवडले । तितुकाही अनुवाद येथें ॥ ९१ ॥
तस्मात अतितर सावधान । सांग घडत असे विवेचन । अनात्मजात निरसून । आत्मत्वें आत्मा भेटे ॥ ९२ ॥

**रूपाच्च गुणदोषाभ्यां विविक्ता केवलाचितिः । सैवानुवर्तते रूपरसादीनां विकल्पने ॥ ८ ॥**

रूपाहून गुणदोषांहूनी । वेगळी चित्प्रभा सर्वा भासउनी । तेचि व्यापक असे सर्वांलागुनी । रूपरसादि विकल्पासह ॥ ९३ ॥
रूपाहून वेगळे म्हणितलें । ईशानिर्मित तितुकेंही आलें । रूप येक उपलक्षण केलें । परी ईश द्वैताहूनी भिन्न ॥ ९४ ॥
गुणदोष म्हणजे जीवें केलें । जितुकें कल्पून भोग्या आणिलें । तितुकियाहूनही चिद्रूप संचलें । विकारलें नाहीं ॥ ९५ ॥
तेंचि व्यापून सर्वा असे । पदार्थमात्र त्याहून न दिसे । घटीं कीं जळीं आकाश जैसें । तेवीं रसादि विकल्पीं ॥ ९६ ॥
हेंचि आतां प्रांजळ करूं । पदार्थमात्र विवेचनें विवरूं । ध्वनितार्थें कळवया निर्धारू । व्यतिरेक अन्वयाचा ॥ ९७ ॥
रूप म्हणजे आदिकरून । पंचविषयात्मक संपूर्ण । या पांचांपरता पदार्थ अन्य । त्रिभुवनीं नाहीं ॥ ९८ ॥
रूप तितुकें ईशानिर्मित । जडचंचलादि समस्त । एक रूपाचा करितां संकेत । नाम वेगळे घेणें नको ॥ ९९ ॥
नामरूप तितुकी माया । आदिकरून तृणांत कार्या । व्यापून चित्प्रभा जे अद्वया । सर्वा ऐसी नव्हे ॥ १५०० ॥
मायादि तृणांत सहजचि जाहलें । वास्तव हें स्वभावेंचि उद्भवलें । यया नामरूपीं उगेचि कल्पिले । प्रकार दोन ॥ १ ॥
येक स्वाभाविक आणि दुसरें । ईक्षणें निर्मिलेंसे ईश्वरें । दोन्ही मायासामर्थ्य परि निमित्तमात्रें । जाण त्या हेतूचें ॥ २ ॥
मायास्फुरण जाहलें सहज । तेथें स्मरणास्मरण दोन्ही बीज । स्मरण तें कळणें ज्ञान चोज । अस्मरण न कळणें अज्ञान ३
एवं विद्या अविद्या सहज जाहलिया । त्यांत सहजीं पडणें आपसया । प्रतिबिंबा नामें दोहींचिया जिवेश्वर दोनी ॥ ४ ॥
इतुकें सहज जाहलें निर्माण । हें स्वाभाविक बोलावें वचन । पुढें सहजचि परी कल्पावें भिन्न । कीं ईशें निर्मिलें ॥ ५ ॥
विद्या प्रतिबिंबित ईश्वर । सर्वज्ञ ज्ञानाभास चतुर । तया ईक्षणमात्रें नाना प्रकार । होते जाहले ॥ ६ ॥
प्रथम गुण शक्तीसहित । सत्वगुण तोचि ज्ञानशक्ति विख्यात । क्रियाशक्ति रजोगुणयुक्त । द्रव्याशक्ति तमोगुण ॥ ७ ॥
तमोगुणाचि द्रव्यशक्ति । तेचि पंचभूतें स्पष्ट दिसती । जयांचे पंचविषय बोलिजेती । अनुक्रमेंकडूनी ॥ ८ ॥
आकाश वायु तेज आप भूमि । हीं पांच भूतें सविषय नामीं । शब्द स्पर्श रूप रस गंधानुक्रमीं । हे पंचविषय पांचांचे ॥ ९ ॥
हेचि मुख्य पंचमहाभूतें । यांपासून तीं भौतिकें समस्तें । जे करून केलीं पंचीकृतें । तीं निरोपिलीं मागां ॥ १५१० ॥

---

यांत मागें जें निरूपण होऊन गेलें त्या निरूपणांत सर्व पदार्थ निवडिलेले आहेत, तितक्यांचा अनुवाद येथें करावयाचा आहे.

**अर्थ**–रूपाहून, गुणदोषाहून, सर्व भासाहून, चित्प्रभा, वेगळी आहे. व तीच रूपरसादि विकल्पासह सर्वांस व्यापून आहे. रूपाहून असें उपलक्षणांनीं सांगितलें, यावरून ईशानिर्मिताहून व गुणदोषाहून म्हणजे जीवकृताहून न विकारतां, चित्प्रभा निराळी असून सर्वांस व्यापून आहे. तिच्यावांचून पदार्थमात्र कांहीं वेगळा राहिलेला नाहीं. जसें आकाश घटांत किंवा जलांत व्याप्त, तशी चित्प्रभा रसादि विकल्पास व्यापून आहे. हेंच आतां अन्वयव्यतिरेकानें विवेचनानें प्रांजल करून सांगतों.

रूप म्हणजे सर्व पंचविषयात्मक जग, किंवा जडचंचळादिक सर्व जीवेशनिर्मित नामरूप, यास व्यापून चित्प्रभा सर्वांहून वेगळी आहे. मायेपासून तृणापर्यंत सर्व सहजच झालें. त्यांचे दोन प्रकार कल्पिले १ स्वाभाविक २ ईश्वराचे ईक्षणानें झालेले. दोन्हीही मायासामर्थ्यानेंच पण जाणत्या हेतूचे निमित्तमात्रें झाले. मायास्फुरण सहज झालें. त्यांत स्मरण अस्मरण उत्पन्न झालें. स्मरण म्हणजे कळणें, ज्ञान; अस्मरण म्हणजे न कळणें, अज्ञान; याप्रमाणें स्मरणअस्मरणरूपी विद्याअविद्या सहज उत्पन्न झाल्या. त्यांत सहजच आपाप प्रतिबिंब पडलें. त्यास जीव आणि ईश्वर अशीं नांवें आहेत. ते हें सहज उत्पन्न झालें यास स्वाभाविक म्हणतात. या स्वाभाविकापासून पुढें दुसरें सहजच झालें. परंतु त्यास ईश्वरानें केलेलें असें मानावें.

ईश्वराचे ईक्षणानें पुष्कळ प्रकार झाले. त्यांत प्रथम गुण आणि शक्ति उत्पन्न झाल्या. सत्वगुण ज्ञानशक्ति, रजोगुण क्रियाशक्ति, तमोगुण द्रव्यशक्ति, तमोगुणापासून पंचभूतें झालीं. व त्या पंचभूतांपासून पंचविषय झाले, पंचविषयांसह पंचभूतें व मागें सांगितलेलीं भौतिकें या सर्वांनि-

अवघियां मिळून चारी खाणी । पांचवी मानसिकाची उभवणी । इतुकींही भौतिकात्मक खाणी । भूतेंविण पदार्थ नसे ११
कल्पनेनें सहज जाहलें । तें मानसिक सहज उद्भवलें । जारापासून जे जन्मले । ते जरायुज ॥ १२ ॥
अंडापासून जे जे होत । ते ते अंडज बोलिजेत । स्वेदापासून जे जे निर्मित । ते ते स्वेदज ॥ १३ ॥
उद्भिजाचे प्रकार दोन । येक वायूपासून होती निर्माण । दुसरे वृक्षादि तृणांत संपूर्ण । स्थावर बोलिजे ॥ १४ ॥
स्थावरात्मक ते न चालती । भूमींत समूळ रोविले असती । तेथें प्राण किंचित् न वाहती । म्हणोनि जड ॥ १५ ॥
येर उरले ते जडचि असोनि । प्राणास्तव चालती खाती म्हणोनी । जंगम ऐसें बोलिजे वाणी । एवं प्रकार दोन जडाचे
एवं इतुकें हें दृश्य ब्रह्मांड । त्यांत सान थोर नानापिंड । सर्वही नामरूपात्मक झाड । मायामूळाचें ॥ १७ ॥
इतुकियासी आधार एक । अधिष्ठान ब्रह्म निश्चयात्मक । सर्वीं अस्ति भाति प्रियात्मक । ज्यावरी नामरूपें दिसती १८
जैसें येक आकाश निश्चळ । त्यांत सान थोर घट सकळ । मडकीं रांजण बोळकीं परळ । अथवा नानाविध पात्रें॥१९॥
तैसें परब्रह्म जें निघोट । त्यामाजीं ब्रह्मांड हा मठ । तया मठीं नाना पिंड घट । दाट ठेविले ॥ १५२० ॥
कित्येक जलें असती भरले । ते ते पिंड जंगम बोलिले । कित्येक कोरडे असती ठेविले । ते सूक्ष्माविण स्थावर॥२१॥
कोरडे घटीं जलाकाश न दिसे । परी व्यापकपणें आकाश असे । सूक्ष्मावीण जीवेश नसे । परी ब्रह्म असे स्थावरीं ॥२२
आहे दिसे आणि चांगुलें । हें अस्ति भाति प्रिय संचलें । यया अधिष्ठानीं रूपतें आकारा आलें । नाम ठेविलें ओळखीसी
आतां सजल घट ते जंगम । जे जे सप्राण उत्तमाधम । त्यांत अस्ति भाति प्रिय परम । आणि सूक्ष्मासह जीवेश २४
सुवर्णादि घट धातूंचे । तैसे उत्तमोत्तम पिंड देवाचे । मध्यम मानव जेवीं खापराचे । शेणादिकांचे कीटक ॥ २५ ॥
ऐसे घटपिंड चिदाकाशीं । मांडिले असती येकरसीं । त्यांत वास्तव्य ज्ञानक्रिया दोहींसी । सत्वरजात्मक ॥ २६ ॥
देहमात्र साकार जितुका । तमोगुण द्रव्यशक्तीचा तितुका । या सर्वांमाजीं संघ हा आसिका । असे जीवेशांसह ॥ २७॥
इतुकें वेगळालें पाहणें नलगे । एका देहाचें पहावें अंगें । सर्वही माया अविद्यादि सोंगें । अनुभवा येती ॥ २८ ॥

ळून चारी खाणी व पांचवी मानसिक योनी झाली. जें कल्पनेनें झालेलें तें मानसिक, जारापासून झालें तें जारज, अंडापासून झालें तें अंडज, स्वेदापासून झालें तें स्वेदज. उद्भिजाचे दोन प्रकार एक वायुपासून होणारे व दुसरे वृक्षादि तृणापर्यंत सर्व, यांस स्थावर म्हणतात. स्थावरात्मक पदार्थ चालत नाहीं व त्यांचीं मुळें जमिनींत रोविलेलीं असतात; व त्यांचे ठायीं किंचितही प्राण वहात नाहींत; म्हणून ते जड. या स्थावराखेरीज दुसरे पदार्थ उरले तेही जडच आहेत. परंतु ते प्राणामुळें खातात व चालतात म्हणून त्यांस जंगम म्हणतात. याप्रमाणें जडाचे स्थावर आणि जंगम असे दोन प्रकार आहेत.

वर सांगितल्याप्रमाणें जें सर्व स्थावरजंगमात्मक दृश्य ब्रह्मांड त्या ब्रह्मांडामध्यें लहानमोठें अनेक प्रकारचे पिंड. याप्रमाणें नामरूपात्मक झाड मायामुळाचें आहे. या झाडास आधार ब्रह्म आहे, ज्यावर अस्तिभातिप्रियात्मक नामरूपें दिसतात. जसें एक निश्चळ आकाश त्यांत लहान मोठें घट, मडकीं, रांजण, बोळकीं, परळ अथवा अनेक प्रकारचीं भांडीं, तसें परब्रह्मामध्यें ब्रह्मांड हा मठ. त्या मठामध्यें अनेक प्रकारचे पिंड हेच घट ठेविलेले आहेत. त्यांत कित्येक पाण्यांनीं भरलेले घट आहेत. तसें येथें जंगमात्मक पिंड आहेत. कित्येक कोरडे घट आहेत. तसे येथें सूक्ष्म देहाखेरीज स्थावर आहेत. कोरडे घटांत जलाकाश दिसत नाहीं पण व्यापकपणानें आकाश असतें. तसें सूक्ष्मदेहावांचून जीवेश स्थावरांत रहात नाहींत पण व्यापकपणानें ब्रह्म असतें.

पदार्थ आहेत दिसतात व चांगले वाटतात. त्या पदार्थांत ब्रह्माचीं अस्तिभातिप्रिय लक्षणें आहेत. ब्रह्म व रूप आकारास आलें. त्या रूपाच्या ओळखीकरितां नानाप्रकारें नांवें कल्पिलीं. सजल घटाप्रमाणें जे जंगम त्यांत अस्तिभातिप्रिय आणि सूक्ष्मदेहासह जीवेश हे आहेत. सोनें आदिकरून जसे धातूंचे घट तसे देवांचे उत्तमोत्तम पिंड. जसें खापराचे घट तसे मनुष्यांचे पिंड. जसे शेणाचे घट तसे किड्यांचे पिंड. याप्रमाणें पिंडरूपी घट चिदाकाशांत मांडिलेले आहेत त्यांत सत्वरजात्मक ज्ञान व क्रियाशक्ति आहेत. जितका साकारदेह तितका तमोगुण द्रव्यशक्तीचा आहे. यांत वर सांगितलेला जीवेशासह सर्व संघ आहे.

प्रत्येक पिंडात काय काय आहे हें निरनिराळें पहाण्याची गरज नाहीं. एका पिंडांत काय आहे तें कळलें म्हणजे सर्व पिंडांचा अनुभव येईल. हा अनुभव आपले देहीं पाहून मग इतर पिंडांचा विचार करावा.

जेवीं घट उदंड गगनीं असती । तितुके भिन्न पहावे न लगती । येका घटाची कळतां रीती । सर्व कळले ॥ २९ ॥
तैसेंचि जयासी वाटे विचारावें । तेणें आपुले देहीं पहावें । सर्व पदार्थमात्र अनुभवावे । मग सर्वीं आणावे प्रत्यया ३०
घटामाजीं जैसें जल । तैशी सूक्ष्मदेहाची चळवळ । जयाचीं सत्रा तत्वें सकळ । परी कोश तीन ॥ ३१ ॥
उगे चंचळपणें वावर्ता । ते पंचप्राण नखशिख वाहती । तेणें आधारें पांच क्रिया उमटती । बाह्य कर्मेंद्रियांच्या ॥३१॥
वाचेचें बोलणें पाणि देत घेत । पाद चाले उपस्थ रति भोगित । गुदेंद्रिय मळमूत्रविसर्ग करित । हे क्रियाशक्ति प्राणाचीं
एवं दहा प्रकार क्रियेचे । प्राण कर्मेंद्रिय प्राणमयाचे । ऐसेच ज्ञानशक्ति मनोमयाचे । सहा प्रकार ॥ ३४ ॥
चंचळपणीं वावरावें । परी पदार्थमात्र ओळखावे । निश्चयेंविण संशयीं पडावें । तेंचि मन ॥ ३५ ॥
तेंचि पांचा द्वारें निघोनी । बाह्यविषयीं पडे जाउनी । ज्ञानेंद्रिय नाम त्या द्वारा लागुनी । श्रोत्र त्वक् चक्षु जिव्हा घ्राण ३६
ऐकणें स्पर्शणें पाहणें । रस कळे गंध घेणें । हे पांचही ओळखावे मनें । परी संशय न फिटे ॥ ३७ ॥
एवं ज्ञानेंद्रियें पांच सहावें मन । हें मनोमयकोशाचें लक्षण । हें प्राणमयाचे अंतरीं जाण । त्याहून सूक्ष्म असे ॥३८॥
जैशी मनासी ज्ञानशक्ति । तैशीच बुद्धीसी ज्ञानस्फूर्ति । परी संशयरूप मनाची व्यक्ति । बुद्धि निश्चय करी ॥ ३९ ॥
या बुद्धीसीही ज्ञानेंद्रियद्वारा । जाणें असे शब्दादि व्यापारा । म्हणोनि तेचि पांच साहाकारा । बुद्धीसी असती ॥४०॥
तस्मात् पांचही ज्ञानेंद्रिय । साहावी बुद्धि जे करी निश्चय । हाचि जाणावा विज्ञानमय । ज्ञानशक्तीरूप ॥ ४१ ॥
एवं प्राण मन विज्ञान । हे लिंगदेहाचे कोश तीन । ज्ञान क्रिया शक्ति दोन । असती गुणांच्या ॥ ४२ ॥
एवं कोशत्रयात्मक सूक्ष्म । सत्रा तत्वांचा अनुक्रम । स्थूलदेहामाजीं संभ्रम । घटीं जेवीं पाणी ॥ ४३ ॥
आर्द्र चंचल जेवीं पाणी । तेवीं विहार प्राणालागुनी । झळके पाणी तेवीं मन विज्ञानीं । ज्ञानशक्ति असे ॥ ४४ ॥
त्यांत कांहींसा झावळपणा । तेवीं संशयरूपता असे मना । केवळ झळझळ तेवीं विज्ञाना । निश्चयात्मकता ॥ ४५ ॥
असो ऐसे मन बुद्धि दोन । त्यांत मुख्यत्वें वसती गुण तीन । जें मागां सांगितलें लक्षण । घोर मूढ शांतवृत्ति ॥४६॥
एवं स्थूलादि गुणांपर्यंत । स्वाभाविक परी ईशनिर्मित । सांगितले घट सजलयुक्त । स्थूल सूक्ष्म दोन्ही ॥ ४७ ॥

---

जसें आकाशांत अनेक घट असले तरी ते सर्व पहाण्याची जरूर नाहीं. एका घटाचा विचार केला म्हणजे सर्व कसे झाले तें कळतील. त्याचप्रमाणें पिंडांचा विचार करावा. घटांत जशी पाण्याची चळवळ तशी पिंडांत सूक्ष्मदेहाची चळवळ आहे. सूक्ष्मदेह सत्रा तत्वांचा आहे. पण सत्रा तत्वें मिळून तीनच कोश होतात. प्राण चंचलपणानें वहातात. त्यांचेयोगानें कर्मेंद्रियांच्या पांच क्रिया होतात. त्या ह्या कीं, वाचेनें बोलणें, हातानें देणेंघेणें, पायानें चालणें, उपस्थानें रतिभोग घेणें, गुदानें मळमूत्र विसर्ग करणें. प्राणपंचक व कर्मेंद्रियपंचक मिळून प्राणमयकोशाचे दहा प्रकार होतात, प्राणमयकोशांत क्रियाशक्ति आहे.

मनोमयकोशांत ज्ञानशक्ति आहे. त्याचे सहा प्रकार आहेत. चंचलपणानें हिंडून पदार्थ ओळखावे परंतु निश्चय न होतां संशयांत पडावें असें जें तें मन. हें मन पांच द्वारानें निघून बाह्यविषयीं जातें, त्या त्याच्या गमनाच्या द्वारांस ज्ञानेंद्रियें म्हणतात. ज्ञानेंद्रियांच्या क्रिया मनानें ओळखाव्या आणि संशयांत पडावें असें जें मन, तें मन पंचज्ञानेंद्रियें मिळून सहा प्रकारचा मनोमय कोश. हा मनोमय कोश प्राणमयकोशाचे आंत आहे. म्हणून प्राणमयाहून मनोमयकोश सूक्ष्म मनाची जशी ज्ञानशक्ति तशी बुद्धीची ज्ञानस्फूर्ति–मनाची संशयरूप व्यक्ति–बुद्धीची निश्चयात्मक व्यक्ति आहे. बुद्धि ज्ञानेंद्रियद्वारानें शब्दादि व्यापार करिते. म्हणून बुद्धीला पंचज्ञानेंद्रियें सहाय्य आहेत. पंचज्ञानेंद्रियें व बुद्धि मिळून विज्ञानमयकोशाचे सहा प्रकार आहेत. प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय असे तीन कोश मिळून सत्रा तत्वांचा लिंगदेह आहे.

पांच प्राण, पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें व मन आणि बुद्धि मिळून सत्रा तत्वें. व ज्ञान आणि क्रिया अशा दोन शक्ति मिळून जो सूक्ष्मदेह हा जसें घटांत पाणी त्याप्रमाणें स्थूलांत आहे. पाणी जसें ओलें आणि चंचळ त्याप्रमाणें प्राणाचा विहार समजावा. पाणी जसें झळकतें तसें मन विज्ञानांत, व त्यांत ज्ञानशक्ति कांहींसा झावळपणा, त्याप्रमाणें संशयरूपी मन केवळ झळझळ. त्याप्रमाणें निश्चयात्मकबुद्धि आहे. या मनबुद्धींत ज्यांची घोर, मूढ, शांत लक्षणें आहेत असे तीन गुण रहातात. स्थूल देहापासून गुणापर्यंत जसें सजल घट तसें स्वाभाविक परंतु ईशनिर्मितांत सूक्ष्म देह आहे. याप्रमाणें दोन देह लक्षणासह सांगितले.

आतां ईश जीवाचे उत्पत्तीपूर्वीं । जे स्फूर्तिरूप तत्वें स्वभावीं । तेही वृत्तीमाजीं पहावी । सूक्ष्मदृष्टी ॥ ४८ ॥
मुख्य अहंब्रह्मास्मि स्फुरण । जें कां मूळमायेचें लक्षण । तेंही सहजत्वें आठवण । होतसें पिंडीं ॥ ४९ ॥
तेचि आठवण निर्विकल्प । सर्वदां होतसे आपेआप । परी ते न कळे झडकरी संकल्प । होतां बाहिर्मुख होय ॥१५५०॥
इकडे आठवण तिकडे नेणीव । हे दोन्ही विद्या अविद्येचे स्वभाव । आवरण विक्षेप जयेतें नांव । ज्ञानाज्ञान हेंचि ५१
मुख्य संकल्पाविण वृत्ति । स्वाभाविक स्फुरे सहजगति । तयामाजीं ज्ञानाभास उमटती । जीवेश दोन्ही ॥ ५२ ॥
विद्याप्रतिबिंबित तो ईश । अस्पष्टपणें प्रेरी जीवास । अविद्या प्रतिबिंबित अनेश । तोही अस्पष्ट ॥ ५३ ॥
पुढें जेव्हां संकल्पासहित । मनबुद्धीचे विकार उमटत । ते समयीं जीव स्पष्ट दिसत । यापूर्वीं अस्पष्ट ॥ ५४ ॥
असो एक स्फुरणरूप मूळमाया । आणि विद्या अविद्या कन्या तिचिया । त्यांत प्रतिबिंबरूप जे नाम तया । जीवेश दोन ५५
जैसें पाणी झऱ्यांतून उसळे । तैशी मूळमायेची स्फूर्ति चंचळे । स्वतां पाणी श्वेत पाहतां कळे । तेवीं विद्या स्फूर्तीची ५६
श्वेतपणा असोनि आच्छादिला । नसोनि काळेपणा उमटला । तैसा अविद्या नेणिवेसी जाहला । ठाव विद्यारूप असोनी
मुख्य पाणियाचे पाझरीं । आकाश प्रतिभासेना झडकरी । अथवा श्वेन काळेपणाही माझारीं । जलाकाश स्पष्ट नव्हे ५८
तैसें मूळस्फुरणीं जीवेश असती । परी पाहणाराचे अनुभवा न येती । विद्या अविद्येंतही अनुमानिजेती । कीं जल तेथें प्रतिबिंब
स्पष्ट जेव्हां जल स्थिरावलें । तेव्हां आकाश स्पष्ट दिसे बिंबलें । तैसें संकल्प होतां दिसों लागलें । जीवाचें रूप ॥६०॥
मूळीं स्फुरणचि असतां चंचळ । परी तें कळेना निवळ । मा त्यांतील प्रतिबिंब सकळ । कोण पाहे ॥ ६१ ॥
तेचि प्रकृतिपुरुष दोन्ही । ओळखावीं चंचळ जाणीव निवडुनी । त्या दोहींचे परिणाम होउनी । जाहले विद्या ईशादि ६२
चंचळपणा जो स्फूर्तीचा । विद्या अविद्या हा परिणाम तिचा । तैसाचि परिणाम ज्ञानाभासाचा । जीवेश दोन्ही ॥६३॥
तोचि जडपणा अस्पष्ट होता । स्पष्ट जाला प्राणा आंतौता । इकडे जीवेशाची जे प्रकाशता । बुद्धींत स्पष्ट जाहली ६४
प्राण जड असून वावरती । त्यामुळें चंचळ ऐसे दिसती । परी ते जाणती ना कल्पांतीं । म्हणून ते जड ॥ ६५ ॥

---

जीवेश उत्पन्न होण्याच्या पूर्वी स्फूर्तिरूपतत्वें आहेत. तीं वृत्तींत सूक्ष्मदृष्टीनें पहावीं. मुख्य अहंब्रह्मस्फुरण ज्याला मूळ माया म्हणतात, त्याची सहजत्वें पिंडीं आठवण होते. तीच निर्विकल्प आठवण आपाप सदोदित होते. पण ती संकल्प होत असतां झडकर कळत नाहीं, कारण वृत्ती विषयाकडे येते. आठवणें व न जाणणें हे विद्याअविद्येचे स्वभाव आहेत. त्यांस आवरणविक्षेप म्हणतात. हेंच ज्ञानअज्ञान होय. मुख्य संकल्पावांचून वृत्ति स्वाभाविक सहजगति स्फुरते. तिच्यामध्यें जीवशीव असें दोन ज्ञानाभास उत्पन्न होतात. विद्याप्रतिबिंब ईश्वर हा अस्पष्ट आहे. तसेंच अविद्या प्रतिबिंबित जो जीव तोही अस्पष्ट आहे. जेव्हां संकल्पासह मनबुद्धि हे विकार उत्पन्न होतात तेव्हां जीव स्पष्ट दिसतो. एरव्ही तो अस्पष्ट आहे. स्फुरणरूप मूळ मायेच्या विद्या, अविद्या ह्याच कोणी एक कन्या, त्यांत जें प्रतिबिंबलेलें त्यास जीव आणि ईश्वर म्हणतात. पाणी जसें झऱ्यांतून उसळतें तशी मूळ मायेची स्फूर्ति चंचळ होते. पाणी पांढरें असतें तशी स्फूर्तीची ज्ञानात्मक विद्या आहे. पाण्याचा श्वेतपणा आच्छादून, नसता काळेपणा उमटतो, तशी विद्येस आच्छादून अविद्या नेणीव उत्पन्न झाली. मुख्य पाण्याचे पाझरांत जसें आकाश झटकर प्रतिभासत नाहीं, अथवा पाण्याचे पांढरे व काळेपणांत जलाकाश स्पष्ट उमटत नाहीं, तसें मूळ स्फुरणांत जीवेश आहेत. परंतु ते अस्पष्ट असल्यामुळें पहाणाराचें अनुभवास येत नाहींत. पण जेथें पाणी आहे तेथें प्रतिबिंब पडलेंच पाहिजे. तसें विद्याअविद्येंत जीवेश असले पाहिजेत. असें अनुमान कारितां येतें. पाणी जेव्हां स्थिर राहिलें तेव्हां आकाश निवडलेलें स्पष्ट दिसलें. तसें संकल्प स्थीर राहिल्याबराबर जीवाचें रूप दिसूं लागलें. मुळीं स्फुरण चंचळ असल्यामुळें तें निवळ कळत नाहीं मग त्यांतील सर्व प्रतिबिंब कोण पाहील? मूळ स्फूरण ती प्रकृति व त्यांतील जाणीव तोच पुरुष आहे, याप्रमाणें प्रकृतिपुरुष हा चंचळ, जाणीव निवडून ओळखावा. चंचळपणा ती विद्या व जाणीव तो ईश्वर असे विद्या आणि ईश्वर हे त्या दोहोंचे परिणाम आहेत. स्फूर्तीचा जो चंचलपणा तिचा विद्या अविद्या हा परिणाम आहे. तसेंच ज्ञानाभासाचा जीव आणि ईश्वर हा परिणाम आहे. मूळ स्फुरणांतील जडपणा अस्पष्ट होता तो प्राणांत स्पष्ट झाला. तशी जीवाची ईश्वराची प्रकाशता बुद्धींत स्पष्ट झाली. प्राण जड असून वावरतात. यामुळें तें चंचळ असे दिसतात. परंतु ते कल्पांतीही जाणत नाहींत, म्हणून ते जडच.

तैसेचि मनबुद्धि हे चंचळ खरे । त्यांत जाणीव दिसे साचोकारें । परी ते जीवाचे भासकत्वें सारे । विषय निवडिती ॥ ६६॥
जैसें पाणी दिसे झळझळित । परी आकाश बिंबतां दिसत । तैसें मनबुद्धि परप्रकाशित । स्वतां चंचळत्वें जड ६७ ॥
असो घटजळाचेनि पडिपाडें । देहीं सूक्ष्मदेह निवडे । जलाकाशापरी प्रतिबिंब पडे । जीवेशाचें सूक्ष्मीं ॥ ६८ ॥
भिंतीसहित ब्रह्मांडमठ । त्यांत उत्तमाधम पिंड घट । घटीं जळ जैसे तैसें स्पष्ट । सत्रा कळांचें सूक्ष्म ॥ ६९ ॥
जळ पातळ वोलें चंचळ । तैसा हा प्राणमयकोश सकळ । प्रतिबिंबासहित पाण्याची झळझळ । तैसे जीवासहित संकल्प ७०
श्वेतपणा तैशी विद्या । काळाभास तैशी अविद्या । पाझर तैशी मूळमाया । एवं दृष्टांतीं सर्व साम्य ॥ ७१ ॥
पाझरीं किंवा श्वेतकाळेपणीं । जलाकाश दिसेना नयनीं । तैशी माया कीं विद्या अविद्या दोन्ही । स्पष्ट नसती जीवेश त्यांत
बुद्धीमाजीं जीवत्व एकलें । चिदाभासरूपें स्पष्ट जाहलें । जैसें जलामाजीं प्रतिबिंबलें । सनक्षत्र आकाश ॥ ७३ ॥
तो चिदाभास वृत्तीसहित । इंद्रियद्वारा विषयाकार होत । जैशा घटछिद्रांतून झळझलित । मठाच्या भिंती ॥ ७४ ॥
ऐसें स्फुरणादि देहांत मिथ्याभूत । सांगितलें जड चंचळ समस्त । चिदाभास जो उमटला त्यांत । तोही सदृष्टांत सांगितला
मिथ्याभूत इतुकेंही जाहलें । तितुकें सदृष्टांत सांगितलें । आतां सत्य परब्रह्म जें संचलें । तें आत्मत्वही देहीं ॥ ७६ ॥
जैसें मुख्य गगन सर्व मठासीं । अंतर्बाह्य व्यापून अलिप्तत्वेंसी । घट जल आणि जलाकाशाशीं । व्यापकत्वें संचलें ७७
तैसें ब्रह्मात्मत्व सघन । मायेसी ईशादि अंततृण । इतुकेंही ब्रह्मांड संपूर्ण । व्यापून असे ॥ ७८ ॥
ब्रह्मांडीं जितुके देह सान थोर । आदिकरून हरिहर । या इतुक्या अंतर्बाह्य निर्विकार । व्यापून असे ॥ ७९ ॥
स्थूलदेहीं सूक्ष्मशरीरीं । जे पंचीकृत अपंचीकृताची परी । तिसरें कारण जे स्फूर्ति निर्धारी । विद्या अविद्यात्मक ॥ ८० ॥
त्यांत जीवेश जे प्रतिबिंबित । एवं सकळ धर्म धर्मीसहित । व्यापूनियां असे अनंत । गगन जेवीं सर्व घटीं ॥ ८१ ॥
ऐसिया अनंताची व्यापकता । जे सच्चिद्घन सर्वीं परिपूर्णता । ते पुढील पदीं विस्तारता । अन्वयें बोलिजे ॥ ८२ ॥
परी प्रस्तुत यया पदामाझारीं । जितुकीं मायादि तृणांत सारीं । रूप नाम जितुकें निर्धारी । स्थूल कीं सूक्ष्म ॥ ८३ ॥
इतुक्याही नामरूपांहून । भिन्न असे ब्रह्मात्मा पूर्ण । अंतर्बाह्य जेवीं गगन । परी विलक्षण घटादिकां ॥ ८४ ॥

---

तसें मन बुद्धि हीं चंचल दिसतात, त्यामुळें त्यांत जाणीव आहे असें वाटतें. पण तीं जीवाचे प्रकाशानें जाणतात. जीव नसला तर तीं स्वतंत्रतेनें जाणण्याविषयीं समर्थ नाहींत. जसें पाणी झळझळीत दिसतें; पण तें आकाश बिंबल्यामुळें दिसतें, तसें मन बुद्धि हीं परप्रकाशित आहेत, वास्तविक तींच तत्वें जडच समजावीं.

घटांत जल तसें स्थूलांत सूक्ष्म देह आहे. सूक्ष्म देहांत जलाकाशाप्रमाणें जीवेशाचें प्रतिबिंब पडतें. भिंतीसहवर्तमान मठ, तसें ब्रह्मांड आहे. मठांत जसें घट तसें ब्रह्मांडांत पिंड. घटांत जसें पाणी तसा स्थूल देहांत सत्रा कळांचा सूक्ष्म देह. पाणी चंचल, ओलें व पातळ तसा प्रतिबिंबासहित प्राणमयकोश. पाण्याची झळझळ तसा जीवासहवर्तमान संकल्प होय. पाण्याचा पांढरेपणा तशी विद्या आहे. पाण्याचा काळा भास तशी अविद्या होय. पाझर, तशी मूळ माया आहे. पाझरांत किंवा श्वेत व काळेपणांत जलाकाश दिसत नाहीं तसें मायेंत किंवा विद्याअविद्येंत जीवेश स्पष्ट दिसत नाहींत. बुद्धीमध्यें जीवत्व चिदाभासरूपानें स्पष्ट झालें. जसें पाण्यामध्यें नक्षत्रासह आकाश प्रतिबिंबलेलें स्पष्ट दिसलें, तद्वत् वृत्तीसहवर्तमान चिदाभास स्पष्ट भासतो, जशा घटछीद्रांतून मठाच्या भिंती झळझळतात तसा तो इंद्रियद्वारानें विषयाचा व्यापार भासतो.

देहामध्यें स्फुरणापासून सर्वही जड, चंचळ, मिथ्या आहेत; असें दृष्टांतासह सांगितलें. तसेंच त्यांत चिदाभास उमटला तोही दृष्टांतासह सांगितला. हे सर्वही मिथ्या, याहून जो सत्य आत्मा, तो देहांत कसा आहे तें सांगतों. जसें मुख्य आकाश मठास आंत बाहेर व्यापून अलिप्त आहे. तसेंच त्या मठांतील घट, घटांतील पाणी, पाण्यांतील जलाकाश, यांस व्यापून आहे. तसा आत्मा मायेपासून तृणापर्यंत सर्व ब्रह्मांड, ब्रह्मांडांतील उत्तम, अधम, मध्यम, पिंड यांस निर्विकारत्वानें अंतरबाह्य व्यापून आहे.

जसें आकाश सर्व घटांत व्यापून आहे. तसें आत्मा, स्थूल देह, सूक्ष्म देह, विद्याअविद्यात्मक स्फूर्ति, त्यांतील प्रतिबिंबित जीव आणि ईश्वर इत्यादि धर्मधर्मीसह सर्वांशीं व्यापून आहे. तें पुढें सांगूं. सध्यां स्थूलसूक्ष्म जीं नामरूपें त्यांत ब्रह्मात्मा व्याप्त असून तो जसें आकाश, घटादिकांत अंतरबाह्य व्यापून अलिप्त, तसा त्यांहून निराळा.

स्थूलदेह हा अन्नमय । ज्याची अन्नीं उत्पत्ति स्थिति लय । जेवीं घट सर्वही मृन्मय । तेवींच साकार जितुका ॥८५॥
त्यांत सूक्ष्म देह सत्रा कळांचा । जो त्रिकोशात्मक दृष्टांत जलाचा । प्राण मन विज्ञानमय साचा । जया प्रेरिता ईश ॥८६॥
आणि प्रतिबिंबरूप जीव । बुद्धीपासून प्रगट स्वभाव । या इतुकियामाजींही स्वयमेव । असून ब्रह्मात्मा वेगळा ॥ ८७ ॥
हें असो देहद्वयाचें कारण । जें सहजत्वें जाहलें निर्माण । त्यांतही परब्रह्म परिपूर्ण । व्यापून भिन्न सर्वां ॥ ८८ ॥
विद्याअविद्यामूळमायास्फूर्ति । त्यांतजीवेशहीअस्पष्टप्रतिबिंबती । तयाकारणाआनंदमयकोशम्हणती । जेथेंसुखैकगतजीवा
एवं अन्नमय स्थूल देहे । प्राणमय मनोमय विज्ञानमय कोशत्रय हे । आनंदमय कारण पाहे । जीवेशासह ॥ १५९० ॥
इतुकेही एकेक देहाआंत । असती स्थूल सूक्ष्म जीवासहित । तितुकेही व्यापून अनंत । सर्वां विलक्षण ॥ ९१ ॥
आकाश घटीं जळीं जलाकाशीं । व्यापून भिन्न जैसें सर्वांशीं । तेवीं स्थूल सूक्ष्म कारण जीवेशीं । व्यापून आत्मा विलक्षण
निर्माण तितुकें वेगळालें । धर्मही भिन्न भिन्न उमटले । तया धर्मधर्मीसहित व्यापिलें । परी नव्हे त्या त्या ऐसें ॥ ९३ ॥
मिथ्याचे धर्म जे जे अनेक । ते ते आधीं करूं रूपक । मग सर्वीं विलक्षण केवीं व्यापक । आपेआप कळे ॥ ९४ ॥
मुख्य परब्रह्म अनंत । केवढें किती नव्हे अंत । तयामाजीं एकदेशी होत । स्फूर्ति रज्जुसर्पापरी ॥ ९५ ॥
तयेचा स्वभावचि चंचळ । उमटे आटे जेवीं मृगजळ । परी उत्पत्तीसी हेतु सकळ । तेचि एक असे ॥ ९६ ॥
जल जैसें किंचितही असतां । गगन प्रतिभास दिसे आंतौता । तेवीं वृत्ति निर्विकारेंही स्फुरतां । सत्याचें प्रतिबिंब पडे ॥९७॥
असो स्फूर्तीचें जें चंचळपण । तेथें सहज विद्या अविद्या होती दोन । अविद्येनें करावें आवरण । हा धर्मचि तिचा ॥९८॥
पाणी काळेरणें जरी असे । परी प्रतिबिंब त्यामाजीं दिसे । अविद्येमाजीं प्रतिबिंब तैसें । नेणीव रूप स्फूर्ति ॥ ९९ ॥
कळणियासी विद्या म्हणावी । तेणें पहावें दिसेल जें स्वभावीं । मग यथार्थ कीं अन्यथा भावी । परी पाहणें धर्म तिचा ॥१६००॥
विद्यावृत्तींत जें बिंबलें । ईश हें नाम तया आलें । सर्वज्ञ सर्वशक्तिमान उमटले । धर्मही तेथें ॥ १ ॥
उगीच प्रेरणा करावी । कर्मसूत्रें स्फूर्ति द्यावी । हाचि धर्म असे स्वभावीं । नियंतृत्वें ईशाचा ॥ २ ॥
येथें कोणी आशंका करिती । कीं ईश प्रेरिता जीवाप्रति । तरी होणार तें न चुके कल्पांतीं । मग जीवाचा यत्न व्यर्थ
तरी अवधारा याचें उत्तर । होणार तें न चुके अनुमात्र । परी प्रयत्न करिती जे नर । हाही भोग सुखदुःखाचा ॥ ४ ॥
मग पुरुषप्रयत्न काय राहिला । म्हणसी तरी ऐके या बोला । प्रवृत्तिरूप भोग जीवाला । ये विषयीं प्रयत्न नको ॥५॥

---

ज्याचा अन्नापासून उत्पत्ति स्थितिलय होतो; अशा स्थूल देहाहून, सत्रा तत्वांच्या सूक्ष्म देहाहून, जीवेशासह कारण-देहाहून, आत्मा निराळा आहे. जसें आकाश घट, जल, जलाकाश यांस व्यापून त्यांहून विलक्षण, तसा आत्मा स्थूल, सूक्ष्म, कारण व जीवेश यांस व्यापून त्यांहून विलक्षण आहे. जें जें धर्मधर्मीसहवर्तमान निर्माण झालेलें आहे, त्यास आत्मा व्यापून; तो त्यांहून निराळा आहे. त्यांसारखा नाहीं.

### मिथ्या पदार्थांचे धर्म सांगतो.

मुख्य परब्रह्म हें केवढें व किती आहे याचा अंत लागत नाहीं, असें अनंत आहे. त्या अनंत परब्रह्मावर एकदेशीय रज्जुसर्पाप्रमाणें स्फूर्तीचा हेतु झाला. ती स्फूर्ति चंचळ स्वभावाची आहे. ती मृगजलाप्रमाणें उत्पन्न होते व नाहींशी होते. परंतु सर्वांचे उत्पत्तीचा हेतु तीच एक आहे. जसें पाणी थोडें जरी असलें तरी त्यांत आकाशाचा प्रतिभास दिसतो, त्याप्रमाणें वृत्ती निर्विकारत्वानेंही स्फुरली असतां तींत सत्याचें प्रतिबिंब पडतें. स्फूर्तीच्या चंचलपणांत विद्याअविद्या उत्पन्न होतात, त्यांत अविद्येचा आवरण करणें हा धर्म आहे.

पाणी काळे जरी असलें तरी त्यांत प्रतिबिंब पडतें व तें दिसतें, तसें अविद्येंत प्रतिबिंब पडतें. कळणें याला विद्या म्हणतात. या विद्येनें जें जें दिसेल तें तें पाहून खरें किंवा खोटें मानावें. पण तिचा पहाण्याचा धर्म आहे. त्या विद्यावृत्तीमध्यें प्रतिबिंबलेलें त्याला ईश्वर म्हणतात. त्याचा सर्वज्ञ सर्वशक्तिमान नियंतृत्व हा धर्म आहे.

**शंका**—जीवाचा प्रेरक ईश्वर आहे, तर जें होणार तें कल्पांतींही चुकावयाचें नाहीं, मग जीवाला कोणत्याही प्रकारचा प्रयत्न करण्याची गरज नाहीं; कारण तो जो प्रयत्न करील तो व्यर्थच होईल ?

**उत्तर**—जें होणार तें अणुमात्रही चुकावयाचें नाहीं. असे असतां मनुष्यें जो प्रयत्न करितात तो सुखदुःखाचाच भोग देणारा होतो. तूं म्हणशील कीं मग पुरुष प्रयत्न तो काय राहिला ? तरी पहा, प्रवृत्तीरूप जो जीवाला भोग होतो त्याविषयीं प्रयत्न करण्याची गरज नाहीं.

होणार तें अन्यथा न घडे । न होणार तें नव्हे कोडें । हा नेमाचि असे प्रवृत्तीकडे । तो न करो करो प्रयत्न ॥६॥
तस्मात् प्रयत्न प्रवृत्तीचा न करावा । घडणार तें घडेल स्वभावा । परंतु निवृत्तिरूप मोक्ष स्वभावा । प्रयत्नेंवीण नव्हे ७
प्रारब्धाधीन मोक्ष नाहीं । कारण कीं अभोक्ता आत्मा विदेही । तो कळावा विचारें निःसंदेहीं । तेथें सुखदुःखें आटती ८
सुखदुःख होणें तें प्रारब्धें घडे । कर्महानि प्रारब्धें केवीं जोडे । तस्मात् परमार्थप्राप्ति घडे । श्रवणादि प्रयत्नें ॥ ९ ॥
अमुक करीन जीवा उद्भवे । तेंचि ईश्वरें यया साह्य व्हावें । तरी मग अपौरुषत्व संभवे । जीवासी केंस ॥१६१०॥
असो धर्मधर्मी सांगत असतां । मध्यें आलें तें बोलिलें तत्वतां । जीवाचा धर्म ऐके आतां । ईश प्रेरिता सहज ११
आविद्येमाजीं बिंबला असे । तया नेणिवेसीही स्फुरवीतसे । पुढें बुद्धि प्रगटतां अपैसें । तेही भासवी विषयांत ॥ १२ ॥
हें पुढें बहुधा निरूपण। जीवाचें रूप स्पष्टतर होणें । परंतु जीवाचा धर्म स्फुरवणें । बुद्धींत बिंबून बुद्धीसी ॥ १३ ॥
एवं सहजत्वें वृत्ति जे निर्विकारी । उठली जळीं जेवीं लहरी। तयेचे प्रकार बोलिजे चारी । जीव ईश विद्या अविद्या १४
तया वृत्तीचा जो परिणाम । संकल्परूप मनोधर्म । होय नव्हे संशय परम । हेचि मनाचे स्वभाव ॥ १५ ॥
संशय न फिटतां ध्यास लागे । वारंवार स्मरतें वाउगें । तेंचि चित्त भिन्न दिसे प्रसंगें । परी तें मनचि ॥ १६ ॥
अमुक होय अथवा नव्हे अमुक । निश्चय करी धर्म हा एक । तोचि बुद्धि निश्चयात्मक । धर्मधर्मी भेद नाहीं ॥१७॥
दुसरा धर्म येक बुद्धीचा । करणें न करणें अभिमान साचा । तो अहंकार नामें वेगळा कैंचा । बुद्धीहूनी ॥ १८ ॥
एवं अंतःकरणचतुष्टय । नामें परी असती द्वय । मनोमय विज्ञानमय । कोश दोन्हीं ॥ १९ ॥
कोश म्हणजे आहे जें रूप । तें आच्छादून भावावें दुजें अल्प । तयाचि नांवें जाणिजे विक्षेप । जग उद्भवासी २०
तेचि अंतःकरणवृत्ति उद्भवे । इंद्रियद्वारा विषयीं धांवे । ते पांच प्रकार तया म्हणावें । ज्ञानेंद्रिय ऐसें ॥ २१ ॥
श्रोत्रें बरा अथवा वाईट । शब्द ऐकावा हा धर्म स्पष्ट । मृदु कठिण ओळखणें अविट । हा धर्म त्वचेचा ॥ २२ ॥
चांगलें ओंगळ रूप पहावें । हा चक्षूचा धर्म स्वभावें । तीक्ष्णादि सर्व रस घ्यावे । हा धर्म जिव्हेचा ॥ २३ ॥
सुगंध दुर्गंध घ्यावा निवडून । यया धर्मासीच नाम हें घ्राण । एवं ज्ञानेंद्रियपंचकें कडून । पंच विषय घ्यावे ॥२४॥

---

कारण प्रवृत्तीचा असा नियम आहे कीं, जें होणार तें तो करो अथवा न करो अन्यथा होत नाहीं व न होणार तें कधीं घडत नाहीं. म्हणून प्रवृत्तीविषयीं प्रयत्न करूं नये. तींत जें घडणारें तें सहजच घडेल. परंतु निवृत्तीरूप जो मोक्ष तो प्रयत्नावांचून होत नाहीं.

मोक्ष प्रारब्धाधीन नाहीं, कारण अभोक्ता आत्मा हा विचारानें कळला पाहिजे. मग सुखदुःखें नाहींशीं होतील. सुखदुःखें प्रारब्धानें घडतात. कर्महानि प्रारब्धानें होत नाहीं. ती होण्यास श्रवणादि प्रयत्न पाहिजे. जीवास अमुक करीन असें वाटतें तेव्हां ईश्वरानें त्याला तेंच करण्याविषयीं साह्य व्हावें. मग जीवाचें अपौरुषत्व कसें होईल.

जीव प्रथम नेणिवेस स्फुरवितो. पुढें बुद्धि उत्पन्न झाली म्हणजे मग तिला प्रकाशितो. तेणेंकरून ती विषय ग्रहण करिते. पाण्यावर जशी लाट तशी ब्रह्माचे ठायीं निर्विकारी वृत्ती सहज उत्पन्न होते. तिचे जीव, ईश, विद्या, अविद्या असे चार प्रकार झाले. त्या वृत्तीचा परिणाम मन, बुद्धि, चित्त, अहंकार हा आहे. संकल्पविकल्प करणारें तें मन. संशय न जातां वारंवार ध्यास लागून स्मरण होतें तेंच चित्त. हें प्रसंगीं मनाहून भिन्न आहे असें वाटतें, परंतु तें मनाचेंच अंग होय. नाहीं असा निश्चय करणारी ती बुद्धि. त्या बुद्धीचा करणें न करणें हा अभिमान आहे. त्यास अहंकार म्हणतात. हा बुद्धीचाच भेद आहे, करितां तो बुद्धीहून निराळा नाहीं. अंतःकरणचतुष्टय म्हणतात, परंतु हीं मन आणि बुद्धि अशीं दोनच तत्वें आहेत.

कोश—पूर्वी जें रूप असेल तें आच्छादून दुसरें त्याचे ठायीं अल्प कल्पावें त्याला कोश म्हणतात. व त्यालाच जग उद्भवण्यास जें कारण त्यास विक्षेप म्हणतात.

अंतःकरणवृत्ति इंद्रियद्वारानें विषय घेण्याकरितां जाते त्या पांच द्वारांस ज्ञानेंद्रियें म्हणतात.

**लिंगदेहांतील धर्मी धर्म कोणते ते सांगतों.**

| (धर्मी) | (धर्म.) |
|---|---|
| श्रोत्र | बरावाईट शब्द ऐकणें. |
| त्वाचा | मृदु कठीण ओळखणें. |
| चक्षु | चांगलें वाईट रूप पहाणें. |
| जिव्हा | तीक्ष्णादि सर्व रस घेणें. |
| घ्राण | सुगंध दुर्गंध घेणें. |

उगोचि कांहीं कळणें नसतां । जडत्वें वावरती देहा आंतौता । अन्नरसा पचवून समस्तां । देहा पुष्टी द्यावी ॥२५॥
क्षुधा तृषा जयाच्या विहरणें । मना इंद्रियां जयांत राहणें । देहालागींही होय जिणें । हे धर्म प्राणाचे ॥ २६ ॥
या प्राणयोगें कर्मेंद्रियासी । वर्तणें असे स्वस्वक्रियांसी । प्राण कर्मेंद्रिय प्राणमय कोशीं । असती दहा ॥ २७ ॥
वाचेनें वर्णोच्चार करावा । शब्द तितुका मुखीं बोलावा । हा धर्मचि वाणीचा जाणावा । जेणें प्रवृत्ति निवृत्ति चाले
घ्यावें द्यावें पदार्थांसी । हा धर्म असे पाणींद्रियांसी । गमन करवावें स्थूलदेहासी । हा धर्म पादांचा ॥ २९ ॥
मैथुनानंद प्रजोत्पादन । हा उपस्थेंद्रियाचा धर्म होणें । मलोत्सर्ग.सर्वही करणें । गुदाचा धर्म हा ॥ १६३० ॥
एवं स्फुरणादि कर्मेंद्रियांत । जितुकीं चंचल तत्त्वें समस्त । तितुकींही धर्मधर्मीसहित । जळापरी सांगितलीं ॥ ३१ ॥
उगेंचि जडपणें असावें । दृश्यत्वें वाईट बरें दिसावें । विकारें वाढावें मरावें । हा धर्म देहाचा ॥ ३२ ॥
घटापरी उत्पत्ति नाश । जड पराधीन दृश्य । हा स्वभावाचि विशेष । साकारमात्राचा ॥ ३३ ॥
असो स्थूळ घट सूक्ष्म जल । त्यांत प्रतिबिंब तो जीव केवळ । ऐसोचि जाणावे पिंड सकळ । ब्रह्मादि कीटकांत ३४
सर्वांमाजीं तत्त्वें इतुकीं । धर्मधर्मीसहित निकीं । असतां न होतीं न्यूनाधिकीं । स्थूल सान थोर जरी ॥ ३५ ॥
जैसे धातु खापरें शेणाचे घट । सान किंवा असोत मोठे । परी जल आणि प्रतिबिंब गोमटें । सर्वांमाजीं सारिखें ३६
तैसे देव मानव कीटकांचे । साकार सान थोर सर्वांचे । परी सूक्ष्म तत्त्वेंसहित जीवाचें । एकरूप सर्वीं ॥ ३७ ॥
ऐशीं नाना पिंडें जंगमाचीं । आणि साकारता सर्व स्थावराची । जया ब्रह्मांडीं वस्ती इतुक्यांची । तीं पंचमहाभूतें जड
सर्व घटासहित सप्राकार मठ । इतुकियांतही एक आकाश दाट । घट पातळ व्यापलें अविट । एक रेणु रितां नाहीं ३९
घट जल प्रतिबिंबासहित । सर्वही मुख्य आकाशें व्याप्त । परंतु सर्वही विकारासहित । संचलेपणें असे ॥ १६४० ॥
तैसें ब्रह्मात्मत्व सघन । सच्चिदानंद परिपूर्ण । मायादि तृणांत जें निर्माण । व्यापून असे ॥ ४१ ॥
पंचमहाभूतें व्यापिलें । सर्व ब्रह्मांड जें दृश्यत्वें रचिलें । त्यांतील सान थोर देह दाटले । ब्रह्मात्मयानें ॥ ४२ ॥
सूक्ष्म तत्त्व तें जितुकें सांगितलें । त्यांत जीवेशाही प्रतिबिंबले । हें इतुकेंही व्यापून ठेलें । निश्चल पूर्ण ॥ ४३ ॥

---

| | |
|---|---|
| पंचप्राण | कांहीं न कळतां उगाच देहांत वावरणें अन्नरस पचवून देहास पुष्टी देणें, ज्याच्या विस्मरणानें क्षुधा तृषा होणें, ज्यांत मन इंद्रियें रहातात, ज्यांचेयोगानें देह जगतो व ज्यांचे योगानें इंद्रियें आपापली क्रिया करितात. |
| वाचा (वैखरी) | मुखानें वर्णोच्चार करणें, ज्याचे योगानें प्रवृत्तिनिवृत्ति चालते असे शब्द बोलणें. |
| हात | घेणें देणें ही क्रिया करणारे. |
| पाद | स्थूल देहास घेऊन गमन करणें. |
| उपस्थेंद्रिय | प्रजोत्पादन व मैथुनानंद होणें. |
| गुद | मलोत्सर्ग करणें. |
| देह | उगीच जड पणानें असावें, दृश्यत्वानें वाईट बरें दिसावें, विकार वाढावे, किंवा मरावें, उत्पत्ति व्हावी, जड, पराधीनपणा, दृश्य. |
| स्फूर्ति | चंचळपणा उत्पन्न होणें, नाश होणें, नाश पावणें व उत्पत्तीस हेतु. |
| विद्या | विक्षेप. |
| अविद्या | आवरण करणें. |
| ईश्वर | सर्वज्ञ सर्वशक्तिमान नियंतृत्व. |
| जीव | नेणिवेस स्फुरविणें, बुद्धीस प्रकाशणें, किंचिज्ज्ञ. |
| मन | संकल्पविकल्प करणें ध्यास धरणें. |
| बुद्धि | निश्चय करणें अभिमान धरणें. |

स्फुरणापासून कर्मेंद्रियांपर्यंत जितकीं चंचल तत्वें आहेत तितकीं जलाप्रमाणें चंचल आहेत असें सांगितलें. आतां घटाप्रमाणें साकाराचा उत्पत्तिनाश, जडपणा, पराधीनत्व, दृश्यत्वपणा आहे. घटांत पाणी, पाण्यांत प्रतिबिंब, तसें स्थूल देहांत जीव. एका पिंडांत जितकीं तत्वें आहेत तितकींच ब्रह्मदेवापासून किड्यापर्यंत सर्व पिंडांत सारखींच आहेत, कमीजास्त नाहींत. मग ते पिंड लहानमोठे कसे कां असेनात. जसें धातु, खापरें, शेण, यांचे लहानमोठे घट जरी असले, तरी त्यांत जल आणि प्रतिबिंब सारखेंच पडतें. तसें देव, मनुष्य, किडे यांचे लहानमोठे साकारांत सर्व तत्त्वें सारखींच आहेत. याप्रमाणें सर्व जंगमाचे आकार व सर्व स्थावरांचे आकार ज्या ब्रह्मांडांत आहेत, तीं पंचमहाभूतें जड आहेत. सर्व घटासहवर्तमान मठास जसें आकाश व्यापून आहे. तसें ब्रह्मांडासह सर्व पिंड व त्या पिंडांतील सर्व तत्त्वें यांस व्यापून आत्मा आहे.

ऐसें सच्चिदानंद व्यापक । अन्वयें अनुस्यूत एक । हें निरूपण निश्चयात्मक । पुढील पदीं असें ॥ ४४ ॥
येथें रूप नाम जें जें उद्भवलें । अथवा रूपरसादि दृश्य जेतुलें । इतुक्यांचे धर्माहून भिन्न संचलें । हें निरूपण या पदीं
सर्व धर्मधर्मी कळल्याविण । स्वस्वरूप केवीं कळे विलक्षण । यास्तव सदृष्टांत केलें निरूपण । जें जें रूप जयाचें ४६
आतां रविदत्ता जें स्वस्वरूप । कवणाऐसें असे पाहे साक्षेप । तोही संवाद कीजेल अल्प । सावधान असावें ॥ ४७ ॥
जैसें आकाश काय मठासम । कीं घट जळा ऐसा नेम । किंवा प्रतिभास गगनाचा भ्रम । तयासारखें तरी असे ॥४८॥
तैसें परब्रह्म सच्चिद्घन । जें व्यापक रितें नव्हे तृण । तें कवणाऐसें पाहे विचारून । पिंडब्रह्मांडीं ॥ ४९ ॥
आधीं पिंडींचा शोध घ्यावा । मग ब्रह्मगोळ त्या रीतीं जाणावा । ब्रह्मसाम्यता यया सर्वां । कवणिया असे ॥१६५०॥
स्थूलसूक्ष्मकारण । जें जड चंचळ अज्ञान । त्यांत प्रतिबिंबित जीव ईशान । स्वरूपसाम्य या कवणा ॥ ५१ ॥
मुख्य मायास्फूर्ति जळीं लहरी । ते विलक्षण सर्प आणि दोरी । मा तिजपासाव हे तत्वें सारीं । तरी त्यां साम्यता कैंची५२
अस्ति भाति प्रिय ब्रह्मात्मा । असज्जड दुःख सर्व अनात्मा । हे दोन्ही एकत्र संगमा । कदापि न मिळती ॥ ५३ ॥
या सर्वांहून चिती वेगळी । बोलिली श्लोकपदीं मुळीं । परी सदानंदता ही निराळी । चिति एक उपलक्षण ॥५४॥
स्वरूपलक्षणांतील एक । ग्रहण करितां निश्चयात्मक । उरलें लक्षण जें सकळिक । न बोलतां ग्राह्य ॥ ५५ ॥
असो चित्प्रभा ते बिलक्षण । सर्व हें नामरूप मिथ्या संपूर्ण । तेंचि ऐकावें विवेचन । घटादिकां गगन जेवीं ॥ ५६ ॥
जड षड्विकारीं दृश्यपणीं । सर्व सुखदुःखाचे आयतनीं । ऐसिया देहाचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ ५७ ॥
विसर्ग होय जयाचेनी । स्थूलाचे मळाची सारणी । ऐसिया गुदेंद्रियाचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ ५८ ॥
स्त्रीपुरुषाचिये मैथुनीं । क्रिया भोग जयालागुनी । तया उपस्थेंद्रियाचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ ५९ ॥
जाणें येणें क्रिया गमनीं । स्थूलासी घडे जयाचेनी । तया पादाचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ १६६० ॥
ग्रहण दानाची जयालागुनी । क्रिया होतसे अनुदिनीं । तया पाणींद्रियाचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ ६१ ॥
नानावर्णोच्चारांच्या श्रेणी । उमटती सर्वदां जयेचेनी । तया वागिंद्रियाचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ ६२ ॥
देहामाजीं अधोगमनीं । वाहत असे जडपणीं । तया अपानाचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ ६३ ॥
ऊर्ध्व वाहे हृदयभुवनीं । श्वासोच्छ्वास जयाचेनी । तया प्राणाचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ ६४ ॥

---

तसेंच ब्रह्म मायेपासून तृणापर्यंत सर्वांस व्यापून आहे. व तें नामरूप हून निराळें आहे. तें स्वस्वरूप कोणासारखें आहे असें म्हणावें ? जसें आकाश मठासारखें आहे असें म्हणावें, किंवा घटासारिखें, किंवा घटातील पाण्यासारिखें, किंवा पाण्यांतील प्रतिबिंबासारिखें आहे असें म्हणावें? हें जसें म्हणतां येत नाहीं, तसें व्यापक ब्रह्म ब्रह्मांडासारखें किंवा स्थावरासारखें किंवा जंगमासारखें किंवा पिंडासारिखें किंवा पिंडांतील सूक्ष्म देहासारिखें किंवा जीव ईश्वरासारिखें यांपैकीं कोणासारिखें आहे असें म्हणावें ? मूळ माया ही पाण्यावरील लाटेसारखी मिथ्याभूत आहे. मग तिच्यापासून झालेलीं सारीं तत्त्वें ब्रह्माची बरोबरी कशी करूं शकतील ? ब्रह्म सच्चिदानंदरूप आहे. आणि त्याखेरीज जो अनात्मा तो असज्जड दुःखरूप आहे. तेव्हां हे दोन्ही एके ठिकाणीं कसे रहातील ? अनात्म्याहून चिती निराळी आहे असें वर्णन केलें आहे. याचें तात्पर्य हें कीं, स्वरूपाचें एक लक्षण जर अनात्म्यांत मिळत नाहीं; तर अर्थातच त्याचीं सर्व लक्षणें अनात्म्यांत मिळावयाचीं नाहींत असें समजावें. जसें घटाहून आकाश निराळें तसें मिथ्या नामरूपाहून चित्प्रभा वेगळी आहे हेंच विवेचन आतां करितों. चित्प्रभा हें ब्रह्माचें एक लक्षण आहे, त्याहून नामरूप मिथ्या ठरल्यावर तें नामरूप आत्म्याहून ( ब्रह्म ) हून मिथ्या आहे असें सहज ठरेल.

१ जड षड्विकारी दृश्य सर्व दुःखांचें घर अशा देहाच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

२ ज्याचेयोगानें विसर्ग होतो त्या गुदेंद्रियाहून चित्प्रभा वेगळी.

३ स्त्रीपुरुषांचे मैथुनांत ज्याला क्रियाभोग होतो त्या उपस्थेंद्रियाहून चित्प्रभा वेगळी.

४ ज्याच्या योगानें स्थूलाचें जाणें येणें होतें त्या पादाच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

५ ज्याच्या योगानें घेण्यादेण्याची क्रिया होते त्या हाताच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

६ ज्याच्यायोगानें अनेक वर्णांच्या माला उत्पन्न होतात त्या वाणीच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

७ देहांत जडपणानें खालीं वहाणारे अपानाहून चित्प्रभा वेगळी.

८ जो हृदयांत वर वहाणारा ज्याच्यायोगानें श्वासोच्छ्वास होतात त्या प्राणाच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

स्थूलीं कंठस्थानीं राहुनी । प्रवर्तत असे क्षुत्पानीं । तया उदानाचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ ६५ ॥
उभय संधींत नाभिस्थानीं । राहून हालवी संधीलागुनी । तया समानाचे रूपाहुनी । चित्प्रभा वेगळी ॥ ६६ ॥
सर्व नाडी अन्नरसें कडोनी । पाववून होतसे पुष्टिदानी । तया व्यानाचे रूपाहुनि । चित्प्रभा वेगळी ॥ ६७ ॥
सुगंध दुर्गंध सन्निधानीं । घेत असे दोन्ही निवडोनी । तया घ्राणाचे रूपाहूनि । चित्प्रभा वेगळी ॥ ६८ ॥
कटु तीक्ष्णादि रसश्रेणी । चाखितां कळे जयेचेनी । तये जिव्हेचे रूपाहुनी । चित्प्रभा वेगळी ॥ ६९ ॥
दृश्य जितुकें साकारपणीं । तितुकियांची दशा देखणी । तया चक्षूचे रूपाहुनी । चित्प्रभा वेगळी ॥ १६७० ॥
सर्व देहाकारें राहूनी । घेत असे स्पर्शालागुनी । तया त्वगिंद्रियाचे रूपाहुनी । चित्प्रभा वेगळी ॥ ७१ ॥
वेदादिकांच्या शब्दश्रेणी । कळूं लागती उठतां ध्वनी । तया श्रोत्रेंद्रियाचे रूपाहूनि । चित्प्रभा वेगळी ॥ ७२ ॥
संकल्प करी संशयेंकडुनी । सदां होय नव्हे चंचलपणीं । तया मनाचे रूपाहूनि । चित्प्रभा वेगळी ॥ ७३ ॥
ध्यासें आठवी अनुदिनीं । सदां प्रवर्ततसे चिंतनीं । तया चित्ताचे रूपाहूनि । चित्प्रभा वेगळी ॥ ७४ ॥
निश्चयचि जयेची करणी । हें खरेंचि स्थापी अमुक म्हणोनी । तया बुद्धीचेही रूपाहूनि । चित्प्रभा वेगळी ॥ ७५ ॥
मी मी सर्वदां वाउगा मानी । जो बंधचि बैसला घेऊनी । तया अहंकाराचे रूपाहूनि । चित्प्रभा वेगळी ॥ ७६ ॥
जो स्फुरवी वृत्तीलागोनी । एकलाचि तिहीं स्थानीं । तया जीवाचिये रूपाहूनि । चित्प्रभा वेगळी ॥ ७७ ॥
जे जीवासी घाली आवरणीं । प्रतिबिंबरूप जीवाची जननी । तये अविद्येचिये रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ ७८ ॥
जे विक्षेपें दुजे दावी नयनीं । जयेची येवढी उद्भवली करणी । तये विद्येचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ ७९ ॥
जो विद्येमाजीं प्रतिबिंबोनी । जीवातें प्रेरी अलिप्तपणीं । तया ईश्वराचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ १५८० ॥
मृगजलवत जयेची उभवणी । जे प्रकृतिपुरुषात्मक निस्तत्त्वपणीं । तये मूळमायेचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ ८१ ॥
असो कारणरूप जी मूळ माया । विद्या अविद्या शक्ति जिचिया । तेचि जाहली नाहीं जया ठायां । तरी कार्य उभवे केवीं
न कळण्यासीच नव्हे रूप । तरी कासया ऐसा असे सर्प । तरी भिन्न दोरी हे वाउगे जल्प । व्यर्थ कां न म्हणावें ८३

९ स्थूल देहामध्यें कंठीं राहून क्षुधा तृषा उत्पन्न करणाऱ्या उदानाच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

१० नाभीजवळ अपान आणि प्राण यांचे संधीस राहून संधीस हालविणाऱ्या समानाच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

११ नाडीद्वारानें अन्नरस सर्व शरीरास पोंहोंचवून पुष्टी देणाऱ्या व्यानाच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

१२ सुगंध दुर्गंध घेणाऱ्या घ्राणाच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

१३ कडू तिखट इत्यादि रसांची रुचि जाणणाऱ्या जिव्हेच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

१४ सर्व साकार दृश्य पहाणाऱ्या चक्षूचे रूपाहून चित्प्रभा वेगळी.

१५ देहाकार राहून स्पर्शास घेणारे त्वगिंद्रियाच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

१६ वेदादिकांच्या पंक्तीची ध्वनि उठल्यावर ज्यास कळतात त्या श्रोत्रेंद्रियाच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

१७ जें संकल्पविकल्प करणारें ज्याचा होय नाहीं अशाविषयीं चंचलपणा त्या मनाच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

१८ ध्यासानें रात्रंदिवस आठविणारें जें व जें सदा चिंतन करण्यास प्रवृत्त होतें, त्या चित्ताच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

१९ निश्चय करून हें अमुक असें खरे स्थापणाऱ्या बुद्धीच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

२० जो मीमीपणाचा अभिमान घेऊन बसला त्या अहंकाराच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

२१ जो तिन्ही अवस्थेंत एकटा वृत्तीला स्फुरविणारा त्या जीवाच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

२२ जीवाला आवरण घालणारी अशी जी जीवाची आई अविद्या त्या अविद्येच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

२३ जी विक्षेपानें नेत्रांस दुसरें रूप दाखविते व जिची सर्व करणी आहे त्या विद्येच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

२४ जो विद्येंत प्रतिबिंबून अलिप्तपणानें जीवास प्रेरणा करितो त्या ईश्वराचे रूपाहून चित्प्रभा वेगळी.

२५ जिचें कार्य मृगजलवत् व जी प्रकृतिपुरुषात्मक-निस्सत्वानें असणारी त्या मूळ मायेच्या रूपाहून चित्प्रभा वेगळी.

कारणरूप जी मूळमाया जिच्या विद्या अविद्या शक्ति आहेत, तीच जेथें झाली नाहीं तेथें तिचें कार्य उत्पन्न कसें होईल ? कळण्यास जर रूप नाहीं तर दोरावर भासलेला सर्प कशासारखा असेल ? सर्पास रूप नाहीं म्हणून दोरी आणि भासलेला सर्प निराळे नाहींत.

तैशी मूळमाया वंध्यासुताची आई । वियादि कन्या इशादि जांवई । हा आनंदकोश निजरूपाचे ठायीं । तें चिद्रूप याहून भिन्न
तया आनंदासीही आच्छादन । करितो कोश नाम विज्ञान । वृत्तीचा परिणाम जे बुद्धि अनान । भाऊन बैसली ८५
ते पंचज्ञानेंद्रियद्वारा । होतसे विषयाकारा । एवं विज्ञानमयता या सहा प्रकारां । त्याहून भिन्न चित्प्रभा ॥ ८६ ॥
त्या निश्चयासीही आच्छादिलें । संशयात्मक वरती दिसलें । यासीही ज्ञानेंद्रिय साह्य झालें । इतुका मनोमय कोश ८७
त्या मनामाजीं व्याप्ति स्वरूपाची । परी ते विकारी चित्प्रभा कैंची । जेवीं पाणी आणि तरंगाची । येकरूपता नव्हे ।
ऐसा मनोमयही आच्छादिला । प्राणमयचि जड दिसूं लागला । तो अंतर्बाह्य दशधा जाहला । प्राण कर्मेंद्रिय ॥८९॥
जो विकाराचा विकारी । तो कैसा होय निर्विकारी । आकाश असून जलामाझारी । येकत्र कालवती ना ॥१६९०॥
या प्राणमयावरती दिसला । स्पष्टत्वें स्थूल साकारला । तो अन्नमयकोश बोलिला । घट जैसा गगनीं ॥ ९१ ॥
मूळीं मूळमाया नव्हे स्वरूपाऐशी । विद्या अविद्यासह जीवेशासीं । तेथें विज्ञानमय प्राण भिन्न वेंसी । तेथें साकारा साम्यता
हें बोलणोंचि व्यर्थ कुडें । तैसेंचि भिन्न म्हणणेंही बापुडें । जैसें जला आणि जलाकाशां न जोडे । तरी गगनासम घट केवीं
ऐसेंचि साकार ब्रह्मयापासूनी । कीटकांत सर्वही दृश्यपणीं । स्वस्वरूप भिन्न सर्वांहूनी । नाना घटांहून गगन ॥ ९४ ॥
हे असो भौतिकाची कथा । परी महाभूतें साम्य न होती सर्वथा । जेथें रूपादिकांची व्यवस्था । असे पंचविध ९५
पृथ्वी आणि भौतिक सारीं । हीं सर्व असतां पंच प्रकारीं । शब्द स्पर्श रूप रस गंधानुकारी । असती पदार्थ ॥९६॥
स्वरूप तरी अशब्द अस्पर्श । अरूप अगंध अरस । तस्मात भिन्न घटाहून आकाश । कां न म्हणावें ॥ ९७ ॥
आपीं जरी गंध नाहीं । तरी चारी असती सर्वदांही । स्वरूपीं रसादि नसती कांहीं । यास्तव भिन्न आपाहुनी ॥९८॥
तो रसही तेजांत नसतां । शब्द स्पर्श रूप असतां आंतौता । म्हणून अग्नीसी स्वरूपसाम्यता । न ये कल्पांतीं ९९
वायूमाजीं रूपही असेना । परी शब्द स्पर्श असतां भिन्नपणा । तरी साम्यता अस्पर्शी होईना । कवणेही काळीं १७००
गगनीं स्पर्शही नसे किमपि । परी शब्द असे ध्वनिरूपी । म्हणूनियां अशब्द चिद्रूपीं । तया असाम्यता गगना ॥१॥
एवं भूतें भौतिकें हीं साकार । आकाशादि तृणांत समग्र । हा एक जिन्नस जड प्रकार । याहून भिन्न चिद्रूप ॥ २ ॥

---

तशी मूळमाया वंध्या सुताची आई आहे. तिच्या विद्या आदिकरून कन्या व ईशादिक जांवई आहेत. हा निजरूपाचे ठायीं आनंदमय कोश आहे. या कोशाहून चित्प्रभा वेगळी आहे. आनंदमय कोशास आच्छादन करणारा विज्ञानमय कोश हा वृत्तीचा परिणाम आहे. यांत बुद्धि आपण निराळी होऊन बसली. ही बुद्धि पंचज्ञानेंद्रियद्वारानें विषयाकार होते, म्हणून त्या सहा प्रकारांस विज्ञानमय कोश म्हणतात, त्याहून चित्प्रभा वेगळी.

विज्ञानमय कोशास आच्छादून पंचज्ञानेंद्रियद्वारानें संशय करणारें मन, अशा सहा प्रकारचे मनोमय कोशाहून चित्प्रभा वेगळी.

मनोमय कोशास ज्यानें आच्छादिलें, ज्यामध्यें आंत पांच प्रकारचे प्राण व बाहेर पांच प्रकारचीं कर्मेंद्रियें मिळून दहा प्रकारचे प्राणमय कोशाहून चित्प्रभा वेगळी.

जो निर्विकारी तो विकाराचा विकारी कसा होईल ? जसें पाण्यांत आकाश आहे तें पाण्यासारखें विकारी कसें होईल ? व तें पाण्यांत कसें कालवेल ? तसा अन्नमय कोश स्वरूपासारखा कसा होईल ? प्राणमय कोशावर जो दिसणारा असा स्पष्टपणें साकारलेला स्थूलदेह त्यास अन्नमय कोश म्हणतात. हा गगनांत घट त्याप्रमाणें स्वरूपीं आहे.

^ वास्तविक मूळमायाच स्वरूपासारखी नाहीं, मग पंचकोश स्वरुपासारखे नाहींत हें सांगावयासच नको. आकाश जसें अनेक घटांहून निराळें आहे तसा ब्रह्मदेवापासून किड्यापर्यंत दिसणारा जेवढा साकार त्याहून स्वस्वरूप भिन्न आहे. भौतिकांहून स्वस्वरूप निराळें आहे असेंच नव्हे, तर पंचमहाभूतांहूनही स्वस्वरूप निराळें आहे. पृथ्वी आणि सर्व भौतिकें हीं पांच प्रकारचीं आहेत. तेच शब्द, स्पर्श, रूप, रस, गंधानुकारी पदार्थ आहेत, आणि स्वरूप अशब्द, अस्पर्श, अगंध, अरूप, अरस आहे. म्हणून तें सर्व पदार्थांहून निराळें आहे. स्वरूप पंचविषयांहून निराळें आहे असें वर वर्णिलें आहे, व ते पंचविषय पृथ्वीचे गुण आहेत, म्हणून पृथ्वीहून स्वस्वरूप निराळें आहे. जसें पृथ्वीचे गुण असल्यामुळें ती स्वस्वरूपासारखी नाहीं, तसेंच आप, तेज, वायु, आकाश यांचेही गुण आहेत, म्हणून आप, तेज, वायु, आकाश यांहून स्वस्वरूप निराळें आहे.

१ पहिला जिन्नस (ज्यास द्रव्यशक्ति म्हणतात) पंचमहाभूतें व आकाशापासून तृणापर्यंत ज्या साकार अंडजजारजादि चार योनी व पांचवी मानसिक योनी यांस भौतिकें म्हणतात. भूतें व भौतिकें मिळून दहा प्रकारचा हा पहिला जड जिन्नस याहून स्वस्वरूप निराळें आहे.

दुसरा जिन्नस जडाचि असोनी । वाहणें असे चंचळपणीं । ऐसिये प्राणाचिये रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी ॥ ३ ॥
परप्रकाशें जाणों लागती । हा तिसरा जिन्नस विशेष विरूाति । ययाहूनीही आत्मा चिन्मूर्ति । भिन्न असे सहज ४
मूळ स्फूर्ति चौथा जिन्नस । जो कां हेतु सर्व विकारांस । तयाच्याही रूपाहून निराभास । चित्प्रभा वेगळी ॥ ५ ॥
प्रतिबिंबाचा प्रकार असे पांचवा । चितासारिखा अभास जाणावा । परी मुख्य चिद्रूपता स्वयमेवा । भिन्न ययाहुनी ६
एवं मिथ्याभूत जिन्नस पांचही । उद्भवले परी जाहलेचि नाहीं । इतुकेही विकारजात सर्वही । या विलक्षण चिद्रूप ॥७॥
पंचभूतें चारी खाणी । पांचवी ते मानसिक योनि । एवं हे दहा प्रकार मिळोनी । जिन्नस पहिला जडरूप ॥ ८ ॥
पंचप्राण कर्मेंद्रिय । हा दुसरा जिन्नस समुदाय । हा चंचल असोनी जडमय । प्रकारें दाही ॥ ९ ॥
मन बुद्धि ज्ञानेंद्रियपंचक । परप्रकाशें जाणती सकळीक । हा तिसरा जिन्नस असे एक । सप्त प्रकारें ॥१७१०॥
चौथा जिन्नस मूळस्फूर्ति । माया अविद्या विद्या म्हणती । तयांसीच नाम अवरणादि शक्ति । परी प्रकार तीन ११
एवं चार जिन्नस वेगळाले । पांचवें चित्प्रतिबिंब पडिलें । तयाचे दोनचि रूपें उमटले । जीव आणि ईश ॥ १२ ॥
एवं पांच जिन्नस सर्वे । पांचांचे बत्तीस होती आघवे । वेगळालीं रूपें आणि नांवें । ईशादि तृणांत ॥ १३ ॥
जडरूप जो पहिला जिन्नस । द्रव्यशक्ति नाम तयास । दुसरिया जिन्नसातीयास । क्रियाशक्ति बोलिजे ॥ १४ ॥
तिसरा जिन्नस ज्ञानशक्ति । चौथी स्फूर्ति आदिशक्ति । तयेशीच ह्मणावी इच्छाशक्ति । बीजरूप सर्वां ॥ १५ ॥
पांचवा जिन्नस चिदाभास । शक्ति जयाच्या तो शक्त जीवेश । असो ऐसे हे पांच जिन्नस । बत्तीस नामरूपें ॥१६॥
पूर्व दृष्टांतीं स्मरावें । सजल घट सान थोर सर्वे । तैसेचि ब्रह्मादि कीटकांत आघवे । आणि महा भूतें जेवीं ॥१७॥
जल तैसें देह सूक्ष्म । ब्रह्मादि कीटकांत सम । या सर्व समष्टीसी असे नाम । वाउगें हिरण्यगर्भ ॥ १८ ॥
या सूक्ष्माचे प्रकार तीन । प्राण आणि मन विज्ञान । चंचळ द्रव झळझळपण । जेवीं पाणी ॥ १९ ॥
तीन कोश परी दोन शक्ति । ज्ञानक्रिया सूक्ष्मीं असती । घटीं जलें जैशीं सांठवती । तेवीं सान थोर देहीं ॥१७२०॥
पाझर तैसें मूळ स्फुरण । जें चौथे जिनसाचें लक्षण । पांचवे ते जीवेशान । जलाकाशापरी ॥ २१ ॥
एवं घट मठ पिंड ब्रह्मांड । हे स्थावरजंगमादि जड । या विलक्षण कीं आत्मा गगनवाड । प्रत्ययें पहावें ॥ २२ ॥
सूक्ष्म देह वेगळाले । सान थोर पिंडीं सांठवले । त्यांहून चिद्रूप प्रत्यया आलें । जलाहून जेवीं गगन ॥ २३ ॥

---

२ दुसरा जिन्नस चंचळ हा जडच. यास ( क्रियाशक्ति म्हणतात ) चंचळपणानें वहाणारे पांच प्राण व पांच कर्मेंद्रियें मिळून होणारा दहा प्रकारचा दुसरा चंचळ पदार्थ याहून चित्प्रभा वेगळी आहे.

३ तिसरा जिन्नस परप्रकाशानें जाणणारा. ज्यास (ज्ञानशक्ति म्हणतात) मन बुद्धि पांच ज्ञानेंद्रियें मिळून होणारा सात प्रकारचा जाणणारा तिसरा जिन्नस याहून चित्प्रभा वेगळी.

४ चवथा जिन्नस मूळस्फूर्ति. ज्यास ( आदिशक्ति किंवा इच्छाशक्ति किंवा आवरणशक्ति म्हणतात ) माया, विद्या, अविद्या मिळून होणारे तीन प्रकारच्या चवथ्या जिनसाहून चित्प्रभा वेगळी आहे.

५ पांचवा जिन्नस प्रतिबिंबें. ज्यांस (चिदाभास म्हणतात ) जीव आणि ईश्वर अशा दोन प्रकारचा हा पांचवा जिन्नस आहे. याहून चित्प्रभा वेगळी.

अन्नमय कोशरूपी स्थूल देहाहून चित्प्रभा वेगळी आहे.

प्राणमय, मनोमय व विज्ञानमय कोशरूपी सूक्ष्म देहाहून चित्प्रभा वेगळी आहे.

आनंदमय कोशरूपी कारण देहाहून चित्प्रभा वेगळी आहे.

पांच जिन्नस मिळून बत्तीस तत्वें होतात, त्या नामरूपात्मक बत्तीस तत्वांहून चित्प्रभा वेगळी आहे. जसे लहान मोठे सजल घट, तसे ब्रह्मदेवापासून किड्यापर्यंत प्राणी आणि मठाऐवजीं पंचमहाभूतें व जलाऐवजीं सूक्ष्म देह, या सर्व समष्टीस उगाच हिरण्यगर्भ असें नांव आहे. जसें पाणी चंचल, द्रव, झळझळपण तसेंच सूक्ष्म देहाचे तीन प्रकार आहेत. प्राण, मन आणि विज्ञानकोश. त्याच्या दोन ज्ञान आणि क्रिया अशा शक्ति आहेत. घटामध्यें पाणी तसा सर्व देहांत सूक्ष्मदेह. जसा पाण्याचा पाझर तसें मूळस्फुरण. जलाकाशासारखा जीवेश. जलाहून जसें गगन निराळें, तसा आत्मा सूक्ष्म देहाहून वेगळा आहे. पिंडब्रह्मांड जें स्थावरजंगमादि जड या विलक्षण आत्मा आहे.

मूळ स्फूर्ति कारण सर्वांसी । जे पाणियाचे उद्भवाऐसी । तया साम्यता कवणें काळेंसी । चिदाकाशा न घडे ॥ २४ ॥
हें असो प्रतिबिंब पडिलें । जलाकाशासम जीवेश उमटले । तें चिदाभासत्व न जाय उपमिलें । चिदाकाशाशीं ॥२५॥
एवं जीवेश मूळ स्फूर्ति । आनंदमयता इतुक्याप्रति । मन बुद्धि प्राण इंद्रियां ह्मणती । त्रिकोशात्मक सूक्ष्म ॥ २६ ॥
स्थूलदेह तो अन्नमय । पंचकोश प्रकारें ऐशिये । जो पांच जिन्नसांचा समुदाय । बत्तीस प्रकार ॥ २७ ॥
या बत्तिसां परता पदार्थ असेना । जरी नामें असतीं अनेकधा नाना । इतुक्यांचेही रूपाहूनि भिन्ना । चित्प्रभा वेगळी ॥ २८ ॥
चित्प्रभा एक उपलक्षण । परी सच्चिदानंद ब्रह्मात्मा सघन । यया बत्तिसांहून विलक्षण । जेवीं गगन सजल घटा ॥ २९ ॥
वेदांतशास्त्रीं जे पदार्थ दोन । एक सत्य एक मिथ्या संपूर्ण । मिथ्या तेचि बत्तीस भिन्नभिन्न । सत्य तो ब्रह्मात्मा १७३०
ऐसे हे दोन्ही निवडिले । दृष्टांतासहित स्पष्ट केले । आत्मस्वरूप तें भिन्न संचलें । येर बत्तिसांहूनी ॥ ३१ ॥
ज्या रीतीं सजल सप्रतिबिंबाचा । दृष्टांत दिधला घटाचा । येणेंचि पाडें बोलिजेत वाचा । बहुधा दृष्टांत ॥ ३२ ॥
नदींत बैसला वृक्षावरी । तैसा ब्रह्मात्मा निर्विकारी । मूळ स्फूर्तीपासून बत्तीस रूपें सारीं । प्रवाहीं पडलिया ऐशीं ॥३३॥
ब्रह्मात्मा जैसा सागर । बत्तीस रूपें तरंगाकार । ब्रह्मात्मा जेवीं गगन स्थिर । मेघादि सम बत्तीस ॥३४॥
आत्मा ब्रह्म जेवीं दोरी । सर्पाऐशीं बत्तिसें सारीं । स्थाणु समान वस्तु निर्विकारी । पुरुषासम बत्तीस ॥ ३५ ॥
ब्रह्मात्मा सघन जेवीं शिंप । रजतापरी बत्तिसांसी रूप । मृगजलवत् सर्वांसी जल्प । सहस्रकर ब्रह्मात्मा ॥ ३६ ॥
सत्य मिथ्या कळावया उद्योगें । दृष्टांत देणें लागती प्रसंगें । येऱ्हवीं कोणतें निर्विकाराजोगें । बोलूं ये वाचे ॥ ३७ ॥
तस्मात् कोणेही रीतीं समजावें । मिथ्या तें मिथ्यात्वें त्यागावें । सत्य तें सत्य निश्चया आणावें । मुमुक्षें अंतरीं ॥३८॥
पाहें रविदत्ता सावधान । सर्व सारांश आला आलोडून । सत्यमिथ्या गेलें निवडून । हातींच्या आंवळ्यापरी ॥ ३९ ॥
ईशादि तृणांत हे बत्तीस । वाउगाचि भासला भास । या सर्वां विलक्षण निराभास । आत्मा ब्रह्म चिद्रूप ॥ १७४० ॥
यया बत्तिसांमाजी असोनी । विलक्षण ब्रह्मात्मा पूर्णपणीं । हे बत्तीस स्वस्वविकार पावोनी । आपेआप नासती ४१
हें उद्भवतां तया निर्विकारा । विकार करूं न शकती निर्धारा । लय पावतां तो ब्रह्म चिन्मात्रा । विकार कल्पी कोण
असो सर्वांचे रूपाहूनी । आत्मा ब्रह्म पूर्णपणीं । मा बत्तिसांचे व्यापारालागोनी । आतळे केसा ॥ ४३ ॥
अमुक अमुक तत्त्वें मिळतां । व्यापार होतसे कर्मापुरता । तया गुणदोषात्मकाची वार्ता । ब्रह्मात्मया केवीं ॥ ४४ ॥
तथापि अज्ञान जनीं मानिली । तरी ही आत्मत्वीं नाहीं स्पर्शिली । वाउगीच स्वतां जाऊन पडली । जन्ममरणप्रवाहीं

---

पाण्याचे उद्भवासारखी मूळस्फूर्ति. तिच्या-हूनही आत्मा निराळा आहे. जलाकाशासारखे प्रतिबिंबरूपी जीवेश त्याहूनही आत्मा निराळा आहे. जसें जलाकाशाहून गगन निराळें, त्याप्रमाणें जीवेशाहून आत्मा निराळा. जीव, ईश आणि मूळस्फूर्ति इतक्या मिळून आनंदमय कोश होतो, त्या आनंदमय कोशाहून आत्मा निराळा.

वेदांतशास्त्रांत दोन पदार्थ एक सत्य एक मिथ्या असे मानिलेले आहेत. जो मिथ्या पदार्थ तो बत्तीस प्रकारचा. व जो सत्य तो एकच ब्रह्मात्मा आहे. नदींत पडलेला दिसतो परंतु तो वृक्षस्थ वृक्षावरच आहे. तसा आत्मा निर्विकारी मूळस्फूर्तीपासून बत्तीस प्रकारचा प्रवाहांत पडलेल्या प्रतिबिंबाप्रमाणें आहे. ब्रह्मात्मा समुद्राप्रमाणें; बत्तीस तत्त्वें तरंगाप्रमाणे आहेत. ब्रह्मात्मा स्थीर गगनाप्रमाणें आहे, बत्तीस तत्त्वें मेघाप्रमाणें आहेत. ब्रह्मात्मा दोरीप्रमाणें आहे व बत्तीस तत्त्वें सर्पाप्रमाणें आहेत. ब्रह्मात्मा स्थाणूप्रमाणें आहे व बत्तीस तत्त्वें पुरुषाप्रमाणें आहेत. ब्रह्मात्मा शिंपीप्रमाणें आहे व बत्तीस तत्त्वें रुप्याप्रमाणें आहेत. ब्रह्मात्मा सूर्याप्रमाणें आहे व बत्तीस तत्त्वें मृगजलाप्रमाणें आहेत. याप्रमाणें सत्य मिथ्या कळण्याकरितां पुष्कळ दृष्टांत दिले. यांच्या योगानें सत्य तें ओळखून घ्यावें. व मिथ्या तें मिथ्या समजून त्याचा त्याग करावा. ईश्वरापासून तृणापर्यंत बत्तीस तत्वांत तो ब्रह्मात्मा असून त्याहून निराळा आहे. बत्तीस तत्त्वें आपापले विकार पावतात व नासतात. परंतु तो आत्मा विकार पावत नाहीं व त्याबरोबर नासतही नाही. तसेंच बत्तीसाबरोबर आपण असतां त्यास कोणी विकार करूं शकत नाहींत. मग तीं लय पावलीं असतां त्या निर्विकारास विकार कोण कल्पील ? आत्मा बत्तीसांचे रूपाहून निराळा आहे तेव्हां तो त्याचे व्यापारास लिप्त कसा होईल ?

कांहीं कांहीं तत्वें मिळालीं असतां कर्मापुरता व्यापार होतो त्या व्यापारांत होणारे गुणदोष आत्म्यास कसे लागतील ? वास्तविक ते लागत नाहींत हें खरें आहे. तरी गुणदोष आत्म्यास लागतात असे अज्ञानी मानितात, परंतु ते गुणदोष आत्म्यास स्पर्श करीत नाहींत. जें मूर्ख स्पर्श करितात असें मानितात, ते मात्र जन्ममरणाचे प्रवाहांत पडतात.

तेचि गुणदोष जीवें कल्पिले जे गतश्लोकीं निरोपिले । तेचि मागुती पाहिजे बोलिले । मीपण त्यागावया ॥ ४६ ॥
जैसा आत्मा सर्व रूपांहून । सहजीं सहज परिपूर्ण । तैसाचि गुणदोषां विलक्षण । सहज परी बोलिजे ॥ ४७ ॥

## गुणदोषाभ्यांकेवलचितिः विविक्ता

गुणदोषांहून केवल चिती । वेगळीच असे सहजगति । बत्तीस जरी विकारा पावती । तरी ते निर्विकार ॥ ४८ ॥
येथेंही रविदत्ता सावधान । हें निष्कर्षाचें असे निरोपण । गुणदोषांहून विवेचन । होय आत्मरूपाचें ॥ ४९ ॥
गुणदोष म्हणजे व्यर्थ कल्पना । अज्ञानें माथां घे मीपणा । सहजीं होताती व्यापार नाना । ते ते आपणा मानीत
तो मीपणा जरी न मानितां । तरी व्यापार होतीलचि तत्वतां । परी मीपणें घेतसें बद्धता । सहज होतां मुक्त ॥ ५१ ॥
आधीं सहज कैसे होत असती । तेंचि बोलिजे अल्प रीतीं । सहजींच गुणदोष उमटती । सहज चिती वेगळी॥५२॥
प्रथम स्थूलदेह अन्नमय । जो रक्तरेतापासून होय । पंचवीस तत्वांचा समुदाय । पंचीकृताचा ॥ ५३ ॥
रक्तरेत मिळतां जठरीं । गर्भ वाढूं लागे अंतरीं । गुण वाढे सांग गर्भ जरी । सलादि होतां दोष ॥ ५४ ॥
जन्मकाळीं आडवा भरतां । हाचि दोष शिणतसे माता । यथा युक्त सहजीं जन्मतां । गुण होय स्वपरा ॥ ५५ ॥
स्वरूप सांग तरी तो गुण । अरूप व्यंग दोषाचें लक्षण । पुढें वाढूं लागतां विपरीतपण । हाचि दोष ॥ ५६ ॥
गुण होय सरळ वाढतां । पुढें पावला तारुण्यता । तेथेंही गुण होय युक्त वर्ततां । अन्यथा दोष ॥ ५७ ॥
वृद्धकाळीं तो दोष बहुत । गुणही असती किंचित । मृत्युकाळ तो कठिण अत्यंत । त्वरें मरतां गुण ॥ ५८ ॥
एवं जन्मापासून मरणवरी । सहजीं देह नाना विकारी । गुण दोष उमटतीच निर्धारीं । हें अन्यथा नव्हे ॥ ५९ ॥
तितुके गुण दोष जरी सांगावे । तरी धरणी लिहितां न पुरवे । तस्मात् अल्प संकेतें समजावें । गुणदोषाचें पात्र हें
मग असो देव कीं मानव । कीटक अथवा गो अश्व । स्थावर कीं जंगम स्वयमेव । परी देह तेथें गुणदोष ॥ ६१ ॥
केचित् गुणाचि दोषाकार होती । केव्हां दोष गुणाऐसे उमटती । परी साकार तितुकें जाहले असती । सहजीं गुणदोषात्मक
असो स्थूलदेहा अंतरीं प्राण । तेथेंही असती दोषगुण । गुण वाटे होतां पिंड पोषण । अन्यथा दोष ॥ ६३ ॥
हें असो दहाही इंद्रिय । मन बुद्धि स्फूर्ति मायामय । विद्या अविद्या जीवेश उभय । हें सर्वही जितुकें ॥ ६४ ॥

---

जे गुणदोष सांगितले ते जीवानें कल्पिलेले आहेत, त्यांचें पुन्हा वर्णन, मीपणाचा त्याग होण्याकरितां करितों.

गुणदोष म्हणजे व्यर्थ कल्पना. जीव अज्ञानानें मीपणा माथीं घेतो. अनेक प्रकारचे व्यापार सहज होत असतां ते ते मीं केले असें मानितो. तो मीपणा जरी मानिला नाहीं तरी व्यापार होतीलच, असें असतां मीपणा धरल्यामुळें बद्ध होतो, आणि सहजत्वें त्या विकाराचा अभिमान धरला नाहीं तर मुक्त राहातो.

### सहज गुणदोष कसे होतात व त्यांत असून आत्मा अलिप्त कसा तें सांगतों.

रक्तरेत एकत्र मिळालें असतां गर्भधारणा होते, आणि तो गर्भ वाढूं लागतो. तेव्हांपासून गुणदोषास आरंभ होतो, ते गुणदोष येथें सांगतों.

१ यथासांग गर्भ असणें हा गुण. १ सल होणें हा दोष.

२ चांगल्या रीतीनें उत्पन्न होणें हा गुण. २ जन्मतांना आडवें येणें हा दोष.

३ सांग स्वरूप असणें हा गुण. ३ कुरूप व्यंग असणें हा दोष.

४ युक्त वागलें असतां गुण. ४ अन्यथा वागणें किंवा विपरीतपणा हा दोष.

५ वृद्धापकाळीं क्षीण न होणें हा गुण. ५ क्षीण शरीर वृद्धापकाळीं होणें हा दोष.

६ मृत्युकाळीं त्वरीत मरणें हा गुण. ६ दुखण्यांत पडून पुष्कळ दिवसांनीं मरणें हा दोष.

७ याप्रमाणें जन्मापासून मरणापर्यंत सहज देह विकारी आहे. याचे गुणदोष किती आहेत हें सांगतांच येणार नाहींत. देह स्थावराचा असो किंवा जंगमाचा असो देह तेथें गुणदोष आहेतच. कांहीं गुण, दोषाकार होतात व कांहीं दोष गुणासारखे होतात. परंतु जे जे साकार ते ते गुणदोषात्मक आहेतच. प्राणांतही गुणदोष आहेत. प्राणापासून पिंड पोषण झालें असतां गुण. पोषण न झालें असतां दोष. देह, इंद्रिय, मन, बुद्धि, मायामयस्फूर्ति, विद्या, अविद्या, जीव, ईश, हीं मिथ्यत्वानें झालेलीं जीं त्यांस म्हणजे झालेल्यांस गुणदोष आहेतच.

हें सर्वही मिथ्यत्वें जाहलें । जाहलें तथा गुणदोष लागले । ते धर्मधर्मी पूर्वी सांगितले । धर्म तेथें गुणदोष ॥ ६५ ॥
सर्प चोर उमटतां भीति । रजत भासतां हर्षे मति । तैसे हे ईशादि तृणांतीं । बत्तीस गुणदोषात्मक ॥ ६६ ॥
व्यापारापूर्वी वेगळाले । देहीं असतां स्थिर उगले । तेथेंही गुणदोष असती संचले । मा व्यापारीं तो उत्कर्ष ॥ ६७ ॥
व्यापारीं बहु तत्वें मिळती । तेव्हां जागृदादि अवस्था होती । तया समयीं तो अतिविकृति । गुणदोषाची ॥ ६८ ॥
अंतःकरणास्फूर्ति वायु व्यान । तयाचे द्वारें वाणी श्रवण । बोले ऐके परस्परेंकडोन । होऊन भोग्यभोक्ता ॥ ६९ ॥
अन्य बोलतां ऐके सावध । तो अंतःकरणीं आदळे शब्द । तेव्हांचि उठे प्रीति काम कीं क्रोध । हेचि अति गुणदोष ॥ ७० ॥
येथें रविदत्ता ऐसें मानिसी । कीं पांचाचि तत्वें व्यापारासी । परी ईशादि देहांत बहु तत्वांसी । अपेक्षा असे ॥ ७१ ॥
अंतःकरण व्यान श्रोत्र वाचा । पांचवा उच्चार शब्दाचा । हा व्यापार यथाची पांचांचा । परी अन्यासीही अपेक्षी ॥ ७२ ॥
साकार देह तो पाहिजे । जीवें तो विषय हा स्फुरावेजे । विद्या अविद्यात्मक स्फूर्ति सहजें । असे व्यापारीं ॥ ७३ ॥
मन बुद्धि चित्त अहंकार । हेंही पाहिजेताति समग्र । हें असो ईशही निरहंकार । प्रेरी गुणदोषां ॥ ७४ ॥
जेवीं सेनेचा जय पराजय । तो राजयासी आरोप होय । तैसें शुभ कीं अशुभ होतां कार्य । ईशावरी आरोप ॥ ७५ ॥
राजआज्ञेवत ईश प्रेरी । परी तो अकर्ता असे निरहंकारी । अन्यें कर्तृत्व आरोपिजे जरी । तरी तो नित्यमुक्त ॥ ७६ ॥
ईशचि मुक्त ह्मणणें काय । जीवही बद्ध कदां न होय । परी अकर्तृत्वाची नेणे सोय । ह्मणोनि साभिमानें बद्ध ॥ ७७ ॥
असो जीवेश विद्याअविद्यास्फूर्ति । मनादि चत्वार अंतःकरणवृत्ति । व्यान श्रोत्र वाचा शब्द निश्चिती । हा इतुका संघ मिळे ७८
तेव्हां ऐकणें बोलणें दोन्ही । व्यापार होत असती जनीं । आणि गुणांचीही होय उभवणी । सत्वादिकांची ॥ ७९ ॥
बोलकार जो गुणें उठे । तरी ऐकणार कामक्रोधें दाटे । तेथें दोषचि अधिक पेटे । मग परस्परें कलह ॥ १७८० ॥
बोलका सत्वगुणीं मधुर । तरी शांतता पावे ऐकणार । तेव्हां गुणाचि उमटे परस्पर । संवादसुख होय ॥ ८१ ॥
एवं संघ मिळतां गुणदोष उमटती । गुण तरी अतिशय उठे प्रीती । दोष तरी मारिती कीं मरती । ऐसें कार्य गुणदोषांचें ८२
ऐसा व्यापार गुणदोषात्मक । सांगितला संघाचा एक । ऐसेचि आरी होती आणिक । तेही संक्षेपें बोलूं ॥ ८३ ॥
मन समान त्वचा पाणी । स्पर्शविषय पांचवा मिळूनी । व्यापार स्पृष्टव्य देणीं घेणीं । अन्य तत्वें अपेक्षी ॥ ८४ ॥
देह बुद्धि अहंकार चित्त । विद्या अविद्या स्फूर्तिसहित । जीव ईशा साह्य असत । आणि गुणही तिन्ही ॥ ८५ ॥
डोळे झांकून जरीं बैसला । परी स्पर्श होतां अंतरीं कळला । सर्प जरी दचकून मेला । स्त्री तरी सुखावे ॥ ८६ ॥
बुद्धि उदान नयन चरण । पांचवा रूपविषय पूर्ण । होत असे पाहणें चालणें । परी अन्य तत्वें अपेक्षी ॥ ८७ ॥
देह मन चित्त अहंकार । विद्या अविद्यात्मक स्फूर्ति प्रकार । त्रिगुण आणि जीव ईश्वर । साह्याकारा असती ॥ ८८ ॥
सन्मुख देखतां रूप चांगुलें । तरी हर्षून अति सुख जाहलें । विरूप पाहून भय घेतलें । एवं गुणदोषात्मक ॥ ८९ ॥
चित्त प्राण जिव्हा उपस्थ । पांचवा रसविषय यथार्थ । अशन रति होय उपस्थित । परी अन्य तत्वें अपेक्षी १७९०
देह अहंकार मन बुद्धि । विद्या अविद्यात्मक स्फूर्ति आधीं । जीवेश त्रिगुणांची मांदी । साह्यत्वा असती ॥ ९१ ॥

---

पूर्वी धर्मधर्मी सांगितले. धर्म तेथें गुणदोष आहेत. सर्प किंवा चोर दिसले असतां भीति उत्पन्न होते, तसेंच रुपें दृष्टीस पडलें असतां हर्ष होतो. तसेंच ईश्वरापासून तृणापर्यंत बत्तीस गुण दोषात्मक आहेत. यांचा व्यापार नसतांही गुणदोषात्मक आहेत, मग व्यापार होऊं लागला असतां तर गुणदोषाचा फारच उत्कर्ष समजावा. व्यापारांत पुष्कळ तत्वें मिळतात तेव्हां जागृदादि ( अवस्था ) होतात. तेव्हां तर फारच गुणदोष वाढतात. तत्वांचा व्यापार होतो, त्यास पांच तत्वांखेरीज आणखी साकार देह लागतो. तसेंच जीवही लागतो; विद्याअविद्यात्मकस्फूर्ति लागते; अंतःकरणपंचक पाहिजे; ईश्वर पाहिजे. तसेच गुणही पाहिजेत.

**व्यापारांपासून गुणदोष.**

बोलणारा रजोगुणी असला म्हणजे ऐकणारा कामक्रोधानें उठतो; बोलणारा सत्वगुणी असला म्हणजे ऐकणारा शांत गुणानें असतो; बोलणारा तमोगुणी असला तर ऐकणाराही तमोगुणानेंच असतो त्यामुळें दुःख होतें, व सत्वगुणानें सुख होतें.

१ ऐकण्यानें किंवा बोलण्यानें प्रीति उत्पन्न होते हा गुण. १ ऐकण्यानें किंवा बोलण्यानें दुःख किंवा मरण होतें हा दोष.

२ स्त्रीस स्पर्श झाला असतां सुख वाटतें, किंवा चांगले वस्तूचें देणें घेणें झालें असतां सुख वाटतें हा गुण. २ सर्पास स्पर्श झाला असतां भीति उत्पन्न होते, व वाईट वस्तूची देवघेव झाली असतां दुःख होतें हा दोष.

३ पहाणें चालणें ह्या व्यापारांत जेव्हां चांगलें रूप पहातो तेव्हां हर्ष होतो हा गुण. ३ वाईट रूप पाहिलें असतां दुःख वाटतें हा दोष.

चांगुला पदार्थ जिव्हा खाय । तेव्हां सुखरूपता पुष्टि होय । अन्यथात्वें मरोनि जाय । ऐसा गुणदोष रसीं ॥ ९२ ॥
तैसेंचि रतिसुख भोगितां । उत्पात्ति होय कीं मरे अवचिता । ऐशी गुणदोषाची सहजता । असे व्यापारीं ॥ ९३ ॥
अहंकार अपान घ्राण । गुद गंधविषय जाण । विसर्ग होय गंधग्रहण । परी अन्य तत्त्वें अपेक्षी ॥ ९४ ॥
देह मन बुद्धि आणि चित्त । विद्या अविद्या स्फूर्तिसहित । जीवेश त्रिगुणादि अपेक्षित । मिळतां व्यापार घडे ॥९५॥
सुगंधें अत्यंतचि सुखावे । दुर्गंधें कासाविस व्हावें । विसर्गें वांचावें कां मरावें । एवं गुणदोष गंधीं ॥ ९६ ॥
जीव व्यापार उदंड करिती । कृष्यादि अथवा कर्में निपजती । परी अवघ्या पांचचि वृत्ति । ब्रह्मादि कीटकांत ९७
एका देहाचे पांच समजतां । सर्वांचे अनुभवा येती तत्त्वां । असो पंचविषय जागृतीं असतां । होती गुणदोषात्मक
हेचि पाच व्यापार स्वप्नीं । होत असती जीवा लागोनीं । जरी देह विषय प्रत्यक्षपणीं । नसती तेथें ॥ ९९ ॥
परी देहाचा आणि विषयाचा । आभास घेऊनियां साचा । व्यापार करीत असे गुणदोषाचा । अन्य जो उरला संघ
विद्या अविद्यात्मक मायास्फूर्ति । जीवेश त्रिगुण चत्वार वृत्ति । प्राण दशेंद्रियें वावरती । गोलकेंविण अंतरीं ॥ १ ॥
बोलणें ऐकणें पाहणें चालणें । स्पर्शणें आणि देणें घेणें । खाणें रति विसर्ग गंध घेणें । आभासरूपें स्वप्नीं ॥ २ ॥
तेथें हर्ष खेद होती व्यापारीं । ऐसे गुणदोष नानापरी । हे असो सुषुप्तीही माझारी । गुणदोष असे ॥ ३ ॥
तेथें मनबुद्धीचा अभाव । इंद्रिय प्राणादिकां नसे ठाव । येक स्फूर्तिमात्र स्वयमेव । असे अविद्यात्मक ॥ ४ ॥
जीवेश प्रतिबिंबें दोन्हीं । असती तया नेणीवपणीं । हाचि आनंदमय कोश वाणीं । बोलिजे पांचवा ॥ ५ ॥
येरवीं ज्ञानादि चारी कोश । यांचा तेथें होतसे नाश । नेणीवरूपेंचि असे विशेष । प्राज्ञ अभिमानही ॥ ६ ॥
असो ऐसिया सुषुप्तीआंत । सुखाकरिता हा गुण प्रगटत । कांहींच न कळे दोष दिसत । व्यापाराविण ॥ ७ ॥
जैसे एका पिंडीं अवस्थें तिहीं । गुणदोष असती सर्वदांहीं । तैसेंचि ब्रह्मादि कीटकांत सर्वही । गुणदोषें व्याप्त ॥ ८ ॥
हे असो भौतिकांची कथा । परी महाभूतींही सर्वथा । असे गुणदोषाची व्यथा । सहजगति ॥ ९ ॥
पृथ्वी अन्नरसें तारी हा गुण । तेणेंचि विषरूपें होय मरण । तेवींच जीवनें तृषा हरण । मरे बुडतां ॥१८१०॥
अग्नि हा शीत निवारित । येऱ्हवीं दहन करी समस्त । मंद वायु सुखही देत । नातरी उडवी ॥ ११ ॥
आकाशीं अवकाश वाड । हाचि गुण तेथें घवाड । शून्यपणें नेणीव निबिड । हाचि दोष ॥ १२ ॥
एवं आकाशादि देहांत तृण । आणि स्फूर्तिपासूनियां प्राण । इतुके बत्तीसही संपूर्ण । गुणदोषें भरले ॥ १३ ॥

---

४ खाणें, व रति, या व्यापारांत चांगलें खाल्लें असतां शरीरास पुष्टी येते हा गुण; तसेंच रतिसुख भोगीत असतां, व उत्पात्ति झाली असतां सुख वाटतें हा गुण. ४ वाईट खाल्ल्यानें किंवा रतिसुख भोगीत असतां मरण आल्यानें दुःख होतें हा दोष.

५ गंधग्रहणाचा व्यापार होत असतां सुगंध आल्यानें सुख होतें हा गुण. ५ दुर्गंध आल्यानें दुःख होतें हा दोष. मलोत्सर्गाचा व्यापार होत असतां सरळरीतीनें मलोत्सर्ग झाला असतां सुख होतें म्हणून हा गुण. व तोच मलोत्सर्ग नीट रीतीनें झाला नाहीं म्हणजे त्यापासून दुःख होते हा दोष.

जागृतीचे पांच व्यापार होतात. तेणेंकरून गुणदोष उत्पन्न होतात; तसेंच स्वप्नांतही हे पांच व्यापार होतात, तेथेंही गुणदोष उत्पन्न होतात.

## स्वप्नांतील व्यापाराचीं तत्त्वें.

भास देह, भास विषय, गोलकावांचून दश इंद्रियें, प्राण, चत्वार अंतःकरणवृत्ति, विद्याअविद्यात्मकस्फूर्ति, जीव, ईश आणि तीन गुण.

वरील तत्त्वांचे योगानें जागृतीप्रमाणें व्यापार होतात तेव्हां हर्ष, खेद, उत्पन्न होतो हा गुणदोष. झोंपेंत मन बुद्धि यांचा अभाव; इंद्रियें प्राण यांस रहाण्यास ठिकाण नाहीं परंतु विद्याअविद्यात्मक एक स्फूर्ति मात्र आहे त्या नेणिवेंत जीव आणि ईश हीं दोन प्रतिबिंबें आहेत यालाच पांचवा आनंदमयकोश म्हणतात. आनंदमयाखेरीज चारी कोशांचा सुषुप्तींत नाश होतो, परंतु तींत नेणीव रूपानें प्राज्ञ अभिमान रहातो, यामुळें तेथील होणारें कृत्य कळतें. झोंपेंत सुखाकारता होतें हा गुण. व कांहींच कळत नाहीं हा दोष.

एका पिंडांत तीन अवस्थेमध्यें जसे गुणदोष आहेत, तसेच ब्रह्मदेवापासून किड्यापर्यंत सर्व प्राण्यांचे पिंडांत तीन अवस्थेमध्यें गुणदोष व्यापून आहेत. ही भौतिकाची गोष्ट राहूंद्या. पण पंचमहाभूतांतही गुणदोष आहेत.

## पंचमहाभूतांतील गुणदोष.

१ पृथ्वी अन्नरसानें तारिते हा गुण १ तीच पृथ्वी विषरूपानें मरण आणिते हा दोष. २ पाण्याचे प्राशनानें तृषा हरण होते हा गुण. २ पाणी बुडवून मारितें हा दोष. ३ अग्नि थंडी नाहींशी करितो हा गुण. ३ तोच अग्नी भाजतो हा दोष. ४ मंद वायू आला असतां सुख होतें हा गुण. ४ तोच वारा जास्त येईल आणि उडवील तेव्हां तो दोष. ५ पैस आकाश हा गुण. ५ शून्यपणानें निबिड नेणीव हा दोष.

आकाश, देह, तृण, हें जड, व स्फूर्तिपासून प्राणापर्यंत चंचळ मिळून होणारीं बत्तीस तत्वें गुणदोषानें भरलेलीं आहेत.

जैसा सजल साभास घट । तेथेंही गुणदोष स्पष्ट । आणि ओधीं पडला जो बुद्धिनष्ट । तेथें गुणदोषा उणें नसे १४
तरंग मेघ सर्प चोर । रजत मृगजलादि विकार । तेथें जैसे हर्ष भय थोर । तेवींच बत्तिशीं गुणदोष ॥ १५ ॥
असो बत्तिसांचे रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी पूर्णपणीं । तैशीचि बत्तिसांचे दोषगुणीं । न लिंपे सहसा ॥ १६ ॥
जैसें घटजल प्रतिबिंबासहित । आकाश व्यापून अलिप्त त्यांत । मा तयाचे गुणदोषें मिश्रित । होईल कैसें ॥१७॥
आणि नदींत वृक्षीं जो बैसला तो पडियला याहून भिन्न संचला । तो पडल्याचे गुणदोषें मेला । हें घडेना सहसा१८
तरंगाचिये सरिसें पाणी । विकारा नपवे त्यांत असोनी । मा उद्भवलयीं दोषगुणीं । उद्भवे मरे केवीं ॥१९॥
मेघें आकाश गजबजीना । मा पाझरें केवि सरिसें जीवना । सर्पेंही रज्जु आच्छादेना । तरी चाले केवीं त्यासवें १८२०
स्थाणु चोराऐसा नसतां । लुटील केवीं हो पांथस्था । शिंप जाहलीच नाहीं साम्य रजता । तरी हर्ष खेद दे केवीं २१
सविता न बुडे मृगजलपुरीं । तो ग्रासिला केवीं मृगजलचरीं । हें बोलतां जैशी शिणे वैखरी । तैशीच ब्रह्मात्मया २२
अरे जो मायेसी अतीत । तो मायाविकारें केवीं चळत । मायाचि तेथें उद्भवून नासत । तो जैसा तैसा ॥ २३ ॥
अविद्या तया आच्छादिना । विद्याही ज्ञानें जाणेना । ईशाचे प्रेरणेंत गवसेना । सर्वज्ञ ही नव्हे ॥ २४ ॥
मुख्य ईशाऐसें नव्हे ब्रह्म । मा सर्वज्ञादि केवीं घे धर्म । तेथून प्रेरकत्वादि नाना कर्म । हे तों अति दूरतर ॥ २५ ॥
जीवाचे रूपाऐसें नाहीं । मग किंचिज्ज्ञ धर्म स्फुरवणें तेंही । आणि साभिमान घेऊन बैसे देहीं । याहून भिन्न म्हणणें नको
बुद्धीचिये धर्माप्रति । भय लज्जादि धारणा धृति । आशा चिंता निश्चय चित्तीं । भिन्न असे पूर्णपणीं ॥ २७ ॥
मनाचे संकल्पविकल्पासी । शोक मोहो कामादिकांसी । चित्प्रभा वेगळी निश्चयेंसी । पूर्णपणीं असे ॥ २८ ॥
चित्ताचे चिंतनापासूनी । अहंकाराचे अहंकर्तव्याहूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ २९ ॥
प्राणाचे विहरणाहूनी । क्षुत्पानादि धर्मापासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ १८३० ॥
श्रोत्राचिये ऐकण्याहूनी । त्वचेचे स्पर्शनापासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ३१ ॥
चक्षूचिये देखण्याहूनी । रसनेचे अशनापासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ३२ ॥
घ्राणाचे सुगंध दुर्गंधाहूनी । चहूंवाणीचे वचनापासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ३३ ॥
हस्ताचे देण्याघेण्याहूनी । पादाचे गमन क्रियेपासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ३४ ॥
उपस्थाचे रतिसुखाहूनी । गुदाचे विसर्गापासोनि । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ३५ ॥
देहाचे संभूतीपासूनी । जन्मणें वाढणें यांहूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ३६ ॥
बाल्य तारुण्य वृद्धाप्याहूनी । अंतकाल मरणापासुनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥३७॥

---

जसे सजलसाभास घटांत गुणदोष आहेत, तसेच पाण्यांत पडलेला दिसणारा जो वृक्षस्थ त्यांतही पुष्कळ प्रकारचे गुणदोष आहेत. तरंग, मेघ, सर्प, चोर, रुपें, मृगजल इत्यादि विकार त्यामध्यें जसे हर्ष, भय, तसेच बत्तीसांत गुणदोष आहेत.

१ जसें आकाश घट, जल, प्रतिबिंब, यांस व्यापून त्याहून अलिप्त आहे, मग तें त्यांचे गुणदोषांत मिश्रित किंवा लिप्त कसें होईल? २ वृक्षस्थ नदींत पडलेला दिसला त्या दिसणाराहून निराळा आहे, तो पडलेल्याचे गुणदोषानें कसा मरेल? ३ पाणी तरंगाचे विकारानें विकारत नाहीं; मग त्या तरंगाचे उद्भव लय या दोषगुणानें उत्पन्न होईल व मरेल हें कसें होईल? ४ मेघानें आकाश गजबजेना, मग तें त्याच्या पाण्याबरोबर कसें पाझरेल? ५ रज्जू सर्पानें आच्छादिली जात नाहीं, मग ती सर्पाबरोबर कशी चालेल? ६ स्थाणु चोरासारखा नाहीं, मग तो पांथस्थास कसा लुटील? ७ शिंपला रुप्यासारखा नाहीं, मग त्यापासून हर्ष, शोक कसा होईल. ८ सूर्य मृगजल पुरांत बुडत नाहीं, मग तो मृगजलचरांनीं ग्रासिला कसा जाईल? तशी बत्तिसांचे रूपाहून चित्प्रभा वेगळी आहे ती, बत्तिसांचे गुणदोषास कशी लिप्त होईल? १ जो मायेहून निराळा आहे तो मायाविकारानें कसा चळेल? माया मात्र त्याचे ठायीं उत्पन्न होऊन नाश पावते पण तो जशाचा तसाच आहे. त्या ब्रह्मास २ अविद्या आच्छादीना ३ विद्या जाणेना ४ तो सर्वज्ञ नाहीं म्हणून तो, ईश्वराचें प्रेरणेंतही सांपडत नाहीं. ब्रह्म ईश्वरासारखें नाहीं मग तें ईश्वराचे सर्वज्ञादि धर्म व प्रेरकत्वादि कर्म कसें घेऊं शकेल?

## बत्तिसांचे व्यापारापासून किंवा गुणदोषापासून चित्प्रभा वेगळी.

५ ब्रह्म जीवाचे रूपासारखें नाहीं, मग त्याचा किंचिज्ज्ञ धर्म व स्फुरवणें आणि देहांत साभिमान धरून बसणें याहून निराळें आहे हें सांगावयासच नको. ६ बुद्धीचे धर्म, भय, लज्जा, धारणा, धृति इत्यादि; चित्ताचे धर्म, आशा, चिंता, निश्चय यांहून चित्प्रभा भिन्न आहे. ७ मनाचे संकल्प, विकल्प, शोक, मोह आणि काम यांहून चित्प्रभा वेगळी आहे. ८ तसें चित्ताचे चिंतनापासून व अहंकाराचे अहंकर्तृत्वाहून चित्प्रभा वेगळी आहे. पंचप्राणाचे विहरणापासून व क्षुधा तृषा या धर्मापासून पंचज्ञानेंद्रियांचे व पंच कर्मेंद्रियाचे धर्मापासून चित्प्रभा वेगळी आहे. देहाचे जन्मणें इत्यादि शड्विकारांहून

कुरूप सुरूप लावण्याहूनी । वर्ण आश्रमादिकांपासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ३८ ॥
स्त्रीपुरुष नपुंसकाहूनी । राजा कीं रंकादिकापासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ३९ ॥
जागृतीचे पंचवृत्तीहूनी । व्यवहाराव्यवहारापासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ १८४० ॥
स्वप्नाचिये पंचवृत्तीहूनी । सुप्तीचिये नेणिवेपासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ४१ ॥
जैशी सर्व प्रपंचाहूनी । तेवींच परमार्थापासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ४२ ॥
बद्ध मुमुक्षु साधकाहूनी । तेवींच सिद्धाचे देहापासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ४३ ॥
श्रवण मनन निदिध्यासांहूनी । तेवींच समाधिसुखापासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ४४ ॥
जेवीं येक पिंडतादात्म्याहूनी । तेवीं कीटकादि ब्रह्मयापासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ४५ ॥
पृथ्वीचे धारणादिकांहूनी । आपाचे क्लेदनापासोनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ४६ ॥
तेजाचे दहनादिकांहूनी । वायूचे विहरणापासूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ४७ ॥
आकाशाचे शून्यापासुनी । अवकाशादि धर्मांहूनी । चित्प्रभा भिन्न पूर्णपणीं । केवळत्वें सहज ॥ ४८ ॥
जैसें घटजल जलाभासी । गगन भिन्न पूर्णपणेंसी । अथवा सर्पादि नाना दृष्टांतांसी । रज्ज्वादि भिन्न ॥ ४९ ॥
तेणें रीतीं पिंड ब्रह्मांड । मायास्फूर्तीचें मिथ्या बंड । या सर्वांहून ब्रह्मात्मा निबिड । सहजीं भिन्नरूप ॥ १८५० ॥
पूर्वपदीं ईशादि तृणांत । रूपादि विकारजात समस्त । त्याहून भिन्न चिद्घन अनंत । निरोपिलें असे ॥ ५१ ॥
यया पदीं ईशादि तृणादिकांचे । गुणदोष जे धर्म सर्वांचे । तितुक्यांहूनही विलक्षण साचें । केवलत्वें बोलिलें ५२
हें आजि बोलिलें म्हणोन । नूतन भिन्न नव्हे विकाराहून । पहिलेंचि असे चिद्रूप पूर्ण । अनंत कल्पें होतां ॥ ५३ ॥
चिद्रूप एक नाम घेतलें । हें उगेंचि उपलक्षण केलें । परी सच्चिदानंद अनंत संचलें । परिपूर्ण सर्वांहूनी ॥ ५४ ॥
ऐसा आत्मा ब्रह्म परिपूर्ण । तेचि कीं स्वयें सर्व असून । कैसें हें नेणों पडिलें अज्ञान । अभिमानें अन्य जाहलें ५५
स्फुरणादि देहांत नसून जाहलें । उपाधीसी उपाधानें देखिलें । देखिल्यासाठीं सत्यचि केलें । मी हाचि म्हणोनी ५६
ते देह तरी बहुत होती । एक त्यागून एक पावती । परी मीपण याचें न त्यागिती । कवणेही काळीं ॥ ५७ ॥
अन्य योनीस तों काय म्हणावें । मूढचि असती पश्वादि सर्वें । परी देव ऋषि दैत्य मानवें । हे तों ज्ञानाधिकारी ५८

---

कुरूपसुरूप लावण्याहून वर्णआश्रमापासून स्त्रीपुरुष नपुंसक यांहून राजा व रंक यांहून चित्प्रभा वेगळी आहे. जागृतीचे पंचवृत्तीहून व्यवहारअव्यवहार यांहून चित्प्रभा वेगळी आहे. स्वप्नाचे पंचवृत्तीहून झोपेचे नेणिवेपासून चित्प्रभा वेगळी आहे. सर्व प्रपंचाहून तसेंच सर्व परमार्थाहून चित्प्रभा वेगळी आहे. बद्ध, मुमुक्षु, साधक आणि सिद्ध यांचे देहाहून चित्प्रभा वेगळी आहे श्रवण मनन निजध्यास यांहून तसेंच समाधिसुखाहून चित्प्रभा वेगळी आहे. जसें एक पिंडाचे तादात्म्याहून त्याचप्रमाणें कीटकादि ब्रह्मदेवापर्यंत सर्वांचे पिंडाचे तादात्म्याहून चित्प्रभा वेगळी आहे पृथ्वीचे धारणादिकापासून आपाचे क्लेदनापासून चित्प्रभा वेगळी आहे. तेजाचे दहनादिकांपासून वायूचे विहरणापासून चित्प्रभा वेगळी आहे. आकाशाचे शून्यापासून व आवकाशादि धर्मापासून चित्प्रभा वेगळी आहे. जसें घट जल, जलाभासाहून आकाश भिन्न आहे. अथवा सर्पाहून दोरी भिन्न आहे. याचप्रमाणें पिंड, ब्रह्मांड, मायास्फूर्ती, या सर्वांहून आत्मा भिन्न आहे. पूर्वी ईश्वरापासून तृणापर्यंत सर्व रूपादि, विकारजात आहे व त्याहून आत्मा भिन्न आहे असें सांगितलें. व आतां त्याच विकारजाताचे जे गुणदोषादि धर्म त्यांहून आत्मा निराळा आहे असें सांगितलें. चित्प्रभा धर्मधर्मी यांहून निराळी आहे असें आतां सांगितलें. म्हणून ती आतां निराळी नवीन झाली असें नाहीं; तर ती पूर्वीपासूनच निराळी आहे. चित्प्रभा निराळी आहे असें सांगितलें यावरून आत्मा निराळा आहे असें समजलें पाहिजे. कारण चित्प्रभा हें आत्म्याचें एक लक्षण आहे तें सर्वांहून निराळें आहे, तेव्हां आत्मा सर्वांहून निराळा आहे हें सांगावयासच नको.

## मीपणाचें पुन्हा वर्णन.

ब्रह्म ( आत्मा ) परिपूर्ण भरलेला असून अज्ञान कसें झालें व त्याचेयोगानें निराळेंच दिसूं लागलें. स्फुरणापासून देहापर्यंत सर्व नसून झालेल्याप्रमाणें आहे. त्या उपाधीनें उपाधिला पाहिलें त्यामुळें हा मी असे सत्य मानिलें. ते मानिलेले देह पुष्कळ होतात, एक टाकून दुसरा धरितो तरी मीपणा केव्हांही टाकीत नाहीं. मनुष्याखेरीज इतर योनींत ज्ञान नसल्यामुळें ते सर्व मूर्ख आहेत, असे समजलें पाहिजे. तेव्हां त्यांनीं मीपणा धरिला असतां कांहीं आश्चर्य नाहीं; परंतु देव, मनुष्य, ऋषी, दैत्य

ऐक्यज्ञानासी पात्र असतां । नेणती कोणी ब्रह्मात्मैक्यता । बळेंचि घेऊन बैसले अहंता । देहबुद्धीची ॥ ५९ ॥
मीच जन्मलों मीच सुरूप । मीच स्त्री पुरुष मीच कुरूप । मीच वाढतों तरुण वृद्धाप्य । पावलों मीच मरें ॥१८६०॥
नेणे देहीं बहु समुदाय । नेणती कैसा व्यापार होय । उगाचि देह हा मांसमय । सचेतनचि मानी ॥ ६१ ॥
मी चालतों बोलतों पाहतों । देतों घेतों वास घेतों । खातों स्पर्शतों सुख भोगितों । पूर्वकर्मवशें ॥ ६२ ॥
मीच पापपुण्यात्मक कर्म । अंगें करीतसें स्वपरधर्म । तेंचि भोगीन अचुक जन्म । उत्तमाधम घेऊनी ॥ ६३ ॥
मागां हें बहुधा निरूपिलें । अकर्तियानें कर्तृत्व घेतलें । लोकद्वयीं संचरूं लागलें जन्ममरणप्रवाहीं ॥ ६४ ॥
तोंचि प्रस्तुत प्रसंगा ऐसें । मीपण दाविलें कांहींसें । हें असो जागृतीचें पिसें । मीपण स्वप्नींही गळेना ॥ ६५ ॥
तेथें देहध्यासासी मी म्हणून । बैसला सुखदुःखें पावे शीण । तैसेंच सुषुप्तीमाजी नेणीवपण । अभिमानें घेतलें ६६
ऐवं जागृति स्वप्न सुषुप्ति । देहबुद्धीची न फिटे भ्रांति । ऐसेचि जन्मती आणि मरती । अनंत कल्पवरी ॥ ६७ ॥
अनंत जन्मीं अनंत साधन । करितां देहबुद्धि नव्हे न्यून । जरी पावले सत्यलोकादि स्थान । तरी बंधन तुटेना ६८
हे देहबुद्धि तेव्हांचि हरे । जई ब्रह्मात्मज्ञान साचोकारें । ब्रह्मात्मज्ञानही होय निर्धारें । निपटून देहबुद्धि जातां ॥६९॥
रज्जु रज्जुत्वें तेव्हांचि मिळे । ज्या समयीं सर्प मावळे । सर्पही लयाचि समई पळे । यथार्थ रज्जु कळतां ॥ १८७० ॥
एवं हे परस्परें साह्यभूत । एक मावळे एक होय निश्चित । ब्रह्मबुद्धीनें देहबुद्धी गळत । देहाभावीं ब्रह्मात्मा ॥ ७१ ॥
तस्मात् मुमुक्षें एक करावें । आपुलें ब्रह्मत्व दृढ धरावें । देहबुद्धीसी बळें त्यागावें । विवेचनें करूनी ॥ ७२ ॥
येथें रविदत्ता ऐसें म्हणसी । कीं ब्रह्मत्व कैसें अन्य जीवासी । तरी ऐकावी उपपत्ति कैशी । श्रुति अनुभवसिद्ध ७३॥
पलंगीं राजा निजेला । तो स्वप्नीं अंत्यज जाहला । दारोदारीं हिंडों लागला । अन्यासी तूं राजा म्हणे ॥ ७४ ॥
तैसा आत्मा ब्रह्म स्वयें आपण । मायेनें देह केला निर्माण । तोचि होऊन बैसला रुपण । अन्य साकारा देव म्हणे७५
तो महारपणा खरा न होये । तरी झोंप जातां कां राजपदा नये । राजाचि असतां स्वप्न जरी न जाये । तरीही खरा राजा
तैसा अज्ञानकाळीं जीवपणा । किंचितूही सत्यत्वें असेना । जीवत्व जातां होय अंगें देखणा । तरी जीव ब्रह्म नव्हे कैसा ॥७७

---

हें ऐक्यज्ञानाचे अधिकारी असतांही कोणी ब्रह्मात्मैकता जाणत नाहींत. ते बळेंच मी जन्मलों, मी सुरूप, मी स्त्री, पुरुष, नपूंसक, कुरूप, मीच वाढतों, मीच तरुण, मीच वृद्ध, मीच मरतों, असें मानितात. वास्तविक, देहांत बहुत समुदाय आहे; हें ते जाणत नाहींत. तसेंच त्या समुदायांचा व्यापार कसा होतो, जड मांसाचा गोळा जो देह, तो ते सचेतन मानितात; आणि मी चालतों, बोलतों, पहातों, देतों, घेतों, वास घेतों, खातों, स्पर्शतों, पूर्वकर्मवशें सुख घेतों, मींच पापपुण्यात्मक कर्म करितों, तेणेंकरून मी उत्तम, अधम योनींत जाईन, असें मानितो; म्हणूनच जन्ममरणप्रवाहांत म्हणजे लोकद्वयांत संचरूं लागतो. हें जागृतीचें मीपण. याचप्रमाणें स्वप्नांतही मीपण मानितो. झोंपेंत नेणीवेचें मीपण घेतो. हें मीपण धरून सत्यलोकापर्यंत जरी गेला तरी बंधन तुटत नाहीं. जेव्हां खरें ब्रह्मात्मज्ञान होईल तेव्हांच देहबुद्धी नाहींशी होते, निःशेष देहबुद्धी नाहींशी होते; तेव्हांच ब्रह्मात्मज्ञान होतें. जसें सर्पपणा नाहींसा झाला म्हणजे रज्जु रज्जुत्वानें मिळते. सर्प तरी तेव्हांच नाहींसा होतो, तें जेव्हां दोरीचें यथार्थ ज्ञान होतें, याप्रमाणें हीं एकमेकांस साह्यभूत आहेत. एक मावळतें तेव्हां दुसरें खरें होतें. ब्रह्मबुद्धीनें देहबुद्धी गळते. देहाचा अभाव झाला म्हणजे ब्रह्मात्मा कळतो. याकरितां मुमुक्षूनें आपलें ब्रह्मत्व दृढ धरावें आणि विवेचनानें देहबुद्धी बळें त्यागावी.

शंका—मनुष्याखेरीज अन्य जिवास ब्रह्मात्मत्व कसें ?

उत्तर—कोणी एक राजा पलंगावर निजला असतां तो स्वप्नांत महार झाला आणि दारोदार हिंडून इतरांस राजा म्हणतो. तसा ब्रह्मात्मा स्वतः आपण मायेनें देह उत्पन्न करून त्यांत अकुंचित होऊन इतर साकारास देव म्हणूं लागला. राजाचा स्वप्नांतील महारपणा खरा असता, तर स्वप्न सरल्यावर तो राजा झाला नसता, तर तो महारच रहाता. ज्यापेक्षां महार राहिला नाहीं त्यापेक्षां तो महारपणा खोटा. राजा असतांना स्वप्न गेलें नाहीं, तरी तो राजा नाहीं असें होत नाहीं. तसा अज्ञानकाळीं जीवपणा किंचितही सत्यत्वानें असत नाहीं. बरें, जीवपणा गेला म्हणजे आपण देखणा होतो; मग जीव ब्रह्म कां न होईल ?

जो वृक्षीं बैसलियामुळें । पडलियाचें रूप उफाळे । तो भ्रम जरी यथार्थ निवळे । तरी पाडिलाचि कीं वृक्षस्थ ॥ ७८॥
तैसा कीं जीव हा अज्ञानें जाहला । चिताऐसा भास दिसला । तें अज्ञान निमितां ऐक्य पावला । तस्मात् जीवचि ब्रह्म७९
घटजलीं आकाश बिंबलें । तें काय गगनहूनि भिन्न पडिलें । तैसें बुद्धीस्तव आत्मया जीवत्व आलें। तरी काय मुके ब्रह्मत्वा८०
अन्यें दोरीसी मानिला विखार । तरी कां दोरपणा मुके दोर । तैसा जीवत्व कल्पी अहंकार । तरी कां ब्रह्मत्व गेलें॥ ८१॥
शिंपपणा उणाचि न होतां । उगाचि रजतभाव कल्पी चित्ता । तैसाचि जीवपणा हा आरोपितां । ब्रह्मत्व न जाय ॥ ८२ ॥
तरंगाचेंचि अंग पाणी । मेघ नाहींच गगन गगनीं । तैसा जीवचि ब्रह्मात्मा पूर्णपणीं । दुजा नाहीं नाहीं ॥ ८३ ॥
चित्रांचें निजांग ते भिंती । घटाचें निजरूपची माती । तैशी आभासीं स्वरूपता चिती । तिहींही काळीं ॥ ८४ ॥
नगाचें अंगचि कीं सुवर्ण । चोराचें दिसणें स्थाणु आपण । तैसा जीवचि परमात्मा चिद्घन । येथें संशय तो काय ॥ ८५ ॥
ऐशिया बहुत दृष्टांत उपपत्ति । साम्यता पडे या नांव युक्ति। येथें कोणी मानील विशाळमति । कीं नुसधी युक्ति अप्रमाण८६
तरी त्या विशाळमतीसी पुसावें । कीं त्वां शास्त्र तरी पाहिलें आघवें । श्रुतिमाउलीचे घोष बरवे । अनंत होत असती ॥ ८७॥
जीव ब्रह्मत्व एक लक्षण । तया महावाक्य हें अभिधान । कोठें भागत्यागें करी ग्रहण । कोठें मुख्यत्वें ऐक्य ॥ ८८ ॥
तत्त्वमसि या वाक्येंकडून । अर्थ घेइजे भाग त्यागून । तैसेंचि अहंब्रह्मास्मि जें वचन । अहंत्यागें ब्रह्मप्राप्ति ॥ ८९ ॥
अहं पदाचा त्याग बोलिला । तरी सर्वांश न जाय त्यागिला । विशेष त्यागून सामान्य पावला निजांगें ब्रह्मत्व ॥ १८९० ॥
हें पुढें असे निरूपण । अहं कैसें ब्रह्म कवण । येथें जीवब्रह्मैक्य प्रमाण । भागत्यागें दाविलें ॥ ९१ ॥
अयमात्मा ब्रह्म या वाक्यासी । काज नसे भागत्यागासी । प्रत्यगात्मा आणि पूर्णासी । सहज ऐक्य ॥ ९२ ॥
जैसें जलाकाश त्यागून आकाश घ्यावें । तैसें जीवत्व त्यागून ब्रह्मत्व लक्षावें। हें भागत्याग लक्षण समजावें । ऐक्यत्वाविशीं
तैसें नलगे घटाकाशासी । आंतील बाहेरील एकरसी । ऐसेंचि ब्रह्म प्रत्यगात्मचासी । मुख्यत्वें ऐक्य ॥ ९४ ॥

---

जसें वृक्षस्थ वृक्षावर होता म्हणूनच पाण्यांत पडलेलें प्रतिबिंब दिसत होतें. त्या प्रतिबिंबाचा विचार झाला म्हणजे जो पडलेला दिसतो तोच वृक्षस्थ आहे. पडलेला मुळींच नाहीं. तसा जीव हा अज्ञानानें झाला, त्याचा चितासारखा ( चिद्रूप ) भास दिसला. तो भास अज्ञान जातांच नाहींसा झाला, आणि चिद्रूपीं ऐक्य पावला; म्हणून जीव ब्रह्म आहे. जसें घटांतील जळांत आकाश बिंबलें, तें आकाशाहून काय निराळें आहे ? तें जसें निराळें नाहीं, तसें बुद्धीमुळें आत्म्यास जीवत्व आलें, म्हणून त्या ब्रह्माचें ब्रह्मत्व मुकेल काय ? जसें, कोणीएकानें दोरीस न ओळखून सर्प मानिलें, परंतु तिचा दोरीपणा जाईल काय ? तसें अहंकारानें जीवत्व कल्पिलें तरी ब्रह्माचें ब्रह्मत्व कसें जाईल ? जसें शिंपीचें शिंपपण कमी न होतां उगीच ती रुपें आहे असें मानितो. तसें ब्रह्माचें ब्रह्मत्व किंचित्‌ही कमी न होतां त्यावर जीवाचा आरोप करितात; म्हणून त्या ब्रह्माचें ब्रह्मपण कमी कसें होईल ? तरंगाचेंच अंग पाणी आहे. मेघ नाहींच तर आकाश आकाशांत आहे; तसा जीव नाहींच तर आत्मा आत्मपणांत आहे. चित्राचें निजांग भिंत आहे. घटाचें निजरूपच माती आहे. तसें आभासाचें स्वरूपच चिद्रूप आहे. नगाचें अंगच सुवर्ण आहे. चोराचें दिसणें स्थाणू आपण आहे. तसा जीव परमात्मा आहे, याविषयीं शंका नाहीं. पुष्कळ दृष्टांतांनीं साम्यता दाखविणें याला युक्ति म्हणतात. या युक्तीनें आम्हीं जीव ब्रह्म आहे असें दाखविलें. आतां कोणी नुसती युक्ति अप्रमाण आहे असें म्हणतील तर नुसती युक्तीच जीवब्रह्मरूप आहे असें सांगते असें नाहीं तर श्रुतिही जीव ब्रह्म आहे असें सांगते.

**महावाक्य**—जीवत्व आणि ब्रह्मत्व याचें एक लक्षण दाखविणारें जें वाक्य तें महावाक्य.

महावाक्यें चार वेदांत चार आहेत. त्यांपैकीं कांहींत भागत्यागानें ऐक्य घ्यावें लागतें, व कांहींत मुख्यत्वानेंच ऐक्य घ्यावें लागतें. १ तत्वमसि या महावाक्यांत भाग त्यागून अर्थ घ्यावा लागतो. २ तसेंच अहंब्रह्मास्मि या महावाक्यांत अहं त्यागानें ऐक्य होतें. अहं त्याग करावा म्हणून सांगितला तरी सर्वांशीं त्याग होत नाहीं. तर विशेष अहंत्यागानें सामान्य अहंपण आपण ब्रह्म होतें. ३ अयमात्मा, या महावाक्यांत भागत्यागावांचून प्रत्यगात्मा आणि पूर्ण ब्रह्म याचें मुख्यत्वानेंच सहज ऐक्य आहे. जसें जलाकाश टाकून आकाश घ्यावें तसें जीवत्व टाकून ब्रह्मत्व पहावें. याला ऐक्यत्वाविषयीं भागत्यागलक्षण असें म्हणतात. घटाकाश यांतील आकाश हें आंतील व बाहेरील एकच. तसें ब्रह्म आणि प्रत्यगात्मा यांचें ऐक्य भागत्यागावांचून मुख्यत्वानेंच आहे.

हें असो अनंत श्रुति । जीव ब्रह्मैक्यता साधिती । ह्या गर्जना होती त्या नायकती । श्रोत्रपुटें तुझीं ॥ ९५ ॥
ऐसें सप्रमाण सयुक्तिक । जीव ब्रह्मचि पूर्ण एक । तस्मात् साधकें निश्चयात्मक । विचारें ब्रह्म व्हावें ॥ ९६ ॥
नुसधी श्रुति युक्तीच प्रमाण । बोलणें नव्हे आहाच वचन । अनुभवसिद्ध जीव ब्रह्मपूर्ण । प्रतिपाद्य असे ॥ ९७ ॥
पाहें पाहें ब्रह्मविद् ब्रह्म । निजांगें होऊन पावले उपरम । मागें जाहले पुढें होणार नेम । असती वर्तमानीं ॥ ९८ ॥
बोधमात्रें श्रीसद्गुरूचें । अज्ञान फिटतांचि साधकाचें । आपुलें ब्रह्मत्व जें साचें । प्राप्त जयाचें तया ॥ ९९ ॥
ऐसा अनुभव ब्रह्मविदाचा । आणि साधकही पावतसे साचा । जरी जीव ब्रह्म म्हणतां कैंचा । तरी बहु विरोध ॥ १९०० ॥
तस्मात् श्रुति युक्ति अनुभवें कडोन । बोलतां कानकोंडें नव्हे वचन । हें सत्य सत्य त्रिवाचा पूर्ण । जिवाचि ब्रह्म यथार्थ ॥
मुख्य आत्मा म्हणावें आपणासी । आपण तें ब्रह्म अविनाशी । प्रत्यगात्म ब्रह्म निश्चयासी । सदृढ धरावें ॥ २ ॥
येथें जेणें अभाव कल्पिला । अथवा संशयीं वाउगा पडला । तो सत्य सत्य जाणावा बुडाला । मायामृगजळीं ॥ ३ ॥
जे गुणदोष आणि रूपाहूनी । चित्प्रभा निरोपिली पूर्णपणीं । तेचि आत्मत्व ब्रह्मत्व ऐक्यपणीं । येर अनात्मजात बत्तीस
श्रुति युक्ति अनुभवयुक्त । बोलतां कोणतें अयुक्त । ऐसा आमुचा अर्थसिद्धांत । तेथें कोणी शंका करी ॥ ५ ॥
कीं अन्न प्राण मन विज्ञान । आनंदादि कोशांसिही संपूर्ण । श्रुति युक्ति अनुभव प्रमाण । तरी अनात्मत्व कैसें ॥ ६ ॥
अहं ब्रह्म प्राण ब्रह्म । मन ब्रह्म विज्ञानही ब्रह्म । आनंद ब्रह्म ऐसा हा नेम । श्रुतीच करी ॥ ७ ॥
ऐसें पंच कोशांसिही श्रुति । ब्रह्मत्व वाखाणी निश्चितीं । याची अर्थाविशीं युक्ति । असे ते दाऊं ॥ ८ ॥
सर्व भूतें अन्नापासूनी जाहलीं । आहे तीं अन्नेंचि वांचलीं । लयकाळीं लयासी पावलीं । अन्नामाजी ॥ ९ ॥
तैसेंचि प्राणापासून सर्व जाहलें । प्राणामुळें वांचलें मेलें । मन असतां उद्भवलें राहिलें । शेवटीं लयही मनीं ॥ १९१० ॥
ऐसेंचि विज्ञान आनंदापासूनी । उद्भवल्या राहती भूतश्रेणी । लयही पावताति निर्वाणीं । ऐशी युक्तिही असे ॥ ११ ॥
श्रुति युक्ति ही प्रमाण जैशी । तेवीं अनुभूति बोलिजे अल्पशी । मी देह वाटतसे सर्वांसी । मीच क्षुधातृषायुक्त ॥ १२ ॥
मीच संकल्पविकल्पात्मक असें । मीच निश्चयही करीतसें । मीच सुखरूपपणें वसें । हा अनुभव सर्वांचा ॥ १३ ॥
तस्मात् श्रुतियुक्त अनुभव । युक्तचि पंचकोशांसी ब्रह्मत्व । ऐसें असतां अनात्मत्व । पंचकोशां केवीं ॥ १४ ॥
ऐशी शंका जरी सप्रमाण । केली श्रुति युक्ति अनुभवेंकडोन । तरी याचें उत्तर ऐका सावधान । बोलिजेत असे ॥ १५ ॥

---

याप्रमाणें श्रुति ऐक्य दाखविते, व युक्तीनेंही ऐक्य आहे असें पूर्वीं ठरलें आहे. आतां तेंच ऐक्य अनुभवसिद्ध दाखवितों.

ब्रह्म जाणणारे ब्रह्मवेत्ते निजांगें ब्रह्म होऊन उपरम पावले. याप्रमाणें मागें ब्रह्मवेत्ते झाले, पुढें होतील व वर्तमानीं असेच ब्रह्मवेत्ते आहेत. श्रीगुरूच्या बोधानें साधकाचें अज्ञान नाहींसें होऊन आपलें ब्रह्मत्व ज्याचें त्यास प्राप्त होतें, असा ब्रह्मवेत्त्यांचा अनुभव आहे, व साधकासही तोच अनुभव येतो; म्हणून अनुभवानेंही जीवब्रह्माचें ऐक्य आहे. मुख्य आत्मा म्हणजे आपण. आपण तोच आत्मा ब्रह्म; म्हणून प्रत्यगात्मा तोच ब्रह्म आहे. याविषयीं ज्याला संशय आला तो फसला असें समजावें. गुणदोष आणि रूपादि यांहून जो आत्मा निराळा तोच ब्रह्म यांचें ऐक्य आहे. त्याखेरीज जे बत्तीस प्रकार ते अनात्मजात आहेत व ते श्रुतियुक्तिअनुभवसिद्ध नाहींत, म्हणून त्यांचें ब्रह्माशीं ऐक्य नाहीं.

**शंका**—तुमचें म्हणणें असें आहे कीं, जें श्रुतियुक्तिअनुभवसिद्ध असेल त्यासच आत्मा म्हणावें, इतरांस अनात्मा म्हणावें, तरी तुम्ही अन्नमयादि पंचकोशांस ते श्रुतियुक्तिअनुभवसिद्ध असतां अनात्मा आहे असें कां म्हणतां ?

श्रुति पंचकोशांस अन्नब्रह्म, प्राणब्रह्म, मनब्रह्म, विज्ञानब्रह्म, आनंदब्रह्म असें म्हणते हें श्रुतिप्रमाण आहे.

१ युक्ति—सर्व भूतें अन्नापासून झालीं. पुढें तीं अन्नानेंच वांचलेलीं आहेत, व त्यांचा लयही अन्नांतच होतो. तसेंच २ प्राणापासून सर्व झालें, प्राणामुळेंच वांचलें व पुढें मेलें. तसेंच ३ मनामुळें उत्पत्ति झाली, मनामुळेंच स्थिति प्राप्त झाली व शेवटीं लयही मनांतच झाला. तसेंच ४।५ विज्ञान व आनंद यांपासून उत्पत्ति स्थिति लय होतो हें युक्तीचें प्रमाण.

सर्वांस मी देह असें वाटतें. क्षुधातृषायुक्त मीच आहें. संकल्पविकल्पात्मक मीच आहें. मीच निश्चय करितों. सुखरूपपणानें मीच आहें. असा अनुभव सर्वांस आहे हें अनुभवप्रमाण.

अरे अन्न प्राण मनादिकांसी । श्रुति ब्रह्मत्व बोले सायासीं । तिचें रहस्य न कळे अल्पांसी । विचारवंत जाणती ॥ १६ ॥
ज्यापासून हें सर्व जाहलें । आणि जेथेंचि राहून मेलें । तेंचि ब्रह्म सर्व नाथिलें । भूतजात ॥ १७ ॥
भूत म्हणिजे निर्माण जाहलें । ईशादि तृणांत जाहलयांत आलें । भूतांवेगळें तें एकचि उरलें । तेंचि परब्रह्म ॥ १८ ॥
तेंचि ब्रह्म कळावें साधकां । हाचि श्रुतीनें घातला आडाखा । कीं भूतादि परता तया एका । स्वानुभवें जाणावें ॥ १९ ।
ऐसें हें जाणावयाचें स्थान । श्रुति माउली दावी आपण । परी हे जीव एका वचनेंकडून । ब्रह्मत्व जाणतीना ॥ १९२० ।
तेव्हां श्रुति ते पुन्हां मागुती । सांगती जाहली जीवाप्रति । कीं लय राहणें सर्वांची उद्भुति । तें ब्रह्म कोणतें विचारा ॥२१
तेव्हां विचारही पाहती करून । परी जीवा न कळे यारीतीं कोण । मग म्हणे अन्न प्राण मन । विज्ञान आनंदही असे॥२२।
हेंही बोलावया असे कारण । कीं विचारवंत अधिकारी कोण । कळेल अनायासें जो विचारहीन । गुंतेल सुटेल येर ॥२३॥
यास्तव हेतु जो कां आपुला । यथार्थ तो प्रगट नाहीं केला । तोचि आडाखा एथें बैसविला । यया पंचकोशांवरी ॥ २४ ॥
कीं अन्नादि आनंदांत संपूर्ण । भूतें जाहलीं पांचांपासून । वांचती शेवटीं पावती मरण । या पांचांमाजीं ॥ २५ ॥
ऐसा संकेत करून श्रुति । उपदेशीत असे जीवाप्रति । म्हणे पहारे विचारून चित्तीं । यांत खरें ब्रह्मत्व कोणतें ॥ २६ ॥
मग आपुलाले बुद्धीऐसे । विचार करिते जाहले मानसें । जे जे विचारासी पात्र जैसे । ते ते निश्चय करिती तैसा ॥ २७ ॥
कोणी अन्नमयचि ब्रह्म म्हणून । बैसले पावले दृढबंधन । तैसेंचि प्राण मन विज्ञान । ब्रह्म निश्चयें स्थापिती ॥ २८ ॥
हें असो आनंदमयासी । ब्रह्मत्व कल्पिती जे मानसीं । तेही न पावती मुक्ततेसी । मा येर निश्चया मोक्ष केवीं ॥ २९ ॥
हेंचि श्रुतीचें घेऊन वचन । गुरुत्वें सांगे चतुरानन । तेणें इंद्र आणि विरोचन । निश्चय करिती द्विविध ॥ १९३० ॥
विरोचनें अन्न ब्रह्म कल्पिलें । देहासीच आत्मत्व दृढ केलें । देहपातांतीं मोक्ष मानिलें । ते सुटले न म्हणावें ॥ ३१ ॥
तयाचा सहाध्यायी इंद्र । चारी वेळां जाऊन सत्वर । मुख्य ब्रह्माचा करून निर्धार । मुक्त जाला येर त्यागें ॥ ३२ ॥

---

**उत्तर**—श्रुति अन्नमयादि पंचकोशांस ब्रह्म म्हणते, त्याचें कारण काय आहे तें मूर्खास कळत नाहीं. शहाणे जाणतात. श्रुतीनें एक सामान्य नियम बांधिला कीं, हें सर्व ज्यापासून झालें व त्यावरच होऊन राहिलें व पुढें त्यांतच लय पावलें, तेंच ब्रह्म आहे. त्याखेरीज सर्व भूतजात मिथ्या आहे. भूत म्हणजे उत्पन्न झालेलें. ईश्वरापासून तृणापर्यंत सर्व उत्पन्न झालेलें आहे; म्हणून सर्व भूतच आहे. भूताखेरीज एक परब्रह्म आहे. तें ब्रह्म साधकास कळावें म्हणून श्रुतीनें वर सांगितलेला अडाखा घातला. त्याचे योगानें भूतापरतें जें परब्रह्म तें साधकानें स्वानुभवानें जाणावें, हें जाणण्याचें स्थान श्रुतीनें दाखविलें; परंतु जीव ह्या एका वचनानें ब्रह्म जाणेनात, म्हणून श्रुतीनें पुनः वरील अडाखा सांगून त्याचे योगानें ब्रह्म कोणतें याचा विचार करा, म्हणून सांगितलें. तेव्हां जीवानें विचार केला तरी त्यास ब्रह्म कोणतें हें कळेना; म्हणून श्रुतीनें अन्नमयादि कोश ब्रह्म आहेत असें सांगितलें. या सांगण्यांत हें निष्पन्न झालें कीं, जो विचारवान असेल तो जाणून मुक्त होईल व न जाणेल तो तसाच गुंतून राहील, व यांत अधिकारी अनधिकारी यांचाही सहज निवाडा होईल. श्रुतीनें वास्तविक आपला हेतु जो यथार्थ तो वरील कारणास्तव प्रगट न करितां वर दाखविलेला अडाखा अन्नमयादि पंचकोशांवर बसविला, तो असा कीं, अन्नापासून आनंदापर्यंत पंचकोशांत सर्व भूतें उत्पन्न होऊन त्यांचेच योगानें वांचतात व पुढें त्यांतच लय पावतात, तेव्हां हे पंचकोश ब्रह्म आहेत; पण यांत खरें ब्रह्म कोणतें तें विचार करून पहा.

श्रुतीचे सांगण्यावरून आपापले बुद्धीसारखे कोणी अन्नास, कोणी प्राणास, कोणी मनास याप्रमाणें पंचकोशांस लोक ब्रह्म म्हणूं लागले. अन्नमयापासून आनंदमयापर्यंत कोणत्याही कोशास ब्रह्म मानिलें तर तो मुक्त न होतां उलटा बद्धच होतो. पूर्वी ब्रह्मदेवानें श्रुतीचे आधारें करून इंद्र आणि विरोचन यांस पंचकोश ब्रह्म आहेत असा उपदेश केला. त्यांत प्रथम अन्नमयकोश ब्रह्म आहे असें दोघांस सांगितलें, तेव्हां विरोचनानें अन्नमयकोश ब्रह्म आहे असा निश्चय करून तो देहास आत्मा मानूं लागला व देहाचा नाश झाला म्हणजे मोक्ष होतो असें समजूं लागला; परंतु मोक्ष देहपातानंतर होतो असें जे मानितात ते मुक्त झाले असें समजूं नये. अन्नमयकोश ब्रह्म आहे असें ऐकल्यावर तो ब्रह्म कसा याचा विचार इंद्रानें केला; तेव्हां त्यास तें ब्रह्म नाहीं असें वाटल्यावरून त्यानें पुनः ब्रह्मदेवास येऊन विचारिलें. या वेळीं ब्रह्मदेवानें प्राणमयकोश ब्रह्म आहे असें सांगितलें. तेव्हां त्यांचा विचार केला. याप्रमाणें पांची कोशांचा विचार करून खरें ब्रह्म कोणतें तें समजून घेतलें, आणि मुक्त झाला.

ऐसाचि भृगुही वरुणाप्रती । पंचवेळां विचारून चिती । ज्ञाता जाहला तेणें जीवन्मुक्ति । पावला सत्य निर्धारें ॥ ३३ ॥
तस्मात् श्रुतीनें अधिकार । पाहिला जीवाचा अल्पमात्र । म्हणून केला असे उच्चार । पांचांसी ब्रह्मत्वाचा ॥ ३४ ॥
येरव्हीं पांचकोशांसी ब्रह्मत्व । श्रुति बोलेना अघटितत्व । बोले तरी कैंचें महत्व । श्रुतीसी उरलें ॥ ३५ ॥
एक ब्रह्म अद्वयही म्हणत । आणि पांचांलागीं ब्रह्मत्व स्थापित । तरी कां मदिरा पिऊन जाहलीं उन्मत्त । विरोधि प्रलाप करी
परी ते श्रुति उन्मत्त नसे । हे अविचारी आपुलाले बुद्धीऐसे । स्वतां भ्रमीं आणि लाविती पिसें । श्रुति बरळ म्हणोनी ॥ ३७ ॥
असो तया मूढासी काज काय । नेणती भवाचा तरुणोपाय । आपण बुडोन श्रुतीवरी अपाय । विरोधाचा घालिती ॥ ३८ ॥
जरी मूढ विरोध श्रुतिसीं । ठेवितां उणीव नये तिसी । हें ज्ञाते जाणती बंधन येरासी । कल्पांत दृढ होय ॥ ३९ ॥
तस्मात् ब्रह्मत्व पंचकोशांसी । यथार्थ न बोले श्रुति अल्पसी । तरी अनात्मया ब्रह्मत्व कल्पना कैशी । करिती मूढ ॥ ४० ॥
एवं श्रुति प्रमाण होतें मानिलें । तें विरोधास्तव व्यर्थ गेलें । आतां युक्तीनें पंचकोशां ब्रह्मत्व आणिलें । तेंही निर्दाळूं ॥ ४१ ॥
अन्नापासून सर्व जाहलें । अन्न तो पृथ्वीसी असे बोलिलें । आणि देहासीच ब्रह्मत्व कल्पिलें । कासयावरूनी ॥ ४२ ॥
या देहापासून जाहलें सर्व । कीं सर्व वांचले या देहास्तव । कीं लय पावले स्वयमेव । एका देहामाजीं ॥ ४३ ॥
पृथ्वीपासूनही जाहलें म्हणतां । विरोध बहुत असे तत्वता । जाहलें तया असे भौतिकता । येर भूता उद्भव केवीं ॥ ४४ ॥
ईशादिकांसी कोण कारण । तें तों राहिलेंचि मुख्य अधिष्ठान । परी आकाशादि हे जाहले कोठून । पृथ्वी तों आपकार्य
तैशीचि प्राणापासून सर्व । जाहलीं म्हणतां भूतें अपूर्व । तरी काय जाहला असे उद्भव । एकाच्या प्राणापासूनी ॥ ४६ ॥
आपोमयता असे प्राणासी । यास्तव आपीं उद्भव जरी कल्पिसी । तरी ही उत्पत्ति नव्हे सर्व भूतांसी । खाणी मात्र उद्भवती
मनापासून जाहलें म्हणावें । तरी मनासी भूतांचि रचना नव्हे । मन उद्भवतां अमुकसें कल्पावें । परी रूपें पाहिलीं असतीं

---

यावप्रमाणें भृगूनें वरुणास पांच वेळां विचारून खरें ब्रह्म कोणतें याचा निश्चय केला व त्याच्या योगानें तो जिवन्मुक्त झाला.

श्रुतीनें जीवाचा अल्प अधिकार आहे असें जाणून पंचकोशास ब्रह्मत्व वर्णिलें आहे. जर तिचा हेतु असा नसता तर ती पांचांस ब्रह्म कां म्हणती ? जर ती पांचांस ब्रह्म म्हणती तर तिचें महत्व कसें उरेल ! कारण तीच एकदां एक अद्वय ब्रह्म आहे असें म्हणते व पुनः तीच पांचांस ब्रह्मत्व स्थापिते तर ती का मदिरा पिऊन आली आहे, म्हणून असें विरोधी वचन बोलत आहे! हें तर नाहींच. मग ती असें कां बोलली, याचा विचार केला पाहिजे. मूर्ख लोक श्रुतीचा अभिप्राय खरा काय तो न जाणून तिलाच दोष देतात. ते देवोत, परंतु साधकानें देऊं नये. श्रुति पंचकोशांस ब्रह्मत्व आहे असें म्हणत नाहीं, मग मूर्ख अनात्म्यास ब्रह्मत्व स्थापितात त्यांचें तें स्थापणें श्रुतिविरोधामुळें सप्रमाण होत नाहीं, तसेंच युक्तीनेंही सप्रमाण होत नाहीं, हें दाखवितों.

सर्व अन्नापासून झालें; अन्न पृथ्वीला म्हणतात. मग देहास ब्रह्म काय आधारानें म्हणावें. जर सर्व देहापासून झालें असें म्हणावें तर तें एकाच देहापासून झालें नाहीं, व एकाच देहामुळें सर्व वांचलें नाहीं, तसेंच एका देहामध्यें सर्वांचा लय झाला नाहीं; आतां सर्व पृथ्वीपासून झालें असें म्हणावें तर त्यास पुष्कळ विरोध आहेत, ते असे. जें झालें त्यास भौतिक म्हणतात. सर्वच जर भौतिक तर पंचभूतें कशीं झालीं ? पृथ्वीपासून सर्व झालें असें म्हटलें असतां ईश्वरही पृथ्वीपासून झाला पाहिजे. बरें सर्व पृथ्वीपासून झालें असें मानिलें असतां पृथ्वी ब्रह्म होईल; पण ती पृथ्वी पाण्यापासून झाली आहे असा श्रुतीचा आधार आहे. तेव्हां पृथ्वी ब्रह्म कशी होईल. जशी पृथ्वी ब्रह्म होत नाहीं म्हणजे एकंदर अन्नमयकोश ब्रह्म होत नाहीं तसाच प्राणमयकोशही ब्रह्म होत नाहीं.

सर्व एकाच्या प्राणापासून होऊन एकाच्या प्राणाचे योगानें वांचलें नाहींत, व सर्वांचा लयही एकाचे प्राणांत झाला नाहीं, म्हणून प्राणमयकोश ब्रह्म नाहीं. आतां कोणी प्राणास आपोमयता आहे म्हणून आपापासून सर्वांची उत्पत्ति स्थिति लय आहे असें मानील; पण सर्वांची उत्पत्ति आपापासून होत नाहीं, तर खाणी मात्र होतात. बरें खाणी झाल्या तरी सर्वांचें वांचणें पाण्यामुळें व लय पाण्यामुळें होतो असें नाहीं, म्हणून प्राणमयकोश ब्रह्म नाहीं. आतां सर्व मनापासून झालें असें म्हणावें तर मनास भूतांची रचना करितां येत नाहीं. पहिलीं रूपें पाहून मग मनास कल्पना करितां येतें, म्हणून सर्व मनापासून झालें असें म्हणतां येत नाहीं. तसेंच त्या मनाचे योगानें सर्वांची स्थिति व लय होत नाहीं. त्याचप्रमाणें

तैसाचि बुद्धीनें जाहलियाचा । निश्चय करावा अमुक साचा । परी बुद्धीपासूनियां सर्वांचा । उद्भव नव्हे ॥ ४९ ॥
तस्मात् विज्ञानचि ब्रह्म ऐसें । हें कल्पांतींही न घडे अल्पसें । आतां आनंदमयीं कारणत्व असे । परी एका पिंडींचिया नाहीं
एकाच्या सुखें सर्व न होती । एकाच्या सुखें सर्व न राहती । एकाच्या सुखामाजीं न सांठवती । अंतकाळीं ॥ ५१ ॥
एकाचें सुख तें प्रवेशानंतर । मग हो कां ब्रह्मादि कीटकांत समग्र । परी तेथून नव्हे भूतांचा विस्तार । जरी आनंदमय तेथें
त्या आनंदमयीं विद्या अविद्या दोन्ही । तिजी स्फूर्ति मायारूपिणी । जीवेश तेथें प्रतिबिंबोनी । राहिले असती ॥ ५३ ॥
इतुक्यासह जो आनंदमय । प्रवेशाउपरि तो व्यष्टिरूप होय । प्रवेशापूर्वी जो समष्टिमय । तेथून सर्व भूतें जाहलीं ॥५४॥
एथें कोणी विरोध मानिती । कीं ईशासहित देहींच वस्ती । बाहेरी नसे ऐशी वचनोक्ति । पूर्वींची असतां ॥ ५५ ॥
तरी याचें उत्तर तें ऐसें । देहाबाहेरी तों स्फूर्त्यादि नसे । परी जों काल खाणींत न प्रवेशे । आणि न होती निर्माण ॥५६॥
खाणीच मुळीं निर्माण नसतां । प्रवेश केवीं होय आंतौता । परी भूतें पंचीकृत अपंचीकृतता । पूर्वींच जाहली असती॥५७॥
पूर्वीं भूतसृष्टि जाहली म्हणून।तयासी मायास्फूर्ति असे कारण।तोचि आनंदमय समसृष्टिमय पूर्ण । जीवेशविद्याअविद्यात्मक
तो साकारापूर्वीं केवीं असे । हे शंकाचि कोणीं न कीजे मानसें । या मायादेवीचे स्वभावचि ऐसे । अघटन घडवावया ॥५९॥
असो आनंदमय जो समष्टिमय । तेथून हें सर्व जाहलें भूतकार्य । अविद्या प्राधान्यें उपादान होय । विद्या प्राधान्यें निमित्त
जरी कारणत्वया आनंदमया । असतां ब्रह्मत्व न म्हणे श्रुति तया । ऐशियाही पहावें तात्पर्या । विचारवंतें ॥ ६१ ॥
माया अविद्या जीव शिव । पांचवी मायास्फूर्ति स्वयमेव । हें निर्माण जाहलें जें रूपनांव । तें भूतांत आलें ॥ ६२ ॥
हे इतुकेही कोठें उद्भवती । तें अधिष्ठान ब्रह्म निश्चिती । जेथून या सर्वांची लय स्थिति उत्पत्ति । तें अभिन्न करण एक ॥६३॥
अभिन्न करण नव्हे ईश्वर । उपादानेंविण निमित्तमात्र । तेवींच निमित्तेंविण माया अनेश्वर । उपादान भिन्नत्वें ॥ ६४ ॥
तस्मात् माया आणि ईश्वरासी । एकचि अधिष्ठान उभयांसी । तेंचि अभिन्न निमित्त उपादानासी । मुख्य कारण ब्रह्म ॥६५॥
ऐसें हें श्रुतीचें तात्पर्य । बोलतसे उत्पत्ति स्थिति लय । या तिहीं कार्यासी जें अद्वय । तें ब्रह्म एकचि पूर्ण ॥ ६६ ॥
येर हे बत्तीस अनात्मजात । ते निरोपिले रूपासहित । आणि त्याचे धर्म ते गुणदोषयुक्त । या उभयां अतीत चिति ॥६७॥

---

बुद्धीपासून सर्वांची उत्पत्ति, स्थिति, लय होत नाहीं; म्हणून मनोमय व विज्ञानमय कोश ब्रह्म होऊं शकत नाहीं. आतां आनंदमय कोश सर्वांचें कारण आहे, परंतु एकाच्या आनंदमयकोशापासून सर्वांची उत्पत्ति होत नाहीं. तसेंच एकाच्या सुखानें सर्व सुखी होत नाहींत व अंतकाळीं एकाच्या सुखांत सांठवत नाहीं, व एकाच्या सुखानें सर्व सुखी रहात नाहींत, व ब्रह्मदेवापासून किड्यांपर्यंत कोणा एकाचें सुख पाहूं गेलें असतां तें प्रवेशानंतर आहे; म्हणून त्या आनंदमयकोशापासून सर्वांचा विस्तार होत नाहीं. प्रवेशाचे अगोदर आनंदमयकोशास समष्टीरूप असतो तोच प्रवेशानंतर व्यष्टीरूप होतो. जेव्हां आनंदमयकोश समष्टीरूप असतो तेव्हां त्यापासून सर्व भूतें होतात.

**शंका**--ईश्वरादि सर्व आनंदमयकोशाची वस्ती देहांत असते, तो बाहेर रहात नाहीं असें पूर्वींचें वचन आहे, आणि आतां तुम्ही प्रवेश होतो म्हणून सांगितलें, तेव्हां देहांखेरीज आनंदमयकोश असला पाहिजे.

**उत्तर**--देहाबाहेर स्फूर्तिआदिकरून नसतात; परंतु जोंपर्यंत खाणी उत्पन्न झाल्या नव्हत्या व त्यांत प्रवेश झाला नव्हता तोंपर्यंत भूतें पंचीकृत व अपंचीकृत होऊन पूर्वींच राहिलेलीं होतीं. पूर्वीं भूतसृष्टि झाली म्हणून तीस मायास्फूर्ति कारण आहे. तोच जीवेशासहवर्तमान विद्याविद्यात्मक समष्टीरूप आनंदमय कोश आहे. तो साकारापूर्वीं कसा असेल अशी शंकाच करूं नये. कारण या मायादेवीचा असा स्वभावच आहे कीं अघटीत घडवावें.

समष्टीरूप जो आनंदमयकोश त्यापासून हें सर्व भूतकार्य झालें. त्यांत अविद्याप्राधान्यें उपादान कारण व विद्याप्राधान्यें निमित्तकारण याप्रमाणें आनंदमयास कारणत्व जरी आहे तरी त्यास श्रुति ब्रह्म म्हणत नाहीं. तेव्हां तिचें काय तात्पर्य आहे तें पहावें. विद्या, अविद्या, माया, जीव, शीव हीं पांच नामें रूपें भूतांत आलीं. हीं ज्या ठिकाणीं उत्पन्न झालीं तें अधिष्ठान ब्रह्म आहे. सर्वांस ईश्वर जरी कारण आहे तरी तो अभिन्न कारण नाहीं, तर उपादानावांचून निमित्तकारण आहे. व माया सर्वांस निमित्तावांचून उपादानकारण आहे. याप्रमाणें उपादान व निमित्तकारण जी माया आणि ईश्वर ह्यांचें अभिन्नकारण एक ब्रह्म आहे; म्हणूनच श्रुति म्हणते कीं, ज्यापासून उत्पत्ति, स्थिति, लय होतो व ज्यास ते उत्पत्ति स्थिति लयाचे धर्म लागत नाहींत तेंच एक ब्रह्म आहे.

ब्रह्मावांचून जे रूपादि बत्तीस अनात्मजात व त्यांचे गुणदोषात्मक धर्म त्याहून चित्प्रभा वेगळी आहे.

तेंचि ब्रह्म तोचि आत्मा । ऐक्यत्वाविषशीं श्रुत्यर्थसीमा । हेंचि जाणेल तो साधक महात्मा । खरा मुक्त होय ॥ ६८ ॥
एवं श्रुति युक्ति अनात्मजातासी।साह्य आरोपिली जेपंचकोशांसी।ते खंडिली मुख्य निर्धारेंशीं । आतां अनुभूति कैशी ती पाहूं
देहासी अथवा प्राणासी । मनोमय विज्ञान आनंदासी । आत्मत्व कल्पना जरी सर्वांसी । तरी अवधारावें साधकें ॥ ७० ॥
मुळीं अज्ञान जें कां आपुलें । तेणेंचि अनात्मया आत्मत्व भाविलें । हें तों पूर्वींच आह्मीं निरोपिलें । तरी हें सत्य कैसें ॥७१॥
मदिरा पिऊनियां भुलला । सत्य कोण मानी त्याचे बोलाला । तैसा देह बुद्धि जो घेऊन बैसला । त्याचा अनुभव अनुपयोगी
तथापि तया देहात्मवादियासी । पुसावें कीं देहा आत्मा म्हणसी । तरी प्राण मन विज्ञानादिकांसी । आत्मत्व कल्पीसी कां
एक आत्मा अससी निर्धार । कीं जाहला अससी पांच चार । ऐसा तो कोठें न देखों प्रकार । जरी उन्मत्तही भ्रमे ॥ ७४ ॥
स्वप्नीं जरी नाना उद्भववी । परी आपणातें एकचि भावी । दिसती बहूपरी येर आघवीं । दुजीं मजहूनी ॥ ७५ ॥
उन्मत्तकालीं कीं स्वप्नामाजीं । एक रूपा मानिना दुजी । हे शाहणे केवीं मानिती सहजीं । बहुधा आत्मया ७६
मागुतीं तो देहात्मवादी । म्हणेल मी देह एकाचि अनादि । प्राणादि बहुधा कोण प्रतिपादी । आत्मा म्हणोनि ॥७७
तरी पहा देहाहून प्राण । प्राणाहून मन विज्ञान । हें आवडीचें तारतम्य लक्षण । मागां निरोपिलें ॥ ७८ ॥
हें तारतम्य सारिखें सर्वांसी । तरी ते आवडी कासया धरिसी । देहाहून आवडी जरी प्राणासी । तरी प्राण आत्मा ॥
अर्थीत देहासी अनात्मत्व आलें । कीं प्राण आवडून देहा उपेक्षिलें । उगेंचि बळें जें आत्मत्व मानिलें । तें उडे आपेआप
तैसेंच प्राणाहून मन आवडे । तेव्हां प्राणाचें आत्मत्व उडे । त्याहून विज्ञान प्रीति जोडे । तरी मनही अनात्मा ८१
सुषुप्तिकाळीं आनंद आवडता । येर बुद्ध्यादि सारी परता । ऐसें आवडीचें तारतम्य पाहतां । अकृत्रिम सर्वांसी ॥८२॥
ऐसे असतां हे मूढ कैसे । देहात्मवादाचें घेती पिसें । असो त्या भ्रामका काज नसे । परी सांगावें मुमुक्षा ॥ ८३ ॥
कीं हें उगेंचि भ्रमें मानिलें । जैसें पुत्रादिकां आत्मत्व कल्पिलें । स्त्रीसही अर्ध देह बोलिलें । तेवींच देहादिकां ८४
पुत्रादिका गौणात्मा म्हणावें । देहादिकां मिथ्यात्मत्व समजावें । हें अवघे अज्ञानकृत्य कळावें । जया तरावें वाटे तया

---

तेंच ब्रह्म, तोच आत्मा. ब्रह्म आणि आत्मा यांचें ऐक्य जाणेल तोच साधक व तोच मुक्त होईल. पंचकोशांस ब्रह्मत्वाविषयीं जें प्रमाण मानिलें होतें त्याचें खंडण झालें. आतां अनुभवानेंही पंचकोश ब्रह्म होत नाहींत हें दाखवितों.

मुळीं आपलें जें अज्ञान त्यानेंच आत्म्यत्व अनात्म्यास मानिलें. हें पूर्वीं आम्हीं सांगितलें आहे व. तेव्हां तें सत्य कसें होईल ? जसें मदिरा पिऊन भुललेला त्याचें बोलणें अप्रमाण, तसा देहबुद्धी घेऊन बसणाराचा अनुभव अप्रमाण. हें जरी खरें आहे, तरी त्या देहात्मवाद्यास विचारावें कीं, तूं देहास आत्मा म्हणतोस, मग प्राण, मन, विज्ञान यांस आत्मा कां मानितोस ? तूं एक आत्मा आहेस किंवा पांच चार आहेस ? कोणी मदिरा पिऊन जरी भुलला किंवा स्वप्नांत अनेक पदार्थ पहातो, तरी तो आपण एकच असें मानितो, अनेक मानीत नाहीं. जर उन्मत्तकाळीं किंवा स्वप्नांत ते भ्रामक आपणास दुसरा मानीत नाहींत, मग शहाणे आत्मे अनेक आहेत असें कसें मानितील ? आतां देहात्मवादी म्हणेल कीं, मी देहाखेरीज प्राण इत्यादिकांस कोठें आत्मा मानीत आहे ? जर तूं देहाहून प्राण इत्यादि आत्मे मानीत नाहींस, तर देहापेक्षां प्राण, प्राणापेक्षां मन विज्ञान हें आवडीचें तार्तम्यलक्षण मागें सांगितलें आहे. तें तार्तम्यलक्षण सर्वांशीं सारखें आहे तर आवडी कां धरतोस ? जर देहाहून प्राणावर आवडी धरितोस, तर प्राण आत्मा समजला पाहिजे. प्राण आत्मा मानिला म्हणजे मग देह सहजच अनात्मा ठरला. कारण प्राणावर आवड बसल्यामुळें देहाची उपेक्षा झाली. ज्याची उपेक्षा होते, तो आत्मा कसा होईल ? तसें देह आत्मा कसा होईल. ?

देहाहून प्राणावर जर प्रीति आहे, तर देहास आत्मत्व बळेंच मानिलें असें समजावें. जें बळेंच आत्मत्व मानिलेलें तें आपाप उडतें. देहास आत्मा मानून जर प्राणावर आवड आहे तर देहाचें आत्मत्व उडतें, तसेंच प्राणास आत्मा मानून मनावर आवडी आहे, तर प्राणाचें आत्मत्व उडतें; त्याचप्रमाणें मनास आत्मा मानून विज्ञानावर आवडी आहे तर मनाचें आत्मत्व उडतें; तसेंच झोंपेचे वेळीं बुद्धीहून आनंद आवडता होतो, म्हणून बुद्धीचें मानिलेलें आत्मत्व उडतें; असें असतां देहात्मवादी देहास आत्मा कसा मानितात ? ते मानितील तर मानोत परंतु मुमुक्षूनें समजावें कीं, हें भ्रमानें मानिलेलें आहे. जसें पुत्रादिकांस आत्मत्व काल्पिलेलें आहे, स्त्रीस अर्धांग मानिलेलें आहे, त्याचप्रमाणें देहास आत्मत्व मानिलेलें आहे. पुत्रादिकांस गौणात्मा म्हणतात. देहादिकांस मिथ्यात्मा म्हणतात. याप्रमाणें हें सर्व अज्ञानाचें कृत्य आहे असें मुमुक्षूस समजलें पाहिजे.

अज्ञान म्हणजे मुख्य आत्मयाचें। न कळणें होय स्वकीयत्वाचें। तेणेंचि देह मी म्हणून नाचे। जन्मावया मरावया ८६
ऐसा मिथ्यात्मयाचा प्रकार। उगाचि मीच मानी असतां पर। जैसा सिंहचि कीं हा असे नर। तेवीं गौणात्मा पुत्रादि
ऐसें असतां या अज्ञान जनी। पुत्रात्मत्वही न त्यागिती कोणी। मा देहाचें आत्मत्व त्यागुनी। परते कोण ॥८८॥
असो रविदत्ता मुमुक्षूनें। निज स्वहित स्वतां करणें। ब्रह्म आत्मा निःसंशयपणें। येर अनात्मजात सर्व ॥ ८९ ॥
या पंचकोशांसी श्रुति बोले। ब्रह्मत्व म्हणोनि युक्तीनें स्थापिलें। जनाचे अनुभवही कल्पिले। परी विचारापुढें तुच्छ
विचारितां श्रुत्यर्थही कळे। तात्पर्य समजून कुतर्क मावळे। हळूहळू अनुभवही निवळे। विचारवंता श्रवणें ॥ ९१ ॥
एक मुख्यात्मयाचा निर्धार। तिहीं प्रतीतीनें करावा विचार। येर अनात्मजात सविस्तर। पंचकोशात्मक बत्तीस ९२
जैसें मुख्यात्मया प्रमाण। वास्तविक श्रुति युक्ति अनुभवेंकडून। तैसें अनात्मया नसे पहा विचारून। श्रुति युक्ति नानुभूति
एवं अनात्मजात पंचकोश। ब्रह्मात्मा एकचि अविनाश। हा निर्धार झाला परी सारांश। श्रुतिचा निवडू मागुती
जया निरूपणें साधकासी। मुख्यात्मत्व येईल निश्चयासी। आणि अनात्मत्व होईल येरांसी देहादि बत्तीसां ॥९५॥
तेंचि ऐकावें सावधान। पंचकोशांचें विवेचन। श्रुत्यर्थाचाही सारांश पूर्ण। आकळे स्वानुभवा ॥ ९६ ॥
अज्ञान देह आत्मा मानिला। जो मांसादिकांचा अन्नमय बोलिला। अन्नचि ब्रह्म म्हणून नेम केला। परी तात्पर्य भिन्न
कोशपंचका पक्षाकरितां। बोलिलीं पांच पांच अंगें तत्त्वतां। इतुकें सर्व विचारें पाहतां। कळे कैसें अनात्मत्व ॥९८॥
अन्नमयाचें हेंचि शिर। हे हेचि पक्ष दक्षिणोत्तर। हाचि आत्मा हें पुच्छ निर्धार। श्रुतीनें केला ॥ ९९ ॥
ब्रह्म तरी सच्चिद्घन। निर्विकार अदृश्य पूर्ण। जेथें अमुक म्हणून निर्देश वचन। सहसा न करी श्रुति ॥ २००० ॥
स्थूल साकार तरी दृश्य। ब्रह्म निराकार अदृश्य। येथें हें हें म्हणून निर्देश। तेथें वाणी मन मुरडे ॥ १ ॥
जें जें दिसे तें तें नासे। दिसे तेंचि हें हें म्हणो येतसे। तस्मात् हें हें ब्रह्म होईल कैसें। अदृश्य अग्राह्य जें ॥ २ ॥
ब्रह्म सत् देह असत। जो क्षणक्षणांत असे नासत। ब्रह्म चिद्रूप देह जड समस्त। प्राणामुळें चळे ॥ ३ ॥
याचि हेतु श्रुति बोले वचन। कीं देहाहून अन्य आत्मा प्राण। तेणेंचि देहासी होतसे पोषण। तस्मात प्राण कीं आत्मा

मुख्य आत्म्याचें म्हणजे आपलें न कळणें तेंच अज्ञान. त्या अज्ञानानें देहास मी मानून जन्मतो व मरतो. याप्रमाणें मिथ्यात्म्याचा प्रकार आहे. हा घोडा असतां जसें त्यास सिंह म्हणावें, त्याप्रमाणें दुसरा असतांना त्यास मी असें मानावें; त्याचप्रमाणें पुत्रादिगौणात्मा यांस आत्मत्व मानावें; हें मानणें जरी खोटें आहे, तरी पुत्रात्मत्व लोक टाकीत नाहींत. मग ते देहाचें आत्मत्व टाकून वेगळें कसें होतील. असो. मुमुक्षूनें आत्मा ब्रह्म आहे व त्याखेरीज इतर अनात्मा आहे असें समजावें. श्रुतीनें युक्तीनें व जनाचे अनुभवानें जरी पंचकोशांस ब्रह्मत्व स्थापिलें. तरी तें विचारापुढें तुच्छ झालें. विचार केला म्हणजे श्रुतीचा अर्थ कळतो, अर्थ कळला म्हणजे कुतर्क नाहींसा होतो व जनाचा अनुभव कळतो. याप्रमाणें विचारानें तिन्ही प्रतितीनें एक मुख्यात्म्याचा निर्धार करावा, आणि त्या आत्म्याखेरीज पंचकोशादि बत्तीस अनात्मजात आहेत असें समजावें. मुख्यात्म्यास जशी श्रुति युक्ती अनुभव प्रमाण आहे तशी अनात्म्यास नाहीं. आत्मा ब्रह्म आहे व पंचकोश अनात्मा आहे हा निर्धार झाला. परंतु श्रुतीचा सारांश पुनः निवडूं. तो असा कीं, ज्या निरूपणानें साधकास मुख्यात्म्याचा निश्चय होईल व आत्म्याखेरीज जो बत्तीसाचा संघ तो अनात्मा असें कळेल.

### पंचकोशरूपी पक्षांचें विवेचन.

पंचकोशांस श्रुतीनें ब्रह्म वर्णिलें आहे त्याचा सारांश कळावा म्हणून पंचकोशाचें विवेचन करितों. अन्नमयकोश जो मांसमय देह, त्यास अज्ञान आत्मा मानून तें अन्नच ब्रह्म म्हणून बसलें. परंतु त्याचें तात्पर्य निराळें आहे. श्रुतीनें पंचकोशांस पक्षाकारता कल्पून त्याचीं पांच पांच अंगें दाखविलीं आहेत, त्यांचा विचार केला म्हणजे त्याचें अनात्मत्व कसें आहे तें कळेल.

अन्नमयकोशाचें ( पक्षाचें ) हेंच शीर, हेंच उत्तरपक्ष व हेंच दक्षिणपक्ष, हा आत्मा, हें पुच्छ असें श्रुतीनें सांगितलें आहे त्याचा विचार करूं. ब्रह्म सच्चिद्घन निर्विकार आहे व अदृश्य आहे त्यास श्रुतीच्यानेंही निर्देशवचनानें दाखवितां येत नाहीं; आणि स्थूल देह तर साकार दृश्य आहे. ब्रह्म निराकार अदृश्य आहे. स्थूलास हें हें असें निर्देशवचन लागतें; ब्रह्मास वाणी, मन, निर्देश करूं शकत नाहींत. जें दिसतें तें नासतें. ज्यास हें हें म्हणतां येतें तें दृश्य आहे, जें दृश्य आहे तें अदृश्य अग्राह्य ब्रह्म कसें होईल? ब्रह्म सत् आहे देह क्षणक्षणा नाश पावतो म्हणून तो असत् आहे. ब्रह्म चिद्रूप आहे, देह जड आहे, तो प्राणाचे योगानें चळतो, याप्रमाणें देह आत्मा ठरत नाहीं म्हणून त्याहून प्राण, आत्मा आहे, असें श्रुति सांगते. कारण प्राणाचे योगानें देहाचें पोषण होतें.

प्रथम साधकाचें शुद्ध हृदय । असे कीं नसे पाहे निश्चय। म्हणून श्रुति होय कीं न होय । ब्रह्म हें पाहें विचारें ॥ ५ ॥
श्रुति निर्धारें जरी सांगती । तरी विचार करीं कासया म्हणती । ऐशी तों मलत्याची असे रीती।ज्याचें त्यामुखें निवडावें
साधक हेंचि खरें म्हणून बैसे । तेव्हां श्रुति अनधिकारी म्हणून त्रासे । जो विचारें नव्हे म्हणून पुसे । तया आल्हादें सांगे
अरे वास्तविक जड ब्रह्म नव्हे । अविद्या ज्यांत वास करून राहे । आतां प्राण ब्रह्म याहून आहे । तेंही पाहे विचारें८
पूर्वींचा आडाखा जो बोलिला। कीं भूतसंघ जाहला राहिला मेला। जेथें तें ब्रह्म तोचि बैसविला। कीं प्राणास्तव होती निमती
या प्राणमयकोशासीही पांच अंगें। विचार करावा म्हणून सांगें । हें पाहून साधकें लागवेगें। विचार कीजे प्राणाचा१०
प्राणचि प्राणमयाचें शिर । व्यान तोचि दक्षिण पक्ष थोर । समान तोचि पक्ष उत्तर । आकाश आत्मा ॥ ११ ॥
पृथ्वी पुच्छ प्राणमयासी । हेंचि आधीं विचारिजे मानसीं । कीं देहाच्या आधारें वायूसी । उद्भव जाहला ॥ १२ ॥
यंत्र जैसें कळासावें । तेवीं शिरांचे ओढीनें वायु उद्भवे । त्या ओढीनें जरी ढिलें पडावें । तरी जावें देह त्यागोनि १३
व्यान समान आणि प्राण । हेंचि शिर येक पक्ष दोन । हें तंव प्राणवायूचें लक्षण । व्यापारभेदें नामें ॥ १४ ॥
परी संचार नव्हे पोकळीविण । कठिनत्वा न जाय भेदून । म्हणून श्रुति बोलिली योजून । आकाश आत्मा ॥ १५ ॥
ब्रह्म तरी निराकार । प्राणविकारें टाकी फूत्कार । ब्रह्म निराधारत्वें सर्वां आधार । प्राण देह तोंवरी दिसे ॥ १६ ॥
ब्रह्म पदार्थमात्रीं व्यापलें । प्राण पोकळींत वास्तव्य केलें । प्राण वाहतसे दशांगुलें । ब्रह्म सर्वत्रीं सम ॥ १७ ॥
ब्रह्म सद्रूप प्राण नासे । ब्रह्म चिद्रूप प्राण तो जड असे । झोंपेंत निवारीना अल्पसें । वस्त्रें नेतां तस्करीं ॥ १८ ॥
हें असो प्राण सुखदुःखदायक । ब्रह्म आनंदघन एक । तस्मात् प्राण ब्रह्म निश्चयात्मक । नव्हे कल्पांतीं ॥ १९ ॥
हा साधकें विचार पहावा । प्राण हा अविद्याकृत स्वभावा । तस्मात अनात्मा म्हणून त्यागावा । ब्रह्म खरें जाणोनी २०
प्राणासी साह्य कर्मेंद्रिय । जडत्वें याची क्रिया होय । प्राणचि अनात्मा तरी निश्चय अनात्मत्व कर्मेंद्रियां ॥ २१ ॥
ब्रह्मलक्षणें प्राणासी नसती । ऐसा विचार जो करी सुमती । तया विचारवंता श्रुति मागुती । आल्हादें सांगे ॥२२॥
कीं प्राण नव्हे ब्रह्म परिपूर्ण । तरी अन्य आत्मा याहून मन । मनेंचि हा व्यापिला प्राण । तस्मात मन ब्रह्मचारी २३

---

श्रुति प्रथम साधकाची शुद्ध बुद्धी आहे किंवा नाहीं हें पहाते; म्हणूनच हें ब्रह्म आहे किंवा नाहीं याचा विचार कर म्हणून सांगते. जर त्याची शुद्ध बुद्धी असली तर तो विचार करून म्हणेल कीं, देह आत्मा नाहीं. तेव्हां त्यास प्राण आत्मा आहे असें सांगते. जर तिचाच निश्चय देह आत्मा आहे असा असता तर ती विचार कर असें कां सांगती ? श्रुतीचा हेतु ज्याचे त्याच्या हातून खरें ब्रह्म कोणतें ते निवडावें. साधक जर देहच ब्रह्म मानून बसले तर तो अधिकारी समजून त्रासतो. व जो देह, प्राण, इत्यादि ब्रह्म नाहीं म्हणून, विचार करून ठरवितो, त्यास प्राण, विज्ञान, मन, इत्यादि ब्रह्म आहे असें सांगते. आतां प्राण ब्रह्म कसा तो पाहूं.

पूर्वीं जो अडाखा सांगितला तोच पंचकोशास लावून पंचकोश ब्रह्म आहेत असें ठरविलें. त्याच आधारानें प्राणमयकोश ब्रह्म आहे. त्याचे योगानें सर्व होतें रहानें व लय पावतें. त्या प्राणमयकोशाचें प्राण हें शिर. त्याचा व्यान हा दक्षिण पक्ष आहे. समान उत्तरपक्ष आहे. आकाश आत्मा आहे व पृथ्वी पुच्छ आहे. याप्रमाणें प्राणमयपक्षाचीं पांच अंगें सांगून त्यांचा विचार कर असें श्रुति सांगते. तरी त्याचा विचार करूं. देहाचेयोगानें वायु उत्पन्न झाला. जसें यंत्र कळासावें तसा शिरांचे योगानें वायु उत्पन्न होतो. शिरांची वोढी ढिली पडली तर वायु देहांतून नाहींसा होतो. व्यान, समान आणि प्राण हे दोनपक्ष व शिर मिळून व्यापारभेदानें तीन प्रकार प्राणवायूचे झाले आहेत. परंतु त्या वायूचा पोकळींवांचून संचार होत नाहीं व कठिणास भेदितां येत नाहीं म्हणून प्राणवायूचा आत्मा आकाश आहे असें सांगितलें. ब्रह्म निराकार आहे. प्राण विकारानें फूत्कार टाकितो. ब्रह्म निराधारत्वानें सर्वांस आधार आहे. प्राण देह आहे तोंपर्यंतच दिसतो. ब्रह्म सर्व पदार्थांत व्याप्त आहे. प्राण पोकळींत व्यापून आहे. ब्रह्म सर्वत्र सम आहे. प्राण दशांगुळें वहातो. ब्रह्म सद्रूप आहे. प्राण नाश पावतात म्हणून ते असत्. ब्रह्म चिद्रूप आहे. प्राण जड आहेत. प्राण सुखदुःखदायक आहेत. ब्रह्म आनंदरूप आहे म्हणून प्राण ब्रह्म नव्हे. प्राण हा अविद्याकृत आहे. म्हणून तो अनात्मा. प्राणास कर्मेंद्रियें साह्य आहेत. त्याची जडत्वानें क्रिया होते. प्राणच जर अनात्मा आहे तर सहजच कर्मेंद्रियेंही अनात्मा. समजावीं; याप्रमाणें प्राणास ब्रह्मलक्षणें नाहींत; म्हणून तो अनात्मा. असा निश्चय करून जो विचारील, त्यास श्रुति आनंदानें सांगते कीं, मन ब्रह्म आहे. कारण प्राणास मनानें व्यापिलेलें आहे.

मनापासून सर्व भूतें जाहलीं । मनास्तव सर्व राहतीं मेळीं । हीं ब्रह्मलक्षणें मनावरी कल्पिलीं । कीं साधकें निवडावीं
पांचचि अंगें मनोमयासी । यजुर्वेदचि शिर ययासी । ऋग्दक्षिण पक्ष जयासी । उत्तर पक्ष साम ॥ २५ ॥
उपदेश आत्मा बोलिला । अथर्वांगिरस पुच्छत्वीं स्थापिला । हें किन्निमित्त याचा विचार केला । पाहिजे साधकें२६
मुख्य रूप मनाचें संकल्पात्मक । कांहीं संशयरूप करावा तर्क । होय नव्हे हें निश्चयात्मक । कदां नाहीं ॥ २७ ॥
तया संशयाचें चिंतन । तेंचि चित्त परी मनाचे पोटीं लीन । या अंतर्वृत्तीचें निर्गमन । पांचा ज्ञानेंद्रियद्वारा २८
गगनीं वायु जेवीं उठे । तेवीं आत्मत्वीं संकल्प उमटे । संशयात्मक चिंतन प्रगटे । श्रोत्रादि द्वारा ॥ २९ ॥
चिंतन संशय उभय लक्षण । ते अंतर्वृत्ति येकरूप मन । आणि ज्ञानेंद्रियपंचक मिळोन । साही मनोमय कोश ३०
या मनोमय कोशामाझारीं । विद्या अविद्या वास करी । म्हणून बंधमोक्ष दोन्ही उभारी प्रवृत्तिनिवृत्तिरूप ॥ ३१ ॥
कामादि विषयासक्तीनें जीवास बंध दृढ होणें । धर्मार्थकाम प्रवृत्तीच्या गुणें । कामादि अभावें मोक्ष ॥ ३२ ॥
धर्म अथवा अर्थ काम । हाही मनाचा मनोधर्म । परी कळेना केवीं कर्माकर्म । म्हणून वेदाज्ञा पाहिजे ॥ ३३ ॥
त्या वेदाज्ञे ऐसें प्रवर्ततां । चारी पुरुषार्थ होती तत्त्वतां । परी जोंवरी विषयासक्तता । तोंवरी मोक्ष नाहीं ॥ ३४ ॥
असो विद्या अविद्यात्मकामुळें । प्रवृत्ति निवृत्ति दोन्ही निवळे । परी वेदाज्ञेवीण कांहींच न कळे । म्हणून वेदाचि अंग मनाचें
यजुर्वेद शिर ऋग्दक्षिण पक्ष । साम तो मनाचा उत्तर पक्ष । हे वेदत्रयी प्रवृत्तिरूप प्रत्यक्ष । येणें धर्मार्थकाम ३६
येणें अविद्यात्मक विषयासक्ति । वाढूं लागे अधिक प्रवृत्ति । बंधनींच पडे अभिमान उन्नति । तेव्हां जीव जन्मे मरे ३७
प्रवृत्ति अथवा निवृत्तीचा । उपदेश मनोमयीं साचा । म्हणोनि आदेश आत्मा बोले वाचा । श्रुति मनोमयासी ॥३८॥
हें चवथें अंग मनोमयाचें । येथें वास्तव्य विद्या आविद्येचें । जरी बोधकत्व प्रवृत्तीचें । तरी धर्मार्थकाम वाढे ॥३९॥
निवृत्तीचा जेव्हां उपदेश । कीं आत्मा ब्रह्म हाचि निर्देश । वेदत्रयी त्यागे विशेष । या विद्यात्मकें मोक्ष लाभे ४०
पुढें जीवन्मुक्तिसुख होणें । यास्तव अथर्वांगिरस पुच्छ म्हणे । परी हा निश्चय बुद्धीनें करणें । मनीं उपदेश मात्र ॥४१॥
याच हेतू मनोमयाहून । अन्य आत्मा कोशविज्ञान । तेणेंचि मनाची पूर्णता होणें । नातरी संशयीं पडे ॥ ४२ ॥

---

मनापासून सर्व भूतें होतात, रहातात लय पावतात. हीं मनाचे ठायीं ब्रह्मलक्षणें आहेत. याचा साधकानें विचार करावा. मनोमयपक्षास पांच अंगें आहेत. त्याचे शिर यजुर्वेद आहे. ऋग्वेद दक्षिणपक्ष आहे, सामवेद उत्तरपक्ष आहे व या मनाचा उपदेश आत्मा आहे व त्याचें अथर्वांगिरस पुच्छ आहे. याप्रमाणें पांच अंगें कांव कशीं कशीं सांगितलीं याचा विचार करूं. मनाचें रूप संकल्पविकल्पात्मक आहे तें संशयरूप तर्क करितें. परंतु त्यास होय नाहीं हा निश्चय करितां येत नाहीं. मन जें संशय करितें त्याचें चिंतन चित्त करितें. म्हणून चित्त मनाचे पोटांत आहे. त्या मनाच्या अंतर्वृत्तीचें निर्गमन पांच ज्ञानेंद्रियद्वारानें होतें. आकाशांत जसा वायु उत्पन्न होतो तसा आत्म्याचे ठायीं संकल्प उठतो. मग श्रोत्रादिद्वारानें संशयात्मक चिंतन प्रगटतें. चिंतन, संशय अशा दोन लक्षणाचें मन व ज्ञानेंद्रियपंचक मिळून सहा प्रकारचा मनोमयकोश. या मनोमयकोशांत विद्या-अविद्या रहाते. म्हणून त्यांचे-योगानें बंधमोक्ष प्राप्त करणारी प्रवृत्तिनिवृत्ती उत्पन्न होते. कामादि विषयासक्तीनें जीवास दृढबंध प्राप्त होतो. धर्म, अर्थ, काम, याच्या प्रवृत्तीनें मोक्ष होतो. धर्म अथवा अर्थ काम हा मनाचा मनोधर्म आहे, परंतु त्या मनास कर्म काय, अकर्म काय, हें कळत नाहीं. म्हणून वेदाज्ञा पाहिजे. त्या वेदाच्या आज्ञेनें चारी पुरुषार्थ होतात. परंतु जोंपर्यंत विषयासक्तता आहे, तोंपर्यंत मोक्ष प्राप्त होत नाहीं. असो. विद्याअविद्यात्मकामुळें प्रवृत्तिनिवृत्ती निवळते. परंतु वेदाज्ञेवांचून कांहींच कळत नाहीं; म्हणून मनाचें अंग वेद आहे. मनाचें शिर व उत्तर-दाक्षिणपक्ष असे जें यजुर्वेद, ऋग्वेद, सामवेद, हे प्रवृत्तीरूप आहेत. यांचेयोगानें धर्म, अर्थ, काम, सिद्ध होतात. यांचेयोगानें अविद्यात्मक विषयासक्ती वाढूं लागते. व विशेष अभिमान वाढला असतां बंधन पावतो, व तेणें-करून जीव जन्ममरण पावतो. प्रवृत्तीचा अथवा निवृत्तीचा उपदेश मनोमयीं होतो. म्हणून मनोमयाचा आत्मा आदेश म्हणजे उपदेश आहे. यांत विद्याअविद्या रहाते. जर प्रवृत्तीचा बोध होईल, तर धर्म, अर्थ, काम, हे सिद्ध होतात. जेव्हां निवृत्तीचा उपदेश होतो, म्हणजे आत्मा ब्रह्म आहे असा उपदेश विद्यात्मकाचा होतो, तेव्हां मोक्ष होतो, पुढें जीवन्मुक्ति सुख व्हावें म्हणून अथर्वांगिरस पुच्छत्वीं दाखविला आहे. मोक्ष, जिवन्मुक्ति यांचा उपदेश मनांत होतो, पण त्याचा निश्चय बुद्धीवांचून होत नाहीं; म्हणून मनोमयाहून अन्य आत्मा विज्ञान आहे.

विज्ञान आत्मा जरी यथार्थ । तरी मनासी आत्मत्व वचन व्यर्थ । आणि मन विकारी एक पदार्थ । ब्रह्म तों निर्विकार ४३
मनासी तों संकल्प विकल्प । ब्रह्म तों सदा निर्विकल्प । मन उठे निमे असद्रूप । ब्रह्म तिहीं काळीं सत् ॥ ४४ ॥
मन जीवाचे प्रकाशें वर्ते । नातरी हें जडचि ऐतें । ब्रह्म तों स्वप्रकाशें सुषुप्तीतें । जाणे स्वप्रभें ॥ ४५ ॥
मन हें सुखदुःखें शीण पावे । ब्रह्म आनंदस्वरूप स्वभावें । तस्मात् मना ब्रह्मत्व न संभवे । बोलिले तें उपचारिक॥४६
जरी मनचि ब्रह्म असतें । जीवा बंधन कायसा करितें । मागुती निर्विषयत्वें सोडवितें । हें निर्विकारीं विकार कां ॥४७
ऐसे नाना परीचे विरोध । मन ब्रह्म कल्पिता बहुविध । मना प्रत्यक्ष संकल्पविकल्प द्विविध । ब्रह्म तरी निर्विकल्प ४८
मन वृत्तिनिवृत्तीचें साधन । ब्रह्म साध्यरूप द्वैतेंविण । तस्मात् मन त्यागून समाधान । साधकें पावावें ॥ ४९ ॥
असो मनाचें अनात्मत्व जयासी । यथा कळलें निश्चयेंसी । श्रुति माउली उपदेशी तयासी । कीं अन्य आत्मा विज्ञान
विज्ञानास्तव सर्व होतें । विज्ञान आहे तों राहतें । शेवटीं ज्ञानीं लया जातें । तरी पाहें होय कीं नव्हे ॥ ५१ ॥
हें लक्षण ब्रह्मींचें बुद्धीवरी । योजना घडे परी निर्धारीं । बुद्धी नुरेचि सुषुप्तीमाझारीं । आणि पुन्हां उद्भवे ॥ ५२ ॥
उद्भवतां मनाच्या सहवासें । संकल्पविकल्पा साह्य होतसे । निश्चय करी परी विश्वासें । सत्यत्व स्थापी मिथ्यावा॥ ५३
मी देह म्हणून दृढतर । निश्चयें घेतसे अहंकार । म्हणोनि अहंता धर्म साचार । बुद्धीचा असे ॥ ५४ ॥
हेंही पंचज्ञानेंद्रियद्वारा । बाह्य वर्ते विषयाकारा । परी मन संशया मोडोनि निर्धारा । अमुकसा निश्चय करी ॥ ५५ ॥
मनासी इच्छा कामादिकांची । तरी तैशीच आज्ञा पाळी वेदाची । त्याच रीतीं बुद्धि घे रुचि । प्रवृत्तीकडे ॥ ५६ ॥
अथवा मनें मोक्षाची इच्छा घेतां । आज्ञा तेचि मानी त्रयीपरता । तैशीच बुद्धीसी होय निश्चयात्मकता । यास्तव श्रद्धा शिर
प्रवृत्तीकडे जरी आवडी । तरी स्वर्गादिकां सत्यता स्थापी प्रौढी । अथवा मोक्षाकडे निश्चयाची वोढी तरी सत्यता ब्रह्मींची ५८
हा निर्धार बुद्धीचा पाहिला । म्हणून श्रुतीनें असे नेम केला । ऋत म्हणतसे दक्षिण पक्षाला । सत्य उत्तर पक्ष ॥५९॥
जें कां सत्य म्हणून मानिलें । तेथेंचि अनुसंधान दृढ केलें । हे बुद्धीचे स्वभावचि देखिले । तेव्हां योग आत्मा श्रुति म्हणे
योग म्हणजे अखंड उद्योग । सत्य वस्तूचा ध्यानें संयोग । कदांही होऊं नेदी योग । हें चवथें अंग विज्ञानाचें ॥ ६१ ॥

---

जर विज्ञानआत्मा आहे तर मन आत्मा नव्हे. मन विकारी आहे, आत्मा ब्रह्म निर्विकारी आहे. मन संकल्पविकल्पात्मक आहे, आत्मा निर्विकल्प आहे. मन उठतें नाहींसें होतें, म्हणून तें असत्‌रूप, ब्रह्म सद्रूप आहे. मन जड आहे तें जीवाचे प्रकाशानें वागतें, ब्रह्म आपल्या प्रकाशानें झोंपेस जाणतें. मन सुखदुःखानें शीण पावतें, ब्रह्म आनंदरूप आहे. मन जर ब्रह्म असतें तर त्याचेयोगानें जीवास बंधन कां होतें व तेंच मन निर्विषयी झालें असतां मुक्त करितें, असे त्या मनाचे-ठायीं विकार कां असावे ? मन ब्रह्म मानिल्यानें अनेक प्रकारचे विरोध येतात व तें संकल्पविकल्पात्मक दोन प्रकारचें आहे, ब्रह्म निर्विकल्प आहे. मन प्रवृत्तीनिवृत्तीचें साधन आहे, ब्रह्म द्वैतांवाचून साध्यरूप आहे. याप्रमाणें मन अनात्मा आहे असें ज्यास कळलें त्यास श्रुति विज्ञान दुसरें ब्रह्म आहे म्हणून सांगते.

विज्ञानामुळें सर्व होतें, वांचतें व मरतें, म्हणून विज्ञान आत्मा याचा विचार करावा. पूर्वी सांगितलेला अडाखा ब्रह्माचा आहे तोच अडाखा बुद्धीस लागतो; परंतु बुद्धि झोंपेंत उरत नाहीं व पुनः उत्पन्न होते. उत्पन्न होण्याबरोबर मनाच्या सहवासानें मनास संकल्पविकल्प करण्यास साह्य होते व विश्वासानें मिथ्याचे ठायीं सत्यत्वाचा निश्चय करिते. मी देह ह्या दृढ निश्चयानें अभिमान धरिते, म्हणून अहंता हा धर्म बुद्धीचा आहे. ही बुद्धि पांच ज्ञानेंद्रियद्वारानें विषयांत वागते आणि मनास हें काय असा जो संशय होतो, त्या पदार्थाचा निश्चय करिते. मनास कामादिकांची इच्छा असली तर तें वेदाची तशीच आज्ञा पाळितें. मन जें वेदवचन पाळितें तेंच वचन पाळून बुद्धि प्रवृत्तीकडे जाते. तसेंच मनानें मोक्षाची इच्छा धरिली म्हणजे तें तदनुरूप वेदाची आज्ञा पाळितें व बुद्धिही तोच निश्चय करिते, करितां विज्ञानाचें श्रद्धा हें शीर आहे. बुद्धि प्रवृत्तीची जेव्हां आवड धरिते तेव्हां स्वर्गादिकांची प्रौढी स्थापिते. तसेंच जर बुद्धि परमार्थाची आवड धरील तर ती ब्रह्माची प्रौढी स्थापिते. असा बुद्धीचा निर्धार पाहून श्रुतीनें विज्ञानाचा ऋत हा दक्षिण पक्ष व सत्य हा उत्तर पक्ष असें म्हटलें. बुद्धीनें ज्याला सत्य असें म्हटलें तेथेंच ती दृढ अनुसंधान धरिते, हें जाणून विज्ञानाचा आत्मा योग आहे असें श्रुतीनें म्हटलें.

योग म्हणजे अखंड उद्योग त्या उद्योगानें व ध्यानानें सत्य वस्तूचा संयोग होतो, कधींही वियोग होऊं देत नाहीं.

त्या संयोगें जें अप्राप्त । तेंचि करून घेतसे प्राप्त । मग साभिमानें मानी कृतकृत्य । यास्तव महा पुच्छ बोलिलें ६२॥
धन्य मी जें हृदयीं धरिलें । त्या वस्तूसी प्राप्त करून घेतलें । ऐसें बुद्धीनें महत्त्व स्वीकारिलें । तस्मात् महा पुच्छ खरें
एवं श्रद्धाचि विज्ञानाचें शिर । ऋत सत्य पक्ष दक्षिणोत्तर । योग आत्मा हा निर्धार । महा पुच्छ प्रतिष्ठा ॥ ६४ ॥
ऐसा विज्ञानाचा प्रकार । श्रुति सांगतसे निर्धार । याचा साधकें अंतरीं विचार । या रीतीं केला पाहिजे ॥ ६५ ॥
जैसें पंचज्ञानेंद्रियसहवासें । मन हें विषयाकार होतसे । तैसेंचि विज्ञाना साहाय्यत्व असे । पंचज्ञानेंद्रियांचें ॥ ६६ ॥
तस्मात् पंचज्ञानेंद्रिय बुद्धि एक । हा विज्ञानकोश मिळून षट्क । हा आनंदमयासी आच्छादक । कारण मनाचें ।६७।
जरी बुद्ध्यास्तव सर्व जाहलें राहिलें । बुद्धि अभावी लया गेलें । परी यासी ब्रह्मत्व नाथिलें । नाश होय म्हणोनी ॥६८॥
जैसें मन एक विषयग्रहणा । साधन असे भक्त ते विधाना । तेवींच साधनता यया विज्ञाना । असे साध्याचि ॥६९॥
तमात् विज्ञानात्मा कल्पूं नये । कोश हा अनात्मा निसंशय । परी विज्ञानयोगें कार्य । साधून घ्यावें ॥ २०७० ॥
श्रद्धा शिर जें विज्ञानाचें । जें कां आवडतेपण स्वर्गादिकांचें । तेंचि त्यागावें इहपर साचें । दोषदृष्टीनें विचारें ॥७१॥
एक वेदांतप्रसिद्ध जें ब्रह्म । तेंचि गुरुमुखें आकळावें वर्म । तेथेंचि बुद्धीची श्रद्धा परम । येर अनात्मजात त्यागा ॥ ७२॥
तेचि ऋत तेंचि सत्य साचार । शब्द दोन परी अर्थ एक निर्धार । तस्मात ब्रह्म सत्यत्वें बत्तीस हे येर। मिथ्यात्वें समजावें ७३
मिथ्यात्व कळतां श्रद्धा उडे। आणि सत्य ते सत्यत्वें जोडे । बुद्धीचा निश्चय धांवे तिकडे । तेव्हां श्रद्धा ही सत्याचीं७४
मग देहबुद्धीचा करी त्याग । ब्रह्मात्मयाचा अखंड योग । सदां ध्यानाचा लागवेग । विसरचि पडो नेदी ॥ ७५ ॥
ऐसा अभ्यास दृढ होतां । शनैःदेहबुद्धि होय त्यागिता । मग आपुलें महत्त्व स्फुरे तत्त्वतां । जे पुच्छत्वीं प्रतिष्ठिलें॥ ७६॥
अहंब्रह्मास्मि तरी स्फुरे । परी त्रिपुटी साधकत्वें उरे । तेंचि महत्त्व विज्ञानानुकारें । निश्चयरूप ठसावे ॥ ७७ ॥
येन्हवीं बुद्धि बंधासी कारण ॥ परी विवेचनें मोक्षद होय आपण । म्हणूनि मुमुक्षें जावें शरण । यया बुद्धीसी ॥ ७८ ॥
देहबुद्धीचा निश्चय त्यागी । आत्मा ब्रह्म प्रतिपादी वेगीं । मग मनही संशयातें त्यागी । एवं उपयोगी परमार्थी ॥ ७९ ॥
परी विज्ञानमय ब्रह्म साधावया । साधक असे गा शिष्यराया । तस्मात् साधकत्व असे जया । तें साध्य ब्रह्म नव्हे॥८०॥
साध्य तें उर्वरित उरावें । साधकें तत्क्षणीं नासावें । म्हणून विज्ञान तें ब्रह्म नव्हे । कवणें काळीं ॥ ८१ ॥

---

या संयोगानें जें अप्राप्त तें बुद्धि प्राप्त करून घेते आणि अभिमानानें आपणास कृतकृत्य मानिते, म्हणून विज्ञानाचें महापुच्छ हेंच पुच्छ आहे. अमुक वस्तु मीं प्राप्त करून घेतली, हें मीं मोठें काम केलें, असें बुद्धीनें महत्व स्वीकारून आपणास धन्य मानिलें; म्हणून त्याचें महापुच्छ खरें आहे. याप्रमाणें विज्ञानाचीं पांच अंगें आहेत त्याचा साधकानें विचार करावा. विज्ञानमयकोश हा बुद्धि व पंचज्ञानेंद्रियें मिळून सहा प्रकारचा आहे. हा आनंदमयास आच्छादक व मनाचें कारण आहे. बुद्धीमुळें सर्व होतें, रहातें व लय पावतें; पण त्याचा नाश होतो, म्हणून विज्ञानमयकोश ब्रह्म नाहीं. जसें मन विषयग्रहणास साह्य आहे, तशी बुद्धिही विषयग्रहणास साह्य आहे, म्हणून विज्ञान आत्मा नाहीं, तर हा विज्ञानकोश अनात्मा आहे. विज्ञानाचें जें श्रद्धा शीर आहे त्याचा इहपर दोषदृष्टीनें विचार करून त्याग करावा आणि वेदांत प्रसिद्ध जें एक ब्रह्म तेंच गुरुमुखानें घ्यावें व तथेंच बुद्धीची श्रद्धा लावावी आणि अनात्मजाताचा त्याग करावा. सत्य आणि ऋत हे शब्द मात्र दोन आहेत, परंतु दोहोंचा अर्थ एकच आहे. यांचे योगानें ब्रह्म सत्य आणि अनात्मजात मिथ्या असें मानावें. हेंच सत्य मिथ्या कळलें म्हणजे त्यावरची श्रद्धा उठते, आणि सत्य सत्यत्वानें घेतलें जातें. मग श्रद्धा ही सत्याचीच होते, आणि देहबुद्धीचा त्याग होतो. व सदोदित ध्यानाचे योगानें ब्रह्मात्म्याशीं अखंड योग होतो. असा दृढ अभ्यास झाला असतां हळूहळू देहबुद्धि टाकतो, आणि आपले पुच्छत्वीं जें स्थापिलेलें महत्व तें आठवतें. अहंब्रह्मास्मि जरी आठवतें तरी साधकत्वानें त्रिपुटी उरतें, तेंच विज्ञानाचे योगानें निश्चयरूप महत्व आहे. बुद्धि स्वाभाविक बंधनकारक आहे; परंतु तीच विवेचनानें मोक्ष देणारी होते; म्हणून मुमुक्षूनें या बुद्धीस शरण जावें म्हणजे मग ती देहबुद्धीचा त्याग करिते आणि आत्म्याचें प्रतिपादन करिते व मन संशय टाकतें. याप्रमाणें बुद्धि परमार्थास उपयोगी आहे म्हणून ब्रह्म साधण्यास विज्ञानमयकोश साधन आहे; करितां विज्ञानमयकोश आत्मा नाहीं.

ब्रह्म सत् बुद्धि असत् । ब्रह्म चित् विज्ञान जड उद्भवत । विज्ञान सदां सुखदुःखें शिणत । ब्रह्म सुखैकघन ॥ ८२ ॥
ऐसें विलक्षण परस्परें । म्हणोन विज्ञान ब्रह्म नव्हे खरें । हें साधकें पहावें विचारें । निःसंशयपणें ॥ ८३ ॥
जरी विज्ञान कारण सर्वांसी । लय स्थिति कीं उद्भवासी । परी कार्यरूपता विज्ञानासी । कारण आनंदमय ॥ ८४ ॥
श्रुति बोले या विज्ञानाहून । अन्य आत्मा आनंदमय पूर्ण । तेणेंचि बुद्धीची पूर्णता होणें । तस्मात् विज्ञान अनात्मा
आतां आनंदमय कोश हा पूर्ण । कार्य करणासीही कारण । बुद्धीसहित सर्व भूतें निर्माण । होतीं राहती नासतीं ॥८६॥
येर अन्नादि विज्ञानांत चारी । कारणें कल्पिलीं असतीं निर्धारीं । परी आनंदमयाची नये सरी । कारणत्वाविशीं ८७
आनंदेंवीण भूतें नाना । कदापि उत्पन्न होतीना । आणि आनंदेंवीण राहतीना । क्षणभरी जीवत्वें ॥ ८८ ॥
सुप्तिकाळीं विज्ञानासहित । त्यागून अन्नमयादि समस्त । प्राण जरी असती वावरत । परी सद्भाव नाहीं ॥ ८९ ॥
एवं चारीही कोशांवांचून । सर्व भूतें सुषुप्तिंत पूर्ण । असतां आनंदमयामाजीं लीन । वांचती सुप्तिसुखें ॥ २०९० ॥
एवं चारी असतां येका आनंदें । वांचती भूतें सुखस्वादें । परी एक आनंदेविण चारी विशदें । असतां भूतें न वांचती
तस्मात् मुख्य कारण आनंदमय।आणि आनंद कोणाचें नव्हे कार्य । येरांसी कारणाचा आरोप होय। परी ते कार्यरूपी चारी
ऐसा आनंदमय मुख्य कारण । परी याचाही विचार साधकें करणें । ऐसें श्रुतीही बोलिली जें वचन । तेव्हां उणीवता वाटे
आणि कोश ऐसें आनंदा म्हणतां । हें तों प्रत्यक्ष आच्छादकता । परी आच्छादिलें असेल आंतौता । तें तों भिन्न याहूनी९
ऐसा विचार साधकें करावा । या आच्छादनीं कोण स्वभावा । तो निवडून येर त्यागावा गोंवा । कोश नामाचा ॥ ९५ ॥
याही कोशासी पांच अंगें । पक्षा ऐशींच श्रुति सांगे । हेंचि किमर्थ हा लागवेगें । विचार करावा ॥ ९६ ॥
जरी अतिसूक्ष्म विचारवंत । तरीच आनंदमयातें निरासित । येऱ्हवीं मागुतीं बंधनीं पडत । जरी चारी कोश निरासिले
जैसें तृण वरचिल जळालें । भूमीपोटीं बीज उरलें । तेवीं विज्ञानादि चारी निरासिले । परी अज्ञान उरे आनंदीं ॥ ९८ ॥
वर्षाकाळीं पुन्हां तें तृण । पूर्ववत होतसे निर्माण । तैशीं विज्ञानादि भूतें संपूर्ण । उद्भवती पूर्णपरी ॥ ९९ ॥
ते कां निरसलें ऐसें म्हणावें । जरी पुन्हां मागुतीं बाधक उद्भवे । असो साधकें येथें विचारें पहावें । कीं बाधक काय आनंदीं
बुद्धीचा जों काल उद्भव न होता । एक स्फूर्ति मात्र असे आंतौता । तेचि मायादेवी स्वस्वरूपा वरुता । भासली असे ॥ १ ॥
तया स्फूर्तिचे दोन प्रकार । जाणीव नेणीव निरंतर । विद्या नामें जाणतें होणार । अविद्यास्वरूप नेणीव ॥ २ ॥

---

ब्रह्म सत्, बुद्धि असत आहे, ब्रह्म चिद्रूप आहे. विज्ञानमयकोश जड आहे व तो उत्पन्न होतो. विज्ञानमय सुखदुःखानें शीण पावतो, ब्रह्म आनंदरूप आहे. याप्रमाणें विरोध येतात म्हणून विज्ञान ब्रह्म नाहीं. विज्ञान सर्वांचे उत्पत्ति, स्थिति, लय याचें कारण आहे, तरी हें आनंदमयाचें कार्य आहे, तेव्हां विज्ञानाहून आनंदमय दुसरा आत्मा आहे असें श्रुति सांगते.

आनंदमयकोशापासून कार्यकारणादि सर्व पदार्थ होतात, वांचतात व शेवटीं त्यांतच लय पावतात, म्हणून आनंदमय आत्मा आहे. अन्नमयापासून विज्ञानापर्यंत अनुक्रमें एक कार्य दुसरें कारण असे चारी कोश कारणें होतात; परंतु कारणत्वाविषयीं आनंदमयाची कोणी बरोबरी करणारे नाहीं. आनंदमयावांचून अनेक प्रकारचीं भूतें उत्पन्न होत नाहींत व आनंदावांचून क्षणभरसुद्धां वांचत नाहींत. सुषुप्तिंत विज्ञानासह चारी कोश टाकून प्राण वावरत असतात, परंतु त्यास सद्भाव नाहीं. याप्रमाणें चारी कोशावांचून सर्व भूतें झोंपेंत आहेत तों आनंदमयांत लीन होऊन झोंपेच्या सुखानें वांचतात, एरव्हीं वांचत नाहींत. म्हणून सर्वांचें मुख्य कारण आनंदमय आहे. तो कोणाचें कार्य नाहीं. इतरास कारणाचा आरोप होतो, परंतु ते चारी कोश अनुक्रमें एकएकाचीं कार्यें आहेत. आनंदमय कोणाचें कार्य नसून सर्वांचें कारण असतांही त्यांत उणीव असल्यामुळें श्रुति विचार कर म्हणून म्हणते; तेव्हां यांत उणीव आहे व यास कोश असेंही श्रुति म्हणते यावरून यानें ज्यास आच्छादिलें तें निराळें आहे हें उघड आहे. म्हणून याचा विचार करून जें आच्छादिलेलें तें ग्रहण करून कोशनांवाचा गोंवा टाकावा. चारी कोश निरशिले पण हा अतिसूक्ष्म असल्यामुळें विचारवंतावांचून या कोशापासून लोक मुक्त होत नाहींत. तर उलटे बंधनांत पडतात. हा आनंदमय सर्वांचें बीजरूप असल्यामुळें चोहोंचा नाश झाला तरी याचा नाश न झाल्यामुळें जीव मुक्त होत नाहीं. जोंपर्यंत बुद्धी उत्पन्न झाली नाहीं, तोंपर्यंत स्फूर्ति असते, तीच स्वस्वरूपावर भासलेली माया. तिचे दोन प्रकार, एक जाणीव, व दुसरा नेणीव.

ऐशिया विद्या अविद्या दोन । त्यांत प्रतिबिंबित जीवेशान । विद्येसह ईश निमित्त कारण । उपादान जीव अविद्या ३
बुद्धीपासून देहापर्यंत । हें जग कार्यरूपें समस्त । जीवही कार्यरूपी विशेष भाशत । स्वप्नीं कीं जागृतीं ॥ ४ ॥
परी सुषुप्तीमाजींही कारणरूपीं । जीवत्व असे नेणीव संकल्पीं । आणि ईश्वर निमित्तमात्र विक्षेपीं । तो कार्यांत न ये ५
कार्यीत न ये ह्मणोनि निमित्त । जो उद्भव स्थिति लया आंत । जो उपादान कारण समस्तांत । हा निर्णयचि असे ६॥
असो ऐसा आनंदमय । या पांचांचा येथें अन्वय । परी मुख्य बाधकत्वाचा अपाय । ते अविद्या नेणीव ॥ ७ ॥
स्वस्वरूपाचें न कळणें । हेंचि कोशनामें अच्छादन । येर विद्या माया जीवेशान । हेंही विकाररूपी ॥ ८ ॥
मुख्य मूळ मायाच विकारी । जे न होऊन जाहली निर्विकारी । अविद्या स्वरूपा आच्छादन करी । विद्या उभारी जगकार्य ९
ईश अलिप्तत्वें प्रेरक । जीव सुखदुःखाचा भागी एक । एवं मायेसहित हें पंचक । बाधक विकारी ॥ २११० ॥
या कोशाचें शिर प्रिय । मोद दक्षिण पक्ष होय । प्रमोदा बोलिली सुखमय । पक्ष उत्तर ॥ ११ ॥
आनंद आत्मा जो चवथा । तोही स्थापिला असे सर्वथा । आत्मा ब्रह्मघनाही समर्था । पुच्छत्वीं प्रतिष्ठिलें ॥ १२ ॥
बुद्धीचा बहिर्व्यापार सरता । विश्रांति घ्यावया परतता । प्रथम वासनेसी सुखाकारता । तेंचि प्रिय या कोशीं ॥ १३॥
पुढें बुद्धीचा तरंग मावळे । तेव्हां सुखाकारता उफाळे । तो मोदनामें सुषुप्ति काळें । दुजें अंग ॥ १४ ॥
जेव्हां घन सुषुप्ति लागे । तेव्हां प्रमोदाकार होय अंगें । गाढ सुषुप्तीचिया प्रसंगें । तो आनंद आत्मा ॥ १५ ॥
हा आनंद आत्मा म्हणितला । परी ब्रह्म आत्मा न जाय स्थापिला । पांच अंगांचा पक्षी जो वर्णिला । त्याचा आत्मा
असो प्रिय अथवा मोद । प्रमोद किंवा आनंद । हे चारी सुखाचे स्वाद । नेणीवरूप वृत्तीचे ॥ १७ ॥
एक सुख एक करी ग्रहण । हेचि त्रिपुटी अन्यथात्वें पूर्ण । ते यथार्थ नव्हे सुखैकघन । उद्भवणें नाश जया ॥ १८ ॥
हेंही चारी जेथून जाहले । आणि मायादि पंचक उद्भवलें । हेंही सर्व जाहल्यांत आलें । तीं तीं भूतें दृश्यापरी ॥१९॥
हे जया अधिष्ठानीं निर्माण । तें अविनाश ब्रह्म सच्चिद्घन । जें पुच्छत्वें केलेंसे स्थापन । तें ब्रह्म आत्मा स्वयें ॥२१२०॥
श्रुतीचा भाव अधिष्ठानावरी । कीं ब्रह्मतत्त्वीं ईशादि तृणांत सारीं । परी आनंदमयापासून निर्धारी । सर्व जाहलें बोलिलीं
परी हें बोलणें वाउगेंचि । जैशी योजना चहूं कोशांची । विचारणा पाहिली अधिकाराची । परी तात्पर्य पुच्छत्वीं २२
चार नामा कल्पिलें वाउगें । तैसेंचि ब्रह्म पुच्छ म्हणोनि सांगे । परी तें सत्यत्वें कोठें अंगें । मा पुच्छ नाम प्रतिष्ठि २३

त्याच विद्याअविद्या व त्या विद्याअविद्येंत प्रतिबिंबणारे जीवशीव, विद्येसह ईश्वरनिमित्त कारण व अविद्येसह जीव उपादान कारण आहेत. बुद्धीपासून देहापर्यंत हें सर्व जग कार्यरूप आहे. जीवही कार्यरूपच आहे परंतु तो सुप्तींत नेणिवेचा कारण आहे. ईश्वर कार्यांत येत नाहीं म्हणून तो निमित्त आहे. जो उद्भवस्थितिलयांत आहे तो उपादान-कारण होय. आनंदमयांत हे वर सांगितलेले पांच प्रकार आहेत; परंतु नेणीव आंत असल्यामुळें हा कोश बाधक आहे.

स्वस्वरूपाचें न जाणणें यासच कोश म्हणतात. विद्या, माया, जीव, शीव हे विकारी आहेत. अविद्या स्वरूपास आच्छादिते व विद्या त्याचे ठायीं जगकार्य उत्पन्न करिते. जगाचा ईश्वर अलिप्तपणें प्रेरक आहे, व जीव सुखदुःखाचा वांटेकरी आहे, म्हणून मायेसह हें पंचक बाधक आहे. या आनंदमय कोशाचें शिर प्रिय आहे व मोद दक्षिणपक्ष आहे व प्रमोद उत्तर पक्ष आहे, व आनंद आत्मा आहे व ब्रह्म पुच्छ आहे. बुद्धीचा बहिर्व्यापार सरून ती विश्रांति घेण्याकरितां प्रथम परतते, तेव्हां वासनेस सुखाकारता होते. तें या आनंदमयाचें शीर आहे. बुद्धी परतून तिचा तरंग मावळतो, मग सुखाकारता उत्पन्न होते, तोच सुप्तीकाळींचा मोद समजावा. जेव्हां गाढ झोंप लागते तेव्हां आनंद व जेव्हां दाट झोंप लागते तेव्हां त्यास प्रमोद म्हणतात. मोदप्रमोदप्रिय आनंद हे चारी सुखाचे स्वाद नेणीवरूप वृत्तीचे आहेत. एक सुख आहे व तें घेणारा कोणी एक आहे अशी त्रिपुटी आहे. तें सुखैकघन नाहीं कारण त्यास उद्भव आणि नाश आहे. हीं चारीही ज्यापासून झालीं व मायादिपंचक ज्यापासून झालें, तें ब्रह्म एक व हीं सुखें आणि मायादिपंचक झाल्यांत आलेलें आहे, म्हणून हीं दृश्याप्रमाणें भूतेंच समजावीं. हीं ज्यापासून झालीं तें ब्रह्म पुच्छ म्हणून वर्णिलेलें आहे. श्रुतीचा भाव अधिष्ठानावर आहे; तेव्हां सर्व ब्रह्मापासून झालें असें सांगावयाचें, परंतु सर्व आनंदमयापासून झालें असें श्रुतीनें सांगितलें; तें उगीच आहे. वास्तविक तिचा सर्व आनंदमयापासून झालें, असें वर्णन करण्याचा हेतु हा आहे कीं अधिकाराप्रमाणें ज्याचें त्यानें खरें काय तें समजून घ्यावें. म्हणूनच पुच्छत्वीं तात्पर्य ठेविलें आहे. चोहों पक्षांचीं अंगें व पुच्छें मिथ्या, तशींच यांचींही अंगें मिथ्या आहेत. जर असें मिथ्या आहेत म्हणजे नाहींतच, मग त्या आनंदमयास पुच्छ कसचें? पुच्छ नाहीं म्हणून पुच्छत्वीं वर्णिलेलें ब्रह्म पुच्छ कसें होईल?

तें कार्य ना नव्हे कारण । निमित्त ना नसे उपादान । सहजीं सत्य एक अधिष्ठान । मायादि भ्रमासी ॥ २४ ॥
सत्य अधिष्ठानेंविण । भ्रमासी नव्होचि उद्भवन । हें श्रुतीनें यथार्थ जाणून । म्हणे जेथून सर्व जाहलें ॥ २५ ॥
सर्व म्हणजे हे बत्तीस । जे सांगोपांग पंचकोश । यांत अधिष्ठानत्वें जें अविनाश । ते एक विलक्षण चिति ॥ २६ ॥
ऐसें श्रुतीचें तात्पर्य । एक चिद्रूप ब्रह्म आत्मा निश्चय । येर हे बत्तीस सह आनंदमय । सर्व भूतांत आले ॥ २७ ॥
जैसें अन्न प्राण मन विज्ञान । पांच पांच अंगें भिन्न भिन्न । अनात्मजात सांडिलें निरसोन । तेवींच त्यागावे वृत्यानंद
स्फूर्ति विद्या अविद्या जीव शिव । हे पांचही विकारी स्वभाव । जाहलें तें भूतरूप स्वयमेव । अनात्मत्वें निरासिजे २९
या पंचका कोश अभिधान जे प्रिय मोदादि पांच लक्षण । यांत चारी अनात्मत्वें निरसोन । उरे ते पाचवें ब्रह्म ॥३०॥
तेंचि अवधि शेष निजसार । याहून निषेधिलें सर्व हें येर । तस्मात् साधकें साधावें दृढतर।ब्रह्म आत्मा हा निश्चय ३१
हा निश्चय अभ्यासें खलावा । अन्य आत्म्याचा निरासिजे गोंवा । तोचि पुढें बोलिजेल आघवा।परी येथें निवडिलं ३२
मनोमयीं नुसधा उपदेश । विज्ञानमयीं साधन अभ्यास । तैसाचि आनंदमयीं निदिध्यास । चारी निरसे तों करावा॥
सर्वांची प्रीति आपणाकरितां । त्यांतही देहादि विज्ञानांत त्यागितां । केवळ उरे स्फुरद्रूपता । ते प्रियता पाहिली ॥३४॥
मग सर्वपणाचें भान विरे । एक स्वकीयत्वाचि वृत्तीसी स्फुरे । तया मोद नाम हें साचोकारें । ओळखावें साधकें ॥३५॥
पुढें कृतकृत्यता जे वाटे । तेणें सुखाचा समूह लोटे । त्या नांव प्रमोद वाउगा दाटे । वृत्त्यानंदात्मक ॥ ३६ ॥
तो वृत्त्यानंद सर्व ओसरे । निवृत्तिरूपें सुख सुखीं थारे । तेंचि जाणावें सामान्य निर्धारें । आनंद अंग चवथें ॥ ३७॥
तेथें सुखैकगोचर सामान्य वृत्ति । त्रिपुटीरूप सहज असती।म्हणूनि हे मावळेल जैं स्फूर्ति । तेंचि ब्रह्म पुच्छा प्रतिष्ठा ॥
अगा हे सुमति रविदत्ता । सावध अससी कीं चित्ता । पंचकोशविवेचन हें तत्त्वतां । येथें सांग केलें ॥ ३९ ॥
ऐसाचि अभ्यास वृत्तीनें करावा।तो पुढें अनुक्रमें बोलिजे बरवा।परी अनात्म्याचा निवडिला गोंवा।मुख्य आत्मा ब्रह्मएक
येथें पंचकोश विवेचितां । शंका मानील कोणी चित्ता । कीं श्लोकपदीं हें कांहीं नसतां । अप्रासंगिक बोलिलें ॥४१॥
तरी पहावें विचारून । श्लोकार्थाचेंचि निरूपण । ध्वनितार्थरूपें केलें कथन । प्रसंगानुसार ॥ ४२ ॥
रूपाहून चिति जे वेगळी । तेचि कीं बत्तिसांहून निराळी । पंचकोशात्मक बत्तीस हे सकळी । रूपात्मक असती ॥४३
पांच भूतें पांच खाणी । ऐशीं दहा रूपें जड मिळोनि । अन्नमयाचि बोलिजे वाणी । याहून भिन्न ते चिती ॥ ४४ ॥
पंचप्राण पंचकर्मेंद्रिय । या दहा तत्वांचा समुदाय । याचीं नावें कोश प्राणमय । याहून भिन्न ते चिती ॥ ४५ ॥

ब्रह्म कोणाचें कार्य नाहीं व कारणही नाहीं. तसेंच निमित्त नाहीं व उपादान नाहीं. तर मायाभ्रमास मात्र अधिष्ठान आहे. सत्य ब्रह्मावांचून भ्रमास अधिष्ठान कोण असणार? कोणीच नाहीं. म्हणून श्रुतीनें म्हटलें कीं, जेथून हें सर्व झालें तें अधिष्ठान ब्रह्म आहे. सर्व कोशांचीं पांच पांच अंगें मिथ्या समजून त्यांचा त्याग केला. असाच वृत्यानंदाचा त्याग करावा आणि आनंदमयाचें पुच्छत्वीं स्थापिलेलें जें ब्रह्म तोच आत्मा. असा हा आत्मा इतर अनात्म्याचा त्याग करून अभ्यासानें दृढ खलावा.

मनोमयीं नुसता उपदेश होतो, विज्ञानमयांत साधन आणि अभ्यास होतो व आनंदमयांत निजध्यास लागतो. याप्रमाणें निजध्यास सर्वांचा निरास होईपर्यंत करावा.

प्रिय–देहापासून विज्ञानापर्यंत जे कोश त्यावर जी प्रीति आहे ती मिथ्या आहे व खरी प्रीति सर्वांची आपणाकरितां आहे असें जें आठवतें त्यास प्रिय म्हणतात.

मोद–प्रियामध्यें सर्वांची प्रीति आपणावर आहे ते सर्व प्रीति करणारे येथें नाहींतच तर माझा मी एकटा आहें असें आठवतें त्यास मोद म्हणतात.



प्रमोद.–मोदामध्यें मीच एकटा आहें असें आठवतें तें आठवून कृतकृत्यता वाटते, तेणेंकरून पुष्कळ सुख होतें त्यास प्रमोद म्हणतात.

आनंद–प्रिय, मोद, प्रमोद हे तिन्ही वृत्यानंद आहेत. असो. वृत्यानंद सर्व नाहींसे होऊन निवृत्तीरूपानें सुख सुखाचे ठायीं स्थीर होतें त्यास आनंद म्हणतात.

आनंदांत सुखैकगोचर सामान्यवृत्ति त्रिपुटीसहवर्तमान सहज आहे. ती स्फूर्ति जेव्हां मावळेल; तेव्हांच ब्रह्मरूप जें पुच्छ याचे ठायीं प्रतिष्ठा होईल. ( तेंच होऊन राहील ).

रविदत्ता या श्लोकांत अनात्मा कोण व आत्मा कोण, यांचा घोटाळा होतो तो काढून आत्मा कोण हें स्पष्ट दाखवून पंचकोशात्मक तीन देहरूपी जो बत्तीस तत्वांचा अनात्मा तोही स्पष्ट दाखविला.

अन्नमयकोश.–पंच भूतें व पांच खाणी अशा दहा प्रकारच्या जडरूपामिळून अन्नमयकोश होतो.

प्राणमयकोश.–पांच प्राण व पांच कर्मेंद्रियें मिळून दहा तत्वांच्या समुदायास प्राणमय कोश म्हणतात.

ज्ञानेंद्रियपंचक एक मनें । या साहांसी मनोमय अभिधान । तेवींच बुद्धि तो कोश विज्ञान । या सातांहून भिन्न चिती॥
स्फूर्ति विद्या अविद्या जीवेश । या पांचा नाम आनंदकोश । याहून विलक्षण तो चिदंश । आत्मा ब्रह्म एकरस ॥ ४७
एवं दाहा दाहा मिळतां वीस । त्यांत सात घालितां सत्तावीस । पुढें पांचांसहित होती बत्तीस । एवं पंचकोश रूपात्मक
या इतुकियांचेही रूपाहूनी । चित्प्रभा वेगळी पूर्णपणीं । तस्मात् श्लोकपदाचेचि व्याख्यानीं । असे विवेचन ॥ ४९ ॥
जैसें रूपाहून चिद्रूप निवाडिलें।अर्थात् पंचकोश विवेचन जाहलें।तैसेंचि गुणदोषांहून भिन्न जें संचलें। येथें सुचलें तें बोलूं
बत्तीस तत्त्वात्मक पंचकोश । तेचि हे देहत्रय अशेष । अन्नमय तो स्थूल विशेष । साकार पंचीकृताचा ॥ ५१ ॥
प्राण मन विज्ञान तिन्ही । असती सूक्ष्म देहालागुनी । सप्तदश तत्त्वें स्थूलीं राहूनी । व्यापार करिती ॥ ५२ ॥
आनंदमय तोचि कारण । या देहत्रयाचें उत्पत्तिस्थान । एवं देहत्रय जीवालागून । उपाधि असे ॥ ५३ ॥
या देहत्रयाचे दोषगुण । व्यापार होताती भिन्न भिन्न । तेचि जागृदादि अवस्था तीन । विहार जीवाचे ॥ ५४ ॥
स्थूललिंगाचिये आधारें । क्रिया होतसे विषयानुकारें । तेचि जागृति पंच व्यापारें । जे स्थूल चाले बोले ॥ ५५ ॥
येऱ्हवीं पाहतां या जडासी । अवस्था असे तरी कायसी । सूक्ष्मास्तव चळणें देहासी । म्हणोनी बोलिली ॥ ५६ ॥
जागृति स्वप्न किंवा सुषुप्ति । या तिन्ही अवस्था बुद्धीप्रति । परी स्थूल वावरे ते जागृती । स्थलाची बोलावी ॥ ५७ ॥
बुद्धि मन हें अंतःकरण । पंचप्राणें पावे चळण । पांच ज्ञानेंद्रियद्वारा निघोन । शब्दादि विषय घेती ॥ ५८ ॥
तेवींच कर्मेंद्रियसहवासें । वचन गमनादि क्रिया होतसे । एवं दशधा व्यापारा नाम आलेंसे । जागृति ऐशी ॥ ५९ ॥
या जागृतीसी नेत्रस्थान । बोलिलें हें एक उपलक्षण । परी सर्वांगीं असे वर्तन । श्रोत्रादि द्वारा ॥ २१६० ॥
श्रवणीं ऐकावें नेत्रें पहावें । जिव्हा रस सेवी घ्राणीं हुंगावें । त्वचीं स्पर्शावें वाणीनें बोलावें । शब्दमातृकांसी ॥ ६१ ॥
पहिला आठव ते परा वाचा । दुजा आभास ते पश्यंती साचा । तिसरा भाव जो मननाचा । ती मध्यमा वाणी ॥ ६२ ॥

---

**मनोमयकोश.** पांच ज्ञानेंद्रिय व मन मिळून सहा तत्वांच्या समुदायास मनोमय कोश म्हणतात.

**विज्ञानमयकोश.**–बुद्धी व पांच ज्ञानेंद्रियें अशा सहा तत्वांचे समुदायास विज्ञानमय कोश म्हणतात.

**आनंदमयकोश.**–स्फूर्ति विद्या अविद्या जीव ईश अशा पांच प्रकारच्या तत्वाच्या समुदायास आनंदमय कोश म्हणतात.

वर सांगितलेल्या पंचकोशांहून म्हणजे बत्तीस तत्वांहून चित्प्रभा वेगळी आहे. बत्तीस तत्वें किंवा पंचकोश रूपात्मक आहेत, म्हणून बत्तीसाहून म्हणजे रूपाहून चित्प्रभा वेगळी आहे.

बत्तीस तत्त्वांचे पंचकोश, त्या पंचकोशांचे तीन देह, त्या तीन देहांचे जे अनेक व्यापार होतात त्याच जीवाच्या जागृदादि तीन विहार करण्याच्या अवस्था आहेत. स्थूल आणि लिंगदेहाचे आधारानें जीवाची विषयानुकार क्रिया होते. त्या पंच व्यापारास जागृति म्हणतात. जडास वास्तविक अवस्था कसची आहे, पण जडदेह सूक्ष्मदेहामुळें बोलतोचालतोसा दिसतो म्हणून स्थूलदेहाची जागृति अवस्था आहे. विचारानें पाहिलें असतां जागृति, स्वप्न, सुषुप्ती ह्या तिन्ही अवस्था बुद्धीला होतात; परंतु स्थूळ वावरतो त्यास जागृति म्हणतात. बुद्धी आणि मन पांच प्राणांच्यायोगानें चलन पावून पांच ज्ञानेंद्रियद्वारानें पंचविषय घेतात. तसेंच कर्मेंद्रियांचे सहवासानें वचनगमनादि क्रिया होतात. याप्रमाणें पंच ज्ञानेंद्रियें व पंच कर्मेंद्रियें या दाहाच्या होणाऱ्या दहा प्रकारचे व्यापारास जागृति म्हणतात. या जागृतीचें नेत्रस्थान आहे असें म्हणतात, हें एक उपलक्षण केलेलें आहे. परंतु हिचें श्रोत्रादिद्वारानें सर्वांगीं वर्तन होतें तें असें– दहा इंद्रियांचे दहा व्यापार होतात त्यांस जागृति म्हणतात. तेव्हां दहा व्यापारांची स्थानें जीं दशइंद्रियें तींच जागृतीचीं स्थानें समजावीं. जागृतीचें स्थूल व्यापारांत नेत्राचा विशेष उपयोग आहे व पंचकोशांस रूपादि म्हटलें आहे, तें रूप ओळखण्यास नेत्राची अवश्यकता आहे म्हणून नेत्रस्थान जागृतीचें आहे असें म्हटलें आहे. रूपादि म्हटलें म्हणजे जसें सहज पंचविषयांचें ग्रहण होतें असेंच नेत्रस्थान म्हटल्यानें दश इंद्रियें स्थानें आहेत असें समजावें.

**परा वाचा**—प्रथमच जो होणारा आठव त्यास परा वाचा म्हणतात.

**पश्यंति वाचा**—प्रथम आठव झाल्यावर पुढें आभास होतो तिला पश्यंति वाचा म्हणतात.

**मध्यमा वाचा**–आभास झाल्यावर पुढें मनन होतें त्यास मध्यमा वाचा म्हणतात.

पुढें वैखरी ते बोलणें । मातृकांचा उच्चार करणें । ऐवं सर्वांगें जागृतीचीं स्थानें । घेणें देणेंही करावें ॥ ६३ ॥
पादाचें गमन उपस्थेंद्रिया । रतिसुख भोगाची घडे क्रिया । गुदीं विसर्ग जो होणें यया । जागृतिस्थान म्हणावें ॥ ६४ ॥
असो सर्वांगें देह वर्ततां । जागृतिअवस्था हे तत्वता । इतुकाही बहिर्व्यापार त्यागितां । तोचे अवस्था स्वप्न ॥ ६५ ॥
नुसधें मन बुद्धि हें अंतःकरण । इंद्रिय प्रत्यक्ष विषयावांचून । अंतरींच वर्ते ध्यास घेऊन । इंद्रिय विषयादिकांचे ॥ ६६ ॥
नेत्र झांकून मनन करी । अथवा अन्यथा पाहे झोंपेमाझारीं । स्वप्नचि बोलिजे दोहीं परी । आंतिचा आंतु क्रीडे ॥ ६७॥
मनन तें कंठगत उद्भवे । यास्तव कंठस्थान स्वप्नासी म्हणावें । एवं स्वप्न अवस्थेसी जाणावें । सूक्ष्मदेहाचें ॥ ६८ ॥
हेचि बुद्धि मन लीन होती । श्रम पाऊन निचेष्टित पडती । उगीच सुखाकार जे स्थिति । ते सुषुप्ति अवस्था ॥ ६९ ॥
गाढ झोंप किंवा उगेपणा । परी ते सुषुप्ति अवस्थेची लक्षणा । देहद्वयाचिया अवसाना । नेणीव स्फूर्ति उरे जे ॥२१७०॥
नेणीव तेचि अविद्या अज्ञान । तोचि डोहो हृदयस्थान । एवं सुषुप्तीचें केलें लक्षण । स्थानासहित ॥ ७१ ॥
यापरी जागृति स्वप्न सुषुप्ति । अवस्था बुद्धीच्या सहजगति । परी बोलाव्या तिहीं देहाप्रती । व्यापारभेदें ॥ ७२ ॥
या तिहीं अवस्थांचे तीन । नेत्र कंठ हृदय स्थान । आतां बोलिजे तिहींलागून । प्रणव त्रिप्रकारें ॥ ७३ ॥
स्थूलदेह जागृति स्थान नेत्र । हा साकार दृश्य समग्र । हेचि मात्रा ह्मणावी अकार । पहिली प्रणवाची ॥ ७४ ॥
सूक्ष्मदेह स्वप्नअवस्था । कंठस्थानीं मनन संस्था । हेचि उकार मात्रा व्यवस्था । दुजी प्रणवाची ॥ ७५ ॥
नेणीव कारण अवस्था सुषुप्ति । हृदयस्थान जें तयेप्रति । हेचि मकार मात्रा निश्चितीं । तिजी प्रणवाची ॥ ७६ ॥
या तिहीं अवस्थांचें आभिमान । एक मीपणा परी असती तीन । तया तिहींचें भिन्न भिन्न लक्षण । बोलिजे ऐकावें ७७॥
स्वस्वरूपाचें अज्ञान । स्वयें न कळे असंग आपण । परी अहंब्रह्मास्मि जें स्फुरण । तेणें देखिलें देहादिकां ॥ ७८ ॥
तेव्हां मी देहचि दृढ धरिलें । तें ते धर्मही आपणासीच कल्पिले । ऐसे अनंत कल्प जरी गेले । तरी क्षीण नोव्हे ॥ ७९ ॥
जो जो जे क्षणीं देह प्राप्त । तो मी म्हणून सदृढ धरित । तो त्यागिला जरी अकस्मात । परी मीपण न त्यागी ॥८०॥
आधीं दुजिया देहातें धरी । मग प्रस्तुत देहाचा त्याग करी । ऐसे अनंत जन्म जातां निर्धारीं । न त्यागी हा मीपणा ८१

---

**वैखरी वाचा**—स्पष्ट शब्द बोलतां येणें तीस वैखरी वाचा म्हणतात.

जागृतीचे बहिर्व्यापाराचा त्याग केला म्हणजे स्वप्नावस्था होते. नेत्र झांकून भासइंद्रियें भासविषयाचा ध्यास घेऊन मनन करितात, अथवा झोंपेंत अन्यथा पहातात. ह्या आंतले आंत दोन प्रकारच्या क्रिडा होतात त्यांस स्वप्नावस्था म्हणतात. स्वप्नावस्थेच्या दोन प्रकारच्या क्रीडा मननात्मक आहेत. तें मनन कंठापासून होतें म्हणून सूक्ष्म देहाची जी स्वप्नावस्था तिचें स्थान कंठ आहे.

**सुषुप्तिअवस्था**—मन आणि बुद्धि श्रम पावून लीन होऊन निचेष्टित पडतात. तेव्हां जी उगीच सुखाकार-स्थिति प्राप्त होते तीस सुषुप्ति अवस्था म्हणतात.

सुषुप्ती अवस्थेचीं दोन लक्षणें आहेत. एक गाढ झोंप, दुसरें उगेपणा. दोन देह नाहींसे झाले म्हणजे नेणीव-स्फूर्ति उरते तीस अविद्या किंवा अज्ञान म्हणतात. अज्ञान तोच डोह, हृदयस्थान आहे. म्हणून कारण देहाचे व सुषुप्ति अवस्थेचें स्थान हृदय आहे. जागृति, स्वप्न, सुषुप्ति ह्या तीन अवस्था बुद्धीच्या आहेत; परंतु त्या व्यापारभेदानें तीन देहांस तीन लावितात.

स्थूल देह, जागृति अवस्था व नेत्रस्थान हा सर्वही साकार दृश्य आहे. हीच प्रणवाची अकारमात्रा स्थूल देहास आहे.

सूक्ष्म देह, स्वप्नावस्था व कंठस्थान ही भासकत्वानें प्रणवाची उकार मात्रा सूक्ष्म देहास आहे.

कारण देह, सुषुप्ति अवस्था व हृदयस्थान ही अज्ञान भ्रांतिरूप प्रणवाची मकारमात्रा कारणदेहास आहे.

तिही अवस्थांचा अभिमान एक मीपणा आहे. त्याचीं तीन निरनिराळीं लक्षणें आहेत, तीं येथें सांगतों. मी स्वतः आपण असंग आहें हें न कळून अज्ञानानें अहंब्रह्मास्मि स्फुरण झालें, त्याचे योगानें देहादिकांस पाहिलें, तेव्हां मी देह अशी दृढ भावना झाली. नंतर त्या देहाचे धर्म ते मलाच आहेत अशी कल्पना केली, ती देहबुद्धि अनंत कल्प गेले तरी क्षीण झाली नाहीं. ज्या ज्या काळीं जो जो प्राप्त झालेला देह त्यास मी म्हणून दृढ धरून बसतो. एक देहाचा त्याग झाला तरी मीपणाचा त्याग करीत नाहीं. तर तो देह सोडण्याचे अगोदरच दुसऱ्या देहाचा मीपणा धारितो आणि मग त्या देहाचा त्याग करितो. याप्रमाणें अनंत देह गेले तरी मीपणा टाळीत नाहीं.

तोचि एका देहीं तीन अवस्थांसी । धरोनि बैसला तिहीं देहांसी । जागृतीमाजीं या साकारासी । सदृढ धरिलें ॥ ८२ ॥
हाचि मी आणि हें हें माझें । हें किंचितही न त्यागी ओझें । हाचि विश्वाभिमानी बुझे । नाम पावला । ८३ ॥
मी पाहतों ऐकतों बोलतों । मी खातों पितों स्पर्शतों । चालतों भोगितों सुखी होतों । मीच जागेपणें ॥ ८४ ॥
ऐसा मीपणा सर्व शरीराचा । प्रत्यक्ष घेऊन बैसला साचा । तैसाचि साभिमान माझेपणाचा । आमरण न सोडी॥८५॥
हें म्यां किती प्रयत्नें मिळविलें । हें वडिलीं संपादिलें । ऐसिया पदार्थमात्र ह्मणे आपुलें । स्त्रीपुत्रादिकां ॥ ८६ ॥
एवं ऐसें जें मी माझेपण । हाचि जागृति विश्वाभिमान । यासीच साधकें त्यागावें विचारून । अत्यागें मोक्ष कैंचा८७॥
हाच स्वप्नींही भास देहासी । मी म्हणून बैसला अपेशी । परी तैजस नाम आलें तयासी । तचे समचीं ॥ ८८ ॥
उगें बैसतांही मनना आंत । म्यां हें केलें करीन अभ्दुत । पूर्वी केलें तें असें भोगित । आतांचें भोगीन पुढें ॥ ८९ ॥
ऐसा ध्यास कर्तेपणाचा । विषयाभावीं मननात्मकाचा । तोचि ध्यास झोंपेंत साचा । घेणें हा तैजस ॥ २१९० ॥
एवं ध्यासकाळीं कीं उगेपणीं । कर्तृत्व कीं भोक्तृत्व ध्यानीं । हे तैजस अभिमानाची करणी । बंधनरूप जीवा ॥९१॥
हें असो विश्व तैजस । साभिमानिया देहद्वयास । परी कारणरूप या उभय यांस । तो प्राज्ञ अभिमानी ॥ ९२ ॥
गाढ झोंपेंत कीं उगेपणा आंत । मी नेणता असे सदोदीत । हाचि प्राज्ञ अभिमानी निश्चित । कारणशरीरीं ॥ ९३ ॥
हें नेणतपण जोंवरी न फिटे । तों कालज्ञानें केवीं आत्मा भेटे । भवसागर हा कैसा आटे । केवीं तुटे बंधन ॥ ९४ ॥
असो ऐसा एकचि अभिमान । अवस्थाभेदें जाहला भिन्न । तयाचें सागितलें लक्षण । आतां भोग तीन अवधारा ९५
प्रत्यक्ष देहासी प्रत्यक्ष विषय । दृश्याकारें भोग्य जरी होय । तरीच भोगिले ऐसा प्रत्यय । हा स्थूल भोग स्थूलासी९६
मनें आठवून भासती । अंतरींच सुखदुःखें उमटती । हा प्रविविक्त भोग तैजसाप्रति । भासरूपें होतसे ॥९७ ॥
विकारजात सर्व निमावें । उगेंचि सहज सुखी असावें । हेंचि वास्तविक रूप जाणावें । आनंदभोगाचें ॥ ९८ ॥
सत्वगुणें जागृति होतसे । कारण कीं सर्व जाणतेपणा असे । स्वप्नीं कांहीं जाणीव कांहीं नेणीव दिसे । म्हणून रजोगुण
हा अवस्थेचा असे प्रकार । परी रजोगुणाचें स्थूल शरीर । तैजस तोचि विष्णु साचार । पालनधर्मी सत्वगुण ॥ २२००

---

असा जो मीपणा तो एका देहांत तीन अवस्थांस व तीन देहांस धरून बसला. जागृतीमध्यें साकारास दृढ धरून हाच मी आणि हें इतर सर्व माझें या मीपणाचा व माझेपणाचा अभिमान सोडीत नाहीं. हाच जागृती अवस्थेचा विश्वाभिमान आहे. हाच मीपणा स्वप्नांत भासदेहास मी म्हणून बसला, म्हणून त्यास तैजस अभिमान म्हणतात. उगीच बसलें असतां मननामध्यें हें मीं केलें, आणखी कांहीं अद्भूत करीन, पूर्वी केलें तें आतां भोगीत आहें, आतां करीन तें पुढें भोगीन, असा कर्तेपणाचा ध्यास, विषय नसतां मननांत व मननांतला झोंपेंत घेणें त्यास तैजस म्हणतात. याप्रमाणें ध्यासकाळीं किंवा उगेपणांत कर्तृत्वाचा किंवा भोक्तृत्वाचा अभिमान घेणें हाच सूक्ष्म देहाच्या स्वप्नावस्थेचा अभिमानी आहे. गाढ झोंपेंत किंवा उगेपणांत मी नेणता असा अभिमान धरितो. हाच कारणशरीराच्या सुषुप्ति अवस्थेचा प्राज्ञाभिमानी आहे. याप्रमाणें एका मीपणाचे विश्व, तैजस आणि प्राज्ञ हे तीन प्रकार सांगितले व ते तीन देहांचे तिन्ही अभिमानी आहेत हेंही सांगितलें. आतां तीन देहांचे तीन भोग सांगतों.

**स्थूल भोग.**—प्रत्यक्ष देहास प्रत्यक्ष विषय दृश्याकारानें जेव्हां भोग्य होते तेव्हांच ते भोगिले असा अनुभव येतो, हाच स्थूल भोग.

**प्रविविक्त भोग.**—मनानें आठविलें असतां भासून त्या विषयांचे योगानें अंतरांतच सुखदुःखें उत्पन्न होतात त्यास प्रविविक्त भोग म्हणतात.

**आनंद भोग.**—सर्व विकारजात नाहींसे होऊन उगीच सहज सुखी असावें यास आनंदभोग म्हणतात.

स्थूलदेहाचा भोग स्थूलभोग, सूक्ष्मदेहाचा किंवा लिंगदेहाचा भोग प्रविविक्त भोग, कारणशरीराचा आनंद भोग आहे. जागृतीमध्यें सर्व जाणतेपणा आहे, म्हणून जागृतीचा सत्वगुण आहे. स्वप्नावस्थेंत कांहीं जाणणें, कांहीं नेणणें असतें, म्हणून स्वप्नावस्थेचा रजोगुण आहे. झोंपेमध्यें सर्वच अजाणतेपणा म्हणजे अज्ञान आहे, म्हणून सुषुप्तीचा तमोगुण आहे. याप्रमाणें अवस्थेच्या आधारानें गुणांची वांटणी सांगितली; परंतु स्थूलशरीर रजोगुणापासून आहे म्हणून स्थूलदेहाचा रजोगुण. सूक्ष्मदेहांत मनबुद्धि हीं जाणतीं तत्त्वें आहेत व मनास विष्णूची उपमा आहे. विष्णु सत्वगुणी जाणता आहे म्हणून सूक्ष्मदेहाचा सत्वगुण. कारणशरीर म्हणजे अज्ञान, अज्ञान हाच तमोगुण, म्हणून कारणशरीराचा तमोगुण आहे.

परी जागृतीसी सत्वगुण । स्वप्न अवस्थेचा रजोगुण । श्रुति बोलिली हें वचन । म्हणोनि बोलिलें ॥ १ ॥
असो मिथ्यासी कोणतेंही बोलतां । विरोध न कल्पावा चित्ता । ज्या समयीं जो प्रसंग अपेक्षितां । मृगजलवत् बोलावें२
सुषुप्ति अवस्था कारणशरीरा । येथें तमोगुणाचि असे सारा । एवं सत्व रज तमाचे उद्गारा । जागर स्वप्न सुषुप्ति ॥ ३ ॥
दृश्य साकार असे जितुकें । ते द्रव्यशक्तीचे पदार्थ तितुके । म्हणून स्थूळासी बोलिलें निकें । द्रव्यशक्ति सर्व ॥ ४ ॥
सत्रा तत्वें क्रिया करिती । म्हणोनि सूक्ष्मासी क्रियाशक्ति । कारणीं गुप्त वासनेसी वस्ती । इच्छाशक्ति यास्तव ॥ ५ ॥
स्थूल व्यापार नव्हे बोलिल्याविण । म्हणून वैखरी जागृतीलागून । स्वप्नीं ध्यासरूप घडे मनन । यास्तव मध्यमा वाचा ।६
सुषुप्तिकाळीं वाचा पश्यंती । तेवींच परेसीही तेथेंचि वस्ती । कारण कीं वेदांत संमती । चवथा देह नाहीं ॥ ७ ॥
चार पांच नव तेरा । देह बोलती मतवादी गिरा । तो वाउगाचि देहलोभ खरा । धरोनी स्थापिती ॥ ८ ॥
विचारें पाहतां अंतःकरणस्फूर्ति । तेचि मायादेवी मूळ प्रकृति । त्याचें अधिष्ठान तो सच्चिन्मूर्ति । ब्रह्म प्रत्यगात्मा ॥९॥
तयासी देह म्हणून कल्पितां । लाज न वाटे तयाच्या चित्ता । परी ते अल्पज्ञ स्वरूप न जाणतां । बोलती तें काय खरें॥
स्थूल सूक्ष्म देह दोन खरे । येथें आढळेचि ना तिसरें । दोन्हींहून न कळणें जें निर्धारें । तें कारणशरीर बोलिजे ११ ॥
याहून महाकारण देह एक । ज्ञानासी बोलती मंद तर्क । तरी तें ज्ञान असे कौतुक । सामान्य कीं विशेष ॥ १२ ॥
विशेष जरी ज्ञान कल्पिलें । तरी तें सूक्ष्मदेहाकडे आलें । अथवा सामान्य म्हणतां तें संचलें । चिद्रूप निर्विकार ॥ १३ ॥
तयासी देह ऐसें म्हणतां । त्याची जीभ कां न झडे तत्वतां । त्या देहाची तूर्या अवस्था असतां । तरी प्रत्यया येती ॥ १४
जैशी जागृति स्वप्न सुषुप्ति । एका नसतां एकीची प्रतीति । तैशी तूर्यावस्था तिहीं परती । कोठें कोणीं देखिली ॥ १५ ॥
जागृती माजीं विवेकसहित । जाणीवदशा असे स्फुरत । तैशीच स्वप्नीं किंवा सुषुप्तींत । लोप नसे तयेचा ॥ १६ ॥
जें तिहींमाजीं सदा असे । तयेसी अवस्था म्हणून बोलणें कैसें । जें तिहीं अवस्थांहून नसे । भिन्न प्रतीति योग्य १७ ॥

---

देहाचे संबंधानें रज सत्व तम असे गुण येतात व त्या देहांच्या ज्या अवस्था त्यांचे संबंधानें सत्व रज तम असे गुण त्या देहास येतात, हा विरोध दिसेल; परंतु दोन्हीही प्रकार घेतले असतां बाध नाहीं. कारण मिथ्या पदार्थाविषयीं कांहीं बोललें असतां हरकत नाहीं. जसा समय येईल तसें त्या त्या वेळीं बोलावें.

जितकें दृश्य साकार आहे तितकें द्रव्यशक्तीचे आहे व स्थूल दृश्य साकार आहे म्हणून स्थूल देहाची द्रव्यशक्ति सूक्ष्मदेहाचीं सत्रा तत्वें क्रिया करितात. म्हणून सूक्ष्मदेहाची क्रियाशक्ति. कारणशरीरांत वासना गुप्त रहाते म्हणून कारणदेहाची इच्छाशक्ति. स्थूलदेहाचे व्यापार स्थूल, हें बोलल्यावांचून होत नाहींत, म्हणून जागृतीची वैखरी वाचा. स्वप्नावस्थेंत ध्यासरूपानें मनन होतें म्हणून स्वप्नावस्थेची मध्यमा वाचा. सुषुप्ति अवस्थेची पश्यंति वाचा आहे व तेथेंच परा वाचाही आहे. कोणी परा वाचा चवथे देहास लावितात; परंतु वेदांतांत चवथा देह नाहीं. सुषुप्ति अवस्थेंत अहंस्फूर्ति आहे व ती भासते म्हणूनच सुषुप्ति अवस्थेच्या परा आणि पश्यंति ह्या वाचा आहेत.

## खरे देह किती त्याचा निर्णय.

कोणी मतवादी चार, पांच, नऊ, तेरा देह आहेत असें देहांचा लोभ धरून वर्णन करितात; परंतु तें उगीच समजावें. वास्तविक खरा विचार केला म्हणजे कळेल कीं, दोन देहांखेरीज तिसरा देहच नाहीं. अंतःकरणस्फूर्ति तीच माया, तीच मूळप्रकृति. तिचें प्रत्यगात्मा ( ब्रह्म ) अधिष्ठान आहे त्यास न जाणून मूर्ख चवथा देह मानितात. परंतु स्थूल आणि सूक्ष्म हेच खरे दोन देह आहेत. दोन देहांखेरीज कांहीं कळत नाहीं म्हणून त्या न कळणें अज्ञानास कारणशरीर अशी कल्पना केलेली आहे. त्याखेरीज ज्ञानास महाकारण देह असें मंदमति म्हणतात; पण ज्या ज्ञानास महाकारण देह मानितात, तें ज्ञान सामान्य आहे किंवा विशेष आहे, तें जर विशेष ज्ञान असेल तर सूक्ष्मदेहाचेंही विशेष ज्ञान आहे. तेव्हां सूक्ष्मदेह मानिल्यानें चवथा देह मानण्याचें कारण नाहीं. आतां तें ज्ञान सामान्य असेल तर तें चिद्रूपब्रह्म होईल; ब्रह्मास देह असें कोण बोलेल? ब्रह्माला तूर्यावस्था असती तर ती इतर तीन अवस्थांप्रमाणें अनुभवास येती. एका अवस्थेचा उदय झाला असतां दोन अवस्थांचा लोप होतो. याप्रमाणें प्राणीमात्रास जागृति, स्वप्न, सुषुप्ति, या तीन अवस्थांखेरीज चवथ्या अवस्थेचा कोणासही अनुभव नाहीं. जागृतीमध्यें विचारासवर्तमान जाणीवदशा स्फुरत असते. तशीच स्वप्न व सुषुप्ति यांतही ती स्फुरत असते. तिचा लोप कोणत्याही अवस्थेंत होत नाहीं. जें तीहींमध्यें नेहमीं असतें त्या ज्ञानास अवस्था असें कसें म्हणावें? ज्या ज्ञानाचा अनुभव तीहींअवस्थांखेरीज येत नाहीं तें ज्ञान ( तूर्यावस्था ) कोणी

समाधिकाळीं जरी कोणी । तूर्या अनुभविली ऐशी मानी । तरी तया पुसावें कर्णीं । सविकल्प कीं निर्विकल्प ॥ १८ ॥
सविकल्प म्हणतां तेचि वृत्ति । सूक्ष्माकडे येत निश्चिती । निर्विकल्प म्हणतां ते निवृत्ति । अंतःकरणाची ॥ १९ ॥
तें अंतःकरण विद्याअविद्यात्मक । तेंचि कारण शरीर आवश्यक । आतां तूर्या म्हणुनियां तर्क । कवणासी करिसी २०॥
तथापि तेचि तूर्या मानिसी । तरी ब्रह्मानुभव कैंचा तुजसी । केव्हां वृत्तीसवें भरंगळसी । केव्हां पडसी शून्यीं ॥ २१ ॥
उगें चाटपणें बडबडितां । तूर्या उन्मनी आलेख उल्लेखता । हें सर्वहि वृत्तिसापेक्षता । तया चिद्रूपज्ञान कैंचें ॥ २२ ॥
असो तया मंदासी काय काज । परी ते धन्य साधक सिद्ध महाराज । जे वृत्तीनें अनुभविती कीं निजीं निज । अंगें ब्रह्म जाहले
त्रिपुटीसहित ब्रह्मानुभव । तयासी सविकल्प हें नांव । तें कर्तृतंत्रलक्षण स्वयमेव । पुढें कळे निरूपणीं ॥ २४ ॥
जो त्रिपुटी त्यागें निजांगें जाहला । तो वस्तुतंत्र सिद्धत्वें संचला । हाही निरूपणें जाय कळला । प्रसंगानुसार ॥ २५ ॥
सूक्ष्म देहाचाचि तळवट । निःशेष अज्ञानाचा भरोनि घोट । जाहला आत्मा ब्रह्म निघोट । निजांगें तोचि धन्य २६॥
येर हे मतवादी सेवकासी । राजा कल्पूनियां निश्चयेंसी । वाउग्या कल्पना करून देहासी । वाढविती आवडी ॥ २७ ॥
प्रत्यगात्मया म्हणती अभिमानी । तूर्या अवस्था ते मूर्ध्नि स्थानीं । निरानंद भोग या महाकारणीं । आणि अर्धमात्रा २८॥
प्रत्यगात्मा मी ब्रह्मस्फूर्ति । ऐशी जी अभिमानात्मक वृत्ति । हे तों सूक्ष्मदेहाची जाति । चिदाभास जीवाची ॥ २९ ॥
तो अभिमान मुख्य आत्मया । होईल कैसा ब्रह्म अद्वया । तस्मात् यथार्थ स्वरूप मतवादिया । कळलचि नाहीं ।३०
अर्धमात्रा कीं निरानंदभोग । स्थान मान कैंचें पूर्ण जें असंग । अद्वय ब्रह्म निर्विकार अभंग । तो विकारी जीव कैसा
तस्मात् साधकें एक करावें । मतवाद्याचे कुतर्क त्यागावे । देहत्रय पचकोश निरसावे । चवथा प्रत्यगात्मा ब्रह्म ३२॥
आणीकही चार चार जितुके । वेद मुक्ति शून्यादि तितुके । हे वादी चहूंवरी कौतुकें । स्थापिती प्रमाणादि ॥ ३३ ॥
ते ते सर्वही विसर्जूनी । देहत्रय पहावें विचारूनी । अवस्था स्थान अभिमानी । त्यागूनी ब्रह्म व्हावें ॥ ३४ ॥
देहत्रय हे मुख्य अनात्मा । चवथा निर्विकार ब्रह्म आत्मा । हें यथार्थ जाणेल तो महात्मा । साधक धन्य धन्य ॥३५॥
येथें कोणी म्हणेल मंदमति । कीं चार देह बोले मांडुक्यश्रुति । तरी ते अवधारा एकाग्र चित्तीं । देहत्रयचि बोले ३६ ॥
चतुर्थ पाद म्हणून सांगत । परी तो देह म्हणून न बोलत । जरी देहच तरी कासया शाश्वत । म्हणती श्रुति ॥ ३७॥
तो अंतःप्रज्ञ ना बाह्यप्रज्ञ । ना नव्हे उभयात्मक प्रज्ञ । अदृश्य अग्राह्य असंज्ञ । अलक्षण आत्मा ॥ ३८ ॥
एक आत्माचि प्रत्यय सार । सर्व प्रपंचाचा उपसंहार । तयासी या तिहींस्तव उच्चार । चौथा ऐसा केला ॥ ३९ ॥
परी तो चौथा नव्हे निश्चयात्मक । जेथें एकपणाचा नसे संपर्क । तोचि शिव शाश्वत साधक । देहत्रयत्यागें जाणती

---

समाधिकाळीं आम्हीं अनुभविली असे म्हणेल, तर त्याला विचारावे कीं, तूं जी तूर्यावस्था अनुभवलीस तीस विकल्प आहे किंवा निर्विकल्प आहे, जर सविकल्प असेल तर ती वृत्ती होईल. म्हणजे सामान्यतः सूक्ष्मदेह होईल. आता ती निर्विकल्प असेल तर अंतःकरणाची निवृत्ति होईल. अंतःकरण हे विद्याअविद्यात्मक आहे त्याला कारण शरीर असें म्हणतात. मग तूर्या असें कोणाला म्हणावें ? तथापि तीच तुम्हीं तूर्यावस्था म्हणाल तर तुम्हाला ब्रह्मानुभव कसा येईल ? तुम्ही केव्हां वृत्तीबरोबर समाधिमध्यें भ्रमत असतां व केव्हां शून्यामध्यें पडतां, असें असून उगीच चावटपणानें बडबड करिता तूर्या उन्मनी आलेख उल्लेख हे सर्वही वृत्तीच्या आपेक्षेनें आहेत. त्या चिद्रूपास ज्ञान कसचें ? त्रिपुटीसहित ब्रह्मानुभव त्याला सविकल्प असें म्हणतात. तें कर्तृत्व लक्षण स्वतः आहे, त्याचें निरूपण पुढें करूं. मतवादी हे सेवकासच राजा असें मानून असावें, त्याप्रमाणें ते आवडीनें जास्त देह मानितात. महाकारणदेह कल्पून त्याचा अभिमानी प्रत्यगात्मा कल्पितात व तूर्याअवस्था कल्पून तिचें मूर्ध्निस्थान कल्पितात. व निरालंबभोग आणि अर्धमात्रा ही मात्रा कल्पितात. प्रत्यगात्मा मी ब्रह्म अशी स्फूर्ति, जी अभिमानात्मक वृत्ति, ही चिदाभास जीवाची म्हणजे सूक्ष्मदेहाचीच एक जात आहे. तो अहंब्रह्म हा अभिमान ब्रह्मात्म्यास कसा होईल ? जर त्यास अभिमान होतो असें मतवादी मानितील तर त्यांस खरें स्वरूपज्ञान झालें नाहीं असें समजावें. अर्धमात्रा निरानंदभोग हें ब्रह्मास कसचें; निर्विकारी जो अद्वय ब्रह्मात्मा तो विकारी जीव कसा होईल ? आत्मा विकारी होत नाहीं म्हणून साधकानें मतवाद्यांचे कुतर्क टाकून तीन देह व पंचकोश निरसून चवथा प्रत्यगात्मा आपण ब्रह्म आहे असें जाणावें.

कोणी म्हणेल कीं, चार देह आहेत असें मांडुक्य श्रुति सांगते. पण ती चार देह सांगत नाहीं तर तीनच देह सांगते. ती चतुर्थ पाद म्हणते. पण चवथा देह आहे असें कांहीं ह्मणत नाहीं. जर चवथा देह असें म्हणती, तर त्यास शाश्वत असें म्हणती कां ? ज्यापेक्षां शाश्वत असेंच चतुर्थपादास म्हणते, त्यापेक्षां तो देह नव्हे. तो अंतःप्रज्ञ नाहीं व बाह्यःप्रज्ञ नाहीं, तसेच उभयप्रज्ञही नाहीं. तर अदृश्य अग्राह्य अलक्षण आत्मा आहे. तीन देह हेच त्रिपाद, त्यांचा निरास झाल्यावर आत्म्याची प्राप्ती म्हणून तीन देहामुळें ह्यास चतुष्पाद असें म्हणते. पण तो चवथाही नाहीं. कारण जेथें एकपणा स्पर्शत नाहीं तेथें चवथा हें कसें विशेषण लागेल ?

तस्मात् रविदत्ता पाहे पुरता । तोचि तूं आत्मा ब्रह्म तत्त्वतां । हे सत्य सत्य प्रतीति त्रिविधता । अन्यथा नव्हे नव्हे ॥
हा देह साकार पंचभूतांचा । जड दुःखरूप आस्थिमांसाचा । तुज निर्विकारा विकार कैंचा । आहे तैसा अससी ॥४२॥
तया देहाचे व्यापारा । जागृति अवस्था बोलिजे गिरा । तुज ब्रह्मात्मया निर्विकारा । अवस्था कैंची ॥ ४३ ॥
तया जागृतीसी नेत्रस्थान । कल्पिलेंसे सर्वांग जागरण । तुज ब्रह्मात्मया स्थान मान । कवण बोले ॥ ४४ ॥
हे अकारमात्राप्रणवाची । तुजआनर्वचनीयासाकारताकैंची । याचाअभिमानघेणेंहीकरणीजीवाची।तूंनिरभिमान साक्षी
सत्वगुण कीं द्रव्यशक्ति । वाचा वैखरी तुज न स्पर्शती । या रूपगुणदोषांहून केवळ चितीं ।तो तूं अससी ब्रह्मात्मा४६।
सत्रा तत्त्वात्मक देह सूक्ष्म । हे क्रीडती देहाचें करूनि धाम । या तिहीं कोशां तूं अधिष्ठान परम । सर्वातीत आत्मा ॥ ४८ ॥
सत्रांची क्रीडा जे जे होणें । तया स्वप्नावस्था अभिधान । तूं तो ब्रह्मात्मा सच्चिद्घन । अवस्थातीत ॥४८॥
स्वप्नावस्थेचें स्थान कंठीं । तुज निर्देश न करी कोणी बोटीं । उकार मात्रा भासकता गोमटी । तूं ब्रह्मात्मा भासातीत ॥
वाउगा देहाध्यास घेउनी । कर्तेपणें जो तैजस अभिमानी । हे तुझिये प्रतिबिंबाची करणी । तूं निराभिमान बिंबात्मा ॥५०॥
आठवून सुखदुःख भोगणें घडे । तें सूक्ष्माचें सूक्ष्मासी सांकडें । तुज आत्मयासी भोक्तृत्व न जोडे । कवणेही काळीं ५१
रजोगुण क्रियाशक्ति मध्यमा । वाणी आदि विकार सूक्ष्मा । तूं निर्विकार ब्रह्म परमात्मा । गुणाविकारातीत ॥ ५२ ॥
नेणपण जें कारणशरीर । उगाचि मानिलासे विकार । तया नेणिवेचा होसी भासकर । तरी तुज नेणीव कोठें ॥ ५३ ॥
बुद्धीसी निर्व्यापारता आली । तये नांवें सुषुप्ति ठेविली । ते अवस्था तुज नाहीं बोलिली । ब्रह्म प्रत्यगात्मया ॥ ५४ ॥
सुप्ति अवस्थेचें स्थान हृदय । तूं स्थानमानातीत अद्वय । मी नेणता म्हणून घेता होय । तो अभिमानी प्राज्ञ ॥ ५५ ॥
आविद्येमाजीं जो बिंबला । तेणें नेणीवपणा बळें घेतला । तो अभिमान तुज नाहीं स्पर्शला । ब्रह्म प्रत्यगात्मया ॥ ५६ ॥
सर्व विकार विश्रांतसि आले । तुजमाजीं सहज सुख पावले । पांथस्थ वृक्षछाये सुखी जाहले । तूं आत्मा वृक्ष अभोक्ता ५७
तमोगुण आणि इच्छाशक्ति । तेवींच विकारी वाणी पश्यंती । तूं आत्मा ब्रह्म चिन्मूर्ति । गुणविकारातीत ॥ ५८ ॥

## आत्म्याशीं देहत्रयांचें असादृश्यदर्शक कोष्टक.

| देह. | आकार. | अवस्था | स्थान. | मात्रा. | अभिमानी. | गुण. | शक्ति. | भोग. | वाचा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| साकार स्थूलदेह पंचभूतात्मक. | जड दुःख रूप अस्थी-मांसाचा. | या देहाची अवस्था जागृति. | जागृतीचें स्थान नेत्र. | प्रणवाची मात्रा अकार. | स्थूलदेहाचा अभिमानी विश्व. | या देहाचा गुण सत्व. | या देहाची द्रव्यशक्ति. | भोग स्थूळ. | या देहाची वाचा वैखरी. |
| आत्मा तूं. | निर्विकार. | अवस्था-तीत. | सर्वांग जागृत. | निराकार. | निरभिमान साक्षी. | निर्गुण. | शक्ति-रहित. | अभोक्ता. | अनिर्वाच्य. |
| सूक्ष्म देह. | जड दुःख-रूप सत्रा-तत्त्वात्मक | या देहाची स्वप्नावस्था | कंठ स्थान. | उकार मात्रा. | तैजस अभिमान. | रजो-गुण. | क्रिया शक्ति. | प्राविविक्त भोग सुख-दुःखमिश्रि | मध्यमा वाचा. |
| आत्मा तूं. | निर्विकारी सूक्ष्माहून सूक्ष्म. | अवस्था-तीत. | अनि-र्देश्य. | भासा-तीत. | निरभिमान. | निर्गुण. | शक्ति-रहित. | अभोक्ता. | अनिर्वाच्य. |
| अज्ञान रूपी कारण शरीर. | अज्ञान. | सुषुप्ति अवस्था. | हृदय स्थान. | मकार मात्रा. | प्राज्ञाभि-मान. | तमोगुण. | इच्छा-शक्ति. | आनंद-भोग. | पश्यंति व परावाचा. |
| कारणाचा कारण तूं आत्मा. | ज्ञानरूप | अवस्था-तीत. | स्थान-मानातीत. | ज्ञान-स्वरूप. | निरभिमान. | गुणातीत. | शक्ति-रहित. | अभोक्ता. | अनिर्देश्य. |

एवं स्फूर्तीपासून देहापर्यंत । जितुका उद्भवला हा संघात । या रूपाहून विलक्षण अत्यंत । तें तूं ब्रह्म असती ॥ ५९ ॥
इतुकीं हीं तत्वें बत्तीस। मिळून देहत्रय पंचकोश । इतुक्यांचे रूपाहूनि जो चिदंश । तें तूं ब्रह्म असती ॥ २२६० ॥
जैसें घटजल जलाकाशासी । भिन्न महदाकाश पूर्णपणेंसी । तेवीं स्थूलसूक्ष्मांसह प्रतिबिंबासी । भिन्न चिद्रूप ब्रह्म तूं ६१
सर्वांचे रूपाहून भिन्न जे चिती । ते लिंपेल केवीं गुणदोषाप्रती । तस्मात् जागृदादि विकार न स्पर्शती । तें तूं ब्रह्म असती
घटादिकांचे व्यापार । गगना न स्पर्शती अणुमात्र । तेवीं न स्पर्शती अभिमानादि विकार । जयासी तें तूं ब्रह्म ॥ ६३ ॥
सद्रूप चिद्रूप आनंदरूप । त्यावरी हें सर्व नामरूप । हा आवघा नव्हेसि तूं आरोप । अधिष्ठान ब्रह्म आत्मा ॥ ६४ ॥
तो तूं ब्रह्म आत्मा आजी । नवा न होसी पहिलाचि सहजीं । कल्पना मात्र भाविली जे दुजी । ते सांडिता तेंचि तूं ६५
तेंचि तूं ऐसेंही बोलतां । विरोध मानिसील तत्त्वतां । कीं हा तूं या शब्दा अपरोक्षता । तें परोक्ष जाहलें ॥ ६६ ॥
तरी याचें ऐकावें उत्तर । जरी तें तूं शब्द अपरपर । हा उपाधीस्तव भासमात्र । परी स्वतंत्र एकरूप ॥ ६७ ॥
जेवीं तूं राजा राजपदीं । होतासि सुखरूप शय्येविशदीं । तोचि तूं स्वप्नीं मेळऊन मांदी । भीक मागसी अंत्यज गृहीं
या कंगालाचे उपाधीकरितां । तो तूं राजा ह्मणावें तत्त्वतां । हा भिकारी नव्हेसि जाहलासी जो आतां। ऐसाचि प्रकार हाही
राजा ह्मणजे सच्चिदानंद ब्रह्म । तेंचि तूं अंगें आत्माराम । हें हें बत्तीस स्वप्नस्थ रूप नाम । नव्हेसि ओळखी भ्रम हा७०
हाचि मी ऐसें जें वाटलें । यास्तव हें तूं नव्हेसि उपदेशिलें । परी हें अपरोक्ष नाहींच जाहलें । तरी तें परोक्ष केवीं ॥७१॥
हें नाहींच तें तूं असती । येथें परोक्षता अपरोक्षता कैशी । तथापि भाविसी जरी मानसीं । तरी हे उपाधि सांडी ॥७२॥
जैसें स्वप्नगत कंगालत्व त्यागिलें । तरी राजाचें राजपद तें संचलें । तैसें सर्व हें मिथ्यात्वें निरसिलें । तरी तूं ब्रह्मब्रह्मीं ऐता
हे उपाधि ईश सर्वज्ञापासून । साकारपर्यंत जितुकें तृण । हे पूर्वींच आह्मीं केली निरसन । धर्मधर्मीसहित ॥ ७४ ॥
येथें विरोध तरी असे केंचा । मुळींच त्याग सर्वज्ञ किंचिज्ज्ञाचा । हा अवघाची भ्रम स्वप्नींचा। जाहला तेव्हांचि नाहीं७५

---

स्फूर्तिपासून देहापर्यंत जितका समुदाय यांहून आत्मा विलक्षण. तोच तूं रविदत्ता ब्रह्म आहेस. सर्व समुदाय मिळून पंचकोश व पंचकोशाचे तीन देह यांचे रूपाहून चित्प्रभा वेगळी आहे. तोच तूं ब्रह्म आहेस. जसें आकाश घट, जळ, जळाकाश यांहून भिन्न आहे. तसें स्थूळ, सूक्ष्म, यांसह जीवेश, यांहून चिद्रूप भिन्न आहे. जें चिद्रूप सर्वांचे रूपाहून भिन्न आहे; तें गुणदोषास लिप्त नाहीं म्हणून ज्यास अवस्था स्पर्शत नाहीं तो तूं ब्रह्म आहेस. जसे घटाचे व्यापार आकाशास स्पर्शत नाहींत. तसे ज्यास अभिमान स्पर्शत नाहीं, तो तूं आहेस. सद्रूप, चिद्रूप, आनंदरूप यांवर नामरूपाची कल्पना आहे; ह्या कल्पनातीत अधिष्ठानरूप तूं आत्मा आहेस. तो तूं ब्रह्म आत्मा आज नवा झाला नाहींस, तर पहिलाच आहेस. परंतु मी आत्मा नाहीं, जीव आहे असा जो दुसरेपणा मानीत होतास, ती कल्पना टाकिलीस म्हणजे तुझा तूंच आत्मा आहेस.

शंका–तसेंच तूं असें म्हटल्यानें तुला विरोध वाटेल कीं, हा तूं या शब्दापासून अपरोक्षता येते व तें म्हटल्यानें परोक्षता होते. तरी हें कसें ?

उत्तर–जरी तूं तें हा शब्द अपरपर आहे, हा उपाधीमुळें भासमात्र, येरव्हीं दोन्ही एकरूप आहेत. जसें तूं राजा राज्यपदीं सुखरूप शय्येवर असतां, तोच तूं स्वप्नामध्यें समुदाय मिळवून अंत्यज घरीं भीक मागत होतास. स्वप्नामध्यें कंगालपणाची उपाधी होती, म्हणून तूं अंत्यज बनला होतास. जो स्वप्नामध्यें अंत्यज बनून भीक मागत होतास, तोच तूं पूर्वीचा राजा आहेस. आतां जो स्वप्नांमध्यें भिकारी मानित होतास, हा तूं नव्हेस. याचप्रमाणें तें तूं ब्रह्म आहेस असें म्हणणें आहे. जसा राजा तसा तूं सच्चिदानंद ब्रह्म तेंच तूं आहेस. हा बत्तीस तत्वांचा समुदाय तूं नव्हेस. हाच समुदाय नामरूपात्मक स्वप्नस्थ भ्रम आहे असें ओळख. हा समुदाय तूं नव्हेस, हाच समुदाय मी आहे असें तुला वाटलें म्हणून हा तूं नाहींस असा आम्हीं तुला उपदेश केला. हें अपरोक्षच झालें नाहीं, तर तें परोक्ष कसें होईल ? हें नाहींस तेंच तूं आहेस. असें सांगण्यांत परोक्षता व अपरोक्षता कसची ? तथापि जर तूं मानिशील तर ही उपाधी टाक. जसें स्वप्नवत कंगालत्व टाकिलें असतां राजाचे राजपद जसेंच्या तसेंच कायम आहे. जसें हें सर्व मिथ्या मानून त्याचा निरास केलास म्हणजे तूं ब्रह्माचे ठायीं ब्रह्मच बनून रहाशील. सर्वज्ञ ईश्वरापासून साकार तृणापर्यंत ही सर्व उपाधी आहे. याचें आम्हीं धर्मधर्मीसहवर्तमान पूर्वींच निरसन केलें. याविषयीं विरोध कसचा आहे. हा स्वप्नांतील भ्रम झाला. तेव्हांच नाहीं असें आहे. म्हणून सर्वज्ञ किंचिज्ज्ञाचा त्याग केला पाहिजे.

जीवेशाचें मात्र ऐक्यकरण । तरी वाच्य विरोधामुळें न होणें । जैसा तो  हा देवदत्त ह्मणणें । येथें विरोध ॥ ७६ ॥
ह्मणोनि जहद्जहल्लक्षणा । केली पाहिजे एकीकरणा । हेंही अल्पसें बोलूं । वचना दृष्टांत द्राष्टांतीं ॥ ७७ ॥
तो ह्मणजे काशीदेश । तेथें उष्णकाळ तरुण विशेष । देखिला होता सदंत शामकेश । त्यासी बहु दिन जाहले ७८
तोचि आतां ययादेशीं । देखिला असे वर्षाऋतूसी । दंतभग्न श्वेतकेशी । वृद्ध हा पाहिला ॥ ७९ ॥
काशी देश आणि हा देश । उष्ण पर्जन्यकाळ कीं शाम श्वेतकेश । तरुण जरा सदंत अदंतास । अति दिसे विरोध
म्हणोनि तो आणि देश एथींचा । पर्जन्य उष्णकाळ मासाचा । तरुण आणि वृद्ध आतांचा । त्यागावा सहसा ८१
शामकेश किंवा सदंत । श्वेतकेश आणि त्यागावे अदंत । मुख्य तोचि हा देवदत्त । पुरुष मात्र घ्यावा ॥ ८२ ॥
तैसा तच्छब्दें तो ईश्वर । त्वं म्हणजे जीव अनेश्वर । अससी म्हणतां सत्य जरी उत्तर । परी विरोध  भासे ॥ ८३ ॥
ईश सर्वज्ञ विद्या हे उपाधि । जीव किंचिज्ञ अविद्या संबंधी । हीं लक्षणें एकमेकां विरोधी । तरी ऐक्य कधीं नव्हे ।॥८४॥
ऐसेंचि तो या सर्व जगाचा कर्ता । हा जन्मून सुखदुःख भोक्ता । नियम्य नियंता ऐशी हे विषमता । तरी समता केवीं८५
तस्मात् किंचिज्ज्ञ आणि सर्वज्ञ । विद्या अविद्या विरोधी दोन । कर्ता भोक्ता नियंत्यादि लक्षण । सांडिजे विरोधास्तव ८६
ईश हा प्रतिबिंब जयाचा । जीवही उभारला तयाचा । तोचि आत्मा ब्रह्म म्हणतां कैंचा । असे विरोध ॥ ८७ ॥
जीवेशाचें वाच्य त्यागुनी । लक्ष्याशीं ऐक्य पूर्णपणीं । येथें परोक्षापरोक्ष म्हणोनी । केली पाहिजे लक्षणा ॥ ८८ ॥
तैसा नव्हे आमुचा पक्ष । वाच्य नाहींच एकरूप लक्ष्य । तो तूं आहेस म्हणतां प्रत्यक्ष । विरोध नाहीं ब्रह्मात्मया ॥ ८९ ॥
हें ईशादि तृणांत पहिलें । मिथ्या म्हणून स्वतां निरसलें । अखंडैकरस सहज उरलें । तें तूं ब्रह्म आत्मा ॥ २२९० ॥
अस्थि भाति प्रियरूप आत्मा । सच्चिदानंद ब्रह्म परमात्मा । ऐथें विरोध कोणता रूप कीं नामा । तरी त्यागावें काई ९१
तें तूं म्हणतां या शब्दासी । विरोध दिसला आहाच बुद्धीसी । परी या त्यागितां सर्व मिथ्यासी । तें तें जाय सहज ॥९२॥
येथें रविदत्ता मागील स्मरावें । पूर्ण दृष्टांता आठवावें । वृक्षीं बैसला तो आणि वाहावे । जो कां प्रवाहीं ॥ ९३ ॥
पडिला तो कधीं नाहींच नाहीं । वृक्षस्थ तो एकचि सर्वदाही । अरे हा तूं नव्हेसि तोचि तूं पाही । वृक्षीं बैसला तो ९४
तैसाचि  तो सर्वांचा अधिष्ठान । हा संघ नव्हेसि तूं आपण । तस्मात् मायादि तृणांत त्यागून । उरसी तो तूं ब्रह्मात्मा ९५

---

म्हणजे मग जीव आणि ईश्वर यांचें ऐक्य होईल. हें ऐक्य वाच्यविरोधामुळें होत नाहीं. जसें तो हा देवदत्त म्हटलें असतां या बोलण्यांत विरोध येतो. म्हणून एकीकरणास जहद्जहल्लक्षणा केली पाहिजे. ती कशी करावी तें सांगतों: काशीमध्यें तरुण अशा देवदत्तास उष्णकाळीं दंतयुक्त व शामकेश असा पाहिल्यास बरेच दिवस झाले. तो काशीदेश त्या देशांतला हा देवदत्त; या देशीं वर्षाऋतूंत दांत पडलेला, पांढरे केश झालेला, वृद्ध झालेला, असा पाहिला. काशी देश आणि हा देश, ऊष्ण व पर्जन्यकाळ, श्वेत किंवा शामकेश, तरुण किंवा वृद्ध, सदंत व अदंत यांत मोठा विरोध दिसतो. म्हणून देशकाल व अन्यस्थिती टाकून तोच हा देवदत्त पुरुष इतकें मात्र घ्यावें. तसें तत् शब्दानें तो ईश्वर, त्वं म्हणजे जीव आहेस असें म्हणणें खरें आहे, तरी विरोध दिसतो. विद्याउपाधिमुळें ईश्वर सर्वज्ञ, अविद्याउपाधीमुळें जीव किंचिज्ज्ञ, हीं एकमेकांचीं लक्षणें एकमेकांस विरोधी जर आहेत तर त्यांचें ऐक्य कधीं होणार नाहीं. ईश्वर जगाचा कर्ता आणि हा जीव जन्मून सुखदुःखाचा भोक्ता. ईश्वर नियंता, जीव नियम्य ही विषमता आहे; तर समता कशी होईल? ती होणें अवघड म्हणून किंचिज्ज्ञ, सर्वज्ञ, माया, अविद्या, विद्या, कर्ता, भोक्ता, नियम्य, नियंता हीं लक्षणें टाक. म्हणजे मग ईश्वराचें जें प्रतिबिंब आहे, तोच जीव, ईश्वर, आत्मा, ब्रह्म आहे. असें म्हटल्यानें कोणता विरोध येतो? जीवेशाचें वाच्य त्यागिल्यानें लक्षाशीं ऐक्य होतें. येथें परोक्षापरोक्ष म्हणून लक्षणा केली पाहिजे; असें नाहीं तर वाच्य नाहींच, एकरूपलक्षणच आहे, म्हणून तो तूं आहेस असें प्रत्यक्ष म्हटलें असतां, आत्मा आणि ब्रह्म यांत विरोध नाहीं. आत्मा अस्तिभातिप्रियरूप आहे. ब्रह्म सच्चिदानंदरूप आहे. यांत रूपाचा किंवा नांवाचा कोणता विरोध आहे? जर विरोध नाहीं तर टाकावें काय? तें तूं म्हटल्यानें बुद्धीला विरोध दिसला, परंतु या सर्व मिथ्याचा त्याग केला म्हणजे तें तें सहज जातें.

वृक्षावर बसलेला आणि नदींत वहावलेला यांत वहावलेला दिसला, हा प्रत्यक्ष नाहीं, भासमात्र आहे. म्हणजे त्याचें खरें अस्तित्व नाहीं, म्हणून तो नाहींच, जो आहे तो वृक्षस्थच एकटा सदोदीत आहे. व त्यासच सांगावयाचे कीं, अरे जो तूं वहावलेला दिसतोस, तो वहावलेला तूं नव्हेस, तर तूं वृक्षस्थच आहेस. त्याचप्रमाणें जो सर्वांचें अधिष्ठान तो तूं हा संघ नाहींस, करितां माया त्यागून जो उरलास तो तूं ब्रह्मात्मा आहेस.

माया अविद्या विद्या ईश । बुद्ध्यादि देहांत सर्व अनेश । याचें मुख्य रूपचि मिथ्या फोस । तरी धर्म सत्य कैसे ॥९६॥
याचि हेतु सर्व रूपांहूनी । आणि सर्व गुणदोषांही पासूनी । चित्कला विलक्षण बोलिलें व्याख्यानीं । तो तूं ब्रह्म आत्मा
हें सत्य सत्य पुनः पुनः सत्य । तोचि तूं ब्रह्म आत्मा आदित्य । हे नव्हेसि बत्तिसही अनित्य । धर्म अथवा धर्मी ९८
हा तत्त्वमसि वाक्याचा उपदेश । काढून दिधला तुज सारांश । आतां हा दृढ करी कीं मी अविनाश । अन्य मीपण त्यागें
येथें संशय जरी असे तुज । तरी पुसावे बापा सहज । तें प्रगट करूं जरी असतां गुज । न बोलावया योग्य ॥२३००॥
ऐसे ऐकतांचि रविदत्तासी । अति आल्हाद जाहला चित्तासी । साष्टांग नमितसे चरणासी । प्रदक्षणा करी ॥ १ ॥
पुढें बद्धांजुळी जोडुनी । विनवीत मंद मंद वाणी । जी जी स्वामी कृपा करोनि । दीना उपदेशिलें ॥ २ ॥
हे स्फुरणापासून बत्तीस । देहत्रयात्मक पंचकोश । याहून आत्मा तूं चिदंश । हें हें भ्रमें दिसे ॥ ३ ॥
हें सत्य सत्य जी सप्रमाण । हें अनात्मजात मी नव्हे संपूर्ण । तोचि आत्मा सच्चिद्घन । निजांगें ब्रह्म ॥ ४ ॥
यांत अन्यथा कधीं न घडे । वाजती श्रुतीचे चौघडे । परी हे सारे दिसती रोकडे । ज्ञानाचे दृष्टीं ॥ ५ ॥
तैसा आत्मा सच्चिद्रूप । अनुभवासी न ये अल्प । तरी निश्चयाचा साक्षेप । कैसा करावा ॥ ६ ॥
तस्मात केवल स्वरूप स्वभावें । केवढें किती ते अनुभवावें । जाणिल्यावरी निजांगें व्हावें । या रीतीं आज्ञा ॥ ७ ॥
परी आधीं जाणिल्यावीण । कवणिया निश्चयें अंगें होणें । तस्मात मज दीनासी करावें पावन । माझें निजरूप नज यावें
ऐशी प्रार्थना सच्छिष्याची । ऐकून वृत्ति तुष्टली गुरूची । प्रतीति बाणवूं पाहे आतांचि । ऐसें बोलून आलींगिलें ॥ ९ ॥
परी आरंभीं आत्मा ब्रह्म । किती उघडा असे परम । हें हें दिसे जें रूप नाम । जाहलेंचि नाहीं तेंचि आहे ॥ २३१० ॥
जैसें अलंकारी सुवर्ण । अंतर्बाह्य परिपूर्ण । नग नाहींच जाहले उत्पन्न । आहे तें सुवर्णाचि ॥ ११ ॥
तैसें नाम रूप वाउगें कल्पिलें । तें काय दिसावया योग्य खरें जाहलें । अधिष्ठान मात्र तें न जाय लोपलें । कवणेही काळीं
तस्मात रविदत्ता आत्मयाचें । जितुकें उघडेंपण साचें । तितुकें नव्हे या पंचकोशाचें । जीवेशासहित ॥ १३ ॥
आणि ब्रह्मात्मयाची जितुकी व्याप्ति । इतुकी जीवेशाची नव्हे वस्ती । तेंचि कैशी ऐकें एकाग्र मतीं । सप्रतीत सांगूं १४
पुढें आपेआप तुझा तुजला । स्वानुभव जाईल बिंबला । परी प्रस्तुत साधन श्रवणाला । चित्त हें करावें ॥ १५ ॥

## रूपरसादीनांविकल्पनेसाएवअनुवर्तते ॥

रूप म्हणजे ईशादि ईशानिर्मित । रसादि विकल्प ते जीवकृत । या इतुकियांचे ठाईं एकचि वर्तत । ते चित्कळा निश्चयें
ईशादि तृणांत या सर्व रूपीं । आणि रसादि जीवकृताचे विकल्पीं । आत्मा ब्रह्मचि सच्चिद्रूपी । व्यापून असे ॥ १७ ॥
ब्रह्मात्मयाचे ठाईं प्रथम । वाउगा स्फुरणासी जाहला उद्गम । जाहला परी तोचि नाथिला भ्रम । कार्यानुमेय कल्पिला

---

माया, अविद्या, जीव, ईश, इत्यादि बुद्धीपासून देहापर्यंत सर्व अनात्मा आहे. त्याचें मुख्य स्वरूप मिथ्याफोस आहे. तेव्हां त्याचे धर्म सत्य कसे होतील? ते सत्य नाहींत म्हणून सर्व रूपाहून आणि सर्व गुणदोषाहून चित्प्रभा विलक्षण आहे; तोच तूं ब्रह्म, आत्मा, सत्य आहेस. हा तत्त्वमसि महावाक्याचा सारांश काढून तुला उपदेश केला. आतां मीपणत्यागानें मी अविनाश आहे असें दृढ करण्यांत जर तुला संशय असेल तर तूं जें मला विचारशील तें मी तुला सांगेन.

शिष्य म्हणतोः ज्ञानदृष्टीनें हें सर्व मिथ्या, आत्मा सत्य असें दिसतें; तसा, सच्चिद्रूप आत्मा थोडाही अनुभवास येत नाहीं, तर त्याचा निश्चय कसा करावा ? निश्चय करण्याकरितां केवळ स्वरूप केवढें, किती तें अनुभवास आणून द्या, मग मी त्यास जाणून अंगें ब्रह्म होईन.

### आत्मा किती उघडा आहे त्याचें वर्णन.

हें जें नामरूप झालेलें दिसतें तें झालेंच नाहीं, तर तें ब्रह्मच आहे. जसें अलंकारांत सोनें अंतर्बाह्य परिपूर्ण भरलेलें आहे; अलंकार झालेच नाहींत, आहे तें सर्व सोनेंच. तसें नामरूप जें मिथ्या कल्पिलेलें तें स्वतः दिसण्यास योग्य नाहीं; कारण त्याच्यानें कधींही अधिष्ठानाचा लोप करवत नाहीं. ज्यापेक्षां अधिष्ठानाचा लोप करवत नाहीं, त्यापेक्षां आत्म्याचें उघडेपण पुष्कळच आहे. तितकें जीवेशासहवर्तमान पंचकोशाचेंही उघडेपण नाहीं. तसेंच ब्रह्मात्म्याची जितकी व्याप्ति आहे तितकी जीवेशाची नाहीं. ईश्वरापासून तृणापर्यंत सर्व रूपांत व रसादि जीवकृतीच्या विकल्पांत, आत्मा व्यापून आहे. ब्रह्मात्म्याचे ठायीं प्रथम वाउगेंच स्फुरण उत्पन्न झालें, जें स्फुरण झालें, तें खोटें व भ्रमरूप आहे. त्याची कार्यावरून कल्पना केली.

ऐसी स्फूर्ति तेचि मूळमाया । न होऊन दिसतसे वायां । जैशी शुक्तिकाची एक असोनियां । भ्रमें रजत भासे ॥१९॥
रजत नाहीं आणि दिसेना । तेवीं मूळ माया न दिसे असेना । शिंप जैसी दिसे आहेपणा । तेवीं ब्रह्म सच्चिद्रूप २३२०
आहे शिंप दिसे शिंप । तेवीं ब्रह्म असे भासे सच्चिद्रूप । रजत नाहीं न दिसे आरोप । तेवीं माया नाहीं न दिसे ॥२१॥
एवं मायेसी निस्तत्त्व अभान। ब्रह्म तें अस्तित्वें भासमान । या उभयांचेंही स्वभावलक्षण । येणरीतीं अकृत्रिम ॥२२॥
तस्मात् ब्रह्म आत्माचि स्फुरणीं आहे । स्फूर्तिरूप माया पाहतां न लाहे । तरी रविदृत्ता उघडें पाहे । विचारें ब्रह्म ॥ २३॥
शिंप जैशी उघड भासे । इतुकें रजतपण कोठें असे । ब्रह्मात्मरूप तें सिद्ध ऐसें । माया नाहीं गा नाहीं ॥ २४ ॥
तया मायेच्या दोन शक्ति। विद्या अविद्या नाम पावती । परी त्या कवणे रीतीं रूपा येती । कारण तेवींच कार्य ॥ २५
जैसें शिंपीचें न कळणें । दुसरें रजताचें उत्पादन । तैसें एक निजरूपाचें विस्मरण । दुजें उभवी जगा ॥ २६ ॥
हेंचि विद्या अविद्येचें लक्षण । यासि कोणतें असे आहेपण । जेवीं काय असे शिंपीविण । तेवीं स्वरूपाविण काय ॥ २७
आहे स्वरूपप्रतीति स्वरूपाची । निस्तत्त्वता विद्या अविद्येची । तेवींच प्रतीतिही नव्हेची । नसती म्हणोनी ॥ २८ ॥
तस्मात् विद्या अविद्या अमुक परी । दावावया नसती निर्धारी । तया अविद्या विद्येमाझारीं । जीवेश बिंबले ॥ २९ ॥
जरी प्रतिबिंब ब्रह्मात्मयाचें । परी नाहींपण विद्या अविद्येचें । तरी जीवेशांसी रूप कैंचें । मृगजल मीनापरी ॥ २३३० ॥
ब्रह्मात्मयाचा आहेपणा । तेणें प्रतिबिंबें दिसती नयना । ब्रह्मात्मा चिद्रूपें देखणा । तो प्रकाश उमटे जीवशिवीं ॥ ३१ ॥
निजात्मयाची सुखरूपता । उमटली जीवेशांसी तत्वतां । येऱ्हवीं या उभयांसी पाहतां । रूपचि नाहीं ॥ ३२ ॥
रूप नाहीं या नांव असत् । रूपेंवीण चेतन कवणा येत । म्हणोनि जें का परप्रकाशयुक्त । तें जडचि खरें ॥ ३३ ॥
ऐशिया निस्तत्व जडाशी । सुखरूपता असे कैशी । सुखदुःखाचिये मिरासी । राहणें जया ॥ ३४ ॥
तस्मात् जीवेश असज्जड दुःखरूप । तया कैंचें सच्चिदानंदरूप । वाउगा भासला प्रतिभासा आरोप । मुख्य स्वरूपाचा ॥३५

---

ती स्फूर्तिरूप मूळ माया न होऊन उगाच दिसत आहे. जशी शिंपच एक असून भ्रमानें रूपें भासतें. रूपें नाहीं आणि दिसत नाहीं. तशी मूळमाया नाहीं व दिसत नाहीं. शिंप आहे व दिसते, तसें चिद्रूप ब्रह्म आहे व तेंच दिसतें. शिंप आहेपणानें दिसते, तसें ब्रह्म सच्चिद्रूप आहे. रुपें नाहीं व तें दिसत नाहीं. दिसतें असें मानितात तो आरोप. तशी माया नाहीं व दिसत नाहीं, आहे मानितात तो ब्रह्मावर आरोप समजावा. याप्रमाणें मायेचें निस्तत्व व अभान, व ब्रह्म अस्तित्वानें भासमान असे दोघांचे स्वभाव सांगितले. स्फुरणांत ब्रह्म आत्माच आहे. स्फूर्तिरूप माया त्यांत नाहीं. म्हणून ब्रह्मच उघडें आहे. शिंप जशी उघड दिसते तितका रुपेपणा कोठें आहे ? तसें ब्रह्मात्मरूप सिद्ध आहे. माया नाहीं.

मायेच्या विद्या अविद्या अशा दोन शक्ति, त्या दिसण्यास योग्य कशा होतील ? कारण त्या जिचें कार्य तें कारणच जर मिथ्या, तर कार्य कसें सत्य होईल ? जसें शिंपीचें न कळणें आणि रुप्याचें उत्पन्न होणें; तसें एक निजरूपाचें विस्मरण, दुसरें जग उत्पन्न करणारें; हींच विद्याअविद्येचीं लक्षणें आहेत या विद्याअविद्येस कोणता आहेपणा आहे. जसें, शिंपीवांचून रुपें नाहीच, शिंपच आहे; असें स्वरूपावांचून माया अविद्या नाहींच, स्वरूपच आहे. स्वरूप आहे व अनुभवही स्वरूपाचाच आहे. माया अविद्येचा अनुभव नाहीं; व त्या नाहींत, म्हणून अनुभव येत नाहीं. याप्रमाणें त्यांची निस्तत्वता सिद्ध झाली. आतां विद्या अविद्या अमक्यासारख्या आहेत असें दाखविण्यास त्या उरतच नाहींत. अशा न उरणाऱ्या विद्याअविद्येंत जीव आणि ईश्वर प्रतिबिंबलेले आहेत.

जसें मृगजलांतील माशांचें मृगजल खोटें म्हणून रूप नाहीं. तसें विद्याअविद्या खोट्या म्हणून त्यामध्यें बिंबणारे जीवशीव ह्यांसही रूप नाहीं. जीवशीव हीं जरी ब्रह्माचीं प्रतिबिंबें आहेत, तरी विद्याअविद्या मिथ्या ह्मणून त्यासही रूप नाहीं. ब्रह्मात्म्याचा आहेपणा आहे ह्मणून प्रतिबिंबें दिसतात. ब्रह्मात्म्याचा चिद्रूपपणा आहे म्हणून जीव आणि ईश्वर प्रकाशक दिसतात. तसेंच जीवात्म्याची सुखरूपता जीव आणि ईश्वर यामध्यें उत्पन्न झाली. एऱ्हवीं त्या दोघांस रूपच नाहीं. त्यांस रूप नाहीं ह्मणून ते असत्. रूपावांचून चेतना कशी व कोणास येईल ? चेतना येत नाहीं म्हणून जीव आणि ईश्वर परप्रकाशक जड आहेत. त्या निस्तत्व जडास सुखरूपता कसची आहे ? तें नेहमीं सुखदुःखांतच रहावयाचें. याप्रमाणें जीव आणि ईश्वर असत्जड, दुःखरूप आहेत. त्यास सच्चिदानंदरूप लक्षण कसचें ?

जेवीं दर्पणीं मुख्य सूर्याचें । प्रातिबिंब पडिलें जेवीं साचें । वाटोळें प्रकाशित परी तें कैंचें । असे सत्य ॥ ३६ ॥
तैसेचि जीवेश हे दोन्ही । निस्तत्वें पाहती मुख्य ज्ञानी । येऱ्हवीं सत्य मानिजे अज्ञानीं । बाळपणीं प्रतिबिंब खरें ॥ ३७ ॥
असो ब्रह्मात्माची एकरूप । जाहलाचि नाहीं जीवेश आरोप । तस्मात् नाहींच तयासी कैंचें रूप । आहे तेंचि आहे ॥ ३८ ॥
एवं विद्या अविद्यात्मक मायास्फूर्ति । आणि जीवेश प्रतिभासें भासती । ऐसे पांच प्रकार एकत्र वसती । तो आनंदमय ॥ ३९ ॥
हाचि कारण समष्टीचा । तोचि पृथक जाहला व्यष्टीचा । यासी ब्रह्मात्मयावीण कैंचा । असे प्रभाव ॥ २३४० ॥
ऐसिया आनंदमयापासूनी । भूतभौतिकांची उभवणी । प्रथम आकाश जाहलें दृश्यपणीं । तें पहावें विचारें ॥ ४१ ॥
गगनींहीआहेपणाब्रह्मींचा । म्हणोनिआकाशआहेबोलिजेवाचा । जेवीं रजतासी आहेपणा शिंपीचा । तेवींसद्रूपा आकाश नांव
शिंपीचा आहेपणा त्यागूनी । रजत घेतां न ये जोखुनी । तैसें ब्रह्म सद्रूपावांचोनी । गगन दृश्य होय कैसें ॥ ४३ ॥
तस्मात् वाउगें गगन नाम ठेविलें । परी तें निस्तत्त्वपणें नाथिलें । आहे तें ब्रह्म सद्रूप संचलें । दिसतांही जरी ॥ ४४ ॥
ऐसें असतां केवढें अज्ञान । खरेंच केलें नसोनि गगन । परी ज्ञाते जाणती नाहींच म्हणून । आहे तें ब्रह्मरूप ॥ ४५ ॥
जैसें मृगजल दिसे उखरीं । तें सत्य मानिती मृगें सारीं । परी जे विवेकी दिसतांही नेत्रीं । सत्य कधीं मानितीना ॥ ४६ ॥
तैसें अज्ञानें जें सत्य भाविलें । तें ज्ञातया नवचे सत्य जाहलें । गगन नाहींच एक निर्धारिलें । सत्य ब्रह्म आत्मरूप ॥ ४७ ॥
ऐसेंचि वायु तेज आप भूमि । निस्तत्त्व पहावे अनुक्रमीं । एक सद्रूप असे रूपनामीं । दुजा भाव असेना ॥ ४८ ॥
येक शीत चांचपावें । सर्व भिन्न भिन्न नलगे पहावें । तैसें आकाश विवेचितां समजावें । चारी भूतें निस्तत्व ॥ ४९ ॥
भूतांपासून जन्मल्या खाणी । त्या पंचप्रकारें दिसती नयनीं । जारज अंडज स्वेदज हे तिन्ही । उद्भिज्ज मानसिक पांचवी
एवं दशधा जड प्रकार । आकाशापरी निस्तत्त्व समग्र । हें नाहींच एक निर्विकार । अस्तिभातिरूपें ॥ ५१ ॥
तया एकेक देहीं भिन्न भिन्न । राहिला वर्ते जागरीं स्वप्न । तया सूक्ष्मदेहाचें लक्षण । सत्रा प्रकारें ॥ ५२ ॥
ते एकचि वृत्ति विभागली । भिन्नभिन्न सत्रा प्रकारें जाहली । ते साकल्यत्वें पूर्वीं निरोपिली । जीवत्वासहित ॥ ५३ ॥
असो चंचळ सत्रा प्रकार । हेही निस्तत्त्व पाहतां विचार । वाउगा भास मात्र दिसे विखार । जैसा रज्जूवरी ॥ ५४ ॥
स्वरूपाचे अस्तित्वें आहे । स्वरूपाचे भानें दिसूं लाहे । स्वरूप निर्धारितां यासी न साहे । आहेपणा किमपि ॥ ५५ ॥
मग सत्राही निस्तत्त्वरूप । भासतीही ना किंचित् अल्प । एक ब्रह्मात्मा सच्चिद्रूप । आदि अंतीं तेवीं मध्यें ॥ ५६ ॥

---

जसें आरशामध्यें मुख्य सूर्याचें प्रतिबिंब पडलें, तें जसें वाटोळें प्रकाशित दिसतें, परंतु खोटें. तसें जीव आणि ईश्वर हे दोन्हीही निस्तत्व, व मिथ्या आहेत. विद्याअविद्या, मायास्फूर्ती आणि जीवईश्वर, या पांचा मिळून होणारा आनंदमय कोश हा समष्टीचा कारण आहे. तोच व्यष्टीचा पृथक् कारण झाला. त्यास ब्रह्मात्म्यावांचून प्रभाव कोठून असेल? आनंदमयापासून भूतें आणि भौतिक उत्पन्न झालीं. त्यांत प्रथम आकाश दृश्यपणानें झालें. त्या आकाशामध्यें ब्रह्माचा आहेपणा आहे ह्मणून आकाश आहे असें बोलतां येतें. जसें रुप्यास शिंपीवांचून आहेपणा नाहीं, तसें सद्रूपावांचून आकाशास अस्तित्व नाहीं. ह्मणून आकाश हें नांव सद्रूपासच आलें. जसें शिंपीचा आहेपणा टाकून रुपें जोखून घेतां येत नाहीं, तसें ब्रह्म सद्रूपावांचून आकाश दृश्य कसें होईल ? ज्यापेक्षां सद्रूपावांचून आकाश दृश्य होऊं शकत नाहीं. त्यापेक्षां आकाश हें नांव उगीच ठेवलेलें आहे. व तें निस्तत्वपणानें खोटेंही आहे ह्मणून आपणास जरी तें दिसलेंसें वाटलें तरी तें सद्रूपच संचलेलें आहे असें समजावें. सद्रूप असून अज्ञानानें आकाश खरें आहे असें भासलें हें केवढें मोठें अज्ञान समजावयाचें. ज्ञाते आकाश नाहीं, सद्रूपच आहे असें जाणतात. उखर जमिनीवर मृगजळ पडतें तें खरें असें मृगें मानितात. परंतु जे विचारी ते दिसत असतांही तें खरें असें कधींही मानीत नाहींत. तसें अज्ञानानें जें खरें मानिलें ते ज्ञाते कधींही खरें असें कबूल करीत नाहींत. जसें आकाश निस्तत्वपणें खरें नाहीं अशींच सर्व पंचभूतें निस्तत्वपणें नामरूपानें उगाच आहेत. त्यांत सद्रूपावांचून दुसरें कांहीं नाहीं.

भूतांपासून पंच खाणी झाल्या. त्या खाणी व पांच भूतें मिळून दहा प्रकारचा जड पदार्थ आकाशाप्रमाणें निस्तत्व आहे.

सूक्ष्म देहाचे सत्रा प्रकार हेही चंचळ आहेत तरी ते पूर्वीं वर्णन केलेल्या लक्षणावरूनच निस्तत्व आहेत. याप्रमाणें बत्तीस तत्वें निस्तत्वरूप आहेत ती अल्प सुद्धां भासत नाहींत. तर त्यांच्या आदीअंतींमध्यें एक सच्चिद्रूप आहे. कोणी बत्तीस

एवं बत्तीस तत्त्वें भिन्नभिन्न । निस्तत्वपणें भासमान । या इतुकियांतही परिपूर्ण । चित्प्रभा वर्ते ॥ ५७ ॥
स्फूर्तीपासून कीटकापर्यंत । बत्तीस तत्वांचा केला संकेत । परी त्रिगुण नाहीं आले आंत । कल्पील कोणी ॥ ५८ ॥
तरी गुण हे धर्मवृत्तीचे । जेवीं विकार कामादिकांचे । तेवीं गुणदोषांत गणन त्यांचें । परी रूपें बत्तीस ॥ ५९ ॥
असो बत्तीसही नामरूपात्मक । सर्वही असज्जड दुःखात्मक । ब्रह्मात्मा परिपूर्ण व्यापक । अनुस्यूत सर्वत्रीं ॥ २३६० ॥
व्यापक म्हणतां भावील कोणी । कीं हे पदार्थही असती सत्यपणीं । या अंतर्बाह्य राहिला व्यापोनी । तरी ऐसें नव्हे ॥६१॥
जैसें सुवर्ण नगा आंत । कीं अंतर्बाह्य मृत्तिका घटांत । घट नग नाहींतचि किंचित् । सुवर्ण मातीच सारी ॥ ६२ ॥
तैसें परब्रह्म पदार्थमात्रीं । पदार्थ नाहींतचि तिळभरी । रजत नाहींच शिंपचि सारी । कीं तरंगीं जीवन ॥ ६३ ॥
ऐशिया दृष्टांता पडिपाडें । ब्रह्मात्म तत्वचि उघडें । अन्य पदार्थ किंचित् न जोडे । परी भ्रमें भासती ॥ ६४ ॥
यासी विवर्तात्मक म्हणावें । न होतां वाउगेंचि कल्पावें । परी कारणचि अंतर्बाह्य आघवें । भ्रमें दिसतांही ॥ ६५ ॥
या भ्रमाचें मात्र निरसन । व्हावें यथार्थाचें ज्ञान होऊन । तेव्हां नामरूपें जाती निपटून । मग उघड आत्मा ब्रह्म ॥६६॥
एवं स्फूर्तीपासून देहापर्यंत । बत्तीस तत्वांचा संघात । नाम रूपें मात्र दिसत । परी एक ब्रह्म आत्मा ॥ ६७ ॥
यापरी बत्तिसांचे रूपीं । अनुस्यूत ब्रह्मात्मा चिद्रूपी । तैसाचि गुणदोषांचेही संकल्पीं । अन्वयरूपें असे ॥ ६८ ॥
जो जया योनींत जन्मला । तितुका देह भोक्तेपणें जाहला । येर खाणीसी कीं भूतांला । भोग्यत्वें कल्पी ॥ ६९ ॥
तेचि रसादि पंचविषय । भोग्य करून भोगिता होय । इकडे एका देहीं जितुका समुदाय । एक होऊन भोक्ता जाहाला ॥७०॥
आनंदमयींच कोश भोक्ता । परी तेथें असे निर्विकल्पता । म्हणोनि सत्रा तत्वें मीनतां । भोक्ता होय सूक्ष्म ॥ ७१ ॥
परी सूक्ष्मासीही स्थूलाविण । व्यापारीं न घडेचि वर्तन । म्हणून स्थूलासहित संपूर्ण । भोक्ता जाला ॥ ७२ ॥
वृत्ति उठोन इंद्रियद्वारा । येत असे विषया सामोरा । तेथें चांगुलें वाईट करी त्वरा । हे कल्पना जीवित्वाची ॥ ७३ ॥
हेचि गुणदोषात्मक जागृति । तैशीच स्वप्नाचीही रीती । कल्पनेचे अभावीं ते सुषुप्ति । परी तेही गुणदोषात्मक ॥७४॥
एवं तिहीं स्थळींची जे क्रीडा । विकल्पीं ब्रह्मात्मा उघडा । व्यापक-परी विकल्पाचा शिंतोडा । न स्पर्शे सहसा ॥ ७५ ॥
ऐसा बत्तीस तत्वांचे रूपीं । अथवा गुणदोषांचे विकल्पीं । आत्मा ब्रह्म सच्चिद्रूपी । अंतर्बाह्य व्यापक ॥ ७६ ॥

---

तत्वांत गुण आले नाहींत तेव्हा, ते स्वतंत्र आहेत असें म्हणतील पण ते स्वतंत्र नाहींत. तर ते गुणदोषांत आल्यामुळें तेही निस्तत्व आहेत असें समजावें. गुण हे धर्म वृत्तीचे आहेत. वृत्ती निस्तत्व झाली तेव्हां तिचे धर्म सहज निस्तत्व झाले. असो. नामरूपात्मक बत्तीस असज्जड दुःखात्मक आहे व त्यांत ब्रह्मात्मा व्यापून आहे.

ब्रह्मात्मा व्यापक आहे असें म्हटल्यानें कोणी मानितील कीं, सर्व पदार्थ सत्यत्वानें आहेत म्हणूनच त्यास ब्रह्मात्मा आंत बाहेर व्यापून आहे. पण असें नाहीं. जसें सोनें दागिन्यांत किंवा माती घटांत अंतर्बाह्य व्यापून आहे, तसे सोन्यांत दागिने नाहींत व मातींत घट नाहीं. तर सर्व सोनेंच किंवा सर्व मातचि आहे. तसें, ब्रह्म सर्व पदार्थांत आहे, पण पदार्थ ब्रह्मांत तिळभर सुद्धां नाहींत. रुपें नाहींच सर्व शिंप आहे, तरंग नाहींच सर्व पाणीच आहे, याप्रमाणें ब्रह्म उघडें आहे त्याखेरीज पदार्थच नाहींत, असें असून जे भासतात ते भ्रमानें. यास विवर्तात्मक म्हणतात. जे भ्रमानें दिसतात ते न होतां उगाच कल्पिलेले आहेत. वास्तविक त्यांत अंतर्बाह्य ब्रह्मच आहे.

भ्रमाचें निरसन होण्याकरितां खरें जें ब्रह्म त्याचें ज्ञान झालें पाहिजे. तें ज्ञान झालें म्हणजे, नामरूपें निःशेष जातील. मग ब्रह्मात्मा उघडच उरेल. याप्रमाणें बत्तीसांचे रूपांत ब्रह्मात्मा आहे, तसाच गुणदोषाचे संकल्पांत अन्वयरूपानें आहे.

जो ज्या योनींत जन्मला, तितका देह भोक्ता झाला, त्याखेरीज खाणी किंवा भूतें यांस भोग्य कल्पितो; तेच रसादि पंचविषय त्यांस भोग्य करून आपण भोक्ता होतो, म्हणजे एका देहांत जितका समुदाय तितका एक समजून भोक्ता होतो; वास्तविक आनंदमयकोश भोक्ता आहे, पण त्याचेठायीं निर्विकल्पता आहे. म्हणून तो भोक्ता नाहीं. तर त्यांत सूक्ष्माचीं सत्रा तत्वें मिळालीं असतां सूक्ष्मदेह भोक्ता होतो. पण ह्या सूक्ष्मदेहासही स्थूलावांचून व्यापार करितां येत नाहीं. म्हणून स्थूलदेहासहवर्तमान सर्वच भोक्ता होतो. वृत्ती निघून इंद्रियद्वारानें विषयासमोर येते तेव्हां चांगलें वाईट हें जीव ओळखतो. हीच गुणदोषात्मक जागृति. तशीच कल्पनारूप स्वप्नावस्था व कल्पना नसतां सुषुप्ती ह्याही अवस्था गुणदोषात्मक आहेत. याप्रमाणें तीन अवस्थांतील म्हणजे तिन्ही कालांतील विकल्परूप व्यापारांत ब्रह्मात्मा न स्पर्शतां उघडेपणानें व्यापक आहे.

इतुकी व्यापकता असे कवणासी । जरी ईशासहित या बत्तिसीं । स्थूल तो असे एकदेशी । जो हा मांसमय ॥ ७७ ॥
ऐसाचि चारी खाणीसह मानसिक । ज्या योनी निर्मिल्या पृथक् पृथक् । त्या कधींच न होती व्यापक । संचरती एकदेशीं
सप्तद्वीपवती पृथ्वी । त्रिलोकात्मक आघवी । परी सीमा सरतां पुढें नसावी । तरी व्यापक नव्हे ॥ ७९ ॥
जीवन कोठें असे कोठें नसे । जरी आवरणही विस्तीर्ण दिसे । परी पुढें मागे पाहतां नसे । म्हणोन व्यापक नव्हे ॥२३८०॥
प्रगटे विझे तो हा अग्न । आवरणरूपी जो भासमान । परी अमुक ऐशी होय गणन । दशगुणें उणावायूसी ॥ ८१ ॥
वायूही उत्पन्न होय तेव्हां असे । वितळून जातां कोठें न दिसे । आवरणासिही सीमा दिसे । म्हणोनि व्यापक नव्हे ॥८२॥
आकाश जरी स्वरूप सम । तरी तें भासलें ब्रह्मासी नाम । परी शब्दगुणी गगनाचा नेम । तें तों व्यापक नव्हे ॥ ८३ ॥
असो देहा आंत जो प्राण । जो पंचधा पावला चळण । तो देहाबाहेरी न करी गमन । तरी व्यापकता कैंची ॥ ८४ ॥
कर्मेंद्रियांची गोलकीं वस्ती । तेथूनिचि क्रिया करिती । तैशींच ज्ञानेंद्रियें विषय घेती । ठाईंच राहूनी ॥ ८५ ॥
मन धांवे ब्रह्मांडा आंत । परी एकदेशीं उसळूनि मरत । अष्ट दिशांसी व्यापीना समस्त । तरी तें व्यापक कैसें ॥ ८६ ॥
मना ऐसाचि बुद्धीचा निश्चय । एकदेशीच होतसे प्रत्यय । तयेसी व्यापकत्व म्हणूं नये । जे नासे क्षणक्षणीं ॥ ८७ ॥
आतां बुद्धिगत जो जीव । येणें स्फुरवावा किंचिद्भाव । परी तेव्हांचि लय होतसे सदैव । नाहीं आणि एकदेशीं ॥ ८८ ॥
विद्या अविद्या माया स्फूर्ती । याची तों एकदेशीं उत्पत्ती । तरी ते सर्वत्रीं कैंची व्याप्ति । म्हणोनि अव्यापक ॥ ८९ ॥
ईश नुसधी करी प्रेरणा । परी बुद्धि ऐलीकडे असेना । मायेपैलीकडे दिसेना । तरी व्यापकता कैंची ॥ २३९० ॥
ईशाऐसाचि कारणरूप जीव । एकदेशीच होतसे उद्भव । तस्मात् बत्तीस जे हें रूप नांव । स्वरूपीं एकदेशी ॥ ९१ ॥
आणि हे असज्जड दुःखात्मक । वाउगेंचि भासलें अनेक । तें कैसें होईल व्यापक । ब्रह्मात्मयासम ॥ ९२ ॥

इतकी व्यापकता ईश्वरापासून सर्व बत्तीसांत कोणामध्येंही नाहीं.

### ब्रह्माशीं बत्तीस तत्वांची व्यापकपणाविषयीं असाम्यता.

स्थूल देह जो मांसमय तो एकदेशी आहे म्हणून तो ब्रह्मासारिखा व्यापक नाहीं. याचप्रमाणें मानसिकासह चार खाणी ज्या निरनिराळ्या योनी उत्पन्न झाल्या आहेत त्या ब्रह्माच्या एकदेशी आहेत. म्हणून त्याही ब्रह्माइतक्या व्यापक नव्हत. सप्तद्वीपवति किंवा त्रिलोकात्मक जी सर्व पृथ्वी तिची सीमा संपली म्हणजे ती पुढें उरत नाहीं म्हणून पृथ्वी ब्रह्माइतकी व्यापक नाहीं.

पाणी कोठें आहे, कोठें नाहीं, असें आहे; आतां आवर्णोदक जें म्हणतात तें जरी विस्तीर्ण आहे, तरी तें पुढेंमागें पाहिलें असतां सर्व ठिकाणीं आहे असें नाहीं; म्हणून पाणी ब्रह्मासारखें व्यापक नाहीं. अग्नि प्रगट होतो व विझतो यामुळें तो व्यापक नाहीं हें सहजच ठरतें. तशांत आवरणरूपी जो भासमान अग्नि तो किती आहे याचें गणीत होतें तें असें: या आवरणरूपी अग्नीहून दसपट वायु आहे, तेव्हां हा अग्नि वायुहून दसपट कमी आहे म्हणूनच अग्नि ब्रह्माइतका व्यापक नाहीं. वायु उत्पन्न झाला म्हणजे असतो, वितुळला म्हणजे नाहींसा होतो, म्हणून तो व्यापक नाहीं. तशांत आवरणरूपी वायु पुष्कळ आहे असें वाटतें, पण त्या आवरणास सीमा आहे म्हणून तें ब्रह्माइतकें व्यापक नाहीं. आकाश स्वरूपासारखें आहे तरी आकाश हें भासलेल्या ब्रह्मास नांव आहे. तेव्हां त्याहून ब्रह्म ज्यास्त व्यापक आहे. तशांत जें शब्दगुणी आकाश आहे, तें तर ब्रह्मासारखें व्यापक नाहींच

देहामध्यें पांच प्रकारानें विभागलेला जो प्राण तो चलन पावतो, पण देहाबाहेर गमन करीत नाहीं म्हणून तो व्यापक नाहीं. कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें गोलकांत राहतात त्यांत क्रिया, कर्मेंद्रियें जागचेजागींच राहून करितात व ज्ञानेंद्रियें जागच्याजागींच राहून विषय घेतात. म्हणून कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें व्यापक नाहींत. मन ब्रह्मांडांत धावतें पण ते धाऊन पुन्हा नाहींसें होतें; त्याची आठ दिशांसही व्याप्ती नाहीं. तें ब्रह्मासारखें व्यापक कसें असेल ? मनासारखा बुद्धीचा निश्चय आहे, त्याचेयोगानें एकदेशीच प्रत्यय येतो, व बुद्धि क्षणक्षणा नाहींशी होते, उत्पन्न होते, म्हणून ती व्यापक नाहीं.

बुद्धीगत जो जीव तो किंचित् भाव स्फुरवितो, पण त्याचा लागलाच लय होतो. याप्रमाणें जीवाचें परप्रकाशकत्व, व तेंही एकदेशी, म्हणून जीव व्यापक नाहीं. विद्याअविद्या माया यांची एकदेशी उत्पत्ति आहे, तेव्हां त्यांची सर्वत्रीं व्याप्ति कशी असेल ? ती व्याप्ति नसल्यामुळें विद्याअविद्या माया ह्या व्यापक नाहींत. ईश्वर नुसती प्रेरणा करितो, पण तो बुद्धीअलीकडे असत नाहीं व मायेपलीकडे दिसत नाहीं, म्हणून तोही अव्यापकच. ईश्वरासारखा कारणरूप जीव त्याचा एकदेशीच उद्भव होतो, म्हणून नामरूपात्मक सर्वही बत्तीस तत्वें स्वरूपाचे एकदेशी आहेत. यांचा स्वभाव असज्जड दुःखात्मक. व हे प्रकार वाउगेंच अनेक भासलेले आहेत. तें ब्रह्मात्म्यासारखें व्यापक कसें होतील ? ब्रह्म आपले

आपुले अस्तिभातिप्रियत्वानें । मायेपासून तृणांत व्यापणें । शेखीं असंभाव्य परिपूर्णपणें । अगणित मायातीत ॥९३॥
तयाची कोण करी मर्यादा । बोलतां मौन पडे वेदा । तेथें एकदेशी वाणीचे संवादा । आकळे कैसा ॥ ९४ ॥
परी बोलल्यावीण कळेना । म्हणोनि यथामति कीजे वल्गना । अगा रविदत्ता सावध मना । ऐसा ब्रह्मात्मा तूं एक ९५॥
हे बत्तीस नाहींतचि तुजवरी । तूंचि एकला एक निर्विकारी । पाहें उघडा आणि असती अंतरीं । जेवीं अळंकारीं हेम॥
सुवर्ण उघडें कीं नग उघडे । ऐसें विचारें पाहें कोडें । या बत्तिसांसी अस्तित्व न जोडे । तूंचि सघन एकरसी ॥ ९७ ॥
आतां तुझी कल्पना ऐशी । कीं प्रत्यक्ष अनुभवावें आपणाशी । तरी तो अनुभव व्हावा कवणासी । तुजसी किंवा बत्तिसां
जरी बत्तिसांतून एकादिया । शक्ति होईल जाणावया । तरी उणीवता येईल वेदराया । आणि अनुभव युक्तीसीही ९९
जेणें सवा स्वप्रकाशें जाणिजे । तो कवणें जडें पाहों लाहिजे । ऐशीं वेदवचनें असती जें जें । तयां बाध आला २४००
ज्ञाते निजांगें ब्रह्म होऊनी । सर्वांतें जाणती सर्वज्ञपणीं । परी जाणों न शकती ध्यातेहीपणीं । ऐशिया अनुभवा बाध
गर्भस्थ मातेतें नेणती । तैसेचि बत्तीसही न जाणती । तस्मात् बत्तीस म्हणतां जाणों लाहती । या युक्तीसीही बाध२
आतां स्वरूपें स्वरूप जरी जाणावें । तरीही बाधचि थोर संभवे । द्रष्ट्याचे प्रतीतीस जें यावें । तें म्हणावें दृश्य ॥ ३॥
दृश्यत्व जरी जाहलें ब्रह्म । तरी केवढा हा विरोध परम । आणि आपआपणासी जाणे सम । ऐशी युक्तिही नसे ॥४॥
डोळा पदार्थ रूप पाहे । जिव्हा रसातें चाखों लाहे । उभयतां भिन्न कर्ता कर्म आहे । म्हणोनि होती ग्राह्य ग्राहक ५॥
परी डोळियानें डोळा पाहिला । कीं जिव्हेचा रस जिव्हेनें चाखिला । ऐसा वृत्तांत कवणें नाहीं ऐकिला । कवणाचे मुखें६
तैसें ब्रह्म ब्रह्माहूनी वेगळें । असतें जरी स्वकीय लीळे । तरी कश्चितही अनुभवाचे डोळे । जाणावया शकती ॥ ७ ॥
ऐसें द्वैत तों ब्रह्मीं नाहीं । तरी अनुभवावें कवणें कहीं । तस्मात् अंगेंचि व्हावें न जाणतांही । सर्वनिरासें साधकें ॥८॥

---

अस्तिभातिप्रियत्वानें मायेपासून तृणापर्यंत सर्वांस व्यापून खेरीज अगणीत उरलेलें आहे. त्या ब्रह्माची मर्यादा कोण दाखवूं शकेल ? वेद वर्णन करूं लागला तर तो स्तब्ध रहातो, त्याच्यानें वर्णन करवत नाहीं, मग एकदेशी जी वाणी, तिचे वर्णनांत तें ब्रह्म आकळलें कसें जाईल ? जरी ब्रह्म आकळलें जात नाहीं तरी त्याचें वर्णन यथामति केलेंच पाहिजे म्हणजे तेणेंकरून तें कशाही प्रकारें कळूं लागेल. रविदत्ता, एवढा वेळ ज्या ब्रह्मात्म्याचें आपण वर्णन केलें तो ब्रह्मात्मा तूंच आहेस. हा बत्तीस तत्वांचा समुदाय तुझ्यावर भासला सुद्धां नाहीं; तर तूंच एक निर्विकारी उघडा आहेस. सोनें उघडे किंवा अलंकार उघडे याचा विचार केला म्हणजे सुवर्णच उघडें आहे असें कळेल. कारण अलंकारांस त्यावांचून अस्तित्वच नाहीं म्हणून अलंकार नाहींतच तर सर्व सुवर्णच आहे; तसें बत्तीस नाहींतच सर्व तूंच एक भरलेला आहेस.

रविदत्ता, पूर्वी तूं प्रश्न केला होतास कीं, आपणाला प्रत्यक्ष अनुभविलें पाहिजे तरी हा अनुभव कोणाला व्हावा, तुला किंवा बत्तीसांस; बत्तीसांतून एखाद्यास ब्रह्म जाणण्याची शक्ति होईल तर श्रुति, युक्ति व अनुभव यांस उणेपणा येईल. वेदश्रुति अशी आहे कीं, जें आपल्या प्रकाशानें सर्वांस जाणतें त्या ब्रह्मास, हीं जडें कशीं जाणूं शकतील, या वेदश्रुतीस बाध येईल. तसेंच ज्ञाते स्वतः ब्रह्म होऊन सर्वज्ञपणानें सर्वांस जाणतात, पण ध्यातेपणानें जाणूं शकत नाहींत. या अनुभवासही बाध येईल. तसेंच गर्भस्थ जसें आईला जाणत नाहीं त्याप्रमाणें ज्यापासून बत्तीस तत्वें झालीं तीं त्या ब्रह्मास कशीं जाणूं शकतील, ह्या युक्तीसही बाध येईल. करितां बत्तीसांतून ब्रह्मास एकही जाणूं शकत नाहीं म्हणून आपला अनुभव बत्तीसांस नाहीं.

आतां स्वरूपानें स्वरूपास जाणावें असें जर म्हणशील, तर तेथें फारच बाध येतात, ते असे: पाहणाराचे म्हणजे द्रष्ट्याचे अनुभवास जें येतें त्यास दृश्य असें म्हणतात. तेव्हां ब्रह्म अनुभवास आलें म्हणजे तें सहजच दृश्य झालें. हा श्रुतीस मोठा विरोध आला, तसेंच आपलें आपणास जाणणें घडत नाहीं, हा युक्तीस विरोध आला. डोळा पदार्थादि रूप पहातो. जीभ रस चाखते. येथें कर्ता कर्म भिन्न आहे म्हणूनच ग्राह्य ग्राहक उभयता होतात. पण डोळ्यानें डोळा पाहिला किंवा जिभेनें जिभेस चाखिलें हें कधीं कोणीही ऐकिलें नाहीं. तसें ब्रह्म ब्रह्मास कसें जाणूं शकेल ? आतां ब्रह्माहून दुसरें निराळें एक ब्रह्म असेल तर कदाचित ब्रह्म ब्रह्मास जाणूं शकतें, पण ब्रह्माहून दुसरें ब्रह्म किंवा कांहींच नाहीं, तेव्हां कोणाचा कोणी अनुभव घ्यावा. हा अनुभव घेणें अनुचित आहे. करितां जाणल्यावांचून आपण सर्व निरासानें ब्रह्म व्हावें.

डोळिया डोळा पाहणें न घडे । ब्रह्मासी ब्रह्माचा अनुभव न जोडे । जेथें द्वैताचें भानचि मोडे । तेथें जाणणें कैंचें ॥९॥
जरी डोळा डोळिया देखेना । तरी डोळा डोळियासी चुकेना । कीं जिव्हा जिव्हेसी चाखेना । वरी अरसज्ञ नव्हे ॥२४१०
तैसें ब्रह्म ब्रह्मासी जाणों न शके । तरी काय ब्रह्मत्वा ब्रह्म मुके । न जाणतांही स्वतःसिद्ध निकें । ब्रह्म ब्रह्मीं निघोट
येथेंही कल्पना ऐशी करिसी । कीं ब्रह्मीं ब्रह्म असे अविनाशी । परी कवणे रीतीं ये प्रतीतीसी । निश्चय राखावया १२
तरी पाहें डोळा डोळिया न देखे । परी सर्व पदार्थी तो ओळखे । जिव्हा आपण जरी न चाखे । परी सर्व रसां सेवी १३
तैसें न जाणे जरी ब्रह्म ब्रह्मासी । परी जाणे स्वप्रकाशें सर्वांसी । हेंचि कीं प्रतीति सहजत्वेंसी । देखणा बत्तिसांचा १४
डोळा जो पदार्थातें पाहे । तो कां म्हणावा लोपला राहे । ब्रह्मात्मा देखणा स्वतःसिद्ध आहे । लोपेना सहसा ॥ १५ ॥
डोळा अंधारीं अपेक्षी प्रकाश । ब्रह्म लयकाळींही स्वयंप्रकाश । म्हणोनि लोपेना सहसा अविनाश । हे उघड प्रतीति
पदार्थ जरी नाहींसे जाहले । तरी नेत्रें दीपासी देखिलें । तैसें स्फूर्तीतें स्वतां अनुभविलें । जागृती अभावीं सुप्ति ॥१७॥
अथवा दीप जरी निमाला । तरी डोळा पाहे अंधाराला । मायास्फूर्तीचाही अंत जाहला । परी लय ओळखी स्वयें १८
अंधाराची प्रतीति देखिली । तेचि डोळियाची ओळखी जाहली । स्फूर्तीचीही शून्यदशा पाहिली । स्वप्रकाशें स्वतां ॥ १९
ऐशी उघड प्रतीति स्वयें । जयेचा लोप कालत्रयीं न होय । ऐशी विचारें कळेना सोय । जया मंदासी ॥ २४२० ॥
तो ब्रह्मज्ञाना नव्हे अधिकारी । तरी तो जाणावा पाषाणापरी । तया गुरु आणि शास्त्रें सारीं । काय करिती ॥ २१ ॥
तेणें कर्म अथवा उपासनेसी । आदरावें चित्तशुद्धि स्थैर्यतेसी । तो पात्र नव्हेचि अपरोक्ष ज्ञानासी । पुढें अधिकार येईल
येथें विचारवंतचि पाहिजे । तेणेंचि निजांगें ब्रह्मत्व लाहिजे । न जाणोनि जाणणें आकळिजे । अनुभवेंवीण अनुभाव्य
ऐशिया हेतु श्रुतिमाउली । यथार्थचि या रीतीं बोलिली । कीं अविज्ञात ती विज्ञात जाहली । विज्ञात ते अविज्ञात २४
असो विचारवंतचि येथें असावा । येर मंदाचा संबंध न पडावा । जे अनुभवेंवीण पावले स्वानुभवा । तेचि धन्य धन्य
ऐशिया उत्तम अधिकारिया । श्रुति बोले बाह्या उभारूनियां । महावाक्य म्हणिजेत जया । अथर्वण वेदींचें ॥ २६ ॥
हा आत्मा ब्रह्म अपरोक्ष । परप्रकाशें नव्हे परोक्ष । हा जाणावा साधकें प्रत्यक्ष । स्वप्रकाशत्वें ॥ २७ ॥

---

जसें डोळ्यास डोळा पहातां येत नाहीं, तसा ब्रह्माचा अनुभव ब्रह्मास घेतां येत नाहीं. कारण जेथें द्वैतच नाहीं तेथें जाणणें कसें घडेल? डोळा जरी डोळ्यास पहात नाहीं, तरी डोळ्याचा डोळेपणा जात नाहीं. किंवा डोळा नाहीं असें डोळ्यास वाटत नाहीं. जीभ जरी जिभेची रुची घेत नाहीं तरी ती अरसज्ञ नाहीं. तसें ब्रह्म ब्रह्मास जरी जाणत नाहीं तरी तें ब्रह्मपणास मुकत नाहीं. तर ब्रह्म ब्रह्माच्चेच ठायीं आहे. आतां कदाचित तूं कल्पना करिशील कीं, ब्रह्म ब्रह्माचे ठायीं आहे पण निश्चय राखण्यासारखा त्याचा अनुभव कसा येतो ? तरी त्याचा अनुभव सांगतों एक. डोळा डोळ्यास पहात नाहीं तरी तो सर्व पदार्थांस पहातो, तसेंच जीभ जिभेस चावीत नाहीं तरी ती सर्व रस चाखते. त्याप्रमाणें ब्रह्म ब्रह्मास जरी जाणत नाहीं तरी आपल्या प्रकाशानें सर्वांस जाणतें. जें बत्तीसास जाणतें, तीच त्या ब्रह्माची प्रतिती आहे असें समजावें. पदार्थांस पहाणारा डोळा तो नाहीं असें कसें म्हणावें ? तसा ब्रह्मात्मा स्वतःसिद्ध देखणा आहे तो कसा लोपेल? डोळयास अंधारामध्यें प्रकाशाची गरज आहे तशी ब्रह्मास नाहीं. तें लय काळींही स्वयंप्रकाश आहे. तेव्हां तें लोपलें असें कसें म्हणावें ? पदार्थ नसेल तर दिव्यास डोळा पहातो. जसें जागृतींतील सर्व पदार्थ नसतां सुषुप्तींत आत्मा स्वतः स्फूर्तीचा अनुभव घेतो. डोळा पदार्थ किंवा दिवा हें कांहींच नसलें तर अंधारास पहातो. तसा आत्मा जागृतींतील पदार्थ किंवा नुसती स्फूर्ति ही नसतां त्या स्फूर्तीचा लय जाणतो. जो अंधारास पहातो तोच डोळा. तसें स्फूर्तीचा लय पहातो तोच स्वयंप्रकाश आत्मा.

याप्राणें ज्याची उघड प्रतिति आहे त्याचा अनुभव ज्या मंदमतीस येत नाहीं, तो ब्रह्मज्ञानाचा अधिकारी नाहीं. तर केवळ दगड आहे. त्यास गुरु आणि शास्त्रें काय करितील ? त्या मतिमंदानें चित्तशुद्धी होऊन स्थिरता प्राप्त व्हावी याकरितां कर्म अथवा उपासना करावी. तेणेंकरून त्यास पुढें अपरोक्ष ज्ञानाचा अधिकार येईल. अपरोक्ष ज्ञान जाणण्यास विचारवंतच पाहिजे. जो विचारवंत असेल तोच स्वतः न जाणून जाणेल व अनुभवावांचून जो अनुभाव्य तो ब्रह्मात्मा आपण स्वतः होईल. हे जाणून श्रुति बोलली कीं, अविज्ञात ती विज्ञात झाली; आणि विज्ञात ती अविज्ञात. असो. या परमार्थांत मतिमंद उपयोगाचा नाहीं, तर विचारवंतच पाहिजे. जे विचारवंत अनुभवावांचून स्वानुभवास पावले तेच धन्य होत. उत्तम अधिकाऱ्यास अथरवण वेदाचें महावाक्य सांगतें कीं, हा अपरोक्ष ब्रह्मात्मा परप्रकाशानें परोक्ष होत नाहीं. ह्यास साधकानें आपल्या प्रकाशानें प्रत्यक्ष जाणावा.

आतां स्वप्रकाश परप्रकाश । हा श्रुत्यर्थाचा सारांश । तात्पर्य कैसें तें सरहस्य । बोलोनि दाऊं ॥ २८ ॥
इंद्रियगोचर जे विषय । तया अपरोक्ष म्हणे न्याय । जें जें इंद्रियगोचर न होय । तें तें परोक्ष ॥ २९ ॥
तरी मोक्षमार्गी साधकासी । ऐशी अपरोक्षता न ये उपेगासी । तस्मात् श्रुतीची स्वप्रतीति जैशी । प्रगट करूं ॥३०॥
इंद्रियें पाहतीं जे जे विषय । ते ते इंद्रियांहून भिन्न प्रमेय । जडरूप तें आपण न होय । वेगळें तें परोक्ष ॥ ३१ ॥
जें जें भिन्न आपणाहूनी । तें तें परोक्ष आपणाहून मानी । आपण तोचि कीं न पाहे कोणी । स्वतां पाहे सर्वां॥३२॥
विषयाहून इंद्रियांकडे । या अर्थे अपरोक्षता घडे । परी यांतही विचारें निवडे । ऐसें करावें ॥ ३३ ॥
पंचज्ञानेंद्रियां एक वृत्ति । मनबुद्धिचि अपेक्षिजेती । त्या वृत्तीमाजीं जीवाची स्फूर्ति । अमुक स्फुरवावया ॥ ३४ ॥
तो जीव तरी प्रतिबिंबरूपें । तोही असे जयाच्या पडपें । जयामाजीं जीव उद्भवे लोपे । तो सामान्य आत्मा ॥ ३५ ॥
एवं इंद्रियवृत्ति तिजा जीव । आणि सामान्य आत्मा स्वयमेव । यांत कोण असे सर्वदैव । तोचि अपरोक्ष ॥ ३६ ॥
मनोराज्य जेव्हां अंतरीं । होत असतां इंद्रियें सारीं । वृत्तीमाजी मीनती परी । प्रत्यक्ष अभाव ॥ ३७ ॥
अभाव इंद्रियांचा जाहला । परी आपण कोणी असे उरला । तोचि अपरोक्ष येरां इंद्रियांला । परोक्षता आली ॥ ३८
आतां वृत्ति जीवासहित । स्वप्रकाशें अपरोक्ष वाटत । येर इंद्रियें तों परप्रकाश समस्त । जडरूप परोक्ष ॥ ३९ ॥
वृत्ति जीवासहित जो आपण । वाटे अपरोक्ष स्वप्रकाशमान । यांतही पहावें विचारून । ज्ञानदृष्टीं साधकें ॥ २४४० ॥
एका वृत्तीचे प्रकार दोन । एक संकल्प एक उगपेण । संकल्परूप तेचि बुद्धि मन । उगेपण ते वृत्ति ॥ ४१ ॥
संकल्पामाजीं जीव विशेषें । स्फुरवी तो कार्यरूपी असे । उगेपणीं कारणरूपीं वसे । तो अस्पष्ट जीव ॥ ४२ ॥
असो उगेपण जेव्हां प्रगटलें । तेव्हां संकल्पविशेषत्व निमालें । तयाचें नाहींपण अनुभविलें । जया उगेपणें ॥ ४३ ॥
तस्मात् उगेपण स्वप्रकाश अपरोक्ष । संकल्प परप्रकाश जाहला परोक्ष । जीव मन बुद्धि जड हे प्रत्यक्ष । स्वानुभवाआलें
आतां नुसधी वृत्ति उगेपण । कारणरूपी जीवपण । यासहित वाटे प्रकाशमान । आत्मा अपरोक्ष ॥ ४५ ॥

---

आतां स्वप्रकाश आणि परप्रकाश हा श्रुतीचा अर्थ आहे. त्याचें तात्पर्य काय आहे तें सांगतो: इंद्रियगोचर जे विषय त्यास न्याय अपरोक्ष म्हणतें व जे इंद्रियगोचर होत नाहींत त्यास परोक्ष म्हणतें; ही परोक्षापरोक्षता परमार्थांत उपयोगी नाहीं. तर श्रुति जी परमार्थांत उपयोगी परोक्षापरोक्षता सांगते तीच येथें सांगतों.

**परोक्ष**–इंद्रियें जे जे विषय पहातात ते ते इंद्रियांहून निराळे आहेत ते विषय जड. आपण त्या जडाहून पाहणारा निराळा आहे तोच अपरोक्ष व विषय परोक्ष.

आपणाहून जें निराळें तें आपणाहून परोक्ष. ज्यास कोणी पहात नाहीं व जें सर्वांस पहातें तोच आपण. विषय जड आहेत त्यास जाणणारीं इंद्रियें हीं त्यांहून भिन्न, म्हणून तीं अपरोक्ष ठरलीं, तर याचा विचार केला पाहिजे. पंचज्ञानेंद्रियरूप एक वृत्ति तिला प्रकाशण्यास मनाची व बुद्धीची अपेक्षा आहे, तेव्हां इंद्रियाहून मन आणि बुद्धि अपरोक्ष ठरतील. मन आणि बुद्धि यांस प्रकाशण्यास जीवाची अपेक्षा आहे, म्हणून मनबुद्धीहून जीव अपरोक्ष ठरला. जीव त्याचें प्रतिबिंब आहे. तो सामान्य आत्मा जीवाहून अपरोक्ष आहे. याप्रमाणें, १ इंद्रिय, २ वृत्ति, ३ जीव, ४ सामान्य आत्मा यांत खरा प्रकाशक जो तोच अपरोक्ष.

अंतरामध्यें जेव्हां मनोराज्य होत असतें, तेव्हां सर्व इंद्रियें वृत्तीमध्यें मिळतात. परंतु त्यांचा प्रत्यक्ष अभाव. याप्रमाणें इंद्रियांचा प्रत्यक्ष अभाव जरी झाला तरी आपण कोणी एक उरलेला असतो, तोच अपरोक्ष. व त्याखेरीज जीं इंद्रियें तीं परोक्ष झालीं. पुढें वृत्ती जीवासह स्वप्रकाशानें अपरोक्ष वाटते, व त्याखेरीज सर्व इंद्रियें परप्रकाशक जड म्हणून तीं परोक्ष. आतां वृत्ति, जीव यांसह जो अपरोक्ष वाटणारा आपण तो स्वप्रकाशमान वाटतो, पण याचाही विचार केला पाहिजे तो असा: एका वृत्तीचे दोन प्रकार आहेत, एक संकल्प दुसरा उगेपणा. संकल्परूप तीच मनबुद्धि व उगेपणा तीच वृत्ति होय. संकल्पांत विशेषत्वानें स्फुरविणारा तो कार्यरूपी जीव आहे व उगेपणांत कारणरूपी जीव आहे तो अस्पष्ट आहे. उगेपणा जेव्हां प्रगट होतो, तेव्हां संकल्प आणि विशेषत्व नाहींसें होतें. तें उगेपणासह कारणरूपी जीव जाणतो, म्हणून उगेपणासह कारणरूपी जीव स्वप्रकाशक अपरोक्ष व संकल्पासह कार्यरूपी जीव परप्रकाशक परोक्ष होय. याप्रमाणें विशेष स्फुरविणारा जीव, मन व बुद्धि हीं जड ठरलीं. आतां नुसती वृत्ति जो उगेपणा व कारणरूपी जीव हीं प्रकाशमान आहेत, म्हणून तीं अपरोक्ष.

येथेंही साधकें समाधिकाळीं। बैसोनि पहावें स्फूर्तितळीं । आधीं चिरकाल उगेपणा न्याहाळी । तोचि साधी हें कृत्य ४६
स्फूर्ति सहज उठे मुरे । उठतां उगीच अवकाशीं पसरे । निमतां नाहींच होय निर्धारें । पुन्हां तत्क्षणीं उठे ॥ ४७ ॥
वृत्ति उठतांचि जीवत्व उमटे । वृत्ति अभावीं नासे गोमटें । जेवीं सहज पाणी उकाळे आटे । तैसेंचि प्रतिबिंब ॥ ४८॥
स्फूर्तीचा उद्भव पहातसे । तैसाचि लयही अनुभवीतसे । परी उद्भवकालीं आहेसा दिसे । नसे वाटे लयीं ॥ ४९ ॥
नाहींपण वाटलें जयासी । तो आहेचि कीं लयसाक्षी अविनाशी । वृत्ति आणि जीवाचे रूपासी । अभाव जाहला ५०
अभावाचा जो अनुभवी । तोचि शून्यसाक्षी गोसावी । स्वयंप्रकाशें देखणा रवि । अपरोक्ष आत्मा ॥ ५१ ॥
येर हे स्फूर्तीपासून इंद्रियांत । वृत्ति जीव आदि समस्त । परप्रकाश आणि मिथ्याभून । ते अपरोक्ष कैसेनी ॥ ५२ ॥
आपणा सन्मुख हें आघवें । स्वप्रकाशें अवलोकावें । तरी तेंचि आपण केवीं व्हावें । म्हणोनि परोक्ष ॥ ५३ ॥
जो सर्वांसी न दिसे । आणि सर्वांमाजीं असे । तोचि अपरोक्ष स्वप्रकाशें । त्रिकालाबाधित ॥ ५४ ॥
जो अन्यासी अपेक्षीना । कीं अमुकास्तव जाहला देखणा । तस्मात् स्वप्रकाशक पूर्णपणा । हा ब्रह्मात्मा एक ॥ ५५
इंद्रियांसी मन बुद्धि पाहिजे । बुद्धीनें जीवाची अपेक्षा कीजे । जीवेंही वृत्तिसापेक्षें आसिजे । म्हणोनि परप्रकाश ५६
सर्वेंही आत्मसत्तें असती । आत्मप्रकाशें वर्तती । आत्माप्रियत्वें वांचती । यासी पृथक सत्व कैंचें ॥ ५७ ॥
तस्मात् परप्रकाशक जडे । यांसी अपरोक्षता न घडे । याचा लय उद्भव पाहतसे पुढें । तो स्वप्रकाश अपरोक्ष ॥५८॥
ऐसियासी हा आत्मा म्हणोनी । श्रुति बोलिली निर्धारवचनीं । सर्वांचा लय कीं असो उभवणी । कीं भलती अवस्था॥
हा शब्दाचे आदि अंतीं । मध्यें वृत्ति किंवा जीवाची स्फूर्ति । अवलोकितसे स्वयंज्योति । हा आत्मा ब्रह्म ॥२४६०॥

---

परंतु याचाही विचार करावा आणि समाधि काळीं बसून स्फूर्तीचा तळ पहावा. उगेपणा चिरकाळ पाहील तोच हें कृत्य साधील. स्फूर्ति सहज उठते व नाहींशी होते. ती जेव्हां उठते तेव्हां अवकाशांत पसरते. निमाली म्हणजे अगदीं नाहींशीच होते व पुढें उत्पन्नही होते. वृत्ती उत्पन्न झाली म्हणजे तीमध्यें जीवत्व उत्पन्न होतें. व तें वृत्ती मावळली म्हणजे नाहींसें होतें. जसें पाणी सहज उकाळतें व आटतें, त्याबरोबर त्यांतील प्रतिबिंबही उत्पन्न होतें व आटतें. स्फूर्तीचा उद्भव जो पहातो तोच तिचा लय पहातो, तो पहाणारा उद्भवकाळीं आहेसा दिसतो; तसा लयकाळीं तो न दिसतां उलटा तो नाहींच असें वाटतें. ज्याला नाहीं असें वाटलें, तोच लयसाक्षि आहे. याप्रमाणें लयसाक्षीचे वेळीं वृत्ती आणि जीव यांचे रूपाचा अभाव झाला. याप्रमाणें अभावाचा जो पहाणारा तोच शून्यसाक्षि, स्वयंप्रकाश, देखणा, अपरोक्ष आत्मा. या आत्म्याहून स्फूर्तीपासून इंद्रियापर्यंत वृत्ती जीवआदीकरून सर्व परप्रकाशक आणि मिथ्याभूत आहेत. ते अपरोक्ष कसे होतील ? आपल्यापुढें आपण स्वप्रकाशानें सर्वांस पहातों तेच आपण कसे होतील ? ते बत्तीस आपण होत नाहींत म्हणून ते परोक्ष होत.

अपरोक्ष–जो सर्वांत असून सर्वांना दिसत नाहीं तोच त्रिकालाबाधित स्वप्रकाशक अपरोक्ष.

स्वप्रकाशक–जो पहाण्याविषयीं दुसऱ्या साधनाची अपेक्षा न धरितां आपल्याच प्रकाशानें पहातो तो स्वप्रकाशक.

इंद्रियांस पहाण्याविषयीं मन आणि बुद्धि यांची अपेक्षा आहे. बुद्धीस पहाण्याविषयीं जीवाची अपेक्षा आहे. जीवास उत्पन्न होण्यास वृत्तीची अपेक्षा आहे, म्हणून ज्यांस दुसऱ्याची पहाण्याविषयीं अपेक्षा आहे, ते पदार्थ सहजच परप्रकाशक आहेत.–आत्म्याचे सत्तेनें आहेत. आत्म्याचे प्रकाशानें प्रकाशतात किंवा वागतात. तसेच हे बत्तीस आत्म्याचे प्रियत्वानें वाचतात. यांस पृथक् सत्व नाहीं, म्हणूनच हे परप्रकाशक व जड यांस अपरोक्षता येत नाहीं. तर जो यांचा लय व उद्भव पहातो तोच स्वप्रकाशक अपरोक्ष. या अपरोक्षास, श्रुति निर्धारानें बोलली कीं, हा आत्मा ब्रह्म आहे.

सर्वांचा उद्भव किंवा लय किंवा अन्य अवस्था असो, हा शब्दाचे आदीअंतीमध्यें वृत्ती किंवा जीवाची स्फूर्ति आपल्या प्रकाशानें पहातो तोच हा आत्मा ब्रह्म आहे.

स्पर्शज्ञान होतां निमतां । त्वचा वृत्ति कीं जीव स्फुरतां । अकृत्रिम प्रकाशी समस्तां । हा आत्मा ब्रह्म ॥ ६१ ॥
चक्षु बुद्धीसी जीव स्फुरवी । तेणें रूपविषय प्रतीति घ्यावी । या इतुकियां सहजी प्रकाशवी । हा आत्मा ब्रह्म ॥ ६२ ॥
जिव्हा बुद्धि वृत्ति जीव । येणें रस घेतसे अपूर्व । या इतुकियां प्रकाशी सर्वदैव । हा आत्मा ब्रह्म ॥ ६३ ॥
घ्राण जीव अंतःकरणवृत्ति । सुगंध दुर्गंध निवडिती । याचा आदि अंत जाणे स्वयंज्योति । हा आत्मा ब्रह्म ॥ ६४
वाचा आदि कर्मेंद्रिय । वचनादि क्रियावृत्ति जीवें होय । या सर्वा सहज प्रकाशमय । हा आत्मा ब्रह्म ॥ ६५ ॥
ऐशी ही जागृति अवस्था सारी । वृत्तियोगें जीव अभिमान धरी । सहज सर्वांसी जो प्रकाश करी । हा आत्मा ब्रह्म६६
स्वप्नांतील भासविषय । किंवा कल्पना उठोनि जाय । त्या वृत्ति जीवासी प्रकाशी अद्वय । हा आत्मा ब्रह्म ॥ ६७ ॥
जीव अज्ञानें मी म्हणे कर्ता । हा तैजसाभिमानी तत्त्वतां । यासी निर्विकारें जो प्रकाशिता । हा आत्मा ब्रह्म ॥ ६८ ॥
कल्पनेचा लय ते सुषुप्ति । नेणीव नुसधी सुखविश्रांति । अनुभवीतसे स्वयंज्योति । हा आत्मा ब्रह्म ॥ ६९ ॥
तेथें नेणतेपणाचा अभिमान । घेऊन बैसला तो प्राज्ञ । तयासीही असे प्रकाशून । हा आत्मा ब्रह्म ॥ २४७० ॥
हें असो समाधिकाळीं । ज्ञाता पडे स्वानुभव सुकाळीं । तयासीही सहजत्वें उजळी । हा आत्मा ब्रह्म ॥ ७१ ॥
एवं रूपादिकीं सर्वी व्यापला । आणि प्रकाशीतसे सर्वा क्रियेला । सच्चिदानंद सहजत्वें संचला । हा आत्मा ब्रह्म ॥७२
ऐसा स्वप्रकाशक अपरोक्ष । जो उत्तम अधिकारी दक्ष । तयासी श्रुति उपदेशी प्रत्यक्ष । हा ब्रह्म आत्मा म्हणोनी ॥
हेंचि वचन अधिकारियानें । विवेचून घेतलें गुरुमुखानें । निश्चयचि करून दृढबुद्धीनें । जीवन्मुक्तत्वें विचरे ॥ ७४ ॥
निश्चय ऐसा दृढ केला । कीं विश्वतैजसा नाहीं स्पर्शला । हा बत्तीस तत्त्वांचा मेळा आपुलाला । वर्तो भलते व्यापारीं॥
आपण आत्मा ब्रह्म असंग । हे बत्तीस वेगळे मिथ्यात्वें जग । ऐसा हा जाहला ग्रंथिभंग । पुन्हां जड चिद्रूप न मिळे॥
ऐसा जो पावला समाधान । जयासी कधींही नोव्हे उत्थान । तयाचें अल्पसें करूं कथन । श्लोकार्धे ध्वनितार्थ ॥७७॥

## ॥ क्षणे क्षणेऽन्यताभूताधीविकल्पाचितिर्नतु ॥

हे बत्तीस ईशादि तृणांत । होती क्षणक्षणां अन्यथाभूत । ब्रह्मात्मा चिद्रूप सदोदित । अन्यथा नव्हे ॥ ७८ ॥
मूळ श्लोकीं बुद्धीचे विकल्प । अन्यथा होती बोलिले अल्प । त्यावरी ईशादि तृणांत केला अल्प । कासयाकोणीमानील
तरी बुद्धीपासून तों ऐलीकडे । देहांत विकल्पांत सांपडे । जीवही तेथें स्फूर्तित्वें आतुडे । एवं हें सर्व आलें ॥ २४८० ॥
बुद्धीचें कारण जें आनंदमय । तेंही बुद्धीवीण कोठें जाय । तस्मात् कारणासी घेऊन कार्य । वर्ते व्यापारीं ॥ ८१ ॥
आरंभीं मायास्फूर्ति उठे । तेव्हांचि बुद्धिकार्य उमटे । तेव्हां विद्या अविद्या जीवेश गोमटे । कां न येती ॥ ८२ ॥

---

हा आत्मा पंचभूतांचे व्यापार व त्या व्यापारास लागणारीं तत्वें यांस प्रकाशितो. तसेंच तीन देह त्यांच्या अवस्था त्यांचे अभिमानीयांस प्रकाशितो. तसेंच समाधिकाळीं ज्ञाता स्वानुभव सुकाळी असतां त्यास हा आत्मा प्रकाशितो. याप्रमाणें हा आत्मा रूपादि सर्वांत व्यापलेला असून आपल्या प्रकाशानें सर्वांच्या क्रिया प्रकाशितो. तोच हा आत्मा सच्चिदानंदत्वानें संचलेला आहे. तोच अपरोक्ष आत्मा; ह्याचा श्रुति उत्तम अधिकाऱ्यास प्रत्यक्ष उपदेश करिते कीं, हा आत्मा ब्रह्म. हें श्रुतीचें वचन उत्तम अधिकाऱ्यानें गुरुमुखानें विवेचून घ्यावें आणि दृढबुद्धीनें निश्चय करून, जिवन्मुक्त होऊन मग हवें तिकडे फिरावें. निश्चय असा दृढ केला पाहिजे कीं, त्यायोगानें विश्व, तैजस हे आपणास स्पर्श करणार नाहींत. तसेंच बत्तीस तत्वांचा समुदाय हवातसा वागो पण आपण आत्मा त्यांहून निराळा असंग आहे, व हे बत्तीस मिथ्याभूत आहेत, असा ग्रंथीभंग झाला, म्हणजे मग पुन्हा जड चिद्रूप एके ठायीं मिळावयाचेंच नाहीं. असा जो समाधान पावला, ज्यास कधींही उत्थान व्हावयाचेंच नाहीं, त्याचें थोडेसें श्लोकार्धानें संक्षेपेंकरून कथन करितों.

ईश्वरापासून तृणापर्यंत बत्तीस क्षणक्षणा अन्यथाभूत होतात, तसा ब्रह्मात्मा चिद्रूप अन्यथाभूत होत नाहीं. मूळ श्लोकांत बुद्धीचे विकल्प अन्यथा होतात, हें संक्षेपानें सांगितलें आहे. मग ईश्वरापासून तृणापर्यंत जें याचें वर्णन, कां केलें असें कोणी म्हणेल, तरी याचें उत्तर ऐका: बुद्धीपासून देहापर्यंत सर्व विकल्पांत सांपडतें व जीवही त्यांत स्फूर्तित्वानें सांपडतो. त्याप्रमाणें सर्व संकल्पांत आलें; तसेंच बुद्धीचें कारण जो आनंदमय तो तरी बुद्धीवांचून कोठें जातो ? तो जात नाहीं म्हणून कार्यकारणास घेऊन आपले व्यापारांत वागतो. प्रथमतः मायास्फूर्ति उत्पन्न होते तेव्हांच बुद्धीचें कार्य उत्पन्न होतें. मग त्यांत विद्या, अविद्या, जीव, ईश्वर हीं कां येणार नाहींत ?

तस्मात् ईशादि तृणांत बत्तीस । विकल्परूपताचि असे यास । हेचि क्षणक्षणां अन्यथा भास । होती पावती विकारा ॥
पृथ्वी आप तेज वायु गगन । हे तों जड पहिलेच संपूर्ण । याही वरी पालट धरिती क्षणक्षण । एकत्र पांच होतां ८४
पांच खाणी तों मुळीं विकारी । पुढें जन्मादि मरणांत विकार करी । क्षणक्षणां पालटती सारीं । देहधारी सान थोर ॥८५
देहा अंतरीं पंचप्राण । हे तों उघड विकारी क्षणक्षण । तैसाचि दशेंद्रियांचा गण । अन्यथा विकारा पावे ॥ ८६ ॥
मनबुद्धीचे तों सर्वदा विकल्प । क्षणक्षणां होती संकल्प । विकारावीण न राहती अल्प । गुणाचे कीं कामादिकांचे ॥
ऐशीच मायास्फूर्ति क्षणक्षणां । उठे मुरे सर्वदा स्फुरणा । तिजसवें विद्या अविद्या विक्षेप आवरणा । करिती विकार
जीव तो मायास्फूर्तीपासून । विषयांत आदळे जाऊन । यासी विकारी म्हणतां क्षणक्षण । किमपि दोष नाहीं ८९ ॥
ही असो जीवत्वाची कथा । परी ईशही विकारी सर्वथा । मुळींच प्रतिबिंबत्वें जाहला अन्यथा । वरी विकार प्रेरणेचा९०
तस्मात् ईशादि तृणांत । क्षणक्षणां होती मिथ्याभूत । कारण कीं सर्वही मायाजनित । विकाराचे विकारी ॥ ९१ ॥
प्रेरक ईश मायेंत आला । मा प्रेर्य जीव तो विकाराचा आथिला । येथें शंका वाटेल कोणाला । ते आधीं अवधारा ९२
कीं प्रेरक मायातीत आत्मा ब्रह्म । बुद्धीचा असे हा श्रुतीचा नेम । आणि सर्वांसी असे विश्राम । अधिष्ठानत्वें ॥ ९३
चुंबकासन्निध लोह चळे । तेव्हां चालक चुंबक या युक्तीच्या बळें । आणि अनुभवही बोलती सकळे । ज्ञाते कवि वेदांती
तस्मात् श्रुति युक्ति अनुभवेंकडून । ब्रह्म आत्माचि करी प्रेरण । येथें प्रेरक स्थापिला ईशान । तरी विरोध वाटे ॥ ९५॥
ऐसिया आशंकेसी उत्तर । कीजेल सत्यत्वेंसी निर्धार । ब्रह्मात्मा प्रेरक जो प्रकार । याचें रहस्य भिन्न ॥ ९६ ॥
ईश्वरादिही सर्व जाहले । जाहले ते स्वधर्मीं व्यापारले । या इतुकियांचें प्रेरण कोणीं केलें । ईशादि तृणांत ॥ ९७ ॥
तेव्हां श्रुतीसीही विचार पडिला । कीं हा आळ घालावा कोणाला । ब्रह्मात्मा तो असंग संचला । ईश तो प्रेर्य असे ।९८
मागुतीं पाहतां विचार । हे जाहलेच नसतां सविस्तर । मिथ्यात्वा प्रेरक जरी निर्विकार । म्हणतां बाध नाहीं ॥ ९९ ॥

---

सर्वही येतात. म्हणून ईश्वरापासून तृणापर्यंत बत्तीस यांस विकल्परूपताच आहे. ज्यांस विकल्परूपता आहे हेच त्यांचे क्षणक्षणा अन्यथाभास होतात; व ते विकार पावतात असें समजावें.

पंचभूतें हीं जड आहेत व क्षणक्षणा तीं पांच एके ठिकाणीं झालीं असतां पालटतात, म्हणून पंचभूतें विकारी व क्षणक्षणा अन्यथाभूत आहेत. पांच खाणी मूळच्या विकारी आहेत. पुढें जन्मआदि मरणापर्यंत सर्व विकार करितात व सर्व लहानमोठे देहधारी क्षणक्षणा पालटतात. देहामध्यें असणारे प्राण हे उघडच विकारी व क्षणक्षणा पालटणारे आहेत. तशींच दशइंद्रियें विकारी आहेत; व तीं क्षणक्षणा पालटतात. मन आणि बुद्धि यांचे सर्वदां संकल्पविकल्प होतात, व त्यांस गुणाचे किंवा कामादिकांचे विकार होतात; व तीं क्षणक्षणा पालटतात. याचप्रमाणें मायास्फूर्ति क्षणक्षण उठते व नाहींशी होते, म्हणून ती विकारी व क्षणक्षण पालटणारी आहे. मायास्फूर्तीच्या विद्याअविद्या ह्या आवरणविक्षेप हे विकार करितात, व त्या क्षणक्षणा पालटतात. जीव मायास्फूर्तिपासून विषयापर्यंत जातो येतो म्हणून तो विकारी; व क्षणक्षणा पालटतो. ईश्वर प्रतिबिंबत्वानें अन्यथा झाला व हा प्रेरणेचा विकार करितो म्हणून ईश्वर विकारी असून क्षणक्षणा पालटतो म्हणूनच ईश्वरापासून तृणापर्यंत बत्तीस क्षणक्षणा मिथ्याभूत आहेत. कारण, सर्व मायेपासून झालेलें व विकाराचे विकारी आहेत.

शंका–श्रुति बुद्धीचा प्रेरक ईश्वर ब्रह्मात्मा आहे असें सांगते. आणि तो अधिष्ठान असल्यामुळें सर्वांस विश्रांति आहे. जसें लोखंड चुंबकाचे जवळ नेल्यानें चळतें म्हणून त्या लोखंडाचा चालक चुंबक आहे; या युक्तीचे आधारानें ब्रह्मात्मा प्रेरक आहे. व ज्ञाते, शहाणे व वेदांतीही, ब्रह्मात्मा प्रेरक आहे असें म्हणतात, हा अनुभव आहे. याप्रमाणें श्रुतियुक्तिअनुभवानें प्रेरक आत्मा असतां तुम्ही जीवाचा प्रेरक ईश्वर आहे म्हणतां हा मोठा विरोध येतो.

उत्तर–ब्रह्मात्मा प्रेरक म्हटलें याचें कारण निराळें आहे तें हें कीं, ईश्वरादि सर्व झालें व जें झालें तें आपापले धर्मानें व्यापारूं लागलें, तेव्हां या ईश्वरादि तृणापर्यंत सर्वांची प्रेरणा कोणी केली, हा श्रुतीला विचार पडला; आणि ती म्हणते कीं, प्रेरणेचा आळ कोणावर घालावा ? ब्रह्मात्मा प्रेरक म्हणावा तर तो असंग आहे. व जीव प्रेरक म्हणावा तर तो प्रेर्य आहे. पुढें विचार केला तेव्हां श्रुतीला वाटलें कीं, सर्व झालेंच नाहीं, त्या मिथ्याचा प्रेरक ब्रह्मात्मा म्हटल्यानें कांहीं बाध नाहीं. म्हणून तिनें ब्रह्मात्म्यास प्रेरक म्हटलें आहे.

चुंबक स्वतां हालवीना । सान्निधानत्वें लोहो पावे भ्रमणा । तरी तो विकार न पावतां आरोपणा । केली तरी निर्बाध २५
तैसे हे माया ईशादि तृणांत । सत्यत्वें नसोनि जाहलें समस्त । यासि प्रेरणा निर्विकारत्वें होत । ब्रह्मात्मयाची ॥ १ ॥
परी यासी स्वतां चेष्टवीना । ना न चेष्टवी हेंही असेना । हेंचि उद्भवून पावतें अवसाना । तया अधिष्ठान मात्र ॥ २ ॥
सर्पत्रिकारा जेवीं दोरी । तेवीं सर्वा आधार निर्विकारी । मग प्रेरी अथवा न प्रेरी । परी आळ आधिष्ठानीं ॥ ३ ॥
ऐसिया हेतु श्रुति जाणे । ब्रह्मात्मया प्रेरक म्हणे । येऱ्हवीं पहातां प्रेरणा न होणें । निज परब्रह्मीं ॥ ४ ॥
हेंही जग जया सत्य वाटलें । तयासी श्रुति उगीच बोले । कीं हें परमात्मसत्तें वर्तलें । तया स्मरा अखंडिता ॥ ५ ॥
जया साधका मिथ्या कळतां । जाहलेंचि नाहीं वाटे चित्ता । तेव्हां प्रेरकत्वाची वार्ता । मिथ्या होय ॥ ६ ॥
म्हणोनि श्रुति निःशंक बोलिली । परी अंतरीं सारांशता भिन्न भाविली । कैशीं हीं भाविकें समजाविलीं । परी यथार्थ नव्हे
यथार्थ विकारें जो प्रेरक । हा ईश्वराचाचि धर्म एक । कारण कीं ईक्षणादि शक्ति अनेक । असती विक्षेपादि ॥ ८ ॥
यासीही श्रुति बहु प्रमाण । कीं प्रेरक सर्वज्ञ ईशान । आणि युक्ति अनुभवेंही करून । ईशेंविण प्रेरण नव्हे ॥ ९ ॥
जयाच्या भीतीनें वायु वाहे । हे श्रुति ईश्वरा प्रमाण आहे । बुद्धीचा प्रेरक गायत्री म्हणताहे । ब्रह्म परमात्मा ॥२५१०॥
ब्रह्मात्मा प्रेरक जें म्हणितलें । हें उगें सहजत्वें बोलिलें । ईश्वराचे भीतीनें म्हणतां जाहलें । विकाररूप प्रेरण ॥ ११ ॥
या सर्वांसी जे भीति होय । ते सामर्थ्याविणें म्हणों नये । सामर्थ्य तेंचि विकारी जेणें भय । पावती सर्व ॥ १२ ॥
तें सामर्थ्य ईश्वरींच असे । ब्रह्मीं विकाराचें नांव नसे । हें विचारें पहावें मानसें । विचारवंतीं ॥ १३ ॥
तस्मात् ईशाचें प्रेरण तें विकारी । ब्रह्मात्मा प्रेरक निर्विकारी । हें दृष्टांताचिये अनुकारी । स्पष्ट कळे तो ऐका ॥ १४ ॥
जैशी राहाटमाळा लोकीं करिती । तेणें पाणी येतसे वरुती । तयासी चक्रें बहुत असती । ते दाटिती एकमेकां ॥ १५ ॥
परी ते वृषभ लावितां चाले । नातरी निवांत राहे उगलें । तो बैलही न चाले पहिले । हाकणाराविण ॥ १६ ॥
ऐसे वृषभ आणि पुरुष हाकितां । आणि राहाटमाळेची सामग्री समस्ता । एका असती भूमीवरुना । तिच्या आधारें चालती
हा दृष्टांत पाहतां विचारून । दार्ष्टांताचें होय विवेचन । अर्थात् विकारी निर्विकारी कोण । कळेल स्पष्ट ॥ १८ ॥

जसें चुंबक स्वतः हालवीत नसतां त्याचे जवळ नेल्यानें लोखंड चळतें, म्हणून चुंबक लोखंडाचा चाळक आहे म्हटल्यानें बाध नाहीं. तसें मायेपासून तृणापर्यंत सर्व मिथ्याभूताची प्रेरणाकर्ता ब्रह्मात्मा म्हटल्यानें कांहीं बाध नाहीं. ब्रह्म हें बत्तीसास स्वतः चेष्टवीत नाहीं व नाहीं चेष्टवीत असेंही नाहीं. तर बत्तीसच त्यावर उत्पन्न होऊन लय पावतात. तो ब्रह्मात्मा त्यांस अधिष्ठान मात्र आहे. जसें सर्प विकार होण्यास दोरी कारण, तसें सर्वांस उत्पन्न होण्यास आधार ब्रह्माचा आहे. तें प्रेरणा करो अथवा न करो सर्वांस आधार असल्यामुळें ब्रह्मात्मा प्रेरक आहे असें श्रुति म्हणते. एऱ्हवीं ब्रह्मात्म्याचे ठायीं वास्तविक प्रेरणाच नाहीं, असें असून प्रेरणा आहे, हें तरी ज्यास जग खरें वाटत आहे त्यासच श्रुति सांगते. ज्या साधकास जग मिथ्या आहे, तें झालेंच नाहीं असें वाटतें, त्यास प्रेरणाच खोटी वाटते. प्रेरणा खोटी आहे तेव्हां ब्रह्मावर प्रेरणेचा आरोप घातल्यानें बाध नाहीं, असें जाणूनच श्रुति ब्रह्मास प्रेरक म्हणते. पण वास्तविक प्रेरणेचा धर्म ईश्वराचा आहे, कारण त्याजवळ ईक्षणादि व विक्षेपादि अनेक शक्ति आहेत. ईश्वर प्रेरक आहे यास श्रुति, युक्ति व अनुभव प्रमाण आहे.

ज्याच्या भीतीनें वारा वहातो तो ईश्वर प्रेरक असें श्रुतीचें प्रमाण आहे. बुद्धीचा प्रेरक ब्रह्म परमात्मा आहे असें गायत्री म्हणते, पण हें उगीच म्हटलें आहे. वास्तविक ईश्वराचे भीतीनें विकाररूप प्रेरणा होते. सर्वांस जी भीति उत्पन्न होते ती सामर्थ्यावांचून होत नाहीं. ज्याचे-योगानें सर्व भय पावतात तेंच विकारी सामर्थ्य. हें विकारी सामर्थ्य ईश्वराचेंच अंगीं आहे. ब्रह्माचे ठायीं विकार नाहीं, तेव्हां त्याचेठायीं सामर्थ्य कोठून असेल ? सामर्थ्य नाहीं म्हणून ब्रह्म निर्विकारी आहे व ईश्वराचें सामर्थ्य विकारी आहे हेंच स्पष्ट कळावें म्हणून दृष्टांत देऊन सांगतों.

लोक रहाटमाळ करितात तिच्या योगानें पाणी वर येतें व तें अखंड येत असावें म्हणून पाणी आणणारे लोटे जवळजवळ बांधलेले असतात. अशाप्रमाणें केलेली माळ रहाटावर घालितात; आणि त्या रहाटास बैल जुंपितात. तो बैल चालू लागला म्हणजे रहाट फिरून त्यावरची माळही खालून वर जात येत असते. बैल थांबला म्हणजे माळ स्थीर रहाते. बैल चालण्याकरितां त्यास हाकणारा एक मनुष्य हातांत चाबूक घेऊन उभा असतो; त्यानें चाबूक मारिला म्हणजे तो बैल चालू लागतो. एऱ्हवीं चालत नाहीं. रहाटमाळेची सामग्री बैल व हाकणारा जसा एका जमीनीवर आहे. तसे देह, प्राण, बुद्धि, स्फूर्ति, जीव व ईश्वर, ह्यांस एक ब्रह्म आधार आहे.

देहादि प्राण बुद्धि स्फूर्ति । हे येक येकांचे दाट असती । जैशी का राहाटमाळेचा स्थिति । तेवीं कळासिली ठाईं ठाईं १९
यासी जीव हा वृषभ जुंपिला । साभिमानें खांदा वाहे उगला । तेणें चालतसे देहयंत्रमाला । सुखदुःख पाणी उफाळे २०
हाकिता पुरुष तो ईश्वर । वर्तवीत प्रारब्धानुकार । हाचि जीवासी बलात्कार । विक्षेपशक्ति चाबुकें ॥ २१ ॥
असो राहाटमाळा वृषभ नर । येका असती भूमीवर । तेवीं देहादि जीव आणि ईश्वर । ब्रह्मात्माधिष्ठानीं ॥ २२ ॥
भूमि निर्विकारें आधार सहज । तेवीं ब्रह्म परमात्मा अचोज । तेथें प्रेरणेचें कैंचें व्याज । सर्वाधार मात्र ॥ २३ ॥
बैलासी हांकिता पुरुष ईश्वर । विक्षेपशक्ति चाबुकाचा मार । तेणें भयें चाले हें जगयंत्र । तस्मात् ईश प्रेरक खरा २४॥
ऐसें विचारून खरें पाहतां । विरोधाची नसे वार्ता । आतां सावधान असावें रविदत्ता । चालिला प्रसंग निरोपूं ॥ २५॥
पंचभूतें पंचयोनीचीं शरीरें । त्यांत पंचप्राण दशइंद्रिय सारे । मन बुद्धि विषयांत वावरे । हे जड चंचळपणें ॥ २६ ॥
विद्या अविद्या ईश्वर जीव । पांचवी माया स्फूर्ति स्वयमेव । एवं हीं बत्तीस तत्त्वें सर्व । क्षणक्षणां अन्यथा होती २७
ईशाचि प्रेरकत्वें विकारी । क्षणक्षणें होत अन्यथा परी । मा जीवादि देहांत तों सारीं । हे तों अन्यथा मुळींचे ॥ २८॥
असो हे सारे अन्यथा होती । क्षणक्षणां विकारें पालटती । परी सर्वांत अनुस्यूत जे चित्ती । अन्यथा नव्हे ॥ २९ ॥
जैसेंआकाशघटींमठींव्यापून । किंचित्अन्यथा न पावेचलन । तैसेंचिब्रह्म परिपूर्ण सच्चिद्घन । सर्वत्रीं परी अन्यथा नव्हे
जरी ब्रह्मादि कीटकापर्यंत। कोठें अज्ञान कोठें ज्ञान स्फुरत। परी ब्रह्म आत्मा अन्यथाभूत। कधीं नव्हे सहसा ॥ ३१॥
नाना देहांमध्यें राहून। सूक्ष्मासी होय वर्तन। त्याचा जीव हा धरी अभिमान। प्रेरकपणें ईशाचे ॥ ३२ ॥
साभिमान येथवरी घेतला। कीं आपणचि देह होऊन बैसला। बळें कल्पिलें पापपुण्याला। मीच कर्ता म्हणोनी ॥ ३३
तेणेंचि वारंवार उपजे मरे। नाना योनींचीं पाऊनि शरीरें। उंच नीच स्वर्ग नरक अपारें। भोगी अनंत कल्प ॥ ३४॥
आधींच अज्ञानें अन्यथा जाहलें। वरी अन्यथात्वें भ्रमूं लागलें। कोठें सान थोर कीं वाईट चांगुलें। परी अन्यथा क्षणक्षणां
इतुकेही अन्यथात्व पावती। परी सर्वत्रीं व्याप्त जे चिती। अन्यथा नव्हेचि कल्पांतीं। आदि अंतीं कां मध्यें ॥३६॥
अज्ञानकाळीं जें निजरूप। अन्यथा विकारी नव्हे अल्प। मा जो जाणेल स्वकीय स्वरूप। तेथें अन्यथा कैसें ॥३७॥
अज्ञानी अन्यथा जाहलें नाहीं। परी वाउगेंचि मानिती सर्वही। कीं मीच देह वर्तणूक जें कांहीं। अन्यथा होय माझी

---

देह, प्राण, बुद्धि, स्फूर्ति, हे रहाटमाळेस जागजागीं लोटे बांधिलेले आहेत. त्या माळेसकट रहाटास जुंपिलेला बैल साभिमानरूपी खांद्यानें रहाट ओढीत आहे; व त्या-योगानें सुखदुःखरूपी पाणी उडत आहे. बैल हाकणारा मनुष्य ईश्वर आहे व बैल मनुष्य आहे. त्या मनुष्य-रूपी बैलास ईश्वर विक्षेपरूपी चाबुकानें हांकीत आहे. म्हणजे मनुष्यास ईश्वर प्रारब्धाप्रमाणें वागवितो हाच त्या मनुष्यरूपी बैलावर विक्षेपरूपी चाबुकाचा मार व बला-त्कार आहे. भूमि जशी सर्वांस निर्विकारत्वें आधार आहे तसेंच ब्रह्म सर्वांस निर्विकारत्वें आधार आहे. तरी विक्षे-रूपी चाबुकानें हांकणारा ईश्वरच एक प्रेरक आहे.

पंचभूतें, पांच योनींचीं शरीरें, पांच प्राण, दशइंद्रियें, मन, बुद्धि, विद्या, अविद्या, मायास्फूर्ति, जीव, शिव, मिळून जडचंचल बत्तीस तत्त्वें हीं अन्यथाभूत होतात, प्रेरक जो ईश्वर तो विकारी व अन्यथाभूत आहे, मग जीव व इतर तत्त्वें यांची कथा काय ? सर्व तत्त्वें जरी विकारी आहेत तरी त्यांत चिति अनस्यूत एक भरलेली आहे. ती त्याबरोबर विकार पावत नाहीं. जसें आकाश घटींमठीं व्यापूनही किंचित् विकारी होत नाहीं व अन्यथा होत नाहीं. तसें ब्रह्म ब्रह्मदेवापासून किड्याप-र्यंत कोठें अज्ञान, कोठें ज्ञान असें स्फुरत आहे. तरी कधींही अन्यथा होत नाहीं; जीव अनेक देहांत राहि-ल्यामुळें सूक्ष्मदेहाचे वर्तनाचा अभिमान धरितो, पण सूक्ष्मदेह ईश्वराचे प्रेरणेशिवाय वर्तत नाहीं; असें असून जीव ईश्वराचे प्रेरणेचा अभिमान आपण इतका धरितो कीं, देहच मी असें आपणास मानितो; व मी पापपुण्य करितों असें कल्पितो, त्या योगानें उपजतो व मरतो. याप्रमाणें अनंत कल्पपर्यंत उंचनीच योनींचीं शरीरें पावून स्वर्ग नरक भोगितो. आधींच सर्व अज्ञानानें झालेलें अन्यथा आहे, तशांत अन्यथात्वें भ्रमूं लागले, मग कोठें थोर, कोठें लहान, वाईट, चांगलें, परंतु क्षण-क्षण अन्यथा होतात. याप्रमाणें सर्व अन्यथा पावतात. तरी सर्वांत व्याप्त जी चिती ती आदीं, अंतीं, मध्यें, अन्यथा होत नाहीं. निजरूप अज्ञानकाळीं अल्पसुद्धां अन्यथा विकारी होत नाहीं. मग जो आपलें स्वरूप जाणेल तो अन्यथा कसा होईल ? अज्ञानानें कांहींही अन्यथा झालें नाहीं, पण सर्व जन उगाच अन्यथा कल्पितात. असें कीं, मी देह व देहाची जी वर्तणूक सर्व अन्यथा होते ती माझी.

मी हा पुण्य पाप करितसें । तें भोगिलेंचि भोगीन आपैसें । ऐसिये अभिमानाचे ध्यासें । भोगणेंचि लागे ॥ ३९ ॥
ऐसा हा अज्ञानाचा जल्प । हाही तोंवरीच संताप । जोंवरी ब्रह्मात्मा सच्चिद्रूप । अपरोक्षें न कळे ॥ २५४० ॥
तोंवरीच मी जीव मज बंधन । मीच पावे जन्ममरण । जोंवरी ब्रह्मात्मा सच्चिद्घन । अपरोक्षें न कळे ॥ ४१ ॥
तोंवरीच षड्विकार बाधती । क्षणक्षणां अन्यथा होती । जोंवरी ब्रह्मात्मा सच्चिन्मूर्ति । अपरोक्षें न कळे ॥ ४२ ॥
तोंवरीच तूं येक मी येक । माझें तुझें नानात्व सकळिक । जोंवरी ब्रह्मात्मा आपण येक । अपरोक्षें न कळे ॥ ४३ ॥
तोंवरीच हें जग सत्य वाटे । ब्रह्मादि कीटकांत सान मोठें । जोंवरी ब्रह्मात्मा घनदाटे । अपरोक्षें न कळे ॥ ४४ ॥
तोंवरीच दारा पुत्र धनादि । विषय लालचीनें संपादी । जोंवरी ब्रह्मात्मा अनादि । अपरोक्षें न कळे ॥ ४५ ॥
तोंवरीच अंकित कर्म धर्मांचा । वर्ण आश्रम कीं देव वेदाचा । जोंवरी ब्रह्मात्मा अभिन्न साचा । अपरोक्षें न कळे ४६
तोंवरीच स्वजन मोहिती । उपजीवना परतंत्र करिती । जोंवरी ब्रह्मात्मा स्वानंदमूर्ति अपरोक्षें न कळे ॥ ४७ ॥
तोंवरीच सुखदुःखाचा शीण । पाप पुण्य हे बागुल दोन । जोंवरी ब्रह्मात्मा सघन । अपरोक्षें न कळे ॥ ४८ ॥
तोंवरीच उत्तम अधम गति । अधोर्ध्व स्वर्ग नरक भासती । जोंवरी ब्रह्म परमात्मा निश्चिती । अपरोक्षें न कळे ४९
तोंवरीच स्वामिसेवकभाव । मी भक्त तूं असशी देव । जोंवरी ब्रह्मात्मा स्वानुभव । अपरोक्षें न कळे ॥ २५५० ॥
तोंवरीच देव दानव मानवादिक । स्त्री पुरुष कीं नपुंसक । जोंवरी ब्रह्मात्मा निश्चयात्मक । अपरोक्षें न कळे ॥५१॥
तोंवरीच शब्दाची खटपट । शास्त्रीय लौकिकाचे बोभाट । जोंवरी ब्रह्मात्मा निघोट । अपरोक्षें न कळे ॥ ५२ ॥
तोंवरीच मी कर्ता भोक्ता सकळां । ध्याता ज्ञाता अनुभविता वेगळा । जोंवरी ब्रह्मात्मा स्वलीळा । अपरोक्षें न कळे
तोंवरीच किंचिज्ज्ञ हा जीव । ईशा सर्वज्ञपणाचा भाव । जोंवरी ब्रह्मात्मा स्वयमेव । अपरोक्षें न कळे ॥ ५४ ॥
तोंवरीच जीव हा भ्रामक । ईश्वर असे यासी प्रेरक । जोंवरी ब्रह्मात्मा उभयीं एक । अपरोक्षें न कळे ॥ ५५ ॥
तोंवरी संचित प्रारब्ध क्रियमाण । ईश करी बलात्कारें प्रेरण । जोंवरी ब्रह्म परमात्मा आपण । अपरोक्षें न कळे ५६
तोंवरीच बंध मोक्ष हे वार्ता । सिद्ध साधक कीं मुमुक्षुता । जोंवरी ब्रह्म परमात्मा तत्वता । अपरोक्षें न कळे ॥५७॥
तोंवरीच गुरु शिष्य हे दोन । श्रवण मनन निदिध्यासन । जोंवरी ब्रह्म आत्मा सघन । अपरोक्षें न कळे ॥ ५८ ॥
असो ऐसें कोठवरी बोलावें । द्वैत तोंवरीच हें आघवें । जोंवरी ब्रह्म आत्मा स्वानुभवें अपरोक्षें न कळे ॥ ५९ ॥
ऐसा अपरोक्ष उत्तमाधिकारी । गुरु शास्त्रविचाराचे अनुकारीं । विवेचनें पावला निःसंशय अंतरीं समाधि उत्थानरहित
ब्रह्मात्मा अपरोक्ष पहिलाचि असे । आजि नवा कवणा करणें नसे । परी वाउगेंचि अज्ञानें लाविलें पिसें । भिन्नत्व देहबुद्धीचें

---

मी पापपुण्य करितों, तें मला सहजच भोगावें लागेल. याप्रमाणें अभिमान जीव घेतो, म्हणून त्यास तें भोगावें लागतें; हें अज्ञानाचें म्हणणें आहे.

हें म्हणणें तोंपर्यंतच आहे, जोंपर्यंत सच्चिदानंद ब्रह्मात्मा अपरोक्षत्वें कळला नाहीं.

१ पापपुण्य भोगणें. २ मी जीव मज बंधन. ३ मी जन्ममरण पावतों असें मानणें. ४ मला षड्विकार बाधतात. ५ सर्व क्षणक्षण अन्यथा मानणें. ६ तूं एक मी एक मानणें. ७ माझें तुझें इत्यादि नानात्व मानणें. ८ जगास सत्य मानणें. ९ ब्रह्मदेवापासून किड्यापर्यंत लहान मोठे मानणें. १० स्त्री, पुत्र, धन, आदिकरून विषय संपादणें. ११ कर्म, धर्म, वर्ण, आश्रम, वेद, देव यांचा अंकीत होणें. १२ स्वजन मोहून उपजीवनाकरितां परतंत्र करितात. १३ सुखदुःखाचा श्रम पावणें. १४ पापपुण्य बागुलाची भीति मानणें. १५ उत्तम मध्यमगति मानणें. १६ वर, खालीं, स्वर्ग, नरक, मानणें. १७स्वामिसेवकभाव मानणें. १८ देवभक्तपणा मानणें. १९ देव, दानव, मनुष्य, स्त्रीपुरुष नपूंसक मानणें. २० शास्त्रीयलौकिक शब्दाची खटपट करणें. २१ कर्ता, भोक्ता, ध्याता, ज्ञाता, अनुभाविता इत्यादि मानणें. २२ किंचिज्ज्ञ जीव, सर्वज्ञ ईश्वर मानणें. २३ भ्रामक जीव, प्रेरक ईश्वर मानणें. २४ संचित, क्रियमाण, प्रारब्ध, हें ईश्वराचे बलात्काराचें प्रेरण मानणें. २५ बंध, मोक्ष, सिद्ध, साधक मुमुक्षुता मानणें २६ गुरु, शिष्य दोन मानणें. तसेंच श्रवण, मनन, निजध्यास, लावणें. हें जोंपर्यंत सच्चिदानंद ब्रह्मात्मा अपरोक्षत्वें कळला नाहीं, तोंपर्यंतच आहे.

हें किती सांगावें ? जोंपर्यंत द्वैत आहे तोंपर्यंत सर्व आहे. तें अपरोक्ष ब्रह्मात्मा कळल्यानें नाहींसें होईल. असो. जो अपरोक्ष उत्तम अधिकारी आहे तो गुरुशास्त्राचे विचारानें, आणि विवेचनानें उत्थानरहित समाधान समाधी पावला. ब्रह्मात्मा अपरोक्ष पहिलाच आहे, तो आज नवा करावा लागत नाहीं. पण उगेंच अज्ञानानें मी देह असें भिन्नत्वाचें पिसें लागलें आहे तें ज्ञानानें घालवावयाचें.

चित्प्रभा जे अनेकधा बोलिली । आणि हे ईशादि जड बत्तीस उद्भवलीं।हे दोन्ही येकचि म्हणून भाविलीं।येकत्र जाहली नसतां
हेंचि चिद्ग्रंथीचें रूप । एकचि जाहले दोरी सर्प । परी हा वाउगाचि आरोप । अज्ञानकार्य ॥ ६३ ॥
ऐशिया ग्रंथीचें भेदन । जो करी विचारें निःसंशय पूर्ण । तोचि उत्तम अधिकारी आपण । पुन्हां ग्रंथि पडों नेदी ६४
ग्रंथि म्हणिजे पुन्हां जडासी । चिद्रूपता न येचि बुद्धीसी । आणि चिद्रूप ब्रह्म जें अविनाशि । तें जडसें न वाटे ६५
चिद्रूप ब्रह्म तेंचि आपण । येर हे बत्तीस आपणाहून भिन्न । निवडिले तया स्वप्नींही मीपण । येऊं नेदी सहसा ६६
जरी देहादिकांचे व्यापार होती । परी असंग आपण अचळस्थिती । हेचि सहज समाधि निश्चिती । समाधि उत्थानरहित
भलतिये अवस्थेमाझारी । असंग आपण निर्धारी । ईशादि तृणांत हे सारीं । मिथ्या परोक्ष ॥ ६८ ॥
देह जन्मला आपण जन्मेना । देहा ऐसा आपण असेना । देह वाढतां आपण वाढेना । स्वयें चिद्रूप आत्मा ॥६९॥
देह तरुण विषय भोगी । आपण असंग विषयालागीं । देह क्षीण होतां न होय प्रसंगीं। स्वयें चिद्रूप आत्मा ॥७०॥
देह मरतां आपण न मरे । देहायेवढा नोव्हे साचोकारे । तरी होईल कैसा जडआकारें । स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ७१ ॥
देह चालतां आपण चालेना । देह बोलतां आपण बोलेना । देतां घेतां न दे घेईना । स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ७२ ॥
रति भोगितां आपण अभोक्ता। असंगाचि स्वयें विसर्ग करिता । भलतिया क्रियेमाजीं समस्ता। स्वयें चिद्रूप आत्मा ७३
कर्ण ऐके आपण ऐकेना । स्पर्श घेतां आपण स्पर्शेना । डोळा देखतां आपण देखेना। स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ७४ ॥
जिव्हा रसज्ञ आपण अजिव्ह । घ्राणें सुगंध घेतां आपण स्वयमेव । आपण असंग अगंध सदैव । स्वयें चिद्रूप आत्मा
क्षुधा तृषा धर्म प्राणाचे । ते धर्म आपणासी कैंचे । जरी संचरतां पोषण देहाचें । स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ७६ ॥
चित्त चिंतितां अचिंत्य आपण । अहंकाराचें न घे अहंपण । बुद्धि निश्चयामाजीं परिपूर्ण । स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ७७ ॥
मन संकल्पा जरी निकें । परी न पडे कदा संशयात्मकें । आपण परिपूर्ण निश्चयात्मकें। स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ७८ ॥
हें असो संघ हा जागृत । सर्व क्रिया असती होत । परी आपण जागा ना व्यापारत । स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ७९ ॥
ब्रह्मादि तृणांत सर्वा पाहे । परी सत्यत्व किंचितही न लाहे । सर्वाधिष्ठान आहे तें आहे । स्वयें चिद्रूप आत्मा ॥२५८०॥
उंच नीच कीं सान थोर । हा नव्हेचि किमपि उद्गार । येकत्वें परिपूर्ण अपार । स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ८१ ॥
ऐसा जागृतीमाजीं देह हा क्रीडे । परी कर्तेपणाची न जोडे । तरी सुखदुःख भोग कवणा आतुडे । स्वयें चिद्रूप आत्मा
वाउगें मनन करितां क्षणीं । कीं स्वप्नभासातें देखोनी । भिन्न पाहे सर्व आपणाहूनी । स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ८३ ॥
गाढ जरी झोंप लागतां । नेणिवेची नसे वार्ता । सर्व काळ देखणा तत्त्वतां । स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ८४ ॥
तैसेंचि समाधिकाळीं आपणा । येऊं नेदी ध्यातृध्याना । ध्येयरूपाचि अनुभवाविना । स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ८५ ॥
एवं जागृतीमाजीं मी माझिया । स्पर्शों नेदी विश्वाभिमानिया । एकरूप पाहतसे अद्वयां । स्वयें चिद्रूप आत्मा ॥८६॥
ध्यासेंही कर्तृत्वा नातळे । भोक्तेपणाही न उफाळे । तैजस ठायींचा ठाईं गळे । स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ८७ ॥
सुषुप्तींत किंवा समाधींत । भिन्नत्वाची नेणेचि मात । प्राज्ञ अभिमानाचा होता निःपात । स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ८८ ॥

---

**चिदचिद् ग्रंथी**–अनेक प्रकारची सांगितलेली चित्प्रभा व ईश्वरापासून देहापर्यंत बत्तीस तत्वें जड हीं एकत्र झालीं नसतां दोन्ही एकच आहेत असें मानणें यास चिदचिद् ग्रंथी म्हणतात.

दोरी आणि सर्प एक होणें त्याप्रमाणें जड बत्तीस तत्वें आणि चित्प्रभा एक होणें हें उगाच अज्ञानामुळें मानणें आहे असें समजून जो या ग्रंथीचा भेद करील तोच उत्तम अधिकारी, तो पुन्हा ग्रंथी पडूं देणार नाहीं.

ग्रंथी–जडास चिद्रूप मानणें व चिद्रूपास जड मानणें.

चित् म्हणजे चित्प्रभा आणि अचित् म्हणजे चिद्रूप नाहीं अशीं बत्तीस तत्वें, त्यांचा एके ठिकाणीं मिलाफ होणें यांस चिदचिद् ग्रंथी म्हणतात. या ग्रंथीचा भेद करणें चित्ताचे धर्म चित्ताकडे राखून, जडाचे धर्म जडाकडे राखणें, व हीं दोन्ही एकत्र मिळालींच नाहींत असें जाणणें, याचें नांव चिदचिद् ग्रंथीचा भेद. हा भेद करून जड, जीं निवडलेलीं बत्तीस तत्वें त्यांचा मीपणा येऊं देऊं नये व चिद्रूप जें ब्रह्म तें आपण व्हावें. देहादिकांचें जरी अनेक प्रकारचे व्यापार झाले, तरी मी असंग आहे, अशी आपली अचळ स्थिति व्हावी, हीच उत्थानरहित सहजसमाधि. हींत आपण असंग आत्मा व ईश्वरादि बत्तीस तत्वें हीं परोक्ष व मिथ्या आहेत.

चिद्रूप आत्मा देहाचे षड्विकारानें विकार पावत नाहीं, तसेंच दशइंद्रियांचे व्यापार होत असतां आपण व्यापार करीत नाहीं. जागृत, स्वप्न, सुषुप्ति व समाधि या अवस्थेंत होणारे व्यापार आत्मा करीत नाहीं; तसेंच अवस्थाचे अभिमानी आपण बनत नाहीं.

ऐसा निजांगें ब्रह्म जाहला । संशय ब्रह्मांडाबाहेरी गेला । द्वैताचा कांटाचि उपटिला । स्वयें चिद्रूप आत्मा ॥ ८९ ॥
स्फूर्तीपासून देहापर्यंत । मी म्हणोन स्वप्नींही नातळत । तेवींचि ब्रह्मादि तृणांत । सत्यत्वें नाढळती ॥ २५९० ॥
ब्रह्माचि सत्य तेचि आपण । या सर्वांसि नुद्भवेचि मीपण । तरी सत्यत्व कैंचें जरी भासमान । मृगजळापरी जग ॥९१
एवं सत्य तें मिथ्या न होय । मिथ्यालागीं सत्यत्व न ये । अहंकारादि देहांत न जाय । कदा मीपणें ॥ ९२ ॥
हेचि सहज समाधीची स्थिती । उत्थानचि नव्हे कल्पांतीं । संशय ग्रासून सहजगति । आठवावीण ब्रह्म अंगें ॥ ९३ ॥
ब्रह्मींचें अभाव असावें । तरी तया अविद्या अज्ञान म्हणावें । अविद्येविण जीवासी रूप नव्हे । तरी साभिमान कैंचा
अज्ञान जातां ज्ञानही मावळे । नुसधें विज्ञान ब्रह्माचि निवळे । तस्मात् विद्येसहित ईशत्व गळे । प्रेरकत्व त्यागूनी ।९५
ऐसे कारणरूपें जीवेश गेले । कार्यरूपें देहादि उरले । तया स्फूर्ति मात्रें जीवें स्फुरविलें । परी साभिमान मेला ॥ ९६ ॥
देह इंद्रिय प्राण बुद्धि मन । आणि स्फूर्तीही तया असे कारण । परी अज्ञान गेलेंचि निपटून । आतां उरती मृगजळवत्
याची क्रियाही प्रारब्धवशें । तिहीं अवस्थेची होतसे । परी कवणेकाळींही न उमसे । ययासी मीपण ॥ ९८ ॥
तेवींचि ब्रह्मादि तृणांत जग । ज्ञान जाहलियाचि दिसती मग । वरी सत्यता न येचि असंग । आस्ति भाति प्रिय ब्रह्म
ऐसा निश्चयचि होऊन गेला । उत्थान नव्हे तिहीं अवस्थेला । जग सत्यत्वा कीं देहाचे मीपणाला । न स्पर्शे ब्रह्मात्माहूनी
जया स्वतां उत्थान असेना । कारण कीं निश्चय नव्हे उणा । भलते अवस्थे सहसा उद्भवेना । संशय कधीं ॥ १ ॥
तया शास्त्रेंही सांगों येती । अथवा प्रवृत्ति लोकरीती । परी पुन्हां नव्हेचि भ्रांति । ऐसें परतोत्थान नसे ॥ २ ॥
अखंडैकरस ब्रह्मात्मा । स्वतां निजांगें येर हें अनात्मा । यया सत्यत्वाचि तये रूप नामा । निखळ अद्वय निश्चयें ॥ ३॥
याचि नांवें पूर्ण ज्ञान । याचि नांवें पूर्ण समाधान । हेंचि कैवल्यमुक्तीचें लक्षण । हेचि सहज समाधि ॥ ४ ॥
ययाचि ज्ञानें हरिहर । नित्य मुक्तत्वें निरंतर । आणि सनकादि ज्ञाते अपार । मागें जाहले असतीं ॥ ५ ॥
पुढें होणार आतां असती । येणेंचि ज्ञानें पावली तृप्ति । हे सत्य सत्य त्रिधा वचनोक्ति । अन्यथा नव्हे ॥ ६ ॥
ऐसें ज्ञान उत्तमाधिकारी । गुरुमुखें सच्छास्त्रानुकारी । विचारें पावती अभेद अंतरीं । निःसंशय होउनी ॥ ७ ॥
शाखा दावितांचि चंद्र लक्षिती । तैसे उपदेशमात्रें अभेदा पावती । तेचि उत्तमाधिकारी धन्य जगतीं । तीव्रप्रज्ञ जे ८

यांप्रमाणें संशयरहित निजांगें ब्रह्म ज्ञाला तो स्फूर्तीपासून देहापर्यंत बत्तीसांस स्वप्नांतसुद्धा मी असें मानीत नाहीं. तसेंच ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत सर्व पदार्थ त्यास सत्य वाटत नाहींत. तर सत्य जें ब्रह्म तें मी आपण आहें असें वाटतें. सर्वांस मीपण उत्पन्न होत नाहीं मग ते मृगजलाप्रमाणें दिसलें तरी त्यांस सत्य कसें येईल ? यांप्रमाणें जें सत्य तें मिथ्या होत नाहीं. हीच सहज समाधीची स्थिति, हींत कल्पांतींही उत्थान होत नाहीं व संशय नाहींसा सहजच होऊन आठवावांचून आपण ब्रह्म होतो. ब्रह्माविषयीं स्मरण नसेल तरच त्यास अविद्या अज्ञान म्हणावें. ती अविद्याच नाहीं तर जीव कोठून असेल ? जीवपणाच नाहीं तर अभिमान कोण धरील? अज्ञान नाहींसें झालें म्हणजे त्याबरोबर ज्ञानही नाहींसें होतें. मग नुसतें विज्ञान ब्रह्म रहातें. तेव्हां अर्थातच विद्येसहवर्तमान ईश्वर प्रेरकत्व टाकून नाहींसा होतो. यांप्रमाणें कारणरूपें जीव ईश गेले, पण त्यांचे कार्य जें देहादिक तें उरलें, त्यास स्फूर्तिमात्र जीवानें स्फुरविलें, परंतु त्याचा अभिमान गेला. बत्तीस तत्वास अज्ञान कारण आहे, तें अज्ञान गेल्यामुळें हीं बत्तीस तत्वें मृगजलवत उरलेलीं असें समजावें. यांची तिन्ही अवस्थांची क्रिया प्रारब्धानुसार होते, पण यास कधींही मीपणा उत्पन्न होत नाहीं. तसेंच ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत जग, ज्ञान झाल्यावर दिसतें, परंतु त्यास सत्यता येत नाहीं, तर आपण असंग आत्मा आहे असें जाणतो. यांप्रमाणें जो निश्चय झाला तो तिन्ही अवस्थेंतही उत्थान पावत नाहीं, व त्यास जगाचें सत्यत्व—देहाचें मीपण स्पर्शत नाहीं. ज्याचा निश्चय उणा नाहीं त्यास स्वतः उत्थान नाहीं, त्यास कोणत्याही अवस्थेंत कधींही संशय उत्पन्न होत नाहीं. मग त्यास शास्त्रें सांगोत किंवा प्रवृत्तीचे लोक लौकिकरीति सांगोत, परंतु पुन्हा भ्रांति पडून उत्थान होत नाहीं. तर आपण अखंडैकरस ब्रह्मात्मा, आपणाखेरीज सर्व बत्तीस तत्वें अनात्मा. ज्याच्या दृष्टीनें या रूपनामास सत्यता येत नाहीं तोच ब्रह्मात्मा. यांप्रमाणें जो अद्वयपणें निश्चयानें निखळ ब्रह्मातमा झाला, तोच पूर्ण ज्ञानी, व त्यालाच पूर्ण समाधानी म्हणतात. हीच कैवल्यमुक्ति—हीच सहजसमाधि, याच ज्ञानानें हरीहर तरले. सनकादिक याच ज्ञानानें ज्ञानी झाले. याच ज्ञानानें पुढेंही ज्ञाते तृप्ति पावतील. जे तीव्र बुद्धीचे शाखाचंद्र न्यायानें उपदेश होताच अभेदास पावतात, तेच उत्तम अधिकारी.

तस्मात् रविदत्ता सावधान । तूं पाहें स्वतां विचारून । ऐसा अधिकार असे कीं पूर्ण । समाधान आकळावया ॥ ९ ॥
बहु प्रकारें आह्मीं तुजला । विवेचून अर्थ सांगितला । उपदेश प्रांजलपणें केला । जेवीं आंवळा हातींचा ॥ २६१० ॥
परी तुज समाधान बाणलें । नाहीं ऐसें आम्हां कळलें । तस्मात् मंदप्रज्ञत्व दिसलें । प्रत्यक्ष आतां ॥ ११ ॥
तरी तुज विचाररूप ज्ञानासी । अधिकार नसे निश्चयेंसी । तुवां कर्म अथवा उपासनेसी । जाऊन संपादावें ॥ १२ ॥
इतुकें बोलून मौन धरिलें । तेव्हां रविदत्ता कैसें जाहलें । वज्राचि काय मस्तकीं पडिलें । जाहलें शतचूर्ण ॥ १३ ॥
आहें कीं मेलों आठवेना । अंतःकरणा आली मुर्छना । शरीरीं येकवटता जाहली प्राणा । आतिक्रमण करूं पाहे १४॥
सर्व चळणवळण राहिलें । इंद्रिय ठाईंच्या ठाईं निमालें । श्वासही किमपि न चाले । थंड जाहलीं गात्रें ॥ १५ ॥
ऐशा लोटतां घटिका दोन । कांहीं प्राण पावला चलन । दीर्घ श्वास प्राणें दाटून । सोडिता जाहला ॥ १६ ॥
पुढें चिरकाळें मन उद्भवलें । तेव्हां हळुहळु नेत्र उघाडिले । परी नेत्रांसी कांहीं न दिसे पाहिलें । मन भ्रमलें म्हणोनि१
नंतर आठवीतसे मानसीं । कीं सद्गुरुनें उपेक्षिलें मजसी । आतां कोणता उपाय जळचरासी । जेवीं जीवनाविण१८
तया तळमळीसी काय पुसावें । तप्तपात्रीं कण भाजावे । शेखीं प्राणाचेंही उत्क्रमण नव्हे । उगी चरफड अंतरीं १९ ॥
नेत्रांसीही अंधता आली । वाणीसी तों बोबडी वळली । सर्व गात्रें कांपूं लागलीं । मस्तक झाडितसे ॥ २६२० ॥
बळें बोलतां येकाचें येक । शब्द होत असती भ्रामक । चित्तासी फुटेचिना तर्क । हां हां मेलों म्हणे ॥ २१ ॥
कंठ सद्गद बाष्पें दाटला । नेत्रद्वारें पूर चालिला । तो काहार नव जाय सोसवला । श्रवण करितां मुमुक्षा ॥ २२ ॥
ऐसे दोन मुहूर्त लोटल्यावरी । बलात्कारें अवस्था सारी । उठोनि लोळे चरणावरी । उपेक्षूं नये म्हणे ॥ २३ ॥
अहा अहा हो सद्गुरुस्वामी । मी जळालों बाह्य अंतर्यामीं । उपेक्षूं नये पाववा विश्रामीं । अभय शीतळकरें ॥ २४ ॥
मी अन्यायी अपराधी परी स्वामीचा । मंदप्रज्ञ अनधिकारी साचा । जैसा पुत्र मूर्ख समर्थ मातेचा । परी त्या माता नुपेक्षी
जरी अन्यथा उपेक्षी माता । तरी तया दुजा उपाय कोणता । तेवीं दयाळुवें मज उपेक्षितां । त्राता त्रैलोक्यीं नसे ॥ २६
हरिहर रुष्ट जाहले जरी । तरी तया सद्गुरु असे कैवारी । सद्गुरु कोपतां पुरारिमुरारि । संरक्षितीना ॥ २७ ॥
आतां कोणतें मी कर्म करूं । अवघा स्वप्नांतील प्रकारु । अथवा जाऊनियां पाय धरूं । कोण्या निर्बळाचे ॥ २८ ॥
गंधर्वनगरीं चित्रींची सेना । त्यांत कवण थोर कवण साना । तेवीं हरिहरादि उपासना । आतां मज करणें अयोग्य२९
मृगजळासी धरण बांधावें । त्यांतील मासोळे अपेक्षावे । तैसें म्यां यज्ञादि कर्म करावें । स्वर्गादि अपेक्षूनी ॥२६३०॥
याची जोंवरी वोळखी न होती । तोंवरी केलीच केली जनरीती । आतां मज अधिकार नसे पुढती । कर्म कीं उपासनेचा
करितां करितां जाहला शीण । भूस बडविलें सांडूनि कण । सांदिसें प्रारब्धउदयें दर्शन । श्रीचरणांचें जाहलें ॥ ३२ ॥
मृगजळा देखोनि धांवतां । मृगा पाणी मिळालें अवचिता । तेवीं अनंत पुण्यांचिये सुकृता । जोडले श्रीचरण ॥ ३३ ॥
ऐसा मज अलभ्य लाभ जाहला । तो केवीं जाय मनें त्यागिला । जरी दयाळुवें ढकलून घातिला । तरी चरण न सोडी
भूकेलिया अमृतपान । जोडतां केवीं फिरवी वदन । तृप्ति जाहलिया सहज आपण । तेथेंचि शयन करी ॥ ३५ ॥
तेवीं भवार्णवीं सद्गुरुपाय । नौका जोडलीसे निर्भय । तेथें ब्रह्मामृताचा लाभ होय । जिव्हाग्रीं अकस्मात ॥ ३६ ॥
तेथूनियां परते कवण । अविट तृप्ति जाहलियाविण । तृप्ति जाहलियाहि होय लीन । जेथील तेथें ॥ ३७ ॥
मध्यें जरी परतें सारिलें । तरी तें मरेल जरी उपेक्षिलें । हें उचित नव्हे दीनासी लोटिलें । समर्थ दातिया उदारा ॥३८
हें असो कामधेनूनें वत्सासी । कीं मेघें अनन्य चातकासी । अथवा चंद्रें कधीं चकोरासी । उपेक्षिलें न देखों ॥ ३९ ॥
दुष्ट जलचरें जाहलीं जरी । तरी जळें टाकिलीं बाहेरी । ऐशी मातही श्रवणावरी । आली नाहीं अद्यापि ॥ २६४० ॥
तेवीं सद्गुरूसी शरण आला । तो दयाळुवें पिटून घातिला । ऐसा न देखों न ऐकिला । कवणेही काळीं ॥ २६४१ ॥
परी मजविशीं उद्भवलें काय । हा नेणों कैसा उदेला समय । परी मी न जाय हाचि निश्चय । उपेक्षितांही दयाळें४२
मी मरमरून शत जन्म घेईन । परी न सोडीं हे चरण । हे प्रतिज्ञाचि सत्य प्रमाण । अन्यथा नव्हे नव्हे ॥ ४३ ॥
इतुकियावरीही समर्थें । उपेक्षूनियां दवडितां अनाथें । काय उपाय कवणिया अर्थें । घडेसा नाहीं ॥ ४४ ॥
परी दयाळुवें बीद रक्षूनी । स्वीकारावें दीनालागुनी । निववावें अभयवचनीं । हेंचि उचित ॥ ४५ ॥
ऐसें विनऊनि पुढती पुढती । चरणीं लोळे नेत्राश्रु वाहती । पुन्हां बद्धांजलि मागुती । पुन्हां नमस्कार ॥ ४६ ॥
ऐसा अनन्य रविदत्त । देखतां स्वामी आनंदभरित । उचलूनि आलिंगिला त्वरित । म्हणती ना भी ॥ ४७ ॥
तुजसी वाउगेंचि वाटलें । कीं मजला गुरूनें उपेक्षिलें । परी आम्हीं नाहीं गा अंतरीं आणिलें । कीं त्यागावें ऐसें ॥ ४८ ॥
अरे शिष्यासी अलभ्य गुरु । तेवींच गुरूसी अलभ्य लेंकरूं । तरी आम्हीं उपेक्षा केवीं करूं । परी निर्धार पाहतसों ॥ ४९ ॥

सद्‌गुरुसी अनन्यभावें। जरी सर्व त्यागूनि शरण यावें। तेणें अबोधें परतोनि जावें। तरी वाहावें बीद कासया॥ २६५०॥
अनन्य मात्र शरण यावा। मग मंद कीं तीव्रप्रज्ञ बरवा। तो सद्‌गुरूनें उद्धरावा। सत्य सत्य त्रिवाचा॥ ५१॥
अनन्य म्हणिजे सद्‌गुरूविना। दुजें दैवतचि असेना। आणि अन्य विषयही दिसेना। निस्पृहत्व सर्व जगीं॥५२॥
याविण वरपंगी वरी वरी। अनन्यत्व दावी बहुपरी। परी भाव नाहींच अंतरीं। असे तरी जायाचा॥ ५३॥
ऐसिया कुचीर शिष्यासी। उपेक्षितां दोष नाहीं गुरूसी। मग तो तीव्रप्रज्ञ जरी श्रवणासी। परी तो वंचक॥ ५४॥
तस्मात् सच्छिष्य अनन्य। तो असो मंद कीं तीव्रप्रज्ञ। तोचि गुरूपासूनि होतसे धन्य। श्रवणें कीं अभ्यासें॥ ५५॥
तीव्रप्रज्ञ जो उत्तम अधिकारी। तो श्रवणमात्रें विवेचन करी। दृढ अपरोक्ष समाधान अंतरीं। पावे बोलिल्या न्यायें
मंदप्रज्ञासी ऐसें न घडे। अभ्यासें हळुहळु पवाडे। दृढ अपरोक्ष समाधान जोडे। तयाचि ऐसें॥ ५७॥
जो विचारें अपरोक्षता पावे। तेंचि अभ्यासें समाधान पावावें। हें अन्यथा कधींच नव्हे। शेवटीं स्थिति एक॥ ५८॥
तस्मात् रविदत्ता सावधान। हा खेद टाकीं होई स्वच्छ मन। तूं जरी अससी मंदप्रज्ञ। तरी अभ्यासें मेळऊं॥ ५९॥
ऐसें अभयवचन ऐकतां। आनंद जाहला रविदत्ता। सर्व भवदुःखाची सोडून चिंता। श्रवणीं तत्पर होय॥ २६६०॥
गुरु म्हणती गा पाडसा। आम्ही तुजसी बोलिलों सहसा। कीं कर्म अथवा उपासना करीं जैसा। अधिकार तुज असे
याचा अर्थ तुज न कळतां। उपेक्षिलें म्हणून मानिलें चित्ता। तरी तयाचें तात्पर्य ऐकें आतां। निवांत होऊनी॥ ६२॥
विचारद्वारा जें पावावें। त्या स्थितीतें अभ्यासें पावे। त्या अभ्यासाचें लक्षण समजावें। तेचि उपासना॥ ६३॥
उपासना म्हणिजे लक्ष्य ब्रह्मात्मा। ऐक्यत्वें निवडिला परमात्मा। याचें अनुसंधान धरी महात्मा। निदिध्यासरूपें॥६४॥
अभ्यासा नाम निदिध्यासन। तेंचि बापा ध्यातृध्यान। हेंचि कीं निर्गुण उपासन। कर्तृतंत्ररूपें॥ ६५॥
तयाचेहि प्रकार दोन। येक सगुण येक निर्गुण। तें पुढें प्रांजळ असे निरूपण। कळेल ऐकतां॥ ६६॥
तेचि उपासना करीं जाई। ऐसें बोलिलों निःसंशयीं। यांत उपेक्षिलें कवणें काई। आतां कर्माचें रूप ऐकें॥ ६७॥
हाही उपासनेचा अभ्यास। जरी न ठाके निदिध्यास। तरी तेणें आदरावें कर्मास। बोलिजे तेवीं॥ ६८॥
कर्म म्हणिजे देहाची क्रिया। मन आणि दशेंद्रियां। अर्पण करोनि गुरूपायां। गुरुभक्ति करावी॥ ६९॥
कायिक वाचिक मानसिक। गुरुसेवा हेंचि कर्म एक। यावांचून जें यज्ञादिक। तें प्रवृत्तीचें॥ २६७०॥
तें जेव्हां आरंभीं त्यागिलें। तेव्हांचि मुमुक्षुत्व पावलें। तेंचि कर्म तया योजिलें। न जाय मुमुक्षा॥ ७१॥
तस्मात् गुरुभक्ति हेंचि कर्म। जेणें सर्व कर्म धर्म पावती विराम। आणि झडकरी देतसे विश्राम। जें विचारज्ञानें पाविजे

---

ज्यांस विचार-रूप ज्ञानाचा अधिकार नाहीं, त्यानें कर्म अथवा उपासना संपादावी. रविदत्ता तूं मंद-बुद्धि दिसतोस करितां तूं कर्म अथवा उपासना कर जा. हें शंकराचार्यस्वामींचें वचन ऐकून रविदत्तास फार वाईट वाटलें आणि फार दुःख झालें. सद्‌गुरूस जो सत्‌शिष्य अनन्यभावें शरण गेला त्यास सद्‌गुरु उपेक्षीत नाहींत, असें असून माझी उपेक्षा गुरूनीं कां केली अशी रविद-त्तास शंका होती.

अनन्य म्हणजे सद्‌गुरूवांचून ज्यास दुसरें दैवतच नाहीं; व अन्य विषयही त्यास सद्‌गुरूवाचून दिसत नाहींत. याप्रमाणें सर्व जगांत ज्याचें निस्पृहत्व आहे तो मंदमती किंवा तीव्रबुद्धि असो, त्यास गुरु श्रवणानें किंवा अभ्यासानें भवसिंधूच्या पार नेतात. तीव्र बुद्धीचा गृहस्थ श्रवण झाल्यावर विवेचनकरून अपरोक्ष समाधान पावतो, तसा मंदबुद्धी पावत नाहीं. तर तो अभ्यासानें हळूहळू अपरो-क्षज्ञानास पावतो. विचारानें जें अपरोक्षज्ञान होतें तेंच अभ्यासानें प्राप्त होतें. अभ्यासाचें लक्षण तीच उपासना.

**उपासना**—लक्ष्य ब्रह्मात्मा आणि आपण यांचें ऐक्य जाणून त्यांचें निजध्यासरूपानें अनुसंधान धरणें त्यास उपासना म्हणतात.

**अभ्यास**—निजध्यास हेंच धातृध्यान. हीच कर्तृतंत्र-रूपानें निर्गुण उपासना आहे. हीसच अभ्यास म्हणतात.

ही निजध्यासरूप उपासना जर रविदत्ता तुला न होईल, तर तूं कर्म कर असें सांगितलें. यांत तुझी उपेक्षा केली नाहीं तर अधिकार पाहून त्याप्रमाणेंच तुला साधनें सांगत आहे.

**कर्म**—देहाची क्रिया, मन आणि दशइंद्रियें गुरुपायीं अर्पून गुरुभक्ति करणें यास येथें कर्म असें म्हटलें आहे.

वास्तविक कायिक, वाचिक, मानसिक, गुरुसेवा हेंच कर्म आहे. याखेरीज जीं यज्ञयागादिक कर्में तीं प्रवृ-त्तीचीं आहेत. हीं टाकिलीं तेव्हांच मुमुक्षुत्व प्राप्त झालें. मग आतां त्यास आम्ही प्रवृत्तीचें कर्म कर म्हणून कसें सांगूं ? तें कधींच सांगणार नाहीं. पण ज्य चेयोगानें पूर्वीचा अधिकारी नसला तरी तो अधिकारी होईल व पुढें उपासना करून मोक्षास पावेल. असें कर्म म्हणजे ज्यांत सर्व कर्म, धर्म, विश्राम पावतात; तें गुरुभक्तिरूप

ऐशिया गुरुभक्तीच्या योगें । अधिकारही पूर्वील नलगे । सांग होतसे लागवेगें । अल्पचि काळें ॥ ७३ ॥
मग पूर्वींचें मुमुक्षुत्व जयासी । तो तरी सहज लागे उपासनेसी । हें असो वस्तुतंत्रहि ज्ञानासी । पात्र होय ॥ ७४ ॥
ऐसें कर्म हे गुरुभक्ति । जया घडे साधकाप्रति । बहु काय बोलावें पुढती । मुक्ति तळहातीं त्याचे ॥ ७५ ॥
तस्मात् रविदत्ता गुरुभक्ति ऐशी । आदरावी तुवां मानसीं । तरी त्वरित ज्ञानासी पात्र होशी । ऐसा हेतु आमुचा ॥ ७६ ॥
ऐसे ऐकतांचि रविदत्तासी । अति आनंद जाहला मानसीं । जेवीं भरतें दाटे समुद्रासी । तेवीं उचंबळे ॥ ७७ ॥
आधींच शर्करेची आवडी । वरी वैद्यें दिधली तेचि पुडी । तेवीं गुरुभक्तीची अति गोडी । तेचि आज्ञा त्यावरी ॥ ७८ ॥
पूर्वीं जाईं ऐसें उपेक्षिलेंसे म्हणतां । वरी गुरुभक्ति करीं आज्ञापितां । तें कैसें जाहलें रविदत्ता । दृष्टांतें सांगूं ॥ ७९ ॥
कोणी येकें परिस मारिला । तेणें शतचूर्ण मस्तक जाला । परी लोहाचा वर्ण पालटला । तेणें दुःख नासून सुख होय ८०
तैसें जा म्हणतां दुःख वाटलें । तें गुरुभक्ति करीं म्हणतां गेलें । अतिशय सुखची उफाळलें । महालाभ देखतां ॥ ८१ ॥
तया आनंदें नाचूं लागे । वस्त्र उडवीतसे वेगें । वाहवा म्हणोन चरणा लागे । प्रदक्षणा करी ॥ ८२ ॥
या लाभापरता लाभ नाहीं । धन्य मी प्राप्त जाहलों पाहीं । म्हणून नाचे उभवून बाही । आनंदें दाटोनी ॥ ८३ ॥
गुरुभक्ति मज प्राप्त होतां । उपासनाही आली हाता । ज्ञानही जाईल केउता । मातेविण पुत्र ॥ ८४ ॥
मिळतां एक वृक्षाचें मूळ । वृक्ष तो हाता आला सकळ । पत्रें शाखा पुष्प फळ । जाईल कोठें ॥ ८५ ॥
तैशी गुरुभक्तीची प्राप्ति । सहपरिवारें मोक्षसंपत्ति । ज्ञान साधन विचारादि होती । दास साधकाचे ॥ ८६ ॥
अहो केवढा लाभ जाहला । काय हो मोक्षाचा ध्वज उभारला । पार नाहीं माझिये भाग्याला । यया त्रिभुवनीं ॥ ८७ ॥
तस्मात् अहोरात्र गुरुभक्ति । सेवाचि करीन अति प्रीतीं । वोवाळून सांडीन मुक्ति । गुरुचरणावरूनी ॥ ८८ ॥
कायेसी अखंड गुरुसेवा । वाणीसी गुरुभजनाचा ठेवा । मनासी निदिध्यास सदैवा । गुरुध्यानाचा ॥ ८९ ॥
कायेसी किंवा मनासी । वाणीसी कीं सर्वेंद्रियांसी । उसंतचि नेदीं कवणासी । गुरुसेवेविण ॥ २६९० ॥
आतां मज गुरुसेवेपरतें कांहीं । या त्रैलोक्यीं काज नाहीं । प्राप्तव्य नसे सहसा कांहीं । गुरुभक्तीपरतें ॥ ९१ ॥
काय हो सद्गुरूनें कृपा केली । माझी मनवांछा पुरविली । ऐशी चित्तवृत्ति आनंदली । रविदत्ताची ॥ ९२ ॥
हें पाहूनी सद्गुरु शंकर । म्हणती हा आधींच गुरुभक्तीसी तत्पर । यासी नाहीं म्हणेल अधिकार । ऐसा कवणु ॥ ९३ ॥
जरी कांहींशी प्रज्ञा मंद । तेही अभ्यासें होय विशद । सहजीं ज्ञान होईल अभेद । अपरोक्ष दृढतर ॥ ९४ ॥
तस्मात् यासी आधीं अभ्यास । सांगावा उपासनारूप निदिध्यास । सत्वरचि पावेल अपरोक्षास । येथें संशय नाहीं ॥ ९५ ॥
परी आधीं यासी पुसावें । जितुकें निरूपण जाहलें बरवें । त्यांत कोणतें बाणलें अनुभवें । तें कळलिया पुढें बोलूं ॥ ९६ ॥

---

कर्म कर, म्हणून सांगत आहों. याचेयोगानें पूर्वींचा मुमुक्षु असला तर तो सहजच उपासनेस लागेल. पण जो पूर्वींचा मुमुक्षु नाहीं तोही उपासनेस लागतो. व पुढें उपासनेचे-योगानें वस्तुतत्वज्ञान त्यास प्राप्त होतें. म्हणून ज्यास अशी गुरुभक्ति घडेल त्याचे हातांत मुक्ति आहे असें समजावें. इतकें फळ गुरुभक्तींत आहे. म्हणूनच आम्ही तुला रविदत्ता कर्म करण्यास सांगत आहों. हें ऐकून रविदत्तास फार आनंद झाला. कारण त्यास पूर्वीं-पासून गुरुसेवेची आवड होतीच, त्यांत आतां गुरूंनीं गुरुसेवा करावी म्हणून सांगितलें मग तर फारच बरें वाटलें.

जा, गुरुभक्ति कर. यांत जा असें म्हटल्यानें उपेक्षा होते व पुढें गुरुभक्ति कर म्हटल्यानें पुन्हा जवळ धरल्या-प्रमाणें होतें. तेंच रविदत्तास कसें झालें, त्याविषयीं उदा-हरण देऊन सांगतों. कोणी एकानें लोखंडाचे पुतळ्याचे मस्तकावर रागानें परीस मारिला तेणेंकरून त्या लोहाचे शतशः तुकडे झाले, परंतु लोखंडाचें लोखंडपण जाऊन सुवर्णत्व आलें. तसें रविदत्तास जा म्हटल्यानें जें फार दुःख झालें तें दुःख, गुरुभक्ति कर असें म्हटल्यानें जाऊन मोठा लाभ झाला; असें वाटून त्यास फारच आनंद झाला. व मला गुरुभक्ति प्राप्त झाल्यानें उपासना व ज्ञान सहजच प्राप्त झालें असें मी समजतों. करितां मी रात्रंदिवस गुरुभक्ति करीन व गुरूचे चरणावरून मुक्ति ओंवाळून टाकीन. मला गुरुसेवेवांचून त्रैलोक्यांत कायिक वाचिक, मानसिक कोणतेंच करणें नाहीं. तर एक गुरु-भक्ति प्राप्त करून घ्यावयाची. असा रविदत्ताचा भाव पाहून शंकराचार्य म्हणतात कीं, हा अधिकारी नाहीं असें कोण म्हणेल ? अधिकारी तर आहेच, पण थोडी बुद्धि मंद आहे ती अभ्यासानें तीव्र होईल, व पुढें यास अपरोक्षज्ञान सहज दृढ होईल; करितां यास अभ्यास म्हणजे उपासनारूप निजध्यास सांगावा, परंतु पूर्वीं जें आपण सांगितलें आहे तें यास किती स्मरत आहे व कोणकोणतें बाणलें आहे तें पाहूं. आणि मग अभ्यास सांगूं.

ऐसे विचारून मानसीं । आचार्य म्हणती रविदत्तासी । काय जे अनुभव असेल तुजसी । तें तें बोलून दाखवीं १७
पूर्वीपासून जें निरूपण । जैसें जैसें जाहलें विवेचन । सत्य मिथ्या हे प्रकार दोन । विचारा आलें तें सांगें ॥१८॥
ऐसें सद्गुरूचें वचन ऐकतां । आनंदोनि जाहला साष्टांगें नमिता । सर्वेचि जाहला विनविता । बद्धांजलि बैसोनी १९
जी जी समर्था कृपा करून । उपदेशिलें दीनालागून । तितकें उच्चारावें केवीं निरूपण । परी यथामती निवेदूं २७००
मुख्य प्रत्यगात्मा ब्रह्म पूर्ण । सच्चिदानंद सघन । तेंचि निजांगें स्वयें आपण । अखंडैकरस ॥ १ ॥
तेथें न होऊन माया उद्भवली । विद्या अविद्यात्मक नाथिली । तेचि बत्तिसां प्रकारें विभागली । ईशादि तृणांत २
त्या बत्तीसांत प्रकार तीन । जड चंचळ तिसरें चेतन । परी तें मिथ्यारूप संपूर्ण । रज्जुसर्पापरी ॥ ३ ॥
स्थावरजंगमात्मक पांच खाणी । हें तों केवळ असती जडपणीं । चंचळामाजींही प्रकार तिनी । असती वेगळाले ॥४॥
प्राण आणि कर्मेंद्रिय । हे चंचळत्वें जडमय । ज्ञानेंद्रिय आणि मन बुद्धि द्वय । चंचळत्वें जाणती ॥ ५ ॥
परी जाणणें नव्हे मनबुद्धीचें । तें स्फोरकत्व प्रतिबिंब जीवाचें । ह्मणोनि परप्रकाशत्व साचें । बुद्ध्यादिकां चंचळा ६
यया चंचळाचा तिजा प्रकार । वृत्तिरूप स्फूर्तिमात्र । ते निर्विकल्पत्वें जाहला विकार । परी ते जडरूप ॥ ७ ॥
विद्या अविद्या तया स्फुरणीं । जडरूप असती दोनी । जीवेशास्तव दिसती झळपणीं । चेतनत्वा ऐशीं ॥ ८ ॥
परी ते स्फूर्ति परप्रकाशक । एवं चंचलाचा प्रकार एक । आतां तिसरें चेतन रूपक । जीवेश दोनी ॥ ९ ॥
हे जरी चेतनत्वें दिसती । परी यांसी रूपचि नसे निश्चितीं । वाउगी मुख्य बिंबा ऐशी आकृति । भासली प्रतिबिंबा१०
एवं चेतनही जया नांव । तेंहि परप्रकाशक ईश जीव । मा येर तो चंचळ जड स्वभाव । तया सांगणें नको ॥ ११ ॥
या रीतीं हे बत्तीस प्रकारें । प्रगटले असती हे सारे । ऐशियासी कोण ह्मणे खरें । भ्रमावांचोनी ॥ १२ ॥
जैसा प्रवाहीं वृक्षावरी बैसला । तो आपणातें असून विसरला । जळीं पाहत असे जो पाडिला । आपणांचि जैसा १३
परी पडिला तो खरा असेना । खरा नाहीं तो कदा दिसेना । नसे तो प्रियही होईना । त्या प्रकारें वृक्षस्थ ॥१४॥
वृक्षस्थ बैसला जो आहे । तयामुळें पडिला दिसत आहे । म्यां न पडावें जें वाटताहे । हें वृक्षस्थामुळें ॥ १५ ॥
तस्मात् आहे दिसे आणि प्रियकर । तो एक वृक्षस्थाचि साचार । येर जो पडिला तो भासमात्र । नसे न दिसे अप्रिय
ऐशिया दृष्टांतासम । येक वास्तविक आत्मा ब्रह्म । येर हा बत्तीस तत्वांचा भ्रम । दिसे परी जाहला नाहीं ॥ १७ ॥
तयाचे अस्तित्वें हे आहेती । तयाच्या भासें हे दिसती । तयाच्या प्रियास्तव प्रिय होती । उत्पत्तिकाळींही ॥ १८ ॥
वेगळे सत्यत्वचि यासी नसतां । आहे असें ह्मणावें केउता । तस्मात् वास्तविक यासी असत्यता । सप्रत्यय असे १९
नाहीं ते कदा दिसतीना । तरी केवीं वर्तती सचेतनपणा । म्हणोनि जडरूपता संपूर्णा । असे अकृत्रिम ॥ २७२० ॥
क्षणां आवडती क्षणां विटती । तरी प्रियत्व कोठें ययाप्रती । आणि सदा सुखदुःखें शिणती । ह्मणोनि दुःखरूप २१
एवं असज्जड दुःखात्मक । हे अनात्मजात सकळिक । जरी जीवेश हे चेतनरूपक । परी समान सर्व ॥ २२ ॥
ब्रह्मात्मा एक सच्चिदानंद । पूर्णपणें येक अभेद । या सर्वांमाजींही विषद । अस्ति भाति प्रियरूपें ॥ २३ ॥

---

असें मनांत आणून शंकराचार्य रविदत्तास मागील झालेलें निरूपण विचारतात. त्यावर रविदत्त उत्तर देतो कीं, आपण जें सांगितलेंत तितकें मला कसें सांगवेल, पण जें माझे बुद्धीस स्मरत आहे तें मी यथामति सांगतों.

मुख्य प्रत्यगात्मा ब्रह्म आपण, त्या आपले ठायीं न होऊन माया झाली, पुढें ती ईश्वरापासून तृणापर्यंत बत्तीस प्रकारानें विभागली. त्या बत्तिसांचे तीन प्रकार १ जड. २ चंचळ. ३ चेतन हे तिन्हीही मिथ्या आहेत. स्थावरजंगमात्मक पांच खाणी ह्या जड. चंचळाचे तीन प्रकार, प्राण, कर्मेंद्रियें हीं चंचळत्वें जडमय आहेत. हा पहिला प्रकार. दुसरा ज्ञानेंद्रियें आणि मन बुद्धी हीं चंचळत्वें जाणतीं. तिसरा प्रकार वृत्तीरूपस्फूर्ति ही ही जाणतीच, पण परप्रकाशक म्हणून जडच. याप्रमाणें चंचळाचे तीन प्रकार झाले. आतां चेतनत्वें जे जीवशीव हे चेतन असे वाटतात, परंतु हे आत्म्याचे प्रतिभास आहेत. ते आत्म्यासारखे प्रकाशक दिसतात परंतु ते खरे प्रकाशक नव्हत. तर तेही परप्रकाशक आहेत. बत्तीस तत्वें झालीं व तीं प्रकाशित दिसतात, परंतु तीं भ्रमामुळें दिसतात. येरव्हीं त्यांस आत्म्यावांचून दुसरें रूप नाहीं म्हणून हीं असत्य. हीं क्षणभर आवडतात, क्षणभर नावडतीं होतात म्हणून हीं प्रिय नाहींत. नेहमीं सुखदुःखानें शिणतात म्हणून हीं दुःखरूप. याप्रमाणें हीं बत्तीस तत्वें असत्‌जड दुःखात्मक आहेत. सर्वांत ब्रह्मात्मा अस्तिभातिप्रियत्वानें आहे.

सर्वत्रीं असे आहेपणा । सर्वत्रीं ब्रह्मात्मा देखणा । सर्वीं प्रिय अकृत्रिमपण । असे स्वतःसिद्ध ॥ २४ ॥
याचा उत्पत्ति स्थिति संहार । परी तिहीं काळीं आत्मा निर्विकार । अथवा सुषुप्ति स्वप्न जागर । या तिहींमाजीं अखंड
पांचचि कोश सर्व तत्वांचे । पंचकोषात्मक देहत्रय साचें । देहत्रयीं नाम व्यापाराचें । जागर स्वप्न सुषुप्ति ॥ २६ ॥
देहादि स्फूर्ति यया सर्वीं । रूपीं व्यापून चिन्मात्र गोसावी । इतुकियाची वर्तणूक व्हावी । या गुणदोषींही व्यापक
एवं धर्मधर्मीरूप गुण । सर्वत्रीं व्यापला सच्चिदूघन । परी त्या त्या विकारा न स्पर्शे आपण । परिपूर्ण जैसा तैसा
तिहीं अवस्थेंत एकरूप । कधींच नव्हे अधिक अल्प । अवस्थाचि पालटती आपोआप । येक येतां दोनी जाती २९
असो रूपीं अथवा गुणदोषीं । ब्रह्मात्मा येक निर्विशेषीं । व्यापकत्व असोनि अशेषीं । धर्मधर्मी ऐसा नव्हे ॥२७३०॥
ऐसा असग ब्रह्मात्मा पूर्ण । असोन कैसें जाहलें विस्मरण । व्यर्थ सर्व तादात्म्याचा अभिमान । घेऊनि बंधनीं पडे
मी माझें आणि कर्ता भोक्ता । हे वाउगीच घेतली अहंता । पापपुण्य कल्पून योनी अनंता । भ्रमें जन्मे मरे ॥३२॥
जरी ऐसें अज्ञानेकडून । जीव भोगी जन्ममरण । परी ब्रह्मात्मा जो सच्चिद्घन । निर्विकारत्वें सदा ॥ ३३ ॥
ऐसा वाउगाच नसोनि बंधनीं । पडिला जीव अभिमान घेऊनी । हा भ्रम जाईल जेव्हां निपटूनी । तेव्हांचि मोक्ष ॥३५॥
ऐसा बंधमोक्षाचा निश्चितार्थ । मज बाणविला कृपायुक्त । परी मी मंदप्रज्ञ असे जो सिद्धांत । निश्चय बाणेना ॥ ३५॥
कारण कीं ब्रह्मात्मा जो असंग । सर्वांहून विलक्षण अंग । प्रतीतीस आला नाहीं अभंग । स्फूर्तिअभावीं कैसा ॥ ३६॥
माया विद्या अविद्यात्मक स्फूर्ति । मावळतां असे जो सच्चिन्मूर्ति । तो स्वानुभवें अपरोक्ष रीतीं । कैसा तो निश्चय नव्हे
तो ब्रह्मात्मा तरी आपण । येर हीं अनात्मजात तत्त्वें संपूर्ण । येविशीं कांहीं नसे अनुमान। परी सर्वातीत कैसा न कळे
स्फूर्तिपासून ऐकीकडे । ज्या ज्या रीतीं स्वानुभवें आतुडे । तें निवेदूं गुरुचरणांपुढें । यथामति कळलें तें ३९ ॥
सर्वांमाजीं जो आहेपणा । स्वतःसिद्ध असे पूर्णपणा । त्यावीण या सर्वांसी असेना । रूपाचि कांहीं ॥ २७४० ॥
सर्प नाहीं अंतर्बाह्य दोरी । तैसा सर्वीं ब्रह्मात्मा निर्विकारी । सर्व नाहींतचि व्यर्थ भासलीं सारीं । भ्रमेंकडोनी ॥ ४१ ॥
आहे तें अंतर्बाह्य सघन । सद्रूप ब्रह्मचि परिपूर्ण । तिहीं अवस्थेंतही येकपण । भेदावेना ॥ ४२ ॥
ऐशी सद्रूपाची प्रतीति । गुरुरूपें बाणली निश्चितीं । चिद्रूप अनुभाविलें तें यथामती । निवेदूं चरणीं ॥ ४३ ॥
जागृतीचे पंच व्यापार । शब्दस्पर्शादि विकार । ते शब्दस्पर्श सांडून दूर । ज्ञान येक निकडिलें ॥ ४४ ॥
तेंचि ज्ञान स्वप्नकाळीं । अविछिन्न भास विषयमेळीं । तया ज्ञानासी विकार समूळीं । सहसा असेना ॥ ४५ ॥
तेंचि सुषुप्तिकाळीं नेणिवेंत । नेणपणासी अवलोकित । हा प्रत्यय उत्थानकाळीं येत । सामान्यत्वाचा ॥ ४६ ॥
गुण विकाररहित उगेपणीं । ज्ञान प्रत्यय येतें स्फुरणीं । परी स्फुरण जातां मावळूनी । शून्यदशा होय ॥ ४७ ॥
दृश्यामाजीं दृश्याचा देखता । तो द्रष्टा अनुभविला दृश्यापरता । भासामाजील भासाचा जाणता । भासातीत साक्षी४८॥
एवं चिद्रूपस्फुरण उद्भवतां कळे । परी स्फुरण जेधवां मावळे । ते वेळीं लया साक्षी न कळे । तळमळ यास्तव ॥ ४९ ॥
आणीकही येक संशय थोर । स्फूर्तिकाळीं जें ज्ञान साचार । तें ज्ञान आणि जीवविकार । कालवलें वाटे ॥ २७५० ॥
येर हे बुद्ध्यादिक वृत्ति । इंद्रियद्वारा विषय घेती । अथवा निर्विकल्प जे स्फूर्ति । परप्रकाशकत्वें ॥ ५१ ॥
ऐशिया वृत्तीविरहित । जें कां चिद्रूप असे व्याप्त । तें अनुभवा ये टळटळित । साक्षीरूप जाणतां ॥ ५२ ॥
परी जीवाचेंही जाणतेपण । प्रतिबिंबित मिथ्या असून । शुद्धज्ञानामाजीं असे मिळून । तें निवडितां न ये ॥ ५३ ॥
एवं चिद्रूपाचें कळणें ऐसें । अनुभाविलें तें निवेदिलेंसे । आतां आनंदरूपही कळलें जैसें । तैसें निवेदूं ॥ ५४ ॥
देह प्राण इंद्रिय मन । अथवा प्रिय द्रव्यादि सर्व जन । आत्मा आवडता यां सर्वांहून । प्रतीति असे ॥ ५५ ॥
येरांची आवडी क्षण क्षण । उठे विटत असे म्हणून । हे प्रियचि न होती संपूर्ण । खरा आवडता आत्मा ॥ ५६ ॥

---

तसेंच गुणदोषांतही असून तो निर्विकारी आहे. धर्मधर्मीसारखा होत नाहीं. त्या आत्म्यासच देहतादात्म्यामुळें विस्मरण पडून अभिमानानें प्राणी बंधनांत पडला, तो अभिमानाचा भ्रम जाईल तेव्हांच मोक्ष होईल. स्फूर्तीच्या लयानंतर ब्रह्मात्मा कसा रहातो याचा अनुभव झाला नाहीं. स्फूर्तिपासून अलीकडचा अनुभव सांगतों.

सर्वांत ब्रह्माचा आहेपणा आहे तसेंच सर्वांत चिद्रूपपणा आहे व पूर्वी वर्णिलेला आहे. त्याचप्रमाणें आनंदही सर्वांत आहे. व या तिन्ही लक्षणांचा मला अनुभव आपण पूर्वी सांगितलें आहे त्याप्रमाणें आहे. पण चिद्रूप स्फुरण उठलें म्हणजे कळतें आणि तें मावळलें म्हणजे लयसाक्षि कळत नाहीं हें एक व दुसरी शंका स्फूर्तिकाळींचें ज्ञान आणि जीवविकार हीं एके ठिकाणीं कालवलीं अशीं वाटतात.

सुषुप्तिमाजीं तों सर्वांचा लय । होतां सुखःदुखाचा क्षय । येक सुखरूपाचि अद्वय । असे निजात्मा ॥ ५७ ॥
उगेपणींही सामान्य वृत्तीसी । सुखाकारता वाटे कांहींशी । परी सर्वा विलक्षण सुखैकराशी । अनुभवा न ये ॥ ५८ ॥
एवं सच्चिदानंद आत्मा पूर्ण । यथामति होय जो वेदन । तो श्रीगुरुचरणीं केला निवेदन । आणीक विनंती येक ५९
हे सर्व असज्जड दुःखात्मक । बत्तीस तत्त्वें सर्व मायीक । उत्पन्नचि नसतां कांहीं येक । मावळती तरी काय ॥२७६०॥
रज्जूवरी सर्प नसतां । दवडावा वधावा केउता । तैसा लयचि व्हावा समस्तां । इच्छी कवण ॥ ६१ ॥
जेवीं असती तेवीं पूर्व रीती । असेनात कां सहजगती । अथवा स्वस्वव्यापारीं प्रवर्तती । तरीही संशय असेना ॥ ६२ ॥
परी आपुलें असंगत्व पूर्ण । क्षणक्षणां त्याचें विस्मरण । या मिथ्यासीच होतसे मीपण । आपण तें नसतांही ॥ ६३ ॥
जेधवां मीपण देहादिकांचें । तेधवां विस्मरण असंगाचें । जेधवां विस्मरण आत्मयाचें । तेव्हां मी म्हणे देहा ॥ ६४ ॥
एवं मीपणा जो देहादिकांचा । तेव्हांचि घात पूर्णत्वाचा । हा विक्षेप निपटून जाईल साचा । ऐसें केलें पाहिजे ॥ ६५ ॥
ऐशी प्रार्थना करूनि रविदत्त । साष्टांग नमून प्रदक्षणा करित । हें जाणोनि आचार्यें त्वरित । उचलोनि आलिंगिला
बापा तुला सर्व आशय । कळला कोण कोणता तो संशय । आणि बाणला जो जो प्रत्यय । तोही विहित झाला ॥ ६७
जे जे तुला संशय असती । ते ते अनुक्रमें फेडूं भ्रांति । आणि तुजला तुझी स्वात्मप्रतीति । यथार्थ बाणवूं ॥ ६८ ॥
आतां निरूपणीं चित्त द्यावें । आणि सांगूं तैसें अभ्यासावें । तरी तुझें तुजसी बाणवावें । निःसंशय समाधान ॥ ६९ ॥
प्रथम तुजला आत्मा जीव । येकचि वाटला उभय स्वभाव । स्फूर्ति जीवाची आणि स्वयमेव । चिद्रूपता येकवटली ७०
ते आधीं देऊं निवडून । सत्यमिथ्या हे भिन्न भिन्न । पुढें आणीकही तुझे प्रश्न । साकल्य निरोपूं ॥ ७१ ॥
आतां सावधान सावधान । बहु तत्पर ऐकें निरूपण । ऐसें ऐकतां रविदत्त आपण । बद्धांजलि बैसला ॥ ७२ ॥
येथें रविदत्ताचिये पांतीं । सावध असावें श्रवणार्थी श्रोतीं । आचार्य बोलले कृपामूर्ति । भाग्यार्थ मुमुक्षूंच्या ॥ ७३ ॥

**मुक्तासुसूत्रवद्बुद्धिविकल्पेषु चितिस्तथा ॥ ९ ॥**

**मुक्ताभिरावृतं सूत्रं मुक्तयोर्मध्य ईक्षते ॥**

**तथा वृत्तिविकल्पैश्चित्स्पष्टा मध्यविकल्पयोः ॥ १० ॥**

जैशी मुक्ताफळांची माला । माजीं तंतु असे गोविला । तैसा बुद्धिविकल्पामध्यें संचला । सामान्य चित्प्रकाश ॥ ७४ ॥
मुक्तें सूत्र जेवीं आच्छादत । तेवीं चिद्रूप विकल्पीं गुप्त । मोतीं सारितां सूत्र दिसत । तेवीं विकल्पामध्यें चिद्रूप ॥ ७५
मोती येक उपलक्षण । परी मणिजात संपूर्ण । अंतरीं सूत्र तें अविच्छिन्न । येकाचि असे ॥ ७६ ॥
परी येकेक मणि ठेलून बैसतां । मार्जील सूत्र न दिसे वरुतां । तोचि मणि मागें पुढें सारितां । मध्यसंधीसी तंतु दिसे
तैसा ब्रह्म आत्मा सर्वीं व्यापक । अनंत अपरिमित एक । सूत्रा ऐसा दृष्टांत कौतुक । दिधला असे ॥ ७८ ॥
मणी बहु अनेकापरी । परी सूत्र येकचि निर्धारीं । तैसा ब्रह्मात्मा सर्व तत्त्वांमाझारीं । येकचि अनुस्यूत ॥ ७९ ॥

---

प्रश्न—१ बत्तीस तत्वें हीं असज्जडदुःखात्मक मायिक असून तीं उत्पन्नच झालीं नाहींत, मग मावळावीं असें कोण इच्छितो ? जसें दोरीवर सर्प नाहीं मग त्यास घालविणें किंवा मारणें कसें ? तो जसा आहे तसाच पूर्वीप्रमाणें असेना. २ हीं बत्तीस तत्वें आपापले व्यापारीं वापरत असतां संशय असूं नये परंतु आपलें जें असंगत्व, त्याचें क्षणक्षणा विस्मरण होतें आणि आपण बत्तीस तत्वें जीं मिथ्या, तीं नसतां त्यांविषयीं मीपणा उत्पन्न होतो. जेव्हां देहादिकांचें मीपण असतें, तेव्हां आत्म्याचें विस्मरण होतें, आत्म्याचें विस्मरण असतें, तेव्हां देहास मी म्हणतो; असा हा विक्षेप जाईल असे स्वामी तुम्ही करा.

रविदत्ता, प्रथम तुला आत्मा आणि जीव यांचा एकच स्वभाव आहे असें वाटलें, तसेंच जीवाची स्फूर्ति आणि चिद्रूपता एके ठिकाणीं जमली आहे असें वाटलें, तरी त्यांत सत्य कोण व मिथ्या कोण याचा निवाडा करूं.

मोत्यांचे माळेंत जसें सूत ओविलेलें आहे, तसा बुद्धिविकल्पांत सामान्य चित्प्रकाश आहे. मोत्यांनीं सूत जसें आच्छादित आहे, तसें विकल्पांत चिद्रूप गुप्त आहे. तें मोतीं सारल्यावर दिसतें, तसें दोन विकल्पाचे संधींत चिद्रूप दिसतें. मोत्यें एकाशीं एक ठेपलेलीं आहेत तीं सारलीं असतां सूत दिसूं लागते. मोत्यें पुष्कळ व अनेक प्रकारचीं आहेत, पण सूत एकच, तसा ब्रह्मात्मा सर्वांत अनुस्यूत एकच आहे.

बुद्धिवृत्तीपासून उठती । इंद्रियद्वारा विषयीं आदळती । तेथून येथवरी चंचळ गति । परी समाप्ति तत्क्षणीं ॥२७८०॥
इकडे तों समाप्ति तत्क्षणीं जाहली । परी दुसरी कल्पना ठेपून आली । तेही आदळून जरी मावळली । तरी तिसरी सिद्ध
ऐसे विकल्प बुद्धीवृत्तीचे । येका सलग्न येक उठती साचे । म्हणोनि मणि जैसे ठेपले माळेचे । तैसे विकल्पासी विकल्प
परी मणि असे एकदेशी । विकल्प बुद्धीपासून उठतां वेगेंशी । विषयांत आदळतां जाऊन त्यासी । समानता न घडे८३
परंतु मणि जैसे बहुत असोनि । येकमेकां राहिले ठेपोनी । तैसे विकल्प येकमेकां लागोनी । संधीविण मिळाले ॥ ८४ ॥
म्हणोनि मुक्तें दृष्टांतासी । दिधलीं असतीं चमत्काराशी । परी तो तंतु आणि मणि यासी । सहित्य कैंचें ॥ ८५ ॥
तंतु आंतचि राहिला । आत्मा तो अंतर्बाह्य संचला । परी येक म्हणून दृष्टांत दिधला । येऱ्हवीं साम्य कैंचें ॥ ८६ ॥
मणीही तैसेच साकार । संकल्प तो आकारेंवीण उद्‌गार । परी दृष्टांत दिधला येकत्र । मिनले माणिया ऐसे ॥ ८७ ॥
आणिकही येक असे कारण । सूत्रातें मणि करिती आच्छादन । तैसें विकल्पाचें जाळें मिळून । चिद्रूप आच्छादिलें ॥
यास्तव दृष्टांतासी दिधलें । म्हणून साम्य न पाहिजे कल्पिलें । चिद्रूप सूत्राऐसें नाहीं वळलें । कीं मुक्ताऐसे विकल्प असती८९
कोणी मानील शंकाकार । कीं साम्य दृष्टांत काय नसती येर । परी दृष्टांताचा चमत्कार । असे तो बोलूं ॥ २७९० ॥
मुक्तमाळा असे स्वाधीन । मणि सारितां ये स्वकरेंकडून । तंतु दिसतसे संधीमधून । स्पष्ट अपरोक्ष ॥९१ ॥
तैसे विकल्प रोधितां येती । तेव्हां स्पष्ट चिद्रूप ये प्रतीती । येर दृष्टांत बहु असती । परी पराधीन ॥ ९२ ॥
तेही साम्य जे दृष्टांत । बोलिजेती सावचित्त । आणि ते पराधीनही असत । तेंही कळेल ॥ ९३ ॥
आकाश एक परिपूर्ण सघन । तैसा आत्मा चिद्रूप आपण । तया आकाशा बहु मेघ मिळून । आच्छादित असती ९४
विकल्प तैसे बहु मिळून । करिती ब्रह्म आच्छादन । अथवा पाणियावरी तरंग ठेपून । आच्छादिती पाणी ॥ ९५ ॥
पाणी अथवा गगनासी । सर्व साम्यता घडे आत्मयासी । व्यापकत्व आणि निराकारासी । साहित्य पडे ॥ ९६ ॥
परी येका पराधीनत्वामुळें । दृष्टांतासी नाहीं योजिलें । कीं मेघ अथवा तरंग जाळें । स्वतां सारितां न येती ॥ ९७ ॥
विकल्प रोधून पाहूं येती । मध्यें चिद्रूप येतसे प्रतीती । मणि जैसें करें चाळिती । जेव्हां टळटळीत सूत्र ॥ ९८ ॥
इतुकिया हेतू मुक्ताफळांचा । दृष्टांत दिधला असे साचा । कीं साधकें अभ्यास विकल्पाचा । रोध करोनी पहावें ॥९९ ॥
सर्व साम्य जरी पाहणें । तरी आकाशाचा दृष्टांत घेणें । विकल्पाचा जरी रोध करणें । तरी स्वीकार मुक्तांचा ॥२८००
जळतरंग जरी जाहले । तरी सर्व साम्यत्वा नाहीं आले । येकदेशी आणि पातळ बोले । तस्मात् मुक्तमालेसम ॥ १ ॥
मुक्तामाळा जैशी स्वाधीन । तेवींच तरंग होती करें निवारण । तस्मात् मुक्तमालेचे समान । गगनमात्र नाहीं ॥ २ ॥
अथवा मालाशब्दें जरी घेतां । मुक्तमाला उपलक्षितां । गगनही आलेंचि दृष्टांता । वेगळें बोलणें नको ॥ ३ ॥
मुक्तमाळा मणिमाळा । तेवींच तरंग मेघमाळा । मणियांत तंतु जेवीं वोविला । तेवीं गगन जीवन व्याप्त ॥ ४ ॥
गगनीं जीवनीं कीं तंतुवरी । उठती मेघ मणि कीं तरंगलहरी । परी आच्छादित असती झडकरी । गगन जीवन तंतु
तैशी स्वरूपसागरीं कल्पना उठे । अंतरापासून विषयात दाटे । चिद्रूप आच्छादिलें गोमटें । बहुत विकल्पें ॥ ६ ॥
मणि मागें पुढें सरतां । तंतु स्पष्ट दिसे आंतौता । कीं तरंगाचे संधीत पाहतां । निश्चळ पाणी ॥ ७ ॥
मेघही आपणचि वितुळती । येकेक ठाई ढग दिसती । तेथें गगन येतसे प्रतीति । निश्चळ पोकळ अवकाश ॥ ८ ॥
ऐसेंचि विकल्पाचिये मधीं । कांहींसा अवसर संधीं । तया संधीमाजीं स्पष्ट आधीं । चिद्रूप प्रतीति बाणे ॥ ९ ॥
कोण्याही प्रकारें समजावें । म्हणोनि दृष्टांतालागीं घ्यावें । आणि विचारवंतेंही तेंचि घ्यावें । मनना योग्य जें ॥२८१०॥
सर्व साम्य असतां बहु बरें । नातरी एकदेशीही साचारें । तेंही घेऊनिया आदरें । कळावें निरूपण ॥ ११ ॥
असो आतां विकल्पाचें रूप । स्पष्ट करूं कांहीं अल्प । पुढें चिद्रूप तें आपेआप । स्पष्ट कळे कैसें तें ॥ १२ ॥

---

विकल्प हे बुद्धिवृत्तीपासून उत्पन्न होऊन ते इंद्रियद्वारानें विषयांत येतात; बुद्धि वृत्ती-पासून विषयापर्यंत त्या विकल्पाची चंचळगति आहे. व त्यांची समाप्तीही तत्क्षणींच होते. एका विकल्पाची समाप्ति झाली नाहीं तोंच दुसरा विकल्प उठतो. दुसऱ्याची समाप्ति झाली नाहीं तोंच तिसरा उत्पन्न होतो याप्रमाणें जसें मणी एकालगत एक लागलेले दिसतात, तसे विकल्प एकामागून एक उठतात. मणी सारितां ये-तात तसे विकल्प रोधितां येतात. मणी सारल्यावर सूत दिसतें तसें विकल्प रोधिल्यावर चिद्रूप दिसेल.

जागृतीमाजीं अंतरांतून । विकल्पें उठें बुद्धीपासून । तोचि इंद्रियद्वारा निघून । विषयावरी आदळे ॥ १३ ॥
आंदळतांचि विकल्प मावळे । पुन्हां दुजा अंतरांतून उफाळे । तो जो मावळे कीं झांवळे । तों बळें आदळे तिसरा १४
ऐसा उसंत निमिष्य नाहीं । मध्य संधीच न दिसे कांहीं । जैसें चक्र वेगें फिरतां लवलाही । भिन्न आरा न दिसती
चक्राच्या आरा तरी भिन्न भिन्न । फिरतां न दिसती असून । मा विकल्पाचें अति चपळपण । तेव्हां संधि कैंच्या दिसती
केव्हां शब्दाकार स्पर्शाकार । कीं रूप रस गंधाकार । केव्हां शब्दाहून शब्दांतर । विकल्प धांवती ॥ १७ ॥
केव्हां कर्मेंद्रियांची क्रिया । बोलणें चालणें अवघिया । तेंही अवलोकून लवलाह्या । ज्ञानेंद्रियांकडे धांवे ॥ १८ ॥
ऐसा क्षण एक विसांवा न होतां । विकल्पजाळें उठती तत्वतां । जैसे मेघ अंतरिक्षि दाटतां । संधीच न दिसती १९
ऐशियामाजीही चिद्रूप सघन । परिपूर्ण व्यापलें जेवीं गगन । अणुप्रायही स्थळ रितें न होणें । आंत किंवा बाहेरी २०
परी मेघें जैसें आच्छादिलें । तेव्हां गगन न दिसें कांहीं केलें । तैसे विकल्पाचि अवघे दाटले । व्याप्त चिद्रूप दिसेना
येथें विचारवंत ऐसें पाहती । कीं गगनब्रह्माची नसतां व्याप्ति । तरी मेघ विकल्प केवीं राहती । तस्मात् अंतर्बाह्य ब्रह्म २२
परी मंदप्रज्ञ केवीं निवळे । विचाराचे झावळे डोळे । ह्मणोनि तया हळूहळू आकळे । साधन अभ्यासें ॥ २३ ॥
तो अभ्यास पुढें बोलणें । प्रस्तुत येथें विकल्प वोळखणें । या रीतीं जागृतीमाजीं होणें । ऐसाचि स्वप्नीं असे २४
स्वप्न ह्मणिजे वाउगी कल्पना । प्रत्यक्ष इंद्रियविषयाविना । मग असो कीं जागेपणा । किंवा झोंपेंत स्वप्न ॥ २५ ॥
या उभय रीतीं स्वप्ना आंत । विकल्पाचें जाळें उठत । बाह्य मात्र न जाती विषयांत । परी अंतरीं घोटाळती २६
तेथेंही देह विषय ज्ञानेंद्रिय । आणि क्रिया कर्म कर्मेंद्रिय । ध्यासरूपें वासनामय । अंतरींच आठवी ॥ २७ ॥
येक विषय आठवितां दिसे । तो नासून दुजा विकल्प होतसे । तो जों भासे कीं नासे । तों उद्भवे तिजा ॥ २८ ॥
ऐसें स्वप्नींही विकल्पजाळें । उठती जैशीं मेघमंडळें । तेणें ब्रह्माकाश झांकोळे । व्याप्त परी दिसेना ॥ २९ ॥
असो दोहीं अवस्थांमाझारीं । विकल्प असे अति विकारी । परी सुषुप्तिमाजींही निर्विकल्प व्यापारीं विकल्प असे ३०
तया सुषुप्तीचेही प्रकार दोन । येक झोंप येक उगेपण । तेथें बुद्धि किंवा नसे मन । इंद्रियध्यासासहित ॥ ३१ ॥
नुसती स्फूर्ति अंतःकरणाची । विद्या अविद्यात्मक माया तेची । कल्पना नसतां विषयादिकांची । असे निर्विकल्प
नेणपणेंची असे दाटली । वासना गडदपणें बैसली । स्फूर्ति मात्र उठे जाय मावळली । एका मागें एक ॥ ३३ ॥
तेंचि विकल्पाचें स्वरूप । वाउगी गडद पडे झाप । तेथेंही व्याप्त सच्चिद्रूप । आच्छादिल्यापरी ॥ ३४ ॥
एवं जागृति स्वप्न सुषुप्ति । तीनाचि अवस्था जीवाप्रती । या तिहींमाजीही विकल्पपंक्ति । असती दाटल्या ॥ ३५ ॥

---

जागृतीमध्यें अंतरांतून बुद्धीपासून विकल्प उठतात ते असे कीं, एक मावळून गेल्यावर दुसरा केव्हां उठला हें कळत नाहीं व उठत असतां मध्यें अवकाशही जात नाहीं, त्यामुळें संधि दिसत नाहींत. जसें चक्राच्या अरा निरनिराळ्या व पुष्कळ असतांही, चक्र फिरविल्यामुळें त्या दिसत नाहींत, तद्वत् संधि दिसत नाहींत. चक्र फिरवितांना अरा दिसत नाहींत. मग विकल्पाचें तर चंचळपण फारच आहे, तेव्हां संधी कशा कळतील ? विकल्प केव्हां शब्दाकार केव्हां स्पर्शाकार केव्हां रूप, रस, गंधाकार केव्हां शब्दाहून जें शब्दांतर त्याकडे धांवतात. केव्हां कर्मेंद्रियांच्या बोलणें चालणें इत्यादि सर्व क्रिया अवलोकून ज्ञानेंद्रियांकडे धावतात. याप्रमाणें क्षणभरसुद्धां विसांवा न घेतां विकल्पजाळें पसरतें. त्यामध्यें चिद्रूप व्यापलेलें आहे. जसें मेघामध्यें अंतरबाह्य गगन दाटलेलें आहे, त्याप्रमाणें चिद्रूप व्यापलेलें आहे. जसें आकाश मेघानें आच्छादिल्यावर कांहीं केलें तरी दिसत नाहीं, तसें सर्व विकल्पच दाटलेले असल्यामुळें चिद्रूप दिसत नाहीं.

याविषयीं विचारवंत हें पहातात कीं, जर मेघांत आकाशाची व विकल्पांत चिद्रूपाची व्याप्ति नाहीं, तर मेघ व विकल्प कसे रहातील ? त्यांस स्वातंत्र्य नाहीं म्हणून अंतर्बाह्य गगन व चिद्रूप व्याप्त आहेच असें समजलें पाहिजे. परंतु ज्याची मंदबुद्धि आहे व ज्याचे विचाराचे डोळे झांकले असल्यामुळें त्यास लवकर कळत नाहीं, म्हणून साधन अभ्यासानें पुढें हळूहळू कळूं लागतें. करितां हा अभ्यास पुढें सांगूच. आतां मात्र येथें विकल्प कोणते कसे जागृतींत होतात ते दाखविले. याचप्रमाणें स्वप्नांत विकल्प उठतात, ते विकल्प बाह्य विषयांत जात नाहींत. पण आंतले आंत घोटाळतात, तेव्हां तेथें देह, विषय, ज्ञानेंद्रियें, कर्म, क्रिया, कर्मेंद्रियें हीं ध्यासरूपानें वासनामय लिंगदेह आठवितें. एक विषय आठविला कीं तो दिसतो, तो मावळून दुसरा विकल्प झाला कीं तो दिसूं लागतो. तो विकल्प दिसून मावळतों आहे इतक्यांत तिसरा विकल्प उठून तो दिसूं लागतो. याप्रमाणें स्वप्नांतही विकल्पाचें जाळें उठतें. जागृति आणि स्वप्न या दोन अवस्थांत विकल्प उठतातच, पण निर्विकल्प जी सुषुप्ति तींतही विकल्प उठतात, ते असेः—सुषुप्तींत नेणपणानें दाटलेली अशी जी वासना आहे, तेथें स्फूर्ति उठते व मावळते, हेच एकामागून एक विकल्प उठतात.

ब्रह्मात्मा तो पहिलाचि संचला । आकाशवत् व्यापक कोंदला । तयावरी विकल्परूप मेघमाला । तीन अवस्था उठती।
नेणीवरूप स्फूर्ति निर्विकल्प । उठे निमे ते उगेपणा झोंप । ते मनबुद्धीसी येतां साक्षेप । स्वप्नावस्था होय ॥ ३७ ॥
तेचि इंद्रियद्वारा विषयांत । स्फूर्ति जाऊन आदळत । तयासी जागृति हा संकेत । एवं व्यापार तीन ॥ ३८ ॥
परी विकल्प तेथून येथवरी । दाटला असे मेघापरी । कोठें स्पष्ट कोठें अस्पष्ट परी । नाहींसा नाहीं ॥ ३९ ॥
ऐसिया विकल्पें चिद्रुप अमुप । आच्छादिलें गगनीं जेवीं झाप । ह्मणोनि ब्रह्मात्मप्रतीति अल्प । नव्हे साधका२८४०
प्रतीति न व्हावया आणिक । कारण असें तें बोलिजे कौतुक । ब्रह्मात्मा जो परिपूर्ण एक । येर मायिक वृत्यादि ४१
स्फूर्त्यादि देहांत सर्व जड । यया जाणणेंच असे अवघड । तरी कोणत्या तत्त्वें आत्मा घबाड । जाणों लाहिजे ४२
अन्य विषयमात्रा परप्रकाशें । जाणती बुद्ध्यादि आपैसे । त्यावीण कल्पिलें कीं आत्मा न दिसे । तेव्हां आच्छादिला विकल्पें
विकल्पें आच्छादिलाही भावितां । चिदात्मा आच्छादेना तत्त्वतां । जैशी अस्ति भाति प्रियरूपता । प्रगटाचि असे ४४
सर्वांमाजीं जो आहेपणा । तो तरी किंचितही नव्हे उणा । प्रियत्वें जैसा आपआपणा । तेंही अन्यथा नव्हें ॥ ४५ ॥
देखणाही जो परिपूर्ण । तेंही विकल्पें नव्हे आच्छादन । तरी आच्छादिला ह्मणेल कवण । भ्रामकावांचोनी ॥ ४६ ॥
जैसे मेघें गगन आच्छादिलें । तें मूढ जनीं व्यर्थ भाविलें । तळीं उपरि जें संचलें । हें तों स्वतःसिद्ध ॥ ४७ ॥
ऐसेंचि ब्रह्मात्मत्व स्वतःसिद्ध । प्रगटचि असे प्रसिद्ध । या विकल्पादिकांचा संबंध । तया नाहींच नाहीं ॥ ४८ ॥
पहा पहा विचारें झोंपेंत । कीं वाउगेपणा मनबुद्धिरहित । तेथील नेणपणा प्रकाशित । आपुल्या प्रकाशें ॥ ४९ ॥
कांहीं मनादिक साह्य नसतां । नेणीव स्फूर्तीसी प्रकाशिता । तो कवणे काळीं होय नेणता । आच्छादे तरी केवीं ५०
त्या स्फूर्तीपासून मनबुद्ध्यादि । उठतां विषयध्यासातें संपादी । तया स्वप्नावस्थेमाजीं अनादि । देखणा तया व्यापारा
मन बुद्धि चित्त अहंकार । ध्यासें जो जो आठवी प्रकार । देहक्रिया विषय समग्र । साक्षित्वें देखे ॥ ५२ ॥
तैसेंचि जागरीं प्रत्यक्ष विषय । इंद्रियद्वारा वृत्ति जाय । त्यांत ज्ञानाज्ञान हें द्वय । प्रकाशी निजात्मा ॥ ५३ ॥
एवं स्फूर्तीपासून जे विकल्प । विषयापर्यंत सर्व संकल्प । उठती निमती जे आपेआप । ते ते जाणे प्रकाशें ॥ ५४ ॥
तयासी कोठं असे न कळणें । सर्वांसी अकृत्रिम देखणें । ऐसें असतां साधक अज्ञानें । ह्मणे प्रतीति न ये ॥ ५५ ॥
येर तत्त्वें हे न जाणती । ह्मणोनि साधका पडली भ्रांति। हाचि मी त्या मज न ये प्रतीति । आत्मप्रकाश कैसा तो ५६

---

ब्रह्मात्मा पूर्वींचाच संचलेला आहे. त्यावर विकल्परूप मेघांच्या माला म्हणजे तीन अवस्था उठतात. प्रथम नेणीवरूप निर्विकल्पस्फूर्ति उठते, मावळते; तीच उगेपणा किंवा झोंप तीच स्फूर्ति मन बुद्धींत आली असतां तीस स्वप्नावस्था म्हणतात. तीच स्फूर्ति इंद्रियद्वारानें विषयापर्यंत येते तीस जागृति म्हणतात. याप्रमाणें तीन अवस्थांचे तीन व्यापार होतात. पण तीहींमध्यें एक विकल्प आहे, तो कोठें स्पष्ट, कोठें अस्पष्ट असा दाटलेला आहे. या विकल्पानें अमूप जें चिद्रूप तें झांकलेलें आहे, म्हणून साधकास त्या ब्रह्मात्म्याची थोडीसुद्धां प्रतिती येत नाहीं. दुसरें प्रतिती न येण्यास कारण हें आहे कीं, स्फूर्ति आदिकरून तत्वें जड असल्यामुळें तीं यास जाणूं शकत नाहींत. तीं परप्रकाशानें इतर विषय जाणतात. आत्मा दिसत नाहीं, म्हणून तो विकल्पांत आच्छादिला अशी कल्पना करितात. जरी आत्मा विकल्पांत आच्छादिला, अशी कल्पना केली, तरी तो अस्तिभातिप्रियरूप आत्मा न लोपतां प्रगटच आहे. जर लोपता तर सर्वांत जी अस्तिभातिप्रियरूपता आहे, ती कोणाची आहे ? ज्याची आहे तोच आत्मा. त्या आत्म्यांस लोपला असें भ्रामक म्हणेल, इतर म्हणणार नाहींत. जसें मेघांत आच्छादिलेलें आकाश तें नाहींच असें मूर्ख लोक म्हणतात. पण त्या मेघांचे खालीं वर तेंच आकाश आहे. तेव्हां आकाश लोपलें असें कसें म्हणावें ? याच प्रमाणें ब्रह्म प्रगट आहे त्यास या विकल्पाचा संबंध मुळींच नाहीं. हा ब्रह्मात्मा झोंपेंत नेणिवेस प्रकाशितो, तेव्हां यास मनबुद्ध्यादिक कोणी साह्य नव्हतीं. असासाह्यावांचून प्रकाशणारा आत्मा आच्छादिला कसा म्हणावा ? जो झोंपेंत आच्छादिला नाहीं तो स्वप्नांत कसा आच्छादेल ? स्वप्नामध्यें मन बुद्धी हीं विषयाचा ध्यास घेऊन व्यापार करितात. तें ध्यास आत्म्यानें मन बुद्धीस प्रकाशिल्यावांचून घेतां येत नाहीं, म्हणून स्वप्नावस्थेंत आत्म्याचा लोप नाहीं. याचप्रमाणें जागृतींतही आत्म्याचा लोप नाहीं. कारण या अवस्थेंतही आत्म्यानें प्रकाशीत केल्यावांचून मन बद्धी इंद्रियें हीं विषय घेत नाहींत. याप्रमाणें स्फूर्तिपासून विषयापर्यंत जो विकल्प, त्यास आत्मा आपल्या प्रकाशानें जाणतो. तो जाणत नाहीं, अशी वस्तूच नाहीं. असा आत्मा प्रकाशित असतां साधक अज्ञानामुळें म्हणतो कीं, मला आत्म्याचा अनुभव येत नाहीं. मनबुध्यादि तत्वें आत्म्यास जाणत नाहींत म्हणून साधकास भ्रांति पडली कीं, बत्तीस तत्वांचा जो मी, त्या मला आत्म्याचा प्रकाश कसा आहे तो कळत नाहीं.

ऐशिया मंदप्रज्ञ साधकासी । अभ्यास पाहिजे दिनंनिशीं । विकल्प निमितां साक्षेपेंसी । उरे तो आत्मा भेटे ॥५७॥
जैसें गगन मेघें आच्छादितां । न दिसे असून आहाच पाहतां । ते मेघ सर्व वितळून जातां । स्वच्छत्वें दिसे ॥ ५८ ॥
तैसे विकल्प निमतां समूळ । उरे निर्विकल्प ब्रह्म केवळ । तेंचि आपेआप कळे प्रांजळ । साध्य तें साधकां ॥५९॥
तस्मात् विकल्प हा मोडावया । अभ्यास पाहिजे शिष्यराया । तोचि बोलिजे सहज उपाया । कवणेरीतीं अभ्यास ॥ ६० ॥
नलगे प्राणाचा निरोध । नलगे आसनादि मूळ बंध । सहजीं सहजत्त्वें प्रसिद्ध । विकल्प तरी मावळे ॥ ६१ ॥
ऐसा अभ्यास समाधीचा । जेणें हळुहळु गात विकल्पाचा । तोचि बोलिजे स्पष्ट वाचा । त्या रीतीं साधकें अभ्यासावा ६२
येथें कोणी चार्वाक म्हणती । अभ्यासाची जयास भीति । कीं कासया पाहिजे अभ्यासरीती । आत्मा सर्वी व्याप्त असतां
तरी आत्मा पहिलाचि व्याप्त । मग विवेचन तरी कासया अपेक्षित । कीटकही ब्रह्मचि परी मुक्त । कल्पांतीं नव्हे ॥६४॥
जैसा काष्टीं असोनि दाहक । मथनेंवीण निरर्थक । तेवीं सर्वत्रीं ब्रह्मात्मा व्यापक । परी नेणतां मुक्ति कैंची ॥ ६५ ॥
तिळामाजीं तेल असे । परी गाळिल्याविण प्राप्त कैसें । तेवीं कीटकही ब्रह्म परी अभ्यासें । विण मोक्ष कैंचा ॥ ६६ ॥
नदीचे पात्रांत पाणी आहे । परी खांदिल्याविण केवीं लाहे । तैसें ब्रह्मत्व असून प्राप्त नव्हे । अभ्यासाविणें ॥ ६७ ॥
दुग्धामध्यें असे घृत । परी क्रियेविण नव्हे प्राप्त । तेवीं अभ्यासेंवीण कृतकृत्य । कल्पांतीं नव्हे ॥ ६८ ॥
सर्व हे ब्रह्मचि असती । येथें संशय नाहीं रती । तरी जन्मती आणि मरती । कासया नानायोनि ॥ ६९ ॥
तस्मात् जयासी खरें तरावें । तेणें बोलिल्या रीतीं आभ्यासावें । अभ्यासें यथार्थ ज्ञान पावावें । तोचि मुक्त साधक॥
येर शब्दज्ञानेंही बडबडितां । दृढ केवीं होय अपरोक्षता । अभ्यासेंविण न जाय तत्त्वतां । देहबुद्धि जे दृढ ॥ ७१ ॥
असो रविदत्ता येर मूढासी । काय प्रयोजन शुष्क उपदेशीं । खरी अपेक्षा जरी तुजसी । तरी अभ्यासी यथाक्रमें ॥७२॥
ऐसें ऐकतांचि रविदत्त । साष्टांगें करूनि दंडवत । विनविताहे सद्गदित । म्हणे दयाळा कृपा करीं ॥ ७३ ॥
ज्या ज्या रीतीं अभ्यास लक्षण । तें तें सांगावें कृपा करून । तैसें तैसें मी अभ्यासीन । अंतर न पडतां ॥ ७४ ॥
ऐसा आदर जाणून रविदत्ताचा । श्रीगुरु बोलते झाले वाचा । अनुक्रमें क्रम अभ्यासाचा । समाधीचा प्रकार ॥१८७५

---

अशा मंदबुद्धि साधकास रात्रंदिवस अभ्यास केला पाहिजे. मग सहजच विकल्प नाहींसे होऊन आत्मा अनुभवास येईल. जसें मेघानें आकाश आच्छादिलें असतां तें असूनही दिसत नाहीं. तेंच मेघ वितुळले म्हणजे स्वच्छ दिसूं लागतें. याचप्रमाणें विकल्पानें आच्छादिलेला ब्रह्मात्मा विकल्प मावळून गेले म्हणजे कळेल. करितां साधकास विकल्प घालवावयास अभ्यासच केला पाहिजे. तो अभ्यास कसा करावा तें सांगतोंः या अभ्यासास प्राणाचा निरोध करावा लागत नाहीं. आसनादि मूळबंध घालावा लागत नाहीं, तर आपापच विकल्प मावळतात.

शंका—ज्यांस अभ्यासाची भीति वाटते ते चार्वाक म्हणतात कीं, आत्मा सर्वांत व्याप्त आहे मग अभ्यास कशाला केला पाहिजे.

उत्तर—आत्मा सर्वदांच सर्व वस्तूंत व्याप्त आहे, मग विवेचन तरी कशाला पाहिजे ? तुमच्या ह्मणण्याप्रमाणें किडाही ब्रह्मच आहे, पण तो कल्पांतींही मुक्त होत नाहीं. जसा काष्टांत अग्नी असतां तो मंथनावांचून प्रगट होत नाहीं, तसा ब्रह्मात्मा सर्वांत व्याप्त असतां तो जाणला नाहीं, तर मुक्त होत नाहीं. तिळामध्यें तेल आहे, पण तें गाळिल्यावांचून मिळत नाहीं. तसा किडा ब्रह्मच आहे पण त्यास अभ्यासावांचून मुक्ति कशी मिळेल ? नदीचे पात्रांत पाणी आहे, पण तें काढल्यावांचून कसें मिळेल ? तसें ब्रह्मत्व असून अभ्यासावांचून तें प्राप्त होत नाहीं. दुधामध्यें तूप आहे, पण तें कृती केल्यावांचून निघत नाहीं, तसें अभ्यासावांचून कृतकृत्य होत नाही. सर्व ब्रह्मच आहेत, याविषयीं तिळभरही संशय नसतां, मग नाना योनींत जन्म घेतात आणि मरतात हें कां ? ज्यापेक्षां अभ्यासावांचून नुसते मुक्त होत नाहींत, त्यापेक्षां आम्हीं सांगतों असा अभ्यास करा. म्हणजे तेणेंकरून खरे तराल. नुसत्या शब्दज्ञानानें दृढ झालेली देहबुद्धि जाऊन अपरोक्षता प्राप्त होणार नाहीं. ती प्राप्त व्हावी, म्हणून रविदत्ता, तूं आम्हीं सांगतों तसा अभ्यास कर.

# सार्थ वाक्यवृत्ति.

## भाग दुसरा.

प्रथम ऐकांत स्थळ असावें । जेथें मनुष्यमात्र नसावें । तेथें सहजासनीं बैसावें । सुख पडे तैसें ॥ ७६ ॥
आरंभीं सदगुरूचें ध्यान । परमादरें करावें नमन । मग सन्मुख करावें अवलोकन । पदार्थ दिसती ते ॥ ७७ ॥
घटपटादि नानापदार्थ । सर्व अवलोकावे यथार्थ । निरुपाधिक असावे अर्थ । पांचही पुढें ॥ ७८ ॥
नवही जें कां कर्मेंद्रिय । निवांत करावें अक्रिय । तैसेंचि चक्षुविण ज्ञानेंद्रिय । करावें स्थिर ॥ ७९ ॥
स्वकीय इंद्रियांतून मन । काढून नेत्रीं आणावें पूर्ण । सहज नेत्रांसी दिसे संपूर्ण । तें तें अवलोकावें ॥ २८८० ॥
एक पदार्थ पाहून सोडावा । दुजा मग दिसेल तो पहावा । तोही सांडोनि अवलोकावा । तिसरा पदार्थ ॥ ८१ ॥
त्या त्या पदार्थीं दृष्टि जातां । विकल्प पावे तदाकारता । तो संकल्प अवलोकावा पुरता । वृत्तीचा कैसा होय तो ॥८२॥
पदार्थीं जाऊन जो आदळे । तो कोठूनियां उफाळे । तो अवलोकावा समूळें । येथून तेथवरी ॥ ८३ ॥
नेत्रद्वारें बाहेरी आला । पदार्थापर्यंत चंचळत्व पावला । तो आधीं पहावा धांविन्नला । नेत्रापासून जेव्हां ॥ ८४ ॥
तो एकदां उठतां न कळे । तरी पुन्हां पहावा वेळोवेळे । केवीं उफाळे कैसा आदळे । नेत्रादि विषयांत ॥ ८५ ॥
ऐसा बाहेरील संकल्प सारा । कैसा करी जो येरझारा । उठे निमे तो येतां त्वरा । अनुभवासी ॥ ८६ ॥
मग पुढें नेत्रांकडे येता । तो कोठून होय उफाळता । दृष्टि घालोनि अंतरा आंतौता । चिरकाळ पहावें ॥ ८७ ॥
पाहतां पाहतां कळूं येतसे । विकल्पाचें रूप दिसे । प्राणा सवें जो उठतसे । अंतरांतूनी ॥ ८८ ॥
एकदां न कळे म्हणोनी । कदां न बैसावें सोडूनी । पाहिलेंचि पहावें अनुदिनीं । प्रत्यया आणावें ॥ ८९ ॥
उठतांचि कळूं जरी आला । तरी जाणावा सुगावा लागला । मग तेथून जरी धांविन्नला । तों तों कळे आपेआप ॥९० ॥
मग उठतें संकल्पाचें स्थान । आणि विषयीं आदळे जाऊन । तेथून येथवरी अवलोकन । सहज करावें ॥ ९१ ॥

---

**समाधिअभ्यास.**

या अभ्यासास जेथें मनुष्यमात्र नाहीं असें एकांतस्थल असावें; त्या एकांतस्थळांत सुखास वाटेल अशा सहजासनीं बसावें. आणि मग सद्गुरूचें ध्यान करून त्यास नमस्कार करावा. नंतर घटपटादि जे अनेक पदार्थ आपल्यापुढें दिसतील ते पहावे; व पुढें निरुपाधिक पांच अर्थ असावे. आपलीं कर्मेंद्रियें क्रिया करीत नाहींत अशीं निवांत करावीं. तसेंच नेत्रावांचून बाकीचीं चार ज्ञानेंद्रियें स्थिर करावीं; मन नऊ इंद्रियांतून काढून नेत्रांत आणावें; आणि डोळ्यांनीं सहज जें दिसेल तें पहावें; एक पदार्थ पाहून तो सोडावा आणि पुढें दुसरा दिसेल तो पहावा; तो पहावयाचा सोडून तिसरा पहावा; याप्रमाणें प्रत्येक पदार्थांत दृष्टी गेली असतां विकल्प तदाकार होतो. तो वृत्तीचा संकल्प कसा होतो हें पहावें. विकल्प पदार्थापर्यंत जातो तों कोठून उत्पन्न होतो; व पदार्थापर्यंत कसा जातो हें उत्पत्तीस्थानापासून विषयापर्यंतचें विकल्पाचें रूप पहावें. विकल्प नेत्रापासून बाहेर पडतो आणि पदार्थापर्यंत चंचलत्व पावून जातो; त्यावेळीं नेत्रापासून विकल्प कसा जातो तें प्रथम पहावें. एकदां पाहिल्यानें कळला नाहीं तर कसा उत्पन्न होतो व कसा विषयापर्यंत जातो हें वारंवार पहावें. याप्रमाणें संकल्प बाहेर कशी येरझार करितो, त्याची त्वरा कशी, तो कसा उत्पन्न होतो, कसा मावळतो याचा अनुभव घ्यावा. मग नेत्रांतून निघतो तो कोठून उत्पन्न होतो, हें दृष्टी आंत घालून चिरकाल पहावें. पहातां पहातां असें कळून येतें कीं, हा विकल्प अंतरांतून प्राणाबराबर उठतो. एक काल पालटतो हें कळलें नाहीं तर प्रत्यय येईपर्यंत अभ्यास न सोडतां रात्रंदिवस पहावें. तो उठतांच जर कळला तर समजावें कीं याचा आपणास शोध लागला. मग तेथून जरी धांवला तरी तो आपाप कळेल. मग जेथून संकल्प उठला तेथून तो विषयीं जाऊन आदळला तेथपर्यंतच्या सर्व संकल्पास पहावें. प्रथम संकल्प उठला कीं लागलेंच त्यास पहावें; मग तो विषयीं जाऊन आदळला व नाहींसा कसा झाला तें पहावें.

संकल्प उठे तो अवलोकावा । आदळून निमे तो पहावा । ऐसाचि दृढ अभ्यास व्हावा । आळस नसावा किंचित् ॥९२
तथापि आळसची येतां । उठोनि फिरावें बाह्यता । फिरोनि बैसावें मागुतां । आळस गेलियावरी ॥ ९३ ॥
बहु वेळ बैसणें न घडे । तरी ऐके दिनीं त्रिकाळ कोडें । बैसावें जाऊन एकीकडे । अभ्यासासी ॥ ९४ ॥
परी व्यापारही जरी करितां । जितुकें अनुभवा आलें बैसतां । तैसेंचि पहावें चालतां बोलतां । विकल्पासी ॥ ९५ ॥
सर्वदां ध्यास जो लागे बरवा । तेणें बैसतां अभ्यास प्रांजळ व्हावा । अथवा बैसले अभ्यासें पाहतां यावा।व्यापारामाजीं
ऐसें हे साह्यत्वें दोनी । अभ्यासावे आळस टाकोनी । जितुकें अनुभविलें आजिचे दिनीं । दुजे दिवशीं तें सुलभ ९७
परी हा अभ्यास केलाचि करावा । आळशी साधक सहसा नसावा । असो रविदत्ता तुवां ऐकावा । पुढील प्रकार ॥९८
बैसतां प्रत्ययासी आले । जे जे उठती विकल्प कीं निमाले । उठते स्थळापासून अनुभविले । विषयापर्यंत ॥ ९९ ॥
तें पाहणे येथून तेथवरी । दृढाचि करावें दृश्यापरी । ऐसें दृढ जाहलियावरी । त्यांतही विवेचावें ॥ १९०० ॥
संशय करितसे तें मन । साधकें पहावें वोळखून । संशयाचोंचि करी चिंतन । तें चित्त समजावें ॥ १ ॥
वोळखितां सत्य निश्चय करी । ते बुद्धि जाणावी शोधून अंतरीं । उगा भलताचि अभिमान धरी । तो अहंकार ॥ २ ॥
ऐसे विकल्पाचे चार प्रकार । संकल्परूप उठती उद्गार । ते वेगळाले समजावे निर्धार । रूपासहित ॥ ३ ॥
यास विकल्पाहीपरतें । निर्विकल्पत्वें स्फुरण उठतें । तया अंतःकरण रूप विकल्पातें । वोळखिलें पाहिजे ॥ ४ ॥
मन बुद्धि चित्त अहंकृति । यांची किंचित् नसतां उत्पत्ति । सहज सामान्यत्वें वृत्ति । पदार्थी जाऊन पसरे ॥ ५ ॥
ऐक स्फूर्ति पसरून वितुळे। तों दुजी जाऊन रूपीं मिसळे। मागुतीं निसरीही उफाळे। जललहरीपरी ॥ ६ ॥
परी ते मनबुद्धीच्या संकल्पा । न यावी संशय कीं निश्चयरूपा । सहज आदळे उफाळे खेपा । घटादिकांत करी ॥ ७ ॥
ते सामान्य वृति साधकें । ओळखावी अभ्यासें निकें । तिचाही प्रकार ऐकें । जाणावयाचा ॥ ८ ॥
ते सहज तरी निमे उठे । उगीच अवलोकावी जेव्हां उमटे । परी हे जाणिली ऐसें जरी वाटे । तरी संकल्प जाहला॥ ९॥
तोचि मन बुद्धि उद्भवली । तेव्हां निर्विकल्पता बुडाली । म्हणून संकल्प नुठतां पाहिली । चिरकाल अनुभवावी॥१९१०॥

---

याप्रमाणें आळस न धरितां दृढ अभ्यास करावा. अभ्यास करितांना कदाचित् आळस आला तर उठून फिरावें; आणि आळस गेल्यावर पुन्हा अभ्यासास बसावें. फार वेळ बसवलें नाहीं तर एका दिवसांत तीन वेळ अभ्यासास बसावें. ज्यावेळीं अभ्यास न करितां व्यापारधंदा करीत असाल त्यावेळीं अभ्यासांत जो अनुभव घेतला असेल तो विकल्पाचा अनुभव, चालणें, बोलणें, या व्यापारांत पहावा; तो असा कीं, त्याच्या ध्यासानें अभ्यास सुलभ आणि प्रांजळ व्हावा. अथवा अभ्यासास बसलें असतां असा अनुभव घ्यावा कीं, तो व्यापारांत सहज पहातां येईल. याप्रमाणें दोन काळ एकमेकांस साह्य होतील असा, आळस टाकून अभ्यास करावा.

आज जें अनुभविलें असेल तें दुसरे दिवशीं सोपें होतें; म्हणून रविदत्ता, हळूहळू रोज अभ्यास करावा अभ्यासास बसल्यावर विकल्प उठल्याचा किंवा तो मावळल्याचा जो अनुभव आला असेल, तसेंच विकल्प जेथून उठला व विषयांत जाऊन आदळला, त्या अनुभविलेल्या विकल्पाचें होणें दृश्याप्रमाणें दृढ करावें. याप्रमाणें दृढ झाल्यावर त्याचाही विचार केला म्हणजे कळेल कीं, संकल्प उठतांच जो संशय उत्पन्न होतो तें मन आहे. हें मनाचें स्वरूप साधकानें ओळखावें. नंतर संशयाचें चिंतन होतेंसें दिसलें, तेव्हां तें चित्त उत्पन्न झालें असें समजावें; पुढें ओळखून जी निश्चय करिते तीस बुद्धि म्हणतात हें ओळखावें. निश्चयाचा अभिमान धरणारा तोच अहंकार असें समजावें. याप्रमाणें विकल्पाचे चार प्रकार होतात. ते निरनिराळे प्रकार त्यांच्या रूपासहित जाणावे. हें चार प्रकारचें सविकल्प स्फुरण उठतें असेंच निर्विकल्प स्फुरण उठतें त्यास अंतःकरण म्हणतात त्यासही ओळखावें.

मन, बुद्धि, चित्त, अहंकार हीं किंचित्‌ही उत्पन्न झालीं नसतां वृत्ति सहज सामान्यत्वानें पदार्थांत जाऊन पसरते. एक वृत्ति उठून पसरते व ती मावळते तोंच दुसरी उठते; ती मावळून जात आहे तों तिसरी उठते. याप्रमाणें पुष्कळ प्रकारें सामान्य स्फूर्ति उठते. पण ती संशयांत किंवा निश्चयांत येऊं देऊं नये. जर तशी न येईल तर ती सहज उठेल व घटादिकांत जाऊन आदळेल. याप्रमाणें खेपा करणारी सामान्य वृत्ति साधकानें ओळखावी. ती उठते व नाहींशी होते तें साधकानें सहज ओळखावें. जेव्हां आपण त्या सामान्य वृत्तीस जाणूं तेव्हां तोच संकल्प होतो. तो संकल्प झाल्याबराबर मनबुद्धि उत्पन्न होतात. मनबुद्धि उत्पन्न झाल्याबराबर निर्विकल्पता बुडते. म्हणून मनबुद्धि उत्पन्न झाली नाहीं तों सामान्य वृत्ति चिरकाल अनुभवावी.

सहज उठतां आदळतां । मन बुद्धीचे आकारा न येतां । उगी अवलोकावी तत्त्वतां । न पाहतां अमुकशी ॥ ११ ॥
पुढें मनबुद्धि उठल्यावरी । अनुमानें पहावी अंतरीं । कीं अमुक वेळां निर्विकल्पता खरी । जाहली होती ते सामान्य १२
परी निर्विकल्पता जोंवरी असे । तोंवरी न कल्पावें अमुकसें । ऐशिया सामान्यत्व अभ्यासें । साधकें अभ्यासावें ॥ १३
या रीतीं नेत्र उघडे असतां । पदार्थविषयही दिसतां । सामान्य वृत्ति जे सहज तत्वतां । अभ्यासें साधावी ॥ १४ ॥
तथापि क्षणक्षणां मन बुद्धि । निर्विकल्पत्वीं उठे कधीं । तेही आपेआप मावळतां नुसधी । सामान्य वृत्ति उरे ॥ १५ ॥
ते सामान्यता वाढवावी । विकल्पता क्षीण व्हावी । ऐशी अभ्यासयुक्ति साधावी । जागृतीमाजीं ॥ १६ ॥
पुढें नेत्र झांकून बैसावें । पदार्थांचें पाहणें त्यागावें । अंतरामाजीं जे संकल्प उमटावे । अवलोकावे तितुके ॥ १७ ॥
आरंभीं उठे जो संकल्प । पदार्थ उद्भवी ध्यासरूप । घटपटादि पदार्थ अमुप । दिसती भासमात्र ॥ १८ ॥
इंद्रिय तों नवही नवते । एक नेत्र मात्र पाहत होते । डोळे झांकितां अंतरा आंतौते । पाहणें आलें ॥ १९ ॥
तेंचि अंतरदृष्टीचें पाहणें । काल्पिला भास वोळखणें । नाना पदार्थांचें जें दिसणें । हे स्वप्नअवस्था ॥ २९२० ॥
येथेंही साधकें वृत्ति उठतां । अवलोकावी स्वस्थ चित्ता । कल्पित विषयावरी आदळतां । न आंवरितां पहावी ॥ २१ ॥
उठतें स्थान समजावें । पदार्थीं आदळतां अवलोकावें । ऐसेंचि चिरकाळ अभ्यासावें । स्वप्न अवस्थेसी ॥ २२
तेथीलही चतुष्टय प्रकार । मन बुद्धि चित्त अहंकार । वेगळालीं रूपें सविस्तर । जाणावीं त्यांचीं ॥ २३ ॥
ऐसा संकल्परूप जो विकल्प । स्पष्ट कळतां आपेआप । पुढें साधावें निर्विकल्प । कैसें तें सामान्य ॥ २४ ॥
बुद्धि मन न होतां उत्पन्न । भासविषयाचें दर्शन । उगेंचि पोकळीमाजीं पसरून । स्फुरण वितळून जाय ॥ २५ ॥
चिरकाळ मन बुद्धि जरी उठेना । तोचि सुषुप्ति स्थिति कीं उगेपणा । तोचि समाधि अभ्यासाविना । प्राप्त नोहे साधका ।
या निर्विकल्प स्फूर्तिचा प्रकार । पुढें निरोपिजे सविस्तर । प्रस्तुत विकल्परूप साचार । कैसा तो अनुभवावा ॥ २७ ॥
मन बुद्धीची तरी विशेष । हानि नव्हेचि निःशेष । परी अनुभवावें अशेष । उठणें आदळणें ॥ २८ ॥

---

ती उठून आदळत असतां जोंपर्यंत मनबुद्धीचे आकारास आली नाहीं, तों ही अमुक असें न ओळखितां पहावी व मनबुद्धि उत्पन्न झाल्यावर अनुमानानें अदमास करावा कीं, सामान्य निर्विकल्पता अमुक वेळ खरी झाली होती. जेव्हां निर्विकल्पता होती तेव्हां ही अमुक आहे अशी कल्पना करूं लागू नये. जर कल्पना करशील तर तो संकल्प होईल. मग निर्विकल्पता सहज नाहींशी होईल, तरी ती नाहींशी न होतां अभ्यासानें साधावी. नेत्र उघडे असतांना व पदार्थ किंवा विषय दिसत असतां सामान्य वृत्ति साधकानें अभ्यासानें साधावी; ती साधीत असतां केव्हां केव्हां मनबुद्धि क्षणक्षणा निर्विकल्पीं उठेल. ती नाहींशी झाली म्हणजे मग सामान्य वृत्तीच उरेल. ती सामान्यता विकल्प क्षीण व्हावा म्हणून वाढवावी, अशी अभ्यासयुक्ति जागृतीमध्यें साधावी.

**जागृतींत स्वप्नावस्थेचे ठायीं अभ्यास.**

जागृतीमध्यें नेत्र उघडे ठेवून सामान्यता साधली असतां मग नेत्र झांकून बसावें. पदार्थांचें पहाणें टाकावें म्हणजे मग अंतर्यामीं संकल्प उठतील ते सर्व पहावे. प्रथम जो संकल्प उठेल तो ध्यासरूप पदार्थ उत्पन्न करील; मग ते भासरूप घटपटादि पदार्थ दिसतील. नऊ इंद्रियें नव्हतीं, एक दहावें नेत्रेंद्रिय मात्र जागृतींत उघडें होतें, तें पदार्थ पहात होतें, तेंच पहाणें डोळे झांकिल्यावर आंत आलें व तें कल्पिलेल्या भासास पाहूं लागलें. डोळे झांकिल्यावर जे पदार्थ भासरूपानें दिसतात तीस स्वप्नावस्था म्हणतात. या अवस्थेंत साधकानें वृत्ती उठली असतां चित्त स्वस्थ करून ती कशी उठते व विषयीं जाऊन कशी आदळते, हें तिचा आवर न करितां पहावें. तसेंच ती कोठून व कशी उत्पन्न होते व विषयांत जाऊन कशी नाहींशी होते हें पहाण्याचा अभ्यास करावा. तसेंच जागृतीप्रमाणें स्वप्नावस्थेंत उत्पन्न होणारे मन, बुद्धि, चित्त, अहंकार हे चार प्रकार व यांची वेगवेगळालीं रूपें ओळखावीं. याप्रमाणें संकल्परूप विकल्प स्पष्ट कळला म्हणजे पुढें सामान्य निर्विकल्प साधावें. जोंपर्यंत बुद्धि, मन उत्पन्न झालें नाहीं व भासविषय दिसले नाहींत; तोंपर्यंत नुसतें स्फुरण उठून पोकळींत पसरून मावळतें. याप्रमाणें होत असतां बराच वेळ जर बुद्धि, मन उत्पन्न झालीं नाहींत तर तीच सुषुप्ति किंवा उगेपणा आहे असें समजावें. हा उगेपणा समाधि अभ्यासावांचून साधकास प्राप्त होत नाहीं. असो मनबुद्धींची निःशेष हानी न होतां विकल्पाचें उठणें व आदळणें अनुभवावें.

सहज रीती विकल्प उठे । अंतराळीं उठोनि दाटे । भास विषय कल्पूनि गोमटे । जाय वितळूनी ॥ २९ ॥
ऐसे संकल्प नानापरी । उठती निमती हृदयांतरीं । तेचि अवलोकावे निर्धारीं । चिरकाळ अभ्यासें ॥ २९३० ॥
एवं डोळे उघडितां विषयापर्यंत । अथवाडोळेझांकितां भासकल्पित । यादोस्थळीं जाऊनि आदळत । विकल्प जो उठोनी
तो विकल्प मात्र अनुभवावा । उगाचि उठतां निमितां पहावा । या अभ्यासें म्हणती स्वभावा । काय प्राप्त साधकां ३२
तरी अवधारीं मोतीं कीं तरंगे । अथवा जैसें निबिड मेघें । सूत्र जल गगन सर्वेगें । आच्छादिलें असे ॥ ३३ ॥
तैसी या सर्व विकल्पजाळीं । आच्छादिली चित्प्रभा आगळी । ते या समाधिअभ्यासें सुकाळीं । कळूं येतसे तें ऐकें॥
जैसें मोतीं मणी तरंग सारितां । अथवा मेघ मध्यें मध्यें वितुळतां । तंतु पाणी गगन आंतौता । प्रतीतीसी येतसे ३५
तैसें या विकल्पाचे संधी आंत । स्पष्ट चिद्रूप प्रगटत । म्हणून सांगितला अभ्यास जो निश्चित । महत्फळ देतसे ॥३६
उगाचि विकल्प पाहतां पाहतां । संधि कळों येती तत्वतां । तया संधीमाजीं अवलोकितां । सामान्य प्रकाश कळे ॥३७
त्या संधीही कैशा आपेआप । होती तें बोलिजे स्वरूप । आणि ब्रह्मात्मा कैसा सच्चिद्रूप । स्पष्ट असे अंतरीं ॥ ३८ ॥
आणि विकल्पामाजीं जो बिंबला । जीवही कळेल अनुभवाला । तस्मात् सावधान निरूपणाला । असावें श्लोकींच्या

**नष्टे पूर्वे विकल्पेतु यावदन्यस्यनोदयः**
**निर्विकल्पक चैतन्यं स्पष्टंतावद्विभासते ॥ ११ ॥**

पूर्व संकल्प निमाला असतां । जों काळ दुजा उदयासी न येतां । निर्विकल्प चैतन्य तत्वता । तों काळ स्पष्ट कळे
अगा रविदत्ता आम्हीं तुजला । अभ्यास ध्वनितार्थ सांगितला । त्या अभ्यासें आद्यंत विकल्पाला । दृश्यापरी देखसी
उठतां किंवा जाऊन निमतां । तया पाहसी टळटाळिता । मग आपेआप संधि तत्वतां । अनुभवा येती ॥ ४२ ॥
पाहणियाचा तो अभ्यास । पाहिलाच असे संकल्पास । तोंचि निरखितां बहुवस । सूक्ष्म दृष्टीनें ॥ ४३ ॥
एक संकल्प उठोनि मावळे । दुजा जोंवरी न उफाळे । तो संधी सामान्यत्वें कळे । पाहतां साधकां ॥ ४४ ॥
संकल्प उठोनि निमे जोंवरी । प्रतिबिंबित जीवहीं असे तोंवरी । विकल्प अवघा निमाला जरी । तरी जीवाचा अभाव
नुसधी सामान्य वृत्ति जे उठे । तेथें सामान्यत्वें चिद्रूप दाटे । तोचि प्रकाश वोळखावा नेटें । सामान्य दृष्टीनें ॥ ४६ ॥

---

विकल्प सहज उठून अंतरांत दाटून भास-विषय कल्पून वितुळून जातो याप्रमाणें अनेक प्रकारचे संकल्प हृदयांत उठून मावळतात. तेच अभ्यासानें चिरकाल पहावे; डोळे उघडे असतां विषयापर्यंत व डोळे झांकिले असतां कल्पितभासापर्यंत जाऊन आदळणारा विकल्प, तो उत्पन्न होत असतां व मावळत असतां अभ्यासानें पहावा.

**अभ्यासाचे फलाविषयीं दृष्टांत.**

**शंका**—अभ्यास केल्यानें काय फळ मिळेल असें म्हणशील तर तें सांगतों ऐक.

**उत्तर**—मोत्यांनीं सूत, तरंगांनीं पाणी, मेघानें आकाश आच्छादिलेलें आहे तशी विकल्पजाळानें चित्प्रभा आच्छादिलेली आहे. ती या समाधि अभ्यासानें कशी कळून येते तें सांगतों. जसें मोती, मणी, तरंग, हे साधिले असतां किंवा मेघ वितुळले असतां तंतू, पाणी, आकाश, आंत आहेत, तीं अनुभवास येतात. तसें विकल्पाचे आंत असलेलें चिद्रूप स्पष्ट होतें. म्हणूनच हा समाधि अभ्यास सांगितला. विकल्प सहज पहात असतां संधी कळून येतात. संधी कळून आल्यावर त्या संधींमध्यें पाहिलें असतां सामान्य चिद्रूपाचा प्रकाश कळूं लागतो. आतां संधी आपाप कशा होतात. त्यांचें स्वरूप सांगतों; व त्यांत ब्रह्मात्मा कसा आहे तें सांगतों.—या योगानें विकल्पांत बिंबलेला जो जीव त्याचा अनुभव येईल. करितां पुढें जो श्लोक सांगतों त्याच्या अर्थाकडे सर्वांनीं लक्ष पुरवावें.

**अर्थ**—प्रथम झालेला संकल्प मावळून दुसरा संकल्प जों उत्पन्न झाला नाहीं, तों मध्य संधीमध्यें निर्विकल्प-चैतन्य स्पष्ट कळतें. रविदत्ता, आम्ही जो तुला अभ्यास सांगितला त्या अभ्यासानें तूं विकल्प दृश्याप्रमाणें स्पष्ट पहात आहेस काय ? जर तूं विकल्पास उठल्यावर व निमाल्यावर टळटळीत पहात असशील तर तुझ्या अनुभवास संधी येतील. संकल्पास पहाण्याचा अभ्यास पूर्वीच सांगितला आहे. त्याप्रमाणें सूक्ष्म-दृष्टीनें पहात असावें; एक संकल्प उठून मावळला व दुसरा संकल्प जोंपर्यंत उठला नाहीं तोंपर्यंत सामान्यत्वें संधी कळतो. संकल्प उठून लयास जाई तोंपर्यंत जीव प्रतिबिंबित असतो. जेव्हां सर्व विकल्प नाहींसा होतो तेव्हां जीवाचा अभाव होतो. जेव्हां नुसती सामान्यवृत्ति उठते, तेव्हां तींत सामान्यत्वें चिद्रूप दाटते. तोच प्रकाश सामान्यदृष्टीनें पहावा.

हें इतुकेंही निरूपण प्रांजळ । विस्तारेंसी होईल सकळ । मुमुक्षें सावधान निवळ । क्षण येक असावें ॥ ४७ ॥
या सामान्यें विशेषाचा निवाडा । येथें होईल प्रांजळ रोकडा । एतूद्विषयीं दृष्टांत पडिपाडा । असे तो बोलिजे ॥ ४८॥
आकाशीं प्रत्यक्ष दिनकर । सर्व प्रकाशीं सान थोर । त्यांत आरिसे ठेविले अपार । त्या प्रकाशामाजीं ॥ ४९ ॥
तया आरसियांमाजीं निकीं । प्रतिबिंबें पडलीं जितुकीं । वेगळालीं भिंतीवरी तितुकीं । तेणें अल्प अल्प प्रकाशिलें५०
आत्मा ब्रह्म जो अविनाशी । स्फुरणादि देहांत प्रकाशी । सूर्य जैसा सहजें आकाशीं । भासवी आरसे भिंत्यादि ५१॥
बुद्धींत प्रतिबिंबित जो जीव । विकल्परूपी भासवी सर्व । जैसा दर्पण प्रकाशीं विशेषत्व । झळझळ अल्प ॥ ५२ ॥
बहुत विकल्प उठती । विषयही भिन्न भिन्न दिसती । जैसे भिंतीवरी अल्प अल्प झळकती । स्थळीं स्थळीं बहु ॥ ५३।
विकल्पें अमुकसें स्फुरावित । तेव्हांमुख्यप्रकाशलोपला वाटत । जैशझिळझळजये स्थळीं उमटत । तितुकें तेज आच्छादी
जरी ब्रह्मात्मयाचा प्रकाश । आच्छादिला वाटे सावकाश । तरी सर्व भासकत्व अविनाश । तो लोपेना सहसा ॥ ५५।
जरी झळझळीनें सामान्य भिंतीचा । प्रकाश लोपविला वाटे साचा । परी सहज प्रकाश जो सूर्यांचा । तो लोपला न जाय
अंगण वोसरी माजघर । अंतर्बाह्य प्रकाशी दिनकर । तैसा स्फुरणादि ।विषयांत समग्र । सहज प्रकाशी आत्मा ॥ ५७
भिंतीवरी एकदेशी झळकत।तेवीं जीव किंचित विषय स्फुरवित।आरसा काढितां झळझळ मावळत ।बुद्धि नसतां जीव मरे
सूर्यप्रकाश तो सर्वदां आहे । तैसा तिहीं काळीं सामान्य राहे । सूर्यासी आरसा आश्रय नव्हे । सामान्या बुद्धि तेवीं
झळझळीसी अपेक्षा आरशाची । जीवासी सापेक्षता बुद्धीची । नासे स्थिति जीव झळझळीची । बुद्धि आरसियाविण
बुद्धींतचि प्रतिबिंब पडिलें । येविशीं कोणीं आक्षेपिलें । कीं देहादिकही भूतांचे जाहले । बुद्धिही भौतिक ॥६१॥
तरी देहादिकांत प्रतिबिंब नसे । बुद्धीमाजीं कां पडतसे । एविशीं उत्तर ऐका कैसें । दृष्टांतासहित ॥ ६२ ॥
मृत्तिका ही पृथ्वीच साकार । कांच ही मृत्तिकेचा विकार । परी आरसियांत प्रतिबिंबे दिनकर । मृत्तिकेंत बिंबेना
येथें कारण स्वच्छास्वच्छता । स्वच्छ आरसिया होय बिंबता । अस्वच्छ मृत्तिका असतां । प्रतिबिंब न पडे ॥६४॥
तैसे देहबुद्धि दोनी भौतिक । परी बुद्धि स्वच्छ असे निश्चयात्मक । तिजमाजीं प्रतिबिंबे प्रकाश । आरसियापरी ६५

---

**सामान्य विशेषाचे निवाड्याविषयीं उदाहरण.**

आकाशांत सूर्य लहानमोठ्या सर्व वस्तु प्रकाशितो, त्या सूर्याचे प्रकाशांत पुष्कळ आरसे ठेविले असतां, त्या आरशांत सूर्याची जितकीं प्रतिबिंबें पडलीं तितकीं वेगळालीं जवळ असलेल्या भिंतीवर दिसूं लागतात. त्यामुळें भिंत थोडथोडी प्रकाशित दिसते. सूर्याप्रमाणें आत्मा स्फुरणापासून देहापर्यंत सर्व प्रकाशितो. आरशामध्यें सूर्याचें प्रतिबिंब पडतें तसें येथें बुद्धीमध्यें आत्म्याचें प्रतिबिंब पडतें. तोच जीव. आरशांतील प्रतिबिंब जसें भिंत थोडथोडी प्रकाशिते, तसा जीव, विकल्परूपी सर्व भासवितो. पुष्कळ विकल्प उठले म्हणजे त्यायोगानें निरनिराळे विषय दिसतात. जसें भिंतीवर थोडेथोडे झळकतात, व जागजागीं पुष्कळ झळकतात. भिंतीवर प्रतिबिंब पडलें असतां तें सूर्याचा प्रकाश लोपवून आपला प्रकाश दाखवितें. तसें विकल्पानें हें अमुक असें स्फुरविलें म्हणजे आत्म्याचा प्रकाश लोपला असें वाटतें. जरी आत्म्याचा प्रकाश जीवानें आच्छादिला असें वाटलें, तरी सहज असलेला आत्म्याचा प्रकाश तो लोपला जात नाहीं. सूर्य आपल्या प्रकाशानें अंगण, वोसरी, माजघर, यांस आंत बाहेर प्रकाशितो. तसा आत्मा स्फुरणापासून विषयापर्यंत सर्व प्रकाशितो. प्रतिबिंबाचें भिंतीवर एकदेशी प्रकाशणें, तसा जीव किंचित् विषय स्फुरवितो. सूर्याचे प्रकाशांतून आरसा काढिला म्हणजे प्रतिबिंब नाहींसें होतें. तशी बुद्धी नसली म्हणजे जीव मरतो. सूर्याचा प्रकाश जसा नेहमीं आहे, तसा सामान्य तिन्हीकाळीं असतो. सूर्याला प्रकाश पाडण्यास आरशाची गरज नाहीं, तशी आत्म्यास बुद्धीची गरज नाहीं. भिंतीवर झळझळ पडण्यास आरशाची गरज आहे, तशी जीवास विषय स्फुरविण्यास बुद्धीची गरज आहे. बुद्धिरूप आरसा नसला तर जीवरूप झळझळ नाश पावते.

शंका—देह आणि बुद्धि दोन्हींही भौतिक आहेत मग बुद्धींत प्रतिबिंब पडतें तसें देहांत कां पडत नाहीं.

उत्तर—पृथ्वीपासून माती आणि कांच दोन्ही पदार्थ होतात; त्यांत कांचेमध्यें सूर्य दिसतो, मातींत दिसत नाहीं. याचें कारण माती अस्वच्छ आहे, व कांच स्वच्छ आहे. स्वच्छ आरशांत सूर्य दिसतो, अस्वच्छ मातींत तो दिसत नाहीं. तशीं देह आणि बुद्धि भौतिकें खरीं, पण देह मातीसारखा जड, व अस्वच्छ आहे; म्हणून त्यांत आत्म्याचें प्रतिबिंब पडत नाहीं. बुद्धी कांचेप्रमाणें स्वच्छ म्हणजे निश्चयात्मक आहे म्हणून तींत आत्म्याचें प्रतिबिंब पडतें.

देह मृत्तिके ऐसा जड । यास्तव प्रतिबिंब पडे ना वाड । असो बुद्धीविण जीवासी अवघड । रूपासी येणें ॥ ६६ ॥
तस्मात् जीवत्व झळझळ उठत । बुद्धि आरसियास्तव भासत । तेणेंचि विषयाची स्फुरविलीं भिंत । विशेषत्वें वरी ६७
येथेंही कोणी कल्पना करी ।कीं बुद्धीच सामान्य प्रकाशानुकारी । विषयातें प्रकाश कां न करी । जीवाचें काज कासया
तरी अवधारावें निश्चित । बुद्धि अभावींही ब्रह्म सदोदित । बुद्धि असतांही निश्चित । परी विशेषें स्फुरवीना ॥ ६९ ॥
जेवीं आदित्य आरसिया अभावीं । अंतर्बाह्य भिंती प्रकाशवी । परी झळझळ वरती जे दावावी । हे कृति दर्पणस्थाची
आरसा नसतां तें नासून जाय । बुद्धि अभावीं जीवाचा लय । आत्मा आदित्य तो प्रकाशमय । बुद्धि आरसाही नसतां
मुख्य कारण कीं दर्पणस्थाविण । झळझळ करी ना सहस्रकिरण । तैसा जीवत्वाचे भासावांचून । आत्मा स्फुरविना
स्फुरवोनियां नाश पावे । तें कार्य जीवाचेंचि समजावें । सामान्य प्रकाशासी न संभवे । विकारत्व बुद्धीचें ॥७३॥
तस्मात् आत्मा बुद्धीसी चेष्टवीना । बुद्धीसी तों केवळ जडपणा । तरी स्फुरवी पदार्थ नाना । जीवत्वावांचोनी ॥७४॥
आरसा जेवीं प्रतिबिंबाविण । भिंतीवरी न करी झळपण । तैसा विषय स्फुरवावया विशेष ज्ञान । पाहिजे जीवाचें
बुद्धि जरी नसावी म्हणसी । तरी उमटणें कोठें प्रतिभासासी जीवनेंविण प्रतिबिंबासी । दिसणें नाहीं ॥ ७६ ॥
तस्मात् बुद्धीस्तव जीवासी रूप । जीवाकरितां बुद्धीसी संकल्प । दोनी मिळोनि विषयाचें माप । पदरीं घेती ॥७७॥
या बुद्धि वृत्ति आणि जीवासी । सामान्यत्वें अधिष्ठान उभयांसी । तें एक चिद्रूप अविनाशी । मुख्य बिंब जें जीवाचें
अगा रविदत्ता हीं रूपें तिनी । एकांतीं निवडावीं बैसोनी । सूक्ष्म दृष्टीचे अभ्यासेंकडोनी । हळुहळू कळों येती ७९
तरी साधकें बैसावे निवांत । विकल्पाचें रूप अवलोकित । चिरकाळ अभ्यासें टळटळीत । स्पष्ट कळती तिनी ८०
आधीं जडरूपें बुद्धीवृत्ति कैशी । जीव कैसा प्रकाशी तीसी । हेंचि पहावें विशेषत्वेंसी । पुढें सामान्य कळेल ॥८१॥

---

बुद्धींत आत्म्याचें प्रतिबिंब पडतें तोच जीव. त्या जीवास बुद्धीवांचून रूपास येतां येत नाहीं. जेव्हां बुद्धी उत्पन्न होते तेव्हांच जीव उत्पन्न होऊन आपल्या विशेष प्रकाशानें विषयरूपी भिंत तो स्फुरवितो.

शंका—सामान्य प्रकाशास बुद्धी साह्य आहे; तीच कां विषय स्फुरवीत नाहीं ? विषय स्फुरविण्यास बुद्धी असतां जीव कशाला पाहिजे ?

उत्तर—बुद्धी नसतां आत्मा सदोदीत प्रकाशित आहे, तसाच बुद्धि असतांही आहे. पण विशेषत्वें जें विषय स्फुरविणें, तें आत्म्याच्यानें होत नाहीं. जसें आरसा नसतां सूर्य भिंति अंतर्बाह्य प्रकाशितो, त्याचप्रमाणें आरसा असतांही प्रकाशितो. पण भिंतीवर जी झळझळ उठते ती त्याच्यानें उठवितां येत नाहीं. ती उठविण्यास आरशांतील प्रतिबिंबच पाहिजे. तसा विषय स्फुरविण्यास बुद्धींत प्रतिबिंबवणारा जीवच पाहिजे. आरसा नसला तर प्रतिबिंब पडत नाहीं व त्याची झळझळ भिंतीवर पडत नाहीं; तशी बुद्धि नसतां जीव उत्पन्न होत नाहीं; व तो उत्पन्न झाला नाहीं तर विषय स्फुरविले जात नाहींत. आत्मा स्वतां विषय स्फुरवूं शकत नाहीं, व तो बुद्धीलाही चेष्टवीत नाहीं. बुद्धि, जड असल्यामुळें ती स्वतः विषय स्फुरवूं शकत नाहीं; मग विषय जे स्फुरले ते जीवावांचून कोणी स्फुरविले. आरसा जसा प्रतिबिंबावाचून भिंतीवर झळझळ करूं शकत नाहीं; तशी बुद्धि जीवावांचून विषय स्फुरवूं शकत नाहीं. आतां तूं असें म्हणशील कीं, जीव जर विषय स्फुरवीत आहे तर बुद्धि कशाला पाहिजे ? तर बुद्धि विषय स्फुरविण्यास पाहिजे आहे. कारण बुद्धीच जर नाहीं तर विषय स्फुरविण्यास जीव कसा उत्पन्न होईल. तो उत्पन्न नाहीं झाला तर विषय कसे स्फुरतील ? ते स्फुरण्यास जीवत्व पाहिजे, व जीवत्वाकरितां बुद्धि पाहिजे. बुद्धि आणि जीव दोघे असतील तेव्हांच विषय स्फुरले जातील, बुद्धीमुळें जीव उत्पन्न व्हावा आणि त्या जीवानें बुद्धीस संकल्प करण्याची शक्ति द्यावी; तेव्हांच विषय जाणले जातात. विषय जाणण्यास बुद्धि आणि जीव पाहिजे, त्याचप्रमाणें आत्माही पाहिजे. आत्मा नसेल तर बुद्धींत प्रतिबिंब कोणाचें पडेल ? प्रतिबिंब नाहीं मग जीवत्व कोणास म्हणावे ? तें म्हणण्यास कांहींच आधार नाहीं करितां आत्म्याची गरज आहे. आत्मा, जीव आणि बुद्धि तिन्ही असतील तरच विषय स्फुरले जातील; एरव्हीं जाणार नाहींत. म्हणून विषय स्फुरविण्यास तीन असलीं पाहिजेत. साधकानें या तिहींचीं रूपें अभ्यासाचे योगानें सूक्ष्मदृष्टीनें एकांतीं बसून निवडावीं; म्हणजे तीं हळूहळू कांहीं दिवसांनीं कळूं लागतील; याकरितां साधकानें निवांत बसून विकल्पाचें रूप चिरकाल अभ्यासानें पहात बसावें, म्हणजे त्या योगानें तिहींचीं रूपें टळटळीत स्पष्ट कळतील. प्रथम, बुद्धिवृत्ती, जडरूप कशी आहे; तिला जीव कसा प्रकाशितो; हें जीवाचें विशेषत्वाचें प्रकाशणें पाहिलें म्हणजे मग सामान्य कळेल.

बुध्दिवृत्तीचा चंचळपणा । जाऊन आदळे विषयीं नाना । परी तियेसी जाणवेना । अमुक ह्मणोनि ॥ ८५ ॥
जीव हा विशेष ज्ञानें प्रकाशी । अमुकसें स्फुरवी पदार्थासी । परी कल्पना नसे तयासी । ज्ञानाज्ञानरूप ॥ ८६ ॥
बुध्दिवृत्तीनें कल्पना करावी । जीवानें अमुकसी स्फुरवावी । ऐशी हे विकल्पाची गोवी । पहावी उकलोनी ॥८४॥
आरंभीं निर्विकल्प जे वृत्ति । सामान्यत्वें झेंपावती । पुढें तयेचे प्रकार होती । द्विधा प्रकारें ॥ ८५ ॥
पहिली नेत्रद्वारें पदार्थ पाहतां । जीवें प्रकाशिलाही असतां । हें काय कीं संशयात्मकता । हा मनाचा विकल्प ८६
मनासी प्रकाशता नसे । जीवासी संशय नुमसे । दोनी मिळोनी पदार्थ भासे संशयात्मकही ॥ ८७ ॥
जैसा आरसियाचा स्वच्छपणा । आणि दर्पणींचा भासकपणा । दोनी मिळुनी झळझळपणा उमटे भिंतीवरी ॥८८॥
तैसें मन आणि जीव मिळूनी । संशय करिती पदार्थ देखोनी । पुढें मन बुद्धि निश्चया आणी । अमुक हें सत्य ८९
तया बुद्धीसीही जडत्व असे । कल्पना मात्र वाउगी करीतसे । परी तो विषय न प्रकाशे । जीवावांचूनी ॥९०॥
जीवाच्या प्रकाशें बुध्दीसी ज्ञान । पदार्थ कळे अमुक म्हणून । हा घटचि निश्चय करी पूर्ण । तेव्हां संशय मावळे ९१
एवं मन बुद्धि मिळून एक वृत्ती । जीवचि प्रकाशी तिजप्रती । याचि नांवें विकल्प ह्मणती । जो मागें स्पष्ट केला ९२
ययापरी वृत्ति आणि जीव । दोहींचे वेगळाले स्वभाव । निवडावे साधकें स्वयमेव । बैसोनि अभ्यासें ॥ ९३ ॥
बुद्धि आणि जीवाचें रूप । अल्पज्ञ आणि जड संकल्प । हे कळूं येती भिन्न भिन्न स्वरूप । अभ्यास बळें ॥ ९४ ॥
दोहींचीं रूपें स्पष्ट कळतां । पुढें मध्यसंधीसी अवलोकितां । स्पष्ट सामान्य चिद्रूपता । अनुभवा येतसे ॥९५॥
जैसा बहु आरसियांच्या बहुत । भिन्न भिन्न झळझळी उमटत । तितुकाची सूर्यप्रकाश आच्छादित । केलासे विशेष ९६
तैसे अमुकसे विषय स्फुरतां । तितुकीच आच्छादिली सामान्यता । मागें पुढें संधी टळटळितां । चिद्रूपता स्पष्ट ९७
आरशाच्या भिन्न भिन्न ज्या झळझळी । त्याच्या मध्यसंधीचिया स्थळीं । जो प्रकाश देखिजे नेत्रकमळीं । तो तरी मुख्य सूर्याचा
तैसा एक विकल्प उठोनि निमाला । दुजा मागून नाहीं उठिला । त्या संधींत सामान्य संचला । चिद्रूप प्रकाश ९९

---

बुद्धिवृत्तीचा चंचळपणा विषयांत जाऊन आदळतो, परंतु तिला हें अमुक असें कळत नाहीं; तसेंच जीव विशेष ज्ञानाचें प्रकाशानें हा अमुक पदार्थ असें स्फुरवितो; पण त्याला ज्ञानअज्ञानरूप कल्पना नाहीं; बुद्धीवृत्तीनें कल्पना करावी आणि जीवानें तें अमुक असें स्फुरवावें; तेव्हांच विषय जाणले जातात. याप्रमाणें विकल्पाचें गोवें उलगडून पहावें. प्रथम निर्विकल्पवृत्ति सामान्यत्वें झेंपावते, मग तिचे दोन प्रकार होतात. पहिला नेत्रद्वारानें पदार्थ पहात असतां, व जीवानें हा अमुक पदार्थ असें प्रकाशिलें असतां, हें काय आहे, असा संशयात्मक विकल्प उत्पन्न होतो, हेंच मनाचें स्वरूप, मनास स्वतः प्रकाश नाहीं, व जीवास हें काय असा संशय उत्पन्न होत नाहीं. पण मन आणि जीव दोघे असतात तेव्हां संशयात्मक पदार्थ भासतो. जसा आरशाचा स्वच्छपणा आणि प्रतिबिंबाचा भासकपणा, या दोन साधनांनीं आरसा व प्रतिबिंब, हीं भिंतीवर झळझळ उठवितात. तसें मन आणि जीव मिळून हें काय असा पदार्थ पाहून संशय करितात. त्या संशयाचा खरा निश्चय बुद्धि करिते कीं, हा अमुक पदार्थ आहे; हा बुद्धीला निश्चय जीवाचे प्रकाशावांचून करितां येत नाहीं. कारण ती जड आहे ती वाउगी कल्पना करिते, पण जीव जेव्हां तो पदार्थ प्रकाशितो तेव्हांच हा अमुक पदार्थ असें ती ठरविते. जीवाचे प्रकाशानें बुद्धीस ज्ञान होऊन हा अमुक पदार्थ असें तीस कळतें. हा घटच आहे' असा जेव्हां ती पूर्ण निश्चय करिते, तेव्हां मनाचा संशय जातो. याप्रमाणें वृत्तीचे दोन प्रकार मन आणि बुद्धि. यांस जीवच प्रकाशितो. यालाच पूर्वीं विकल्प म्हटलें होतें. जीव आणि वृत्ति या दोहोंचे वेगळाले स्वभाव साधकानें स्वतः अभ्यासाचे योगानें निवडावे; म्हणजे जीवाचें रूप अल्पज्ञ व बुद्धीचें रूप जडसंकल्प आहे. असें निरनिराळें स्वरूप प्रत्येकाचें कळून येईल. दोहोंचीं रूपें स्पष्ट कळलीं म्हणजे मग, मध्यसंधी पहाव्या. त्या पहातां पहातां स्पष्ट सामान्य चिद्रूपता अनुभवास येईल.

पुष्कळ आरशांमुळें पुष्कळ झळझळी उत्पन्न होतात; त्या विशेष प्रकाशक झळझळींनीं झळझळी इतका ( त्या ) सामान्यरूपाचा प्रकाश आच्छादित केला जातो, तसें हें अमुक विषय असें ठरलें असतां त्या विषयांइतकी सामान्य चिद्रूपता आच्छादिली जाते व बाकीची विषयांखेरीज जी चिद्रूपता आहे ती त्या विषयाचे मागेंपुढें स्पष्ट संचलेली असते. जसें आरशाचे योगानें सूर्याचें प्रतिबिंब पडतें, त्या प्रतिबिंबाच्या झळझळी भिंतीवर उठतात. त्यांपैकीं प्रत्येक दोन झळझळींच्यामध्यें जो प्रकाश आपणास दिसतो, तो मुख्य रूपाचा आहे, प्रतिबिंबाचा नाहीं. तसा जीव आणि बुद्धि यांच्या दोन विकल्पाचे मध्य संधीमध्यें जो प्रकाश आहे, तो चिद्रूपाचा आहे, जीवाचा नाहीं.

अथवा एकाही संकल्पीं पाहतां । अमुक स्फुरलें तें मात्र त्यागितां । पुढें ज्ञातता मागें अज्ञातता । प्रकाशिली सामान्यें ऐसें जें सामान्य चिद्‌घन । स्पष्ट कीजे जीव विकल्पाहून । आणि जागृति स्वप्नींचे अभ्यासेंकडून । ज्ञानाज्ञानाहीपासून आधीं बैसतां उघडूनी नेत्र । घटपटादि पाहतां पदार्थमात्र । स्पष्टचि कीजे सामान्य चिन्मात्र । विशेष विकल्पाहूनी विषय पाहतां नेत्र उघडूनी । संधी जाणाव्या जागृत स्थानीं । पुढें ज्ञातता अज्ञातता दोनी । कळती प्रकाशित कैशा ३ घट दृष्टीं पहात असतां । तो सांडून पाहूं जाय पटावरुता । अथवा अन्याहून अन्य विषयीं जातां । मध्य संधी कळती घटाचें पाहणें सांडिलें । पट पहावयासी चालिलें । पटापर्यंत नाहीं गेलें । तोंवरी संधीचें रूप ॥ ५ ॥ जैशिया झळझळी भिन्न भिन्न । बहूत दिसती त्या त्यागून । मध्य संधी ज्या सूर्यें प्रकाशमान । पहाव्या दृष्टीं ॥ ६ ॥ तैसेचि विषयाहूनी दुजिया । विषयांप्रती जातां आपसया । संधि दिसताती मध्य ठायां । अवलोकाव्या ते समयीं॥७॥ घट पाहतां पाहतां सोडावा । पट तरी दृष्टीसी न पहावा । तितुकी अवधि जी ये अनुभवा । तो वोळखावा संधि ॥८॥ तया मात्र संधी माझारी । कल्पूं नये हाचि कीं संधी अंतरीं । जरी कल्पितां तये अवसरीं । विकल्पाचि जाहला ॥९॥ तरी साधकें तितुका अवसर । जोकां उभयाविषयांचामध्यसार । नकल्पितां जो कांहीं भाव स्थिर । तो सहज अवलोकावा मग तो पुढें आठवावा । कीं अमुकसा संधि आला अनुभवा । कांहीं विकल्पाचा नसतां गोवा । उगें स्थिरत्व होतें ११ त्या समयींचें जें उगेपण । तया समयीं नसतां आठवण । पुढें कळे अनुमानेंकडून । कीं स्थिरत्व होतें अमुक काळ १२ अमुक काळ जें स्थिरत्व जाहलें । तें विकल्पउत्थानीं आतां कळलें । तस्मात् तया समयासी अनुभविलें । तत्क्षणीं सामान्यें तेथें अनुभविलें जरी नाहीं । तरी आठवा न ये तें कांहीं । अनुभविल्या विषयाविण कांहीं । बोलतांचि न ये ॥ १४

तसेंच, एका संकल्पाचे वेळीं जें स्फुरलें असेल, तें टाकिलें असतां त्याच्यापुढें ज्ञातता व मागें अज्ञातता असते. ती सामान्य आत्माच प्रकाशितो, जीव प्रकाशीत नाहीं.

दोन विकल्पांचे संधीस व ज्ञातता अज्ञाततेस प्रकाशणारें जें चिद्रूप तें जीव विकल्पाहून व ज्ञानाज्ञानापासून निराळें आहे. असें जागृती व स्वप्न या दोन प्रकारच्या अभ्यासबळानें जाणावें. त्यांत प्रथम जागृतीमध्यें नेत्र उघडून बसलें असतां व घटपटादि पदार्थ पहात असतां विशेष विकल्पाहून सामान्य चिद्रूप स्पष्ट निराळें आहे असें जाणावें. याप्रमाणें जागृतीमध्यें विकल्पाच्या संधी व त्यास प्रकाशणारें चिद्रूप जाणिलें म्हणजे मग ज्ञातता व अज्ञातता प्रकाशित कशा आहेत तें कळेल. नेत्रानें घट पहात असतां तो पहाण्याचा सोडून पट पाहूं गेलें किंवा एक वस्तु पहाण्याची सोडून दुसरी पाहूं लागलें म्हणजे दोहोंच्यामध्यें कांहीं अवकाश जातो, त्यास संधी म्हणतात. ह्या संधींची सीमा किंवा रूप, पट पहाणें सोडिल्यापासून घट पहाणें घडलें नाहीं तावत्कालपर्यंतच्या अवकाशास संधी किंवा संधीची सीमा समजावी.

भिंतीवर दिसणाऱ्या झळझळी न पहातां त्यांच्यामधील जागा, सूर्यानें प्रकाशित आहेत हें जसें पहाणें. असेंच दोन विकल्पाचेमधील संधी आत्मप्रकाशानें प्रकाशित आहेत हें पहाणें आहे. घट पहात असतां तो पहाण्याचा सोडून पट पहावयास जावें; पण तो लवकर पाहूं नये, याप्रमाणें घटाचें पहाणें सुटल्यापासून पटाचें पहाणें घडलें नाहीं तोंपर्यंतचा जो अवधि अनुभवास आला; त्यास संधि म्हणावें. संधी पहात असतां, हा संधी असा निश्चय केला कीं, तोच विकल्प होईल, विकल्प झाला कीं, संधीची सीमा गेली असें समजावें. संधीची सीमा किंवा संधी गेला मग त्यांत प्रकाशणारें चिद्रूप कसें कळेल ? तें जर कळावें असा हेतु आहे, तर साधकानें त्या संधीमध्यें कांहीं न कल्पितां स्थीर भावानें संधी पहात असावें, कांहीं वेळ संधीचा स्थीरभाव पाहिला म्हणजे मग तो पुढें आठवावा कीं, अमुक वेळ विकल्प न उठतां संधीचा स्थिरभाव मीं पाहिला.

संधीचें स्थीरत्व पहात असतां आठवण नसल्यामुळें किती वेळ उगेपण होतें हें तेव्हां सांगतां येत नाहीं. पण तेंच उगेपण उत्थान झाल्यावर अनुमानानें कळतें कीं, अमुक वेळ उत्थान न होतां स्थीरत्व होतें. जें स्थीरत्व कांहीं वेळ होतें तेंच विकल्पाचें उत्थान झाल्यावर आतां कळलें. यावरून स्थीरत्वाचा अनुभव ज्याच्या प्रकाशानें जाणला गेला तेंच सामान्य चिद्रूप. जर स्थिरत्वाचे वेळीं सामान्य चिद्रूप नसतें, तर तेथचा अनुभव कोणी सांगितला असतां, व तेथें जर कांहीं अनुभविलें नसतें तर स्थीरता कशी आठविली असती ? ज्यापेक्षां स्थिरता आठवते त्यापेक्षां तिचा अनुभव घेतला आहे असें समजावें. व असा सिद्धांतही आहे कीं, जो विषय अनुभविला नाहीं तो सांगतां येत नाहीं. जो अनुभविला असेल तोच सांगतां येतो.

जैसा सहज दृष्टीं पदार्थ देखिला । पुरताअमुकम्हणूननाहींकळला । पुढेंजरीएखादियेंपुसिला । तेव्हांम्हणेपाहिलासावाटे ॥
तस्मात् तो पाहिला असे । विकल्प जरी तेथें नसे । परी पाहिला म्हणून सांगतसे । अनुभविला विषय ॥ १६ ॥
तैसाचिमध्यसंधीचासमय । जोकांसामान्यत्वाचाप्रत्यय । तो अनुभविलाहोतानिश्चय । म्हणोनिआतां आठवी ॥१८॥
ऐसा स्थिरत्वाचा जो अनुभव । तो चिद्रूप प्रकाशिला स्वयमेव । जेथें विकल्परूप हा जीव । विशेषत्वें नसे ॥ १८ ॥
जीव नसतां प्रकाश असे । तो प्रकाशिला सामान्य प्रकाशें । येथें संशय किमपि नसे । अगा हे रविदत्ता ॥ १९ ॥
कोणी कल्पना ऐशी करी । कीं तो प्रकाश जीवाचा निर्धारी । तरी ते अल्पमति अविचारी । अभ्यास दृष्टि त्या कैंची
झळझळी सांडूनि जो मध्यभाग । तो सूर्यें प्रकाशिला सांग । तेथें दर्पणस्थाचा लाग । प्रकाशावया नसे ॥ २१ ॥
दर्पणस्थें झळझळचि प्रकाशावी । तैसें विकल्पातें जीव प्रकाशवी । मध्यस्थळीं प्रकाशी रवि । तेवि मध्यसंधि आत्मा २
मधील भिंत दर्पणींचा । सूर्य प्रकाशीना साचा । तेवीं संधी जो उभय विषयांचा । जीव हा प्रकाशीना ॥ २३ ॥
तस्मात् तो कूटस्थ आत्मा । सामन्य प्रकाशक जो चिदात्मा । संधीमाजी स्पष्ट महात्मा । साधक पाहे अनुभवें ॥२४
विकल्प मात्र जितुका स्फुरे । तितुकाचि विशेषें जीव आविष्करे । झळझळ पडली तेथें भासमात्रें । विशेष दिसे ॥२५
असो जीवत्व जितुकें स्फुरलें । तितुकेंचि सामान्य आच्छादिलें । जैसें झळझळीनें मात्र झांकिलें । तितुकेंचि स्थळ २६
येर विकल्पाचे मागें पुढें । सामान्याचि दाटलें गाढें । जेवीं झळझळीमध्यें पाहतां जोडे । रवीचा प्रकाश ॥ २७ ॥
एवं ऐशिया संधीमाजीं । अभ्यासें अवलोकावें सहजीं । जेथें विकल्पवृत्ति नसे दुजी । तेंचि सामान्य चिद्रूप ॥ २८ ॥
ऐसा हा चिरकाळ अभ्यास । केला पाहिजे मध्य संधीस । उभय विषयांचा टाकूनि भास । सामान्यत्वें राहावें ॥ २९ ॥
हा चिरकाळ अभ्यास करितां । संधि स्पष्ट होती टळटळिता । मग भलते वेळे अवलोकितां । जेथें तेथें भासती ॥ ३०
संधीचा जो प्रकाशक । तो सामान्य चिदात्मा एक । प्रतीति येतसे निश्चयात्मक । तस्मात् अभ्यास कीजे ॥ ३१ ॥

---

जसें कोणी एक गृहस्थ स्वस्थ विचार करीत बसला असतां त्यापुढें दुसरा कोणी एक गृहस्थ गेला. कांहीं वेळानें पहिल्या गृहस्थास तिसऱ्यानें विचारिलें कीं, अमुक गृहस्थ येथून गेला काय ? त्यावर पहिला उत्तर देतो कीं, माझें त्याकडे लक्ष नसल्यामुळें अमुकच गेला असें निश्चयानें मला सांगतां येत नाहीं. पण कोणीसा येथून गेला खरा. या पहिल्या गृहस्थाचे सांगण्यावरून कोणी तरी गृहस्थ गेला हें सिद्ध आहे. व त्यानें तरी या गृहस्थास पाहिलें म्हणूनच त्यास कोणी गृहस्थ गेला असें सांगतां आलें, जर त्यानें मुळींच पाहिलें नसतें तर त्यास कोणी तरी गेलें असें सांगतां आलें नसतें. ज्यापेक्षां तो कोणी तरी गेला असें सांगतो, त्यापेक्षां त्यानें त्या गृहस्थास पाहिलें हें सिद्ध आहे. त्याचप्रमाणें मध्यसंधीची वेळ, ज्यांत सामान्याचा अनुभव आला; तो समय किंवा त्यासमयींची स्थिरता तेव्हां अनुभविली होती, म्हणूनच ती उत्थान झाल्यावर आठवली. याप्रमाणें स्थिरत्वाचा अनुभव चिद्रूपानें प्रकाशिला. तेव्हां, तेथें विकल्परूप विशेषत्वानें प्रकाशणारा जीव नव्हता. जीव नसतां जीवाचे प्रकाशावांचून जें जाणलें गेलें तें सामान्य चिद्रूपानें प्रकाशिलें असें समजावें. कोणी म्हणतील कीं, स्थीरत्वाचाही अनुभव जीवाचेच प्रकाशानें जाणला जातो, पण असें नाहीं. कारण झळझळीचे-मधील संधी जशा प्रतिबिंबास प्रकाशितां येत नाहींत; त्यास सूर्यच प्रकाशितो, तशा विकल्पाचेमधील संधी जीव प्रकाशित नाहीं तर त्यास चिद्रूपच प्रकाशितें, तें चिद्रूप म्हणजे कूटस्थ आत्मा त्यास साधक पहातो.

भिंतीवर जेथें झळझळ उठते तेथें प्रतिबिंब विशेषत्वानें प्रकाशीत आहे असें समजावयाचें. तसेंच जितका विकल्प स्फुरतो तितका विशेषत्वानें जीव प्रकाशतो असें समजावें. जेथें झळझळ उठली तें स्थळ, प्रतिबिंबानें आच्छादिलें असें समजावें. तसें जीवत्व जितकें स्फुरलें तितकें त्यानें सामान्य आच्छादिलें असें समजावें. झळझळीवांचून जी जागा उरली ती सूर्यानेंच प्रकाशिली आहे, तसें विकल्पाचे मागेंपुढें राहिलेली संधी आत्म्यानें प्रकाशिली आहे. याप्रमाणें जेथें विकल्प नाहीं अशा संधींत चिद्रूप आहे हें अभ्यासानें सहजीं पहावें. याप्रमाणें मध्यसंधीचा चिरकाल अभ्यास करावा, आणि सामान्यत्वें रहावें. असें करितां करितां संधी टळटळीत स्पष्ट होतील, व ते पाहिजे त्या अवस्थेंत पाहिजे तेव्हां पाहिले असतां जेथें तेथें भासतील, व त्यांस प्रकाशणारा चिदात्मा अनुभवास येईल, करितां अभ्यास कर.

आतां ज्ञातता अज्ञातता कैशी । प्रकाशीतसे आत्मा अविनाशी । तेंचि स्पष्ट कीजे ताहे मानसीं । सावधान असावें ॥
बैसतांही नेत्र उघडोनी । नूतन पदार्थ जो तया स्थानीं । तो एकाएकीं देखिला नयनीं । तेव्हांचा जो वृत्तिभाव ३३ ॥
अंतरांतून विर्विकल्पवृत्ति । आरंभीं उफाळून पदार्थावरुती । सहजत्वें तदाकारता पावती । तेथून येथवरी पसरे ॥ ३४॥
तो पदार्थ तरी नाहीं कळला । अथवा संशयही नाहीं स्फुरला । ऐशिया तया न कळणियाला । अज्ञातता म्हणावी ३५
पुढें मन संकल्प उठतां । हें काय असें न कळे पुरता । तो संशय वाटतसे चित्ता । अमुक निश्चय नव्हे ॥ ३६ ॥
मग निरखून जेव्हां पाहे । सान मुख स्थूल उदर लाहे । तेव्हां म्हणे हा घट आहे । हा निश्चय बुद्धीचा ॥ ३७ ॥
एवं मनाचा जो कां संशय । आणि बुद्धीचा निश्चय । ऐसे जे हे भाव उभय । तें भासकत्व जीवाचें ॥ ३८ ॥
तया पुढें पाहणें घटाचें । ज्ञान तरी होऊन साचें । जें स्थिरत्व सामान्य वृत्तीचें । तया ज्ञातना बोलिजे ॥ ३९ ॥
घट निश्चय कळूं आला । संशय तो निःशेष मावळला । तत्क्षणींच जीवही निमाला । घटबुद्धि प्रकाशोनी ॥ ४० ॥
हे विशेषत्वें तिनी मावळती । उगें कळणें मात्र उरे वृत्ति । तेंचि ज्ञातता पहावी पुरती । सामान्य घटाकारता ॥ ४१ ॥
पूर्वी संशयात्मक हें मन । जोंवरी जाहलें नाहीं उत्पन्न । तेंचि न कळणें अज्ञान । सामान्यें प्रकाशिलें ॥ ४२ ॥
पुढें ज्ञान होऊन बुद्धीसी । नाश होय विशेषासी । तुसधें कळणें जें सामान्यें वृत्तीसी । तयाही प्रकाशीं चिद्रूप ॥४३॥
एवं पहिली ते अज्ञातता । पुढें उरे ते जाण ज्ञातता । हे दोन्ही प्रकाशिलें तत्त्वतां । सामान्य चिद्रूपें ॥ ४४ ॥
मध्यें जीवाचें रूप तरी । किती असे पहावें अंतरीं । खद्योत जैसा चमकून ते अवसरीं । तत्क्षणीं झांकोळे ॥ ४५ ॥
मनाचा मात्र संशय उठतां । अथवा बुद्धीसी अमुक हा निश्चय होतां । तितुकियासीच होय स्फुरविता । विशेषत्वें जी
तितुकें मात्र स्फुरवोनि यावें । तत्क्षणींचि स्वतां मावळावें । पुढें उरे तें स्वयें प्रकाशावें । सामान्य चिद्रूपें ॥ ४७ ॥
तस्मात् येथेंही रविदत्ता । अभ्यासावें सादर तत्त्वतां । आधीं नूतन पदार्थ पाहतां । अज्ञातता अनुभवावी ॥ ४८ ॥
अथवा संशय निश्चय पदार्थाचा । होऊन जातां भाव कळण्याचा । उरे तो प्रकाश सामान्याचा । तोचि स्थिर करावा४

---

**अज्ञातता.**—डोळे उघडून पदार्थ पहात असतां तेथें असलेला जो नवीन पदार्थ तो एकदम डोळ्यांनीं पाहिला असतां जो वृत्तिभाव तेव्हां होतो, म्हणजे प्रथम निर्विकल्प वृत्ति आंतून उफाळून पदार्थावर जाऊन सहजत्वें तदाकारता पावते, म्हणजे उफाळण्यापासून तदाकारता पावेपर्यंत येथून तेथवर पसरते; पण पदार्थ कळला नाहीं, अथवा त्याविषयीं संशय उत्पन्न झाला नाहीं, अशा न कळण्यास अज्ञातता म्हणतात.

अज्ञाततेनंतर, मन संकल्प उत्पन्न होऊन हें काय असें पुरतें कळलें नाहीं, असा मनास संशय वाटत आहे; पण त्यास निश्चय होत नाहीं. मग निरखून जेव्हां पहातें, आणि लहान तोंड, मोठें पोट ज्याचें असा हा घटच आहे असा निश्चय बुद्धि करिते. मनाचा संशय आणि बुद्धीचा निश्चय हे दोनच भाव जीव आपले प्रकाशानें प्रकाशितो तेणेंकरून घट निश्चय होतो.

**ज्ञातता**—घटाचें ज्ञान होऊन पुढें घटास पाहूं लागलें असतां, हा घट आहे असा संशय किंवा निश्चय न होतां नुसती सामान्यवृत्ति घटकार होऊन स्थीर रहाते, त्या स्थीरतेस ज्ञातता म्हणतात.

हा घट असा निश्चय झाला तेव्हां संशय गेला. संशय गेल्यावर बुद्धीस हा घट असा प्रकाश करून जीवही तत्क्षणींच निमाला. याप्रमाणें मन, बुद्धि आणि जीव हीं तिन्हीं विशेषत्वें स्फुरणारीं आहेत. हीं मावळल्यावर वृत्तीस उगीच कळणें उठतें; त्यायोगानें सामान्य घटाकारता होते, तीस ज्ञातता म्हणतात.

घट पहावयास लागलों असतां जोंपर्यंत संशयात्मक मन उत्पन्न झालें नाहीं, तोंपर्यंतचें जें न कळणें तेंच अज्ञान. त्या अज्ञानास किंवा अज्ञाततेस सामान्यानें प्रकाशिलेलें आहे. तसेंच बुद्धीस ज्ञान होऊन घट निश्चय झाला, मग विशेष ज्ञान गेलें. वृत्तीस जें सामान्य करणें उरलें तीच ज्ञातना; त्या ज्ञाततेस सामान्यानें प्रकाशिलेलें आहे.

प्रथम अज्ञातता मग ज्ञातता, सामान्यानें प्रकाशिलेली आहे. यामध्यें जो घट जाणण्याचा विकल्प झाला, तो जीवानें प्रकाशिला. तें जीवाचें प्रकाशणें काजव्याचे चमकण्याप्रमाणेंच किंचित् आहे, व काजवा जसा चमकून मावळतो तसा जीव घटज्ञान करून मावळतो. मनाचा संशय उठला असतां अथवा बुद्धीस निश्चय करावयाचा असतां तितकाच वेळ जीव विशेषत्वें स्फुरवितो, आणि आपण मावळून जातो, पुढें जी उरते ती अज्ञातता व ज्ञातता चिद्रूप प्रकाशिते. करितां रविदत्ता, तूं ज्ञातता व अज्ञातता यांचा अभ्यास कर. तेणेंकरून चिद्रूप कळेल. अज्ञातता अनुभविल्यावर जो पदार्थ आपण पहात आहों तो सोडून दुसरा लवकर पाहूं नये, कारण तशानें ज्ञाततेची स्थीरता फार वेळ अनुभवितां येणार नाहीं.

तोचि एक पदार्थ पहावा । दुसरा सत्वर नावलोकावा । एकाकारत्वें सहज स्वयमेवा । घ्यावा अनुभव ॥ ५० ॥
दुसरा जरी पदार्थ पाहिला । तरी तोही पाहिजे स्थिर केला । विकल्पाआदि अंतीं ज्ञानाज्ञानाला । क्षणक्षणां वाढवावें
विकल्प असे तो क्षण क्षण । अभ्यासबळें करावा क्षीण । ज्ञातता अज्ञातता वर्धमान । दिवसें दिवस व्हावी ॥ ५२॥
ऐसाचि संधि उभय विषयांचा । वाढवीत जावा अभ्यासें साचा । मधील सामान्य प्रकाशाचा । अनुभव घ्यावा ॥ ५३
ऐसा हा बहिर्विषय व्यापारीं । संधि साधावा येकांतामाझारीं । अथवा देहयात्रा होतां सारी । क्षणक्षणां पहावा ॥ ५४
वृत्तीसी अभ्यासचि पडावा । व्यापारीं संधिचा अनुभव घ्यावा । अधिकचि आवडी उपजे भावा । समाधिसुखाची५५
आतां नेत्र झांकून जे अंतरीं । विकल्प उठताती नानापरी । येथेंही उभय विकल्पांमाझारीं । संधि साधाव्या ॥ ५६ ॥
आणि ज्ञातता अज्ञातता । प्रकाशित सामान्यें तत्त्वतां । तेही साधावे समस्ता । अभ्यासबळें ॥ ५७ ॥
नेत्र झांकून उगेपणीं । दृष्टी घालावी मूळ स्फूरणीं । संकल्पाचिये जन्म स्थानीं । सहज अवलोकावें ॥ ५८ ॥
सहजीं जो कां विकल्प उठे । विषयध्यासें आठवी गोमटें । तें अवलोकावें अंतरीं नेटें । अंतर दृष्टीनें ॥ ५९ ॥
घटपटादि नाना प्रकार । विषय भासती जैसे साचार । तेथें शब्दस्पर्षादिकांचे अनुकार । होती प्रत्यक्षापरी ॥६०॥
ते ते जैसे जैसे सहजें । येक येक उमटतील जे जे । अवलोकावे आपुलें तेजें । भासत असती ॥ ६१ ॥
विकल्प उठोनि विषय कल्पी । अमुक म्हणोनि आरोपी । ते बुद्धि ओळखावी साक्षेपी । स्थापी सुंदर खोटें ॥ ६२ ॥
ऐशिया बुद्धीसी स्फुरविता । अमुकअल्प प्रकाशें होय दाविता । तो जीव बिंचला बुद्धिआंतौता । प्रतिबिंब जेवीं दर्पणीं
तो जीव विकल्प होतां उमटे । विकल्प नासतां तत्क्षणीं आटे । मागुती दुजियामाजीं उठे । विकल्पासह ॥ ६४ ॥
चिद्रूप सामान्य जो प्रकाश । आदि मध्य अवसानी अविनाश । मध्यें उठोनि जो पावे नाश । तो जीव अनात्मा६५
परी विशेषत्वें जीव उठतां । सामान्यासी होय आच्छादिता । म्हणोनी सामान्य प्रकाश ऐता । असतां न कळे साधका
यास्तव साधकें ऐसें करावें । संधीचें पाहणें अभ्यासावें । उभय विकल्पीं अवलोकावें । संधींत सामान्य ॥ ६७ ॥
एक विकल्प उठोनि मावळे । दुजा जोंवरी न उफाळे । तोंचि संधि अनुभवितां कळे । विकल्प उठतां मग ॥ ६८ ॥
विकल्प नसतां उगेपणा । जाहला होता तो ये अनुमाना । तस्मात् तेथें होता कळलेपणा । तेणें आतां आठविलें
तोचि सामान्य प्रकाश निर्विकल्प । संधीमाजी दाटला अमुप । तो अनुभवावा साधकें साक्षेप । सामान्य होऊनी
तोचि अभ्यास कैसा कैसा । साधकें अभ्यासावा जैसा । तोचि बोलिजेत आहे अल्पसा । तेणें रीतीं कीजे ॥ ७१ ॥

---

ती यावी म्हणूनच दुसरा पदार्थ लवकर पहावयास लागूं नये, व एक सोडून दुसरा पदार्थ पाहूं लागलें, म्हणजे असेंच करावें. तेणेंकरून अज्ञातता व ज्ञातता क्षणक्षण वाढतील. मग सहजच विकल्प क्षणक्षण क्षीण होईल. ज्ञातता, अज्ञातता वाढवावयाची अशीच संधीही क्षणक्षण वाढवावयाची. याप्रमाणें ज्या जागृतीमध्यें म्हणजे बहिर्विषय व्यापारांत ज्ञातता, अज्ञातता व संधी वाढवावा, तसाच एकांतांतही वाढवावा. एकांतांत या तिहींचा अनुभव असा घ्यावा कीं, तो व्यापारांत सहज स्मरेल. याप्रमाणें वृत्तीस अभ्यास झाला असतां तिला समाधिसुखाची अधिकच आवड उत्पन्न होईल.

## स्वप्नांतील संधींचें विवेचन.

नेत्र झांकून उगेपणानें दृष्टि मूळ स्फुरणाकडे लावावी, आणि संकल्प कोठून उत्पन्न होतो तें स्थान पहावें. प्रथम सहज विकल्प उठतो, तो विषयध्यासानें पदार्थ आठवितो. ते पदार्थ किंवा शब्दस्पर्शादिकांचे अनुकार प्रत्यक्षाप्रमाणें होतात, ते अंतर्दृष्टीनें पहावे. प्रथम विकल्प उठून विषय कल्पितो, आणि हा अमुक असा निश्चय करितो, तीच बुद्धि समजावी, व त्या बुद्धीस जो प्रकाशणारा तो जीव समजावा. तो जीव विकल्प झाल्याबरा-बर उत्पन्न होतो, व तो नाहींसा झाला कीं मावळतो, आणि पुनः विकल्प उत्पन्न झाला कीं पुनः उत्पन्न होतो. ज्या वेळीं जीव विशेषत्वानें विकल्प स्फुरवीत नाहीं, त्या वेळीं सामान्य जें चिद्रूप तेंच प्रकाशीत असतें. सामान्य चिद्रूप विकल्पाचे आदि अंतीं मध्यें सर्वदां प्रकाशीत असतें; पण जेव्हां विकल्प असतो तेव्हां जीव विशेषत्वानें प्रकाशीत असल्यामुळें सामान्य प्रकाश आच्छादिलासा वाटतो; म्हणूनच साधकास सामान्य प्रकाशाचा अनुभव येत नाहीं; तो यावा म्हणून साधकानें संधी पहावा, व त्यांत सामान्य चिद्रूप आहे, त्याचा अनुभव घ्यावा. एक विकल्प उठून मावळला आणि दुसरा जोंपर्यंत उत्पन्न झाला नाहीं. तोंपर्यंत संधी अनुभवविला असतां कळतो; तो असा कीं, विकल्प नसल्यामुळें अमुक वेळ उगेपणा होता. हें विकल्प उठल्यावर अनुमान करितां येतें; व ज्यापेक्षां तेव्हांचें अनुमान आतां करितां येत आहे, त्यापेक्षां तेथें उगेपणा जाणणारें ज्ञान होतें, तोंच सामान्य निर्विकल्प प्रकाश त्या प्रकाशाविषयीं अभ्यास कसा करावा तें सांगतों.

अगा रविदत्ता ग्रामेंपट्टणें । भूमीवरील अपार स्थानें । पाहिलीं किंवा ऐकून जाणें । जागृतीमाजीं ॥ ७२ ॥
जे जे विषय सान थोरे । वनें उपवनें ग्रामें पुरें । ते ते कल्पून उभवी सारे । ध्यासमात्रें बुद्धि ॥ ७३ ॥
हें काय असेही ह्मणून । संशय करीतसे मन । निश्चय स्थापी अमुक हें आपण । तेचि बुध्दि ॥ ७४ ॥
इतुकियाही विकल्पासी । जीवाचि स्फुरवी आपेसि । या विकल्पा आदिअंतीं ऐकरसी । सामान्य चित्प्रकाश ॥७५॥
एवं आदि अंती सामान्य एक । मध्यें किंचित् विशेषात्मक । तया विकल्पामाजीं अनेक । विषयाध्यास उठती ७६
उगेंचि निवांतही असतां । ग्राम दिसूं लागे अवचिता । तो ग्राम जरी निरखूं जातां । उपवन दिसे ॥ ७७ ॥
तें उपवनही जाऊनी । नदी कीं पर्वत दिसे नयनीं । अथवा सेना बाजार दिसोनी । हारपोनि जाती ॥ ७८ ॥
ग्राम दिसत होतें तें राहिलें । उपवन जोंवरी नाहीं देखिलें । तेंचि मध्य संधीसी ओळखिलें । पाहिजे तत्क्षणीं ७९
अथवा उपवनही सांडोनियां । वस्तुजात नथे प्रत्यया । तोंवरी संधीमाजीं तितुकिया । सामान्य ओळखावें ॥ ८०॥
पदार्थ अमुकसा भासे । तो कल्पिला बुद्धिमानसें । तया जीव हा स्फुरवीतसे । अमुक ह्मणोनी ॥ ८१ ॥
तितुका विकल्पमात्र त्यागुनी । दुजा जोंवरी नव्हे भासकपणीं । तोंवरी तया संधीलागोनी । चित्प्रभा प्रकाशी ८२
ते संधिमात्र साधकें पहावी । त्यांतील सामान्यता अनुभवावी । मध्यें दिसे जरी विकल्प गोंवी । तरी ते आपणचि लोपे
भासविषय सहजचि उठती । ते आपणाचि भासून हारपती । मागें पुढें जें सहजगति । सामान्यचि असे ॥ ८४ ॥
स्फुरे तयासी उत्पन्न होणें । अल्पसें दिसून लय पावणें । या आदि अंतीं सहजपणें । सामान्य ऐतें ॥ ८५ ॥
ऐतें असून मिथ्याभासानें । उठले क्षणीं आच्छादनें । भास निमतां प्रतीति बाणे । सहज सामान्याची ॥ ८६ ॥
तस्मात् तें सामान्यचि अनुभवावें । भासतां विषय मिथ्या पहावें । पुढें तें मावळतां स्वभावें । सामान्यचि उरे ॥८७॥
हा एक प्रकार स्वप्नस्थानीं । संधीचा असे भासकपणीं । याहूनि प्रकार दुजा तो बोलूं वचनीं । विकल्पसंधीचा ८८
उगेंचि नेत्र झांकून बैसतां । भासविषयही न दिसतां । कल्पना मननात्मक तत्त्वतां । उठती निमती ॥ ८९ ॥
उगेंचि मागें जें कांहीं जाहलें । अथवा अमुक बोलिलें कीं ऐकिलें । तयाचें मनन करूं लागलें । मध्यमा वाचेनें ९०
अथवा पुढें अमुक करीन । अमुकासी अमुक बोलेन । ऐसें जें होत असे मनन । विकल्परूपें ॥ ९१ ॥
तें मनन सतत एकरूप । वाटे परी तें अल्प अल्प । एक उठून जातसे संकल्प । मागून दुजा उठे ॥ ९२ ॥
उठतांचि निमतसे तत्क्षणीं । तेव्हांचि दुजा उठे मागोनी । तें उठणें निमणें अंतर नयनीं । विलोकावें साधकें ॥९३॥

---

रविदत्ता, वनें, उपवनें, ग्राम, शहरें इत्यादि जीं जीं भूमीवरील अनेक स्थानें आहेत, तीं पाहिलेलीं किंवा ऐकिलेलीं त्यांची किंवा अनेक प्रकारचे विषय पाहिलेले किंवा ऐकिलेले त्यांची कल्पना करून ध्यासमात्रें, बुद्धि ते उत्पन्न करिते. पुढें ते विषय पहात असतां हें काय असा संशय जें करितें तेंच मन. त्या मनाचा संशय नाहींसा करून हें अमुक असा निश्चय जी करिते तीच बुद्धि. त्या बुद्धीस व मनास जीव प्रकाशितो. मन बुद्धि विकल्पावांचून जें त्यास सामान्य प्रकाशितो. याप्रमाणें विकल्पाचे आदि अंतीं सामान्य चिद्रूप व विकल्पाचे वेळीं जीव हे प्रकाशक आहेत; त्यांत जीव विशेषत्वानें विकल्पाचे वेळीं किंचित् प्रकाशतो, तेव्हां अनेक ध्यास विषयाचे उठतात, ते असे. उगीच निवांत असतां अकस्मात् एक गांव दिसतो. त्या गांवास जों निरखून पहावें तों एक बाग दिसूं लागते, पुढें बाग दिसेनाशी होऊन नदी किंवा पर्वत दिसूं लागतो; किंवा सेनाबाजार दिसूं लागतो. प्रथम गांव दिसत होता तो दिसेनासा होऊन बाग जों दिसली नाहीं, तोंपर्यंतचे अवकाशास संधी म्हणतात. तसेंच गांव दिसेनासा होऊन दुसरी कांहीं वस्तु दिसली नाहीं तोंपर्यंतचे अवकाशास संधी म्हणतात. त्या संधींत सामान्य चिद्रूप कसें आहे, याचा अनुभव मागें सांगितला आहे; त्याप्रमाणेंच पहावा. भासविषय सहज उठतात व ते भासून आपाप मावळतात, त्यांचे आदि अंतीं सामान्य प्रकाशीत आहे. मध्यें जो मिथ्या भास उठतो, त्यानें मात्र सामान्य आच्छादिला जातो, म्हणून जे विषय भासतात ते मिथ्या समजून ते भासल्यावर चिद्रूपच उरतें असें समजावें.

नेत्र झांकून उगीच बसलें असतां, भासविषय न दिसतां मननात्मक कल्पना उठतात व मावळतात त्या अशाः पूर्वीं जें कांहीं झालेलें असेल किंवा कोणी बोललेलें किंवा ऐकिलेलें असेल त्याचें मनन मध्यमा वाचेनें करूं लागतो, अथवा पुढें अमुक करीन, अमक्याशीं अमुक बोलेन असें विकल्परूपानें मनन करूं लागतो. तें मनन सतत एकरूप आहे असें वाटतें, पण तें निरनिराळें आहे. एक संकल्प होऊन गेला नाहीं तों दुसरा उठतो. तो मावळला नाहीं तों तिसरा उठतो. याप्रमाणें संकल्पाचें उठणें मावळणें अंतर्दृष्टीनें पहावें.

अति त्वरा या विकल्पांची । न कळे कदां पाहतां आहाची । तरी तयाहून सूक्ष्मदृष्टीची । धारणा धरावी ॥ ९४ ॥
बहु चिरकाळ पाहतां पाहतां । संधी कळो येती आंतौता । तथापि नयेचि अनुभवितां । तरी निरोधावा संकल्प ९५
तो विकल्प जरी रोधिला । तरी उठेल ध्यासें पाहिला । तो जरी मावळून गेला । तरी आणीक उठे ॥ ९६ ॥
हा स्वभावचि विकल्पाचा । उठतां न राहे कदां साचा । परी रोधामुळें वेग हा तयाचा । मंद मंद चाले ॥ ९७ ॥
तें समयीं विकल्पाची संधी । अंतर दृष्टीसी कळूं ये आधीं । परी तितुकी जे का अवधि । लक्षिली पाहिजे ॥ ९८ ॥
एक विकल्प उठोनि जातां । जोंवरी दुजा नुद्भवता । तया संधीचिया आंतौता । सामान्य चिद्रूप ॥ ९९ ॥
विकल्प उठतां जीव उमसे । विकल्प निमतां त्यासवें नासे । तरी संधीमाजीं जो जाणत असे । तो जीवाहूनी वेगळा ३१००
जयाचें प्रतिबिंब हें उमटलें । त्या आत्म्यानें संधीत प्रकाशिलें । तेथें जीवाचें सामर्थ्य नचले । विकल्व अभाव जाणावया
अरे जन्मले नाहीं तेक्षणीं । टकटका पाहे कैसें नयनीं । तैसें जीवत्व नसेचि मध्यस्थानीं । तरी संधि केवीं प्रकाशी ॥२॥
तस्मात् आत्मा ब्रह्म पूर्णपणा । त्रिकाळ बाधित जो देखणा । तोचि संधीसी प्रकाशमाना । करी सामान्य प्रकाशें ॥३॥
यास्तव संधीमाजी जो साक्षेपें । त्यागून विकल्पाचीं रूपें । अवलोकिता आत्मा चिद्रूपें । स्पष्ट कळूं येतसे ॥ ४ ॥
परी विकल्प जो कां उठिला । तों वरिचेवरी पाहिजे त्यागिला । मागून दुजा नाहीं जों उठिला । तोंवरी मध्यें पहावें ५
संकल्पाचे बुडीं दृष्टी । जो कां बैसोनि घाली मिठी । तरीच विकल्प हा त्वरें नुठी । तेव्हां संधि प्रकाशती ॥ ६ ॥
ऐसा अभ्यास चिरकाळ करावा । क्षीण होतां विकल्पाचा यावा । संधि प्रकाशलिया स्वानुभवा । सामान्य येतसे ॥ ७
एवं संधीमाजील चित्प्रकाश । अभ्यासें आणावा प्रत्ययास । तेणें बळें दिवसेंदिवस । प्रतीति बाणे ॥ ८ ॥
आतां ज्ञातता अज्ञातता । स्वप्नस्थानींच्या कैशा तत्त्वता । त्या प्रकाशिल्या केवीं अनंता । चिद्रूपें तें बोलिजे ॥ ९ ॥
परी जागृतस्थानीं ज्या निरोपिल्या । प्रति विषयीं मागें पुढें दाटल्या । त्याहून विलक्षण कळल्या । पाहिजे येथींच्या
येथील विलक्षण कां म्हणसी । तरी जागरीं प्रत्यक्षता विषयासी । तेथें उद्भव नसतां विकल्पासी । सामान्य वृत्ति पसरे
तैसें स्वप्नस्थानीं नव्हे । विकल्प उठती जरी स्वभावें । तरीच विषयध्यासें दिसावें । नातरी अभाव ॥ १२ ॥

---

विकल्प फारच जलद उठतात. ते साधारणपणें पाहूं गेलें असतां कळत नाहींत. करितां त्यांच्याहीपेक्षां सूक्ष्म दृष्टीनें पहावें. याप्रमाणें चिरकाळ पहाण्याचा अभ्यास केला असतां, विकल्पाचे आंतील संधी कळून येतील. या नच कळतील तर संकल्प रोधावा. संकल्प रोधिला तरी पूर्वीच्या ध्यासानें दुसरा संकल्प उठेलच. तो उठून मावळतो आहे तों तिसरा संकल्प उठेल. याप्रमाणें एकसारखे संकल्प उठतीलच, ते कधींही रहावयाचे नाहींत. पण निरोध केल्यानें इतकेंच होईल कीं, त्यांची गति मंद होत जाईल. मग विकल्पाची संधी अंतर्दृष्टीनें कळून येईल. ती कळून आल्यावर तिचा विचार करावा, म्हणजे सामान्य चिद्रूप कळेल. हें चिद्रूप त्रिकालाबाधित प्रकाशमान आहे. त्याचा लोप संकल्पाचे वेळीं झालासा दिसतो; पण तो मिथ्या; कारण विकल्पांत प्रकाशणारा जो जीव तो त्या चिद्रूपाचें प्रतिबिंब आहे. तें सामान्याचा लोप कसा करूं शकेल ? त्याचा लोप त्याच्यानें करवत नाहीं व विकल्पाखेरीजच्या मागें पुढें असणाऱ्या संधी त्यास प्रकाशितां येत नाहीं. जर संधी प्रकाशितां येत नाहींत, म्हणजे विकल्पाचे मागें पुढें याचा प्रकाश नाहीं. जर दोन काळीं त्याचा प्रकाश नाहीं तर तिसरे वर्तमान काळीं म्हणजे विकल्पाचे वेळीं तरी तो सामान्य प्रकाश कसा लोपवील ? आतां विशेष प्रकाशाचे दृष्टीनें कोणी सामान्याचा लोप झाला असें म्हणतील तर ते म्हणोत; पण विशेष प्रकाश हा खरा प्रकाश नव्हे, तर भास आहे. भासानें खऱ्याचा लोप कसा होईल ? असो.

विकल्प जो उठेल तो वरचेवर टाकावा म्हणजे मग मध्यसंधी कळतील. संधी कळण्यास संकल्पाचे मुळाशीं दृष्टि लावून बसावें. तेथून हलूंच नये, असें केलें असतां संकल्प लवकर उठणार नाहींत. ते उठले नाहींत तर सहजच संधी कळतील. याप्रमाणें चिरकाल अभ्यास करावा, म्हणजे विकल्प सहज क्षीण होईल, आणि संधीमधील चिद्रूप अनुभवास येईल.

### स्वप्नांतील ज्ञातता अज्ञातता यांचें विवेचन.

जागृतींतील ज्ञातता अज्ञातता यांहून स्वप्नांतील ज्ञातता अज्ञातता निराळ्या आहेत. कारण जागृतीमध्यें प्रत्यक्ष विषय आहेत, तसे स्वप्नांत नाहींत. स्वप्नामध्यें जेव्हां विकल्प उत्पन्न होतात तेव्हां ते ध्यासानें विषय भासवितात. विकल्प नसले म्हणजे स्वप्नांत दिसणारे भासविषय दिसत नाहींत.

मननरूपही विकल्प आंत । ज्ञातना अज्ञातता ज्या असत । तेथें विकल्पची असे उमटत । म्हणोनि सामान्यता नसें
तस्मात् स्वप्नस्थानींच्या भिन्न । ज्ञातता अज्ञानता विलक्षण । त्याचि केवीं ऐकें सावधान । अभ्यासावया बोलूं ॥१४॥
जागृतीमाजील एखादा । अप्राप्त विषय जो सदा । जयाची प्रयत्नेंही कदां । प्राप्त नव्हे ॥ १५ ॥
तयाचा आठव मनन काळीं । जाहलिया चित्त उगें तळमळीं । तेव्हां दुश्चितपणा होय समुळीं । प्रयत्न न चलतां १६
तया दुश्चितपणेंकडून । मोडून जाय होणें जे आठवण । अनायासें विकल्पाचें भान । मावळून जाय ॥ १७ ॥
विकल्पची किमपी न होतां । उगीच नेणिवेनें होय स्तब्धता । तेचि जाणवी अज्ञातता । विकल्पभावीं ॥ १८ ॥
ऐशियाही अज्ञाततेसी । सामान्य आत्माचि प्रकाशी । जीव उद्भवेना तया समयासी । विकल्प मोडतां ॥ १९ ॥
कवणेंही प्रकारेंकडून । सहजत्वें यावें दुश्चितपण । ते समयीं विकल्प जाय मोडून । नंतर सामान्यचि उरे ॥ ३१२० ॥
एवं अज्ञातता सामान्यें प्रकाशिली । हे साधका पाहिजे कळली । अज्ञातता चित्प्रकाशें व्यापिली । ते कळावया बोलूं
जागरीं अप्राप्त विषयाचा । परमार्थरूप कीं प्रपंचाचा । लाभ जो जाहला असेल साचा । तोचि मननीं आठवावा २२
तो आठवतांचि धन्यत्व वाटतें । तेणें आनंदें चित्त सुखावतें । पहिलें वृत्यात्मक जें असतें । तें वितुळतें तत्क्षणीं २३
पुढें सुखाकारताचि उरे । विकल्पाचें स्फुरणचि मुरे । उगें सुखचि सुखपणें थोरे । सहजगती ॥ २४ ॥
ऐसा जो हा उगेपणा । विषयानंदें तृप्त वासना । हेचि ज्ञाततेची लक्षणा । कळावी साधका ॥ २५ ॥
हाचि रविदत्ता विषयानंद । प्रसंगानुसार जाहला विशद । पुढें अनुक्रमें वासनानंद । आणि ब्रह्मानंद कळेल ॥ २६ ॥
प्रस्तुत येथील जे ज्ञातता । विकल्पावीण जे स्तब्धता । जेथें जीवाची नसे वार्ता । ते प्रकाशिली सामान्यें ॥ २७ ॥
अज्ञातता आत्मा प्रकाशी । मा केवीं प्रकाशीना ज्ञाततेसी । तस्मात् जेथें अभाव विकल्पासी । तेथें सामान्य स्पष्ट
परी साधकें विकल्पस्थिर करावा । मगस्वप्रकाशयेतसेस्वानुभवा । विकल्पाचा असतां गोंवा । असून स्पष्ट नव्हे सामान्य
म्हणोनि संधीचिये समयीं । अथवा अज्ञाततेचे ठायीं । किंवा ज्ञाततेचिये नवाई । घेइजे स्वानुभव ॥ ३१३० ॥
एवं कवण्याही प्रकारें । अभ्यासें विकल्प जरी सरे । तरीच सामान्य आविष्कारे । निजात्म प्रकाश ॥ ३१ ॥

---

आतां मननरूप जो दुसरा विकल्प त्यांत तरी विकल्प आहे. त्यावांचून मननात्मक पदार्थ उत्पन्न होत नाहींत. पदार्थ पहावयास नसले तर ज्ञातता अज्ञातता घडत नाहींत. ज्ञाततेकरितां व अज्ञाततेकरितां पदार्थ उत्पन्न करावे, तर ते विकल्पावांचून होत नाहींत. विकल्प असून पदार्थ असले म्हणजे तेथें सामान्य चिद्रूप लोपलें जातें. चिद्रूप लोपलें म्हणजे मग ज्ञातता अज्ञातता कोण प्रकाशील ? त्या प्रकाशिल्या नाहींत, मग आहेत असे तरी कसें मानावें ? याप्रमाणें जागृतींतील व स्वप्नांतील ज्ञातताअज्ञाततेंत विरोध येतो; म्हणून स्वप्नांतील अज्ञातता ज्ञातता, जागृतींतील अज्ञाततेज्ञाततेहून विलक्षण आहेत. त्या कशा आहेत, तेंच आतां सांगतों.

जागृतींतील जो एकादा अप्राप्त विषय आहे; ज्याची प्रयत्नानेंही कधीं प्राप्ति होत नाहीं; त्याची आठवण मनन काळीं होऊन चित्त तळमळतें व प्रयत्न न चालल्यामुळें दुश्चितपणा होतो. या दुश्चितपणाचे योगानें अप्राप्त वस्तूची झालेली आठवण नाहींशी होते. याप्रमाणें अनायासानें विकल्पाचें भान मावळून जातें; तें भान गेल्यावर विकल्प नसल्यामुळें सहज नेणिवेनें स्तब्धता येते. तीच, नेणिवेच्या अभावीं या स्वप्नामध्यें अज्ञातता समजावी. ह्या अज्ञाततेस, सामान्य चिद्रूप प्रकाशितें, तेथें विकल्प नसल्यामुळें जीव विशेष प्रकाशण्यास उत्पन्न होत नाहीं. कोणत्याही प्रकारानें सहज दुश्चितपण यावें म्हणजे तेणेंकरून विकल्प मोडून जाईल, मग सहजच सामान्य चिद्रूप उरेल.

जागृतींतील परमार्थरूप किंवा प्रपंचदायक जो अप्राप्त पदार्थ त्याचा लाभ झालेला मनन काळीं आठवतो. आणि मग धन्यता वाटते; त्या योगानें वृत्त्यात्मक असलेलें चित्त वितळून आनंदानें सुखावतें. याप्रमाणें विकल्पाचें स्फुरण मावळून सुखाकारता उरते म्हणजे सुखच सुखपणानें सहज स्थीर रहातें. याप्रमाणें विषयानंदानें वासना तृप्त होऊन होणारा जो उगेपणा, त्यास स्वप्न काळींची ज्ञातता म्हणतात. येथें विकल्प नसल्यामुळें जीव उत्पन्न होत नाहीं. तर, हींत सामान्य चिद्रूपच प्रकाशीत आहे. विकल्पाखेरीज सर्व चिद्रूपच प्रकाशितें. विकल्पांत मात्र जीव प्रकाशितो; त्यामुळें सामान्य स्पष्ट कळत नाहीं. ते कळावें व विकल्प क्षीण व्हावा म्हणून संधींत ज्ञाततेंत व अज्ञाततेंत, सामान्याचा अनुभव घ्यावा. कोणत्याही प्रकारानें विकल्प सरला पाहिजे. मग सहज आत्म्याचा प्रकाश होईल.

तंव रविदत्त करीतसे विनंति । जी जी एक विरोध वाटे मजप्रती । पूर्वश्लोकीं ऐकिली उक्ति । कीं विकल्पतिन्ही स्थळींअसे
जागृति स्वप्नीं विकल्प दिसे । आणि सुषुप्तीमाजींही स्फूर्तित्वें असे । प्रस्तुत निरूपण कीं नासे । जागर स्वप्नीं ॥ ३३ ॥
संधिकवाज्ञानताअज्ञातता । विकल्पहामावळेत्याआंतौता । नुसधीसामान्यस्फूर्तिउरेतत्वतां । तेथेंचिद्रात्माप्रकाशे ॥३४॥
तेचि स्फूर्ति सुषुप्तींत असे । तेचि विकल्परूप बोलिलीसे । इचा अभाव तो अभ्यासें नसे । तरी सामान्य प्रकाशे केवीं
आणि सुषुप्तींत प्राज्ञ अभिमान । हेंचि कीं जीवत्वाचें लक्षण । तो जीवासहविकल्प आपण । असतां सामान्य प्रगटेना
सुषुप्तींपर्यंत विकल्प व्यापला । तरी जागर स्वप्नीं केवीं जाय निमाला । हेंचि कैसें कळावें मजला । म्हणून चरण धरी ॥३७॥
तंव स्वामी म्हणती ऐक बापा । पुरतें विचारून पाहों विकल्पा । सुषुप्तिकाळीं असे ऐशिया जल्पा । अन्य प्रयोजन असे
बुद्धीसहित सुषुप्तीआंत । विकल्पाचा होय घात । जीवही त्यासवें लय पावत । विशेषत्वें ॥ ३९ ॥
नुसधी अंतःकरणाची स्फूर्ति । उठे निमे सुषुप्ति आंतौती । तयेसी न कळे स्वयंज्योति । म्हणोनि भ्रांति कल्पिली ॥४०
जीव जो जागरीं स्वप्नाआंत । देहभाव घेऊनियां बैसत । ते भ्रांति न फिटतां लय पावत । सुषुप्तिकाळीं ॥ ४१ ॥
उत्थान होतांचि मी देह म्हणोनी । पुढें प्रवर्ते व्यापारालागूनी । यास्तव कल्पिला सुषुप्तिस्थानीं । कीं असे गुप्त ॥ ४२
नेणपणावाचे अभिमान । तयासीच नांव हें प्राज्ञ । परी तेथें मीपणाचें स्फुरण । आणि आठवही नाहीं ॥ ४३ ॥
तरी तेथें जीव हा कैसा । कोणते रूपें असे सहसा । पुढें उद्भवे यास्तव आहेसा । केला परी तेथें नाहीं ॥ ४४ ॥
कांहीं दुजें वृत्तीसी दिसेना । म्हणोनि अज्ञान हे केली कल्पना । सर्वांचा अभावाचि तेथें देखणा । कोण कोणा होय ४५
एक ब्रह्म आत्माचि परिपूर्ण । आस्ति भाति प्रियत्वें आपण । असे तो देखे प्रकाशघन । तया अज्ञानासी ॥ ४६ ॥
तो स्फूर्तीचे अज्ञाना जाणे । आपुलिये सर्वज्ञपणें । तयासी कवणिया जडें जाणणें । जरी असतां बुद्ध्यादि ॥ ४७ ॥
जागृतींत विशेषासहित बुद्धि । असतां जाणेना आत्मया कधीं । मा सुषुप्तिकाळीं मावळतां शुद्धि । घेईल केवीं आत्मयाची
जैशी सूर्याचे प्रकाशीं । दिवटी लाविता उजळीना सूर्यासी । मा विझून गूळ उरतां तयासी । भानु प्रकाशवे केवीं ४९।

---

प्रश्न—मागील श्लोकांत तिन्ही अवस्थेमध्यें विकल्प आहे असें वर्णन केलें. आणि आतांचे श्लोकांत जागृतींतील व स्वप्नांतील विकल्प नाश पावतो. असें दाखवितां म्हणजे संधींत व ज्ञातता अज्ञानतेंत विकल्प मावळतो असें दाखवितां; पण नुसती स्फूर्ति सुषुप्तींत असते, ती विकल्परूप आहे असें वर्णिलेलें आहे. हिचा अभ्यासानें लोप होत नाहीं, म्हणजे हा विकल्प दूर होत नाहीं. मग हींत सामान्य चिद्रूप कसें प्रकाशेल ? तुम्हीं तर नुसती स्फूर्ति सामान्य प्रकाशितो असें म्हणतां हा विरोध येतो. तसेंच सुषुप्तींत प्राज्ञाभिमान आहे तोच जीव. हा जीव विकल्पासह आपण सुषुप्तींत आहे; तेव्हां तेथें सामान्य कसा प्रकाशेल, हा विरोध आहे. तसेंच जागृतीपासून सुषुप्तीपर्यंत विकल्प व्यापलेला आहे. मग जागृतींतील व स्वप्नांतील विकल्प कसा नाहींसा झाला तें मला सांगा.

उत्तर—आम्हीं सुषुप्तींत विकल्प आहे असें सांगितलें याचें कारण निराळें आहे. सुषुप्तींत बुद्धिसहवर्तमान विकल्पाचा नाश होतो. त्याबरोबर विशेषत्वानें स्फुरणारा जीवही लय पावतो. मग नुसती स्फूर्ति झोंपेंत उठते व मावळते तिला सामान्य कळत नाहीं. म्हणून जागृति स्वप्नांत जो देहभाव घेऊन बसणारा जीव त्याची भ्रांति न जातां तो सुषुप्तींत लय पावतो; आणि जागृति झाल्यावर मी देह असें म्हणून व्यापार करूं लागतो; म्हणून तो झोंपेंत गुप्त राहिला आहे अशी कल्पना करितात. नेणिवेचा जो अभिमान त्यास प्राज्ञ म्हणतात. पण झोंपेंत मीपणाचें स्फुरण आणि आठवणही नाहीं. तेव्हां तेथें जीव, कसा कोणते रूपानें आहे? कोणत्याही रूपानें नाहीं. पण पुढें झोंप सरल्यावर उत्पन्न होतो. म्हणून आहे असें म्हटलें; परंतु तो तेथें नाहीं. झोंपेंत वृत्तीला दुसरें कांहींच दिसेना म्हणून तेथें अज्ञान आहे अशी कल्पना केली. सर्वांचाच लय होतो मग कोणी कोणास पहावें. सर्वांच्या लयास पहाणारा अस्तिभातिप्रियत्वानें एक आत्मा आहे. तोच आपले प्रकाशानें अज्ञानास जाणतो. त्यास जाणण्यास बुद्धि आदिकरून सर्व असलीं, तरी तीं जड आहेत, म्हणून जाणूं शकत नाहींत. जागृतीमध्यें बुद्धि, जीवासह असतां आत्म्यास जाणत नाहीं मग ती बुद्धि सुषुप्तींत लय पावल्यावर आत्म्यास कशी जाणेल ?

सूर्याचे प्रकाशांत दिवटी लाविली असतां ती सूर्यास प्रकाशूं शकत नाहीं. मग ती दिवटी विझून जी गूळ उरते ती सूर्यास कशी प्रकाशील ? त्याच-

तैशी हे बुद्धि जागृतीमाजीं । आत्मया जाणेना सहजीं । तरी नुसधी वृत्ति आत्मत्वीं सतेजीं । सुषीप्त केवीं जाणों शके
गूळ अथवा मशालीसी । अथवा आणीक नाना पदार्थीसी । सूर्य जैसा सहजत्वें प्रकाशी । निजप्रकाशें ॥ ५१ ॥
तैसें अतःकरणाचें स्फुरण । आणि विशेषें बुद्ध्यादि मन । अथवा जिवादि विषयांचें दर्शन । आत्मा प्रकाशी निजतेजें
येर हे असतां न जाणती । तरी ज णावें कवणें सुप्ती । म्हणून कल्पिली अज्ञानभ्रांति । परी नेणिवेसी जाणे आत्मा ॥५३
आत्मा नेणीव जाणत असतां । वाउगा कल्पी मी नेणता । तोचि प्राज्ञ अभिमानी तत्त्वतां । जीवही कल्पिला ॥५४॥
परी सुषींत जीव ना अज्ञान । अमुक रूपाचें नसे जाण । मात्र देहउपाधीस्तव असे स्फुरण । तेंही स्पष्ट नसे ॥ ५५ ॥
जैसें देहाचें मढें पडे । प्राण वाउगा जडत्वें वावडे । तैसें अंतःकरणही असे जडें । उठे निमे प्राणासवें ॥ ५६ ॥
बुद्धि आणि जीवाचा अभाव । तरी कवणें आहेसा कल्पावा सुसमुदाव । तस्मात् देह प्राणस्फूर्तीचाही भाव । आहे तैसा नाहीं
तस्मात् रविदत्ता विकल्पाचा । सुषींत अभाव आहे साचा । अज्ञानादि आहे ह्मणणें वाचा । हा प्रकार भिन्न ॥ ५८ ॥
जागृतींत नसतां आत्मज्ञान । अन्यथा घेतला देहाभिमान । सुषींत विकल्प जातांही मोडून । अज्ञान न फिटे ॥५९॥
जागरीं येताचि मी हा काळ । कांहीं जाणिलें नसतां अळुमाळ । ऐसें नेणपण अभिमान बळ । आरोपी उठलिया ३१६०
अरे हें जागृतींतचि कल्पिलें होतें । कीं मी हें जाणतसें समस्तें । तेणें तादात्म्यें सुषुप्ती आंतौतें । मी नेणता कल्पी ६१
परी विचारें पाहतां जागृतींत । जीवही परप्रकाशें वर्तत । स्वतां प्रकाशावया समस्त । आभासरूप कैंचें ॥ ६२ ॥
सर्व आत्मप्रकाशाचें बळ । मागें पुढें दाटलें सकळ । मध्यें बुद्धिस्थ जीवाची झळझळ । अल्पशी दर्पणस्थापरी ॥ ६३ ॥
इतुकेनें म्हणे मीं जाणिलें । आत्मप्रकाशासी विसरलें । तेणेंचि विकल्प जरी मावळून गेले । परी कल्पितसे सुप्ति ॥६४॥
तस्मात् जो कोणी साधक खरा । जागरीं पाहे विचारद्वारा । कीं आद्यंत सामान्य आत्मा सारा । निजप्रकाशें प्रकाशी
मध्यें जीवाचें रूप केतुलें । तेंही सामान्यास्तव उमटलें । तें नाहींच ऐसें बोधा आलें । जया साधकासी ॥ ६६ ॥

---

प्रमाणें जागृतींत जीवासहवर्तमान बुद्धि आत्म्यास जाणत नाहीं; मग झोंपेंत नुसती स्फूर्ति आत्म्यास कशी जाणेल? ती जाणत नाहीं; पण सूर्य जसा मशाल, गूळ किंवा दुसरे कांहीं पदार्थ यांस प्रकाशितो. तसा आत्मा अंतःकरणाचें स्फुरण, जीव व बुद्धि व मन आणि विषय यांस विशेषत्वानें प्रकाशितो जीवादि बत्तीस तत्वें असतांना आत्म्यावांचुन तीं जाणूं शकत नाहींत. मग झोंपेमध्यें कोण जाणूं शकेल ? कोणीच जाणत नाहींत. म्हणून अज्ञान आहे, अशी भ्रांति कल्पिली. जी अज्ञान भ्रांतिरूप नेणीव कल्पिली. तिला आत्मा जाणतो आत्मा नेणिवेस जाणत असतांही मी कांहीं जाणत नाहीं असा नेणतेपणा आपणास लावितो; तोच कल्पित प्राज्ञाभिमानी जीव समजावा. त्याखेरीज वास्तविक खरा जीव सुषुप्तींत नाहीं तसेंच अज्ञानही नाहीं. पण देहउपाधीमुळें स्फुरण आहे, तेंही स्पष्ट नाहीं. झोंप लागली म्हणजे देह प्रेतवत् पडतो. व त्यांत प्राण जडत्वानें उगाच वावरत असतो. त्या प्राणाबरावर जड जें अंतःकरण तेंही उठतें, व मावळतें. पण बुद्धि व जीव यांचा अभाव असल्यामुळें बत्तीस तत्वांचा समुदाय आहे असें कोणी कल्पावें ? कोणीच कल्पिण्यास नसल्यामुळें देह, प्राण व स्फूर्ति हीं असूनही नाहींच असें समजावें. रविदत्ता, याकरितांच सुषुप्तींत विकल्पाचा अभाव आहे म्हणून म्हटलें. आतां अज्ञानादि आहे असें म्हटलें आहे, तो प्रकार निराळा आहे. जागृतींत आत्मज्ञान नाहीं म्हणूनच अन्यथा देहाभिमान घेतला, त्या अभिमानाचें अज्ञान, सुषुप्तींत विकल्प मोडला तरी नाहींसें होत नाहीं. जागा झाल्यावर मी इतका वेळपर्यंत कांहीं जाणत नव्हतों असा नेणपणाचा बळें आरोप अभिमानानें करितो, याचें कारण जागृतींत दृश्य सगळें आहे, अशी कल्पना होती. व त्यांस मी जाणतों असें मानीत होता, त्या तादात्म्यानें सुषुप्तींत मी कांहीं जाणत नाहीं, अशी नेणिवेची कल्पना केली. वास्तविक, जीव जागृतींत परप्रकाशानें वर्ततो त्यास स्वतां प्रकाशण्यास रूपच नाहीं व प्रकाशही नाहीं. मग तो स्वतः कसा प्रकाशतो ? त्यास आत्म्याचा प्रकाश मिळतो तेव्हां बुद्धींत प्रतिबिंबणारा जीव दर्पणस्थाप्रमाणें अल्प प्रकाशतो. व झळझळीप्रमाणें प्रकाशून मी सर्व जाणता असें मानितो; त्यामुळें आत्मा प्रकाशतो याचा विसर पडला. आत्म्याचे प्रकाशानें विकल्प जर मावळून गेले तर त्या वेळीं सुषुप्तीची कल्पना करितो. पण खरा जो साधक आहे तो विचारद्वारा जागृतींतच पहातो कीं, आत्मा आपल्या प्रकाशानें आद्यंत सर्व सामान्यत्वें प्रकाशितो. मध्यें विशेषत्वानें जीव प्रकाशितो, तो तरी आत्म्याचे सामान्य प्रकाशानें प्रकाशितो. म्हणून जीव स्वतः प्रकाशीत नाहीं, असेंच म्हटलें पाहिजे. याप्रमाणें

यथार्थ सामान्य ज्ञान होतां । अज्ञानासह मरे अहंता । तयासी झोंपही जरी लागतां । नेणीव ना अभिमान ॥ ६७ ॥
आत्माचि एक परिपूर्ण । अद्वैतरूप सच्चिद्घन । कैंचा देह प्राण अंतःकरण । अविद्या आणि जीव ॥ ६८ ॥
जागरीं असतांचि हे नाहीं होती । जैशी मृगजळाची भरती । सुप्तींत तो अभावचि निश्चितीं । तरी आहे कल्पी कवण
मृगजळ जया ठायीं पडिलें । तेथें तृणही नाहीं भिजलें । मा नाहीं तेथें कोरडें जाहलें । बोलावें नलगे ॥ ३१७० ॥
तैसें जागरीं कीं स्वप्नाआंत विकल्प असतां मिथ्याभूत । तरी आहेसा सुषुप्तींत संकेत । कवणगा करी ॥ ७१ ॥
तस्मात् रविदत्ता सुषुप्तीमाजीं । अथवा उगेपणीं सहजीं । विकल्पता नसे दुजी । पहावी विचारें ॥ ७२ ॥
मध्यें जितुका विकल्प उठत । तितुक्यामध्यें सामान्य आच्छादित । तितुकें टाकितां जें सदोदित । मागें पुढें चिद्रूप
अथवा स्फूर्ति नुसधी असतां । तयासी कल्पिली विकल्परूपता । तरी तेथें जीवेवीण ऐता । सामान्य प्रकाश ॥७४॥
विशेष बुद्धि जेव्हां उठे । तेव्हां जीवत्वही त्यांत उमटे । तया विकल्पामाजीं गोमटें । आच्छादे सामान्य ॥ ७५ ॥
जैशी दर्पणाची झळझळ । पडिली असे जितुकें स्थळ । तितुकें स्थळींचें सामान्य केवळ । विशेषत्वें आच्छादी ॥७६॥
येर भिंतीं जें प्रकाशिली । ते गगन सूर्याची प्रभा पडिली । तैसी विकल्पाविरहित सामान्यता संचली । ते आत्मप्रकाशें प्रकाशित
जरी स्फूर्ति ते उठतसे । अंतरांतून विषयांत आदळतसे । परी बुद्धि विशेषत्व जरी नसे । तरी केवीं उमसे जीवित्व ॥७८
म्हणोनि निर्विकल्प जे वृत्ति । सामान्य विकल्पा आदि अंतीं । उगेपणीं किंवा सुषुप्ति । ते प्रकाशी आत्मतेजें ॥ ७९ ॥
येथेंही जरी शंका मानिसी । कीं वृत्ति तेथें उभवणें जीवासी । दर्पण तेथें प्रतिबिंबासी । दिसणें असे ॥ ३१८० ॥
जरी बुद्धि विशेषें उद्भवेना । परी वृत्ति आरसा तो असे जाणा । तरी जीवत्व प्रतिबिंब उमटेना । कैसें तरी अवधारीं
दर्पणीं प्रतिबिंब तों पडिलें । परी उष्णामाजीं उष्णीं मिळालें । । छायेमाजीं जैसें दिसलें । तैसें वेगळें दिसेना ॥ ८२ ॥
ऐशियापरी वृत्तीआंत । सामान्य जीव प्रतिबिंबत । परी विशेषाविण टळटळित । सामान्य प्रकाशे ॥ ८३ ॥
तेव्हां जीवाचें जें स्फुरवणें । सामान्यांत जाय मिसळून । जैसें विशेषीं दिसे जे भिन्नपण । तैसें आदि अंतीं नसे ॥ ८४

---

यथार्थ, सामान्य ज्ञान झालें असतां अज्ञानासहवर्तमान अभिमान नाहींसा होतो. मग त्या साधकास झोंप जरी लागली तरी नेणीव किंवा अभिमान रहात नाहीं. कारण त्यास एक आत्माच परिपूर्ण व्यापून आहे, त्याखेरीज देह, प्राण, अंतःकरण, अविद्या, जीव हीं कोणीच नाहींत असा अनुभव आहे. याप्रमाणें ज्याच्या अस्तित्वाचा मृगजल भरतीप्रमाणें अनुभव आहे तर झोंपेंत अभाव आहे. तेव्हां तीं आहेत अशी कल्पना कोण करील ? मृगजळ जेथें पडतें तेथें गवत भिजत नाहीं. मग जेथें मृगजळ पडत नाहीं तेथील गवत कोरडें झालें असें म्हणण्याचीच गरज नाहीं. त्याप्रमाणें जागृतींत किंवा स्वप्नामध्यें विकल्प असूनही जे मिथ्याभूत आहेत, त्यांच्या अस्तित्वाची सुषुप्तींत कोण कल्पना करील ? कोणीही करणार नाहीं म्हणून रविदत्ता, सुषुप्तींत किंवा उगेपणांत विकल्पता नाहींच. मध्यें मात्र विकल्प उठतो तितका सामान्य प्रकाश आच्छादला जातो. तो विकल्प टाकिला असतां सर्व सामान्यच प्रकाश रहातो. आतां नुसती स्फूर्ति उठली असतां तीच विकल्परूपता आहे असें म्हटलें, तर तींत जीव नसल्यामुळें विकल्परूप कोण विशेषत्वानें प्रकाशेल ? जीव बुद्धीवांचून उमटत नाहीं, व नुसते स्फूर्तींत बुद्धि नाहीं म्हणून दर्पणस्थाच्या झळझळीप्रमाणें सामान्य प्रकाश आच्छादण्यास विशेषत्वानें प्रकाशणारा जीव नाहीं म्हणून नुसती स्फूर्ति विकल्परूप नाहीं म्हणून विकल्पावाचून असणारी जी निर्विकल्प स्फूर्ति, जी उगेपणांत किंवा झोंपेंत आहे ती आत्मतेजानें प्रकाशित आहे. कारण जेथें बुद्धीचें विशेषत्व नाहीं तेथें आत्म्याचें सामान्यत्व आहे.

शंका—जेथें आरसा आहे तेथें प्रतिबिंब दिसलेंच पाहिजे. तसें विशेषत्वानें झळझळविणारी बुद्धि जरी नाहीं तरी वृत्तिरूप आरसा आहे त्यांत जीवत्व उत्पन्न झालें पाहिजे. तें कां होत नाहीं ?

उत्तर—आरशामध्यें प्रतिबिंब पडावयाचेंच हा नियम आहे. पण आपण दोन आरसे दोन ठिकाणीं ठेविले, एक उन्हांत व एक सावलींत त्यांपैकीं उन्हांत जो आरसा ठेविला होता त्यावर सूर्याचा प्रकाश असल्यामुळें त्या प्रकाशांत पडलेलें प्रतिबिंब प्रकाशांतच मिळून गेलें तें वेगळें दिसेना, पण सावलींत जो आरसा ठेविला होता तेथें सावली असल्यामुळें त्यांतील प्रतिबिंब स्पष्ट दिसतें. त्याचप्रमाणें वृत्तींत आत्मप्रकाश आहे त्या प्रकाशामुळें तींत सामान्यत्वानें प्रकाशणारा जीव स्पष्ट दिसत नाहीं. तोच विशेषत्वानें असणारे विकल्परूप बुद्धींत स्पष्ट दिसतो.

वर दर्शविल्याप्रमाणें वृत्तीमुळें जीवत्व आहे खरें, पण तें जीवत्व नुसत्या वृत्तींत सामान्य आत्मप्रकाशामुळें लोपतें,

जरी जीवत्व वृत्तीस्तव असे । परी सामान्यामाजीं लोपतसे । नुसधा चित्प्रकाश येतसे । प्रत्यया विकल्पाभावीं ॥ ८५ ॥
ब्रह्मात्मत्व जाणावयालागीं । वृत्तीची अपेक्षा असे अंगीं । हें पुढें बोलिजेल प्रसंगीं । परी जीवाची अपेक्षा नको ॥८६
म्हणोनि संधि साधावयाचा । अभ्यास बोलिला हा साचा । कीं विकल्पाभावीं जीवत्वाचा । अभाव होतसे ॥ ८७ ॥
मध्य संधीसी सामान्य प्रकाश । प्रत्यया येतसे अविनाश । प्रसंगें ज्ञातता अज्ञातता विशेष । नसतां त्य ही स्पष्ट केल्या
जागरीं किंवा स्वप्नस्थानीं । नेत्र झांकितां किंवा उघडोनी । अभ्यासी जो साधक अनुदिनीं । बोलल्या रीतीं संधि ८९
प्रत्यक्ष विषयाहून विषयांतर । जातां मध्य संधींत निरंतर । अथवा विकल्पामागें पुढें प्रकार । ज्ञातता अज्ञाततेचा ३१९०
ऐशियामाजीं आत्मप्रकाश । कळू येतसे अविनाश । आणि अंतरींचे विकल्प जे अशेष । त्यांहीमध्यें सामान्य ॥ ९१ ॥
तेथेंही ज्ञातता अज्ञातता । निरोपिल्या त्या साधाव्या तत्त्वता । अभ्यासबळें सामान्या टळटाळितां । घेईजे स्वानुभवें ९२
ऐशिया अभ्यासे म्हणसी । कोणती प्राप्ति साधकासी । तरी क्षीणता होतां विकल्पासी । आत्मप्रकाशीं समरसे ॥ ९३ ॥
जैसा जैसा विकल्प क्षीण । तैसा तैसा सामान्य प्रकाशमान । जों जों सामान्य दुणावे आपण । तों तों विकल्प मोडे९४
ऐसाचिरकाळअभ्यासहोतां । जोमार्गेंउगेपणाबोलिलातत्त्वतां । तोसमाधियोगबाणें अवचिता । विकल्प जातां निपटूनी
विकल्पाचें उठणें राहावें । नुसधें वृत्तीचें स्फुरण उरावें । हेंचि समाधीचें लक्षण जाणावें । राजयोगियासी ॥ ९६ ॥
परी विकल्प सर्व मोडून जावा । उगेपणा चिरकाळ व्हावा । तरीच पाविजे ब्रह्मानुभावा । अखंडैकरसीं ॥ ९७ ॥
ऐसें ऐकोनियां रविदत्त । नमस्कारोनि आदरें विनवीत । जी जी विकल्प तो अनिवार्य अत्यंत । क्षीण होय कैसा ॥ ९८
बळें धरितां अधिकचि उठे । रोधितां भलते प्रकारें उमटे । पाणी जैसें न बांधवे मोटे । तैसें वाटे दुष्कर ॥ ९९ ॥
कोणीकडून कव घालवी । कवणें स्थळीं स्थिर करावी । वायूची झुळुक केवीं आवरावी । तेवींच हा विकल्प ॥ ३२०० ॥
तरी हा विकल्प कैसा निरसे । कैसा उगेपणा होतसे । कीं जेणें पाविजे अखंडैकरसें । स्वानुभवासी ॥ १ ॥
सुषुप्तींत आपैसा होय । विकल्प अवघाचि मावळून जाय । परी तो स्वानुभवाचे उपेगा नये । तस्मात् स्थिरत्व व्हावें जागरीं

---

व तेथें विकल्पाचा अभाव असल्यामुळें जीवत्वाचा अनुभव न येतां चित्प्रकाशाचाच अनुभव येतो. आतां तो चित्प्रकाश म्हणजे ब्रह्मात्मत्व जाणण्यास वृत्तीची अपेक्षा आहे, जीवाची नाहीं वृत्तीची अपेक्षा आहे म्हणून संधी साधण्याचा अभ्यास सांगितला व ज्ञातता अज्ञातता यांचाही अभ्यास सांगितला. कारण या तीन ठिकाणीं विकल्पाचा अभाव आहे. म्हणून जीवत्वाचाही अभाव होतो. जेथें जीवत्वाचा अभाव आहे तेथें आत्मत्व स्पष्ट आहे. तें आत्मत्व स्पष्ट कळण्याकरितांच जागृतींतील किंवा स्वप्नांतील संधी ज्ञातता व अज्ञातता यांचा अभ्यास सांगितला. तो अभ्यास करून रविदत्ता तूं सामान्य चित्प्रकाश टळटळीत पहा. तूं म्हणशील कीं, तुम्ही सांगता तो अभ्यास करून साधकास कोणती प्राप्ति होईल. साधक जर आम्हीं सांगतों तो अभ्यास करील, तर त्यास विकल्पाची क्षीणता होऊन आत्मप्रकाशाचा अनुभव येईल. विकल्प जसा जसा क्षीण होत जाईल तसा तसा आत्मप्रकाश जास्त दिसेल. जों जों आत्मप्रकाश अनुभवास विशेष येईल, तों तों विकल्प क्षीण होत जाईल. याप्रमाणें अभ्यासानें विकल्प निःशेष गेला म्हणजे मग मागें उगेपणारूप समाधि सांगितली ती अकस्मात् बाणेल. जे राजयोगी आहेत त्यांच्या समाधीचें लक्षण हें आहे कीं, विकल्पाचें उठणें राहून नुसतें वृत्तीचें स्फुरण उरावें. याप्रमाणें विकल्प सर्व मोडून जाऊन जर उगेपणा चिरकाळ होईल तरच ब्रह्मानुभवास पावेल.

रविदत्त वरील निरूपण ऐकून गुरुजीस नमस्कार करून विचारतो कीं, महाराज विकल्प अत्यंत अनिवार्य आहे. तो क्षीण कसा होईल. त्यास बळें धरूं लागलें असतां तो अधिकच वाढतो. बरें त्याचा रोध करूं लागलें तर तो भलत्याच प्रकारानें उमटतो. पाण्याची जशी मोट बांधवत नाहीं तसाच हा विकल्प दुष्कर आहे. त्यास कोणीकडल्या अंगानें कंव घालावी, व कोठें त्यास स्थीर करावा. वाऱ्याची झुळूक जशी आवरितां येत नाहीं त्याचप्रमाणें हा विकल्प अनावर आहे, तरी हा विकल्प कसा निरसेल, व उगेपणा कसा होईल ? सुषुप्तींत हा विकल्प आपाप मावळून जातो पण तो स्वानुभवाचे उपयोगास येत नाहीं. म्हणून झोपेंतील विकल्प मोडून उपयोग नाहीं. तर तो जागृतींत मोडून स्थीरता साधेल;

ऐशी कृपा करावी स्वामी । निःशेष द्वैतचि नुरे ऊर्मी । जेणें अखंडैक निजधामीं । समरस होय ॥ ३ ॥
ऐसें प्रार्थून चरण धरी । वारंवार प्रदक्षणा करी । ऐसें पाहूनियां ते अवसरीं । स्वामी बोलती सकृप ॥ ४ ॥
म्हणती सखया अवधारावें । अभ्यासा कांहीं दुष्कर नव्हे । परी हळुहळु संपादावें । आणि निरसावें बाधक ॥ ५ ॥
तेचि कैशी ये श्लोकीं । अभ्यासाची स्थिति निकी । साधिली पाहिजे साधकीं । तेचि अवधारीं ॥ ६ ॥

**एकद्वित्रिक्षणेष्वेवं विकल्पस्य निरोधनं ॥**
**क्रमेणाभ्यस्य तांयत्नाद्ब्रह्मानुभवकांक्षिभिः ॥ १२ ॥**

जया साधका ब्रह्मानुभवाची । अपेक्षा खरी असे साची । तेणें क्षणक्षणां विकल्पनिरोधाची । यत्नें स्थिति साधावी ७
आजि एक क्षण निरोध । जाहला विकल्परहित शुद्ध । तरी उद्यां परवां द्विविध । वाढवावें सामान्य ॥ ८ ॥
दोन क्षण जाहलिया निरोधन । पुढें अभ्यासें साधावे क्षण तीन । ऐसें प्रतिदिनीं क्रमेंकडून । चिरकाळ स्थिर करावें
आतां हेंचि प्रांजळ करूं । कैसा कैसा अभ्यास प्रकारु । ध्वनितार्थें कीं यथार्थें निर्धारु । बाणे अभ्यासाचा ॥ ३२१० ॥
तस्मात् साधकीं सावधान । निरूपण ऐकोनी एकाग्र मन । त्या रीतीच येकांतीं बैसून । अभ्यासावें आदरें ॥ ११ ॥

**एवं ब्रह्मानुभवकांक्षिभिः ॥**

एवं ह्मणिजे या प्रकारें । जैसें मागें बोलिलें विस्तारें । तैसें साधकें अभ्यास द्वारें । हळुहळु साधावें ॥ १२ ॥
ब्रह्मानुभवाची आकांक्षा । कीं जाणावें सामान्य अपरोक्षा । तेणें याचि अभ्यासें प्रत्यक्षा । पाविजे स्वानुभवा ॥ १३ ॥
मागें आनां पूर्व श्लोकाआंत । संधि प्रकार टळटळित । सांगितला जैसा यथायुक्त । नेत्र झांकितां कीं उघडोनी ॥ १४
ज्ञातता आणि अज्ञातता । द्विविधापरी प्रकार तत्त्वतां । साधावे बाह्य आणि आंतौता । बैसोनि ऐकांतीं ॥ १५ ॥
संधीमाजीं सामान्य पहावें । कीं अज्ञाततेंत चिद्रूप वोळखावें । नातरी ज्ञाततेमाजीं स्थिर असावें । विषयानंदें ॥ १६ ॥
ऐसे कोणतेही प्रकारीं । स्थिरत्व करावें अंतरीं । विकल्प न होतां निर्विकारी । वृत्ति बुडावी ॥ १७ ॥
संकल्पाचें जें अधिष्ठान । संकल्प उमटताहे जेथून । लक्षांशें लक्षावें तें स्थान । सूक्ष्म अंतरदृष्टीनें ॥ १८ ॥
आरंभीं निर्विकल्प स्फूर्ति उठे । पुढें मनबुद्ध्यादि विकल्प उमटे । परी वृत्तीचे मुळीं निराखितां तुटे । विकल्परूप धर्म
यद्यपि जरी विकल्प उठिला । तरी सोडूं नये वृत्तीच्या मुळाला । एकतानचि पाहिजे लक्षिला । आपुला जाणतेपणा
ऐसें संकल्प बुडीं जाणतेपण । तें लक्षिलें जरी एकतान । मग विकल्प जरी उठे आपण । तरी आपैसा निमे ॥२१॥
ऐसाचि वारंवार जरी उठे । परी तत्क्षणीं वितळूनियां फाटे । ज्ञानघनाचि परिपूर्ण दाटे । गगनापरी ॥ २२ ॥

---

अशी स्वामी तुम्ही कृपा करून युक्ति योजा. स्वामी म्हणतातः हे रविदत्ता, ऐक. आम्ही जो अभ्यास सांगितला तो कांहीं दुष्कर नाहीं. तो जें बाधक आहे त्याचा त्याग करून हळूहळू संपाद, म्हणजे तेणेंकरून विकल्पाचा मोड होऊन स्थीरता साधेल. तीच स्थीरता होण्याकरितां साधकानें कसा अभ्यास करावा तेंच पुढील श्लोकांत सांगतों.

ज्या साधकास ब्रह्मानुभवाची खरी अपेक्षा आहे, त्यानें क्षणक्षण विकल्पविरोधाची स्थिरता साधावी, ती अशी. आज एक क्षण विकल्परहित झाला तर उद्यां, परवां दुप्पट वाढवावा. दोन क्षण साधले म्हणजे तीन क्षण साधावें. याप्रमाणें दररोज करावें. आतां अभ्यास प्रकार सांगतों त्याप्रमाणें साधकानें तो करावा. मागल्या श्लोकांत नेत्र उघडे असतां किंवा झांकिले असतां संधी कसा टळटळीत अनुभवास येतो तें सांगितलें. तसेंच ज्ञातता आणि अज्ञातता यांचाही प्रकार सांगितला. या तिहींत सामान्य आत्मप्रकाश पहावा. तो प्रकाश कळण्याकरितां तिहींपैकीं कोणत्या तरी एके प्रकारांत स्थीरत्व करावें; म्हणजे तेणेंकरून विकल्प न उठतां वृत्ति निर्विकल्पांत बुडेल. संकल्प जेथून उत्पन्न होतात, तें त्यांचें अधिष्ठान लक्षांशानें लक्षावें.

प्रथमतः निर्विकल्प स्फूर्ति उठते मग मन, बुद्धि इत्यादि विकल्प उत्पन्न होतात. परंतु वृत्तीचें मूळ पहात असतां तिचा विकल्परूप धर्म उत्पन्न होत नाहीं. यद्यपि विकल्प जरी उठला तरी वृत्तीचें मूळ सोडूं नये तर आपल्या जाणतेपणास, एकतान लक्षीत असावें. याप्रमाणें संकल्पाचे बुडीचें जाणतेपण आपण एकतान लक्षीत असलों तर, विकल्प जरी उठला तरी तो आपणच स्वतः नाहींसा होतो. याप्रमाणें वारंवार जरी उठला तरी तो तत्क्षणींच वितळून नाहींसा होतो. मग आकाशाप्रमाणें परिपूर्ण ज्ञानघनच दाटतो.

स्वरूपनिर्धार गगनाऐसा । वोतप्रोतपणें सहसा । मध्येंचि किंचित् विकल्पठसा । उमटून मावळे ॥ २३ ॥
तेंचि ज्ञान वृत्ती उठतां । आलें वाटे स्फूर्ति आंतौता । परी तें असे तयेच्या परतां । वृत्ति येवढें नव्हे ॥ २४ ॥
जैसें गगन वायूंत न ये । तैसें चिद्रूप वृत्तींत न समाये । परी वाटलें जें वृत्तिमय । येर न कळे ह्मणोनी ॥ २५ ॥
जैसा विकल्प होतां स्फूर्ति झांकोळे । तेवीं स्फूर्ति उठतां ज्ञान तें न कळे । गगनापरी जें असें सगळें । कळे तें वृत्तीयेवढें
विकल्प त्यागूनि स्फूर्ति ओळखावी । स्फूर्तित्यागें चित्प्रभा कळावी । जैशी वायु टाकोनी गगनी घालावी । निजदृष्टि सहज
विषय पाहतां वाटे देखत । तो हा चक्षूच पदार्थजात । डोळिया अवलोकितां वाटे पाहत । विकल्प अंतरींचा ॥२८॥
विकल्प कळे जयाचे दृष्टी । ते हे स्फूर्तीच आपुले पुष्टी । जेधवां स्फूर्तीस जाणे उठाउठी । तो चिद्रूप आत्मा ॥२९॥
तस्मात् गगनवत् चिद्रूप आपण। मध्यें एकदेशी वायु ऐसें स्फुरण। तें चिद्रूपचि जाणे स्फुरणालागून। परी ऐसें साधका न कळे
कारण कीं विशेषावरी प्रवृत्ति । अनादि पडलीसे भ्रांति । हे अभ्यास कळतां कळतां कळती । तोंवरी दृष्टि वरिवरी ३१
आरंभीं नेत्राचें देखणें त्यागावें । तें संकल्पावरी आणावें। तेंचि पुढें संकल्प पहावे । स्फूर्तीच्या योगें ॥ ३२ ॥
नंतर तया अति सूक्ष्मा स्फुरणा । चिद्रूप आत्माचि देखणा । तो लय उद्भव साक्षी अनुमाना । स्फुरणाच्या यावा ३३
तथापि तो प्रस्तुत न कळे । तरी तो निवळत निवळत निवळे । परी अभ्यासावें चिद्रूप सगळे । स्फूर्तीच्या दृष्टीनें ॥३४
स्फुर्ति उठतांचि चिद्गगन । व्यापोनि पसरावी जेवढें सघन । पसरतांचि जातसे वितळून । मागुनीं दुजी उठे ॥ ३५ ॥
तेही चिद्रूपाकार व्हावी । चिद्गगन व्यापून विरावी । ऐशी जे जे वृत्ति उठावी । ते ते फेंकावी चिद्गगनीं ॥ ३६ ॥
जैशी वायूची झुळूक गगनीं । उठोनि गगन व्यापी जाऊनी । पसरतांचि जाय मावळूनी आपुले आपण ॥ ३७ ॥

---

ज्ञानघनाचा गगनाप्रमाणें वोतप्रोतपणा आहे. त्यामध्यें किंचित् विकल्प उत्पन्न होतो आणि मावळतो. वृत्ति उत्पन्न झाल्याबरोबर स्वरूपज्ञान, तें स्फूर्तींत आलें असें वाटतें; परंतु तें स्फूर्तीहून परतें आहे. म्हणून तें वृत्तींत आलें तितकेंच ज्ञान आहे, असा निर्धार करूं नये. कारण तें वृत्ति इतकें नाहीं, अमूप आहे. आकाश जसें वाऱ्यांत येत नाहीं तसें चिद्रूप वृत्तींत मावत नाहीं. आतां आपणास वृत्तीइतकेंच आहे असें जें वाटतें, त्याचें कारण वृत्ती व्यापून जें उरलेलें आहे तें अनुभवास येत नाहीं. विकल्प उत्पन्न झाल्याबरोबर जशी स्फूर्ति झांकते तशी स्फूर्ति उत्पन्न झाल्याबरोबर स्वरूपज्ञान गगनाप्रमाणें परिपूर्ण असतां तें तितकें कळत नाहीं. तर जितकी स्फूर्ति त्यास व्यापून आहे तितकेंच म्हणजे स्फूर्ति इतकेंच ज्ञान आहे असें वाटतें.

विकल्प टाकून जशी स्फूर्ति ओळखावी. तशी स्फूर्ति टाकून चित्प्रभा जाणावी. वायूचा त्याग केला म्हणजे जसें कळेल, तसेंच स्फूर्तीचा त्याग केला म्हणजे चित्प्रभा कळेल. विषय पाहूं लागलें असतां सर्व पदार्थ डोळाच पहातो असें वाटतें. डोळ्यास पाहूं लागले असतां असें वाटतें कीं, त्यास अंतरांतील विकल्प पहात आहे. विकल्पास पाहूं लागलें असतां त्यास स्फूर्ति पहात आहे असें वाटतें. आतां त्या स्फूर्तीस पाहूं लागलें असतां चिद्रूप आत्मा पहात आहे असें अनुभवास येईल; व वास्तविक ज्ञानघन तोच आत्मा आहे; व तोच गगनवत परिपूर्ण असून गगनांत जसें वायूचें संचरणें एकदेशी; तसें स्वरूपीं स्फुरण एकदेशी आहे. त्या स्फुरणास चिद्रूपच जाणतें; पण साधकास चिद्रूप स्फुरणास जाणतें असें कळत नाहीं. कारण त्याची आजपर्यंत विशेषाकडेच प्रवृत्ति होती. ही भ्रांति अनादिकाळची आहे. ही अभ्यासानें कमी होऊन चिद्रूप कळूं लागेल. जोंपर्यंत चिद्रूप स्पष्ट कळूं लागलें नाहीं तोंपर्यंत दृष्टि वरवरच आहे असें समजावें.

डोळे पदार्थास पहात होते त्या डोळ्यांचें पहाणें टाकून डोळ्यांस पाहूं लागावें म्हणजे त्यांस संकल्प पहात आहे असें दिसेल, पुढें डोळ्यांस पहावयाचें टाकून त्यास पहाणारा जो संकल्प त्यास पाहूं लागावें म्हणजे त्यास स्फूर्ति पहात आहे असे दिसेल. पुढें संकल्पास पहावयाचें टाकून त्यास पहाणारी जी स्फूर्ति तीस पहाणारा चिद्रूप आत्मा तिच्या उद्भव काळीं व लय काळीं आहे असा अनुभव व्हावा. तो अनुभव एकदम होणार नाहीं, हळूहळू अभ्यासानें निवळतां निवळतां अभ्यास पूर्ण झाला म्हणजे हें चिद्रूप निवळून त्याचा अनुभव होईल. पण स्फूर्तीच्या दृष्टीनें सगळें चिद्रूप अभ्यासिलें पाहिजे. जेवढें चिद्गगन आहे तेवढी स्फूर्ति व्यापून पसरावी. ती पसरतां पसरतां वितळून जाते व दुसरी उठते तीही पुन्हां चिद्रूप व्यापून पसरावी; म्हणजे ती वितळेल. ती वितळल्यावर पुढें जी उत्पन्न होईल तीही वर सांगितल्याप्रमाणें चिद्गगनीं फेंकावी. वाऱ्याची झुळूक जशी आकाशांत उत्पन्न होऊन गगन व्यापते व गगनभर पसरून मावळून आपोआप नाहींशी होते.

अथवा पाणियावरी लहर । उपाधीस्तव उठे चक्राकार । सर्व पाणी तें व्यापून सत्वर । वितळून जाय ॥ ३८ ॥
याचि दृष्टांताचिये पडिपाडें । स्फूर्ति उठोनि चिद्रूप जेवढें । तदाकार होऊन मोडे । वितुळतां स्वभावें ॥ ३९ ॥
येथें चिद्रूप गगनापरी । बोलतां कोणी शंकाकरी । कीं गगन जैसें पोकळ नेत्रीं । भासे तैसेंचि चिद्रूप ॥ ३२४० ॥
येविशीं पुढें असे बोलणें । गगन चिद्रूप भेदें दाखवणें । आणि ज्ञान तेंचि सदानंदघनें । अनुभवाविण अनुभाव्य ४१ ॥
हें अनुक्रमें निर्विकल्प व्याजें । निरोपितां साधका समजे । प्रस्तुत येथें बोळखिजे । अभ्यासावया चिद्गगन ॥ ४२ ॥
वृत्ति उठतांचि येथून उठे । आणि जेथवरी जाऊन फाटे । येथवरी चिद्रूप घनदाटें । एकतान पहावें ॥ ४३ ॥
परी वृत्ति उठतां विकल्पाकार । होऊंच न द्यावी अणुमात्र । बुद्धिमनाचा उद्गार । होऊं न द्यावा ॥ ४४ ॥
तथापि पूर्वाभ्यासें उठे । तरी चिद्गगन पहावें नेटें । बुद्धि निश्चया येतां गोमटें । कीं हें चिद्गगन ॥ ४५ ॥
ऐसा निश्चय जरी करितां । विकल्प मोडे विषयाकारता । निश्चय होऊन उरे ज्ञातता । सामान्यता वृत्ति पसरे ॥ ४६ ॥
तेही पसरितां जाय वितळूनी । पुढें दुजी वृत्ति उठे मागूनी । तेही विकल्पाकार न होतां गगनीं । अभ्यासें योजावी ४७
ऐसा अभ्यास चिरकाळ होतां । विकल्पाचिये होय घाता । नुसधीच उरे सामान्यता । निर्विकल्प स्फूर्ति ॥ ४८ ॥
ऐसें जाहलिया अंतःकरणासी । सुख जें होय एकरसीं । तें बोलतां न येचि वाचेसी । वृत्तीचें वृत्ती जाणे ॥ ४९ ॥
तस्मात् ब्रह्मात्मानुभवाची । आकांक्षा जया साधकाची । तेणें ऐशिया आभ्यासाची । दृढता करावी ॥ ३२५० ॥
जया अभ्यासें विकल्प मोडे । आणि स्वस्वरूपीं वृत्ति पवाडे । तरी हें अगत्य साधकें कोडें । अभ्यासावें ये रीतीं ॥ ५१
विकल्प मोडून जाय म्हणतां । कीं त्वरितचि मोडेल भावील चिंता । तरी ऐसें नव्हे हळुहळु तत्वतां । क्षीणत्वा पावे ॥
विकल्प हळुहळु क्षीण होय । सामान्यही तैसेंचि वाढत जाय । त्वरित नव्हे म्हणून सोडूं नये । अभ्यासासी ॥ ५३ ॥

**एक द्वित्रिक्षणेषु विकल्पस्यनिरोधनं क्रमेणयत्नात्अभ्यास्यतां ॥**

एक दोन तीन क्षणीं । अभ्यास वाढवावा अनुदिनीं । विकल्पक्षीण कीजे निरोधूनी । यत्नसाध्यें क्रमें होय ॥ ५४ ॥
आतां बोलिल्या प्रकारें । सामान्य वृत्ति चिद्गगनाकारें । क्षण एक एकाग्र स्थिरे । तितुका मोडे विकल्प ॥ ५५ ॥
ऐसा आजि अभ्यास जाहला जितुका । उद्यीक सहज होय तितुका । त्याहीवरी क्षण एक निका । हळुहळु वाढवावा

अथवा पाण्यावर उपाधीमुळें चक्राकार लाट उत्पन्न होते व पुढें ती सर्व पाण्यापासून वितळून जाते; त्याचप्रमाणें स्फूर्ति उठून चिद्गगन व्यापून तदाकार होऊन सहजच वितळून जाते.

शंका—चिद्रूपास गगनाची उपमा दिली पण गगन जसें नेत्रास पोकळ आहे असें दिसतें तसेंच चिद्रूप असेल असें वाटेल, तर तें तसें नाहीं. चिद्रूपाचा आणि गगनाचा भेद पुढें निर्विकल्पाचे निमित्तानें दाखविला आहे. येथें प्रस्तुत अभ्यासाकरितांच चिद्रूपास गगनाची उपमा देऊन चिद्रूपाची ओळख केली आहे. वृत्ति जेथून उत्पन्न होते व जेथपर्यंत जाऊन नाहींशी होते. तेथपर्यंत चिद्रूप एकतान पहावें व तें पहात असतां वृत्ति विकल्पाकार होऊं देऊं नये. तसेंच बुद्धि, मन, हींही उत्पन्न होऊं देऊं नये. पूर्वाभ्यासानें जर बुद्धि, मन, उत्पन्न होतील तर मोठ्या, नेटानें चिद्गगन पहावें. तें पाहून हेंच चिद्गगन असा जर बुद्धि निश्चय करील तर विषयाकारता मोडून विकल्प नाहींसा होऊन ज्ञातता उरेल, मग सहजच सामान्यता वृत्ति पसरेल. याप्रमाणें वृत्ति पसरून वितळून गेली म्हणजे दुसरी वृत्ति उठेल; ती विषयाकार किंवा विकल्पाकार होऊं न देतां, चिद्गगनीं अभ्यासानें योजावी. याप्रमाणें चिरकाळ अभ्यास झाला असतां विकल्पाचा घात होतो; व नुसती सामान्य वृत्ति उरते; ती निर्विकल्प स्फूर्ति उरली असतां अंतःकरणास सुख होतें, तें सांगतांच येत नाहीं. तें वृत्तीचें वृत्तीसच ठाऊक. अशा सुखाचा व ब्रह्मात्म्याचा ज्याला खरा अनुभव घेणें आहे त्यानें जेणेंकरून विकल्प मोडेल असा वर सांगितलेला अभ्यास करावा.

विकल्प मोडून जातो असें जरी सांगितलें, तरी तो त्वरीतच मोडत असेल असें वाटेल, तर तसें नाहीं. तो हळू हळू क्षीण होतां होतां मोडतो. विकल्प जसा जसा क्षीण होत जातो तसें तसें सामान्य वाढत जातें. विकल्प त्वरित मोडत नाहीं म्हणून अभ्यास करण्याचा टाकूं नये. दिवसांतून एक, दोन, तीन क्षण अभ्यास वाढवावा, व निरोधून विकल्प क्षीण करावा. तो क्रमानें यत्न साध्य होईल. सामान्य वृत्ति चिद्गगनाकारानें क्षणभर एकाग्र होऊन स्थिरावली म्हणजे तितकाच विकल्प मोडतो. याप्रमाणें आज इतका अभ्यास झाला तितका उद्यां सहज होतो; पुढें दुसरा क्षण वाढवावा.

आजि दोन क्षण सामान्य जाहले । तितुकेचि विकल्प जाती मोडले । तरी तिसरे दिनीं पाहिजे साधिलें । तीन क्षणपर्यंत
ऐसें प्रतिदिनीं क्षण क्षण । सामान्य वाढवावें स्थिरपण । विकल्प करावा निरोधन । सहजीं सहज ॥ ५८ ॥
अथवा एके दिनींच बैसतां । क्षणक्षणां वाढवावी सामान्यता । तैशीच विकल्पा यावी क्षीणता । हळुहळू अभ्यासें ५९
प्रथम वृत्ति चिद्गगनाकार । जाहली असे निमिष्यमात्र । तितुकाचि मोडे विकल्पविकार । पुढें उठे मागुतीं ३२६०
तेचि पुन्हां मोडून विकल्प । वृत्ति होय चिद्गगनरूप । मागुतीं उठतांचि साक्षेप । गगनाकार करावी ॥ ६१ ॥
परी स्थिरता पहिली जाहली । तीहून दुजी पाहिजे वाढविली । एक क्षण वृत्ति स्थिरावली । दुजी दोन क्षण ॥६२॥
दोन क्षण सामान्य स्थिरावतां । मध्यें विकल्प उठोनि जातां । पुढें तीन क्षण तदाकारता । वाढवावी सहज ॥६३॥
आणीक विकल्प उठोनि जाय । मग चार क्षण करावी चिन्मय । ऐसा क्रमेंकरोनि हळुहळू उपाय । साधावा अभ्यास
ऐशी क्षण क्षण वृद्धि करावी । सामान्य तदाकारता साधावी । विकल्पता क्षीण पावे आघवी । आणि बळात्कार नव्हे
सहज मनासी गोडी लागे । तदाकार वृत्ति होय अंगें । विकल्प सांडोनि राहे उगें । उठे जरी विकल्प ॥ ६६ ॥
कल्पनेचें एकनिकें । देखिल्या या सुखासी सोके । विकार सांडोनि आवश्यकें । तदाकारता स्वीकारी ॥ ६७ ॥
ऐशी तदाकारता वाढली । विकल्पाची वाढी मोडली । ऐशी घटिका दोन घटिका साधिली । जरी हे स्थिरता ॥ ६८ ॥
तरी अभ्यासाचें फलत्व जाहलें । ब्रह्मानुभवासी पावले । परी हें सर्वदा अभ्यासिलें । पाहिजे यत्नें ॥ ६९ ॥
एक वेळें मुहूर्त एक बैसावें । पुन्हां व्यापारींच सदां असावें । ऐसियासी योगसिद्धि नव्हे । बैसतांही एकांतीं ३२७०
जरी सर्व काळ राहे स्मरण । व्यापारता स्नान पान भोजन । सदा समाधीचें अनुसंधान । साधका असावें ॥ ७१ ॥
विषय पाहतां संधि पहावी । ज्ञातता अज्ञातता वोळखावी । मननीं तैशीच आठवावी । स्थिति समाधीची ॥ ७२ ॥
चिद्गगनीं चिद्गगन व्हावें । अंतर्बाह्य चिद्रूप पहावें । अहोरात्र ऐसेंचि ध्यावें । व्यापरामाजींही ॥ ७३ ॥
ऐशिया व्यापारींच्या ध्यासें । निवांत स्थळीं योग साधे अपैसे । ना तरी विस्मरण जरी व्यापारीं होतसे । तरी दांत खातां
एकांतीं सुख जें अनुभविलें । त्या ध्यासें व्यापारीं स्मरलें । तैसेंच व्यापारीं ध्यासरूप ठसावलें । नें उमटलें समाधिकाळीं न साधे
एवं व्यापारींचे अनुसंधानें । समाधीचें सुख नें बाणे । समाधिसुखाचेनि गुणे व्यापारीं सुख ॥ ७६ ॥
तस्मात् साधकें सर्व काळ । अनुसंधान राखावें निर्मळ । नातरी समाधिकाळीं बरळ । विघ्नें होत असती ॥ ७७ ॥

---

आज दोन क्षण सामान्य झाले तर तितकाच विकल्प मोडून ते क्षण तिसरे दिवशीं सहज होतील. पुढें तीन क्षण साधावे असें प्रतिदिनीं क्षणक्षण सामान्य स्थिरपण वाढवावें, तेणेंकरून सहज विकल्पाचा विरोध होईल. आतां ज्यास साधेल त्यानें एकाच दिवसांत बसलें असतां क्षणक्षण सामान्यता वाढवावी. प्रथम वृत्ति, क्षणभर चिद्गगनाकार झाली असेल तितकाच विकल्पविकार मोडून पुन्हा उठतो. पुन्हा विकल्प उठल्यावर पुन्हा वृत्ति चिद्गगनाकार करावी. याप्रमाणें क्षणक्षण स्थीरता साधावी. प्रथम एक क्षण, पुढें दोन क्षण, मग तीन क्षण, नंतर चार क्षण, असा क्रमानें उपाय करून अभ्यास साधावा. याप्रमाणें करीत गेल्यानें बलात्कार न होतां सर्व विकल्पता क्षीण पावते, व मनास या क्रमानें अभ्यास करण्याची गोडी लागते, व विकल्प जरी उठला तरी तो मोडून मन सुखाकार होतें. कल्पनेचें एक बरें आहे कीं, ती जें सुख पाहील तेथेंच संवकते. यामुळें तीं ब्रह्मानंदाशीं तदाकार होऊन विकल्पास टाकते. याप्रमाणें तदाकारता वाढून विकल्पाची वाढ मोडेल, व स्थीरता घटका दोन घटका साधेल तर अभ्यासाची सफलता होऊन ब्रह्मानुभवास पावेल. पण इतकी स्थीरता होण्यास यत्नानें नेहमीं अभ्यास केला पाहिजे. एक वेळ क्षणभर बसून सर्वकाळ व्यापारांत राहील तर असा अभ्यास करणाऱ्यास एकांतींही बसून योगसिद्धि प्राप्त व्हावयाची नाहीं. तर स्नान, पान, भोजन इत्यादि व्यापार करीत असतां सदां साधकास समाधीचें स्मरण असून अनुसंधान असलें पाहिजे, तें असें कीं, विषय पहाण्याबरोबर संधी पहावी; ज्ञातता, अज्ञातता वोळखावी. याचप्रमाणें मननाचे वेळीं समाधीची स्थिति आठवावी. चिद्गगनीं चिद्गगन व्हावें अंतरबाह्य चिद्रूप पहावें. असें अहोरात्र व्यापारामध्यें ध्यात असावें. मग अशा व्यापाराचे ध्यासानें निवांतस्थळीं योग आपाप साधतो. तसें न होतां जर व्यापारांत समाधीचें विस्मरण असेल तर दांत खाल्ले असतांही योग साधत नाहीं.



एकांतांत जें सुख अनुभविलें असेल, त्याच्या ध्यासानें व्यापारांत स्मरण झालें पाहिजे. व व्यापारांत जो सुखाचा ध्यास असेल तेंच समाधी काळीं उमटेल ह्मणून व्यापाराचे अनुसंधानानें समाधीचें सुख बाणतें. व समाधीचें सुखामुळें व्यापारांत सुख होतें. म्हणून साधकानें नेहमीं अनुसंधान राखावें. नाहीं तर समाधी काळीं विघ्नें होतात.

जरी व्यापारीं निर्विषय मन । तरी समाधिसुख पावे निर्विघ्न । तस्मात् साधकें कामादि त्यागून । अनसंधानीं असावें ७८
कृषि वाणिज्य राज्यकारण । आणि विषयीजन संभाषण । अथवा अन्य शास्त्राचें वेवादन । इतुकेंही त्यागावे ॥ ७९ ॥
कामादिक जरी गेले । तरी मनोराज्यही पाहिजे त्यागिलें । वाउग्या विषयवल्गनेतें अव्हेरिलें । पाहिजे साधकें ।३२८०
कामादिक मनोराज्य असतां । अथवा कृष्यादि व्यापार करितां । तो ध्यास जो बैसे चित्ता । तेणें समाधिस विघ्नें होती
काव्य तर्क न्यायादिक । हेही पढतां आवश्यक । निश्चय संपादिला जो एक । त्याची उपेक्षा होय ॥ ८२ ॥
तस्मात् हे विघ्नकर समाधीसी । त्यागिलेचि त्यागावे आवश्येसी । जितुके निर्वाहक देहासी । ते भोजनादि संपादावें॥
भोजनादि जरी न केलें । तरी मृत्यु किंवा देह गलित जाहले । तरी साधन अभ्यास बुडालें । म्हणोनि भोजनादि कीजे
तैसें काव्यकृष्यादि त्यागितां । मृत्यु नव्हे ना विगलितता । तस्मात् त्यागाव्याचि ह्या समस्ता । कृति विघ्नकर ॥ ८५ ॥
म्हणसी जनकादिकीं कैसें । सर्व राज्यादि संपादून जैसें । समाधानही स्वतःसिद्ध असें । तरी तया दृढ बोध ॥ ८६ ॥
ऐसा दृढ बोध तुज अपरोक्ष । बाणेल संशयरहित प्रत्यक्ष । देहादिकांचें कर्म बरें कीं रुक्ष । भिन्नत्वें जेव्हां पाहसी ८७
तेव्हां तूंही जनकापरी । जें जें पाहिजे तें तें करी । कृष्याद अथवा काव्य तर्कें सारीं । पुढें यथासुखें ॥ ८८ ॥
तुज अद्यापि ब्रह्मानुभवासी । कीं ठाव नाहीं असंगज्ञानासी । वाउगी समानता करूं जासी । तरी पावसी अनर्थ ॥८९
तस्मात् भोजनादि संपादावें । कृष्यादि तर्क पठन त्यागावें । कामादि विषयचिंतन न करावें । सहसा साधकें ३२९०
विवेक वैराग्य जागृत सदा । आणि असावी शमदम संपदा । कधीं पावेन सुखैकपदा । हे असावी तळमळ ॥ ९१ ॥
असो रविदत्ता तुज सांगणें नलगे । तूं उदास सर्वीं असमी अंगें । परी अन्यासाठीं सांगावें लागे । जे जे येर मुमुक्षु
आतां ऐके सावधान । समाधीचें निरूपण । जें पूर्वी जाहलें अवलोकन । सामान्य गगनापरी । ९३ ॥
तेंचि अनुसंधान दृढ राखितां । बलात्कारें विकल्प निरोधितां । विघ्नें चार होताती तत्त्वतां । ते आधीं अवधारी ॥९४॥

---

व्यापारांत जर मन निर्विषय असेल, तरच समाधीसुख निर्विघ्न पावेल. म्हणून साधकानें कामादि टाकून सदा अनुसंधानीं असावें. कृषि, वाणिज्य, राज्यकारण, आणि विषयीं जनाशीं संभाषण, अथवा अन्य शास्त्राचा विवाद, हीं टाकावीं. कामादिक गेले तरी मनोराज्याचाही त्याग केला पाहिजे. कारण मनोराज्यांत तरी वाउग्याच विषयवल्गना होतात. त्याही विघ्नकारकच आहेत. म्हणून मनोराज्याचा त्याग करावा. कामादिक, मनोराज्य, अथवा कृष्यादि व्यापार करीत असतां त्याचाच ध्यास चित्तास लागतो. तो ध्यास लागल्यानें समाधीस विघ्नें होतात. तसेंच काव्यतर्क न्यायादिक पढलें असतां जो अवश्यक संपादिलेला निश्चय असेल त्याची उपेक्षा होते. म्हणून काव्यतर्कादिकही समाधीस विघ्नें करणारीं आहेत. यांचा अवश्यमेव त्याग करावा. आणि भोजनादिक जें देहाचें निर्वाहास लागणारें तें संपादावें. आतां निर्वाहाचे पदार्थ संपादून भोजनादिक जर न केलें तर मृत्यु येईल किंवा देह गलित होईल. देह गलित झाल्यानें किंवा मृत्यु आल्यानें साधनअभ्यास बुडेल. तो अभ्यास बुडाला मग मोक्षप्राप्ति कशी होईल ? मोक्षप्राप्ती व्हावी म्हणूनच सर्व खटपटी आहेत, करितां भोजनादिक कर.

काव्य, कृष्यादिकांचा त्याग केल्यानें मृत्यु येत नाहीं. व देह गलित होत नाहीं म्हणून ह्या विघ्नकर्त्यांचा त्याग कर? तूं म्हणशील कीं, जनकादिक राज्य संपादून कसे राहिले होते ? त्यांस राज्यादिकाचें कां विघ्न झालें नाहीं - वास्तविक त्यांसही विघ्न व्हावें पण ते स्वतः दृढबोधानें वर्तत होते व त्यांचें सदोदीत समाधान होतें. म्हणून त्यांस राज्यादिकांचें विघ्न झालें नाहीं. तुला जर त्यांच्याचसारखा दृढ अपरोक्ष बोध निःसंशय प्रत्यक्ष बाणेल व देहादिकांचें बरें किंवा वाईट कर्म अभिन्नत्वानें पहाशील, तेव्हां तूं जनकादिकाप्रमाणें काव्यतर्कादिक पाहिजे तें कर. पण तुला अद्याप ब्रह्मानुभव झाला नाहीं. तसेंच असंगज्ञानही प्राप्त झालें नाहीं असें असून जर उगाच जनकादिकांची बरोबरी करूं पाहशील तर अनर्थांत पडशील; म्हणून तू त्याची बरोबरी न मानितां भोजनादिक संपाद व कृष्यकाव्यतर्कादिक यांचा त्याग कर. विवेक, वैराग्य जागृत ठेव. शमदमादि संपत्ति राख. मी त्या परमानंदास कधीं पावेन अशी तळमळ असूं दे. तूं जसें सांगितल्याप्रमाणें करिशील असेंच सर्व मुमुक्षूंनीं होऊन करावें. समाधीचें गगनाप्रमाणें अवलोकन होऊन त्याचेंच दृढअनुसंधान राखीत असतां म्हणजे बलात्कारानें विकल्पाचा निरोध करीत असतां चार विघ्नें होतात तीं आधीं सांगतों.

विक्षेप लय तिसरा कषाय । चौथा रसास्वादु होय । हेचि समाधिसुखासी अपाय । करिती बळें ॥ ९५ ॥
या चारींचीं रूपें कैशीं । वेगळालीं बोलिजे परियेसी । आणि निवारणही होती जैशीं । तेंही निरोपूं ॥ ९६ ॥
विक्षेप म्हणिजे विकल्प । मनोराज्याचा संकल्प । हा उठतांचि नेदी अल्प । विषयध्यासें उठे ॥ ९७ ॥
अनेक विषय आठवित । ते प्रत्यक्ष दिसती अंतरांत । तेणें वृत्ति कैशी होय निवांत । चिद्रूपामाजीं ॥ ९८ ॥
तथापि बलात्कारें चिद्गगनीं । वृत्ति लावावी अनुसंधानीं । ते लावावी जों त्या आधीं उठावणी । संकल्पाची होय९९
तेव्हां कैचा सांपडे अवसर । विक्षेपची उठती वारंवार । कैची वृत्ति होय तदाकार । क्षणभरी तरी ॥ ३३०० ॥
विक्षेपरूप विकल्प ऐसा । उठतां पूर्वाध्यास सहवासा । समाधिसुखाचा अनुभव सहसा । नये बैसतां चिरकाळ ॥ १ ॥
हा विक्षेप मोडावयासी । सर्वदा अनुसंधान असावें मानसीं । रुप्यादि व्यापार आणि काव्य तर्कासी । सांडिलें पाहिजे
पूर्वी निरोपिल्या प्रमाण । अन्य किंचित् न करावें भाषण । त्यागबुद्धि अंतरापासून । असावी सर्वांची ॥ ३ ॥
एक आत्मस्वरूपाचें अनुसंधान । तेंचि मनासीही मनन । अथवा अनुभवा आलें जें ध्येय पूर्ण । तेथें एकतान ध्यास
इतुकें सर्वदा ध्यान राहे । तरीच साधका स्वानुभव लाहे । आणि अन्याच्या त्यागें विक्षेप मोडताहे । हळुहळू अभ्यासें
तस्मात् साधकें सर्व व्यवहाराचा । सर्वदा त्याग करावा साचा । आणि सदा ध्यास निरालंबाचा । योषाजारापरी असावा
हाचि उपाय विक्षेप जावया । दुजा नाहींच गा शिष्यराया । तस्मात् वैराग्य अंतरापासूनिया । आणि आवडी स्वरूपीं
एवं खरें वैराग्य विषयादिकांचें । आणि अनुसंधान स्वस्वरूपाचें । हें जागृतींत दृढतर व्हावें साचें । तरीच समाधि घेतां साधे
तेथेंही बैसलियावरी । विक्षेप उठती विषयानुकारी । तयासि विवेक वैराग्यें सारी । जरी साधक स्वयें ॥ ९ ॥
एकदां सारितां न जाती । वारंवार विकल्प उठती । ते सारावेचि विवेकविरक्ती । कडून तेच अवसरीं ॥ ३३१० ॥
येथींचा विवेक तो ऐसा । हा जो उठे विकल्प ठसा । तो कासयावरी उमटे सहसा । हें पाहिलें पाहिजे ॥ ११ ॥
पाणियावरी जेवीं तरंग । कीं आकाशामध्यें मेघ । तैसे चिद्गगनीं विषय अमोघ । विकल्पासह भासती ॥ १२ ॥

---

### समाधींतील विघ्नांचें निरूपण.

समाधीचा अभ्यास करीत असतां चार विघ्नें होतात १ विक्षेप २ लय ३ कषाय ४ रसस्वाद या चोहोंचीं रूपें निरनिराळीं सांगतों व त्यांचें कोणते उपायानें निवारण होईल तेंही सांगतों.

**विक्षेप**—विक्षेप म्हणजे विकल्प, ज्याचें योगानें मनोराज्य करितां येतें, तोच संकल्परूप किंवा विकल्परूप विक्षेप.

हा संकल्परूप विक्षेप क्षणभर अवकाश न देतां एकसारखा विषयाचे ध्यासानें उठतो. तो पाहिलेल्या विषयांचें स्मरण करितो, तेव्हां ते विषय प्रत्यक्ष अंतरांत उत्पन्न होतात म्हणजे दिसूं लागतात. मग वृत्ति चिद्रूपांत कशी निवांत होईल, ती निवांत होत नाहीं, तरी बलात्कारानें अनुसंधानीं लाविली असतां ती लागण्याचे अगोदरच संकल्प उत्पन्न होतो. याप्रमाणें एकसारखे विक्षेपच वारंवार उठतात. त्यांत अनुसंधान राहून वृत्ति तदाकार कशी होते ? याप्रमाणें विक्षेपरूप विकल्प पूर्वाध्यास सहवासानें उठला असतां समाधिसुखाचा अनुभव समाधि लावून चिरकाळ बसलें तरी येत नाहीं. आतां हा विक्षेप मोडावा याकरितां मनामध्यें सर्वदां अनुसंधान असलें पाहिजे, व हें अनुसंधान रहावें म्हणून रुप्यादि व्यापार व काव्यतर्क यांस सोडिलें पाहिजे. तसेंच पूर्वी सांगितल्याप्रमाणें यत्किंचित्ही भाषण करूं नये, व अंतरापासून सर्वांची त्यागबुद्धि असावी, आणि आत्मस्वरूपाचें अनुसंधान असावें, व तेंच मनानें मनन करावें किंवा जें ध्येय अनुभवास आलें त्याचा एकतान ध्यास असावा. असा साधकास ध्यास असेल तरच त्यास स्वानुभव प्राप्त होईल, व अन्य पदार्थांच्या त्यागानें अभ्यासेंकरून हळूहळू विक्षेप मोडेल. हा विक्षेप मोडण्यास हेच दोन उपाय, एक सर्व व्यवहाराचा त्याग म्हणजे वैराग्य आणि निरालंबाचा ध्यास म्हणजे स्वरूपाची आवड. याप्रमाणें दोन उपाय जागृतीमध्यें दृढ केलेले असले म्हणजे मग समाधि घेऊं लागलें असतां ती साधते.

जागृतींत असे दोन उपाय सांगितले. त्याचप्रमाणें समाधि घेतांना विषयानुकार विक्षेप उठतील ते विवेकवैराग्यानें साधकानें दूर करावे. ते एकदां दूर केल्यानें गेले नाहींत तर ते जसे जसे उठतील तसे तसे त्यांस दूर करावे. समाधि घेत असतां विवेक करणें तो हा कीं, विकल्प जो उठतो तो कशावर उठतो हें पहावें. जसें, पाण्यावर तरंग किंवा आकाशांत मेघ तसें चिद्गगनांत विकल्पास हे विषय भासतात.

पाणी गगन अवलोकितां। तरंग मेघाची मिथ्या वार्ता। तैसें स्वानुभवें चिद्गगनीं निरखितां। मिथ्यता विषयासी १३
विषय सांडून चिद्गगन पहावें। अर्थात् विषयाचा त्याग संभवे। स्वरूपानुसंधान विवेक यां नांवें। होचि दोनी वाढती
ऐसें विवेक-वैराग्य वाढतां। अवश्य विक्षेपा येतसे क्षीणता। क्षणक्षणां संधीसी विवर्धता। बोलिल्या न्यायें होय १५
निःशेष विकल्प जरी मोडे। तरी सामान्यसुख अपार जोडे। तें सुख बोलतां नये कोडें। वृत्ति जाणें साधकाची
एवं विवेक वैराग्यें करूनी। विक्षेप विकल्पाची हानि। होतसे साधकालागुनी। तस्मात् या रीती साधावें ॥ १७ ॥
ऐसें विक्षेपरूप एक विघ्न। साधकाचें गेलें निरसून। परी पुढें लय ठाके येऊन। हेंही विघ्न दुर्धर ॥ १८ ॥
तया लयाचे दोन प्रकार। एक झोंप दुजा शून्याकार। येणें स्वानुभवा पडे अंधकार। तरी तो काल व्यर्थ गेला
विकल्पासह विक्षेप मोडतां। झोंपचि येतसे आवश्यकता। अथवा वृत्तीसी शून्याकारता। हाही लयचि बोलिजे २०
लय किंवा शून्याकार होणें। तरी स्वानुभवा मुकावें येणें। येथही साधकें उपाय करणें। तरी मोडेल लय ॥ २१ ॥
चिद्गगनाची एकाकारता। असावी ध्येयमात्र गोचरता। हा विसराचि न पडे तत्त्वतां। निमिष्यही एक ॥ २२ ॥
स्मरण एकतान असावें। विस्मरणासीच विसरावें। सामान्यवृत्तीनें उठोनि पसरावें। वितुळतां आपुले आपण २३
स्वरूपाची गोडी अत्यंत। असतां स्मरणही राहे निवांत। परी ते आवडी कैशी देऊन दृष्टांत। स्पष्ट करूं अवधारीं
उष्णकाळीं सूर्य खडतरला। माध्यान्ही वोणवाही लागला। ऐशिया समयीं गज बुडला। महाडोहाच्या आशयीं २५
तयासी सुख शीतलत्वाचें। जाहलें तें कदां त्यागिलें नवचे। जरी तोंड बाहेरी काढितां साचे। तापेल यास्तव न काढी
तैसा हा त्रिविध तापें तापला। विक्षेपासी अति विटला। चिद्गगनीं विश्रांति पावला। विक्षेपाकडे तो न येची ॥२७॥
परी त्या स्वात्मत्वसुखाची। गोडी क्षणक्षणां वाढती साची। वाहवा ह्मणे विश्रांति मीचि। पावलों असें ॥ २८ ॥

---

पण जसें पाणी आणि आकाश यांस पाहिलें असतां तरंग आणि मेघ मिथ्या आहेत असें वाटतें. त्याचप्रमाणें चिद्गगन स्वानुभवानें पाहिलें असतां विषयांस मिथ्यता येते. ज्याप्रमाणें चिद्गगनास पाहिल्यानें विषयांचा त्याग आपाप होतो. त्याचप्रमाणें करीत गेल्यानें त्यास स्वरूपानुसंधान विवेक म्हणतात. हा स्वरूपानुसंधान विवेक व वैराग्य हे दोनी वाढले असतां विक्षेप क्षीण होतो; आणि क्षणोक्षण संधी वाढतो. जेव्हां विक्षेप निःशेष मोडतो तेव्हां स्वानुभवसुख प्राप्त होतें; व तें सामान्य सुख कसें आहे हें सांगतां येत नाहीं; तर त्याचा अनुभव, साधकाची वृत्ति घेते. याप्रमाणें पहिलें विघ्न विक्षेप. हें मोडत आहे तों दुसरें विघ्न कषाय उत्पन्न होऊं लागतें त्यास मोडिलें पाहिजे.

लय दोन प्रकारचा एक झोंप व एक शून्याकारता. शून्याकारता किंवा झोंप प्राप्त झाल्यानें समाधि साधत नाहीं, व स्वानुभव येत नाहीं. म्हणून जोंपर्यंत लय आहे, तोंपर्यंतचा काळ व्यर्थ गेला असें समजलें पाहिजे. विकल्पासह विक्षेप मोडला असतां अवश्य झोंप येतेच. ती जर नच आली तर वृत्तीस कांहीं कळत नाहीं, अशी शून्याकारता प्राप्त होते. याप्रमाणें झोंप किंवा शून्याकारता प्राप्त झाल्यानें स्वानुभव साधकास येत नाहीं. म्हणून त्यानें लय मोडण्याविषयीं उपाय करावा, तो हा कीं, ध्येय मात्र गोचर आहे त्याखेरीज दुसरें कांहीं गोचर नाही, अशी चिद्गगनाची एकाकारता असावी. ही एकाकारता विसर न पडतां सदोदीत असावी. स्वरूपाचें सदोदीत स्मरण असावें. विस्मरण कधींही पडूं देऊं नये. असें झालें असतां सामान्य वृत्ति उठून आपणच पसरेल व ती पसरून वितुळली असतां पुन्हां उठून पसरेल व वितुळेल. स्वरूपाची गोडी लागली असतां स्मरण रहातें तें स्मरण रहाण्यास कशी स्वरूपाची आवड असली पाहिजे तें दृष्टांतानें स्पष्ट करितों.

उन्हाळ्याचे दिवसांत दोन प्रहरीं सूर्य आपल्या प्रखर तेजानें प्रकाशीत आहे, व अशा वेळीं सभोवतालीं मोठा वणवाही लागलेला आहे. तशा समयीं जसा हत्ती महा डोहांत शिरतो. त्या वेळीं त्यास शीतळत्वाचें सुख होतें, तें टाकितां येत नाहीं. तो कदाचित् तोंड बाहेर काढूं म्हणेल तर तें काढितां येत नाहीं; कारण जर तो तोंड बाहेर काढील तर तें तापेल म्हणून तो तापण्याचे भीतीनें तोंड बाहेर काढीत नाहीं. जसा हत्ती उन्हाळा, दोन प्रहरचें प्रखर तेज व वणवा, या तीन तापानें तप्त झाला होता, तसा हा समाधिसुख घेणारा साधक त्रिविधतापानें तापलेला आहे व विक्षेपास फारच विटलेला आहे. तो चिद्गगनीं विश्रांति पावला असतां विक्षेपाकडे येत नाहीं. तर त्यास क्षणोक्षण स्वात्मसुखाची गोडीच लागते, व तो मी विश्रांति पावलों असें म्हणतो;

अनंत जन्मींचें दुःख गेलें । जया सुखें तें मज प्राप्त जाहलें । ऐसेंही जरी आठविलें । तरी हा विक्षेपची ॥ २९ ॥
ह्मणोनि ऐसेंही नाठवितां । उगेंचि असावें सुखाकारता । पुढें आपेआप उत्थान होतां । आठवेल विक्षेपें ॥ ३३३० ॥
ते आठवण भोजनादि व्यपारीं । विरूंची नये क्षणभरी । म्हणजे तया ध्यासें पुन्हां झडकरी । बैसता तदाकार होय ३१
विक्षेप नसतां सावधान । चिद्गगनीं होय लीन । चढती आवडी क्षणक्षण । तरीच हा लय मोडे ॥ ३२ ॥
झोंप तें नयची तत्त्वतां । आणि नव्हे शून्याकारता । सावधपणें एकाग्रता । यांचि नांवें समाधि ॥ ३३ ॥
ऐसें लयाचें विघ्न नासलें । समाधिसुख प्राप्त जाहलें । तरी आणीक तिजें विघ्न उदेलें । कषायाचें साधका ॥ ३४ ॥
कषाय ह्मणिजे सुखरूप असतां । सहजी भास चिद्गगना आंतौता । हिरवें पिवळे भासती भोंवता । कीं अग्नि लागला वाटे
नानाविद्युलता चमकती । कीं नानावाद्यें श्रवणीं पडतीं । हा कषाय विघ्नकर निश्चितीं । वोढी वृत्ति तिकडेची ॥ ३६ ॥
एकाएकीं अवलोकितां । तत्क्षणीं उठोनि धांवें तत्त्वतां । एकदां साधक उठोनी पळतां । मग पुन्हां पुन्हां तैसाची ॥३७॥
प्रतिदिनीं तितुक्या सुखासी । पावतां एकाग्र तदाकारतेसी । भासतां नाद किंवा रंगासी । आरोळी मारोनी पळे ॥ ३८ ॥
ऐशी हे संवे लागली जरी । तरी पुढें प्रवेशेना ब्रह्माकारीं । तेथून प्रतिदिनीं फिरे माघारीं । तस्मात् हें विघ्न दुर्धर ॥३९ ॥
अथवा उठोनी जरी न पळाला । ठायींचा ठायींच बैसला । कषाय दिसतांचि आला । विक्षेपाकडे ॥ ३३४० ॥
विक्षेपाकडे जरी येण्याची । संवे पडली वृत्तीसी साची । तरी तेही आवडी सांडून एकाग्रतेची । उत्थान प्रतिदिनीं करी॥
येथें साधकें एक करावें । चिद्गगन ज्ञानघना न सोडावें । आठवणींत आठवपणें मुरावें । भिन्नत्वें नुरतां ॥ ४२ ॥
तथापि रंग नाद उमटती । तरी ते मिथ्यात्वें दृश्य भ्रांति । विवेकें विदारूनि त्यागिजेती । विक्षेपाकडे आलियाही ॥४३
ब्रह्म अशब्द परिपूर्ण । तेथें कैंचें नादाचें श्रवण । आणि अदृश्य अगोचर तरी वर्ण । हिरवा पिवळा कैंचा ॥ ४४ ॥
ज्ञानघन जो प्रकाशक । तो ऐसा नव्हे दृश्यात्मक । सूर्याऐसा म्हणती कित्येक । तेही न विवेकी ॥ ४५ ॥

---

माझें अनंत जन्मींचें दुःख गेलें असें मानितो. साधकास माझें दुःख जाऊन मी सुखी झालों हें आठवतां कामा नये. तें जर आठवेल तर हा आठवरूपी विक्षेपच उठला असें समजावें. म्हणून मुद्दाम तें सुख आठवूं नये तर तें सुख विक्षेप उठल्यावर आपाप आठवेल. त्यास सुखाची आठवण भोजनादि व्यापार होत असतांही असावी. कधींही विसरूं नये. याप्रमाणें स्वरूपाचे ध्यासानें समाधीस बसलें असतां लागलीच तदाकारता होते. याप्रमाणें विक्षेप नसतां सावधानतेनें चिद्गगनीं लीन होतो, व अशी चढती आवड क्षणक्षण होते, तेव्हांच हा लय मोडतो. झोंप तर येत नाहींच पण शून्याकारता तीही होत नाहीं. अशा सावधपणानें जी एकाग्रता तिलाच समाधि म्हणतात. ही समाधी लय मोडून जों लागते आहे तों तिसरें कषायाचें विघ्न उत्पन्न झालें.

**कषाय**—समाधीचे वेळीं सुखरूप असतां चिद्गगनांत एकाएकी हिरवे पिंवळे इत्यादि रंग भासतात, किंवा अग्नि लागल्याप्रमाणें वाटतो, किंवा वीज चमकावी तसा भास होतो, किंवा कानांत वाद्यादिकांचे नादाप्रमाणें नाद होतोसा वाटतो, यास कषाय म्हणतात.

हा कषाय समाधीचे वेळीं साधकास विघ्नकर्ता आहे. त्याचे योगानें वृत्ति त्याकडेच लागते. याप्रमाणें हा कषाय एकाएकी पाहिला असतां साधक उठून धावूं लागतो. एकदां साधक उठून धावला मग जरी पुन्हां समाधीस बसला तरी त्याचप्रमाणें होतें. याप्रमाणें प्रतिदिवशीं एकाग्र तदाकारता होऊन या सुखास पावत असतां नाद किंवा रंग भासून साधक आरोळी मारून भिऊन पळतो. अशीच जर नेहमीं संवय लागली तर तो ब्रह्माकारतेंत प्रवेशत नाहीं, तर तेथून दररोज माघारा फिरतो, म्हणून हें कषायाचें विघ्न साधकास दुर्धर आहे. रंग किंवा नाद पाहून कदाचित भिऊन पळाला नाहीं तरी तो विक्षेपाकडे येतो. विक्षेपाकडे येण्याची समाधि. सावधपणानें ती एकाकारता राखणें ती समाधि म्हणतात. वृत्तीला संवय लागली तर ती एकाग्रतेची आवड टाकून प्रतिदिनीं उत्थान करील, तें न व्हावें म्हणून साधकानें असें करावें कीं, चिद्गगन ज्ञानघनास सोडूं नये, तर आठवणींत भिन्नत्वें न उरतां आठवपणें मुरावें; मग रंगनाद जरी उमटले, तरी ते मिथ्या, दृश्य भ्रांति आहे, असें विवेकानें जाणून त्यांचा विक्षेपाकडे आले म्हणजे त्याग करावा, तो असा—ब्रह्म शब्दरहित आहे तेथें नाद कसचा? तसेंच ब्रह्म अदृश्य अगोचर असल्यामुळें तेथें हिरवे, पिंवळे हे रंग कसचे ? प्रकाशक ज्ञानघन जो आत्मा तो सूर्यासारिखा आहे, असें कित्येक म्हणतात पण तो तसाही नाहीं.

डोळे दडपूनियां पाहती । अथवा मुद्रादिकांची कृति । चित्तप्रकृतीनें प्रकाश उमटती । तें ब्रह्म म्हणती मूढ ॥ ४६ ॥
कोणी भाविती ज्योति ऐसें । कोणी मानिती अणुत्वें असे । ऐसें कित्येकांसी लागलें पिसें । तयां मूढां प्राप्त कैचें ॥ ४७
असो खरें तरणें जया साधका । ऐशिया न गुंतावें कुतर्का । तेणें पहावें अंतरविवेका । सूक्ष्मबुद्धीनें ॥ ४८ ॥
कीं ज्ञान प्रकाशाऐसें नाहीं । तें अंतरदृष्टीनेंही दिसेना कांहीं । जरी दिसावयाजोगें असतां कधींही । विषयपाहतांआढळेना
तस्मात् वर्ण व्यक्ति नाद रंग । हे सर्व दृष्टीचे दृश्य तरंग । आत्मा ब्रह्म असंग अभग । अमुक ऐसा नव्हे ॥ ५० ॥
दृश्य भासातीत सघन । निश्चळ परिपूर्ण चिद्‌गगन । तेथेंचि वृत्तीसी करावें लीन । एकाग्रभावें ॥ ५१ ॥
ऐसा निर्धार धरून बैसतां । कषाय नासून जाती तत्त्वतां । किंचित् भासही जाहला असतां । वितळून जाती ॥ ५२
दिसोत न दिसोत नाद रंग । परी वृत्ति असावी अभंग । तरी आपेआप पावे भंग । विघ्न कषायाचें ॥ ५३ ॥
वृत्ति लीन असतां चिद्‌गगनीं । कदाचित् विकल्प पावला उत्थानीं । तरीअहंब्रह्मअसंगम्हणोनी । होतांपुन्हां लीन होय
लीनत्वें मी ब्रह्म तरी स्फुरे । परी न होती शब्दाकारें । सामान्य वृत्तीच जाऊन पसरे । पुन्हां वितळून झेंपावे ॥ ५५ ॥
एवं विकल्प उठतां नुठतां । अहंब्रह्मास्मि स्वकीय असंगता । स्फुरूं लागे एकाकारता । अभ्यासबळेंकडोनी ॥ ५६ ॥
ऐशी वृत्तीची ब्रह्माकारता । होय जरी साधका तत्त्वतां । तत्क्षणीं कषायाचे होय घाता । आपेआप ॥ ५७ ॥
या रीतीं कषाय पावतां उपमर्द । पुढें उमटूं लागे रसास्वाद । हेंही समाधीसी प्रसिद्ध । विघ्नचि चौथें ॥ ५८ ॥
विक्षेप नव्हे लय नव्हे । कांहीं रंगही नुमटावे । परी अहंब्रह्म म्हणोनी ध्यावें । अभिमानें माथां ॥ ५९ ॥
अहंब्रह्मास्मि म्हणून । वृत्तीनें घेतला जो अभिमान । हें नव्हे समाधीचें लक्षण । ध्येयाहून भिन्न पडे ॥ ३३६० ॥
जैशी देहबुद्धीची स्फूर्ति । घेऊन बैसती मूढमति । तैशीच अहंब्रह्मही वृत्ति । साभिमानें बाधक ॥ ६१ ॥
निर्विकल्प निजरूप आपुलें । तें किमात्मक नाहीं कळलें । परी मी म्हणोन साभिमानें आलें । देहबुद्धीकडे ॥ ६२ ॥

---

कित्येक डोळे दडपून ब्रह्मास पहातात अथवा मुद्रा दिकांची कृति करितात, त्यायोगें पित्तप्रकृति खवळून प्रकाश दिसूं लागतात त्यांस ते मूर्ख ब्रह्म म्हणतात. कोणी ब्रह्म ज्योतीसारखें आहे असें मानितात. कोणी अणुरेणु इतकें सूक्ष्म आहे असें मानितात. असें कित्येक प्रकारें मूर्ख, ब्रह्माची कल्पना करितात. त्यांच्या तशा मानण्यानें तें प्राप्त कसचें होतें? असो. ज्या साधकांस खरें तरणें असेल त्यानें अशा कुतर्कास गुंतू नये, तर त्यानें अंतरविवेकास पहावें कीं, ज्ञान प्रकाशासारखें नाहीं तें अंतरदृष्टीनेंही दिसत नाहीं. जर तें दिसण्याजोगें असतें तर कधींतरी आढळलें असते. पण आढळत नाहीं म्हणून ज्ञानरूप, जें ब्रह्म तें नाद, वर्ण, व्यक्ति यांसारखें कसें होईल ? नाद, वर्ण, व्यक्ति, रंग हे सर्व दृष्टीचे दृश्य तरंग आहेत. आणि आत्मा असंग अभंग, आहे, तो अमक्यासारखा आहे असें कसें म्हणतां येईल ? हा आत्मा दृश्यभासातीत आहे. त्याचे ठायीं एकाग्रभावानें वृत्ति लीन करावी. अशा प्रकारें निर्धार धरून बसलें असतां कषाय नासून जातात. कदाचित् किंचित् भास झाला तरी तोही वितळून जातो. नाद, रंग दिसोत अगर न दिसोत; पण वृत्ति निश्चळ असली पाहिजे, मग आपाप कषायाचें विघ्न नाश पावतें. वृत्ति चिद्‌गगनीं लीन असतां कदाचित् उत्थान होते वेळीं विकल्प उठला तर, अहंब्रह्म असंग आहे असें आठवतांच तो विकल्प पुनः लीन होतो. लीनत्वानें मी ब्रह्म म्हणून जरी आठवलें तरी शब्दाकार स्फुरण होत नाहीं, तर सामान्य वृत्तीच जाऊन पसरते, व पुन्हां वितळून झेंपावते. म्हणून विकल्प उठला असतां किंवा न उठला असतां अहंब्रह्मास्मि ही स्वकीय असंगतारूप एकाकारता अभ्यासबळानें स्फुरूं लागते. अशी साधकाचे वृत्तीची एकाकारता किंवा ब्रह्माकारता जर खरी होईल तर तत्क्षणींच कषायाचा घात झाला असें समजावें. कषायाचा वर सांगितल्याप्रमाणें नाश झाला म्हणजे मग साधकास समाधीचे वेळीं चवथें विघ्न रसास्वाद हें उत्पन्न होतें.

**रसस्वाद**–म्हणजे जो विक्षेप नव्हे, लय नव्हे व कषायही नव्हे, तर अहंब्रह्म म्हणून अभिमान धरणें यास रसस्वाद म्हणतात.

अहंब्रह्मास्मि म्हणून जो वृत्तीनें अभिमान घेतला हें समाधीचें लक्षण नव्हे. कारण अभिमानामुळें ध्येय आणि ध्याता हे भिन्न रहातात. देहबुद्धि धरून मूर्ख रहातात, ती त्यास जशी बाधक आहे तशी अहंब्रह्मास्मि ही वृत्तिही, साभिमानामुळें बाधक आहे. कारण निर्विकल्प जें आपलें रूप तें किमात्मक आहे हें कळतां मी ब्रह्म म्हणून म्हणतों हा साभिमान देहबुद्धीचाच समजला पाहिजे.

जरी म्हणसी चिद्गगनाकार । वृत्ति जाहली असे निर्धार । ते कैशी येईल साचोकार । देहबुद्धीकडे ॥ ६३ ॥
तरी अवधारावें निवांत । वृत्ति उठतां अभिमान स्फुरत । तेक्षणीं देहबुद्धीच ऐसा संकेत । यथार्थ न कळे म्हणोनी ६४
वृत्ति जरी लीन जाहली । तरी शून्याकारता अवलंबिली । तेचि सत्य म्हणून बळकाविली । आपुली स्वरूपस्थिति ६५
स्फूर्तीपासून देहापर्यंत । या मिथ्यात्वाचा साभिमान घेत । हे देहबुद्धि नव्हे काय निश्चित । ब्रह्म म्हणून घेतां जरी ६६
तथापि इतुकें मिथ्या म्हणोनी । त्यागिलें जरी विवेचुनी । तरीही शून्यासी ब्रह्म कल्पूनी । मीच मानोनी बैसे ॥ ६७॥
आत्मरूप जरी गगनापरी । परी ज्ञानघन रूपप्रतीति नव्हे खरी । तेचि शून्य भावि अंतरीं । तेणें सुखें नाचत ॥ ६८ ॥
जैसा हटयोगी वायु कोंडोनी । शून्याकार बैसला होऊनी । तैसाचि हाही गगनातें मानी । शून्याकार ब्रह्म ॥ ६९ ॥
येथें स्वरूप आणि गगनाचा । भेद कळला पाहिजे साचा । आणि अहंब्रह्माभिमान वृत्तीचा। निपटून गेला पाहिजे ७०
तरीच हा रसास्वाद मावळे । ब्रह्म ब्रह्मत्वें स्वयें निवळे । नातरी शून्य किंवा उफाळे । देहबुद्धी मागुती ॥ ७१ ॥
तस्मात् या रसास्वादाचें विघ्न । ब्रह्म न पविजे निरसल्याविण । तेंचि कैसें ऐकावें निरूपण । अति सावधान साधकें ७२
आधीं गगनस्वरूपाचा भेद । विवेचनें कळावा प्रसिद्ध । पुढें साभिमान त्यागुनि स्तब्ध । वृत्ति राहे तें बोलूं ॥ ७२ ॥
आकाश म्हणिजे केवळ भूत । शब्द गुण जेथें उमटत । आणि शून्यरूप जाणण्यारहित । नेत्रासी अवकाश दिसे ॥७४
काम क्रोध लोभ मोह भय । याही पांचांचा गगनीं अन्वय । पोकळ दृश्य तमोगुण कार्य । जड चारी भूतांऐसें ॥ ७५॥
चिद्गगनीं शब्दगुण नसे । आणि शून्यही जेथें अनारिसें । नेणीव काळत्रयीं न दिसे। अदृश्य अगोचर ॥ ७६ ॥
कामक्रोधादि हे मनोधर्म । त्या मनाचाचि नसे जेथें उद्गम । अवकाशेंविण चिद्घन सम । पोकळ तो किंचित् नसे ७७
भूत म्हणिजे जाहलें । म्हणोनि गगन हें नाम पावलें । स्वस्वरूप आदिअंतीं संचले । ज्ञानघन निबिड ॥ ७८ ॥
जया स्वरूपीं मायास्फूर्ति । रज्जुसर्पाची जेवीं भ्रांति । तैशी न होऊन मानिली उत्पत्ति । अहंब्रह्मास्मि शब्दें ॥ ७९ ॥
तो शब्द आणि तया शब्दासी । अवकाश जाहला अखंडैकरसीं । तया चिद्रूप पोकळपणासी । आकाश नाम ठेविलें॥
येर भूतें आणि जगास । पैसरूपीं जाहला वास । तया नाम मात्र ठेविलें फोस । आकाश म्हणोनी ॥ ८१ ॥

---

शंका.---तूं म्हणशील कीं, वृत्ति जर निश्चयानं चिद्गगनाकार झाली आहे तर ती देहबुद्धीकडे कशी येईल ? याचें उत्तर ऐक.

उत्तर.---वृत्ति उठल्याबरोबर अभिमान स्फुरतो. त्या वेळीं स्वरूप यथार्थ न कळतां अभिमान उत्पन्न झाला, याला देहबुद्धीच म्हटली पाहिजे. वृत्ति जरी लीन झाली तरी तिनें शून्याकारता अवलंबिली आहे. तीच खरी आपली स्वरूपस्थिति असें मानून बसली. ती वृत्ति स्फूर्तीपासून देहापर्यंत या मिथ्यत्वाचा साभिमान घेते. हा साभिमान ब्रह्म मानून जरी धरिला तरी ती देहबुद्धि नव्हे काय ? वृत्तीनें विवेचन मिथ्या मानून जरी सर्वांचा त्याग केला तरी शून्यास ब्रह्म कल्पून तेंच मी असें मानून बसते. आत्म्याचें रूप जरी गगनासारखें आहे तरी ज्ञानघनरूप आत्मप्रतीति खरी येत नाहीं, तर त्याच शून्यरूप आकाशास ब्रह्म अंतरीं मानून त्याच सुखानें नाचतो. जसा हटयोगी वायु कोंडून शून्याकार होऊन बसला, तसाच हा अभिमानी साधक गगनास शून्याकार ब्रह्म मानून बसला. साधकास वास्तविक स्वरूप आणि गगन याचा भेद कळला पाहिजे व वृत्तीचा अहंब्रह्म साभिमान निःशेष गेला पाहिजे, तेव्हांच हा रसस्वाद मावळेल व ब्रह्म ब्रह्मत्वें स्वतः निवळेल. तसें न झालें तर शून्यत्वांत किंवा देहबुद्धींत जाऊन साधक पडेल, म्हणून रसस्वादाचें विघ्न निरशिल्यावांचून ब्रह्मत्व पावणार नाहीं.

### गगन आणि स्वरूप यांमधील भेद.

आकाश म्हणजे जें केवळ भूत ज्यापासून शब्द गुण उत्पन्न झाला व जें जाणण्यावांचून शून्यरूप आहे, तें नेत्रास अवकाशात्मक दिसतें. यापासून काम, क्रोध, लोभ, मोह, भय, हे पांच पदार्थ उत्पन्न झाले असे हें आकाश पोकळ दृश्य तमोगुण कार्य आहे. व चार भूतांप्रमाणें जडही आहे चिद्गगनीं शब्दगुण नाहीं व शून्यत्वही तें अदृश्य अगोचर असल्यामुळें तेथें नेणीव दिसत नाहीं; कामक्रोध हे मनाचे धर्म आहेत त मन या चिद्गगनीं उत्पन्न होत नाहीं. म्हणून याचेठायीं ते मनाचे धर्म नाहींत. आकाशासारखें तें चिद्गगन पोकळ नाहीं. भूत म्हणजे झालें, म्हणून त्यास गगन हें नांव प्राप्त झालं. स्वरूप हें आदिअंतीं ज्ञानघनरूप संचलेलें आहे. त्या स्वरूपाचे ठायीं मायास्फूर्ति, रज्जूचे ठायीं सर्पाची भ्रांति आहे तशीच अहंब्रह्मास्मि या शब्दानें न होऊन उत्पत्ति मानिली. तो शब्द आणि शब्दगुण यांस अखंडैकरशीं अवकाश मिळाला. त्या छिद्ररूप पोकळपणास आकाश हें नांव ठेविलें. मग त्यांत बाकीचीं चार भूतें व जग यांचा वास झाला. त्या पैसरूपास फोस नांव आकाश असें ठेविलें, मग तेथें

तेथें अज्ञान जडत्व आलें । म्हणोनी कल्पिलें तमोगुणी जाहलें । कामक्रोधादि कार्यांत उमटले । अंतःकरणरूपी ॥८२
ऐसे विकार हे गगनाचे । कार्य तरी मायास्फूर्तीचें । विचारें पाहतां जाहलेंच नवचे । परी नामास्तव कल्पिलें ॥ ८३ ॥
स्वरूप तरी अखंडैकरस । जेथें मायेसी जाहला उमस । परी तेथें छिद्ररूप पोकळीस । अवकाश कैंचा ॥ ८४ ॥
जैसें आरसिया छिद्र नसतां । पुढील पदार्थ दिसती आंतौता । तैसें ज्ञानघन निबिड असतां । भ्रमें जग मध्यें जाहलें वाटे
ज्ञानघनीं कैंचा अवकाश । म्हणिजे अमुक स्थळ स्वरूपाहून वोस । पडिलें ऐसें नाहीं तयास । एकरस बोलिजे ॥ ८६
ऐशिया अखंडैकरसामाजीं । कल्पिली कल्पना माया दुजी । नेणीवही कल्पिली सहजीं । तेंचि आकाश ॥ ८७ ॥
ज्ञानामाजीं नेणतेपण । पोकळ जडरूप गगन । नाम पावलें उपाधीकडून । येरव्हीं जाहलेंचि नाहीं ॥ ८८ ॥
स्वरूपाविण स्थळ रितें नाहीं । ऐसें बोलतां कोणी येथेंही । शंकील कीं गगनासीही पाही । खंडतां कोठें ॥ ८९ ॥
तरी परिसा याचें उत्तर । जें कां निश्चळ अंत ना अपार । तयासी गगन हें नाम मात्र । मायेस्तव कल्पिलें ॥ ३३९० ॥
वेगळेपणें जें पहावें । तयासी गगन कल्पिलें स्वभावें । अभिन्नपणें जें एकरस व्हावें । तरी तें गगनचि ब्रह्म ॥ ९१ ॥
काळिमा नसतां पितळ । तेंचि सुवर्ण केवळ । तैसें अज्ञान नसतां निवळ । ज्ञानघन तें ब्रह्म ॥ ९२ ॥
हें अवकाशरूप उगें भाविलें । तया ब्रह्मरूपा गगन नाम ठेविलें । परी तें आकाश नव्हे असे संचलें । परब्रह्मचि ॥ ९३ ॥
आतां आकाशाचें रूप कोणतें । म्हणसी जरी बोलिजे तें । छिद्रत्वें शब्द नाद उमटती तें । आकाश भूतरूप ॥ ९४ ॥
तेंचि आकाश शब्दासहित । जाहलें म्हणून नाम पावलें भूत । तेंचि प्रळयकाळीं नासत । येर संचलें तें ब्रह्म ॥ ९५ ॥
शब्दरूप तेंचि श्रोत्रासी । वेद्य जाहलें एकदेशी । येर ओतप्रोत तें कवणासी । विषय असे सांगें ॥ ९६ ॥
म्हणसी नेत्रासी पोकळपणा । दिसे गगनाचा परिपूर्णा । तरी ते वाउगी कल्पिली कल्पना । गगना रूप कैंचें ॥ ९७ ॥
शब्द तरी नेत्रासी न दिसे । मा ओतप्रोत तें कैसें भासे । अनुमानिलें जें पोकळसें । तें परब्रह्म सघन ॥ ९८ ॥
परब्रह्म अनुमाना आलें । म्हणून गगन ऐसें नाम ठेविलें । पाहणाराकडे ज्ञान उमटलें । पाहिलें तें जड अज्ञान ॥ ९९ ॥

---

अज्ञान जडत्व आलें. म्हणून गगन तमोगुणापासून झालें अशी कल्पना केली. कामक्रोध हे अंतःकरणरूपी कार्यांत उत्पन्न झाले. हे विकार गगनाचे आहेत. पण हें सर्व मायास्फूर्तीचें कार्य आहे. म्हणून विचार केला असतां हें झालें नाहीं असेंच ठरलें. पण नामरूपामुळें उगीच कल्पना केली की, हें आहे वास्तविक स्वरूप, अखंडैकरस आहे. तेथें माया उत्पन्न झाली; त्या ठिकाणीं छिद्ररूप पोकळीस अवकाश कसचा सांपडला. जसें आरशास छिद्र नसतां त्यांत पुढील पदार्थ दिसतात, तसें ज्ञानघन निबिड असतां भ्रमानें त्यामध्यें जग झालेंसें वाटतें. स्वरूपाहून एकादें स्थळ वोस असतें, तर ज्ञानघनीं अवकाश सांपडतात. पण कोठेंच वोस स्थळ नाहीं म्हणून तेथें जग भासण्यास अवकाश नाहीं. त्या अखंडैकरसाचे ठायीं दुसरी माया आहे अशी कल्पना केली व नेणीव ही सहज कल्पिली, तेंच आकाश. ज्ञानामध्यें नेणतेपण, पोकळ, जडरूप गगन, हें नांव उपाधीमुळें आलें. एरव्हीं आकाश झालेंच नाहीं.

**शंका**–स्वरूपावांचून जसें स्थळ रितें नाहीं तसें गगन तरी कोठें खंडिलेलें आहे.

**उत्तर**–जें अनंत अपार निश्चळ परब्रह्म, त्यास मायेमुळें गगन हें नांव कल्पिलें. वेगळेपणानें जें ब्रह्मास पाहिलें त्यास गगन हें नांव कल्पिलें. तें अभिन्नपणें एकरस होतें तेव्हां तेंच गगन ब्रह्म आहे. जसें काळिमा नसली तर तीच पितळ केवळ सुवर्ण आहे, तसें अज्ञान नसतां तेंच गगन ज्ञानघन ब्रह्म आहे. ब्रह्मास अवकाश आहे अशी उगीच कल्पना करून त्यास गगन नांव ठेविलें. पण तें आकाश नव्हे, तर परब्रह्मच संचलेलें आहे. आतां आकाशाचें रूप कोणतें म्हणशील तर छिद्रत्वानें ज्यांत शब्द ( नाद उमटतात. ) तें भूतरूप आकाश. तेंच आकाश शब्दासहित झालें म्हणून भूत हें नांव पावलें. तें प्रळयकाळीं नासतें मग जें संचलेलें रहातें तेंच ब्रह्म आहे.

शब्दरूप जें आकाश तेंच श्रोत्रास कळतें. त्याखेरीज जें वोतप्रोत उरतें तें कोणचा विषय आहे. तूं म्हणशील कीं गगनाचा पोकळपणा नेत्रास कळतो तो पोकळपणा उगाच कल्पिलेला आहे. आकाशास वास्तविक रूपच नाहीं. शब्द नेत्रास दिसत नाहीं मग वोतप्रोत उरलेलें गगन नेत्रास कसें भासलें. जें पोकळ आहे असें अनुमान केलें तेंच सघन परब्रह्म आहे. परब्रह्म अनुमानास आलें म्हणून त्यास गगन असें नांव ठेविलें. तेव्हां तें पहाणाराकडे ज्ञान आलें; त्यानें पाहिलें तें जड अज्ञान.

परी पाहणाराचें विशेष ज्ञान । तेंचि अन्यथा अप्रमाण । मा कल्पिलें पोकळासी जें अज्ञान । तें खरें कैसें ॥ ३४०० ॥
पहाणाराचें ज्ञान त्यागावें । पोकळींचें जडपण विसर्जावें । उर्वरित केवळ ज्ञान स्वभावें । तें परब्रह्म दोहींकडे ॥ १ ॥
तस्मात् ओतप्रोत तें ब्रह्म पूर्ण । शब्दरूप तितुकेंचि गगन । जें कां उद्भवलें मायास्फुरण । उपाधिमाजीं ॥ २ ॥
तेथूनचि परा पश्यंती मध्यमा । वैखरी आदि पावली उद्गमा । शब्दरूपता तयाचिये नामा । आकाशभूत ॥ ३ ॥
येर चारी भूतांचे उपाधीस्तव । शब्दघसणीनें उठे स्वभाव । अथवा पशुपक्ष्यादि जीव । तेथें ध्वनिरूपें गगन ॥ ४ ॥
तेथेंचि कामक्रोधाची उत्पत्ति । आणि शून्य जड अज्ञान भ्रांति । अथवा नाशही कल्पांतीं । इतुक्याचि गगना ॥ ५ ॥
तया शब्दरूप गगनाचा । वेद्यत्वपणा श्रोत्रासी साचा । येर ओतप्रोत जें तयाचा । शब्द ना वेद्यत्व ॥ ६ ॥
तेथें कामक्रोधादि ना जडपण । शून्य अज्ञान ना शब्दगुण । उत्पन्न जाहलें ना नाश होणें । म्हणून तेंचि ब्रह्म ॥ ७ ॥
अज्ञानें तया ब्रह्मरूपासी । कल्पना केली भूताऐशी । नाम आकाश ठेविलें त्यासी । परी रूप कांहीं नसे ॥ ८ ॥
तस्मात् तेंचि ब्रह्म खरें । परी घेतलें पाहिजे विचारें । तंव रविदत्त पुसे आदरें । कर जोडोनी ॥ ९ ॥
जी जी स्वरूपासीं जें उपमिलें । तें गगन कवणासी बोलिलें । विभु व्यापक निरंश म्हणितलें । हें तों ओतप्रोत गगन
शब्दरूप तें तों एकदेशी । विभुत्व व्यापकता न ये त्यासी । तस्मात् उपमिलें जें ब्रह्मरूपासी । तें ओतप्रोत गगन ११
विभुत्व व्यापकत्व निरंशता । स्वरूपासम असती तत्वतां । एक चैतन्याची मात्र अधिकता । ब्रह्मरूपीं असे ॥ १२ ॥
ब्रह्मीं चैतन्य म्हणतां अधिक । व्यापकही जड जाहलें आवश्यक । तेंचि ब्रह्म उपदेशितां एक । तरी हें उमजे ऐसें करा
ऐसें ऐकतांचि श्रीशंकर । हर्षोनि करिते जाहले उत्तर । कीं हें ओतप्रोत जें निर्विकार । यासीच उपमिलें ॥ १४ ॥
अज्ञानें भ्रमें भाविलें असे । कीं हें व्यापकचि आकाश ऐसें । तयासी कळावया सांगती आवेशें । श्रुति आणि ज्ञाते १५
श्रुति आणि ज्ञाते कळून । सांगती कैसें हेंचि गगन । म्हणसी तरी प्रयोजन । असे इतुकेंची ॥ १६ ॥
कीं अज्ञानासी ज्ञान व्हावें । तरी तें कासयासारिखें उमजावें । ऐसा पदार्थचि दुसरा नव्हे । म्हणोनि ज्याचें त्या उपमिलें

---

व पहाणाराचें विशेष ज्ञान तेंच अन्यथा प्रमाण आहे. मग त्यानें पोकळास जें अज्ञान कल्पिलें तें खरें कसचें ? म्हणून पहाणाराचें ज्ञान टाकावें व पोकळीचें जडपण विसर्जावे. मग जें ज्ञान उरतें तेंच परब्रह्म होय. म्हणून वोतप्रोत जें तें ब्रह्म व शब्दरूप जें तें गगन. तेंच माया-उपाधींत उत्पन्न झालें. त्यापासूनच परापश्यंतीमध्यमा-वैखरी या चार वाचा उत्पन्न झाल्या. त्यांच्या शब्दरूपतेस आकाश असें नांव आलें. चार भूतांचें उपाधीमुळें घसणीनें शब्द उत्पन्न झाला. अथवा पशुपक्षादि जीवांचे ठायीं ध्वनीरूपानें गगन आहे. तेथेंच कामक्रोधाची उत्पत्ति आणि शून्य अज्ञान जड भ्रांति आहे. त्यांचाच कल्पांतीं नाश होतो. शब्दरूप जें गगन त्याचा वेद्यत्वपणा कानासच आहे. त्या शब्दरूपाखेरीज जें वोतप्रोत तेथें शब्द नाहीं व त्याचें वेद्यत्वही नाहीं. तेथें कामक्रोधादिक नाहींत. जडपण, शून्य अज्ञान, शब्दगुण हे नाहींत. तें उत्पन्न झालें नाहीं व त्याचा नाश होत नाहीं, म्हणूनच तें ब्रह्म आहे. त्या ब्रह्मरूपास अज्ञानानें हें भूतच आहे अशी कल्पना केली. व त्यास आकाश हें नांव ठेविलें. पण त्यास रूप कांहींच नाहीं म्हणून तेंच ब्रह्म खरें आहे. पण तें विचारानें घेतलें पाहिजे.

प्रश्न—रविदत्त विचारितो कीं, स्वरूपास ज्या गगनाची उपमा दिली तें गगन कोणतें ? विभु, व्यापकत्व निरंश असें म्हटलें आहे तें वोतप्रोत ब्रह्म होय. शब्दरूप जें आकाश तें तर एकदेशी आहे, त्यास विभुत्व, व्यापकता, निरंशता येत नाहीं म्हणून स्वरूपास ज्याची उपमा दिली तें वोतप्रोत गगन होय. त्या वोतप्रोत गगनाचीं विभुत्व, व्यापकत्व, निरंशतादि लक्षणें स्वरूपाचे लक्षणांप्रमाणें आहेत. ब्रह्मरूपांत वोतप्रोत गगनापेक्षां एक चैतन्य मात्र अधिक आहे. ती ब्रह्मीं चैतन्याची अधिकता म्हटल्यानें व्यापक ब्रह्म तेंही अवश्य जड झालें. आणि तेंच एक ब्रह्म म्हणून तुम्ही उपदेशितां तरी तें मला स्पष्ट कळेल असें सांगा.

श्रीशंकराचार्य उत्तर देतात कीं, हे रविदत्ता, जें वोतप्रोत गगन, गगन या नांवानें आहे त्याचीच स्वरूपास उपमा दिली. अज्ञानानें भ्रमानें मानिलें आहे कीं, आकाश व्यापक आहे. त्याला कळण्याकरितां श्रुति आणि ज्ञाते सांगतात कीं, आकाशासारखें ब्रह्म आहे. तूं म्हणशील कीं, स्वरूपास समजून उमजून हेंच गगन असें कां सांगतात ? तर त्याचें कारण इतकेंच आहे कीं, अज्ञान्यास ज्ञान होण्याकरितां स्वरूपास कोणाची उपमा द्यावी ? उपमा देण्यासारखा दुसरा पदार्थच नाहीं तेव्हां त्यांनीं कसें उमजावें ? त्यांस उमजण्यास दुसरा मार्ग नाहीं, म्हणून ज्याची त्यासच दुसरे नांवानें उपमा दिली.

अज्ञानासी या गगनाचा । व्यापकपणा मोठेपणा साचा । ठाउका असे तरी उपमिता स्वरूपाचा । अनुभव कळेल १८
एक शून्य अज्ञान भाविलें । म्हणोनीच गगना ऐसें उपमिलें । तेंही साधका जाईल कळलें । अभ्यासबळेंकडूनी ॥१९॥
कीं ब्रह्म चिद्घन ज्ञानरूप । तें विशेषा ऐसें नव्हे अल्प । सामान्य स्वयंप्रकाश अमुप । यथार्थ कळे जेव्हां ।३४२०॥
तेव्हांचि ओतप्रोताक्षी अज्ञान । कल्पिलें होतें तें त्यागून । सहजीं सामान्य एकरूपज्ञान । कळतां गगनबुद्धि जाय २१
विभुत्वव्यापकत्वतों पहिलेंसम । तें तों ऐक्याचिसहजनिःसीम । भाविलंअज्ञातआणिठेविलेंनाम । तें मिथ्याहोय स्वानुभवें
तस्मात्रविद्त्ताविचारूनपाहें । व्यापकज्ञानघनब्रह्माचि आहे । या व्यापकासी कोणतें रूप कीं लाहे । चक्षु आदि इंद्रियां
असो ऐसिया व्यापक रूपासी । गगन कल्पना जे अज्ञानासी । तेचि निरसिजे ऐकें मानसीं । सावधानपणें ॥ २४ ॥
वायु आदि चारी भूतें । व्यापक गगनीं असतीं मिश्रितें । तेंचि भिन्न काढितां ऐतें । स्वतःसिद्ध ब्रह्म ॥ २५ ॥
अज्ञानशून्य जे नेणीव । हा पृथ्वीचा कठिण स्वभाव । गगनीं मृदुत्वाचा जो भाव । तो आपाचा गुण ॥ २६ ॥
भासलें गगन तें तेज । म्हणून पोकळ अनुमानिजे सहज । स्तब्धता निरोधता ते समज । वायुतत्वाची ॥ २७ ॥
शब्दरूप अंतःकरणस्फूर्ति । जयेस्तव गगन हें वदंती । हे केवळ गगनीं नाढळती । विचारून पाहतां ॥ २८ ॥
स्तब्धता निरोधता तों नसे । कीं मायाचि जेथें नुमसे । चंचळ स्वभावेंविण एकरसें । चिद्गगन ब्रह्म ॥ २९ ॥
तस्मात् गगनीं वायूचा अभाव । तेज भासकत्वें दिसे तें वाव । जाहला म्हणसी ब्रह्मींचा अनुभव । परी तो भ्रम ॥३०
वेगळेपणें कोण खरें । कीं ब्रह्म अनुभविजे साचोकारें । तस्मात् अभिन्नपणें भास निवारे । तेव्हां तेजाचा अभाव ३१
त्वचेसी कांहीं स्पर्शावें । तरी मृदु कठिण म्हणावें । आपुलें आपणासी स्वयमेवें । मृदु ना कठिण ॥ ३२ ॥
तरी आप हें कवणेपरी । असे तें काढावें निर्धारी । नाहींच नाहीं कल्पना दुसरी । आहे तैसें आहे ॥ ३३ ॥
कठिणपण शून्य अज्ञान । हे कल्पिली पृथ्वी म्हणून । विचारें वोळखितां सामान्य ज्ञान । अज्ञान मावळे ॥ ३४ ॥
आपण चिद्गगन ओतप्रोत । अंत नाहीं म्हणोन अनंत । सजातीयादि भेदरहित । कळे जरी स्वानुभवें ॥ ३५ ॥

---

अज्ञान्यात या गगनाचा व्यापकपणा व मोठेपणा ठाऊक आहे म्हणून गगनाची उपमा दिली असतां त्यांस स्वरूपाचा अनुभव येईल. एक शून्य अज्ञान मानिलें म्हणूनच स्वरूपास गगनाची उपमा दिली. पण त्यांत आकाशाचें काय स्वरूप आहे, हें साधकास अभ्यासाचे बळानें कळूं लागेल व ब्रह्म चिद्घन ज्ञानरूप आहे तें विशेषासारखें अल्प नाहीं. तर सामान्य स्वयंप्रकाश अमुप आहे, असें जेव्हां यथार्थ कळेल तेव्हांच वोतप्रोतास अज्ञान कल्पिलें होतें तें टाकून सहजीं सामान्य एकरूप ज्ञान कळतांच गगनबुद्धि जाईल. विभूव्यापकत्व ही समानता पहिलीच आहे व ऐक्यही सहजीं आहे. आतां अज्ञान मानून जें गगन नांव ठेविलें होतें तें मात्र स्वानुभवानें मिथ्या होतें, म्हणून रविद्त्ता, विचार करून पहा. व्यापक, ज्ञानघन ब्रह्मच आहे. या व्यापकास कोणतें रूप आहे, कीं तें चक्षुआदि इंद्रियांस कळेल. असो. अशा व्यापकरूपास अज्ञानाची गगन ही कल्पना आहे तीच निरशितों. ऐक—

वायुआदि चारी भूतें, व्यापक गगनांत मिश्रित आहेत, तींच निराळीं काढिलीं असतां स्वतःसिद्ध ब्रह्म उरेल. व्यापक गगनांत अज्ञानशून्य नेणीव आहे हा पृथ्वीचा कठीण स्वभाव आहे. आकाशामध्यें मृदुत्वाचा जो भाव तो आपाचा गुण आहे. आकाश जें भासतें तो तेजाचा गुण होय. या गुणानें आकाश पोकळ आहे अशी कल्पना करितात. आकाशामध्यें स्तब्धता, निरोधता आहे ती वायुतत्वाची आहे. शब्दरूप अंतःकरणस्फूर्ति, त्या स्फूर्तीमुळें आकाश हें स्वरूपास नांव आलें. ही स्फूर्ति गगनांत विचार करून पाहिली म्हणजे आढळत नाहीं. जेथें मायाच नाहीं तेथें स्तब्धता, निरोधता कोठची ? याप्रमाणें स्तब्धता निरोधता नाहीं म्हणून गगनीं वायु नाहीं. भासकत्वानें तेज दिसतें तें खोटें. तूं म्हणशील कीं, ब्रह्मींचा अनुभव झाला. जो झाला असा वाटतो तो भ्रम. कारण आपण ब्रह्माहून वेगळें राहून त्याचा अनुभव घेणें हें घडत नाहीं. आतां अभिन्नपणानें राहिलें तर भास नाहींसा होतो, म्हणून तेथें तेज नाहीं. त्वचेला जेव्हां स्पर्श होतो तेव्हां तेथें मृदु कठीण ओळखते. आपलें आपणच आहे तेव्हां तेथें मृदु कठीण कोठचें ? मृदुत्वच नाहीं तर तेथें आप कोठून असेल ? कठीणपण शून्य अज्ञान हा पृथ्वीचा गुण म्हणून कल्पना केली. पण विचार केला म्हणजे सामान्य ज्ञान कळतें. मग अज्ञान कोठें उरेल ? आपण चिद्गगन ओतप्रोत व अनंत आहे, असें सजातीयादि भेदरहित जर स्वानुभवानें कळेल;

देहादिकाचि मी आपण । मानिलें होतें विपरीत ज्ञान । म्हणून कल्पिलें एक अज्ञान । कीं नकळे आपआपणा ॥ ३६॥
हें विपरीत ज्ञान वृत्ति उठतां । कल्पिलें असे बहिर्मुखता । तस्मात् नेणीवही आली पाहतां । माथां वृत्तीचे ॥ ३७ ॥
परी स्वरूप अज्ञान नसे । उठतां वृत्तीसी जाणतसे । विपरीत ज्ञान तेंही प्रकाशे । जयाच्या प्रभे ॥ ३८ ॥
वृत्तीसीच स्वरूप न कळलें । तें अज्ञानही जेणें प्रकाशिलें । तरी तें अज्ञान कैसें जाहलें । ज्ञानघन ओतप्रोत ॥ ३९।
जडपणा तों स्वरूपीं किंचित । नाहींच नाहीं निभ्रांत । शून्य अज्ञानत्व कल्पिला संकेत । तो विचारें निरसिला ॥ ४०
तथापि शून्य खंडन उरलें । तें पुढील श्लोकीं निरूपिलें । तेव्हां तेंचि वस्तुतंत्र ज्ञान संचलें । कळेल अपरोक्ष ॥ ४१॥
एवं स्वस्वरूप जें चिद्गगन । अनंत अपार व्यापक पूर्ण । तयासी व्यर्थ कल्पिती आकाश म्हणून । परी तेंचि सघन ब्रह्म
तें स्वरूप अशब्द अस्पर्श । अरूप अगंध अरस । भास मृदु ना निरोधांश । आणि अज्ञान नव्हे ॥ ४३ ॥
ऐसें गगन गाळून काढिलें । पांचही भूतांचे धर्म त्यागिले । नंतर उर्वरित जें उरलें । तें रविदत्ता चिद्गगन ॥ ४४ ॥
हें ऐकूनी रविदत्त आपण । साष्टांग घालितसे नमन । जी जी स्वस्वरूप ज्ञानघन । पोकळीविण एकरस ॥ ४५ ॥
ऐसें विचारें अनुमानलें । कीं गगनप्राय ओतप्रोत संचलें । परी तें वृत्तीसी पाहिजे कळलें । तेव्हां वृत्तीचें अज्ञान नासे
स्वरूप वास्तविक अज्ञान नव्हे । सामान्य ज्ञानघनचि स्वभावें । परी वृत्तीसी तों अज्ञान संभवे । कीं कळेना स्वरूप ४७
सजातियादि भेदरहित । कीं परिच्छेदाविण अनंत । वृत्तीसी कळावा अपरिमित । तरीच अज्ञान निरसे ॥ ४८ ॥
जया वृत्तीच्या न कळण्यामुळें । एवढें ऐक्य तें पडिलें वेगळें । देहबुद्धि धरूनियां बळें । नाथिलेंचि जन्में मरे ॥ ४९ ॥
ऐशिया वृत्तीसी कळल्याविण । न फिटेचि कदाही अज्ञान । अभ्यासें व्यापितसे चिद्गगन । परी केवढें किती कळेना ५०
वृत्तीसी कळे किंवा न कळे । तों इतुकियांत वृत्ति मावळे । तरी अशेषत्वें कैसें निवळे । अगोचर ब्रह्म ॥५१॥
तथापि किंचित कळण्यानें । वृत्तीनें अभिमान माथां घेणें । अहंब्रह्मास्मि हें उफाळणें । विघ्नरूप रसास्वादु ॥ ५२ ॥
तरी हा रसास्वादु कैसा जावा । यथार्थ वृत्तीसी कैसा कळावा । अभिमानरहित स्वानुभवा । कैसें पावावें ॥ ५३ ॥

---

व देहादिकच, मी आपण आहें, असें विपरीत ज्ञान मानिलें होतें म्हणून एक अज्ञान कल्पिलें कीं, मी कोण हें मला कळत नाहीं. हें विपरीत ज्ञानवृत्ति उठतांच बहिर्मुख दृष्टीनें कल्पिलें, म्हणून नेणीवही वृत्तीकडे आली. स्वरूप हें अज्ञान नाहीं, कारण तें अज्ञान असतें तर वृत्ति उठल्याबराबर तिला जाणतेंना. ज्यापेक्षां जाणतें त्यापेक्षां तें अज्ञान नाहीं. त्याचे प्रकाशानें विपरीत ज्ञान तेंही प्रकाशीत आहे. तसेंच वृत्तीला स्वरूप कळत नाहीं तें वृत्तीचें अज्ञानही स्वरूपप्रकाशानें प्रकाशीत आहे. मग तें ज्ञानघनस्वरूप अज्ञान कसें होईल?

स्वरूपीं जडपणा नाहीं, शून्य अज्ञानत्व कल्पिलें होतें, त्याचा विचारानें निरास केला; तथापि शून्यखंडण उरलें तें पुढल्या श्लोकीं सांगितलें आहे; त्याचा विचार समजला म्हणजे वस्तुतंत्र अपरोक्षज्ञान संचलेलें आहे असें कळेल. मग स्वस्वरूप जें चिद्गगन, अनंत, अपार, व्यापक आहे त्यास व्यर्थ आकाश अशी कल्पना केली. वास्तविक तेंच सघन ब्रह्म आहे. तें स्वरूप, अशब्द, अस्पर्श, अरूप, अगंध, अरस आहे तेथें भास, मृदु, निरोधांश व अज्ञान नाहीं. याप्रमाणें पांच भूतांचे धर्म त्यागून गगन गाळून काढिलं, मग जें उरलें तेंच चिद्गगन. हें चिद्गगन विचारानें अनुमानितां आलें. पण तें वृत्तीला कळेल तेव्हांच तिचें अज्ञान जाईल. स्वरूप वास्तविक अज्ञान नाहीं, तर तें सामान्य ज्ञानघनच आहे. पण वृत्तीला स्वरूप कळत नाहीं म्हणून अज्ञान आहे असें ती कल्पिते. तें तिचें अज्ञान स्वरूपपरिच्छेदावांचून अनंत अपार आहे असें कळेल तेव्हांच निरसेल. ज्या वृत्तीच्या न कळण्यामुळें एवढें ऐक्य असतां वेगळें पडले व देहबुद्धि धरून उगाच मी जन्मतों, मरतों, अशी वृत्तीची भावना झाली. तिला कळल्यावांचून अज्ञान कधींही फिटणार नाहीं. वृत्ती अभ्यासामें चिद्गगन व्यापते, पण तें केवढें व किती आहे हें कळत नाहीं. वृत्ती अभ्यासानें व्यापते, पण तिला कळलें न कळलें तोंच ती मावळते. मग अगोचर ब्रह्म अशेषत्वानें कसें निवळेल ? तें अशेषत्वानें निवळले नाहीं, पण किंचित् तिला कळलें, त्यायोगानें ती अभिमान माथां घेते. आणि अहंब्रह्मास्मि म्हणते हा रसस्वाद होय. हा विघ्नकारक आहे, तो कसा जावा, वृत्तीला यथार्थ कसा कळावा व अभिमानरहित स्वानुभवास कसें पावावें ?

साभिमानेंविण शून्य होतें । अभिमानें तों विघ्न उमटतें । तरी येथील खूण कैशी आहे ते । स्वामी निरोपावी ॥ ५४ ॥
ऐसें बोलोनी चरण धरिलें । ऐकतां सद्‌गुरूही संतोषले । ऐक ह्मणती सावधान पाहिलें । वृत्तीसी कळणें कैसें तें ॥५५॥
जे कां चिद्‌गगनीं वृत्ति पसरे । तदाकार होऊनी विघुरे । नंतर जें कांहीं उर्वरित उरे । तेंचि स्वप्रभरूप ॥ ५६ ॥
पुन्हां तत्क्षणींच वृत्ति उठे । चिद्‌गगन व्यापून सवेंचि फाटे । दुजी नुठे तोंवरी दाटे । केवल स्वरूप ॥ ५७ ॥
ह्मणसी वृत्ति मावळतां निवळे । तें वृत्तीसी केवीं कळे । परी वृत्ति उठतां चिद्‌गगनीं मिसळे । परी तें कळे हें म्हणूनी
वृत्ति पदार्थ जरी पाहतां । अमुक कळून मावळे तत्त्वतां । हा स्वभावचि वृत्तीचा ऐतां । कीं कळावें मावळावें ॥५९॥
ह्मणोनी घटपटाचें जें अज्ञान । निरसून अमुकसें होय ज्ञान । जरी मग जातसे मावळून । तरी कळणें तों जाहलें ६०
तैशी वृत्ति झेपावी चिद्‌गगनीं । हें स्वस्वरूप कळे तत्क्षणीं । तेव्हांचि जाय जरी वितळूनी । परी अज्ञान तें गेलें ६१
हें मी ब्रह्म चिद्‌गगन । एकरस दंडायमान । ऐसें वृत्तीसी होय ज्ञान । न कळणें जाउनी ॥ ६१ ॥
वृत्ति व्यापतांचि अज्ञान जातें । अमुकसें ब्रह्म निश्चया येतें । म्हणसी साभिमानें माथां घेतें । हा उफाळे रसास्वादु ॥६२
तरी हा रसास्वादु त्रिपुटि असतां । निःशेष मावळेना तत्त्वतां । वस्तुतंत्र निजांगें होतां । तेव्हांचि मावळे ॥ ६४ ॥
तोंपर्यंत हा अभिमान । पाहिजे तरीच अज्ञान अखंड । कर्तृतंत्रत्वें अखंड अनुसंधान । एकतान असावें ॥६५॥
हे ध्येयध्यानरूप कर्तृतंत्रता । चिरकाळ राहे जरी स्थिरता । येणेंचि वस्तुतंत्र अभिन्नता । होय हळुहळू ॥६६॥
दृढ अपरोक्ष जाहलियावरी । कीं अगें निर्विकल्प निर्विकारी । हें विघ्न रसास्वादाचें निर्धारीं । मावळोनि जाय ६७
तों काल हा रसास्वादु । साभिमानरूप ब्रह्म आल्हादु । उपयोगीं वृत्तीचा छंदु । अन्य विघ्नें निवारी ॥ ६८ ॥
विक्षेपाची नरडी पिळी । लयाची खांदून काढी मुळी । कषायातें धरून आफळी । हा रसास्वादु ॥ ६९ ॥
तस्मात् हा जरी विघ्नकर । परी आरंभीं होतसे सुखकर । अन्य विघ्नांसी करी संहार । आणि ब्रह्मानंद वाढवी ॥७०॥
विघ्नत्रय निःशेष निमालें । वृत्तीसी ज्ञान जरी दृढ जाहलें । पुढें हें भिन्नत्वें विघ्न दिसलें । सुलीन नव्हे ह्मणोनी ॥७१॥
परी आधीं वृत्तीसी पुरतें । ज्ञान व्हावें ब्रह्मींचें ऐतें । पुढें आपेंआप रसास्वादातें । घात होय निर्विकल्पी ॥ ७२ ॥

---

अहंब्रह्मास्मीचा अभिमान नसला तर शून्यत्व होतें व हा अभिमान असला तर समाधीस विघ्न उत्पन्न होतें, तर आतां येथें कसें रहावें ? ती खूण स्वामी मला सांगा.

वृत्ति चिद्गगनीं पसरते व तदाकार होऊन विरते. मग जें उर्वरीत उरतें तेंच स्वप्रकाश आत्मस्वरूप. वृत्ती विरल्यावर लागलीच उठते व पुन्हा चिद्गगन व्यापून मावळते. ती मावळून जो दुसरी उठली नाहीं तोंपर्यंत त्यांत केवळ स्वरूप दाटतें. तूं म्हणशील कीं, वृत्ति मावळल्यावर स्वरूप निवळतें, तें वृत्तीला कसें कळेल ? वृत्ती उठून जेव्हां चिद्गगन व्यापतें तेव्हां तिला हें चिद्गगन असें कळते. जसें वृत्ती पदार्थ पाहूं लागली म्हणजे तिला हा अमुक पदार्थ आहे असें कळून ती लागलीच मावळते. तिचा असा स्वभाव आहे कीं, कळावें आणि मावळावें. म्हणून घटपटाचें अज्ञान निरसून मग जरी ती मावळून गेली तरी तिचें कळणें कायमच आहे. तशी वृत्ति चिद्गगनीं झेंपावली तेव्हांच तिला हें स्वस्वरूप असें कळलें. मग लागलीच जरी वितुळून गेली तरी अज्ञान उरलें नाहीं. हें मी चिद्गगन एकरस दंडायमान आहे असें वृत्तीस ज्ञान होतें व न कळणें नाहींसें होतें. वृत्ती व्यापतांच अज्ञान जातें व अमुक हें ब्रह्म आहे असा निश्चय होतो. हा निश्चय वृत्ती साभिमानानें धरते, म्हणून हा रसस्वादच आहे असें तूं म्हणशील, तर हा रसस्वाद जोंपर्यंत त्रिपुटि आहे तोंपर्यंत निशेष मावळत नाहीं. जेव्हां आपण निजांगें वस्तुतंत्र व्हावें तेव्हांच हा रसस्वाद मावळतो. तोंपर्यंत हा अभिमान असेल तरच अज्ञानखंडण होईल. करितां कर्तृतंत्रत्वानें अखंड अनुसंधान एकतान असावें हो ध्येयध्यानरूप कर्तृतंत्रता जर चिरकाळ स्थीर राहील तर इचेयोगानेंच हळुहळू वस्तुतंत्रअभिन्नता होईल. मी स्वतः निर्विकल्प निर्विकारी आहें असा दृढ अपरोक्ष झाल्यावर मग हें रसस्वादाचें विघ्न मावळून जातें. तोंपर्यंत हा रसस्वाद ब्रह्माल्हाद देणारा असा हा वृत्तीचा छंद अन्य विघ्न घालविण्याचे उपयोगीं आहे. हा लय, विक्षेप, कषाय या तीन विघ्नास निवारितो. हा आरंभीं सुखकर आहे व अन्य विघ्नें निरसून हा ब्रह्मानंद वाढवितो. तिन्ही विघ्नें निःशेष गेलीं व वृत्तीस दृढ ज्ञान झालें, मग हा सुलीन झाला नाहीं म्हणून भिन्नत्वानें रसस्वादाचें विघ्न दिसलें तरी तें अनहितकारक नव्हे. कारण वृत्तीस प्रथम ब्रह्मींचें पुरतें ज्ञान झालें पाहिजे, पुढें आपाप त्या रसस्वादाचा निर्विकल्पीं घात होतो.

अगा बापा हे रविदत्ता । जरी हे वृत्ति व्याप्ति होय उत्त्वतां । इसीच ब्रह्मविद्या नांव पाहतां । ठेविती ज्ञाते आणि वेद
हे ब्रह्मविद्या चिद्गगनीं अपार । पावोनि राहे तत्तदाकार । तरीच अज्ञानरूप अंधकार । फिटेल तत्क्षणीं ॥ ७४ ॥
येऱ्हवीं या ब्रह्मविद्येविण । जरी अभ्यासिलें समाधिसाधन । उगेंचि स्थिर केलें बुद्धि मन । तरी व्यर्थ जाय सर्व ७५
तिन्हीही विघ्नें निरसलीं । ब्रह्माकार वृत्ति जाहली । चिद्गगनाकारें एकरसली । हेचि ब्रह्मविद्या ॥ ७६ ॥
हे ब्रह्मविद्याचि अज्ञान नाशी । आणि आपणही उरेना आपैसी । पूर्ण ब्रह्म अखंडैकरसीं । मावळून जाय ॥७७॥
तस्मात् अज्ञान नासावया थोर । हे ब्रह्मविद्याचि ब्रह्माकार । अज्ञान नासूनियां समग्र । स्वयेंही नासे ॥ ७८ ॥
म्हणोनि अज्ञान नासावयापुरती । ज्ञाते वृत्ति व्याप्ति अपेक्षिती । परंतु जीव व्याप्ति न स्वीकारिती । प्रयोजनाभावीं
बाह्य पदार्थ घटादिक । तेथें वृत्ति होय घटरूपक । हा स्थूल उदर सान मुख । ऐसें ज्ञान करी ॥ ३४८० ॥
हे ज्ञान होतांचि अज्ञान । घटाचें नासून जाय संपूर्ण । परी त्या वृत्तीसी पाहिजे स्फुरण । जीवचैतन्याचे ॥ ८१ ॥
वृत्तीही असे परप्रकाशक । घट तो जड अप्रकाशक । म्हणोनि जीव स्फुरद्रूपक । पाहिजे उभयां ॥ ८२ ॥
तैसें नलगे ब्रह्माकारतेसी । वृत्तीच एक अज्ञान नाशी । जीव नलगे स्फुरवावयासी । ब्रह्म प्रकाशें प्रकाशित ॥ ८३ ॥
जैसें अंधारीं पदार्थ पहावया । अपेक्षिजे चक्षु दीपां उभयां । तैसें घटादि जड म्हणूनियां । जीव वृत्ति दोन्ही असावें
दीपचि नुसधा जरी पाहणें । तरी चक्षूच एक पुरें होणें । तैसें ब्रह्मतत्त्व जरी अवलोकनें । तरी वृतीच एक पुरे ॥८५
ब्रह्म स्वतां प्रकाशघन । तेणें चित्तवृत्ति प्रकाशमान । म्हणूनि नलगे जीवाचें स्फुरण । वृत्ति मात्र असावी ॥ ८६ ॥
तेही वृत्ति अज्ञान जोंवरी । अपेक्षिजे ब्रह्माकारी । निपटून अज्ञान जातां झडकरी । मावळे हा स्वभाव ॥ ८७ ॥
म्हणसी वृत्ति जोंवरी आहे । तोंवरी जीव ही प्रतिभासत्वें राहे । पाणी तेथें प्रतिबिंब लाहे । तरी अवधारीं ॥ ८८ ॥
जरी पाणियांतील प्रतिबिंब असे । परी तें छायेमाजीं विशेषें दिसे । तेंचि असोनियां समरसे । केवळ उष्णामाजीं ८९

---

रसस्वादरूपवृत्तिव्याप्तीस ज्ञाते आणि वेद ब्रह्मविद्या म्हणतात. ही ब्रह्मविद्या अपार चिद्गगनीं पावून तत्तदाकार होऊन राहते, तेव्हां लागलाच अज्ञानरूपी अंधःकार फिटतो हा अंधःकार ब्रह्मविद्येवाचून समाधिसाधन जरी अभ्यासिलें व तेणेंकरून बुद्धि मन स्थिर केलें तरी तें सर्व करणें व्यर्थ जाऊन तो तसाच शिल्लक रहातो.

**ब्रह्मविद्या**—विक्षेपलयकषाय हीं समाधीचीं तिन्ही विघ्नें निरसून वृत्ती ब्रह्माकार होते म्हणजे चिद्गगनाकारें एकरस होते तिलाच ब्रह्मविद्या म्हणतात.

वर सांगितलेली ब्रह्मविद्या, अज्ञान नासतें आणि आपण होऊन स्वतः उरतनाशी होते, म्हणजे ती पूर्ण ब्रह्म अखंडैकरशीं मावळून जाते; म्हणून अज्ञान नाहींसें करण्यास ही ब्रह्मविद्याच समर्थ आहे.

**वृत्तिव्याप्ति**—वृत्ती चिद्गगनाशीं समरसून नाहींशी होते तीस वृत्तिव्याप्ति म्हणतात.

अज्ञानाचा नाश करण्याकरितां ज्ञाते वृत्तीव्याप्तिची इच्छा करितात, जीवव्याप्तीचें प्रयोजन नाहीं म्हणून तिचा स्वीकार करीत नाहींत. घटादिक बाह्य पदार्थ पहात असतां वृत्ती घटरूप होते व हा मोठे पोटाचा लहान तोंडाचा घट आहे असें ज्ञान करते म्हणजे जाणतें. याप्रमाणें घटाचें ज्ञान झालें म्हणजे तत्संबंधीं अज्ञान नासतें; पण घटाचें अज्ञान नासून ज्ञान होण्यास जीवचैतन्याचें स्फुरण लागतें. कारण वृत्ती परप्रकाशक आहे, व घट जड अप्रकाशक आहे. म्हणून त्या दोघांस स्फुरद्रूप जीव पाहिजे, तसें ब्रह्माकारतेस जीवाचें कारण नाहीं. वृत्तीच आत्मप्रकाशानें अज्ञान नासते. जसें अंधारांतील पदार्थ पहाण्यास चक्षु आणि दीप या दोघांची अपेक्षा आहे, त्याप्रमाणें घटादिक जड आहेत म्हणून त्यांस पहाण्यास जीव आणि वृत्ती हीं दोन्ही पाहिजेत. आतां नुसता दीपच पहाणें असेल तर एका डोळ्यानेंच पहाणें होईल. तसें ब्रह्मतत्त्व पहाण्यास एक वृत्ती पुरे आहे. ब्रह्म स्वतः प्रकाशघन आहे, त्या योगानें चित्तवृत्ती प्रकाशमान होते, म्हणून जीवस्फुरणाची गरज नाहीं. एक वृत्ती मात्र पाहिजे. ती वृत्ती तरी अज्ञान आहे तोंपर्यंतच पाहिजे. अज्ञान गेल्यावर ती लागलीच आपण होऊनच मावळते.

**शंका**—वृत्ती जोंपर्यंत आहे तोंपर्यंत जीव प्रतिभासकत्वानें रहातो. जसें पाणी आहे तेथें प्रतिबिंब आहेच. त्याप्रमाणें वृत्ती आहे तोंपर्यंत जीवत्व आहेच.

**उत्तर**—पाण्यांत जें प्रतिबिंब पडतें तें सावलींत विशेषत्वानें दिसतें, पण तेंच प्रतिबिंब असून उन्हामुळें त्यांत समरसून जातें.

तैसा वृत्तीस्तव जीव आसिला । परी ब्रह्मप्रकाशीं लोपून गेला । ता प्रकाशीना ब्रह्माकारतेला । मग असे तरी कैसा९०
आणीकही एक परिहार असे । जीवत्वाचा अभावचि होतसे । पाणियांत बिंब बुडतां जैसें । प्रतिबिंब पडेना ॥ ९१ ॥
जोंवरी बिंब पाणियाहूनि वेगळें । तोंवरी प्रतिबिंब आहे ऐसें कळे । जरी सूर्य पाणी एकत्र मिसळे । तेव्हां प्रतिबिंब कैंचें
तैसी ब्रह्मस्वरूपाहूनि वेगळी । वृत्ति पडून विषय न्याहाळी । म्हणून आभास जीवाची झळझळी । उमटली वृत्तीमाजीं
ते वृत्ति ब्रह्माकार जाहली । बिंबात्मया मिसळूनि गेली । तरी जीवत्वाची कोठें उमटली । आभासता सांगा ॥ ९४ ॥
एवं जीवत्वाचा निःशेष अभाव । वृत्तिव्याप्तीचा मात्र गौरव । तेही नासूनि जाय स्वयमेव । अज्ञान नासूनी ॥ ९५ ॥
अमुक हें ब्रह्म ऐसें कळे । हेंचि ज्ञानवृत्तीसी निवळे । तेव्हांचि अज्ञान निःशेष मावळे । पुढें ज्ञातता उरे ॥ ९६ ॥
जैशी घटाकार वृत्ति जाहली । परी घटबुद्धि नाहीं उठली । तेचि आज्ञातता संचली । न कळणें घटाचें ॥ ९७ ॥
पुढें हा घट म्हणोनि कळला । तेव्हां नकळण्याचाभावनासला । ऐसें अज्ञानजातांचनाशवृत्तीला । तैसाचि भाव येथींचा
स्वरूपीं वृत्ति जेव्हां उद्भवली । तेव्हांचि ब्रह्मस्वरूपा विसरली । अन्य पदार्थचि पाहूं लागली । हेंचि न कळणें अज्ञान
प्रस्तुत आतां अभ्यासें करून । अंतर्बाह्य संधि साधून । तिन्हीही विघ्नें निरसून । ब्रह्मीं वृत्ति झेंपावली ॥ ३५०१ ॥
झेंपावतांचि पहिलें अज्ञान । कींजोंवरी जाहलें नव्हतें विवेचन । तेंस्वरूपचि भाविलें दृश्यत्वेंगगन । विचारिलेंनाहीं तों
तेंचि श्रवणमननें शोधिलें । ब्रह्म आकाश भिन्न निवाडिलें । यथार्थ ब्रह्मींचें लक्षण कळलें । तेव्हांसमाधिकाळीं पाहे२
सूक्ष्म पंचभूत जें आकाशीं । तें गाळून सांडिलें जडत्वेंसी । उर्वरित उरे जें अविनाशी । अभिन्नत्वें प्रतीतीस आणी ३
व्यापक परिपूर्ण चिद्‌गगन । जें त्रिधा परिच्छेदविहीन । आणि त्रिविधभेदशून्य । ऐसें कळे वृत्तीसी ॥ ४ ॥
स्वरूप एक नाहीं दुसरें । चिद्रूप ज्ञानघन निर्विकारें । दृष्टांतही नसे साचोकारें । निरूपम सहज ॥ ५ ॥
गगन होतें दृष्टांतीं दिधलें । तेंही शोधनें मिथ्या जाहलें । उर्वरित ऐक्यत्वा पावलें । आतां उपमा कैंची ॥ ६ ॥
चिद्रूप दुसरेंचि असेना । अर्थात् सजातीय भेदाची खंडना । जीवेश प्रतिबिंबें तींसत्यअसतीना । तरी सद्रूपा दुजाकोण

तसा वृत्तीमुळें जीव असला तरी तो ब्रह्मप्रकाशांत लोपून जातो. जो लोपून गेला तो ब्रह्माकारतेस कसा प्रकाशील ? तो प्रकाशित नाहीं म्हणून लोपून गेला असें म्हटलें. दुसरें पाण्यांत बिंब बुडालें असतां प्रतिबिंब पडत नाहीं. जोंपर्यंत बिंब पाण्याहून वेगळें आहे तोंपर्यंत प्रतिबिंब आहे असें दिसतें. पण सूर्य पाण्यांत मिसळला मग प्रतिबिंब कोठून पडेल ? तशी ब्रह्मस्वरूपाहून वृत्ती वेगळी पडून विषय न्याहाळते म्हणूनच आभासजीवाची झळझळ वृत्तींत उठते. पण तीच वृत्ती ब्रह्माकार झाली आणि बिंबात्म्यास मिसळून गेली, मग आभासकता जीवत्वाची कोठें उमटेल ? याप्रमाणें जीवत्वाचा निःशेष अभाव होऊन वृत्तिव्याप्ति मात्र असते. ती वृत्ती अज्ञान नासून आपण नाहींशी होते. अमुक हें ब्रह्म असें कळतें हेंच ज्ञान वृत्तीस निवळतें, तेव्हांच अज्ञान निरसतें, व पुढें ज्ञातता उरते. जशी घटाकार वृत्ति झाली परंतु घटबुद्धि उत्पन्न झाली नाहीं तेंच घटाचें नकळें तीच अज्ञानता. पुढें हा घट असें कळलें तेव्हां न कळण्याचा भाव गेला. जसें अज्ञान गेल्याबरोबर वृत्तीचा नाश होतो तसाच येथील भाव आहे.

स्वरुपीं वृत्ती जेव्हां उत्पन्न झाली तेव्हांच ती ब्रह्मस्वरूपास विसरली; आणि अन्य पदार्थ पाहूं लागली, हेंच न कळणें अज्ञान. प्रस्तुत आतां अभ्यासानें अंतर्बाह्य संधी साधून तिन्हीही विघ्नें निरसून ब्रह्मीं वृत्ती झेंपावली ती झेंपावतांच पहिलें अज्ञान उत्पन्न झालें कीं, स्वरूपच दृश्यत्वानें आहे, तें गगनाचा विचार न केल्यामुळें मानिलें. तेंच श्रवण मननानें शोधिलें, आणि ब्रह्म व आकाश भिन्न आहेत असें निवाडिलें. ब्रह्मींचें यथार्थ लक्षण कळलें तेव्हांच समाधीकाळीं त्या स्वरूपास पहातो. आकाशांत जीं सूक्ष्म पंचभूतें होतीं तीं जडत्वानें गाळून सांडिलीं मग जें उर्वरीत उरलें तें, अविनाशी ब्रह्म अभिन्नत्वानें प्रतितीस आणितो, तेव्हां त्यास व्यापक परिपूर्ण चिद्गगन जें त्रिधा परिछेदावांचून व त्रिविध भेदशून्य आहे असें वृत्तीस कळतें. स्वरूप एक नाहीं व दुसरेंही नाहीं असें चिद्रूप निर्विकार ज्ञानघन आहे; त्यास दृष्टांत देण्यासही दुसरा पदार्थ नाहीं. असें तें निरूपम सहज आहे. त्यास पूर्वीं गगनाचा दृष्टांत दिला होता. तें गगन शोधाचे अंतीं मिथ्या ठरलें व उर्वरीत जें उरलें तें ऐक्यत्वास पावलें. आतां उपमा कोणाची द्यावी ? चिद्रूप दुसरें असत नाहीं म्हणून सजातीय भेद लागत नाहीं. जीवेश प्रातिबिंबें खरीं नाहींत म्हणून सद्रूपास दुसरा कोणता पदार्थ उपमा देण्याजोगा आहे ?

जग जडत्वें होतें भाविलें । अथवा शून्यत्वें गगनसें कल्पिलें । तें तों विचारें नाहींसें जाहलें । आतां विजातीयभेद कैंचा
कांहीं अवयव असतीना । स्फुरणाची तरी मिथ्या लक्षणा । म्हणून स्वगत भेद आढळेना । एकरस चिद्गगन ॥ ९ ॥
सजातीय विजातीय । आणि स्वगत भेद जो होय । हे खंडिलिया चिद्गगन अद्वय । वृत्तीसी कळों आलें ॥ ३५,१० ॥
तें चिद्गगन अमुक देशीं असे । आणि दुजिया देशीं नसे । ऐसें नाहीं तें व्यापिलें असे । दशदिशा एकरूप ॥११ ॥
ऐसा देशतां जो परिच्छेद । हा तुटोनि गेला मानिला जो भेद । ओतप्रोत एकरस अभेद । परिपूर्ण कोंदलें ॥ १२ ॥
आतां समाधिकाळीं हें प्रगटलें । नातरी नाहींसें कधीं होतें जाहलें । संचलें होतें तेंचि अवलोकिलें । आतां सामान्यवृत्ती
अनंत युगें अनंत कल्प । होती जाती आपेआप । परी एकरूप सच्चिद्रूप । आदि अंतीं संचलें ॥ १४ ॥
आतां काळ परिच्छेद कोठें । पाहतां न पाहतां पूर्ण दाटे । पाहणाराचि मात्र उठोनि आटे । परी तें संचलें एकरूप १५
अमुक एक वस्तु उद्भवली । त्यांत चिद्रूपता नाहीं संचली । ऐसें नाहीं सर्वीं व्यापली । तेव्हां वस्तुपरिछेद नसे ॥ १६ ॥
एवं देशता कालता वस्तुता । भेद नाहीं स्वरूपीं तत्त्वता । ऐसें वृत्तीसी अखंडिता । ज्ञान हें ठसावें ॥ १७ ॥
वृत्ति उठतांचि पसरून वितुळे । परीअंतलागेना कीं केवढें सगळें । परी हेंचि ब्रह्म म्हणोनि कळे । जरीमावळे पुनःपुन्हां
एवं सजातीयादि भेदरहित । कीं त्रिधा परिच्छेदेंविण अखंडित । अथवा वृत्तीसी न लागे अंत । म्हणोनि अनंतपूर्ण१९
आणीकही सच्चिदानंदादि लक्षण । वृत्तीसीकळोंयेतीभिन्नभिन्न । हेंपुढीलश्लोकीं असेनिरूपण । येथेंकळतीम्हणूनबोलिलें
ऐसें सच्चिदानंद अनंत । चिद्गगन परिपूर्ण सदोदित । सामान्य वृत्तीसी जेव्हां कळत । तत्क्षणीं अज्ञान नासे ॥ २१॥
अधोमुख जो वृत्तीचा ओघ । मनादि विषयांत होता अमोघ । तेव्हां हाचि सत्य होता संघ । स्वरूपज्ञान नव्हतें ॥२२॥

---

जग जडत्वानें भाविलेलें होतें अथवा शून्यत्वानें गगन अशी कल्पना केली होती ते विचारानें नाहींसें झालें. तेव्हां विजातीय भेद कसा उरेल? स्वरूपास कांहीं अवयव नाहींत व आपण स्फुरण म्हणतों ही मिथ्या कल्पना आहे, म्हणून स्वरूपाचे ठायीं स्वगतभेद लागत नाहीं. याप्रमाणें तिन्ही भेद खांडिलें, तेव्हां वृत्तीस चिद्गगन कळूं लागलें. तें चिद्गगन अमुक देशांत आहे आणि त्याखेरीज दुसऱ्या देशीं नाहीं असें नाहीं. तर तें दशदिशा व्यापून आहे. तेव्हां देशतापरिच्छेद हा, मानिलेला भेद तुटून गेला तेव्हां अभेद एकरस परब्रह्म कोंदलें. तें परब्रह्म आतां समाधिकाळीं प्रगटलें, त्याचे अगोदर तें नाहींसें झालें होतें असें नाहीं. तर संचलेलें जें होतें तेंच आतां सामान्य वृत्तीनें अवलोकिलें. अनंत युगें, अनंत कल्प आपाप होतात जातात. पण एक रूप, सच्चिद्रूप आदि अंतीं संचलेलें आहे. म्हणून कोणी पाहो अथवा न पाहो त्यास काळपरिच्छेद नाहीं. पहाणारा मात्र उत्पन्न होतो व लय पावतो. तें जशाचें तसें एकरूप संचलेलें आहे. अमुक एक वस्तु उद्भवली त्यांत चिद्रूपता संचलेली नाहीं असें नाहीं. ती सर्वांस व्यापून आहे म्हणून ब्रह्मास वस्तु परिच्छेद नाहीं. याप्रमाणें देशता, कालता, वस्तुता, स्वरूपीं भेद नाहीं. असें अखंडित ज्ञान, वृत्तीस ठसावें. वृत्ती उठतांच पसरून वितुळते, पण तिला स्वरूप केवढें सगळें आहे त्याचा अंत लागत नाहीं. तरी, हें ब्रह्म, म्हणून कळतें व पुढें वृत्ती मावळते. याप्रमाणें पुन्हा पुन्हा कळते व पुन्हा पुन्हा वृत्ती मावळते. याप्रमाणें सजातीयादि भेदरहित किंवा त्रिधा परिच्छेदरहित अथवा अनंत, व सच्चिदानंदरूप स्वरूप आहे, असें वृत्तीस कळतें व असें स्वरूपाचें लक्षण सामान्य वृत्तीस कळलें म्हणजे अज्ञान नासतें.

**सजातीय भेद**–एकासारखी दुसरी वस्तु असली तर तो सजातीय भेद.

**विजातीय भेद**–एका पदार्थाहून दुसऱ्या जातीची निराळी वस्तु असणें हा त्या वस्तूच्या जातीशीं विजातीय भेद आहे असें म्हणतात.

**स्वगत भेद**–एका वस्तूंत दुसरी वस्तु मोडते म्हणजे ती तिचा भाग आहे असें ठरतें हा स्वगत भेद.

**काल परिच्छेद**–एक वस्तु सर्व काळीं टिकत नाहीं हा काल परीच्छेद.

**देश परिच्छेद**–एक वस्तु जी एकदेशीं आहे ती सर्व देशीं नसली तर तो देश परिच्छेद समजावा.

**वस्तु परिच्छेद**–एक वस्तु कांहीं वस्तूंस व्यापून आहे, ती सर्व वस्तूंस व्यापून नसली तर तो वस्तु परिच्छेद समजावा.

वृत्तीचा अधोमुख वोघ होता म्हणजे ती मनादि विषयांत वापरत होती तेव्हां तिला स्वरूप ज्ञान नव्हतें. म्हणून हा बत्तीस तत्वांचा समुदाय खरा वाटत होता. तोच

तेचि अभ्यासें विकल्पादिक । सांडिलें मन बुद्ध्यादि अनेक । एकलें सामान्यवृत्तीचे कौतुक ।उरलेंतेंब्रह्माकार जाहलें२३
अधोमुख तें ऊर्ध्व जाहलें। वृत्तीचें मुख ब्रह्मीं पसरलें । तेव्हां हेंचि ब्रह्म म्हणोनि कळलें । बोलिल्या क्षणीं ॥ २४ ॥
पहिलें ओतप्रोत जें अखंड । वृत्तीसी ठाउकें नव्हतें उदंड । माया अविद्येचेंचि माजलें बंड । हेंचि अज्ञान दृढ होतें
तेचि वृत्ति हे अधोमुखता । सांडोनि परतलीसे तत्त्वता । चिद्गगनाकार होत्साता । ज्ञान होतें जाहलें ॥ २६ ॥
तेव्हां न कळणें गेलें वृत्तीचें । हें मी ब्रह्म म्हणून कळे साचें । इतुकेंचि काज वृत्ति व्याप्तीचें । जीवाचे अभावीं ॥ २७
ऐसी वृत्तीसी ब्रह्माकारता । होऊन वितुळे परी मागुता । होत असे तदाकारता । हेचि ब्रह्मविद्या ॥ २८ ॥
मग त्या वृत्तीसी फुंज दाटे । आश्चर्यवत मानीतसे नेटें । म्हणे हें एवढें स्वस्वरूप घनदाटे ।असतांविसरलेंहोतें कीं२९
आतां अनंत जन्मींचें सुकृत । एकाएकीं वाढलें अद्भुत । ब्रह्मज्ञान जाहलें ओतप्रोत । नें चिद्गगन अपार ॥३५३०॥
ऐसा फुंज दाटतां वृत्ती । विकल्पाची होय उत्पत्ति । जरी तदाकारता जाहली मागुती । तरी उफाळे विकल्प ॥३१।
मी ब्रह्माकार जाहलों स्वतः । ऐशीच उठो लागे अहंता । हाचि रसास्वादु तत्वतां । उठतां समाधि भंगे ॥ ३२ ॥
म्हणोनि रसस्वादु विघ्नकर । लीन वृत्ति जे ब्रह्माकार । उसळून होतसे विकल्पाकार । अहंब्रह्म साभिमाने ॥ ३३ ॥
येथें साधकें एक करावें।तदाकारतेसी न सोडावें । उसळतांची पुनःपुन्हां जिरवावें । न द्यावें विकल्पा हातीं ॥ ३४ ॥
वृत्ति उठतां चिद्गगनीं । पसरून मावळे तत्क्षणीं । तया मावळणियाचे साक्षपणीं । सहजत्वें असावें ॥ ३५
वृत्ति उठो कीं पसरो सहज । परी तयेसी नाहीं काज । साक्षित्व साक्षित्वाचिये शेज । पासून न चळावें ॥ ३६ ॥
वृत्ति उठे पसरे मावळे । ते जयाच्या साक्षीनें कळे । तें कळणें कळणियासी निवळे । तेंचि लक्षावें एकरूप ॥ ३७ ॥
तरीच वृत्ति विकल्पाकडे । साभिमानें न पवाडे । साक्षीमाजींच उठे बुडे । सुलीनता तदाकार ॥ ३८ ॥
हे तदाकारता चिद्गगनगोचर । वृत्ति राहे सामान्यत्वें स्थिर । जरी अहंब्रह्मास्मि सूक्ष्म उद्गार । परी विकल्पाकडे न ये
त्रिपुटी रूप ध्येय ध्यान । ध्याता ध्येयीं समरस होणें । ध्येयाकारें वृत्तीचें स्थिरपण । ध्याता आपण नुठे जरी ४०

---

विकल्पादिसमुदाय अभ्यासानें सांडिला, तेव्हां वर सांगितलेलीं जीं लक्षणें त्या लक्षणांनीं युक्त जें ब्रह्म तें एकटी उरलेली जी सामान्य वृत्ती ती तदाकार ब्रह्माकार झाली, अधोमुख वहात होती ती उर्ध्वमुख झाली, म्हणजे ती ब्रह्माकडे पहाण्यास वळली तेव्हां त कळलें. वृत्तीस कळण्याचे अगोदर ओतप्रोत अखंड ब्रह्म भरलेलें होतें. तें केवढें आहे हें वृत्तीस ठाउकें नव्हतें. त्या वेळेस माया अविद्येचेंच बंड माजलें होतें. हेंच दृढ अज्ञान, हें वृत्तीचें न कळणेंरूप अज्ञान वृत्ती अधोमुख व्हावयाची राहून ऊर्ध्वमुख वाहूं लागून चिद्गनाकार झाली तेव्हां ज्ञानाचे योगानें तें गेलें. इतकेंच जीवाचे अभावीं म्हणजे जीवपण न स्फुरतां एकट्या वृत्तीव्याप्तिचें काम आहे. याप्रमाणें वृत्ती तदाकार होऊन वितुळते, व पुन्हा तदाकार होते, हीस ब्रह्मविद्या म्हणतात. वृत्ती तदाकार होऊन वितुळली. याप्रमाणें तिनें ब्रह्माचा अनुभव घेतला; म्हणून तिला अभिमान येतो व ती मोठें आश्चर्य मानिते आणि म्हणते कीं, एवढें मोठें स्वस्वरूप घनदाट असतां मी कशी विसरलें. जें स्वरूप विसरलें तेंच अनंत जन्मींच्या पुण्याईमुळें आतां ब्रह्मज्ञान झालें व ओतप्रोत चिद्गगन कळलें, असा वृत्तीस गर्व उत्पन्न झाल्यामुळें विकल्प उत्पन्न होतो. याप्रमाणें विकल्प उठला म्हणजे मग जरी वृत्ती चिद्गगनाकार झाली तरी विकल्प उठल्यावांचून रहात नाहीं. मी स्वतः ब्रह्माकार झालों असा अभिमान उठतो हाच रसस्वाद. हा रसस्वाद उठला असतां समाधि भंगते. म्हणून समाधी घेत असतां हा रसस्वाद विघ्नकर्ता होतो.

रसस्वादरूप विघ्न टळण्यास उपाय हा कीं, साधकानें तदाकारतेस सोडूं नये. वृत्ती तदाकारतेपासून उत्थान पावली तर पुन्हा पुन्हा जिरवावी. तीस विकल्पाकडे येऊं देऊं नये. वृत्ती उठली म्हणजे ती चिद्गगनीं पसरते व लागलीच मावळते. त्या मावळण्याचे साक्षित्वानें सहजत्वें असावें. वृत्ती उठो किंवा पसरो तिची गरज नाहीं. पण आपण मात्र साक्षित्व सोडूं नये. वृत्ती उठते पसरते व मावळते हें ज्याचे साक्षित्वानें कळतें, तें कळणें, कळण्यासच निवळतें. तेंच एकरूप लक्षावें मग वृत्ती साभिमानें विकल्पाकडे येत नाहीं. तर सुलीन होऊन साक्षींत उठते व बुडते. याप्रमाणें ती तदाकार होऊन रहाते. ही तदाकारता चिद्गगनगोचर आहे, वृत्ती सामान्यत्वें स्थीर रहाते, तिचा अहंब्रह्मास्मी हा सूक्ष्म उद्गार असला तरी ती विकल्पाकडे येत नाहीं म्हणून त्रिपुटीरूप ध्येय, ध्यान, ध्याता, ध्येयीं समरस होणें अवश्य आहे. ध्याता जर आपण उठला नाहीं तर ध्येयाकारें वृत्तीचें स्थीरत्व होतें.

ह्याचि अभ्यास क्षणक्षण । वाढवावा अभ्यासेंकडून । हलुहळू ध्याता ध्यान त्यागून । ध्येयीं समरसावें ॥ ४१ ॥
ध्याता होतां ध्येयाकार । साभिमानाचा नुठे उद्गार । सहजीं उरे चिद्गगनाकार । सामान्यत्वें वृत्ति ॥ ४२ ॥
तें ब्रह्मसुख तरी तसे । परी विकल्प किमपि नुमसे । हाही रसास्वादु परंतु असे । तदाकार होऊनी ॥ ४३ ॥
रसास्वादाचीं लक्षणें दोन । एक सामान्य विशेषण । विशेषें होतसे समाधि उत्थान । लीन राहे सामान्यत्वें ॥४४॥
तस्मात् ब्रह्मसुख तरी ध्यावें । परी विकल्पाकडे न यावें । मुख्य ध्येयाकारत्वें असावें । ध्यात्या उजू न येतां ॥ ४५ ॥
ध्यात्याकडे जरी वृत्ति । येतांचि साभिमान उसळे वरुती । विकल्पाकार होऊन समाप्ति । सुखाकार तेची होय ॥ ४६
म्हणोनि ध्याता नावलंबावा । ध्येयाकारता सहज स्वभावा । तरीच रसास्वादाचा नुठावा । विशेषें विकार ॥ ४७ ॥
सामान्यत्वें जो रसास्वादु । उरे ध्येयाकार वृत्त्यानंदु । हा जों काल त्रिपुटीचा भेदु । तोंवरी सामान्यत्वें उरे ॥ ४८ ॥
जेव्हां निजांगें ब्रह्म होऊनी । दृढ अपरोक्ष वस्तुतंत्रपणीं । सहजत्वें उरे समाधानीं । तेव्हांचि त्रिपुटी भंगे ॥ ४९ ॥
त्रिपुटि भंगतां रसास्वादु भंगे । तोंवरी सामान्यत्वें असे अंगें । परी विशेषाकारें नुमगे । म्हणोनि विघ्नकर नव्हे ॥ ५०॥
तस्मात् साधके ध्येयाकारता । सामान्यत्वें रमावें तत्त्वतां । ध्यान आणि नावलंबावा ध्याता । तरी विशेषत्वें मोडे ५१
होचि ब्रह्मविद्या वृत्तिव्याप्ति । अज्ञानाची करी समाप्ति । शीघ्र मेळवी दृढ अपरोक्षाप्रति । वस्तुतंत्र समाधाना ॥ ५२ ॥
होचि ब्रह्मविद्या सदोदित । सेविती साधक मुनि संत । जयेच्या योगें अति त्वरित । सुटती संसारांतूनी ॥ ५३ ॥
तस्मात् रविदत्ता ब्रह्मविद्या हे । तुज निरोपिली यथार्थ पाहें । या अभ्यासें पावें लवलाहें । दृढ अपरोक्ष ज्ञाना ॥ ५४
हे सामान्यवृत्ति जे सुखकर । उगीच राहे चिद्गगनाकार । हाचि बापा असे प्रकार । वासनानंदाचा ॥ ५५ ॥
जो जागृतीचिये समाप्ती । सुषुप्तीही नव्हे पुरती । ते समयीं ब्रह्मानंदाची प्राप्ति । वृत्तीसी होय ॥ ५६ ॥
बुद्धिमनःशेष मावळलें । वृत्तीनें माघारां अवलोकिलें । ते समयीं ब्रह्मानंदाचें पडिलें । प्रतिबिंब वृत्तीमाजीं ॥ ५७ ॥
सहजत्वें सुखाची लहर । झाक येतसे आनंदाकार । तेव्हां वासना सुखी सुखाकार । या नांव वासनानंद ॥ ५८ ॥

---

हाच अभ्यास वारंवार अभ्यासानें वाढवावा आणि हळुहळू ध्याता ध्यान त्यागून ध्येयीं समरसावें. ध्याता ध्येयाकार झाला म्हणजे साभिमानाचा उद्गारच होत नाहीं, तर सामान्यवृत्ति सहजीसहज चिद्गगनाकार उरते. ती वृत्ति ब्रह्मसुख घेतें, पण तेथें विकल्प उत्पन्न होत नाहीं. वृत्ति ब्रह्मसुख घेतें हाही रसस्वादच. परंतु ती तपाकार होऊन असते. रसस्वाद दोन प्रकारचा आहे. एक सामान्य व दुसरा विशेष. सामान्य रसस्वाद सामान्यत्वें लीन रहातो आणि विशेष रसस्वाद समाधी उत्थान करितो. करितां ब्रह्मसुख ध्यावें, पण विकल्पाकडे येऊं नये. तर मुख्य ध्येयाकारत्वानें ध्यात्याचे समोर न येतां म्हणजे आपण ध्याता न होतां असावें. वृत्ति जर ध्यात्याकडे येईल तर साभिमान उत्पन्न होईल. साभिमान उत्पन्न झाला असतां वृत्ति विकल्पाकार होऊन सुखाकारतेची समाप्ती होईल. म्हणून ध्यात्यास अवलंबूं नये. मग ध्येयाकारता सहज राहील. ध्येयाकारता राहिल्यानें विशेषत्वानें होणारा रसस्वादाचा विकार उठणार नाहीं. सामान्यत्वें जो रसस्वाद जो ध्येयाकारें वृत्त्यानंद उरतो, हा जोंपर्यंत त्रिपुटीचा भेद आहे तोंपर्यंतच सामान्यत्वानें उरतो. जेव्हां स्वतः ब्रह्म होऊन वस्तुतंत्रपणें दृढ अपरोक्ष समाधानीं सहजत्वें उरेल तेव्हांच त्रिपुटी भंगेल. त्रिपुटी भंगली असतां रसस्वाद भंगतो. त्रिपुटी भंगेपर्यंत रसस्वाद सामान्यत्वें रहातो विशेषाकारें रहात नाहीं म्हणून तो विघ्नकर्ता नाहीं. जो विघ्नकर्ता विशेषाकारें रसस्वाद आहे तो मोडावा असें असेल तर साधकानें ध्यान आणि ध्याता यांस न अवलंबितां सामान्यत्वें ध्येयाकारतेंत रमावें. हीच वृत्तिव्याप्ति ब्रह्मविद्या होय. ही अज्ञान घालविते आणि शीघ्रच दृढ अपरोक्ष समाधानास वस्तुतंत्रपणें मिळविते. ही ब्रह्मविद्या साधक, मुनी, संत सदोदीत सेवितात व इचे योगानें त्वरीत संसारापासून सुटतात, म्हणून ही ब्रह्मविद्या हे रविदत्ता, तुला मीं सांगितली. या विद्येच्या अभ्यासानें तूं दृढ अपरोक्ष ज्ञानास पाव.

उगीच चिद्गगनाकार होऊन सुखकर रहाणारी सामान्यवृत्ति हाच वासनानंदाचा प्रकार आहे. जागृति संपली पण झोंप पुरती लागली नाहीं अशा वेळीं वृत्तीस ब्रह्मानंदाची प्राप्ति होते. बुद्धि, मन हीं निःशेष मावळलीं आणि वृत्ति मागें पाहूं लागली, त्यावेळीं वृत्तीमध्यें ब्रह्मानंदाचें प्रतिबिंब पडलें. मग सहजत्वें सुखाची लहर आली तिची आनंदाकार झांक येते, तेव्हां वासना सुखाकार होऊन सुखी होते, म्हणून त्यास वासनानंद म्हणतात.

पुढें गाढ जेव्हां झोंपें लागतां । नुसधा ब्रह्मानंद उरे तत्वतां । तो वृत्तीसी न ये अनुभवितां । असे केवळपणें ॥ ५९ ॥
तोचि वासनानंद कोणी । बळें उठवितां निजेल्यालागूनी । प्रगटे मागुती झोंप उल्लंघोनी । पुरता जागा नव्हे तों ६०॥
एवं सुप्तीचिया आदिअंतीं । वासनानंदाची प्रतीति । असे सर्वही जनांप्रति । साधनेंहीविण ॥ ६१ ॥
तोचि वासनानंद उगेपणीं । गुणाचे विकार नसती जये स्थानीं । जे मांगा सांगितलें निरूपणीं । तयाचिये परी ॥६२॥
तोचि आतां समाधि अभ्यासें । विकल्पाचें मोडतां पिसें । वृत्तिव्याप्ति तदाकारें होतसे । प्रतीति साधका ॥ ६३ ॥
येथेंही मनबुद्धि परततां । सामान्यवृत्ति ब्रह्माकार होतां । तया वृत्तीचिया आंतौता । प्रतिबिंबे आनंद ॥ ६४ ॥
वृत्ति उठोनि जेव्हां पसरे । तेव्हांचि वासनानंद आविष्करे । सामान्यता सुख सुखीं थावरे । तेणें सुखावे वृत्ति ॥ ६५॥
तें सुख म्हणून उद्गार न होतां । उगी स्तब्धपणें तदाकारता । तोचि वासनानंद तत्त्वतां । प्रतिबिंब ब्रह्मानंदाचें ॥६६
येथें कोणी शंका करिती । कीं इतुकें अभ्यासें साधितां स्थिति । नव्हेचि ब्रह्मानंदाची प्राप्ति । प्राप्त तो वासनानंद ६७
तरी मग कासया अभ्यास करावा । कासया विकल्पही मोडावा । मुख्यानंदचि प्राप्त न व्हावा । काय होतें वासनानंदें
याचें उत्तर सावधपणें । ऐकावें साधकें आदरानें । अभ्यासें वासनानंद दृढ होणें । तरी ब्रह्मानंद समीप ॥ ६९ ॥
स्फुरण उठतां कीं पसरतां । लय होय कीं उठे मागुता । परी तें द्रष्ट्याचे दृष्टीसी तत्त्वतां । टळटळीत दिसावें ॥३५७०
जेवीं हातींचिया कांकणा आरसा । पहावया नलगे सहसा । इतुका टळटळीत स्फूर्तीचा ठसा । प्रतीतीस यावा ॥७१॥
सहज वृत्ति उठतां पहावी । पसरून मावळता दिसावी । इतुकी अभ्यासें वृत्ति खलावी । तरीच अभ्यास सफळ ॥ ७२॥
ऐसा अभ्यास दृढतर व्हावा । जैसा कां दरवाजियाचा दिवा । आंतून कीं बाहेरून पहावा । कांहीं श्रम न लागतां ७३
तैसा वासनानंद टळटळीत । अनुभवा यावा साधनाविरहित । तरी मग ब्रह्मानंद व्हावया प्राप्त । विलंब नलगे ॥ ७४॥
जैसा सुप्ति आरंभीं मध्यस्थानीं । वासनानंदाची प्राप्ति होवोनी । वृत्ति मिळे ब्रह्मानंदीं पूर्णी । अभ्यासेंवीण सहज ७५
तोचि वृत्ति निपटून मावळे । वासनानंदही एकत्र मिळे । तेचि ब्रह्मानंदाचे सोहळे । आपेआप सर्व जना ॥ ७६ ॥
तैसा अभ्यासें वासनानंदाचा । अनुभव जाहला असे साचा । ध्येय ध्याता ध्यान या त्रिपुटीचा । विकार असे ॥ ७७॥

---

वासनानंदाचा अनुभव घेत असतां पुढें जेव्हां गाढ झोंप लागते तेव्हां नुसता ब्रह्मानंद उरतो. तो वृत्तीस अनुभवितां येत नाहीं. झोंपेंतून कोणीं उठविलें तर पुरती झोंप सरून पुरता जागा जों झाला नाहीं तों तेथें वासनानंद प्रगटतो. याप्रमाणें झोंपेच्या आदिअंतीं वासनानंदाची प्रतीति सर्व जगास साधनावांचून आहे. तोच वासनानंद जेथें गुणाचे विकार नाहींत अशा उगेपणीं आहे. तोच आतां समाधि-अभ्यासानें विकल्पाचें बंड मोडून तदाकारें वृत्तिव्याप्ति झाली असतां साधकाचे प्रतीतीस येतो. येथेंही मन बुद्धीहून परतून सामान्यवृत्ति ब्रह्माकार होत असतां त्या सामान्यवृत्तींत आनंद प्रतिबिंबतो. वृत्ति जेव्हां उठून पसरते, तेव्हांच वासनानंद आविष्करतो, आणि सामान्यता सुख सुखीं स्थीर होतें; त्या योगानें वृत्ति सुखावते. तें सुख आहे, असा उद्गार न होतां उगीच स्तब्धपणें तदाकारता होते. तेंच ब्रह्मानंदाचें प्रतिबिंब वासनानंद आहे.

शंका—अभ्यासानें इतकी स्थिति साधिली असतां ब्रह्मानंदाची प्राप्ति होत नाहीं, वासनानंदाचीच प्राप्ति होते. मग अभ्यास तरी कशाला करावा ? विकल्प तरी कशाला मोडावा ? जर मुख्यानंदाची प्राप्ति होत नाहीं, तर वासनानंदाचा तरी काय उपयोग ? त्यानें काय होणार आहे ?

उत्तर—अभ्यासानें वासनानंद जर दृढ झाला तर ब्रह्मानंद जवळच आहे असें समजावें. स्फुरण उठलें असतां व पसरलें असतां, लय पावलें असतां किंवा पुनः उठलें असतां तें द्रष्ट्याचे दृष्टीस टळटळीत आलें पाहिजे व दिसूं लागलें पाहिजे. जसा हातच्या कांकणास आरसा पहावयास लागत नाहीं, इतका टळटळीत स्फूर्तीचा ठसा प्रतीतीस यावा. सहज वृत्ति उठतां पहावी. ती पसरून मावळत असतांही दिसावी. इतकी अभ्यासानें वृत्ति खलली तरच अभ्यास सफल झाला असें समजावें. जसा दरवाजांतील दिवा कांहीं श्रम न पडतां आंतून बाहेरून पहातां येतो, तसा अभ्यास दृढतर व्हावा आणि त्या योगानें वासनानंद साधनावांचून टळटळीत अनुभवास यावा; मग ब्रह्मानंद प्राप्त होण्यास अवकाश लागणार नाहीं. जसा झोंपेचे आरंभीं वासनानंद असतो तोच अभ्यासावांचून झोंपेंत आपण ब्रह्मानंद होतो, तेव्हां तेथें वृत्ति रहात नाहीं व वासनानंदही निराळा रहात नाहीं, तर अवघा ब्रह्मानंदच असतो. त्याचा अनुभव सर्व जनास आहे. तसा अभ्यासानें जो वासनानंदाचा खरा अनुभव झाला असेल, तेथें ध्येय, ध्याता, ध्यान या त्रिपुटीचा विकार आहे.

अंतःकरण वृत्ति अवच्छिन्न । चैतन्यसाक्षी हा ध्याता आपण । पाहतसे ओतप्रोत चिद्‌गगन । हेंचि ध्येय संचलें ७८
या ध्येयाचें सुख तेणें । घेऊनियां सुखाकार होणें । ऐशिये त्रिपुटीचे वेगळेपणें । म्हणावा वासनानंद ॥ ७९ ॥
तेचि ध्याता ध्यान मावळूनी । ध्येय मात्र चिद्‌गगन पूर्णपणीं । उर्वरित उरे स्वानुभवावांचोनी । तोचि ब्रह्मानंद ३५८०
तो ब्रह्मानंद प्राप्त व्हावया । पुससी साधन शिष्यराया । तरी तो सहसा विचारावांचोनियां । अभ्यासें प्राप्त नव्हे ॥८१
अभ्यासाचें इतुकेंचि कार्य । वासनानंदचि प्राप्त होय । पुढें अभ्यासाचा उपाय । ब्रह्मानंदासी नचले ॥ ८२ ॥
तस्मात् वासनानंद वृत्तिव्याप्ति । जे विस्तारें निरोपिली अति । ययाची टळटळीत व्हावी प्रतीति । अभ्यासेंकडोनी ८३
इतुकें अभ्यासें दृढ जाहलिया । विचारही होय साधका तया । जेवीं शाखेचा पल्लव त्यागोनियां । चंद्र लक्षी सहज ८४
वासनानंद वृत्तिव्याप्ति । जे ब्रह्मविद्या नांवें म्हणती । इतुकी शाखा जाणावी निश्चितीं । ब्रह्मानंद तो चंद्र ॥ ८५ ॥
चंद्र जैसा जयाचा तेणें । शाखा त्यागुनियां पाहणें । तैसा ब्रह्मानंद विचारें पावणें । त्रिपुटीरहित साधकें ॥ ८६ ॥
असो जो ब्रह्मानंद परिपूर्ण । याचें पुढील श्लोकीं निरूपण । आणि विचारही कैसा तें विवरण । यथार्थ होईल ८७
या श्लोकीं इतुकें केलें । अभ्यासासी स्पष्ट दाविलें । चारी विघ्नांतेंही निरसिलें । विक्षेपलयादि ॥ ८८ ॥
तस्मात् साधकें ययाऐसा । वृत्तिव्याप्तीचा अभ्यास जैसा । क्षणक्षणां वाढवूनि सहसा । रोधावा विकल्प ॥ ८९ ॥
ब्रह्मानुभवाची आकांक्षा जया । तेणें प्रवर्तावें या उपाया । हा अभ्यास अति यत्नेंकडोनियां । क्रमेंचि अभ्यासावा ९०
अंतर्बाह्य संधि साधून । चारीही विघ्नें निरसून । स्वानुभवें पहावें चिद्‌गगन । स्फूर्तीसहित ॥ ९१ ॥
सामान्यवृत्तीनें चिद्गगन ध्यावें । चिद्‌गगनामाजीं स्फूर्तीतें पहावें । इतुकें अनुसंधान वाढवावें । क्षणक्षणीं अधिक॥९२
गगनामाजीं वायूची झुळूक । कीं वायुयोगें व्यापे गगन एक । तैसें वृत्तीनें चिद्‌गगन कौतुक । कीं चिद्‌गगनीं वृत्ति
येथवरी अभ्यासें पायवाट । विषयापासून व्हावी नीट । पुढें त्रिपुटीविरहित जें घनदाट । तेणेंसी अभिन्न होणें ९४
तरी अभ्यास त्यागून विचारद्वारा । पावावें अपरोक्ष साक्षात्कारा । अनुभवेंविण अनुभाव्य निर्धारा । वस्तुतंत्र विज्ञाना

---

अंतःकरण वृत्ति, अवच्छिन्न चैतन्य, साक्षी हा ध्याता आपण ओतप्रोत चिद्गगन पहात आहे. हेंच ध्येय संचलेलें आहे. या ध्येयाचें सुख ध्यात्यानें घेऊन सुखाकार व्हावें. अशा त्रिपुटीच्या वेगळेपणानें जो होणारा आनंद तो वासनानंद. तोच ध्याता आणि ध्यान हीं मावळलीं आणि ध्येय मात्र चिद्गगन पूर्णपणीं स्वानुभवावांचून जें उर्वरीत उरतें तोच ब्रह्मानंद. हा ब्रह्मानंद प्राप्त होण्यास शिष्या, तूं साधन विचारितोस, तरी हा विचारावांचून नुसत्या अभ्यासानें प्राप्त व्हावयाचा नाहीं. अभ्यासानें इतकेंच होतें कीं, वासनानंदाची प्राप्ति होते. ब्रह्मानंद अभ्यासानें प्राप्त होत नाहीं. त्यास विचारच पाहिजे. पण हा विचार होऊन ब्रह्मानंद प्राप्त होण्यास वासनानंदरूप वृत्तिव्याप्ति वर सांगितली तिचा अभ्यासानें अनुभव टळटळीत आला पाहिजे. तो अनुभव दृढ अभ्यासानें झाला म्हणजे मग साधकास जसा शाखेचा पल्लव टाकून चंद्र लक्षितो, त्याप्रमाणें साधकास विचार होऊन वासनानंद वृत्तिव्याप्ति जी ब्रह्मविद्या हीच शाखा. ही टाकून ब्रह्मानंदरूप चंद्र तो साधक पहातो. चंद्र जसा शाखा टाकून ज्याचा त्यानें पहावयाचा, तसा विचारानें साधकास त्रिपुटीरहित ब्रह्मानंद पहावा व त्यास पावावें. ब्रह्मानंदाचे पुढल्या श्लोकीं निरूपण केलें आहे व विचार कोणास म्हणावें याचेंही विवेचन केलेलें आहे. या श्लोकांत इतकेंच केलें कीं, अभ्यास स्पष्ट दाखविला व समाधी अभ्यासास येणारीं चार विघ्नें याचा निरास केला. आतां जो अभ्यास सांगितला तो वृत्तिव्याप्तीचा अभ्यास करून विकल्प रोधावा. ज्याला ब्रह्मानुभवाची इच्छा असेल त्यानें या उपायास प्रवर्तावें, आणि हा अभ्यास अतिप्रयत्नानें क्रमानेंच अभ्यासावा. अंतर्बाह्य संधी साधून चारीही विघ्नें निरसून स्वानुभवानें स्फूर्तीसहित चिद्‌गगन पहावें. सामान्य वृत्तीनें चिद्‌गगन ध्यावें. चिद्‌गगनांत स्फूर्तीस पहावें. इतकें क्षणक्षण अधिक अनुसंधान वाढवावें.

आकाशामध्यें वाऱ्याची झुळूक किंवा वाऱ्याचे योगानें आकाश व्यापतें तसें वृत्तीनें चिद्गगन किंवा चिद्‌गगनांत वृति व्यापून आहे. विषयापासून येथपर्यंत अभ्यासानें पायवाट व्हावी. मग त्रिपुटिरहित जें परब्रह्म त्याशीं अभिन्न व्हावें. तें होण्याकरितां पुढें अभ्यास टाकून विचारद्वारा अनुभवावांचून अनुभाव्य वस्तुतंत्र. विज्ञान, अपरोक्षसाक्षात्कार त्यास पावावें.

तेंचि आतां एका श्लोकीं । विचारें ऐक्यता व्हावी निकी । तरी तेंचि निवडावें साधकीं । जीव आणि ब्रह्मात्मा ९६
ब्रह्मात्मा तोचि निर्विकल्प । जीव तोचि विकारी सविकल्प । या दोहींचें जेथें प्रांजळरूप । निवाडिलें असें ॥ ९७ ॥

**सविकल्पक जीवोयं ब्रह्मस्यान्निर्विकल्पकं ॥**
**अहं ब्रह्मेति वाक्येन सोयमर्थैभिधीयते ॥ १३ ॥**

सविकल्पक जीव हा खरा । जो वाउगा मायेस्तव भास दुसरा । ब्रह्मात्मा निर्विकल्प निर्धारा । मायातीत अनंत ॥ ९८॥
हाचि अर्थ महावाक्य सांगे । अहंब्रह्मास्मि जें निजांगें । तस्मात् साधकें विचारून लागवेगें । अभिन्नता वरावी ॥ ९९।
प्रथम जीवाचें रूप कैसें । कोठोनी कोठवरी असे । तें विचारें त्यागून आपैसें । अहंब्रह्म निश्चय व्हावा ॥ ३६०० ॥

**सविकल्पक जीवोयं**

पूर्वीं विक्षेपाचें केलें रूप । तोचि विकारी जीवसंकल्प । उठोनियां निमतसे अल्प । खद्योतापरी ॥ १ ॥
वृत्ति उठतां मनबुद्धि उठती । इंद्रियद्वारा विषयीं आदळती । त्यांत प्रतिबिंबून आभास चिती । किंचित् प्रकाश करी॥२
मन तें होय नव्हे करित । अमुक वस्तु हे बुद्धि स्थापित । दोहींच्या अनुकारें चिंतितें चित्त । मी स्फुरे तो अहंकारु ३
येथें पाहतां पदार्थ दोन । एक चंचळ दुजें भासचेतन । त्या दोहींचे प्रकार विभागून । चतुर्धा जाहले ॥ ४ ॥
मन बुद्धि चित्त अहंकार । चंचलत्व तितुका वृत्तिविकार । यासी स्फुरविता असे जो प्रकार । जीवचैतन्याचा ॥ ५ ॥
उभय मिळून एक संकल्प । हाचि जीव विकारी रूप । उठोनियां निमतसे अल्प । गगनीं जेवीं विद्युल्लता ॥ ६ ॥
उठतांचि पदार्थ लखलाखिती । अंधकारांत पडे दीप्ती । निमिष्यामाजीं होतसे समाप्ति । पुढें अधिक अंधार ॥ ७ ॥
तैसा जीव संकल्प उठतां । अमुक अमुक पाहे पदार्थजाता । इतुकेंही स्फुरऊन मागुता । निमिष्यांत लय होय ॥ ८ ॥
हें काय हो होय कीं नव्हे । हे प्रिय द्वेष्य कीं उपेक्ष्य नुमजावें । हेंचि मन संशयीं पडावें । बहु वेळ उठतांही ॥ ९ ॥
जोंवरी बुद्धि निश्चय करीना । तोंवरी उठे निमे क्षणक्षणां । परी संशयात्मकता जाईना । जीवस्फुरण असतांही३६१०।
तैसोंचि संशयें उठोनि मन । तेंचि मन परी चिंतन जें होत । तया नांव ठेविलें चित्त । जें मनाचे रूप दुजें ॥ ११ ॥

---

तेंच आतां एका श्लोकानें विचारें ऐक्यता व्हावी म्हणून, जीव आणि ब्रह्मात्मा, या दोघांचें प्रांजळरूप निवडिलेलें आहे त्याप्रमाणें साधकानें निवडावें व जाणावें.

जो मायेमुळें वाउगा दुसरा भास झाला तो जीव खरा सविकल्पक आहे, व मायातीत अनंत जो ब्रह्मात्मा तो निर्विकल्प आहे. हाच अर्थ अहंब्रह्मास्मि हें महावाक्य सांगतें, म्हणून साधकानें लवकर विचार करून अभिन्नता वरावी. प्रथम जीवाचें रूप कसें आहे व कोठून कोठपर्यंत आहे तें विचारानें जाणून त्याचा त्याग करावा, आणि अहंब्रह्म हा निश्चय व्हावा. पूर्वीं विक्षेपाचें रूप सांगितलें आहे, तोच जीवसंकल्प. तो उठतो व काजव्याप्रमाणें नाहींसा होतो. वृत्ति उठतांच मन बुद्धि उठतात, व इंद्रियद्वारा विषयांत जातात. त्या मनबुद्धींत चिती प्रतिबिंबून किंचित् प्रकाश करिते. मन होय नव्हे असा संशय करितें. पुढें बुद्धि ही अमुक वस्तु आहे असें स्थापिते, दोहोंच्या अनुकारानें चिंतन करिते तें चित्त, मी मी स्फुरतें तो अहंकार. येथें पाहिलें असतां पदार्थ दोन आहेत, एक चंचळ व दुसरें भासचेतन. त्या दोन पदार्थांचे विभागानें चार प्रकार झाले. मनबुद्धिचित्तअहंकार हा चंचळ पदार्थ. जो चंचळ तोच वृत्तीचा विकार आहे. या विकारास स्फुरविणारा जीवचैतन्य आहे.

**जीवाचें रूप.**

वृत्तिविकार आणि जीवचैतन्य दोहों मिळून एक संकल्प. हाच विकारीरूप जीव, हा गगनांत जशी वीज तसा अल्प उत्पन्न होऊन मावळतो. वीज उठतांच पदार्थ लखलखतात. अंधारांत उजेड पडतो, पुढें निमिष्यांत तिची समाप्ति होते, मग अधिकच अंधार दिसूं लागतो तसा जीव संकल्प उठतांच हा अमुक हा अमुक असे पदार्थ पहातो, आणि लागलाच त्याचा निमिषांत लय होतो. जीवाचे प्रकाशानें हें आहे किंवा नाहीं, हें प्रिय किंवा द्वेष्य, हें उपेक्ष्य याचा उमज न पडतां पुष्कळ वेळ उठलें तरी संशयांत पडावें हेंच मन. हें मन जोंपर्यंत बुद्धीनें निश्चय केला नाहीं तोंपर्यंत क्षणक्षण उठतें व निमतें; पण त्याची संशयात्मकता जीव स्फुरत असतांही जात नाहीं. याचप्रमाणें संशयानें उठतें व निमतें तेंच मन. पण एकसारखें चिंतन होतें म्हणून त्यास चित्त म्हणतात. हें मनाचें दुसरें रूपच आहे असें समजावें.

पुढें अमुक हा पदार्थ असे । ऐसा बुद्धि निश्चय करीतसे । तेव्हां संशयात्मकता नासे । चिंतनासहित ॥ १२ ॥
हें प्रिय खरें तें अंगीकारावें । हें द्वेष्य तें वाटे निपटून जावें । हें उपेक्ष्य तें व्यर्थ उपेक्षावें । जें प्रिय ना द्वेष्य ॥ १३ ॥
हा जाणिजे अहंकार । जो बुद्धीचा दुजा प्रकार । एवं विकार हे जीवाचे चत्वार । क्षणक्षणां होती ॥ १४ ॥
हे प्रियकर पदार्थ माझे । येर हे असती दुजे तुझे । ऐसें साभिमानें घेतलें वोझें । या विकल्परूप जीवानें ॥ १५ ॥
हें माझें म्हणावया । प्रयोजन असे शिष्यराया । आपण कोण हें नोळखोनियां । देहातें मी म्हणे ॥ १६ ॥
अहंकारादि देहापर्यंत । हे वेगळाले नेणें समस्त । हा इतुकाही मीच भावित । सहित धर्मधर्मी ॥ १७ ॥
हें सर्व मागें निरूपण । जाहलें असे विस्तारेंकडून । या सर्वांसी मी एक म्हणून । बैसला बळें ॥ १८ ॥
जाति वर्ण आश्रम सारे । सुंदर वोखटे साचोकारे । मीच म्हणून जो हुंबरे । या नांव मीपण ॥ १९ ॥
एवं देह मी आणि हें हें माझें । घेऊन बैसला दृढतर वोझें । हाचि विश्वाभिमानी बुझे । जागृति व्यापारी ॥ ३३२० ॥
मनबुद्ध्यादि जीवासहित । हे क्षणक्षणां उठोनि मावळत । परी मीपणाचा नोव्हेचि घात । हे मावळती जरी ॥ २१ ॥
म्हणोनि जीवत्व कदा मरेना । कीं विकल्पाभावीं असे मीपणा । जोंवरी उत्पत्ति नसे ज्ञाना । तोंवरी असे ॥ २२ ॥
तोंचि मनबुद्धि इंद्रियांवांचून । स्वतां भास विषयांतें कल्पून । अंतरीं व्यापार तीतें स्वप्न । जागृतिसंस्कारें ॥ २३ ॥
तेथील भास विषयातें पाहे । आणि भासरूप एक आपण आहे । तोचि सुखदुःखातें लाहे । प्रविविक्त भोगें ॥ २४ ॥
आणि मागें केलें पुढें करणार । पापपुण्यादि अवघा प्रकार । त्यापासून जो सुखदुःख विकार । तयाचाही मी भोक्ता२५
एवं कर्ता भोक्ता सर्व कर्मांचा । तोचि तैजस अभिमानी साचा । सूक्ष्म देहीं या विकल्पाचा । उभारा असे ॥ २६ ॥
स्वप्नींही संकल्प निमे उठे । परी अभिमान घेतला तो न पालटे । हें असो सुप्तीमाजी नेटें । मीपणें व्यापिलें ॥ २७ ॥
सुप्ति म्हणिजे व्यापारविण । मन बुद्धिसहित होती लीन । नुसधें नेणीवरूप अज्ञान । उरे कारणरूपी ॥ २८ ॥
त्या अज्ञानाच्या अवस्था तीन । सुप्ति मूर्छा आणि मरण । या तिहींमाजीही असे मीपण । नेणिवरूपेंचि ॥ २९ ॥
काय मी सुखी निजेलों होतों । कांहींच न जाणतां पदार्थ हा तो । ऐसा उत्थानीं जेव्हां सांगतो । तेव्हां तेथें मीपण असे
तया मीपण नांव प्राज्ञ । विकल्पाभावी जीव किंचिज्ञ । स्वरूपींच मिळे परी अज्ञ । पणा न फिटे ॥ ३१ ॥
उत्थानीं विक्षेप उठतां । साभिमानातें होय धर्ता । हाचि विशेष परी सामान्यता । होता सुप्तीमाजीं ॥ ३२ ॥

---

पुढें हा अमुक पदार्थ आहे असा बुद्धि निश्चय करिते, तेव्हां चिंतनासह संशयात्मकता नासते. हें प्रिय खरें, हें अंगीकारावें, हें द्वेष्य निःशेष नाहींसें व्हावें, हें उपेक्ष्य व्यर्थ आहे म्हणून याची उपेक्षाच करावी. कारण हें प्रिय नाहीं व द्वेष्यही नाहीं. हा अहंकार समजावा. हा बुद्धीचा दुसरा प्रकारच आहे. याप्रमाणें जीवाचे चार प्रकारचे विकार क्षणोक्षण होतात. हे प्रियकर पदार्थ माझे, हे राहिलेले जे दुसरे पदार्थ ते तुझे असें विकल्परूप जीव साभिमानानें ओझें घेतो. वास्तविक हें माझें हें माझें असें म्हणण्याचें कारण कांहीं होतें काय? आपण कोण हें न कळून देहास मी म्हणतो. अहंकारादि देहापर्यंत सर्व वेगळालीं आहेत, त्या सर्व धर्मधर्मीसहित संघातास मी मानून बसला, हें मागें निरूपण विस्तारानें केलेलें आहेच. त्या सर्वांस मी मानून बसला हाच अहंकार होय.

**मीपण**—जाति, वर्ण, आश्रम, सुंदर, वोखटें यांस मीच म्हणून मानितो यास मीपण म्हणतात.

देह मी आणि हें हें माझें असें मानणारा तो जागृतीचा विश्वाभिमानी. मनबुद्धि आदिकरून जीवासहित सर्व क्षणक्षण उठून मावळतात, पण मीपणाचा घात होत नाहीं, म्हणून जीवत्व कधींही मरत नाहीं. विकल्पाचे अभावीं मीपणा रहातो, तो ज्ञान होईपर्यंत तसाच असतो. जागृतीचे संस्कारानें येणारे स्वप्नावस्थेचा अभिमानी तैजस, या विकल्पाचा सूक्ष्म देही उभारा आहे. स्वप्नांतही संकल्प उठतो व निमतो, परंतु अभिमान पालटत नाहीं. हें असो. सुषुप्तींतही मीपणानें व्यापिलेलें आहे. सुषुप्ति म्हणजे व्यापारावांचून मनबुद्धि हीं लीन असतां कारणरूपी नुसतें नेणीवरूप अज्ञान उरतें. त्या अज्ञानाच्या अवस्था तीन १ सुषुप्ति २ मूर्छा ३ मरण. या तीन अवस्थेंत नेणीवरूपानें मीपणा आहे, त्यास प्राज्ञ म्हणतात. हें विकल्पाचे अभावीं जीवाचें रूप आहे, तें स्वरुपीं मिळतें, पण अज्ञानपणा नाहींसा होत नाहीं. उत्थान होऊन विक्षेप उठला असतां साभिमान धरतो हाच विशेष प्राज्ञ; पण तो सुषुप्तींत सामान्यता होता.

ऐसाचि मूर्छाकाळीं मी मूर्छित । पडिलों होतों तो जाहलों सावचित्त । ऐसा अभिमानाचा नव्हे घात । देह मृतही पावे जरी
प्राणप्रयाणसमयीं आपण । मी मेलों हा भाव घेऊन । पावला अत्यंताचि विस्मरण । तें पुढें जन्मतां स्मरे ॥ ३४ ॥
मागें मेलों होतों तो जन्मलों । गर्भीं कीं यमयातनेसी भ्यालों । तया श्रमें बहु आतां भुकेलों । म्हणून मुख पसरी ३५
तस्मात् मरण जाहलियाही मीपणाचा । अभाव नव्हेची साचा । जरी अभाव सविकल्पाचा । तरीही हेतु उरे ॥ ३६ ॥
जरी विकल्पाभावी स्वस्वरूप । ओतप्रोत उरे अमुप । जीवत्वहि तेथें नसे अल्प । परी हेतु जीवाचा उरे ॥ ३७ ॥
जागृतींत ज्ञान नाहीं जाहलें । निमतां अज्ञानगर्भीं मिळालें । तें अज्ञानही वितळून उरलें । नुसधें ब्रह्मात्मत्व ॥ ३८ ॥
तेंचि उत्थानीं जन्मतां सावधपणीं । विक्षेपाची जाहली उभवणी । सामान्य हेतु तो विशेषेंकडूनी । स्फुरता जाहला३९
एवं सुप्तिमूर्छा आणि मरण । या तिहीं स्थळीं होतें मीपण । तरी जीवत्व असोचि सनातन । ज्ञानाभावी प्रळयींही ४०॥
हें तों असे अज्ञान समय । रविदत्ता आतां सावध होय । जो कां समाधिरूप उपाय । बोलिला अभ्यास ॥ ४१ ॥
येथेंही मीपणा पूर्वरीतीं असे । कारण कीं विचारें अज्ञान न नासे । उगेंचि स्थिरत्व साधिलें अभ्यासें । तेणें सुखी तो प्राज्ञ
जयासी म्हणावा ब्रह्मानुभव । जो ब्रह्मविद्येचा गौरव । तोही मूळज्ञानाचा ठाव । असे बापा खरा ॥ ४३ ॥
तेंचि अवधारी सावधान । आरंभीं जाहलें संधीचें ज्ञान । तयाचा विक्षेपें घे अभिमान । मी समाधिस्थ म्हणोनी ॥ ४४
मी म्हणिजे हे देहादिक । हाचि विश्वाभिमानी एक । जरी देहबुद्धीचा न फिटेचि कळंक । तरी तो समाधि कैंचा ॥ ४५
मीच कीं समाधीचा साधिता । ऐसा साभिमानें जाहला कर्ता । मीच ब्रह्मसुखाचा जाहलों घेता । हाचि भोक्ता तेथें ४६
एवं कर्तृत्व भोक्तृत्व बळें घेणें । हेचि तैजस अभिमानाचीं लक्षणें । समाधीमाजीं असती पाहणें । विचारून साधकें ४७
हे विक्षेपामुळें म्हणसी असती । मनबुद्धीस्तव उठे साहंकृती । तरी पाहें विघ्नें जरी नासती । तरी प्राज्ञ हा न मरे ४८
पाहिलें विघ्न जें विक्षेपरूप । तें अभ्यासें नासतां साक्षेप । देहद्वयाचा क्षय आपआप । होतां विश्वतैजस निमती ॥ ४९

---

याचप्रमाणें मूर्छा काळीं मी मूर्छित पडलों होतों तो सावध झालों. याप्रमाणें देह मृत झाला तरी अभिमानाचा घात होत नाहीं. प्राणप्रयाणसमयीं आपण मी मेलों हा भाव धरून अत्यंत विस्मरण पावला. तें पुढें जन्मतांच स्मरूं लागलें कीं, मागें मी मेलों होतों तो आतां जन्मलों. गर्भांत किंवा अगोदर यमयातनेस भ्यालों होतों त्या श्रमानें मी आतां फार भुकेलेला आहें असें मानून तोंड पसरतो, यावरून मरण आलें तरी मीपणाचा अभाव होत नाहीं. सविकल्पाचा जरी अभाव आहे, तरी हेतु उरतोच. विकल्पाचे अभावीं जरी स्वस्वरूप ओतप्रोत अमूप उरतें तेथें जीवत्व अल्प सुद्धां उरत नाहीं. तरी तेथें जीवाचा हेतु उरतो. जागृतींत ज्ञान झालें नाहीं, मेल्याबराबर सर्व अज्ञान गर्भांत मिळालें तें अज्ञान वितळून गेल्यावर नुसतें परब्रह्म उरलें तेंच उत्थानीं जन्मतांच सावधपणांत विक्षेपाची उभवणी झाली. तेव्हां जो सामान्य हेतु होता तो आतां जन्मतांच विशेषत्वानें स्फुरूं लागला. याप्रमाणें सुषुप्ति, मूर्छा आणि मरण या तीन स्थळांत मीपण होतें, म्हणून जीवत्व, सनातन ज्ञानाचे अभावीं व प्रळयकाळींही आहे, ही गोष्ट तर अज्ञानसमयाची झाली. पण रविदत्ता, जो समाधिरूप अभ्यासाचा उपाय सांगितला, यांतही मीपणा पूर्वीप्रमाणेंच आहे. कारण येथेंही अद्याप विचारानें अज्ञान नाशिलेलें नाहीं. अभ्यासानें उगीच जें स्थीरत्व साधिलें होतें त्या योगानें जो सुखी आहे तोच प्राज्ञ समजावा.

ज्याला ब्रह्मानुभव म्हणतात तो ब्रह्मविद्येचा गौरव आहे. तोही मूळाज्ञानाचाच ठाव आहे असें समज. तेंच आतां सांगतों. प्रथम संधीचें ज्ञान झालें. त्याचा विक्षेपानें मी समाधीस्त असा अभिमान घेतो. मी म्हणजे देहादिक हाच एक विश्वाभिमानी आहे. याची येथें म्हणजे समाधींतही जर देहबुद्धि जात नाहीं तर तो समाधि कसचा ? कारण जो समाधि साधिता तो मीच असा साभिमानानें कर्ता झाला व मीच ब्रह्म सुख घेता तो येथें भोक्ता झाला. याप्रमाणें कर्तृत्व भोक्तृत्व बळें घेणें हींच तैजस अभिमानाचीं लक्षणें आहेत. हीं लक्षणें समाधींत आहेत असें साधकानें विचारानें पहावें. तूं रविदत्ता, असें म्हणशील कीं, विक्षेपामुळें हीं लक्षणें आहेत. मनबुद्धि आहे म्हणून साहंकृति उठते. तरी असें पहा. विघ्नें जरी नासलीं तरी प्राज्ञ मरत नाहीं. पहिलें विघ्न विक्षेप. तें विघ्न अभ्यासानें नासलें असतां दोन्ही देहांचा क्षय आपोआप होतो, तेव्हां विश्व तैजस हे त्या देहाचे अभिमानी ह्यांचाही नाश होतो;

तेही निःशेष निमतीना । झोंपेंत जेवीं राहती लीनपणा । तेवीं लयरूप दुसरीया विघ्ना । माजीं लीन होती ॥ ३६५० ॥
सुषुप्तींतून जेवीं उत्थान । पावती विश्वतैजस आपण । कारण कीं निमाला नाहीं प्राज्ञ । नेणवि अभिमानें उरे ॥ ५१ ॥
शून्य किंवा झोंपेआंत । नेणपणें अभिमान उरत । म्हणून विक्षेपाचें उत्थान होत । विश्वतैजसरूपें ॥ ५२ ॥
लय ऐसाचि असे कषाय । तेथेंही नसे ज्ञानरूप उपाय । म्हणोनि प्राज्ञाभिमानें होय । उत्थान झडकरी ॥ ५३ ॥
हें असो जो रसास्वादु । वृत्तीनें घेतला स्वरूपस्वादु । तेथेंही प्राज्ञ असे सभेदू । कारण उभयांचा ॥ ५४ ॥
वृत्तीनें चिद्गगन लक्षिलें । उठोनि व्यापतां ज्ञान जाहलें । हेंचि ब्रह्म ऐसें कळलें । ओतप्रोत अनंत ॥ ५५ ॥
चिद्गगनीं वृत्ती पसरे । वायू ऐशी व्यापूनि विरे । परी तें ज्ञान पावोनियां मुरे । मागुती तदाकारें उठे ॥ ५६
ऐसें ज्ञान होतां स्वरूपाचें । अज्ञान तरी गेलें वृत्तीचें । परी तेचि वृत्ति साभिमानें नाचे । म्हणे म्यां ब्रह्म जाणितलें ५॥
फुंजें दाटून सबराभरित । उसळून विक्षेपासी पावत । अहंब्रह्म म्हणूनि विक्षेप होत । हेचि विश्वतैजस ॥ ५७ ॥
ब्रह्माकार जे वृत्ति होती । ते उसळोनि जाहली विक्षेपाकृति । तरी ते प्राज्ञरूप अहंकृति । नाहीं कैशी म्हणावी ॥ ५९ ॥
विश्वतैजस जेव्हां उद्भवती । तेव्हां ते प्राज्ञापासून निघती । तस्मात् विशेषें रसास्वाद जो निश्चितीं । तेथें वस्ति तिहींची
ज्ञानचि म्हणसी कैसें अज्ञान । तरी पाहें श्रुतीचें वचन । विज्ञात तें अविज्ञात केन । बोले उपनिषद ॥ ६१ ॥
तेंचि जाणे स्वप्रकाशीं । वृत्तीसहित यया सर्वांसी । हे कोण जाणती तयासी । हिंपुटी होतां ॥ ६३ ॥
जाणों जाताचि लय वृत्तीचा । पसरूनि तदाकारें मिळे साचा । उद्भवतां हेतु घेऊनि जाणिवेचा । वाउगा अभिमान धरी
न कळतांचि कळणें वाटलें । तेंचि कीं अज्ञान यथार्थ नाहीं कळलें । उगेंचि कळलें म्हणून साभिमानें घेतलें । तोचि कीं प्राज्ञ
तेचि वृत्ति साभिमानें दाटली । फुंजे विक्षेपाकार जाहली । विश्वतैजस दोहींतें व्याली । प्राज्ञ अहंकृति माता ॥ ६५ ॥
तस्मात् विशेषें जो रसास्वादु । अहंब्रह्मास्मिरूप आल्हादु । तेथें प्राज्ञरूप हा भेदु । उघड असे ॥ ६६ ॥
आतां सामान्यत्वें रसास्वादाचें । जें कां लक्षण वासनानंदाचें । तदाकाराचि वृत्ति व्याप्तीचें । संचलें राहे स्वरूपीं । ६७॥

---

पण तो निःशेष नाश होत नाहीं. तर झोंपेंत जसें लीन होऊन रहातात, तसेंच आतां लयरूप दुसऱ्या विघ्नांत लीन होऊन रहातात. झोंपेंतून जसे ते दोन्ही अभिमानी प्राज्ञ मेला नाहीं म्हणून उत्थान पावतात, तसेच समाधीचे वेळीं प्राज्ञ मेला नाहीं म्हणून उत्थान पावतात. शून्य किंवा झोंपेंत नेणपणानें अभिमान उरतो, म्हणूनच विश्वतैजस-रूपानें विक्षेपाचें उत्थान होतें. लयास सारखाच कषाय आहे. त्यांतही ज्ञानरूप उपाय नाहीं, म्हणून प्राज्ञाभिमानाचें लवकर उत्थान होतें. हें असो. चवथें विघ्न जो रसस्वाद ज्यांत वृत्तीनें स्वरुपाचा स्वाद घेतला तेथेंही दोन अभिमानांचें कारण जो प्राज्ञ, तो जिवंत आहे. वृत्ती उठली आणि तिनें चिद्गगन लक्षून त्यास व्यापिलें, तेव्हां ओतप्रोत अनंत हेंच ब्रह्म आहे असें ज्ञान झाल. चिद्गगनांत वृत्ती वाऱ्यासारखी पसरते व त्यास व्यापून विरते, पण जेव्हां चिद्गगनास व्यापिते तेव्हां त्याचें तिला ज्ञान होऊन ती विरते, व पुन्हा तदाकारत्वानेंच उठते. याप्रमाणें स्वरूपाचें ज्ञान झालें असतां वृत्तीचें अज्ञान जातें. पण तीच वृत्ती साभिमानानें म्हणते कीं, मी ब्रह्म जाणलें व हाच अभिमान घेऊन उसळून ती विक्षेपाकडे येते, तेव्हां अहंब्रह्म असा विक्षेप होतो. हाच विश्व तैजस समजावा. प्रथम जी ब्रह्माकार वृत्ती होती तीच उसळून विक्षेपाकृति झाली मग ती अहंकृति प्राज्ञरूप नाहीं असें कसें म्हणावें ?

विश्व तैजस हे जेव्हां उद्भवतात तेव्हां, ते प्राज्ञापासूनच निघतात, म्हणून विशेषें जो रसस्वाद तेथें तिन्ही अभिमानी आहेत. रविदत्ता, तूं असें म्हणशील कीं, ज्ञानच अज्ञान कसें होईल ? तर यास श्रुतिवचन आहे. केन उपनिषदांत विज्ञात तें अविज्ञात असें सांगितलें आहे. ब्रह्म आपल्या प्रकाशानें वृत्तीसहित सर्वांस जाणतें त्या ब्रह्मास यांपैकीं कोण जाणण्याविषयीं समर्थ आहे ? कोणीच नाहीं. वृत्ती जाणूं लागली म्हणजे ती तदाकारें पसरून त्यांत मिळते व पुढें ती उद्भवली म्हणजे जाणिवेचा हेतु घेऊन वाउगाच अभिमान धरते. तिला वास्तविक स्वरूप न कळतां कळलेंसें वाटलें तेंच अज्ञान, कारण खरें स्वरूप कळलें नाहीं, उगेंच कळलें म्हणून अभिमान धरणें तोच प्राज्ञ. वृत्ती साभिमानानें दाटली आणि त्या अभिमानानें विक्षेपाकार झाली. आणि तीच प्राज्ञरूप माता विश्व तैजसास व्याली. याकरितां विशेषें जो रसस्वाद जो अहंब्रह्मास्मिरूप आल्हाद तेथें प्राज्ञरूप भेद उघड आहे, असें निश्चयानें समजावें. आतां सामान्यत्वें जो रसस्वाद तो स्वरूपीं संचलेला रहातो.

वृत्ति पसरे किंवा मावळे । उठे किंवा सहज झांकोळे । परी ब्रह्माकारत्वें स्वयें निवळे। अहंकृति ही न घेतां ॥ ६८ ॥
ध्येयरूप एक चिद्गगन । ध्याता लक्षीतसे एकतान । नाहींच दुजें ध्यातों म्हणून । उद्गारही किंचित ॥ ६९ ॥
ध्येयाकार चिद्गगना आंत । वृत्ति एकदेशीं सहज उठत । परी हे उठली ऐसा संकेत । स्फुरूंही नेणें ॥ ३६७० ॥
कीं हें वृत्तीनें स्वरूप जाणिलें । ऐसेंही स्फूर्तीसी नाहीं उभवलें । अथवा उठोनी वितळूनी फाटलें । तेंही नेघे स्फूर्ती ॥ ७१
ऐसी एकरूप ध्यानस्थिती । ध्यात्याची ध्येयाकार अनुवृत्ति । असतां या ध्यातेपणाची सोहंकृति । सामान्यें नेघे ध्याता
ऐशिया तदाकारत्वस्थितीसी । निर्विघ्नतासमाधि नाम तियेसी । तेथील सुखाकारत्वें ग्रहणासी । वासनानंद नाम ॥ ७३
वृत्ति सुखदुःख विसरली । एक सुखाकारें सुखीं मिळाली । तेचि होऊन तेथें उरली । तेचि सदृढ वासना ॥ ७४ ॥
तया वासनेसी तदाकारत्व । म्हणोनि वासनानंद आरोपित्व । तेंचि वृत्तिव्याप्तीचें महत्त्व । ब्रह्माकार एकरूप ॥ ७५ ॥
असो ऐसी स्थिति जे समाधीची । एकतान ध्येयाकारत्वाची । परी रविदत्ता येथेंही प्राज्ञाची । गुप्तत्वें प्रौढी असे ॥७६
तेचि केंवी प्राज्ञाची प्रौढी । ऐकावी सावधान अर्धघडी । प्रत्यक्ष नसे परी परवडी । अनुमाना योग्य ॥ ७७ ॥
जरी सामान्यत्वेंही अभिमान न घेतां । परी तदाकारत्वें असे ध्याता । ध्याता तो वृत्ति सापेक्षता । तदवच्छिनें ध्यानसे
इकडे ध्याता वेगळा झाला । तिकडे ध्येयरूप पाहे चिद्गगनाला । मध्यें ध्यानरूप ऐशिया त्रिपुटीला । भिन्नत्व असे ७९
निर्विकल्प स्वरूप गोचर । वृत्ति असे ध्येयाकार । मी ध्यातसें हा पडे विसर । परी अनुभवी अनुभाव्या ॥ ३६८० ॥
ते समयीं आठविना द्वैत । उगी तदाकारें असे निवांत । परी उत्थान जेव्हां पावत । तेव्हां परामर्ष करी ॥ ८१ ॥
कीं अमुक वेळ मी ध्येयाकार । वृत्तीविण जाहलों होतो स्थिर । किंचितही ध्यातेपणाचा उद्गार । नव्हता मज ॥ ८२ ॥
ऐसा आठव समाधीचा । उत्थानीं करी तदाकारत्वाचा । तस्मात् तेथें ध्यातेपणाचा । आहेपणा असे ॥ ८३ ॥
हाचि ध्याता तया ध्येयाहून । पडिला कीं ध्यानास्तव भिन्न । हें विचारें पाहतां मूलाज्ञान । असे विस्मरणरूप ॥ ८४ ॥
ध्यातेपणा आपण जाहला । तेव्हां आपण ध्येयत्वा विसरला । हें विस्मरणरूप मूलाज्ञानाला । विचारें पहावें ॥ ८५ ॥

---

त्यास वृत्ती उठली किंवा सहज झांकोळली, पसरली किंवा मावळली हें न कळतां तो अहंकृति न घेतां ब्रह्माकारत्वें रहातो. ध्याता एकतानध्येयरूप चिद्गगन एक लक्षिता, तेव्हां त्यास मी ध्येयाहून दुसरा कोणी ध्याता निराळा आहे असा किंचित उद्गारही काढितां येत नाहीं. ध्येयाकार चिद्गगनांत वृत्ति एकदेशी सहज उठते, परंतु वृत्ती उठली असें स्फुरूंही जाणत नाहीं. तसेंच वृत्तीनें स्वरूप जाणलें असेंही स्फूर्तीत उत्पन्न होत नाहीं. अथवा स्फुरण उठून वितुळून गेलें हेंही स्फूर्तींत उत्पन्न होत नाहीं. याप्रमाणें ध्यात्याची ध्येयाकार अनुवृत्तीरूप एकरूप ध्यानस्थिति असतां, अशा प्रकारच्या ध्यातेपणाची सोहंकृति ध्याता सामान्यत्वेंही घेत नाहीं. या तदाकारत्व स्थितीस निर्विघ्नता समाधि नांव आहे. त्या निर्विघ्नता समाधींतील सुखाकारत्वानें जें गृहण त्यास वासनानंद म्हणतात.

वृत्ति सुखदुःखास विसरली आणि एक सुखाकारें सुखीं मिळाली व तेंच होऊन तेथें उरली तीच सुदृढ वासना. त्या वासनेस तदाकारत्व आहे, म्हणून वासनानंद हा तीवर आरोप करितात. याप्रमाणें ब्रह्माकार एकरूप होणें हेंच वृत्तीव्याप्तीचें महत्त्व आहे. असो. अशी जी समाधीची स्थिति तेथेंही प्राज्ञ गुप्तत्वानें आहे. तो तेथें कसा आहे हें सांगतों. वर जी समाधीची स्थिति सांगितली तेथें प्राज्ञ प्रत्यक्ष नाहीं. पण तो आहे असें अनुमान करितां येतें तें असें: ध्याता जरी सामान्यत्वेंही अभिमान घेत नाहीं तरी तो तदाकारत्वानें असतो. ध्यात्यास वृत्तीची अपेक्षा आहे. तिचे योगानेंच तो ध्यातो, म्हणून ध्येयाहून ध्याता निराळा आहे असें ठरलें. तसेंच ध्येयरूप चिद्गगनास पहातो. याप्रमाणें ध्याता निराळा, ध्येय निराळें, तेव्हां अर्थात मध्यंतरींचें ध्यान तेंही निराळेंच. याप्रमाणें ही त्रिपुटी भिन्नत्वानें आहे. निर्विकल्पस्वरूप गोचर वृत्ती ध्येयाकार असते, तेव्हां तिला मी ध्यातें हा विसर पडतो. परंतु ती अनुभाव्यास अनुभविते तेव्हां ती, द्वैत आठवीत नाहीं, तर उगीच तदाकारत्वानें निवांत असते. पण जेव्हां उत्थान पावते तेव्हां परामर्ष करते कीं, अमुक वेळ मी ध्येयाकार वृत्तिवाचून स्थीर झालों होतों, मला किंचितही ध्यातेपणाचा उद्गार नव्हता, असा आठव तदाकारत्वाचा समाधीपासून उत्थान झाल्यावर करितो, म्हणून तेथें ध्यातेपणाचा आहेपणा आहे. हाच ध्याता त्या ध्येयाहून ध्यानामुळें भिन्न झाला. हेंच विचारानें पाहिलें असतां विस्मरणरूप, मला ज्ञान आहे. जेव्हां आपण ध्याता झाला तेव्हां मीच ध्येय आहे हें विसरला. हें विस्मरणरूप मूल अज्ञान यास विचारानें रविदत्ता तूं पहा.

तें आपण असतां स्वतःसिद्ध । ध्यातेपणाचा संबंध । तस्मात् मूळाज्ञान हें प्रसिद्ध । असे तदाकार ध्यानीं ॥ ९६ ॥
जरी मी ध्यातेपणाचे साभिमानें । ऊर्मि न घेतां तदाकार होणें । परी उत्थानीं मी सुखी होतो म्हणे । तोचि प्राज्ञ अभिमान
त्याध्येयाकारेंहासुखीजाहला । केवळसुखाअभिन्नत्वनाहींपावला । याचि हेतुवासनानंदनामयाला । जेवींजागर सुषुप्तीची संधि
सुषुप्तींत जैसा अनुभवेंविण । ब्रह्मानंद स्वानंदघन । तैसा होय जेधवां अभिन्न । त्रिपुटित्यागें अंगें ॥ ९९ ॥
तया नांव ब्रह्मानंद । अनुभवेंविण स्वानंदकंद । ऐसा निजांगें ब्रह्म प्रसिद्ध । विचारेंवीण नव्हे ॥ ३६९० ॥
अभ्यासें इतुकेंचि साधावें । विघ्नें निरसून तदाकार व्हावें । ऐसा चिरकाळ अभ्यास होतां स्वभावें । विचारा पात्र होय
शुद्ध विचार होईल जेधवां । कीं आपण त्रिपुटीविण स्वानंद ठेवा । तेव्हांचि अभ्यासाचा प्रकार आघवा । गळे स्वयमेव
तस्मात् विचार होय तोंपर्यंत । अभ्यास करावाचि यथायुक्त । विचारें अभिन्नता जेधवां प्राप्त । तेव्हां आपैसा गळे ९३
असो अभ्यास तोंवरी त्रिपुटी असे । त्रिपुटी तोंवरी मूळाज्ञान वसे । मूळाज्ञान असतां त्यासहवासें । प्राज्ञ हा आहे ९४
प्राज्ञ अभिमानी तोचि जीव । असे स्वतःसिद्ध स्वयमेव । येथें शंकेचा ऐसा भाव । करील कोणी ॥ ९५ ॥
कीं वृत्तिव्याप्ति ही असतां । जीवाची नसे फलद्रूपता । आतां जीव त्रिपुटींत आहे म्हणतां । थोर विरोध आला ॥ ९६
तरी याचें उत्तर ऐकावें । समाधींत विकल्परूप जीव नव्हे । आतां आहे म्हणे कोण बरवें । परी विकल्पाचा हेतु असे
जैसा देहद्वयांत दोहीं व्यापारीं । जीव विकल्परूप विकारी । तैसा कोठें सुषुप्तिमाझारीं । परी उरे हेतुरूप ॥ ९८ ॥
सर्व विकल्प निपटून गेला । बुद्धीसहित आभास निमाला । एकला ब्रह्मानंदचि उरला । परी हेतु जीवाचा न निमे ९९
तो हेतु तोचि प्राज्ञ अभिमानी । जीव निमाला नेणीव घेऊनी । उत्थान पावतांचि विश्वतैजसालागूनी । प्रसवे मागुता ३७००
सुषुप्तींत जीव हा किंचित नसतां । हेतु कल्पावा उत्थान होतां । तैसाचि प्राज्ञ अभिमानी तत्त्वतां । कल्पावा तदाकारीं
तदाकारीं समाधि आंत । ध्याता ध्येय गोचर निवांत । ते समयीं विश्वतैजस निमत । विकल्परूपी जीव ॥ २ ॥

---

ध्येय आपण स्वतःसिद्ध असतां ध्यातेपणाचा संबंध धरिला, म्हणून तदाकार ध्यानीं हें मूळाज्ञान आहे. मी ध्याता या साभिमानानें उर्मि न घेतां जरी तदाकार होतो, तरी उत्थानीं मी सुखी होतो म्हणतो तोच प्राज्ञाभिमान. त्या ध्येयाकारानें हा सुखी झाला. केवळ सुखाशीं अभिन्नत्व पावला नाहीं, याचकरितां यास वासनानंद म्हणतात. जसा जागृति आणि झोंप यांच्या संधींतील वासनानंद आहे, त्याप्रमाणें हा वासनानंद आहे. झोंपेंत जसा ब्रह्मानंद स्वानंदघन अनुभवावांचून आहे, तसा त्रिपुटी टाकून जेव्हां अंगें अभिन्न होईल तेव्हां त्यास अनुभवावांचून स्वानंदकंद ब्रह्मानंद म्हणावें. असा निजांगें ब्रह्म प्रसिद्ध विचारावांचून होत नाहीं. अभ्यासानें इतकेंच साधावें कीं, चारी विघ्नें निरसून तदाकार व्हावें. याप्रमाणें चिरकाळ अभ्यास झाला असतां तो विचारास योग्य होतो. जेव्हां मी त्रिपुटीवांचून स्वानंद ठेवा आहे, असा शुद्ध विचार होईल तेव्हांच अभ्यासाचा सर्व प्रकार आपोआप गळेल. याकरितां विचार होईपर्यंत अभ्यास यथायुक्त करावाच. जेव्हां विचारानें अभिन्नता प्राप्त होईल तेव्हां तो अभ्यास आपोआप गळतो. जोंपर्यंत अभ्यास आहे तोंपर्यंत त्रिपुटी आहे. जोंपर्यंत त्रिपुटी आहे तोंपर्यंत मूळाज्ञान आहे. जोंपर्यंत मूळाज्ञान आहे तोंपर्यंत त्याबरोबर प्राज्ञ आहे. जो प्राज्ञ अभिमानी तोच जीव. म्हणून मूळाज्ञान जाईपर्यंत जीव कायम आहे.

शंका—वृत्तिव्याप्ति होत असतां जीवाची फलद्रूपता नाहीं, असें पूर्वीं दाखविलें आणि आतां जीव त्रिपुटींत आहे असें म्हणतां हा तुमच्या सांगण्यास मोठाच विरोध आला.

उत्तर—समाधींत विकल्परूप जीव नाहीं, तो आतां आहे असें कोण म्हणणार आहे ? तो प्रत्यक्ष तर नाहींच पण विकल्पाचा हेतु आहे. जसा दोन देहांत—दोन व्यापारांत—जीव विकल्परूप विकारी आहे तसा विकल्परूप झोंपेंत कोठें उरतो ? नाहीं. तर तो हेतुरूप उरतो. सर्व विकल्प निःशेष गेला, बुद्धिसहित आभासही निमाला, पुढें एकटा ब्रह्मानंदच उरला; परंतु जीवाचा हेतु मेला नाहीं. जो उरणारा हेतु तोच प्राज्ञ अभिमानी. हा प्राज्ञ आहे तोंपर्यंत जीव नेणीव घेऊन जरी निमाला तरी तो उत्थान होतांच विश्व तैजसास घेऊन उठतो. जसा सुषुप्तींत जीव किंचित्ही नसतां उत्थान झालें म्हणजे जीवाचा हेतु होता ही जशी कल्पना करणें, तसेंच प्राज्ञ अभिमानी तदाकारता आहे अशीही कल्पना करावी. तदाकारी समाधीमध्यें जोंपर्यंत ध्याता, ध्येय, गोचर निवांत आहे तेव्हां विकल्परूप जीव, असा जो विश्वतैजस तो निमतो.

परी या विकल्परूपें जीवाचा । हेतु ठरला ध्येयीं साचा । पुन्हां उद्भव होय विश्वतजसाचा । तया कारण प्राज्ञापासूनी
जया अज्ञानें हें सर्व जाहलें । हें सर्व तरी लय पावलें । परी तें प्रयोजन नाहीं निमालें । दृढ अभिन्नज्ञानें ॥ ४ ॥
कळलें तें वृत्तीसी चिद्गगन । तें वृत्ति निमतां जाय मावळून । वृत्ति अभावी उरे जें अज्ञान । तें शून्यत्व न फिटे ॥५॥
जरी वृत्तीसहित वृत्तीचे लयासी । अभाव देखणा ये प्रतीतिसी । जेव्हां न कळून कळेल निश्चयेंसी । तेव्हांचि मूलाज्ञान फिटे
तोंवरी मूलाज्ञान हेतुरूप । जीव संकल्पाचा बाप । उरे म्हणोनि भेदपडप । निमालें नाहीं ॥ ७ ॥
जीव विकल्परूप नसे । परी हेतु विकल्पाचा उरतसे । तो हा उभय संधींसी असे । सविकल्पा निर्विकल्पाच्या ॥ ८ ॥
सविकल्पत्व तया जरी नसतां । परी योजावा सविकल्पा आंतौता । निर्विकल्पीं हेतूचीही वार्ता । सहसा बोलूं नये ॥९
वायु आणि वायूचा निरोध । वायूकडे लावितां नाहीं बाध । त्यावीण आकाशीं आरोपितां शुद्ध । न स्पर्शे गगना ३७१०
तैसाचि सविकल्प जीवाचा हेतु । सविकल्पींच तयाची मातु । शुद्ध निर्विकल्प स्वरूपा आंतु । हेतु ना विकल्प ॥ ११॥
एवं हेतुसहित सविकल्प । हाचि जीव आभासरूप । कार्यकारणरूपें असद्रूप । वर्ते निर्विकल्प ॥ १२ ॥
बुद्धि उद्भवतां विश्वतैजस । उठोनि क्रीडती जागृति स्वप्नास । या दोहीं व्यापारीं तया विकल्पास । जीवत्वकार्यरूपी १३
सुप्ति मूर्छा मरणसमयासी । अथवा जागर सुप्तीचे संधीसी । विकल्प अभावीं विकल्प हेतूसी । नाम कारणरूप प्राज्ञ
तेवींच समाधिकाळीं अहंब्रह्मास्मि । वृत्तीनें घेतली सुखाची ऊर्मि । तेचि दोंप्रकारें अनुक्रमीं । विशेष सामान्यें होती
विशेष स्फूर्ति जे कळों आली । ते विश्वतैजसाकार जाहली । तेचि कार्यरूपी जीवाची उभवली । विकृति सविकल्पाची
सामान्यत्वें जे स्वरूपाकार । ध्याता ध्येयीं निरंतर । तो विकल्पाचा हेतु प्राज्ञ अहंकार । कारणरूपीं जाणिजे ॥१७॥
एवं जागृतिपासून समाधीपर्यंत । सविकल्परूपी जीवचि निश्चित । हें निरोपिलें बापा यथायुक्त । येथें संशयो नसे १८
अहंब्रह्मास्मिरूप अनुभव । सामान्य अथवा विशेष भाव । हाचि जीवत्वाचा स्वभाव । तुज कळों येईल पुढें ॥ १९ ॥
अगा रविदत्ता त्वां होतें पुसिलें । कीं ब्रह्म जीवाचें रूप वेगळालें । त्यांत जीवाचें रूप स्पष्ट सांगितलें । सविकल्परूप

---

परंतु या विकल्परूपानें जीवाचा हेतु ध्येयीं उरलेला आहे, म्हणून पुन्हा विश्व तैजसाचा त्या कारण प्राज्ञापासून उद्भव होतो. ज्या अज्ञानानें हें सर्व उत्पन्न झालें व पुढें सर्व हें लय पावलें. परंतु याचें कारण जें अज्ञान तें दृढ अभिन्न ज्ञानानें निमालें पाहिजे. वृत्तीला जें कळलें तें चिद्गगन. तें चिद्गगन वृत्ती निमतांच मावळून जातें. पुढें वृत्तीच्या अभावी जें शून्य अज्ञान उरतें तें फिटत नाहीं. जेव्हां वृत्तीसह वृत्तीचे लयाचा म्हणजे अभावाचा देखणारा अनुभवास येईल व जेव्हां न कळून निश्चयानें कळेल तेव्हां मूलाज्ञान फिटेल. जोंपर्यंत जीव संकल्पाचा बाप असें जें मूलाज्ञान तें हेतुरूप उरतें तोंपर्यंत भेद मोडला जात नाहीं. येथ विकल्परूप जीव जरी उरत नाहीं तरी विकल्पाचा हेतु उरतो. हा हेतु सविकल्प निर्विकल्पाच्या उभय संधींत रहातो. त्याला जरी सविकल्पत्व नाहीं तरी तो सविकल्पांत आहे अशी कल्पना करावी. निर्विकल्पांत हेतूची वार्ताही नाहीं. जसा वारा आणि त्या वाऱ्याचा निरोध हा वायुच करितो असें म्हटल्यानें बाध येत नाहीं, पण त्याचा आकाशावर आरोप केला तर तो आकाशास स्पर्शतही नाहीं. तसा सविकल्प जीवाचा हेतु, त्याचा मोठेपणा सर्व सविकल्पांतच आहे. शुद्ध निर्विकल्पांत हेतूही नाहीं व विकल्पही नाहीं. म्हणून हेतूसहित सविकल्प हाच आभासरूप जीव. हा निर्विकल्पीं कार्यकारणरूपानें असद्रूपपणें रहातो. तो बुद्धी उत्पन्न होतांच विश्व तैजसरूपानें जागृती स्वप्नांत क्रीडत असतो. तेव्हां जागृति, स्वप्न, या दोहीं व्यापारीं त्या विकल्पास कार्यरूपी जीवत्व आहे. झोंप, मूर्छा, आणि मरण अथवा जागृति आणि झोंप यांमधील संधींत विकल्पाचे अभावी विकल्प हेतु उरतो त्यास कारणरूपी प्राज्ञ असें म्हणतात. त्याचप्रमाणें समाधी काळीं वृत्तीनें अहंब्रह्मास्मि अशी सुखाची उर्मी घेतली ती दोन प्रकारची आहे. एक विशेष आणि दुसरी सामान्य.

जी विशेष स्फूर्ति कळली ती विश्व तैजसाकार झाली व तीच कार्यरूपी सविकल्प जीवाची विकृति उमटली आणि सामान्यत्वें जो स्वरूपाकार ध्याता ध्येयीं निरंतर असतो तोच विकल्पाचा हेतु प्राज्ञ अहंकार कारणरूपी समजावा. याप्रमाणें जागृतिपासून समाधीपर्यंत सविकल्परूपी जीव आहे, हें यथायुक्त रविदत्ता तुला सांगितलें. याविषयीं संशय उरला नाहीं. अहंब्रह्मास्मिरूप अनुभवाचा सामान्य अथवा विशेष भाव हाच जीवत्वाचा स्वभाव आहे. हा पुढें तुला कळेल. रविदत्ता त्वां पूर्वी ब्रह्म आणि जीव यांचें वेगळालें रूप विचारिलें होतेंस त्यांत जीव सविकल्परूप आहे असें त्याचें रूप स्पष्ट सांगितलें.

जागृतीपासून मोक्षापर्यंत । ह्याचि जीव आणि जीवाचें कृत । हें श्रुतियुक्ति अनुभवयुक्त । सहेतुक सांगितलें ॥ २१ ॥
बहु बोलणें बापा कासया । देहापासून स्फूर्तिरूप माया । हा अवघा संघ जो तया । सविकल्प जीव म्हणावा ॥ २२
ययापरतें जें एकरूप । तें ब्रह्मात्मत्व निर्विकल्प । तेंचि बोलिजे स्वस्वरूप । जीवाचें रूप जाहलें ॥ २३ ॥
आणीक तुझा संशय होता।कीं ब्रह्मात्मा जो स्फूर्तिहून परता।तो अनुभवा न ये यथार्थ तत्त्वतां । स्फूर्तीतें साक्षिमात्र कळे
तरी तें आतां निर्विकल्प व्याजें । यथार्थ ज्ञान तें प्रगट कीजे । स्फूर्तीविण एकरस सहजें । तें तुजला भेटऊं ॥ २५ ॥

## ब्रह्मस्यान्निर्विकल्पकं ॥

ब्रह्म केवळ निर्विकल्प आहे । जेथें द्वैताचा हेतुही न साहे । आदि मध्य अवसानीं राहे । या जगद्रूप भ्रमाच्या ॥ २६
जगभ्रम हा जीवसंकल्प । कीं हा अवघा जीवरूप विकल्प । याचे आदि अंतीं सच्चिद्रूप । निर्विकल्प ब्रह्म ॥ २७ ॥
जया निर्विकल्पीं सविकल्पाची । वार्ताही नसे सहेतुकाची । कारण कार्यासहित या भ्रमाची । उत्पत्तीच जाहली नसे
सविकल्प नव्हे तें निर्विकल्प । तेथें हेतु ना जीवत्वाचा आरोप । ऐसें परिपूर्ण एकरूप । आदि मध्यें अवसानीं ॥ २९ ॥
निर्विकल्प म्हणतां मानील कोणी।कीं अंतःकरणा ऐसें विकल्प।वांचोनी । उगेंचि सामान्यत्वें स्फुरद्रूपपणीं।तरी ऐसें कदा नव्हे
याचि हेतू पूर्वपदांत । हेतूही केला विकल्पीं मिश्रित । या सर्वांहून अनंत विरहित । जेथें ध्येयत्व न साहे ॥ ३१ ॥
येविषयींही शंका कवणासी । होईल कीं निर्विकल्प जें अविनाशी । सर्वांपरतें तें असेल कवणे देशीं । तें पहावया केवीं जावें
तरी ऐसेंही कदापि असेना । त्रिधा परिच्छेदेंविण पूर्णपणा । सर्वीं अनुस्यूत असून होईना । या विकल्पा ऐसें ॥ ३३ ॥
आकाश कवणे स्थळीं नाहीं । ऐसा पदार्थ नसे कोठेंही । तैसें निर्विकल्प सर्वीं सर्वदांही । अणुही व्यापून असें ॥ ३४ ॥
गगन सर्वीं परी सर्वांवेगळें । तैसें ब्रह्म व्यापूनि विकल्पा निराळें । वायुवेगें आकाश न चळे । तेवीं विकल्पें विकारेना
जागृतीपासून मोक्षापर्यंत । विकल्प जीवसहेत । जो आतां निरोपिला संकेत । कार्यकारणरूपें ॥ ३६ ॥
इतुकियाही सविकल्पामाझारीं । ब्रह्म निर्विकल्प निर्विकारी । आणि या विरहितही निर्धारीं । असंभाव्य असे ॥ ३७ ॥

---

तसेंच जागृतिपासून मोक्षापर्यंत हाच जीव आणि जीवानें केलेलें हें सर्व श्रुति युक्ति अनुभवयुक्त सहेतुक सांगितलें. फार काय सांगावें देहापासून स्फूर्तिरूप मायेपर्यंत हा जो सर्व संघ त्यास सविकल्प जीव म्हणावें. आतां यास विकल्प जीवाखेरीज जें एकरूप तें निर्विकल्प ब्रह्म. त्या ब्रह्माचें म्हणजे स्वरूपाचें वर्णन करितों व तुझी शंका होती कीं, स्फूर्तिहून पर जो ब्रह्मात्मा तो यथार्थ अनुभवास येत नाहीं, स्फूर्तीनें साक्षित्वानें मात्र कळतो, तरी ही तुझी शंका दूर व्हावी म्हणून निर्विकल्प कोण या सांगण्याचे निमित्तानें स्फूर्तिवांचून सहज जें एकरस तेंच तूं निर्विकल्प त्या तुझी तुझ्याशीं यथार्थ ज्ञान प्रगट करून भेट करूं.

### निर्विकल्प ब्रह्माचें वर्णन.

जेथें द्वैताचा हेतूही सहन होत नाहीं, असें जें ब्रह्म तें निर्विकल्प ब्रह्म होय. हें ब्रह्म या जगद्रूप भ्रमाचे आदि मध्य अवसानीं संचलेलें आहे. जगभ्रम हा जीव संकल्प किंवा हा अवघा जीवरूप विकल्प आहे; याचे आदि-अंतीं सद्रूप निर्विकल्प ब्रह्म आहे. ज्या निर्विकल्पीं सहेतुक सविकल्पाची वार्ताही नाहीं व जेथें जगभ्रम हें कार्य व त्याचें जें कारण या दोहींची उत्पत्तीच झाली नाहीं. जें सविकल्प नाहीं तेंच निर्विकल्प. तेथें हेतु नाहीं व जीवत्वाचा आरोपही नाहीं. असें परिपूर्ण एकरूप ब्रह्म आदि, मध्यें, अवसानीं आहे. निर्विकल्प म्हटलें म्हणून कोणी कल्पना करितील कीं, अंतःकरण जसें निर्विकल्प असून उगाच सामान्यत्वें स्फुरतें तसें हेंही स्फुरत असेल तर हें तसें नाहीं, म्हणूनच श्लोकाचे पूर्वपदांत हेतु विकल्पांत आहे असें दाखविलें, व ब्रह्माचे ठायीं ध्येयत्वही सहन होत नाहीं असें दाखविलें.

**शंका**—अविनाशी जें निर्विकल्प ब्रह्म तें सर्वांहून पर आहे. तें कोणत्या देशीं असेल व तें जेथें असेल तेथें पहावयास कसें जावें?

**उत्तर**—तें ब्रह्म त्रिधापरिच्छेदावांचून आहे म्हणून तें दूरदेशीं न रहातां सर्वांत अनस्यूत आहे. तें या विकल्पासारखें त्यांत असून विकल्परूप होत नाहीं. जसें आकाश कोणत्या ठिकाणीं नाहीं असा पदार्थच कोठें नाहीं. तसें निर्विकल्प सर्वांत सर्वदा व्यापून आहे; यावांचून एक अणुही रिता नाहीं. जसें आकाश सर्वांत असून सर्वांहून वेगळें आहे. तसें ब्रह्म सर्वांस व्यापून विकल्पावेगळें आहे. जसें आकाश वाऱ्याचे वेगानें चळत नाहीं, तसें ब्रह्म विकल्पाचे योगानें विकल्प पावत नाहीं. आतां वर जो सहेतुक विकल्परूप जीव सांगितला त्या सर्व सविकल्पांत निर्विकल्प निर्विकारी ब्रह्म असूनही त्याखेरीज असंभाव्य उरलेलें आहे. त्या निर्विकल्पास

तें सविकल्पासी कळेना । कोणतें तत्व जाणों शकेना । आणि जाणल्याविण तों होईना । मुक्त कल्पांतीं ॥ ३८ ॥
तस्मात् तें जाणिलें पाहिजे । जाणोनि तेंचि होऊन राहिजे । तरीच साधका मोक्ष लाहिजे। नातरी बंधन दृढ ॥३९॥
तेंचि समजावया कारणें । नानापरीचीं निरूपणें । मागें जाहालीं पुढेंही होणें । श्रुति युक्ति अनुभवें ॥ ३७४० ॥
विचारवंता इतुकें नलगे । श्रवणमात्रें तया उमगे । परी मंदप्रज्ञास्तव प्रसंगें । अभ्यासही कथिला ॥ ४१ ॥
अभ्यासें वृत्तिव्याप्तिपर्यंत । पायवाट जाहली यथायुक्त । आतां निर्विकल्प तें व्हावें प्राप्त । तें निर्वचनें प्रगटूं ॥४२॥
अगा रविदत्ता मागें तुजला। तूष्णीभाव जो सांगितला । आणि जागरसुषुप्तीचें संधीला । दाविल निर्विकल्प ॥ ४३॥
तें तिहीं अवस्थांमाजीं एकरूप । अन्वयें व्यापून चिद्रूप। अवस्था होती जाती परी अल्प। तें न्यूनाधिक नव्हे ॥४४॥
जागृदादि अवस्था तिन्ही । स्वभावें असती जीवालागोनी। परी आगंतुक मूर्छा समाधि मरणीं । त्यांतही ज्ञान निघोट
तेंचि निर्विकल्प ब्रह्म पूर्ण । असे सामान्यत्वें सर्वीं सघन । या सविकल्पामाजींच। निरखून पाहतां कळे ॥ ४६ ॥
परी मंदप्रज्ञासी स्फुरणापरतें । जें निर्विकल्प स्वतःसिद्ध ऐतें। तें अनुभविल्याविण सविकल्पा आंतौतें। सहसा जाणवेना
तस्मात् रविदत्ता सावधान । आतां स्फुरणापरतें तुज दावीन । परी तूं स्फूर्ति शाखा हे त्यागून । लक्षीं निर्विकल्प चंद्र
परी आरंभीं तुवां आधीं । जैसा जैसा साधिला समाधि । तो तो अनुभवीत येई निरवधि । वृत्तिव्याप्तीपर्यंत ॥ ४९ ॥
नेत्र उघडून एकांती । संधि ज्या साधिल्या निश्चितीं । एक विषय त्यागून वृत्ति । जाऊं पाहे विषयांतरा ॥ ३७५० ॥
मध्यसंधीसी विकल्पाविण । सामान्यत्वें प्रकाशमान । तेंचि निर्विकल्प ब्रह्म पूर्ण । अनुभविलेंचि असे ॥ ५१ ॥
तूं म्हणसी ते सामान्यवृत्ति । विकल्पाविण पसरे स्फूर्ति । तरी ते जड करीना दीप्ति । तस्मात् प्रकाशक ब्रह्म ॥५२ ॥
अथवा वृत्ति व्यापून मावळे । तेंचि मावळणें जया कळे। तें कळणें सहज निश्चळें । ब्रह्मात्मयाचें ॥ ५३ ॥
किंवा वृत्तिसामान्येंपदार्थीव्यापतां । बुद्धीचाविकल्पउद्भवलानसतां । ते सहज प्रकाशिली अज्ञातता । जेणेंनिर्विकल्पतेंब्रम्ह

---

सविकल्प जीव किंवा दुसरा कोणताही पदार्थ जाणूं शकत नाहीं आणि तें जाणिल्यावांचून कोणी कधींही मुक्त व्हावयाचा नाहीं. करितां तें जाणिलें पाहिजे आणि तें जाणून व तेंच होऊन राहिलें पाहिजे, तेव्हांच साधकास मोक्ष प्राप्त होईल. नाहीं तर दृढ बंधनच राहील. ब्रह्म समजावें म्हणून अनेक प्रकारचीं निरूपणें पूर्वी सांगितलीं व पुढेंही निरूपणें सांगणें आहेत. विचारवान जो आहे त्यास इतके आयास करावे लागत नाहींत. तो श्रवण होतांच समजतो. पण जो मंदबुद्धि आहे त्यास कळण्याकरितांच अभ्यास सांगितला व त्या अभ्यासानें वृत्तिव्याप्तिपर्यंत यथायुक्त पायवाट झाली. आतां निर्विकल्प प्राप्त व्हावें अणून तें अनिर्वचनानें प्रगट करूं.

रविदत्ता, मागें तुला तूष्णीभाव सांगितला त्यांत व जागृति आणि झोंप यांचे संधींत निर्विकल्प दाखविलें होतें, तें चिद्रूप तिन्ही अवस्थेंत अन्वयानें एकरूप व्यापून आहे. तें अवस्था झाल्या किंवा गेल्या तरी न्यूनाधीक होत नाहीं. जागृतिआदि करून तीन अवस्था जीवास आहेतच पण त्याला ज्या अगांतुक मूर्छा, समाधि, मरण ह्या अवस्था येतात त्यांतही तें चिद्रूपज्ञान न्यूनाधिक होत नाहीं. तेंच निर्विकल्प पूर्ण ब्रह्म सामान्यत्वें सर्वांत भरलेलें आहे. तें या सविकल्पांतच निरखून पाहिलें असतां कळतें. पण मंदबुद्धीस स्फुरणापरतें निर्विकल्प जें आहे त्याचा अनुभव घेतल्यावांचून सविकल्पांतील निर्विकल्प सहसा जाणवत नाहीं. म्हणून रविदत्ता मी आतां स्फुरणापरतें जें निर्विकल्प तें तुला दाखवितों. पण तूं शाखाचंद्रन्यायें स्फूर्तिरूप शाखा टाकून निर्विकल्परूप चंद्र पहा. प्रथमतः तूं समाधी जसा जसा साधिला असशील तो वृत्तिव्याप्तीपर्यंत अनुभवीत ये. एकांतांत नेत्र उघडून ज्या संधी साधिल्या त्या संधींत विकल्पावांचून निर्विकल्प ब्रह्म होतें, त्याचा तूं अनुभव घेतलाच आहेस. तूं म्हणशील कीं, विकल्पावांचून सामान्य वृत्ती पसरत होती, निर्विकल्पस्फूर्ति जरी पसरत होती तरी ती जड असल्यामुळें प्रकाशीत नव्हती. तेथें निर्विकल्प ब्रह्मच प्रकाशीत होतें. ही ब्रह्म जाणण्याची पहिली युक्ती. दुसरी ब्रह्म जाणण्याची युक्ती अशी कीं, निर्विकल्प वृत्ति चिद्गगनास व्यापते व लागलीच मावळते. तें तिचें मावळणें ज्याला कळतें, तोच ब्रह्मात्मा. तिसरी युक्ती वृत्ती सामान्यत्वें पदार्थीं व्यापत असतां व बुद्धीचा विकल्प उत्पन्न झाला नसतां पदार्थांची अज्ञातता ज्यानें प्रकाशिली तेंच निर्विकल्प ब्रह्म आहे.

विकल्प होऊन मावळून जाय । उगीच वृत्ति पदार्थमय । ते ज्ञातता जेणें प्रकाशित होय । तें निर्विकल्प ब्रह्म ॥ ५५ ॥
अगा पदार्थ आणि पदार्थसंधि । सविकल्पत्वें जीव आणि बुद्धि । पुढें ज्ञातता अज्ञातता आधीं । सामान्य वृत्तीसहित
हें एकदांचि जेणें प्रकाशिलें । प्रकाशू । विकारा नाहीं पावलें । तेंचि निर्विकल्प ब्रह्म संचलें । विकल्पा आदिअंतीं ।।५७॥
एवंडोळेउघडूनियांबैसतां । यारीतींअनुभविली निर्विकल्पता । तेचिनेत्रलावोनीअंतरआंनौना । कल्पनेसी अनुभाविसी ५८
एक कल्पना उठोनि गेली । दुजी नाहीं जों उठिली । ते संधी जेणें प्रकाशिली । तें निर्विकल्प ब्रह्म ॥ ५९ ॥
तेथील ज्ञातता अज्ञातता । मागें ज्या रीतीं सांगितल्या तत्त्वतां । त्या प्रकाशिल्या जेणें समस्तानें निर्विकल्प ब्रह्म ३७६०
अंतरींचे कल्पित विषय । कल्पक बुद्धि आणि जीव तन्मय । वृत्ति ज्ञानाज्ञान जेणें हा समुदाय । एकदांचि प्रकाशिल॥
प्रकाशी परी त्या त्या ऐसा । कदापि नव्हे विकारी सहसा । वायुमाजीं गगनातें जैसा । किंचित् पालट नव्हे ॥ ६२ ॥
एवं जागृतीस्वप्न व्यापारीं । जेधवा जीवत्व विकल्पागारीं । तितुकें व्यापूनि सहज निर्विकारी । ब्रह्मात्मा परिपूर्ण ॥६३॥
तेथील विश्वतैजस अभिमान । धरि तो जीवचि एक आपण । इतुकेंही निर्हेतुत्वें प्रकाशवून । निर्विकल्पत्वें असे ६४
एवं विक्षेपकाळीं विक्षेपाकार । ब्रह्म नोव्हेचि कदा अनुमात्र । तो विक्षेप निमतांही समग्र । लय जो होय ॥ ६५ ॥
शून्याकार स्तब्धता कीं झोंप । तयाचा नेणता जीव हेतुरूप । जयासी प्राज्ञ नामाचा जल्प । इतुकें प्रकाशिलें जेणें ६६
तेथील सामान्य वृत्ति अज्ञाना । आणि जीवही लीनत्वें नेणता । परी तयासी निर्विकल्पें जाणता । तो अन्यथा नव्हे ६७
पुढें कषाय जेव्हां उमटती । ते रंग आणि उसळे वृत्ति । तिचें जाणणें आणि आपुली भ्रांति । त्यातेंही प्रकाशी निर्विकल्प
इतुकेंही आत्मयानें प्रकाशिलें । परी वाउगेंचि नेणपण धरिलें । त्या प्रज्ञासहित जेणें जाणिलें । अकृत्रिमपणें ॥ ६९ ॥
आतां अहंब्रह्मास्मि जे स्फूर्ति । विशेषें उठे अहंकृति । हाचि रसास्वादु विघ्नकर निश्चिती । परी प्रकाशी निर्विकल्प
जरी विश्वतैजसाकार जाहला । विकल्प जीवत्वें विकारला । तरी तो विकारही सर्व प्रकाशिला । निर्विकल्प ब्रह्में ॥७१॥
अथवा प्राज्ञाकार होऊनी । जीवत्व उरे नेणपणीं । तयाही नेणतियालागूनी । निर्विकल्प प्रकाशी ॥ ७२ ॥
पुढें अभ्यासें तदाकारता । जो सामान्य रसास्वादु तत्त्वतां । ब्रह्म ध्येयाकारत्वें ध्याता । विशेष स्फूर्तिविण ॥ ७३ ॥
येथील निरूपण तों प्रांजळ । केलेंचि करूं पुन्हां सकळ । कारण कीं स्फुरणापरतें जें निश्चळ । प्रतीतीस आलें पाहिजे
वृत्ति उठोनि चिद्गगनीं । पसरतां आकळी ध्येयालागूनी । तदाकारें तद्रूपचि होऊनी । ध्यातेपणाही विसरे ॥ ७५ ॥

---

बुद्धीचा विकल्प होऊन मावळून गेला म्हणजे मग उगीच वृत्ती पदार्थमय होते, तीस ज्ञातता म्हणतात. ज्यानें ती प्रकाशिली तें निर्विकल्प ब्रह्म होय. हे रविद्या पदार्थ आणि पदार्थाची संधी. सविकल्पत्वानें जीव आणि बुद्धि आणि आधीं अज्ञातता व पुढें ज्ञातता आणि सामान्य वृत्ति यांस एकदांच ज्यानें प्रकाशून जें शून्य विकारास पावलें नाहीं, तेंच निर्विकल्पब्रह्म, विकल्पाचे आदिअंतीं संचलेलें आहे. याप्रमाणें डोळे उघडून बसलें असतां वर सांगितल्याप्रमाणें निर्विकल्पता अनुभविली. तीच निर्विकल्पता नेत्र झांकून अंतरांत अनुभवितो. कल्पित विषय कल्पित विषयांचा संधी अज्ञातता व स्वप्नांतील ज्ञातता. कल्पक बुद्धि व जीव तन्मयवृत्ति व ज्ञान, अज्ञान हा समुदाय एकदांच ज्यानें प्रकाशिला तेंच निर्विकल्पब्रह्म. हें ब्रह्म वरील समुदायास प्रकाशून त्या त्यासारखें विकारी होत नाहीं जसें आकाश वाऱ्यांत किंचितूही पालटत नाहीं तसें निर्विकल्प ब्रह्म निर्विकारी जीव जागृति, स्वप्न या दोन व्यापारांत विकल्पाकार असतांही रहातें. दोन अवस्थांचा विश्वतैजस असा अभिमानी जीवच आपण होतो. त्यांस निर्हेतुकत्वें ब्रह्म प्रकाशून निर्विकल्पत्वानें रहातें. याप्रमाणें ब्रह्म विक्षेपकाळीं विक्षेपाकार होत नाहीं; पण विक्षेपाचा लय झाल्यावर शून्याकारता स्तब्धता किंवा झोंप या अवस्था प्राप्त झाल्या असतां त्यांचा नेणता हेतुरूप जीव ज्यास प्राज्ञ म्हणतात तो लीनत्वानें आहे त्यासही निर्विकल्प ब्रह्म प्रकाशितें. तसेंच त्या अवस्थेंतील सामान्य वृत्ति अज्ञाततेस निर्विकल्प ब्रह्म प्रकाशितें. त्याचप्रमाणें रंग दिसूं लागणें किंवा वृत्ति उसळणें हा जो कषाय, हा समाधि घेत असतां उत्पन्न झाला म्हणजे वृत्तीचें जाणणें आणि आपली भ्रांति हीं उत्पन्न होतात, यांसही तें निर्विकल्प ब्रह्म प्रकाशितें. सर्व आत्म्यानेंच प्रकाशिलेलें आहे, पण उगाच नेणपण धरितो असा जो प्राज्ञ त्यासही सर्व ज्यानें प्रकाशिलें तेंच निर्विकल्प ब्रह्म. हें ब्रह्म अहंब्रह्मास्मिरूप जो रसस्वाद त्यासही प्रकाशितें. हें ब्रह्म तिन्ही अभिमान्यांस प्रकाशितें, तसेंच अभ्यासानें तदाकारता रूप जो सामान्य रसस्वाद ज्यांत ध्येयाकारत्वानें ब्रह्म आहे व ध्याता विशेष स्फूर्तीवांचून आहे, त्यासही ब्रह्म प्रकाशितें. तेंच निरूपण पुनः करूं. कारण स्फूर्तिपरतें जें निश्चळ ब्रह्म त्याचा अनुभव आला पाहिजे.

वृत्ति उठून चिद्गगनीं पसरत असतां ध्येयास आकळते व ध्यातेपणास विसरून तदाकारत्वानें तद्रूप होऊन रहाते.

जरी मी ध्यातसें हे स्फूर्ति उठेना।परी ध्यानीं अवलंबितां ध्येया पूर्णा।ध्याता होतसे वृत्ति।अवच्छिन्ना । तेव्हां ध्यान घडे
तें ब्रह्मसुख हा ग्रहणकर्ता । तरी वेगळा जाहला ध्येयासी ध्याता । तिसरें ध्यान हे त्रिपुटीची वार्ता । उद्भवे ध्यानें ७७
तें ब्रह्म येणें अनुभविलें । तरी अनुभाव्य अनुभविते दोन जाहले । तिसरा अनुभव हे वेगळाले । होतसे अनुभवें ७८
तें ज्ञेय येणें जाणतां । ज्ञेयाहून भिन्न पडे ज्ञाता । मध्यें तिसरें ज्ञान तत्त्वतां । हें उद्भवे त्रिपुटी ॥ ७९ ॥
या साधकें तें साध्य साधिलें । तरी साध्य साधक भिन्न पडिले । तस्मात् त्रिपुटीयोगें ऐक्य पावले । कदापि नाहीं३७८०
ऐसे वेगळेपणें ध्येय ध्याता । अथवा साध्य साधक ज्ञेय ज्ञाता । किंवा अनुभाव्य अनुभविता । भिन्न तोंवरि फळ काय
ब्रह्मात्मा कोणी एक भिन्न असे । आणि आपणही कोणी एक होतसे । हेंचि कीं मूळाज्ञान उमसे । ऐक्य नव्हे ह्मणोनी
ऐसें कोटि जन्में ध्यान करितां । कदापि संभवेना ऐक्यता । तस्मात् विचारें कैशी ते अभिन्नता । वोळखिली पाहिजे
येथें विरोध मानिसी सध्यां । कीं हे वर्णिली मागें ब्रह्मविद्या । अचुक पाववीतसे अनाद्या । आतां म्हणतां ऐक्य नव्हे८४
तरी हे ब्रह्मविद्या बापा खरी । सेव्यमान असे ऋषिसुरनरीं । इच्या योगें पावले निर्विकारीं । परी विचारद्वारा ॥८५॥
जोंवरी विचार उद्भवेना । तोंवरी ऐक्य कदा घडेना । कर्तृतंत्ररूप अनुसंधाना । विचार होय तों असावें ॥ ८६ ॥
येवढी ज्ञानाची दृढता जाहली । ते कदापि न जाय व्यर्थ गेली । विचार होऊन ऐक्यता पहिली । होईलचि निःसंशय
हें अन्यथा नव्हे कल्पांतीं । एवं हे ब्रह्मविद्या मोक्षदाती । परी जोंवरी विचारा अनुत्पत्ति । तोंवरी भिन्न असे ॥ ८८ ॥
आणीक म्हणसी कीं भिन्न असतां । ध्यात्यासी नसे सुखाची वार्ता।तरी ऐसें नव्हे सुखरूप तत्त्वतां।जाहला असे तदाकारें
हे वृत्ति त्या ब्रह्मसुखासी । विसरली होती निजात्मयासी । तेणें पावली होती सुखदुःखासी । अनत कल्प ॥ ३७९० ॥
ते प्रतिदिनीं ब्रह्मसुखीं मिळे।व्यापारीं शिणोनि सुप्तीचे मेळें । परी सुख ऐसें ज्ञानें न कळे । म्हणोनि अप्राप्त ॥ ९१ ॥

---

मी ध्यातों ही जरी स्फूर्ति उठत नाहीं तरी ध्येयास ध्यानीं अवलंबितो, आणि ध्याता वृत्ति अवछिन्न होतो, तेव्हांच ध्यान घडतें. ध्येय हें ब्रह्मसुख, व ध्येयास अवलंबणारा ब्रह्मसुखग्रहणकर्ता असा प्रकार असल्यामुळें ध्येयाहून ध्याता निराळा झाला. ध्येय, ध्याता आणि तिसरें ध्यान ही त्रिपुटी ध्यानानें उत्पन्न झाली. यानें जर ब्रह्माचा अनुभव घेतला तर एक अनुभविता व दुसरा अनुभाव्य असे दोन झाले, व तिसरा अनुभव अशी अनुभवामुळें त्रिपुटी उत्पन्न होते. ज्ञात्यानें ज्ञेय जाणिलें असतां ज्ञाता ज्ञेय पाहून ध्येयाहून निराळा होतो, व तिसरें ज्ञान ही त्रिपुटी उत्पन्न होते. याचप्रमाणें साध्य, साधक आणि साधन ही त्रिपुटी उत्पन्न होईल. त्रिपुटी उत्पन्न झाली असतां ऐक्य कधींही होत नाहीं, म्हणून वेगळेपणानें ध्येय, ध्याता, ज्ञेय ज्ञाता, अनुभाव्य अनुभविता, साध्य, साधक हे प्रकार भिन्न आहेत तोंपर्यंत या अभ्यासाचें कांहींच फल नाहीं.

ब्रह्मात्मा कोणी एक आहे व आपण त्याहून निराळा कोणी एक आहे हेंच ऐक्य होत नाहीं, म्हणून तेथें मूलाज्ञान आहे असें समजावें. हें मूलाज्ञान राहून कोटि वर्षें, कोटि जन्म तप केलें–ध्यान केलें तरी कधींही ऐक्यता संभवावयाची नाहीं. म्हणूनच अभिन्नता कशी संभवेल ? याचा आतां तूं विचार करूनच ती ओळखून तसें केलें पाहिजे. ध्येय आणि ध्याता व ध्यान अशी त्रिपुटी उत्पन्न होते, म्हणून ऐक्य होत नाहीं म्हणून सांगतां, पण पूर्वीं तुम्हींच ही ब्रह्मविद्या अचूक ब्रह्मास पाववितें म्हणून सांगितलें होतें, आणि आतां ऐक्य होत नाहीं म्हणून म्हणतां हा तुमच्या बोलण्यास विरोध येतो, असें मानशील तर हें विरोधी बोलणें नाहीं. कारण जी ब्रह्मविद्या तुला सांगितली ती ब्रह्मविद्याच आहे, व ती सर्व ऋषी, सुर, मुनी व मानव यांस सेव्यही आहे. हिचे योगानें सर्व निर्विकार ब्रह्मास पावले, पण नुसते पावले नाहींत, तर विचारद्वारा पावले. जोंपर्यंत विचार उत्पन्न झाला नाहीं तोंपर्यंत ऐक्य कधींही घडावयाचें नाहीं, म्हणून हा विचार उत्पन्न होईपर्यंत कर्तृतंत्र अनुसंधानानें असाव. ब्रह्मविद्येचे योगानें एवढी ज्ञानाची दृढता झाली ती कधींही व्यर्थ जाणार नाहीं. तिचें योगानें ऐक्यता विचार होऊन होईल, याविषयीं संशय नाहीं. ब्रह्मविद्या ही मोक्षदाती आहे, पण विचार उत्पन्न झाला नाहीं तोंपर्यंत भिन्नत्व आहे, असें समजावें. तूं म्हणशील कीं, भिन्नता आहे म्हणून ध्यात्यास सुख नाहीं तर असें नव्हे, तो तदाकारें सुखरूपच झालेला आहे.

वृत्ति निजात्म्यास विसरल्यामुळें ब्रह्मसुखास मुकून अनंतकल्प सुखदुःखास पावली होती, ती दररोज व्यापारांत शीण पावली, म्हणजे झोंपेचे वेळीं ती ब्रह्मसुखांत मिळत असे; पण ज्ञानावांचून तेथें सुख आहे, असें तीस कळत नव्हतें, म्हणून तें सुख तिला झोंपेंत प्राप्त होत नव्हतें, पण ती त्यांत मिळत होती.

तरी रविदृत्ता तुवां समजावें । न कळून मिळतां सुखातें पावे । आणि समजून अभ्यासें सुखही न व्हावें । हें केवीं घडेल
अरे सुप्तिजागृतीचिये संधीं । सुख जें होतसे सामान्यबुद्धि । तें त्यागून परतवेना कधीं । हे प्रसिद्ध सर्व जनां ॥ ९३॥
सुप्तींत तों केवळ ब्रह्मानंद । त्रिपुटीविण स्वानंदकंद । असतां तदाकारीं परमानंद । नाहीं कवण म्हणे ॥ ९४ ॥
येथेंही कोणी मंदमति । मानिती कीं येवढी सुखानुभूति । असतां ज्ञाते कैसे परतती । व्यापाराकडे सुखत्यागें ॥ ९५
तरी याचें उत्तर ऐकावें । प्रारब्धभोगास्तव लागे भोगावें । जैसें सर्व जनें जागें व्हावें । सुप्तिसुख त्यागूनी ॥ ९६ ॥
सुप्तींतून जरीजागेंजाहलों।तरी कां तेथीलसुखनाहींसेंजाहलें । तैसेंसाधकसमाधींतूनउत्थानपावले। तरी ब्रह्मसुख होणें नव्हे
जैसें नीड टाकूनी पक्षी जाती । चारापाणी घेऊन येती मागुती।तरी कां नीडीं न म्हणावी विश्रांति।स्थळ त्या पक्षिया
तैसे साधक व्यापारें शिणतां । समाधींत पावती विश्रामता।मागुती प्रारब्ध वोढी प्रवृत्ति आंतौता।परी तेथें सुख अपार
सुखदुःखें वृत्ति शिणली होती।ते ब्रह्माकार जाहली फिटून भ्रांति।तयेसीच म्हणावी वृत्तिव्याप्ति। कीं पसरली ब्रह्मीं ३८००
ऐशी वृत्तिव्याप्ति ब्रह्मीं व्यापतां । हेंचि मी ब्रह्म कळे तत्त्वतां । तेव्हां न कळणें वृत्तींचें पाहतां । गेलें आवरण ॥ १ ॥
एवं अज्ञान जातां वृत्तींचें । तदाकारत्व जाहलें ब्रह्मींचें । हेंचि रूप ब्रह्मविद्येचें । त्रिपुटीसहित ॥ २ ॥
आधींच सुखदुःखें शिणली होती । ते मीनली ब्रह्मसुखीं वृत्ति । तेणें अति आवडी वासनेप्रति । म्हणोनि वासनानंद ३
अन्य प्रीति सर्व विषयांची । विटूनि ब्रह्मसुखाची वाढली रुचि । तेथेंचि वासना दृढतर साची।मीनली तो वासनानंद
जैसा जागृतिसुप्तीचा संधी । आनंदें सुखी जाहली बुद्धि । तैशीच तदाकारत्वें आधीं । वासना सुखरूप ॥ ५ ॥
तस्मात् ब्रह्मविद्या ते वृत्तिव्याप्ति । तोचि वासनानंद निश्चिती । त्रिपुटीरूप ब्रह्मानुभूती । ध्येयाकारें ध्यान हेंची ॥ ६ ॥
पुढें विचारें जेव्हां ब्रह्माभिन्न ।होय स्वयें त्रिपुटी त्यागून । तयासी नांव पूर्ण विज्ञान ।वस्तुतंत्ररूप ॥ ७ ॥
तोचि निर्विकल्प ब्रह्मानंद । अनुभवाविण केवळ निर्द्वंद्व। जैसा सुषुप्तिकाळींचा शुद्धबुद्ध । संचला उरे ॥ ८ ॥

---

जर न कळून त्या ब्रह्मसुखांत वृत्ती मिळत होती तर समजून अभ्यासानें त्या सुखांत कां मिळणार नाहीं, उघडच मिळेल. अरे सुषुप्ति आणि जागृति यांचे संधींत सामान्य बुद्धि जें सुख होतें तें टाकून परतवत नाहीं, याचा तर सर्व जनास अनुभव आहे. मग झोंपेंत तर केवळ ब्रह्मानंद त्रिपुटीवांचून असतां तदाकारीं परमानंद नाहीं असें कोण म्हणेल? कोणीही म्हणणार नाहीं.

शंका–कोणी मतिमंद म्हणतो कीं, एवढा सुखाचा अनुभव असतां त्याचा त्याग करून ज्ञाते व्यापाराकडे कां परततात?

उत्तर–झोंपेंत हें ब्रह्मसुख असतां जसे सर्व लोक त्याचा त्याग करून जागे होतात. तसे ज्ञाते प्रारब्धभोगामुळें तें सुख त्यागून व्यापाराकडे येतात. झोंप घेणारे लोक झोंपेंतून जरी जागे झाले तरी तेथील सुख नाहींसें होत नाहीं व कमी होत नाहीं. तसे साधक समाधीपासून उत्थान पावले तरी तेथील ब्रह्मसुख कमी होत नाहीं. जसे पक्षी आपला घरटा सोडून चारा, पाणी घेण्याकरितां जातात, व पुन्हां घरट्यांत परत येतात, म्हणून त्यापक्षांस घरटें हें विश्रांतिस्थळ नाहीं असें कसें म्हणावें? तसा साधक व्यापारांत शिणला असतां समाधींत विश्रांति पावतो व पुढें प्रारब्धवोढीमुळें प्रवृत्तींत येतो; पण तेथील सुख तो प्रवृत्तींत आल्यामुळें कमी होत नाहीं, तर तेथें जें अपार सुख आहे तें तसेंच आहे. वृत्ती सुखदुःखानें शिणली होती, तिची भ्रांति जाऊन ती ब्रह्मीं मिळून ब्रह्माकार झाली. तिलाच वृत्तिव्याप्ति म्हणावें. याप्रमाणें वृत्तीव्याप्ति ब्रह्मीं व्यापली असतां हेंच मी ब्रह्म असें कळतें तेव्हां न कळणें. हें वृत्तीचें आवरण जातें. याप्रमाणें वृत्तीचें अज्ञान गेलें असतां ब्रह्मींचें तदाकारत्व होतें. हेंच त्रिपुटीसहित ब्रह्मविद्येचें रूप आहे.

**वासनानंद**–वृत्ती सुखदुःखानें शिणली होती ती ब्रह्मसुखांत मिळाली त्यामुळें वासनेस अति आवड उत्पन्न झाली, म्हणून त्यास वासनानंद म्हणतात. सर्व विषयांची अन्य प्रीति विटून ब्रह्मसुखाची रुची वाढली आणि तेथेंच वासना दृढतर मिळाली. म्हणून त्यास वासनानंद म्हणतात. जसा जागृति आणि झोंप यामधील संधींत आनंदानें बुद्धि सुखी झाली. तशीच तदाकारत्वानें वासना सुखरूप झाली, म्हणून त्यास वासनानंद म्हणतात. जो वासनानंद तीच ब्रह्मविद्या व तीच वृत्तिव्याप्ति तोच त्रिपुटीवांचून ब्रह्मानुभव व ध्येयाकारें तेंच ध्यान होय.

**ब्रह्मानंद**–विचारानें त्रिपुटीचा त्याग करून ब्रह्माशीं अभिन्न होतो, त्यालाच वस्तुतंत्ररूप पूर्ण विज्ञान म्हणतात व त्यालाच अनुभवावांचून निर्विकल्प ब्रह्मानंद म्हणतात. जसा सुषुप्तींतील शुद्धबुद्ध आनंद उरतो तसाच हा निर्विकल्प ब्रह्मानंद समाधींत विचारानें उरतो.

परी सुषुप्तिकाळीं नेणीव न फिटे। म्हणोनि प्रज्ञाभिमानी न पालटे। तेथें मूलाज्ञान निःशेष आटे। अभिन्न समाधानें ९
पहिलें ब्रह्मविद्येनें अज्ञान नाशिलें। अज्ञान जातां ज्ञान वितुळलें। पूर्ण विज्ञान ब्रह्मीं लय पावलें। उर्वरित तें विज्ञान
जैसें निवळीचें बीज पूर्ण। पाणियाचा गाळ नासून। आपणही नासे परी जीवन। शुद्ध उरे जैसें ॥ ११ ॥
तैसें अज्ञान ब्रह्मज्ञानें गेलें। त्यासवेंचि ज्ञानही मावळलें। पुढें अविनाश उर्वरित उरलें। चिद्रूप निर्विकल्प ब्रह्म ॥ १२
आतां तें निर्विकल्प ब्रह्म सहज। त्रिपुटीविण जें सुषुप्तींत सतेज। आणि जें वाणीमनासी अचोज। तेंचि तूं प्रतीति बाणवूं
रविदत्ता तुवां मागें। प्रश्न केला होता अंगें। कीं स्फूर्तीपरतें जें अभंगें। अनुभवा न ये ॥ १४ ॥
आणि म्हणसी सुषुप्तिकाळींचा। ब्रह्मानंद त्रिपुटीविण साचा। तो अनुमानें जाणतां नेणीयेचा। कळे उत्थानीं ॥ १५॥
हेंचि तुझें विरोधी बोलणें। सुषुप्तीचें म्हणसी कळे अनुमानें। आणि समाधि घेतां पूर्णपणें। स्फुरणापरतां न कळे केवीं
जैसा सुषुप्त्यानंद उत्थानीं। अनुभविला अनुमानें कडोनि। तैसा स्फूर्तित्यागें जो पूर्णपणीं। स्फूर्ति उत्थानीं कां न कळे
तथापि तुझा संशय न फिटे। तरी सावधान असावें नेटें। तुझें तुज रूप घनदाटें। संचलें तें दावूं ॥ १८ ॥
परी त्वां समाधि जो साधिला। वृत्तीनें घेसी ध्येयाकाराला। आतां किंचित् अभ्यास तुजला। त्याहून विलक्षण सांगूं
तेथेंही तूं विरोध मानिसी। कीं मागा निरोपिलें निश्चयेंसी। वृत्ति व्याप्ती पुढें अभ्यासासी। प्रयोजन नाहीं ॥३८२०॥
एक पुढें विचार पाहिजे। विचारेंचि अभिन्नता लाहिजे। आतां अभ्यास कांहींसा कीजे। ऐसा विरोध मानिसी २१
तरी याचें उत्तर ऐकावें। हें भिन्न अभ्यासाचें रूप नव्हे। विचाराचें अंगचि समजावें। जेणें वृत्तीपरतें भेटे ॥ २२ ॥
तस्मात् रविदत्ता हा अभ्यास। साधीं समाधिसमयास। हा ठसावतां विचार अनायास। होय अभिन्नत्वाचा ॥ २३ ॥
वृत्तीकडून ध्येयाकडे पाहसी। तेणें ध्याता तूं वेगळा ध्येयासी। तरी तें पाहणें त्यागी या समयासी। सांगतों तैसें करीं
ओतप्रोत जें चिद्गगन। त्यामध्यें वृत्ति पसरे उठून। ते वृत्ति पाहे अवलोकून। दृष्टीनें ध्येयाच्या ॥ २५ ॥
ध्येयरूप जें चिद्गगन। तें ओतप्रोत होऊन आपण। त्या आपणामध्यें पहावें स्फुरण। उठे पसरे केवीं ॥ २६ ॥

---

झोंपेंत नेणीव फिटत नाहीं म्हणून प्राज्ञाभिमान रहातो. येथें समाधींत विचारानें मूलाज्ञान रहात नाहीं म्हणून अभिन्न समाधानानें ब्रह्मानंद उरतो.

प्रथम ब्रह्मविद्येनें अज्ञान घालविलें. अज्ञान जाण्याबरोबर ज्ञान आपण नाहींसें झालें. पूर्वी विज्ञान होतें तें ब्रह्मीं नाहींसें झालें पुढें जें उरलें तेंच विज्ञान जसें निवळीचें बीं पाण्यांतील मळ नासून टाकून आपणही नासून जातें, पण पुढें शुद्ध पाणी जसें उरतें, तसें अज्ञान ब्रह्मज्ञानानें नेलें या अज्ञानाबरोबर ज्ञान नाहींसें झालें. पुढें अविनाश निर्विकल्प उरलें; तेंच निर्विकल्प चिद्रूप ब्रह्म. आतां तें निर्विकल्प ब्रह्म त्रिपुटीवांचून झोंपेंत आहे, तें वाणी किंवा मनास जाणवत नाहीं, तेंच तूं आहेस असा तुला अनुभव आणून देऊं. रविदत्ता, पूर्वी तूं प्रश्न केला होतास कीं, स्फूर्तीपर जें आहे तें अनुभवास येत नाहीं, पण त्रिपुटीवांचून जो झोंपेंतील ब्रह्मानंद तो नेणिवेंतून उत्थान पावल्यावर अनुमानानें जाणला असतां कळतो. हें तुझें विरोधी बोलणें आहे. सुषुप्तींतील अनुमानानें कळतो पण समाधि घेत असतां स्फुरणापरता जो, तो कळत नाहीं, हें कसें ? जसा झोंपेंतील आनंद जागे झाल्यावर अनुमानिला, तसा स्फूर्तीचा त्याग केला असतां स्फूर्तीहून पर जो तो स्फूर्तिउत्थानीं कां कळत नाहीं? ज्यापेक्षां तुला तो कळत नाहीं, त्यापेक्षां तुझा संशय गेला नाहीं. तो जावा म्हणून आम्हीं तुझें तुला घनदाट स्वरूप दाखवूं. वृत्तीनें ध्येयाकारास ध्यावें असा जो तूं समाधि साधिलास, त्याहून किंचित् विलक्षण अभ्यास तुला सांगूं. तिकडे लक्ष दे.

शंका—वृत्तिव्याप्तीनंतर अभ्यासाची गरज नाहीं. एक विचार मात्र पाहिजे. त्या विचारानें अभिन्नता प्राप्त करून घ्यावी असें मागें तुम्हीं सांगितलें. आणि आतां कांहींसा अभ्यास सांगतां हा तुमच्या बोलण्यास विरोध येतो अशी शंका करिशील तर ऐक.

उत्तर—ज्या योगानें वृत्तीहून पर जो ब्रह्मात्मा भेटतो, तो सूक्ष्म अभ्यास विचाराहून निराळा नाहीं, तर तो विचाराचेंच अंग आहे, म्हणून रविदत्ता, तूं हा अभ्यास समाधीचे वेळीं साध. हा अभ्यास ठसावला असतां अनायासानें अभिन्नत्वाचा विचार होईल. पूर्वी तुझी वृत्तीकडून ध्येयाकडे पहाण्याची रीत होती म्हणून तूं ध्याता ध्येय याहून वेगळा पडत होतास, तरी असें पहाणें तूं आतां टाक आणि मी सांगतों तसें कर.

## सूक्ष्म अभ्यास अथवा विचाराचें अंग.

ओतप्रोत चिद्गगनामध्यें वृत्ती उठून पसरते, ती वृत्ती ध्येयाचे दृष्टीनें पहा. ध्येयरूप जें ओतप्रोत चिद्गगन तें आपण होऊन त्या आपणामध्यें स्फुरण कसें उठतें व कसें पसरतें तें पहावें.

स्फुरण उठतां कळे आपणा । पसरतांही आपण देखणा । मावळे तरी लय साक्षी जाणणा । उरे स्फूर्तिअभावीं ॥ २७ ॥
वृत्तीकडून ध्येयासी पाहणें । व्यापे तोंवरी होय जाणणें । वृत्ति मावळतां होय नेणणें । तेणें शून्य संदेह ॥ २८ ॥
वृत्ति निमतां ध्येय हरपलें । उगेंचि शून्यकार जाहलें । मागुतीं वृत्तीनें उठोनि देखिलें । पुन्हां निमतां शून्य ॥ २९ ॥
शून्य म्हणिजे कांहीं नाहीं । नाहीं तेंचि ब्रह्म वाटे असोनिही । ऐशिया निश्चयें सर्वथाही । पुन्हां प्रवाहीं पडे ॥ ३८३० ॥
वृत्ति उठतां ज्ञान उद्भवे । तें ज्ञातृत्व वृत्तीचें समजावें । तें वृत्तिज्ञान सहज नाश पावे । मग शून्यपणें नेणीव ॥ ३१ ॥
वृत्तिरूप जो का ध्याता । वृत्ति तोंवरी ध्येयाकारता । दोनी निमती वृत्ति निमतां । पुढें शून्य उरे वाटे ॥ ३२ ॥
कांहीं ध्येयाकारें सुख वाटलें । तेंही वृत्ति निमितां मावळलें । एवं वासनानंदासी कल्पिलें । शून्यत्वचि सुख ॥ ३३ ॥
ऐसें वृत्तीकडून ध्येयाकार । पाहे जरी होऊन एकाग्र । तरी परिणाम याचा साचार । शून्यत्व पावे ॥ ३४ ॥
यथार्थ ब्रह्म तें नाहीं कळलें । नसून शून्य ब्रह्म भाविलें । तेव्हां ज्ञान तें वृत्तीसी आलें । ब्रह्म जड सहज ॥ ३५ ॥
सुखही वृत्ति उद्भवतां असे । ब्रह्म कांहीं सुखरूप नसे । एवं असज्जड दुःखात्मक ऐसें । निश्चया दृढ आलें ॥ ३६ ॥
वृत्तीच सच्चित्सुखरूप । वाउगा कल्पून बैसे आरोप । तयासी उत्थानीं उठतां संकल्प । पुर्ववत् दुःख होय ॥ ३७ ॥
इतुके सायासें अभ्यास केले । ते शून्यब्रह्मीं वरपडे जाहले । तरी त्या अभ्यासासी व्यर्थत्व आलें । कां न म्हणावें ३८
ऐसा शून्यसंदेही साधक । समाधिस्थ राहे जरी कल्प एक । तरी तो बापुडा निश्चयात्मक । कदां मुक्त नव्हे ॥ ३९ ॥
ऐसा रविदत्ता घात होतसे । वृत्तिरूपाधिये अभ्यासें । तस्मात् विचारा उपयोगी असे । ध्येयाकडून वृत्तीं पाहतां ३८४०

स्फुरण उठतें तेव्हां व पसरतें तेव्हां आपणास कळतें. तसेंच तें मावळतें तेव्हां त्या स्फुरणाचा लयसाक्षी स्फुर्तीअभावीं आपणच उरतो. वृत्तीकडून ध्येयास पाहूं लागलें असतां वृत्ती व्यापेतोंपर्यंत ध्येयाचें ज्ञान होतें पुढें वृत्ती मावळल्यावर नेणणें प्राप्त होतें. तेणेंकरून शून्य मानून त्या संशयांत साधक पडतो. वृत्ती मावळल्याबरोबर ध्येय हरपतें, म्हणजे वृत्ती नसल्यामुळें कळत नाहींसें होतें. त्यायोगानें वृत्ती निमाल्यापासून ती पुन्हां उत्पन्न होईपर्यंत उगीच शून्याकार स्थिति होते. वृत्ती उठल्यावर पूर्ववत् दिसूं लागतें. वृत्ति निमाल्यावर लागलीच शून्याकार स्थिति होते, याप्रमाणें एकसारखा क्रम चाललेला असतो.

शून्य म्हणजे कांहीं नाहीं. नाहीं, तेंच ब्रह्म खरें, असें सत्य ब्रह्म असून वाटूं लागतें. या निश्चयानें वारंवार संशयांत किंवा जन्ममरणाचे धोक्यांत पडतो. वृत्ती उठतांच ज्ञान उत्पन्न होतें ते जाणणें वृत्तीचें आहे असें समजावें. ती जाणणारी वृत्ती लय पावली असतां तिचें तें ज्ञान आपाप नाश पावतें. मग अर्थात्च शून्यपणानें नेणीव उरते. वृत्तीरूप जो ध्याता त्याची वृत्ती आहे तोंपर्यंत ध्येयाकारता असते ती ध्येयाकारता व तो वृत्तीरूप ध्याता हे दोन्हीही भाव वृत्ति निमाली म्हणजे नाहींसे होतात. तेव्हां पुढें अर्थातच शून्य उरलेसें वाटतें. वृत्तीरूप ध्याता ध्येयाकार झाला तेव्हां त्यास कांहींसें सुख वाटलें. तें सुख वृत्ती निमाली तेव्हां सहजच मावळलें. याप्रमाणें वासनानंदास शून्यत्वच सुख आहे, अशी कल्पना केली. याप्रमाणें वृत्तीला घेऊन ध्येयाकार होऊन एकाग्रतेनें जरी पहात असला तरी या अभ्यासाचा परिणाम शून्यत्व प्राप्त होणें हाच आहे, यापेक्षां कांहीं जास्त प्राप्त होणें नाहीं.

वृत्तीस यथार्थ ब्रह्म कोणतें तें कळलें नाहीं, यामुळें तिनें शून्य नसून त्या शून्याचे ठायीं ब्रह्म भावना केली. ब्रह्म भावना करणारी ही वृत्ती असल्यामुळें ज्ञान वृत्तीस आहे असें झालें. तेव्हां सहजच ब्रह्म जड आहे असें ठरलें. तसेंच वृत्ती उत्पन्न झाली म्हणजे ध्येयाकारतेनें सुख होतें, म्हणून सुख ही वृत्ती उत्पन्न होऊन स्थित आहे तोंपर्यंत आहे. ती वृत्ती मावळल्यावर मग शून्य अज्ञान उरते अशा कल्पनेनें ब्रह्म सुखरूप नाहीं असें ठरलें. शून्यत्व म्हणजे असत्पणा, जडपणा व दुःखरूपता अशा लक्षणांचें एक ब्रह्म आहे असें ठरलें. तेव्हां ब्रह्माचीं सच्चिदानंदादि लक्षणें वृत्तीकडे आलीं. त्या लक्षणांचा वृत्ती आपणावर आरोप करून बसली. तीं लक्षणें वास्तविक तिचीं नव्हत. अशा वृत्तीरूप ध्यात्यास उत्थानीं संकल्प उठला असतां पूर्ववत् दुःख होतें याप्रमाणें त्या ध्यात्यानें मोठ्या सायासानें अभ्यास केला पण त्यास अखेरीस शून्य ब्रह्म प्राप्त झालें. याप्रमाणें शून्य हेंच ब्रह्म आहे असा ज्यांस निश्चय अथवा अनुभव झाला त्यांचा अभ्यास व्यर्थ गेला असें कां म्हणूं नये ? याप्रमाणें जो साधक शून्यसंदेहांत पडलेला आहे, तो कल्पपर्यंत जरी तसा असला, तरी निश्चयानें कधींही मुक्त व्हावयाचा नाहीं. रविदत्ता, याप्रमाणें वृत्तीअभ्यासानें घात होतो, म्हणून हा अभ्यास टाकून ध्येयाकडून वृत्तीस पाहाण्याचा अभ्यास कर. हा अभ्यास विचाराचे उपयोगी आहे.

ध्येयब्रह्म जें परिपूर्ण । त्यामध्यें वृत्तीचें एकदेशी भान । उठतां पसरतां होय अवलोकन । तरी लयही जाणों लागे ४१
ध्येयाच्याज्ञानेंवृत्तिजाणिली । कींहेवृत्तिमजचिद्गगनींउठली । मगतेवृत्तिजरीपसरूनमेली । तरी ज्ञान उरे लयसाक्षी ४२
वृत्तीचा अंत मध्य उद्भव । आपुले दृष्टी पडतसे सर्व । तिचा निःशेष जरी होतां अभाव । ज्ञानघन आपण उरे ४३
आपणज्ञानघनजोकांउरला । तोजाणिल्यावीणप्रतीतीसआला । तरी वृत्तीचामिथ्यापणापाहिला । जरीउठे स्फूर्तिरूप४४
वृत्तीसी असद्रूपता आली । अर्थात् सद्रूपता ब्रह्मींचि संचली । ऐशी प्रतीति बाणूं लागली । वृत्तीचे अभावींही ॥ ४५॥
वृत्तीचा अभाव जेणें पाहिला । तो ज्ञानघन ब्रह्मात्मा संचला । अर्थात् वृत्तीचा पाहूं लागला । जडपणा सहज ४६
जयाच्या सुखें हे वृत्ति पसरोनी । सुखरूप जाहली होती चिद्गगनीं । तो सुखैकघन पूर्णपणीं । वृत्तीसी सुख कैचें ४७
एवं ध्येयाकडोनी वृत्तिसी जाणतां । वृत्तीसी असज्जड दुःखरूपता । कळे आपुली प्रतीति बाणतां । अस्तिभातिप्रियरूप
वृत्तीचा अभाव जो जाणता । तो आहे म्हणोन जाहला देखता । आहेपणा तो सद्रूपें तत्त्वता । जाणता तो चिद्रूप४९
वृत्ति अभावीं सुखवृत्तीचें । मावळून निजसुख उरे साचें । तया अनुभविता कोणी नवचे । तोचि ब्रह्मानंद ॥३८५०॥
एवं सच्चिदानंद आपण एक । वृत्ति असज्जड दुःखात्मक । ऐसा या अभ्यासाचा विवेक । प्रतीति येतसे ॥ ५१ ॥
जरी एकाएकी वृत्तीचा । अभाव कळूं नये साचा । तरी वृत्तीचिये संधीचा । प्रकार पहावा ॥ ५२
एक वृत्ति पसरून चिद्गगनीं । वितळून जात असे ज्ञान पावोनी । दुसरी जोंवरी उठे मागुनी । तोंवरी संधि दिसे ॥ ५३
त्या संधीसीच म्हणावा लय । तितुका कळूं आला प्रत्यय । तें वृत्तीवांचून कळणें जें होय । तें चिद्रूप ब्रह्मींचें ॥ ५४॥
तें चिद्रूप ब्रह्मींचें म्हणतां । भावील ब्रह्म वेगळें तत्वतां । ऐसें नव्हे लक्ष्यलक्षण विचारितां । चिद्रूपचि ब्रह्म ॥ ५५ ॥
जैसा राहोचें शिर तोचि राहो । तेथें भिन्नपणाचा नसे संदेहो । तैसाचि चिद्रूप ब्रह्मात्मा निःसंदेहो । लक्ष्यलक्षणरूप

---

ध्येय ब्रह्म जें परिपूर्ण त्यांत वृत्तीचें एकदेशी भान होतें. तिचें उठतांना व पसरतांना अवलोकन झालें असतां, तिचा लयही सहज जाणूं लागतो. ध्यात्याचे ज्ञानानें तो वृत्तीला जाणतो कीं, ही वृत्ती मी जो चिद्गगन त्या चिद्गगनामध्यें उठली आहे. ती वृत्ती पुढें चिद्गगनीं पसरून जरी मावळली तरी तिच्या लयाचें सहाजिक ज्ञान उरतें. तो लय जाणता. हा ज्ञानघन लयसाक्षी, वृत्तीच्या आदि मध्य अवसानीं उरतो. व आपल्या दृष्टीनें तिच्या सर्व स्थिति पहातो. जो वृत्तीच्या स्थिति पहाणारा ज्ञानघन साक्षि उरला तो जाणल्यावांचून आपाप अनुभवास आला. मग अर्थातच स्फूर्ति उठली तरी वृत्ती मिथ्या आहे असा अनुभव येतो. अशाप्रकारें वृत्तीस असद्रूपता येते, तेव्हां सद्रूपता ब्रह्माची ब्रह्मीं रहाते. याप्रमाणें वृत्तीचे अभावी सुद्धां अशी प्रतीति बाणूं लागते. वृत्तीचा अभाव ज्यानें पाहिला तो ज्ञानघन ब्रह्मात्मा संचलेला आहे. यावरून तो वृत्तीचा जडपणा पाहूं लागला. वृत्ती पसरून ज्याच्या सुखानें सुखरूप झाली होती तो पूर्णपणीं सुखैकघन आहे. तें सुख वृत्तीस कोठचें असणार ? याप्रमाणें ध्येयाकडून वृत्तीस जाणूं लागलें असतां वृत्ती असज्जड दुःखात्मक आहे व आपला अनुभव आला असतां आपण अस्तिभातिप्रियरूप आहे. वृत्तीचा अभाव जाणणारा आपण आहे, म्हणूनच तिचा अभाव पहातां आपणच झाला. याप्रमाणें आपला आहेपणा म्हणजे सद्रूप किंवा अस्तित्व कळलें. तसेंच वृत्तीचे लयास जाणिलें, म्हणून तोच जाणता चिद्रूप किंवा भाति या लक्षणानें युक्त आहे. वृत्तीचा लय झाला म्हणजे वृत्तीचें सुख मावळतें. मग जें निजसुख उरतें तेंच प्रिय. तोच आनंद; त्यास अनुभवणारा कोणी रहात नाहीं, ज्याचा तोच असतो. याप्रमाणें सच्चिदानंद आपण एक आहे, व वृत्ती ही असज्जड दुःखात्मक आहे, असा विचार या अभ्यासानें कळतो.

वृत्तीचा अभाव एकाएकी कळून जर आला नाहीं तर वृत्तीचे संधीचा प्रकार पहावा, एक वृत्ती उठून ती चिद्गगनीं पसरून ज्ञान पावून मावळते, आणि दुसरी उठूं लागते. दुसरी वृत्ती जोंपर्यंत उठली नाहीं तोंपर्यंत संधि दिसतो. त्या संधीलाच वृत्तीचा लय म्हणावा. जितका वेळ संधी होता तितका वेळ तिचे लयाचा प्रत्यय आला. आतां लयाचा प्रत्यय वृत्तीवांचून कळला म्हणून तें जाणणें वृत्तीचें चिद्रूप लक्षण आहे. जाणणें हें ब्रह्मींचें चिद्रूपलक्षण आहे असें म्हटल्यानें ब्रह्म त्या लक्षणाहून निराळे असेल असें कोणास वाटेल तर तसें नाहीं. ज जाणणें चिद्रूप तेंच ब्रह्म. कारण येथें लक्ष्य आणि लक्षण दोन नाहींत तर एक ब्रह्मच लक्ष्यलक्षण आहे. जसें राहू आणि त्याचें शीर हीं दोन नाहींत तर, जें शीर तोच राहू व जो राहू तेंच त्याचें शीर, शिर आणि राहू यांत भिन्नता नाहीं. तसा चिद्रूप ब्रह्मात्मा लक्ष्य लक्षणरूप एकच आहे. असो.

असो संधिचियाही आवरीं । स्फूर्ति असे चिद्गगनाकारी । ज्ञातता अज्ञाततेची परी । पहावी साधकें ॥ ५७ ॥
वृत्ति उठतांचि प्रथमतां । ब्रह्म न कळणें ते अज्ञातता । पुढें हेंचि ब्रह्म ऐसें कळतां । ज्ञातता तया नांव ॥ ५८ ॥
एवं वृत्ति उठणें पसरणें । आणि मावळोनि लय होणें । संधीचाही प्रत्यय बाणें । ज्ञातता अज्ञातताही कळे ॥ ५९ ॥
इतुकेंही कळलें जयासी । तो चिद्रूप ब्रह्मात्मा अविनाशी । आत्मा म्हणिजे आपण निश्चयेंसी । जें ब्रह्म निर्विकल्प ६०
तया ब्रह्मात्मयावांचून । लय न कळे वृत्तीलागून । ज्ञातता अज्ञातताही प्रकाशमान । प्रकाशें जयाच्या ॥ ६१ ॥
वृत्तींचेंही उठणें पसरणें । हेंही चिद्रूपेंचि वोळखणें । परी वृत्ति आहे तोंवरी अनुमानें । संशय असे ॥ ६२ ॥
ब्रह्मींचें कळणें खरें कळलें । वृत्तीचें जडत्व प्रतीती आलें । मग वृत्ति उठतांही कळूं लागलें । कीं देखणें निर्विकल्पाचें
परी हा प्रत्यय बाणे तोंवरी । वृत्तिच वाटे जाणती खरी । परी वृत्तीचा लय जो निर्धारीं । वृत्ति न देखे कदा ॥ ६४
तस्मात् वृत्तिलयाचा जो देखणा । तोचि ब्रह्मात्मा पूर्णपणा । हें सत्य सत्य सत्य त्रिवचना । अन्यथा नव्हे नव्हे ६५
रविदत्ता आतां तुजसी । पुसेन तें सांगें वेगेंसी । वृत्तीचा लय जो अनुभवासी । तुझिया आला कीं नाहीं ॥ ६६ ॥
लयजरीत्वांअसेलपाहिला । तरीविचारपुढीलसांगूं तुजला । नातरी मागुतींअभ्यासकरीं वहिला । ध्येयाकडून पाहण्याचा
तंव रविदत्त करून नमन । विनवीतसे कर जोडून । वृत्तिलयाचें होतसे ज्ञान । परी ब्रह्मात्मा कैसा न कळे ॥ ६८ ॥
इतुकें प्रार्थून पुन्हां नमी । तें ऐकोन बोलती स्वामी । आतां येचि क्षणीं निजधामीं । तुझे तुजसी घालवूं ॥ ६९ ॥
अगा रविदत्ता अज्ञान अंवस । परवां सरली कालिचा जो दिवस । पाडवाही गेला समाधि अभ्यास । आज स्वानुभूतिबीज
ऐशी शुद्धबीज उदेली । वृत्तीचे संधीची वेळ आली । जेथें ज्ञातता अज्ञाततेची प्रगटली । झांवळी वेळ ॥ ७१
ऐशिये समयीं ब्रह्मात्मा चंद्र । चिद्गगनीं उदेला पश्चिमे समोर । तूं मात्र न पाहसी सत्वर । दृष्टि चिद्गगनीं पसरली
तरी पाहे स्फूर्ति पसरली या रुखा । जेथून उद्भवली सूक्ष्म शाखा । तिजहून पाहें अति सूक्ष्म रेखा । ब्रह्मात्मया चंद्राची

---

संधीचे अवसरीं स्फूर्ति चिद्गगनाकारीं असते तेव्हां साधकानें ज्ञातता अज्ञातता पहावी. वृत्ती उठली म्हणजे तिला जोंपर्यंत ब्रह्म कळलें नाहीं तोंपर्यंत अज्ञातता होती. पुढें जेव्हां तिला हेंच ब्रह्म असें कळलें, तेव्हां कळून जी स्थीरता राहिली तीच ज्ञातता आहे असें समजावें.

याप्रमाणें वृत्तीचें उठणें, पसरणें व लय पावणें हीं जो जाणतो तसेंच वृत्तीचा संधी, ज्ञातता व अज्ञातता जो जाणतो तोच चिद्रूप ब्रह्मात्मा अविनाशी. तोच आत्मा म्हणजे आपण जें निर्विकल्प ब्रह्म तें आहों. जें निर्विकल्प ब्रह्म त्या ब्रह्मावांचून वृत्तीस तिचा लय कळत नाहीं. तर ज्याच्या प्रकाशानें ज्ञातता अज्ञातता कळतात तेंच लय पहाणारें ब्रह्म आहे. वृत्तीचें उठणें व पसरणें हें चिद्रूप ओळखतें. पण वृत्ती आहेपर्यंत अनुमानानें संशय असतो कीं, हें कळणें वृत्तीचें आहे किंवा ब्रह्माचें आहे, पण पुढें जेव्हां वृत्तीचा लय होतो तेव्हां तो जाणावयास वृत्ती उरत नाहीं, तर ब्रह्मच उरतें. म्हणून वृत्ती उठतांना व पसरतांना ती स्वत: जाणत नाहीं कारण ती जड आहे व ब्रह्म चिद्रूप आहे. म्हणून कोणत्याही वेळेस वृत्ती स्वतः न जाणतां असतें व उठणें पसरणें इत्यादि सर्व गोष्टी चिद्रूप देखणें जें निर्विकल्प ब्रह्म, तेंच जाणतें. तें निर्विकल्प जाणते खरें आहे. असा अनुभव जोंपर्यंत बाणला नाहीं, तोंपर्यंत वृत्तीच खरोखर जाणती आहे असें वाटतें. वृत्तीचा लय वृत्ति पहात नाहीं त्या वेळेस पहाणारें निर्विकल्पच उरतें, म्हणून सर्वकाल पहाणारें तेंच खरें पहाणारें. त्यावांचून वृत्ति पहाणारी आहे असें कांहीं वेळेस वाटतें, पण ती सर्वकाल पहावयास टिकत नाहीं. यावरून वृत्तीचें पहाणें खरें नाहीं. रविदत्ता, मी आतां तुला विचारितों तें सांग. वृत्तीचा लय तुझे अनुभवास आला किंवा नाहीं ? तूं जर वृत्तीचा लय पाहिला असशील तर तुला पुढें विचार सांगूं, आणि तो लयाचा अनुभव आला नसेल तर तूं पुन: ध्येयाकडुन पहाण्याचा अभ्यास कर. तेव्हां रविदत्त नमन करून म्हणतो, मला वृत्तीचे लयाचें ज्ञान होतें, पण ब्रह्मात्मा कसा आहे तें कळत नाहीं. तेव्हां स्वामी सांगतात कीं, जो ब्रह्मात्मा तेंच तुझें निजधाम आहे, त्या धामास तुला आतांच घालवूं.

हे रविदत्ता, अज्ञानरूपी अंवस परवां सरली. कालचा दिवस पाडव्याचा जो समाधिअभ्यास तोही गेला. आज स्वानुभूति बीज उदयास आलेली आहे. अशा शुद्ध बीजाच्या उदयाचे वेळीं वृत्तीचे संधीची वेळ आली आहे, व याच वेळीं ज्ञातता अज्ञाततेची झांवळी वेळ प्रगटली आहे. अशा वेळीं ब्रह्मात्मा चंद्र चिद्गगनांत पश्चिमेकडे उगवला आहे. तूं मात्र चिद्गगनीं दृष्टि पसरली म्हणून पहात नाहींस, तरी तो ब्रह्मात्मा मी दाखवितों पहा. स्फूर्ति पसरलेली आहे तोच वृक्ष. त्यापासून सूक्ष्म शाखा उद्भवली आहे, तीहून अति सूक्ष्म रेषा ब्रह्मात्मा चंद्राची आहे.

हे विचाररूप निज अंगुली । दाविली अनुभाव्य अंतराळीं । तरी आतां तिचे दृष्टीनें न्याहाळीं । तयासी विचारें ॥ ७५
यापरतें बापा आम्हासी । दावितां न ये न बोलवे वाचेसी । आतां तुझा तूंचि चंद्र अविनाशी । पाहें आम्हां शब्द नाहीं
आणीकही तुजला खूण । सांगतों यथार्थ निर्वाण । पाहें म्हणतां भावोनि आन । पहावया जाशी ॥ ७६ ॥
पाहशी अथवा जाणों जाशी । किंवा लक्षांशेंही लक्षिशी । तरी वृत्तियोगचि अवलंबिशी । तेणें त्रिपुटीच होय ॥७७॥
त्रिपुटीही होऊन पूर्ववत् । होईल विज्ञात तेंचि अज्ञात । आणि वृत्ति निमतांचि अकस्मात । शून्यसंदेहीं पडसी ॥ ७८
तस्मात् पाहणें अथवा जाणणें । किंवा लक्षांशीं अनुभवणें । यया मार्गीं न जाणें । भिन्नत्वाच्या ॥ ७९ ॥
येथें विचारचि करावा । जाणण्याचा मार्ग त्यागावा । तरीच हा मायिकाचा गोंवा । तुटेल सर्व ॥ ३८८० ॥
नातरी जाणण्याचे मार्गीं चालतां । विचारा न पविजे कल्पांता । जंव जंव जाणों जाय ज्ञाता । तों तों भिन्न पडे ८१
तस्मात् रविदत्ता विचार करीं । जाणते वृत्तीचा त्याग करीं । तो विचारही येणें अवसरीं । तुज बोलून दावूं ॥ ८२ ॥
तुवां वृत्तीचा लय पाहिला । तो वृत्तीसि तों नाहीं कळला । त्या वृत्तीचाचि शून्यपणा जाहला । तरी त्या कळेना अभाव
तस्मात् तूं जो असंग ब्रह्मात्मा । अखंडैक रस परमात्मा । तयाची निजदृष्टीची गरिमा । असे लयसाक्षित्वाची ॥ ८४
वृत्तीविण वृत्तीचा लय । जाणे जो स्वतां अद्वय । तेंचि चिद्रूप निःसंशय । देखणा शून्याचा ॥ ८५ ॥
म्हणसीब्रह्मात्माजाणेलयासी । परीब्रह्मात्माकसा न ये प्रतीतीसी । तरीतोजाणावा कोणें अविनाशी । हें सांगें विचारूनी
वृत्तीनें तो कोटि वर्षें धुंडितां । कळला नाहीं जीवंत असतां । आतांतीगेलीमेलीबुडालीवार्ता । तरी पहावया योग्य नाहीं
तो जो वृत्तीचा लय जाहला । अभावशून्य म्हणावें तयाला । तया शून्यासी जाईल कळला । हें न घडे कल्पांतीं ॥८८॥
वंध्येचा पुत्र टकमकां पाहे । आकाशाचा रेणु लवलाहें । हें कधींही बोलणें न साहे । तेवीं शून्य जाणेना ॥ ८९ ॥
अरे जें उत्पन्नचि जाहलें नसतां । तें अंध ना डोळस तत्त्वतां । तें केवीं जाणेल अनंता । परमात्मयासी ॥ ३८९० ॥

---

ही रेषा मी विचाररूप निज-अंगुळीनें अनुभाव्य अंतराळीं दाखविली, तरी तूं आतां या अंगुळीचे दृष्टीनें म्हणजे विचाररूप दाखविण्यानें त्या रेषेस पहा. आतां यापेक्षां अन्य तऱ्हेनें आम्हास दाखवितां येत नाहीं, व वाचेनेंही बोलून सांगतां येत नाहीं, रविदत्ता, आतां सांगतों कीं, तुझा तूंच चंद्र आहेस; खरें कीं खोटें हें पहा. पहा असें म्हटलें म्हणून तूं निराळा चंद्र मानून पहावयास जाशील तर फसशील. कारण पाहूं लागलास किंवा जाणूं लागलास किंवा लक्षांशानें लक्षूं लागलास तर तूं वृत्तियोगच अवलंबिलास असें होईल. वृत्तियोग अवलंबिला असतां त्रिपुटी उत्पन्न होते. त्रिपुटी उत्पन्न झाली असतां विज्ञात तेंच अज्ञात होतें, व वृत्ति मावळल्यावर शून्य संशयांत पडशील, म्हणून पहाण्याच्या जाणण्याच्या किंवा लक्षण्याच्या नादींच तूं लागूं नको. कारण हे भिन्नत्वानें दाखविणारे मार्ग आहेत, करितां हे मार्ग सोडून तूं येथें उपयोगी जो विचार तो करण्याचे नादीं लाग. तूं जर जाणण्याचे नादीं लागशील तर जों जों जाणूं लागशील तों तों भिन्नत्वानें वेगळा होशील, व जाणण्याचे नादीं लागल्यामुळें तुला विचार कल्पांतींही उत्पन्न होणार नाहीं. करितां हे रविदत्ता, तूं जाणत्या वृत्तीचा त्याग करून विचार करावयास लाग. तुला मी आतां विचार सांगतों.

## ब्रह्मविचार.

तूं जो वृत्तीचा लय पाहिलास, तो लय वृत्तीचा वृत्तीला तर कळला नाहींच. कारण वृत्तीचा शून्यपणा झाला. त्या शून्यास तिचा अभाव कसा कळेल ? शून्यास अभाव कळला नाहीं तो असंग ब्रह्मात्मा जो तूं त्या तुला तुझ्या लयसाक्षित्वाच्या दृष्टीची थोरीव समजली पाहिजे. वृत्तीचा लय वृत्तीला घेतल्यावांचून जो स्वतः जाणतो, तेंच शून्यास पहाणारें चिद्रूप आहे. तूं म्हणशील कीं, ब्रह्मात्मा लयास जाणतो तो अनुभवास कां येत नाहीं ? तो जाणता येता, पण त्याला जाणण्याविषयीं त्यासारखें अविनाशी दुसरें कोण आहे ? वृत्तीनें जिवंत असतां कोटी वर्षेंपर्यंत त्याचा शोध केला तरी तिला तो कळला नाहीं. आतां ती वृत्ति गेली अथवा मेली किंवा बुडाली तरी तो तिला दिसण्याजोगा नाहीं. आतां वृत्तीचा जो लय झाला त्या अभावास शून्य म्हणावें. त्या शून्यास ब्रह्मात्मा कळेल हें तर बोलावयासच नको. जसा वांझेचा मुलगा आकाशाचा रेणु टकमकां पहातो हें बोलणें जसें संभवत नाहीं, तसें शून्य अज्ञान जाणतें आहे—सज्ञान आहे—हें बोलणें संभवत नाहीं. अरे, जें उत्पन्न झालें नाहीं तें आंधळें नाहीं व डोळसही नाहीं. तें शून्य अज्ञान; अनंत, अपार परमात्म्यास कसें जाणूं शकेल ?

तस्मात् शून्य शून्यपणें देखेना । वृत्तीही ब्रह्मात्मया जाणेना । वृत्तीनें जाणिलें तें असेना । सत्य कदापि ॥ ९१ ॥
तरी आतां कवणें जाणावें । हें यथार्थ पुरतें विचारावें । जरी म्हणसी ब्रह्म आवलोकावें । ब्रह्मरूपेंची ॥ ९२ ॥
तरी ऐकावें सावधान । हेंही न घडे विरोधी वचन । बोलसी कीं आपणासी आपण । जाणावें स्वतां ॥ ९३ ॥
डोळियासी डोळा दिसेना । रसनेसी रसना चाखवेना । आपुली ये खांदां बैसवेना । आपणासी कष्टी होतां ॥ ९४ ॥
डोळा जरी आराशियास्तव । पाहे तरी तें मिथ्या सर्व । आरशिया मुळींच डोळ्यांचा अभाव । तरी पाहिला तो मिथ्या
तो आरसा आणि आरशियाचा । डोळा पाहिला तो आभासाचा । परीडोळियासीडोळाजो असे साचा । तो न देखे सहसा
तैसा ब्रह्मात्मा जो परिपूर्ण । आपणा अमुकसा न जाणे आपण । जरीवृत्तिउठतांहोय भासमान । ज्ञाता ध्याता साधक
तयावृत्तीसीआणिभासमानासी । जाणतचि असे आत्माअविनाशी । परी तें मिथ्याचि तरी ते कायशी । जाणण्याची मात
त्याविरहित जो आपण उरला । तें तों जाणतां न ये तयाला । डोळा देखेचि डोळियाला । तेवींच ब्रह्म ब्रह्मासी ॥९९
जरीनदेखेआपआपणासी । परीजाणतसेवृत्तिवृत्तिगतासी । डोळानपाहेजरीडोळियासी । परीआरसाआभासापाहे ३९००
डोळा न देखे जरी डोळिया । तरी तें देखणें न म्हणावें वायां । तैसें ब्रह्म ब्रह्मींचें न ये प्रत्यया । तरी चिद्रूप अन्यथा नव्हे
कारण कीं डोळा अंधारा पाहे । तैसा वृत्तीचा लय जाणताहे । अंधार कीं लय जया कळताहे । हें तों नव्हे अन्यथा २
जोंवरी दीप न लागे । तोंवरी अंधार पाहूं लागे । तैशी जों कालवृत्ति नुमगे । तों काल लया जाणे ॥ ३ ॥
दीप लागतां अंधार नासे । तेव्हां डोळा प्रकाशा पाहतसे । तैशी वृत्ति जेव्हां उमसे । ती प्रकाशे जयाचेनी ॥ ४ ॥
मंदिरींचे पदार्थ सान थोर । मिळतां दीप आणि नेत्र । दिसूं लागती जे जे समोर । अंधाराभावीं ॥ ५ ॥
तैसे बुद्धीनें कल्पिले विषय । जे जे उद्भवती स्वप्नमय । ते ते पाहताति मिळोनि उभय । ब्रह्म आणि वृत्ति ॥ ६ ॥
पुस्तक वाचावया प्रसंगें । डोळा उपनेत्रही लागे । तिजा दीप मिळोनियां वेगें । मग पाहणें घडे ॥ ७ ॥

---

तस्मात् शून्य शून्यपणामुळें पाहूं शकत नाहीं, व वृत्ति त्या ब्रह्मात्म्यास जाणूं शकत नाहीं. कारण वृत्तीनें जें जाणिलें तें कधींही सत्य असत नाहीं. तेव्हां आतां या ब्रह्मात्म्यास कोणीं जाणावें हें पुरता विचार करून सांग. तूं म्हणशील कीं, ब्रह्मानेंच ब्रह्मास पहावें, पण असें घडत नाहीं, हें विरोधी वचन आहे. आपणास आपण स्वतः कसें जाणावें ?

डोळ्यास डोळा दिसत नाहीं. जिभेस जिभेची रुचि घेववत नाहीं. तसें मोठ्या कष्टानें आपल्या खांद्यावर आपण बसूं लागलों तर आपणांस बसतां येत नाहीं. डोळा आरशाचे योगानें डोळ्यास पहातो तरी तें त्याचें डोळ्याविषयींचें खरें पहाणें नव्हे. आरशास डोळे नाहींत तेव्हां आरशामुळें जो डोळा पाहिला तो पहावयाचा डोळा नव्हे, तर मिथ्या आहे. मूळ पहावयाचे डोळ्यानें आरसा व त्या आरशांत दिसलेला आभासाचा डोळा पाहिला. पण खरा मूळचा पहाणारा डोळा तो डोळ्यास दिसलाच नाहीं, व दिसावयाचाही नाहीं. तसा परिपूर्ण जो ब्रह्मात्मा तो आपणास मी अमुक असें जाणूं शकत नाहीं. वृत्ति उठल्यावर ज्ञाता, ध्याता, साधक भासमान जरी होतात, तरी त्या वृत्तीस आणि भासमानास आत्मा जाणत आहे. ध्याता, साधक इत्यादि सर्वही मिथ्याच आहेत. त्यांस जाणिलें तरी तें न जाणिल्या सारिखेंच आहे. त्याची मोठी मातबरी नाहीं. पण त्या सर्व मिथ्या वस्तूंहून जो आपण उरला तो मात्र त्यांस जाणतां येत नाहीं. जसा डोळा डोळ्यांस पहातां येत नाहीं, तसें ब्रह्म ब्रह्मास पहातां येत नाहीं. ब्रह्मात्मा जरी आपला आपणास पहात नाहीं, तरी वृत्ति व वृत्तिगत जो जीव किंवा शीव त्यांस पहातो. डोळा जरी डोळ्यास पहात नाहीं, तरी आरसा व आभास यांस पहातो. डोळा जरी डोळ्यास पहात नाहीं तरी त्याचें पहाणें व्यर्थ आहे असें म्हणतां येत नाहीं. तसें ब्रह्म ब्रह्मास पहात नाहीं तरी त्याचें चिद्रूपत्व लक्षण व्यर्थ नाहीं. डोळा जोंपर्यंत रात्रीं दिवा नाहीं तोंपर्यंत अंधारच पहातो. तशी जोंपर्यंत वृत्ति उत्पन्न झाली नाहीं तोंपर्यंत ब्रह्म तिचा लय पहातें. रात्रीं दिवा लाविला म्हणजे अंधार नाश पावतो, तेव्हां डोळा प्रकाशास पहातो तशी वृत्ति उत्पन्न होते तेव्हां ती त्याच्या प्रकाशानें प्रकाशित होते. रात्रीं दिवा लाविल्यानें अंधार नाहींसा होतो, मग दिवा आणि नेत्र यांचेयोगानें अंधाराचे अभावीं समोर असणारे मंदिरांतील लहानथोर पदार्थ दिसूं लागतात. तसें बुद्धीनें कल्पिलेले विषय जे जे स्वप्नमय उत्पन्न होतात ते ते ब्रह्म आणि वृत्ति दोघें मिळून पहातात. रात्रीचे वेळीं मंद दृष्टि असल्यामुळें पुस्तक वाचणारास नेत्र, आरशी व दिवा लागतो तेव्हां पुस्तक वाचणें घडतें.

तैसे जागृतीचे व्यापार होतां । ब्रह्मात्मा आणि वृत्तिसापेक्षता । बुद्धिज्ञानेंद्रिय सर्व मिळतां । घडती व्यापार ॥ ८ ॥
दीप अनेकही असोनी । पाहणें तें होय एका नयनीं । नेत्र नसतां व्यर्थचि दोनी । दीप कीं उपनेत्र ॥ ९ ॥
तैसे वृत्ति बुद्धि ज्ञानेंद्रिय । इतुका जरी असतां समुदाय । परी जाणणें तें एक अद्वय । ब्रह्मात्मयाचें ॥ ३९१० ॥
जाणणें ब्रह्मात्मयाचें खरें । परी हें उद्भवलें विशेषाकारें । तेणें सामान्य आच्छादून एकसरें । पाहती वाटती ज्ञानेंद्रिय
जैसें डोळियाचें पाहणें लोपलें । उपनेत्रचि पाहावया पुढें आले । परी ते परीक्षवंत जाणती भले । पाहणें कवणाचें तें
तैसें विचारवंत ते जाणती । कीं जाणता ब्रह्मात्मा चिन्मूर्ति । हे जरी वृत्ति बुद्धि इंद्रियें असती । परी उपकरणें सर्व १३
उपनेत्र असतां सूक्ष्माक्षर । न दिसे दीप आणि असतां नेत्र । परी पहातसे पदार्थमात्र । तेंही पाहणें नेत्राचें ॥ १४ ॥
तैसें ज्ञानेंद्रियावांचोनी । नघे जागृतीचे व्यापारालागूनी । परी भासविषय वृत्ति सापेक्षूनी । जाणता ब्रह्मात्मा ॥ १५॥
पदार्थजात कांहीं नसतां । एक दीप मात्र सदना आंतौता । परी तयासीही प्रकाशासाहिता । पाहणार डोळाचि ॥ १६
तैसे बुद्धीसहित भास निमाले । एक स्फुरण वृत्तींचें मात्र उरलें । परी ते वृत्ति आणि वृत्तिगता जाणिलें । आभासा ब्रह्में
तो दीपही सदनींचा निमाला । उगाचि अंधार मात्र दाटला । परी तो अंधारही नेत्रीं पाहिला । स्वयें डोळियानें ॥१८
तैशी स्फूर्ति मावळून गेली । तिच्या अभावा शून्यदशा बोलिली । परी ते लयस्थिति स्वयें अनुभविली । ज्ञानमात्रें ब्रह्में
अंधार जेणें पाहिला । तोचि डोळा अंध नाहीं जाहला । तैसा लय जेणें स्वयें अनुभविला । तो चिद्रूप नव्हे कैसा २०
पाहें अंधार पहावयासी । कोणतें साहित्य दुजें नेत्रासी । तैसा वृत्तीचा लय जाणावयासी । कोणतें उपकरण आत्मया
साहित्याविण देखे नो डोळा खरा । उपकरणें विण तोचि जाणता निर्धारा । येर साहित्य उपकरणें हीं पसारा । परी देखणें जाणणें एक

तसें जागृतीचे व्यापार होत असतां ब्रह्मात्मा, वृत्ति, बुद्धि आणि ज्ञानेंद्रियें हीं असलीं पाहिजेत, तेव्हांच ते व्यापार होतात.

रात्रीचे वेळीं पाहण्यास नेत्र, आरशी आणि दीप लागतो त्यांपैकीं दिवा व आरशी हीं दोन आहेत, नेत्र मात्र नाहीं तर तीं दोन्हीही साधनें व्यर्थ आहेत. कारण ज्यांचेयोगानें पहाणें होतें ते मुख्य नेत्रच नाहींत. मग त्या दीप अयनकाचा काय उपयोग ? तसें बुद्धि, वृत्ति आणि ज्ञानेंद्रियें यांचा जरी समुदाय आहे, तरी त्यास प्रकाशणारा एक ब्रह्मात्मा नाहीं तर त्यांचा काय उपयोग ? हा सर्व समुदाय जाणणारा ब्रह्मात्मा नसतां व्यर्थ आहेत. असो ब्रह्मात्मा जाणतो हें खरें आहे पण या समुदायाचे योगानें जाणणें विशेषाकारें उत्पन्न झालें तेव्हां त्या विशेषाकार जाणण्यानें ब्रह्मात्म्याचें सामान्य जाणणें झांकलें. म्हणून ज्ञानेंद्रियें जाणतात असें सर्वांस वाटूं लागलें. जसें मंद दृष्टीमुळें डोळ्यास स्पष्ट दिसेना म्हणून आरशी लावावी लागली, त्या आरशीनेंच दिसतें, एरव्हीं दिसत नाहीं अशी मूर्खांची समजूत आहे. पण शहाणे असें जाणतात कीं, आरशीमुळें जरी दिसतेंसें वाटतें तरी डोळ्यांनीं पाहिलें नसतां नुसती आरशी पहाण्याचें काम करीत नाहीं. म्हणून आरशीनें दिसत नाहीं, तसें विचारवंत जाणतात कीं, जाणता एक ब्रह्मात्मा आहे, वृत्ती, बुद्धि, ज्ञानेंद्रियें हीं पहाण्यास अगर जाणण्यास लागतात तरी तीं स्वतंत्रपणें जाणूं शकत नाहींत म्हणून तीं उपकरणें म्हणजे कृपेचीं साधनें आहेत. रात्रीं दिवा आणि नेत्र आहेत पण एक आरशी नाहीं तर सूक्ष्माक्षर दिसत नाहीं जरी सूक्ष्माक्षर दिसत नाहीं तरी नेत्र सर्व पदार्थ पहातात. हें पहाणें उपनेत्रावांचून नेत्राचें होतें. तसें ज्ञानेंद्रियावांचून जागृतीचे व्यापार होत नाहींत पण वृत्तीला घेऊन ब्रह्मात्मा भासविषय जाणतो रात्रींचे वेळीं मंदिरांत कांहींएक पदार्थ नाहींत एक दिवा मात्र आहे पण त्या दिव्यासही प्रकाशासहित पहाणारा एक डोळाच आहे. तसे बुद्धिसहित भास निमाले एक वृत्तींचें स्फुरण मात्र उरलें, पण त्या वृत्तीस व वृत्तीगत जो आभ्यास त्यास एक ब्रह्मच जाणत आहे, आतां सदनामध्यें दीप होता तो मालविला तेव्हां तेथें जो अंधार पडला, त्यासच नेत्र पाहूं लागला. त्याचप्रमाणें हें ब्रह्म स्फूर्तीची जी शून्यदशा तीस पाहूं लागलें. ज्यानें अंधार पाहिला तो डोळा जसा अंध नव्हे, तसा वृत्तीचा लय ज्यानें पाहिला तो चिद्रूप नव्हे असें कसें बोलावें ? हे रविदत्ता, अंधार पहाण्यास डोळ्यांस कोणते दुसरें साहित्य लागलें ? जसें त्यास अंधार पहावयास साहित्य लागलं नाहीं, तसें ब्रह्मास वृत्तींचा लय पहावयास साहित्य लागलें नाहीं. जो साहित्यावांचून पहाणारा तोच खरा डोळा, तसा उपकरणावांचून जाणणारा तोच खरा जाणता, खऱ्या जाणत्यावांचून साहित्यें किंवा उपकरणें हीं उगाच पसारा आहे. वास्तविक जाणणें किंवा पहाणें हें एक नेत्राचें किंवा ब्रह्माचें आहे.

डोळा डोळिया मात्र न देखे । आत्मा आत्मयासी नोळखे । इतुकेंन पाहणें जाणणें जें सारिखें । उणें न नव्हे सहसा२३
तस्मात् रविदत्ता ब्रह्म जाणा .या । अपेक्षा करणें तेंचि वायां । कोणी जाणताही नसतां लया । वृत्तीच्या तो जाणे२४
अरे हेंचि जाणणें स्वरूपाचें खरें । कीं लयही जाण जो निर्धारें । हा प्रत्ययचि कीं साचोकारें । कीं लय जाणता तो हा
अंधार पाहे तो हा डोळा । प्रत्यक्ष कीं देखणा निर्मळा । तैसाचि हा लयाचा टळटळा । जाणता ब्रह्मात्मा ॥ २६ ॥
डोळा न देखोनि हा देखिला । आत्मा न जाणोनि हा जाणिला । प्रत्यक्ष अपरोक्ष समजला । विचारें ज्ञानघन ॥ २७
ऐसें न जाणोनि जाणणें । हेंचि ज्ञान श्रुति अनुभवानें । येर जाणणें तेंचि नेणणें । म्हणती श्रुति आणि ज्ञाते ॥२८॥
एक लय मात्र खरा जाणावा । वृत्ति स्फूर्तिचिया अभावा । तरीच केला तो विचार बरवा । मोक्षरूप ज्ञानाचा ॥२९
रविदत्ता तुजला वृत्तीचा लय । जरी खरा आला नसेल प्रत्यय । तरी मागुतीं सांगूं उपाय । लयप्रतीतीचा ॥ ३९३०॥
वृत्ति जेथून उद्भवती । आणि होतसे कोठें समाप्ति । ते अवलोकावीं यथारीतीं । ब्रह्मरूपें तुवां ॥ ३१ ॥
वृत्ति उठतां वृत्तीचा तळवट । धरून बैसावा ज्ञानघनदाट । वृत्तीसवें उसळूं नये अफाट । पसरतां क्षणीं ॥ ३२ ॥
जैसा पाणबुडा पाणियाचा । तळ धरोनि बैसे साचा । तेव्हां गमावलिया वस्तूचा । लाभ होतो ॥ ३३ ॥
तैसें वृत्तीचें जें अधिष्ठान । धरून बैसावें स्वरूप आपण । वृत्ति जरी उठे उसळून । तरी निजसवें न उसळावें ॥ ३४॥
पाणियाचा स्वभावचि वरुती । उसळून आणावें बुडाल्याप्रती । तैसा वृत्तीचा स्वभावचि निश्चितीं । वरुती वोढावें ३५
पाणबुडा वरुती पाणिया । फेंकितां तळ धरवे तया । तैसें वृत्तीसी वरुती फेंकोनियां । आपण तळवटीं दडावें ॥ ३६ ॥
पाणी जरी खालीं वोढितां । आपण उसळून येतसे वरुता । तैसें वृत्तीसी बळें जरी आकळितां । आकळणारासह उसळे
तस्मात् पाणी वरुतीच फेंकावें । तरीच तयासी तळवट फावे । तैसें वृत्तीचें उसळणेंचि त्यागावें । आपण उरावें तळवटीं
आपण तरी तळींच असे । वृत्तीसवें नुसळे अल्पसें । परी वाउगेंचि साधका वाटतसे । कीं वृत्तीसवें आलें ॥ ३९ ॥

---

डोळा डोळ्यास मात्र पहात नाहीं, तसा आत्मा आत्म्यास ओळखत नाहीं पण यामुळें त्यांचें पहाणें किंवा जाणणें हें कमी होत नाहीं म्हणून हे रविदत्ता ब्रह्मास जाणण्याची इच्छा करणें हें व्यर्थ आहे. ब्रह्माचें हेंच जाणणें समजावें कीं, कोणी जाणत नसतां जो वृत्तीचा लय जाणतो तोच ब्रह्मात्मा होय. जो अंधार जाणणारा, तोच हा प्रत्यक्ष डोळा पहाणारा. तसा लय जाणता तोच हा ब्रह्मात्मा. जसा डोळा न पहातां पाहिला तसा आत्मा न जाणतां जाणल्याप्रमाणें आहे हा ज्ञानघन आत्मा विचारानें प्रत्यक्ष अपरोक्ष समजला. याप्रमाणें न जाणून जाणणें हेंच श्रुति आणि अनुभवानें खरें ज्ञान आहे असें ठरतें. त्याखेरीज जें जाणणें तें नेणणेंच समजावें असें श्रुति आणि ज्ञाते म्हणतात. जाणण्यापैकीं एक वृत्तीस्फूर्तीचा लय हा मात्र जाणिला पाहिजे. हा जाणल्यावांचून मोक्षरूप ज्ञानाचा विचार केला तरी तो ठीक नव्हे. रविदत्ता, तुला वृत्तीचे लयाचा जर खरा अनुभव आला नसेल तर तुला पुन्हा लय प्रतितीचा उपाय सांगतों ऐक.

वृत्ति कोठून उत्पन्न होते व कोणते ठिकाणीं लय पावते ती त्या ब्रह्मरूपानें यथारीति अवलोकावी. वृत्ति उठतांच वृत्तीचा तळ जो ज्ञानघन तो धरून बसावें. वृत्ति उठून पसरूं लागली म्हणजे आपण तिचे बराबर उसळून अफाट पसरूं नये. जसा पाणबुड्या पाण्याचा तळ धरून बसतो, तेव्हांच त्याला गमावलेली वस्तु प्राप्त होते. तसें वृत्तीचें जें अधिष्ठान तें स्वरूप धरून आपण बसावें. वृत्ति जरी उठून उसळली, तरी तीबराबर आपण उसळूं नये. पाण्याचा स्वभावच असा आहे कीं, जें बुडालें असेल त्यास उसळून वर आणावें. तसा वृत्तीचा स्वभावच आहे कीं, जें तळास गेलें असेल त्यास वर ओढावें. पाणबुड्यास तळाशीं जावयाचें असलें म्हणजे तो पाण्यास वर फेंकतो, तेव्हांच त्यास तळ मिळतो. तसा आपणास वृत्तीचा तळ सांपडण्यासाठीं आपण त्या वृत्तीस वर फेंकावें, आणि तळाशीं दडून बसावें. पाणी जर खालीं दाबलें तर आपण उसळून वर येतों. तसें वृत्तीस बळेंच जर आकळावयास गेलें, तर ती आकळणारासह वर उसळते, म्हणून पाण्यास दाबूं नये, तर वरच फेंकावें म्हणजे मग सहज तळ मिळतो. तसें वृत्तीचें उसळणेंच टाकावें, मग आपणास सहज वृत्तीचा तळ सांपडेल. तेथें आपणच उरावें. वास्तविक आपण तळींच आहें, वृत्तीबराबर अल्प सुद्धां उसळत नाहीं; पण साधकास उगीच वाटतें कीं, आपण वृत्तीबराबर उसळून आलों.

तें वाटणें त्यागावें आपण । तरी तळवटींच उरे ब्रह्म चिद्घन । तेणें आपणासमोर वृत्तिचें उठणें । आणि निमणें कळे
आपण वृत्तींत जरी न ये । तरी उठतांचि वृत्ति मावळून जाये । मग तो प्रत्यक्ष अनुभवा लय । येतसे जाण त्याच्या
तोचि लय चिरकाळ जाणावा । वृत्ति उठतांहीनिमिलस्वभावा । तयालयाचाजोजाणतांबरवा । तोचि ब्रह्मात्मानिर्विकल्प
ऐसा लयाचा खरा प्रत्यय । टळटळीत जाणावा निश्चय । तोचि लय देखणा निःसंशय । ब्रह्मात्मा निर्विकल्प ॥ ४३ ॥
तया देखणियासी कदां । लोपचि नाहीं सर्वदां । अंधार देखण्या डोळ्यासी आपदा । न ये अंधत्वाची जेवीं ॥ ४४ ॥
ऐसें चिद्रूपज्ञान ब्रह्मात्मयाचें । स्वभावलक्षण देखणें लयाचें । कळेल जया साधका साचें । तोचि ज्ञाता वास्तव ॥४५॥
ऐशिया चिद्रूप निर्विकल्पा । यथार्थ ज्ञान म्हणावें बापा । हेंचि ज्ञान संसारखेपा । तोडील साधकाच्या ॥ ४६ ॥
होंचि लय जाणतें चिद्रूप । सर्वदा सघन उणें नव्हे अल्प । तस्मात् तेंचि त्रिकालाबाधित सद्रूप । जें आहेच आहे सर्वदा
ऐसें असोनियां मंदमति । वृत्ति अभावीं नाहींच म्हणती । लयही न कळे अविचाराप्रती । तेव्हां कल्पिती नेणीव ॥ ४८
ब्रह्मात्मा तरी शून्य कीं नेणता । नव्हेचि नव्हे येणें जरीकल्पितां । परीतेचिमुकेल असतीस्वहिता । अतिप्रयत्नहीसाधूनी
असोतयामूढांसी कायकाज । परीखऱ्यासाधका निरवणें आज । कीं शून्य संदेह न व्हावा सहज । असे तो ज्ञानघन कळावा
म्हणोनि शून्य खंडन यथामति । कीजे कळावया साधकाप्रती । परी आधीं आशंका जे करिती । शून्यवादी ते ऐका ५१
असताचि पूर्वीं आहे । ऐशी श्रुतीच म्हणताहे । आणि अनुभवही लाहे । वृत्तीविण समाधींत ॥ ५२ ॥
वृत्ति तोंवरी जाणणें घडे । वृत्तिअभावीं शून्य उघडे । आहे तरी अनुभवा न जोडे । तस्मात् शून्यरूप ब्रह्म ॥ ५३ ॥
ऐशिये आशंकेचें उत्तर । ऐकावें होऊनि निरुत्तर । श्रुति जरी बोले असदेवअग्र । परी तात्पर्य वेगळें ॥ ५४ ॥
हें हें स्फूर्तिपासून ऐलीकडे । जितकें देहादि जग उघडें । हें सर्व आहे वाटे तें मोडे । असद्रूप होतें ॥ ५५ ॥
हें कांहीं जाहलें नव्हतें । उत्पत्तिपूर्वीं असताचि होतें । पुढें सृष्टिकाळीं जाहलें दिसतें । आहे म्हणावया ॥ ५६ ॥
तस्मात् हें हें नव्हतें म्हणून । श्रुति बोले याचें होय शून्य । येरवीं ब्रह्म पूर्वीं जें सचिद्घन । तया शून्यत्व म्हणेना ५७

---

तें वाटणें आपण टाकावें, तेव्हां तळीं ब्रह्मचिद्घन उरतें, त्यायोगानें आपणासमोर वृत्तीचें उठणें व निमणें कळतें. आपण वृत्तींत जर येणार नाहीं, तर वृत्ति उठल्याबराबर ती मावळून जाते. मग तिचा लय जाणत्याच्या अनुभवास प्रत्यक्ष येतो. तोच लय चिरकाळ जाणावा. त्या लयाचा जाणता तोच निर्विकल्प ब्रह्मात्मा. याप्रमाणें लयाचा प्रत्यय टळटळीत जाणावा. तोच लय पहाणारा ब्रह्मात्मा निर्विकल्प, त्याच्या देखण्यास कधींही लोप नाहीं. जसे अंधार पहाणारे डोळ्यास अंधत्वाची आपदा येत नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्मात्म्याचें चिद्रूप ज्ञान, जें लयाचें देखणें स्वभाव लक्षण तें ज्या साधकास खरें कळलें, तोच खरा ज्ञाता. अशा निर्विकल्प चिद्रूपास यथार्थ ज्ञान म्हणावें. हेंच ज्ञान साधकाच्या संसारखेपा तोडील. हेंच लय जाणतें चिद्रूप. हें सर्वदां सघन आहे, हें अल्प सुद्धां उणें होत नाहीं, म्हणून तेंच त्रिकालाबाधित सद्रूप सर्वदां आहेच आहे. असें चिद्रूप त्रिकालाबाधित असतांही मंदमति वृत्तीचे अभावीं नाहींच असें म्हणतात, व त्यांस लय कळत नाहीं म्हणून ते नेणीव कल्पितात. त्या मंदमतींनीं ब्रह्मात्म्यास शून्य किंवा नेणता असें मानिलें, तरी तो शून्य किंवा नेणता होत नाहीं; पण जे प्रयत्न करून शून्य संदेहांत पडले ते मात्र स्वहितास मुकले. त्या मूर्खांस सांगण्याचें आम्हांस कारण नाहीं, पण जो खरा साधक असेल त्यास आज हेंच सांगतों कीं, तुला शून्य संदेह होऊं नये, तर जो ज्ञानघन आहे तोच कळावा, याकरितां शून्यखंडण करितों. त्याविषयीं शून्यवाद्यांची जी शंका आहे ती प्रथम सांगतों.

## शून्यखंडन.

शंका—असतच पूर्वीं आहे असें श्रुतीच म्हणते, व वृत्तीवांचून समाधींत असाच अनुभव येतो. जोंपर्यंत वृत्ति आहे तोंपर्यंत जाणणें घडतें. वृत्तीचा अभाव झाल्यावर शून्यत्व उघड रहातें. ब्रह्म जर आहे असें म्हणावें तर तें अनुभवास येत नाहीं, म्हणून ब्रह्म शून्यरूपच आहे.

उत्तर—श्रुति जरी असदेव अग्र म्हणते, तरी तिचें तात्पर्य निराळेंच आहे. स्फूर्तीपासून अलीकडे जितकें देहादिक जग आहे हें अलीकडे उघडें आहे, हें सर्व असद्रूप होतें तें मोडतें, हें कांहीं झालें नव्हतें, उत्पत्तीपूर्वीं असतच होतें, पण सृष्टीकाळीं दिसतें झालें, म्हणून यास आहे म्हणणें आलें. हें सर्व जग पूर्वीं नव्हतें म्हणून याचें शून्यत्व आहे, असें श्रुति बोलत होती, पण सच्चिद्घन जें पूर्ण ब्रह्म आहे त्यास शून्य असें श्रुति म्हणत नाहीं.

ऐसें श्रुतीचें तात्पर्य वेगळें। या मूढाप्रति तें यथार्थ न कळे । ब्रह्माचि शून्य म्हणूनि निराळे । पडिले कल्पवरी ॥ ५८ ॥
जरी श्रुतींचा भावार्थ ऐसा । नसे जरी यदर्थीं अल्पसा । तरी सतचि पूर्वीं आहे कैसा । उच्चार करिती ॥ ५९ ॥
तस्मात् श्रुति असत् होतें म्हणून । हे हे पदार्थ नव्हते संपूर्ण । ब्रह्म तें सद्रूप आहे पूर्ण । ऐसें तात्पर्य श्रुतीचें ॥ ६० ॥
तथापि शून्यवादी नायकती । तरी पुसावें हें तयांप्रती । इदं इदं याची काय गति । श्रुति बोलिली जे ॥ ६१ ॥
इदं इदं नव्हतें म्हणतां । शून्य आलें यया समस्तां । येन्हवीं इदंतेची वार्ता । ब्रह्मीं शून्यासहित नसे ॥ ६२ ॥
हेंही असो असत् आहे । हा तों विरोध प्रत्यक्ष पाहे । अंध डोळस मुका बोलका हे । तैसेंचि हेंही वचन ॥ ६३ ॥
आहे तें नाहीं कदा न होय । नाहीं तें आहे हा नव्हे प्रत्यय । एकासीच हें रूप उभय । हा केवढा विरोध ॥ ६४ ॥
ऐशिया विरोधाकरितां । शून्य आहे न ये स्थापितां । तरी दोहींतून एकचि आतां । सांगा म्हणावें निवडूनी ॥ ६५ ॥
नाहींच म्हणून जरी सांगसी । तरी शून्य नाहींच कल्पांतेंसी । हें तों इष्टचि असे आम्हासी । शून्य नाहीं तें नाहीं॥६६॥
आतां शून्य आहे बोलशी जरी। तरी विरोधचि सांगितल्यापरी। तथापि सताच्या योगें बोलतां उत्तरीं। हेंही तों अति इष्ट
जैसें जगही सताच्या योगें । आहे म्हणून बोलावया जोगें । तैसें शून्यही असो प्रसंगें । येणें सत् तें सिद्ध जाहलें ॥६८
रज्जु असून सर्प म्हणतां । परी दोरी आहे ती न सारी परता। तैसें सताच्या योगें शून्य भाविता । सद्रूप तया अधिष्ठान
मागुतीं वादी कोणी म्हणती । कीं सताचा योग कासया निश्चितीं । असताचि आहे ब्रह्म चिन्मूर्ती । विरोध तरी कैंचा
तरी अवधारा सूर्यचि अंधार । हा कधीं तरी होईल निर्धार । अथवा राहेल दिनकरासमोर । हेंही न घडे ॥ ७१ ॥
तैसें ब्रह्म तों नव्हेची शून्यरूप । जें लयसाक्षीज्ञानस्वरूप । अथवा सतसंयोगीही नव्हे अल्प । मी सद्रूपीं उरेल ॥७२॥
एवं शून्य नाहीं तें नाहींच नाहीं । आहे तें आहेच सर्वदांही । यथें शंका कवणाचीही । न चले सर्वथैव ॥ ७३ ॥
ऐसें श्रुति युक्ति या उभयानें । शून्याचा न घडेचि संभवणें । आतां अनुभव नाहीं जरी म्हणे । तरी याचें उत्तर ऐका

याप्रमाणें श्रुतीचें तात्पर्य आहे, तें या मूर्खांस कळत नाहीं. ते ( भु ) शून्यास ब्रह्म मानून राहिले, म्हणून ते कल्पपर्यंत निराळेच राहिले. आम्ही सांगतों असा जर श्रुतीचा भावार्थ नसता तर सत्च पूर्वीं आहे, असा ती पूर्वीं उच्चार कसा करिती ? हें सर्व जग असत् होतें म्हणजे पूर्वीं नव्हतें, तर पूर्वीं सत् जें ब्रह्म तेंच होतें, असें श्रुतीचें तात्पर्य आहे. इदं; इदं म्हणजे हें हें नाहीं असें म्हटल्यानें शून्यत्व या सर्वांस आलें. एरव्हीं इदंतेची वार्ता ब्रह्मीं शून्यसहित नाहीं. हें असो.

असत् आहे हें बोलणें विरोधी दिसतें. जसें अंध डोळस आहे, मुका बोलका आहे, हें बोलणें विरोधी, त्याचप्रमाणें असत् आणि तें आहे हेंही बोलणें विरोधी. कारण, जें आहे तें कधीं नाहीं असें होत नाहीं. जें नाहीं तें आहे असा अनुभवही नाहीं. असें असतां एकास आहे आणि नाहीं हें म्हणणें मोठेंच विरोधी आहे. या विरोधामुळें शून्य आहे, असें स्थापितां येत नाहीं. तर आतां या दोहोंपैकीं एक काय तें सांगा. तुम्ही जर शून्य नाहींच असें सांगाल तर शून्य कल्पांतींही नाहीं हेंच आम्ही म्हणत आहों, आतां शून्य आहे, असें जर सांगाल तर असें म्हटल्यानें विरोध येतो, हें वर दाखविलेंच आहे, तेव्हां शून्य आहे असें म्हणतां येत नाहीं. तथापि सताचे योगानें शून्य आहे असें बोलाल तर तेंही आम्हांस इष्टच आहे. जसें सताचे योगानें जग आहे असें बोलतां आलें म्हणजे आमची सत् वस्तु कबूल केलीत. तसेंच सताचे योगानें शून्य आहे म्हटल्यानें शून्याचें अधिष्ठान आमचें सत् आहे, असें तुम्ही कबूल केलेंत. जसें रज्जू असून तिला सर्प म्हणतां, पण सर्प ठेवून दोरी दूर करीत नाहीं. तसें सताचे योगानें शून्य आहे असें मानिल्यानें त्या शून्याचें सत् हें अधिष्ठान कायम रहातें.

शंका--तुम्ही शून्याशींच तिचा योग कां करता ? आमचें ब्रह्म असत् आहे, मग तर विरोध येणार नाहींना ?

उत्तर--सूर्यच अंधार असें कधीं तरी होईल बरें ? तो अंधार तरी सूर्यासमोर उभा राहील काय ? हें जसें घडत नाहीं तसें ज्ञानस्वरूप लयसाक्षी ब्रह्म शून्यरूप होत नाहीं व शून्य सत्संयोगी अल्पही होत नाहीं. मग तें सद्रूपीं कसें उरेल ? एवं शून्य नाहीं तें नाहींच नाहीं, जें आहे तें सदोदीत आहेच. याविषयीं कोणाचीही शंका सर्वथा चालावयाची नाहीं. याप्रमाणें श्रुतियुक्ती या दोहोंनीं शून्याचें संभवणें घडत नाहीं असें ठरविलें, आतां अनुभवानेंही शून्याचें संभवणें होत नाहीं हें ठरवूं.

शंका--अनुभव नाहीं म्हणतात तर याचें उत्तर ऐका.

वृत्तीचा अभाव जो जाहला । तो शून्य म्हणून भाविला । त्या शून्याचा प्रत्यय आला । कीं नाहीं त्या पुसावें ॥ ७५
म्हणतां शून्याचा प्रत्यय नाहीं । उगाचि वृत्ति उद्भवतां मानिला तोही । कीं लय वृत्तीचा तोंवरी कांहीं । न होतेंचि तेथें
ऐशिया विकल्पीं तों आधीं । शून्य नाहींच नाहीं जाहलें कधीं । वृत्तीचा आहेपणा जो बुद्धि । तोचि नाहींसा जाहला
अर्थात् हें अवघें नाहीं जाहलें । वृत्तीसह सर्वां शून्यत्व आलें । तेंचि शून्य म्हणून अनुमानलें । सद्रूप संचलें तें शून्य नव्हे
म्हणतां शून्याचा प्रत्यय आला । वृत्तिअभावीं शून्यपणा जाणिला । याही विकल्पीं तो जाणता जाहला । शून्याचा आत्मा
अर्थात् शून्यरूप वृत्तीचा लय । जाणिला जेणें तो एक अद्वय । तोचि लयसाक्षीचा प्रत्यय । जयासी तो शून्य कैसा
एवं श्रुतियुक्ति अनुभवेंकडून । शून्य संभवेना असें म्हणून । तथापि शून्यवादी बळें स्थापन । करिती ते करोत ॥ ८१
परी रविदत्ता तुवां विचारावें । लयसाक्षित्व खरें जाणावें । जाणतां तो कदा शून्य नव्हे । आहे तोचि लयसाक्षी ॥८२
मालविलें जेणें दीपासी । तो उरे मालवितां आहेपणेंशी । दीपासवें मरे जरी अंधारासी । मग पाहेल कोण ॥ ८३ ॥
तैसा वृत्तीचा जो लय जाहला । तो सद्रूप साक्षीनें देखिला । तयासी शून्यपणा जरी आला । तरी अभाव पाहिला कोणें
लय वोळखिला जयानें । तोचि साक्षी चिद्रूप देखणेपणें । आहे तोचि जाणना होणें । जाणता तोचि आहे ॥ ८५॥
एवं चिद्रूप तोचि सद्रूप । तोचि ब्रह्मात्मा निर्विकल्प । आणि तोचि एक आनंदरूप । स्वभाव लक्षण हेंही ॥ ८६ ॥
वृत्ति उद्भवतां वृत्तीपासोनी । ऐलाड जितुकी तत्त्व श्रेणी । तितुकीही सुखदुःखें व्यापूनी । असती सर्व ॥ ८७ ॥
तया वृत्तीचाचि संबंध जयासी । नसे किमपि तिहीं काळेंसी । तरी सुखदुःखें अविनाश स्वरूपासी । स्पर्शती कैशीं८८
तस्मात् सुखदुःखावीण एक । तेंचि निजसुख निश्चयात्मक । ब्रह्मानंद निर्विकल्पक । त्रिकालाबाधित ॥ ८९ ॥
कोणी तयासी अनुभवीना । अनुभविलिया नांव वासना । तो वासनानंद जेथें उरेना । ध्यातेपणासह ॥ ९० ॥
केवळ उर्वरित ब्रह्मानंद । त्रिपुटीविण स्वानंदकंद । असेचि असे पूर्ण विशद । तिहींही काळीं ॥ ९१ ॥
जैसें सद्रूप शून्याविण । आहेचि आहे परिपूर्ण । परी वृत्तीसी नेणवे अमुकसें म्हणून । ग्रहणही नव्हे ॥ ९२ ॥

---

वृत्तीचा जो अभाव झाला तच शून्य, अशी कल्पना केली; त्या शून्याचा प्रत्यय आला किंवा नाहीं हें शंकाकर्त्यास पुसावें. तो जर शून्याचा प्रत्यय नाहीं, वृत्ती उत्पन्न होतांच उगाच मानिला. कारण वृत्तीचा लय होता तेव्हां तेथें कांहींच नव्हतें असें म्हणेल तर या विकल्पानें शून्य कधींही नाहींच नाहीं असें ठरलें; तेव्हां वृत्तीचा आहेपणा जो बुद्धीनें ठरविला होता, तोच नाहींसा झाला. अर्थात् हें अवघें नाहीं असें झालें. वृत्तीस सर्वांस शून्यत्व आलें, तेंच शून्य असें अनुमानिलें. पण सद्रूप जें संचललें आहे तें शून्य नव्हे.

तुम्हीं म्हणता कीं, शून्याचा प्रत्यय आला. वृत्तीचे अभावीं शून्यपणा जाणिला, या विकल्पांतसुद्धां शून्याचा जाणता आत्मा झाला. अर्थात शून्य ( वृत्तीचा लय ) ज्यानें जाणिला, तोच लयसाक्षीचा प्रत्यय ज्याला आहे तो शून्य कसा होईल ? याप्रमाणें आत्मा आहे, म्हणून श्रुतियुक्तीअनुभवानेंसुद्धां शून्य संभवत नाहीं. असें असून जर शून्यवादी बळेंच शून्य आहे असें स्थापन करितील तर करोत. पण त्वां रविदत्ता विचार करून लयसाक्षित्व खरें जाणावें. जो जाणता तो कधींही शून्य होत नाहीं म्हणून जो आहे तोच लयसाक्षी खरा समजावा.

ज्यानें दिवा मालविला तो मालवणारा दीपाचे अभावीं आहेपणानें उरतो, जर तो दीपाबरोबर मरेल तर अंधार आहेसें कोण पाहील ? तसा वृत्तीचा जो लय झाला तो सद्रूपसाक्षीनें पाहिला, त्या साक्षीचाच जर शून्यपणा असला तर अभाव कोणी पाहिला सांगा ? ज्यानें लय पाहिला तोच चिद्रूपपणें देखणारा साक्षी, जो उरतो म्हणजे आहे तोच चिद्रूप व जो चिद्रूप तोच आहे. जो चिद्रूपसद्रूप तोच निर्विकल्प ब्रह्मात्मा, तोच आनंदरूपही आहे. वृत्ती उत्पन्न होतांच वृत्तीपासून अलीकडची जितकी तत्वश्रेणी तितकीही सर्व सुखदुःखानें व्यापून आहे. त्या वृत्तीचा संबंध ज्यास तिन्ही काळींही किमपि नाहीं, मग त्या अविनाश स्वरूपास सुखदुःखें कशीं स्पर्शतील ? ज्यापेक्षां तीं स्पर्श करीन नाहींत त्यापेक्षां सुखदुःखावांचून असणारें ब्रह्मानंद निर्विकल्पक त्रिकालाबाधित तेंच खरें निजसुख. त्या सुखास कोणी अनुभवीत नाहीं. जर अनुभवील तर ती वासना समजावी. तो वासनानंद जेथें ध्यातेपणासह उरत नाहीं, तर केवळ उर्वरीत ब्रह्मानंद त्रिपुटीवांचून स्वानंदकंद तिन्हीही काळीं पूर्णपणें असतो, जसें सद्रूप शून्यावांचून पूर्णपणें आहेच आहे. पण वृत्तीला अमुक असें जाणवत नाहीं म्हणून तिला ग्रहण होत नाहीं,

ाचि चिद्रूपही असतां । वृत्तीसी न कळे तत्त्वतां । तैसाचि आनंदही अनुभवितां । नये वृत्तीसी ॥ ९३ ॥
ाचिदानंद ब्रह्मस्वरूप । तिहीं लक्षणीं ब्रह्म निर्विकल्प । वृत्तीसी अमुकसें न कळे अल्प । निर्विकल्प याचि हेतु ॥९४
ृत्ति जरी तयासी अनुभवी । तरी निर्विकल्पता केवीं बोलावी । तस्मात् त्रिपुटीविण स्वतःसिद्ध गोसांवी । सच्चिदानंद
य्यसाक्षीचा जो प्रत्यय । तोचि चिद्रूपपणें अद्वय । आहे तोचि लया जाणता होय । आणि तोचि सुखरूप ९६ ॥
यासी कोणी अनुभविना । आणि आपण आपणाही जाणेना । याचि हेतु निर्विकल्प वचना । बोलिलें मूळ श्लोकीं
यात् म्हणिजे आहेचि आहे । तेंचि शून्यातीत ब्रह्म पाहे । सर्व अभावीं उर्वरित राहे । सच्चिदानंद ब्रह्म ॥ ९८ ॥
नगा रविदत्ता ऐसें जें स्वरूप । सच्चिदानंद ब्रह्म निर्विकल्प । तेंचि तूं आत्माराम एकरूप । त्रिविधाप्रतीति ॥ ९९ ॥
्वां निर्विकल्प अनुभविलें । लयसाक्षित्व न जाणोनि जाणिलें । निश्चयेंसीसदृढबाणलें । या नांव आत्मप्रतीति ४००
ातां आम्हीं पूर्वीपासून । जें जें केलें सांग निरूपण । विवेचन अथवा अभ्यासलक्षण । यथायुक्त ज्या रीतीं ॥ १ ॥
या त्या रीतीं तुवा विश्वासें । असंभावना टाकून एकरसें । धरिलें असेल दृढमानसें । तेचि गुरुप्रतीति ॥ २ ॥
ाम्हीं जरी जितुकें निरोपिलें । अप्रमाण एकही नाहीं बोलिलें । शास्त्ररीतींच युक्तीनें बिंबावलें । या नांव शास्त्रप्रतीति
तुक्याही प्रत्ययाचें सार । जें निर्विकल्प ब्रम्ह निर्विकार । विवेचनें आणि अभ्यासप्रकार । व्यतिरेकें भेटविलें ॥ ४ ॥
ही महावाक्यें वेदांचीं । बोलत असती अर्थ ह्याची । तत्वमस्यादिकडोनि साची । तत्वमेव म्हणोनी ॥ ५ ॥
ाम्हीं उपदेशरीती सांगितलें । तें तुवां अनुभवें पाहिजे घेतलें । म्हणोनि यजुर्वेद महावाक्य बोले । ह्याचि अर्थ प्रगट६

**अहं ब्रह्म इति वाक्येनसः अयं अर्थः अभिधीयते ॥**

ाहंब्रम्हास्मि जें प्रसिद्ध वचन । तोचि हा अर्थ या वाक्येंकडून । बोलिजेत आहे निवडून । जें निर्विकल्प ब्रम्ह तूं ७
ो सविकल्पांत नाहीं आला । बत्तिसातीत असंभाव्य संचला । वृत्तीही न जाणे तयाला । तोचि हा अर्थ आत्मा ॥८
ो वृत्तीसी तरी कळेना । परी वृत्तीचा लय जो देखणा । तोचि हा अर्थ पूर्णपणा । आत्मा ब्रह्म निजांगें ॥ ९ ॥

---

ा सद्रूप तेंच चिद्रूप असतांही, वृत्तीस, कळत नाहीं. तसाच ानंदही तिला अनुभवितां येत नाहीं. सच्चिदानंद ब्रह्म वरूप, तिहीं लक्षणांनीं ब्रह्म निर्विकल्प आहे. तें वृत्तीस मुक आहे असें अल्पसुद्धां कळत नाहीं. म्हणून त्यास ोर्विकल्प असें म्हटलें. वृत्ती जर त्यास अनुभवील तर ोर्विकल्प असें कसें म्हणतां येईल ? ज्यापेक्षां वृत्तीस नुभवितां येत नाहीं त्यापेक्षां तें त्रिपुटिवांचून सच्चि ानंद स्वतःसिद्ध आहे. लयसाक्षीचा प्रत्यय तोच चिद्रूप. ो आहे तोच जाणता होतो. म्हणून चिद्रूप तोच स- प व सद्रूप तोच आनंदरूप; त्यास कोणी जाणत नाहीं तो आपण आपणसही जाणत नाहीं, म्हणूनच मूळ लोकांत त्यास निर्विकल्प असें म्हटलें आहे. आणि यात् हें पद घातलें आहे याचा अर्थ जे आहेच आहे, शून्यातीत ब्रह्म सर्वांचे अभावीं उर्वरीत रहातें. रवि- त्ता असें जें स्वरूप सच्चिदानंद ब्रह्म निर्विकल्प आहे च त्रिधाप्रतितीनें तूं आत्माराम एकरूप आहेस.

**आत्मप्रतीती**–त्वां रविदत्ता, निर्विकल्प अनुभविलेंस, यसाक्षित्व न जाणून जाणलेंस आणि तेंच निश्चयानें ला सदृढ बाणलें याला आत्मप्रातिति म्हणतात.

**गुरुप्रतिति**–रविदत्ता, पूर्वीपासून आम्ही विवेचन अ- वा अभ्यासलक्षण जें जें सांग निरूपण केलें व यथा- युक्त ज्या रीतीनें सांगितलें, त्या त्या रीतीनें त्वां विश्वा- सानें असंभावना टाकून एकरसें दृढ मनामध्यें धरिलें तेंच गुरुप्रतिति.

**शास्त्रप्रतिति**–रविदत्ता, आम्ही जितकें निरूपण केलें त्यांत एकही अप्रमाण सांगितलें नाहीं तर शास्त्ररीतीनेंच युक्तीचे द्वारें बिंबविलें याला शास्त्रप्रतिति म्हणतात.

आत्मप्रतिति गुरुप्रतिति आणि शास्त्रप्रतिति ह्या ति- न्ही प्रत्ययांचें सार, जें निर्विकल्प निर्विकार ब्रह्म, तें वि- वेचनानें व अभ्यास प्रकारानें व्यतिरेक करून भेटविलें हेंच चार वेदांची चार महावाक्यें सांगतात. तत्वम- स्यादि महावाक्यानें तेंच तूं आहेस असें आम्हीं उपदेशरीतीनें सांगितलें. जें आम्हीं सांगितलें तें त्वां अनुभवानें घेतलें पाहिजे म्हणून यजुर्वे- दांतील महावाक्य ह्याच अर्थ प्रगट करतें. तोच अर्थ अहंब्रह्मास्मि या वाक्यानें विवेचन करून सांगत आहों कीं, जे निर्विकल्प ब्रह्म तेंच तूं स्वतः आहेस. जो बत्तिसांत असंभाव्य संचलेला असून सविकल्पांत आला नाहीं व त्यास वृत्तीही जाणत नाहीं तोच हा आत्मा. जो वृत्तीला तर कळत नाहीं पण जो वृत्तीचा लय पाहतो तोच तूं आत्मा ब्रह्म.

तोचि मी जरी प्रतीतिं घेतली । तरी ते ग्राहकता जीवाकडे आली । नुसधी जे निर्विकल्पता संचली । तो तूं ब्रह्म आत्मा
अथवा स्फूर्तिपासून जागृतीपर्यंत । व्यापकत्वें निर्विकल्प व्याप्त । परी त्या त्या विकल्पां न पावत । तो तूं ब्रम्ह आत्मा
जैसा दीप पदार्थ उपनेत्राहूनी । डोळा एकरूप असतां स्वस्थानीं । तो पहावा ऐशी इच्छा धरोनी । परतला मार्गे ॥१२
उपनेत्र आणि अक्षरें पोथीचीं । दीपप्रकाशी कीं पदार्थ इंद्रियांचीं । इतुकें दिसती तया डोळिया रीची । परी हे तया न पाहती
ऐसा प्रत्यक्ष डोळा उघडा । परी अप्रत्यय म्हणून जाहला वेडा । तेव्हां दीपही मालवूनि कोडा । अंधार नेत्रा दाविला
तेव्हां तो अधिकचि भांबावला । म्हणे कांहीं न दिसे अंधार दाटला । येव काण एकें हासकिला । कीं अंधार दिसेकवणा
जयासी अंधार प्रत्यक्ष दिसे । तोचि कीं डोळा देखणा असे । मग डोळिया डोळा न भासे । तरी डोळा तो हाची १६
ऐसें अन्याचें ऐकोनि वचन । पाहता जाहला विचार करून । तंव अंधार देखणा हाचि नयन । हा प्रत्यय बाणला त्या
ऐशिया दृष्टांता पडिपाडें । द्राष्टांतींही पहा उघडें । स्फूर्तिपासूनियां ऐलीकडे । जागृतीपर्यंत ॥ १८ ॥
दीप अयनक आणि पुस्तकाक्षर । वाची तैसाचि जागृतीचा प्रकार । वृत्ति बुद्धि इंद्रियादि व्यवहार । प्रत्यक्ष विषय घेणें
हें पूर्वीच असे स्पष्ट केलें । जागृतीसी पुस्तक पाहणें कल्पिलें । आणि मंदिरींचे पदार्थ दीपें पाहिले । तैशी स्वप्नावस्था
असो वृत्ति बुद्धि इंद्रियें विषय । हाचि जागृतीचा समुदाय । इतुकियाचा जाणता अद्वय । निर्विकल्प आत्मा ॥ २१
ऐसा तू सहजचि असरी । स्वप्रकाशें सर्वा जाणशी । परी मज मी नेणें म्हणानि पुसों येशी । गुरुत्व आम्हां भावोनी
मग आम्हींही तुजला बहु प्रकारें । सांगितलें विवेचन विस्तारें । परी तूं न जाणशी साचोकारें । मंदप्रज्ञ म्हणानि २३
तेव्हां अभ्यास समाधीचा । सांगितला विवेचनासह साचा । हे वृत्ति बुद्धि इंद्रियविषयांचा । प्रत्यक्षपणा दाविला ॥ २४॥

---

तोच मी अशी प्रतिति घेतली, तर प्रतिति एक वस्तु, व तिचा घेणारा जीव अशी ग्राह्य ग्राहकता उत्पन्न होते, म्हणून प्रतिती घ्यावयास जातां उपयोगाचें नाहीं. तर नुसती निर्विकल्पता संचली आहे, तोच तूं ब्रह्मात्मा. अथवा स्फूर्तिपासून जागृतिपर्यंत व्यापकत्वानें निर्विकल्प व्याप्त आहे, पण तें त्या त्या विकल्पास पावत नाहीं तोच तूं ब्रह्मात्मा आहेस.

जसा दिवा, पदार्थ आणि आरशी यांहून डोळा एकरूप स्वस्थानीं असतां त्या डोळ्यास पहावें असें मनांत आणून डोळा पुढील पदार्थ पहावयाचें टाकून डोळ्यासच म्हणजे आपणास पहाण्याकरितां मार्गे परतला. दिवा रात्रीं लाविला म्हणजे तो घरांतील पदार्थ, वाचावयास घेतलेल्या पोथीचीं अक्षरें व डोळ्यास लाविलेली आरशी, यांस प्रकाशितो, व डोळा त्या प्रकाशासह सर्व पदार्थांस पहातो, पण हे वर दाखविलेले पदार्थ कोणीही डोळ्यास पहात नाहींत. असा प्रत्यक्ष डोळा उघडा असतां प्रत्यय येत नाहीं म्हणजे डोळ्यास प्रत्यक्ष डोळा दिसत नाहीं, म्हणून तो वेड्यासारखा झाला, तेव्हां प्रत्यय येण्याकरितां दिवा मालविला; आणि अंधार डोळ्यास दाखविला. तो अंधार डोळ्यानें जेव्हां पाहिला तेव्हां तर तो अधिकच भांबावला आणि म्हणतो कीं, अंधार दाटल्यामुळें कांहींच दिसत नाहीं, असें जो तो म्हणत आहे तों कोणी एकानें त्या डोळ्यास विचारिलें कीं, अरे अंधार जो दिसला तो कोणाला दिसला. ज्याला अंधार प्रत्यक्ष दिसला तोच पहाणारा डोळा आहे. मग जरी तो डोळा डोळ्यास दिसत नाहीं तरी जो डोळा म्हणतात तो हाच आहे. असें जेव्हां दुसऱ्याचें वचन डोळ्यानें ऐकिलें तेव्हां तो विचार करून पहातो तों, अंधार पहाणारा तोच डोळा असा प्रत्यय त्या डोळ्यास बाणला. याचा दृष्टांताचे हिशेबानें द्राष्टांतीं स्फूर्तिपासून अलीकडे जागृतीपर्यंत ब्रह्म उघडें आहे. दिवा, आरशी आणि पुस्तकाक्षर वाचणें, तसाच जागृतीचा प्रकार आहे, म्हणजे वृत्ति, बुद्धि, इंद्रियें, यांचा प्रत्यक्ष विषय घेणें हा व्यवहार आहे. हें पूर्वीच स्पष्ट केलेलें आहे. जसें पुस्तक पहाणें तशी जागृति. घरांतील पदार्थ दिव्यानें पाहिले त्याचप्रमाणें स्वप्नावस्था आहे. असो. वृत्ती, बुद्धि, इंद्रिय, विषय हाच जागृतीचा समुदाय आहे. व या समुदायास जाणता निर्विकल्प आत्मा आहे. असा तूं सहज आहेस, व स्वप्रकाशानें सर्वांस जाणतोस; परंतु मला गुरुत्व मानून मी कोण, हें मी जाणत नाहीं, हें मला सांगा, असें विचारावयास आलास. तेव्हां आम्हीही तुला विवेचन विस्तारानें पुष्कळ प्रकारें सांगितलें. पण तूं मंदबुद्धि असल्यामुळें साचोकारें जाणत नाहींस, असें पाहिलें. तेव्हां समाधीचा अभ्यास विवेचनासह सांगितला. तसेंच वृत्ति, बुद्धि, इद्रियें, विषय यांचा प्रत्यक्षपणा दाखविला.

हे जड परप्रकाशक सर्व । याचा जाणता तूंचि सदैव । हे दाखविले वेगळाले स्वभाव । परी तुज नुमजे ॥ २५ ॥
मग पुढें कल्पना जे अंतरीं । विषयाध्यासे स्वाप्रानुकारी । याचाही जाणता तूंचि निर्धारी । हेंही दाखविलें ॥ २६ ॥
तरी ही तुज उमजेना । तेव्हां हे बुद्धीची सारोनी कल्पना । दाखविलें नुसधिया स्फुरणा । मध्य संधीसहित ॥२७॥
त्या वृत्तीमुळें वृत्तीच जाणती । वाटती जाहली तुजप्रती । मग पुढें दाविली तिची समाप्ति । शून्याकारता ॥२८॥
तेव्हां तों अधिकचा गडद पडे । वृत्तीचें साक्षित्व ही मोडे । लय जाणणें असोनि उघडें । शून्यदशा भाविसी ॥२९॥
मग येथील जो कां विचार । लयाचा तरी कळे निर्धार । न कळणें तो नाहीं साचार । नेणणें कळे तें ज्ञान ४०३०
ऐसा विचार जेव्हां सुचविला । जेवीं डोळा पाहे अंधाराला । तेव्हां तुज लय प्रतीतीस आला । तो प्रत्यय जया तोचि तूं
अगा रविदत्ता खरें कीं खोटें । विचारून पाहें हें गोमटें । लयरूप शून्य जें तुजला भेटे । तें शून्यासी कीं अन्यासी
हाचि प्रकार तुजला मागें । विचाररूप विवेचनाचे प्रसंगें । सांगितला होता तो उमगे । आतां अभ्यास जाहलिया
तेव्हां हा आत्मा म्हणोनि प्रत्यक्ष । दाविला होता स्वप्रकाश अपरोक्ष । परी तुझी वृत्ति अभ्यासें दक्ष । नव्हती सूक्ष्मत्वें
म्हणोनि तुजला तये समयीं । प्रतीती न ये निःसंशयीं । कारण कीं वृत्त्यादिकांचे समुदायीं । नेणपणें पडसी ॥३५॥
आतां अभ्यासें तुजला । वृत्तीचा लय प्रत्यया आला । तस्मात् मागील निरूपणाला । आलोडून पहावें ॥ ३६ ॥
तें निरूपण कोणतें म्हणसी । तरी जें अयमात्मा या वाक्यासी । स्पष्ट केलें देऊनि दृष्टांतासी । याचि डोळियाच्या
दीप अयनकामुळें पदार्थ । अथवा पुस्तकाक्षरें अर्थ । कळती परी नेत्रचि समर्थ । स्वप्रकाशक ॥ ३८ ॥
दीप अयनकही तया नेत्रासी । साह्यकारी परी परप्रकाशतातयासी । ते नसतांही नेत्र अंधारासी । पाहे तोस्वप्रकाशक
तैसा लयसाक्षी जो देखणा । स्वप्रकाश अपरोक्ष पूर्णपणा । येर हे वृत्तीपासून या सर्व गणा । आत्मप्रकाश पाहिजे
वृत्ति उठे जेव्हां चिद्गगनीं । ते वृत्तीसी अनुभवेना जडपणीं । आत्मप्रकाशाच्या योगेंकडोनी । जाणतसे तदाकारत्व

---

हें सर्व जड, परप्रकाशक आहेत. यांचा खरोखर जाणता तूंच एक आहेस. हें वेगळाले स्वभावानें दाखविलें. परंतु तुला उमजेना तेव्हां पुढें अंतरांत विषयाचे ध्यासानें स्वप्नानुकारी कल्पना होते, तिचाही जाणता तूंच एक आहेस हेंही दाखविलें, तरीही उमज पडेना, तेव्हा ही बुद्धीची कल्पना सारून मध्य संधीसहित नुसत्या स्फुरणास दाखविलें. त्या वृत्तीमुळें वृत्तीच जाणणारी आहे असें तुला वाटलें तेव्हां मग पुढें तिचा शून्याकारता समाप्ति दाखविली. त्यावेळीं तर अधीकच गडद पडलें. वृत्तीचें साक्षित्वही गेलें, लय जाणनें उघडें असून शून्यदशा मानिलीस, म्हणून मग लयाचा तरी निर्धार होईल असा येथील विचार सांगितला. ज्यांत न कळणें हें नाहींच तर जें नेणणें कळतें तेंच ज्ञान आहे. जसें डोळा अंधारास पहातो तोच खरा डोळा. तसें लय जाणणारा तोच निर्विकल्प ब्रह्मात्मा. असा जेव्हां तुला विचार सुचविला तेव्हां तुला लयाचा अनुभव आला. ज्याला लयाचा अनुभव आला तोच तूं ब्रह्मात्मा.

रविदत्ता, मीं सांगतों हे खरें किंवा खोटें याचा विचार करून पहा लयरूप शून्य जें तें तुला भेटलें किंवा तें शून्याला भेटलें किंवा शून्याखेरीज दुसरे कोणास भेटलें ? हा प्रकार तुला आम्ही मागें विचाररूप विवेचनाचेप्रसंगीं सांगितला होता, तो आतां अभ्यास झाला असल्यामुळें उमग. तेव्हां तुला हा आत्मा म्हणून प्रत्यक्ष स्वप्रकाश अपरोक्ष दाखविला होता. परंतु तेव्हां तुझी बुद्धिवृत्ति, जाणण्याविषयीं अभ्यासानें सूक्ष्मत्वानें दक्ष नव्हती, म्हणून तुला त्यावेळीं निःसंशय प्रतिती येईना. कारण तूं नेणपणानें वृत्त्यादिकांचे समुदायांत पडत होतास. आतां अभ्यासानें तुला वृत्तीचे लयाचा प्रत्यय आला आहे, म्हणून मागील निरूपण आलोडून पहा. तें निरूपण कोणतें म्हणशील तर जें अयमात्मा या वाक्याचें स्पष्टीकरण डोळ्यांचे दृष्टान्तानें स्पष्ट केलें तेंच निरूपण पहा.

दिवा, आरशी यांचेयोगानें पदार्थ अथवा पुस्तकाचीं अक्षरं किंवा त्यांचा अर्थ कळतो, पण सर्व पाहून जाणण्यास एक स्वप्रकाशक नेत्रच समर्थ आहे दिवा आणि आरशी हीं त्या नेत्रास साह्यकारी आहेत. तरी ते परप्रकाशकच होत. हें साह्यकारी साधनें नसतांही नेत्र अंधारास पहातो. म्हणून तोच उपकारणावांचून पहाणारा स्वप्रकाशक नेत्र. तसा लयसाक्षी जो पहाणारा तोच स्वप्रकाशक अपरोक्ष आहे. त्यावांचून वृत्तीपासून जो जाणता समुदाय, त्यास आत्मप्रकाशाची अपेक्षा आहे. वृत्ती जेव्हां चिद्गगनांत उठते तेव्हां त्या वृत्तीस जडपणामुळें अनुभव घेतां येत नाहीं. तोच आत्म्याचा प्रकाश तिला मिळाला म्हणजे मग ती तदाकारत्व जाणते.

अथवा मनबुद्धि उठूनी । भासविषय भासवी स्वप्नीं । तयासी जाणती हे दोनी । परी आत्मप्रकाशें ॥ ४२ ॥
जेवीं सदनींचे पदार्थ दीपयोगें । डोळाचि एक पाहूं लागे । तैसे वृत्तिबुद्धीचेही प्रसंगें । आत्माचि देखणा ॥ ४३ ॥
आतां जागृतीचे तों व्यापारा । इतुकेंही पाहिजे साहाकारा । वृत्ति बुद्धि पंचज्ञानेंद्रियद्वारा । जीवासहित विषय घेती
जैशी पोथी वाचावयासी । पाहिजे दीप अयनक नेत्रासी । वृत्ति बुद्धि इंद्रियें तैशीं । मिळतां भोग घडे ॥ ४५ ॥
परी दीप आणि अयनक । हे उघडचि परप्रकाशक । स्वप्रकाशक नेत्रचि एक । स्पष्टत्वें असे ॥ ४६ ॥
तैसे वृत्ति बुद्धि आणि इंद्रिय । इतुकाही जाणण्याचा समुदाय । परी एक आत्मत्वाचा अन्वय । असतां जाणों शकती
तैसें आत्मया कोणतें उपकरण । असे पहावया लयसाक्षिज्ञान । म्हणोनि तोचि एक स्वप्रकाशमान । येर हे परप्रकाशक
तस्मात् हे जड आणि आपणाहूनी । भिन्न असती कळती म्हणोनी । स्वतां जाणेना आपणालागूनी । परी भिन्न पाहे सर्वां
एवं जड भिन्न आणि परोक्ष । हे वृत्तिसहित सर्व प्रत्यक्ष । एकचि स्वप्रकाश अपरोक्ष । आत्मा ब्रम्ह ॥ ४०५० ॥
हाचि अर्थ मागां जो निरोपिला । जो अयमात्मायावाक्यें बोलिला । तोचि मागुती येथेंस्पष्ट केला । या अभ्यासप्रसंगें
तोचि अर्थ अहंब्रह्मास्मी वाक्यही सांगतसे अनुक्रमीं । कीं साधकें धरावें अंतर्यामीं । जें निर्विकल्प ब्रह्म स्वयें ॥५२॥
जो अर्थ अयमात्मा या वाक्याचा । तोचि असे अहंब्रह्मास्मीचा । स्वप्रकाश अपरोक्ष जो साचा । तोचि मी ब्रह्म
तोचि अर्थ तत्त्वमसि म्हणोनी । उपदेशिलें आम्हीं विवेचनीं । आणि अभ्यासें लयसाक्षित्व पूर्णपणीं भेटविलें जें तेंचि
आणि चौथेंही प्रज्ञानब्रह्म । तोही हाचि अर्थ बोले निःसीम । तस्मात् तो हा अर्थ सुखधाम । साध्यरूप साधका
येथेंही तूं ऐसें म्हणसी । अयमात्मा ब्रह्म या वाक्यासी । प्रत्यक्ष ऐक्यता पूर्णब्रह्मासी । विरोधाहीविण ॥ ५६ ॥
तैसा अविरोध या तिहींतें । कोठें असे वाच्यलक्षातें । वाच्य जेव्हां बाधिजेतें । तेव्हांचि लक्षांशीं ऐक्य ॥ ५७ ॥
म्हणोनि चारी वाक्यांसी एकार्थता।नव्हेसी शंका मानिसी तत्त्वतां । कीं अहंहेचिसविकल्पता।तेणेंनिर्विकल्पीं ऐक्य नोव्हे

---

अथवा मन बुद्धि उठून भासविषय स्वप्नीं भासवितात. त्यालाही आत्मप्रकाशानें दोन्ही जाणतात. जसें घरांतील पदार्थ दिव्याचेयोगानें एक डोळाच पाहूं लागतो तसा बुद्धिवृत्तिचेही वेळीं आत्मा पहातो जागृतीचे व्यापारांत बुद्धिवृत्ती, पंच ज्ञानेंद्रियद्वारानें जीवासहीत सर्व विषय घेतात, म्हणजे पंच विषय घेण्यास बुद्धिवृत्ती पंचज्ञानेंद्रियें व जीव हीं साह्यकारी लागतात. जसें पोथी वाचावयास दिवा व आरशी नेत्रास पाहिजे, तशी वृत्ती, बुद्धि, इंद्रियें, मिळालीं असतां भोग घडतो. पण दिवा आणि आरशी हीं परप्रकाशक व नेत्र एक मात्र स्वप्रकाशक. त्याचप्रमाणें आत्मा हा एक मात्र स्वप्रकाशक आहे त्याखेरीज बुद्धिवृत्ति इद्रियें त्याचे प्रकाशानें जाणतात, म्हणून तीं परप्रकाशक. नेत्रास अंधार पहाण्यास उपनेत्र किंवा दिवा यांची गरज नाहीं त्याचप्रमाणें आत्म्यास वृत्तीचा लय पहाण्यास बुद्धिवृत्ति किंवा इंद्रियें यांची गरज नाहीं. म्हणून तोच आत्मा स्वप्रकाशक व त्याखेरीज बाकीचीं बुद्धिवृत्यादि जाणतीं पण तीं परप्रकाशक. जीं परप्रकाशक तीं जड आहेत. व आपण त्यांस जाणतों म्हणून तीं आपणाहून भिन्न आहेत. आत्मा आपणास जरी स्वतः ओळखीत नाहीं तरी सर्वांस आपणाहून भिन्न पहातो म्हणून वृत्तीसह सर्व, जड, भिन्न आणि परोक्ष आहेत. व आपण आत्मा ब्रह्म एक स्वप्रकाश अपरोक्ष आहे. हाच अर्थ पूर्वी अयमात्मा या वाक्यानें निरोपिला होता. तोच पुन्हा या अभ्यासप्रसंगीं येथें स्पष्ट केला. तोच अर्थ अहंब्रह्मास्मि हें महावाक्य सांगतें कीं, साधकानें जें निर्विकल्पब्रह्म तें मी स्वतः आहे हें अंतर्यामीं धरावें.

अयमात्मा या वाक्याचा जो अर्थ तोच अर्थ अहंब्रह्मास्मि या वाक्याचा आहे तो हा कीं, जो स्वप्रकाशक अपरोक्ष तोच ब्रह्म मी आहें. तोच अर्थ तत्वमसि या वाक्यानें आम्ही विवेचनाचे वेळीं उपदेशिला. आणि अभ्यासानें लयसाक्षित्व जें पूर्ण ब्रह्म निर्विकल्प तेंच तूं अशा समजुतीनें तुला तें भेटविलें, आतां चवथें वाक्य जें प्रज्ञानब्रह्म तेंही हाच अर्थ सांगतें म्हणून तोही अर्थ साधकास साध्यरूप सुखदायक आहे.

शंका—वर चार महावाक्यांची अर्थाविषयीं ऐक्यता वर्णिलेली आहे तर तूं कदाचित् असें म्हणशील कीं, अयमात्माब्रह्म या वाक्यानें प्रत्यक्ष ऐक्यता पूर्ण ब्रह्माशीं विरोधावांचून होते. तसा अविरोध बाकीच्या तिन्ही वाक्यांत वाच्य लक्षांशाशीं कोठें आहे? वाच्याचा जेव्हां बाध करावा तेव्हांच लक्षांशीं ऐक्य होतें. म्हणून चारही वाक्यांची एकार्थता घडत नाहीं. कारण अहं हेंच सविकल्प आहे त्यायोगानें निर्विकल्प ऐक्य कसें होईल?

तरी याचें उत्तर अवधारावें। अहं म्हणोनि स्फूर्तीतें न घ्यावें । स्फूर्तीपरतें जें निर्विकल्पस्वभावें । तोचि ब्रह्मात्माआपण
वृत्तीपासून इंद्रियापर्यंत । जो जीवत्वें प्रतिबिंबित । जेणें देहबुद्धि होती अखंडित तो त्रिविध अहंकार नव्हे ४०६०
सर्व मिथ्यात्वें त्यागिलें । दृश्य जड परप्रकाशें वर्तले । तयाचें अहंपण कोण बोले । ब्रह्म म्हणोनी ॥ ६१ ॥
अरे जेथं ध्याता वेगळा । तोही प्राज्ञ म्हणोनि केला निराळा । उरे लयासाक्षिपणें केवळा । तोचि ब्रह्मात्मा मी स्वयें
येथें कोणतें गा वाच्य असे । लक्ष तरी म्हणणें काइसें । त्रिपुटीविण अखंडैकरसें । तोचि ब्रह्मात्मा मी स्वयें ॥६३॥
विद्या अविद्या स्फूर्ति उठतां बोलू येती कारणात्मता । त्यामाजीं प्रतिबिंबरूपता । उमटे जीवेशाची ॥ ६४ ॥
तेथें एक सर्वज्ञ एक किंचिज्ज्ञ । एक निरभिमान एक साभिमान । एवं विरोध हे या वाच्यालागून । म्हणोनि बाधिजेते
या पक्षीं तों स्फूर्तिरूपवृत्ति । तिचाही लयजाणता स्वयंज्योति । तोचि आपण अनुभाव्यनिश्चितीं । अनुभविल्यावीण
जेथें मायास्फूर्तिचा अभाव । तेथें कैसें असती जीवशिव । माते खंडिजेती विरोधास्तव । ऐसें तों नाहीं ॥ ६७ ॥
तथापि विद्या अविद्या स्फूर्तिसहित जीवेश उभयीं प्रतिबिंबित । परी हें प्रतिबिंब ज्याचें निश्चित । तो ब्रह्मात्मा मी स्वयें
हे अर्थातचि मिथ्या जाहली । पूर्वींच ब्रह्मीसही निषेधिलीं । एकली लयसाक्षी चित्प्रभा उरली। ते संचली स्थिती स्वयें
तस्मात् अहं ब्रह्मास्मि वाक्येंकडून । हाचि अर्थ बोलिला निवडून । हा ब्रह्मात्मा स्वप्रकाश पूर्ण । लयसाक्षी अपरोक्ष
चारीही महावाक्यांचा अर्थ । एकचि म्हणती ज्ञाते समर्थ । कोठें प्रत्यक्ष बांधिती अनर्थ । परी परिणाम एकरूप ७१
यास्तव सारांश हा तुजला । मथितार्थकाढोनियादिधला । तरी विसरूंच नकाभलतेअवस्थेला । निर्विकल्प मी करीं दृढ
मागुतींहि एक आशंका । वाटेल मनीं ते आधीं ऐका । कीं वाक्यें एकार्थ सांगितला निका । वाच्याविण एकरूप ७३
जेथें त्रिपुटीही उद्भवेना । वाच्यलक्ष सहसा असेना । तरी ऐसें कासया बोलिलें वचना । तो हा अर्थ म्हणोनि ।७४॥
तो हा म्हणतां परोक्षापरोक्ष । होत असती वाच्यलक्ष । याचें उत्तर कैसें तें प्रत्यक्ष । बोलिजे ऐका ॥७५॥
जो सृष्टिपूर्वीं सदोदित । सच्चिदानंद त्रिकालाबाधित । तो आतां उपाधि असतां निवांत । लय साक्षी प्रगटे ॥७६॥

---

उत्तर—अहं या शब्दानें स्फूर्ति घेऊं नये तर स्फूर्तीहून पर जें निर्विकल्प वस्तु तोच ब्रह्मात्मा आपण, वृत्तीपासून इंद्रियांपर्यंत जो जीवत्वानें प्रतिबिंबतो, ज्याचेयोगानें सदादीत देहबुद्धि होती तो त्रिविध अहंकार मी नव्हे, हें सर्व मिथ्या समजून त्याचा त्याग केला. तें दृश्य, जड, परप्रकाशक, ब्रह्म मीच आहें असें कोण म्हणणार आहे. अरे जेथें ध्याता वेगळा पडला तो प्राज्ञ मी नव्हे तर जो लयसाक्षित्वानें उरणारा ब्रह्मात्मा तोच मी स्वतः आहें. येथें वाच्य व लक्ष्य कोणतें आहे ? कोणीच नाहीं. तर त्रिपुटीवांचून अखंडैकरस ब्रह्मात्मा मीच स्वतः आहें.

जीवेशाचें कारण ज्या विद्याअविद्या स्फूर्ति उठली असतां जीवेशाचें कारण आहेत असें म्हणतां येतें, व त्यांत जीवेशाचीं प्रतिबिंबें उमटतात. तेव्हां एक सर्वज्ञ एक किंचिज्ज्ञ एक निरभिमान एक साभिमान याप्रमाणें या वाच्यास हे विरोध आहेत, म्हणून त्यांचा बाध करावा लागतो; पण येथें स्फूर्तिरूप जीव वृत्ति तिचा लय जाणता आपण स्वयंज्योती तोच आपण अनुभवणारावांचून अनुभाव्य मूर्ति आहे. जेथें मायास्फूर्तीचा अभाव तेथें जीवशिव हे कसे असतील, ते जर नाहींत तर विरोधामुळें त्यांची खंडणा कशी करावयाची बरें; विद्याअविद्येंत प्रतिबिंबित जीवेश हे ज्याचें प्रतिबिंब तो ब्रह्मात्मा मी स्वतः आहें तेव्हां हीं सर्व अर्थातच मिथ्या झालीं. त्यांचा पूर्वींच निषेध करून एकटी चित्प्रभा उरली असें मागें सांगितलें आहे. म्हणून अहंब्रह्मास्मि या वाक्यानें स्वप्रकाशक अपरोक्ष लयसाक्षि, हाच ब्रह्मात्मा आहे. हाच अर्थ निवडून सांगितला आहे. ज्ञाते व समर्थ हे चारी महावाक्यांचा अर्थ एकच आहे म्हणतात. त्यांत कोठें प्रत्यक्ष कोठें अनर्थ बाध करितात. पण सर्वांचा परिणाम एकरूप आहे. म्हणून मतितार्थ काढून हा सारांश तुला दिला तर आतां तूं कोणत्याही अवस्थेंत मी निर्विकल्प आहें हें विसरूं नको, तर हेंच दृढ कर.

शंका—चारी वाक्यें वाच्यावीण एकरूप असा अर्थ सांगतात. जेथें त्रिपुटीही उत्पन्न होत नाहीं. वाच्य आणि लक्ष्य सहसा असत नाहीं, मग तो हा अर्थ असें कां बोलला तो हा म्हटल्यानें परोक्षापरोक्ष वाच्य लक्ष्य होतात.

उत्तर—जो सृष्टीपूर्वीं सदोदीत त्रिकालाबाधित होता तो लयसाक्षी आतां उपाधि असतां निवांत प्रगटला.

सृष्टिपूर्वी जो का अविनाशी । तो शब्द प्रवर्तत असे तयासी । हा जो आतां जाणे लयासी । तोचि हा ब्रह्मात्मा ॥७७॥
जैसें घटमठेंवीण गगन । तेंचि घटीं जळीं प्रतिभासी सघन । व्यापलें जें निश्चळ पूर्ण । तेंचि हें म्हणावें ॥७८॥
जें पाणी तरंगाविरहित । तयासी तें म्हणोनि बोलों येत । तेंचि तरंगीं विकाररहित । म्हणोनि तेंचि हें पाणी ॥७९॥
न पडतां वृक्षीं बैसला असे । तोचि प्रवाहीं पडिला भासे । मागुतीं कळतां जेथींचा तेथें वसे । तोचि हा वृक्षस्थ ४०८०
सर्पापूर्वी जे दोरी होती । तेथें सर्प भासून मावळे मागुती । पहिली तैशीच कळल्यावरुती । कीं तेचि हे दोरी ॥८१॥
इत्यादि या दृष्टांतासम । बत्तिसांपूर्वी जो आत्मा ब्रह्म । तो आतां हें जातां रूपनाम । प्रत्यया लयसाक्षी आला ८२
जो सृष्टीपूर्वी सृष्टीच्या लयाचा । जाणता उपकरणेंविण साचा तोचि हा जाणता लयवृत्तीचा । कीं तो हा ब्रह्मात्मा
किंवा पुढें सर्व लया जातां । जो एकला उरे सर्वांपरता । तोचि हा प्रतीतीस आला आतां । समाधीमाजीं ब्रह्मात्मा
अथवा मागें जे जे ज्ञाते जाहले।ते ते जयाच्या ज्ञानेंसमाधान पावले।तेंचिब्रह्मात्मरूप मज कळलें।तोचि हा अर्थ प्रगटला
अथवा मागें जाहलें पुढें होणार । सर्वांचें एकचि निजसार । तेथेंचिपावलों मी त्यागोनि येर । यास्तव तो हा ब्रह्मात्मा
एवं तोचि ब्रह्मात्मा आपण । सांडोनिया बत्तिसांचें मीपण । अहं ब्रह्म हे स्फूर्तिविण । अगे होणें हे प्रतीती ॥८७॥
अगा रविदत्ता तोचि तूं ब्रह्म । त्रिपुटीविण आत्माराम । न जाणोनि जाणणें हें उत्तम । तुझेंचि तुजसी अद्वय ॥८८॥
तोचि तूं या सर्व जगासी । अधिष्ठानरूप अविनाशी । सर्व लय होवोनिया उरसी सच्चिदानंद ब्रह्मात्मा ॥८९॥
ब्रह्मादि कीटकांत हें जग । या सर्वांचें निजरूप असंग । तोचि ब्रह्मात्मा असंग । त्रिकालीं एकरूप ॥ ९० ॥
देवभक्त स्वामी सेवक । गुरुशिष्य कीं राजा रंक । अवघा तूंचि ब्रह्मात्मा एक । हें तें नामरूपत्यागें ॥ ९१ ॥

---

सृष्टीपूर्वी जो अविनाशी लयसाक्षी होता त्याला तो हा शब्द लागला म्हणजे तो या शब्दानें तो सृष्टीपूर्वीचा अविनाशी आत्मा दाखविला आणि हा, हा शब्द त्यास जाणणारा जो त्यास लागतो म्हणजे हा, या शब्दानें आतां जो जाणता तोच पूर्वीचा अविनाशी आत्मा असें दाखविलें, जसें घटमठांवाचून गगन आहे तेंच घटांतील जळांत प्रतिभासत आहे याप्रमाणें पूर्णपणानें जें व्यापलेलें तेंच हें हल्लीं प्रतिभासत आहे. तें हा शब्द तरंगाविरहीत जे पाणी त्या पाण्यास लागतो तेंच पाणी तरंगांत विकारावांचून आहे म्हणून तेंच हे पाणी असें म्हणतात. पूर्वीचा दृष्टांत कोणी एक गृहस्थ वृक्षावर बसलेला आहे तो पाण्यांत न पडतां वृक्षावरच बसलेला असून तोच प्रवाहांत पडलेला भासतो. व पुढें कळलें कीं, वृक्षस्थ जागचे जागींच आहे. तेव्हां असें म्हणणें येतें कीं, जो पूर्वी पडला नव्हता तोच हा आतां प्रवाहांत उगाच पडलेला भासत आहे. सर्पापूर्वी दोरी होती ती सर्प भासतांच दोरी नाहीं अशी वाटूं लागली. पुढें सर्प व जीव खोटा आहे ती दोरीच असें कळलें आहे, तेव्हां म्हणतात कीं, जी सर्पापूर्वी दोरी होती तीच आतां सर्प रूपानें भासत आहे. म्हणून तीच ही दोरी. याप्रमाणें वर सांगितलेल्या दृष्टांतासारखा बत्तिसांपूर्वी जो आत्मा ब्रह्म होता, तोच आतां हें नामरूप जातांच प्रत्ययास ( लय साक्षी ) आला. जो सृष्टीपूर्वी सृष्टीच्या लयाचा जाणता उपकरणावांचून होता तोच हा वृत्तीचा लय जाणता. म्हणून तो हा ब्रह्मात्मा असें म्हटलें. किंवा पुढें सर्व लयास गेल्यावर जो सर्वांपरता एकटा उरतो तोच हा ब्रह्म समाधींत आतां प्रतितीस आला. अथवा मागें जे जे ज्ञाते झाले ते ते ज्याच्या ज्ञानानें समाधान पावले तेंच ब्रह्मात्मत्व रूप प्रगटलं म्हणून तोच हा असा अर्थ प्रगटला. अथवा मागें जे ज्ञाते झाले व पुढें जे ज्ञाते होतील त्या सर्वांचें एकच निजसार आहे. तेथेंच मी त्या सर्वा बत्तिसांचा त्याग करून पावलों म्हणून तो हा ब्रह्मात्मा असें म्हटलें. एवं तोच हा ब्रह्मात्मा आपण बत्तिसांचें मीपण सांडून अहंब्रह्म स्फूर्तिवाचून अंगें ब्रह्म झाला आहे याप्रमाणें ब्रह्म होणें हाच प्रत्यय होय.

हे रविदत्ता, तोच तूं ब्रह्म, त्रिपुटीवीण आत्माराम आहेस. त्या ब्रह्मास न जाणून जाणणें हें उत्तम वर्तन तुझें तुलाच शोभतें. व तें तुझ्याशीं अद्वयही आहे. तोच अविनाशी तूं या सर्व जगास अधिष्ठान आहेस. तोच तूं सर्वांचा लय झाल्यावर सच्चिदानंद ब्रह्मात्मा उरतोस. ब्रह्मदेवापासून किड्यापर्यंत हें सर्व जग त्या सर्वांचें जें निजरूप तोच तूं ब्रह्मात्मा, असंग, त्रिकालीं एकरूप, देवभक्त, स्वामिसेवक, गुरुशिष्य, किंवा राजा रंक हें तें इत्यादि नामरूपत्यागानें अवघा तूंच ब्रह्मात्मा आहेस.

हे सर्व नामरूपें सविकल्प । न होऊन जाहलीं असती अनेक । परी तूं याचें अधिष्ठान एक । निर्विकल्प ब्रह्मात्मा ९२
अनंत कल्पें होती जाती । परी निर्विकल्पता तुझी ऐती । जेथें बद्धता ना नसे मुक्ति । तो तूं ब्रह्मात्मा असंग ९३
हाचि अर्थ चारी वाक्यांचा । आणि हाचि विषय जो वेदांचा । हाचि आशय सर्व ज्ञात्यांचा । भूत भावीं वर्तमानीं
हाचि अर्थ कळावयासाठीं । गुरुशिष्य सच्छास्त्रांच्या थाटी । शब्दार्थरचना अनंत कोटि । इतुकियाकरितां ॥९५॥
बहु कासया बा बोलावें । सर्व करणें येथें समाप्ति पावे । वेदें पाहून जेथें मौन राहावें । तो तूं हा ब्रह्मात्मा ॥ ९६ ॥
तोचि अर्थ न बोलोनि आम्ही । बाणविला तुज सुखैकधामीं । तस्मात् सांडोनिया सर्व उर्मि । तेंचि होऊन राहे ९७
येरां बत्तिसांचें मीपण त्यागी । तो ब्रह्मात्माचि होय निजांगीं । तरीच तूं निर्भय होसी जगीं । सत्य सत्य त्रिवाचा ९८
आतां निष्कर्षें पाठी थापटूनी । सांगत असों निर्वाणवचनीं । लयसाक्षी ब्रह्मात्मा पूर्णपणीं । तो तूं अद्वय आहेसी
आतां बोलणें सर्व खुंटलें । ऐकणें त्यासवें पांगुळलें । उर्वरित सहजीं सहज उरलें । तो तूं ब्रह्मात्मा ॥ ४१०० ॥
इतुकें बोलोनि श्रीशंकर । मौनें राहते झाले स्थिर । इकडे रविदत्ताचें अंतर । ब्रह्माकार जाहलें ॥ १ ॥
लयसाक्षित्वें चिद्रूप चिद्रूपें । वृत्तिज्ञान तें सर्व हारपे । उठे जरी तें पसरोनि लोपे । भिन्नपणें न होतां ॥ २ ॥
उगीच स्तब्धता मात्र उरली । तया स्तब्धतेची जाणीव संचली । ते जाणतीकळापरी प्रतीति आली । नाहीं स्फूर्तिरूप
अनुभविता तो अनुभाव्यरूप । होऊन ठेला भिन्न नव्हे अल्प । सुख सुखाकारें सुखरूप । गगन गगनीं जेवीं ॥ ४ ॥
वृत्ति निमग्न जाहली तिकडे । मन बुद्धि कासया उद्भवे इकडे । इंद्रियांचीं लागलीं कवाडें । देहही स्तब्ध केला ॥५॥
प्राणही मंदत्वें जाहला स्थिर । वाहे परी नव्हेचि गोचर । ऐसा रविदत्त देखिला समोर । सद्गुरुनाथें ॥ ६ ॥
आनंदें मग टाळी पिटिली । म्हणती । उपदेशाची सफळता जाहली । अन्यन्यासी परिपूर्ण लाधली । जे आपुली पूर्वभूमि
पुत्रासी राज्यपद प्राप्त होतां । अति सुखावती मातापिता । तैशी रविदत्तासी स्वरूपाकारता । पाहोनि आनंदती गुरु ८
रविदत्त तो अखंड सुखरसीं । निमग्न असे तदाकारत्वेंसी । जैसा गज बुडाला अक्षोभ्य सागरासी । अति तापा भिऊनी

---

हीं सर्व नामरूपें सविकल्प न होऊन अनेक झालेल्या सारखीं वाटतात. पण या सर्वांचें तूंच एक ब्रह्मात्मा अधिष्ठान आहेस. अनंत युगें झालीं, गेलीं, तरी तुझी निर्विकल्पता जशाची तशी कायम आहे. जेथें बद्धता नाहीं व मुक्तता नाहीं तोच तूं असंग ब्रह्मात्मा. हाच अर्थ चारी वाक्यांचा आहे. व हाच विषय वेदांताचा आहे. व हाच आशय भूत भविष्य वर्तमान काळच्या ज्ञात्यांचा आहे. हाच अर्थ कळण्याकरितां गुरुशिष्य, सत्शास्त्र, यांचा उदय आहे. व अनंतकोटी शब्दार्थ रचना याचकरितां आहे. फार काय सांगूं जें जें करणें तें येथें समाप्तीस पावतें व वेद पाहून जेथें स्तब्ध होतो तोच तूं ब्रह्मात्मा. तोच अर्थ न बोलतां आम्ही तुला बाणविला, तेव्हां हे रविदत्ता, तूं आतां उर्मि सोडून तेंच होऊन रहा. आणि बत्तिसांचा मीपणा टाक. मग तूं जगांत निर्भय होशील. आतां निष्कर्षें पाठी थापटून निर्वाणवचन सांगतों कीं, लयसाक्षी ब्रह्मात्मा पूर्णपणीं जो तोच अद्वय तूं आहेस.

आतां बोलणें सर्व खुंटलें. ऐकणेंही त्याबरोबर पांगुळलें. मग उर्वरीत सहजींसहज उरलें तो तूं ब्रह्मात्मा आहेस, इतकें बोलून श्रीशंकराचार्य कांहीं न बोलतां स्थीर राहिले व रविदत्ताचें अंतर ब्रह्माकार झालें. लयसाक्षीत्वानें चिद्रूप चिद्रूपानें राहिलें. वृत्तिज्ञान सर्व हरपलें, तेव्हां वृत्ति जरी उठे तरी ती पसरून पुन्हा भिन्नपणें न होतां मावळे. याप्रमाणें उगीच स्तब्धता मात्र उरली. त्या स्तब्धतेची जाणीव संचली तीच जाणती कळा आहे. पण तिची स्फूर्तिरूप प्रातीति आली नाहीं.

जो अनुभविता तो अल्पही भिन्न न होतां अनुभाव्यरूप होऊन ठेला. गगन गगनांत जसें, तसें सुखसुखाकारानें सुखरूप राहिलें. वृत्ती तिकडे निमग्न झाली मग इकडे जागृतीस, मन, बुद्धि, कशाला उत्पन्न होते. इंद्रियें तर कवाडाप्रमाणें बंद झालीं. देह स्तब्ध होऊन राहिला. प्राण मंदत्वानें स्थीर झाला. तो वहात होता पण आहे किंवा नाहीं हेही कळेना. याप्रमाणें रविदत्ताची स्थिती शंकराचार्य सद्गुरूंनीं पाहिली. आणि आनंदानें टाळी पिटून म्हणतात कीं, उपदेशाची सफलता झाली. अनन्यास जी आपली पूर्वभूमी ती परिपूर्ण प्राप्त झाली. पुत्रास राज्य प्राप्त झालें असतां मातापिता अति सुखावतात, त्याप्रमाणें रविदत्ताची स्वरूपाकारता पाहून गुरु आनंद पावले. रविदत्त अखंडसुखांत तदाकारत्वानें निमग्न होता. जसा फार तापास भिऊन हत्ती अक्षोभजळीं बुडी देऊन रहातो,

अविद्यावनीं त्रिविधतापें । जीव तापला सुखदुःखविकल्पें । तो भेद सांडोनी एकरूपें चिद्रूपीं लीन जाहला ॥४११०॥
तेथोनि उसळे जरी वृत्ति । तरी तेथेंचि होय समाप्ति ध्येयाकारताचि उरे ज्ञप्ति । परी ध्यातृत्व नुमसे ॥ ११ ॥
प्रळयोदकीं वायु घोंटाळे । तैशी वृत्ति स्वरुपींच मिसळे । हेलाबून आनंदें उफाळे । परी गळे तत्क्षणीं ॥ १२ ॥
किंचित् निर्विकल्पीं स्थिरावे । किंचित् सविकल्पाकार व्हावें । सविकल्प होतां जरी स्वभावें । अहंस्फूर्ति असेना ॥१३॥
ऐसें मुहूर्त एक जाहलिया । उत्थान पावतसे आपसया । बुद्धि मन हीं उद्भवोनिया । सुखाकारें हेलावती ॥ १४ ॥
परी जे विर्विकल्पीं सुखावली । ते वृत्ती सुखासहीत उफाळली । मन बुद्धि व्यापून दशधा दाटली । इंद्रियापर्यंत ॥१५॥
तेणें गात्रें कापूं लागती । रोमांचही थरारिले वरुती । बाष्पें दाटून नेत्रांप्रती । आश्रुधारा चालिल्या ॥ १६ ॥
मागुतीं वृत्ति स्वरुपीं मिळे । पुन्हां हेलावूनिया उफाळे । तेणें अधिकाधिक उचंबळे । सुखवृत्यानंदाचें ॥ १७ ॥
बळें नेत्रही उघडित । परी स्वरूप सुखेंचि वृत्ति व्याप्त । दिशा विदिशाही ना ढळत । चिद्रूपावाचोनी ॥१८॥
अंतरीं जरी वृत्ति जातसे । तरी ध्येयाकारेंचि समरसे । इकडे दृश्याकार जरी होतसे । तरी चिद्गगनरूप ॥१९॥
मागें पुढें अधोर्ध्व दिशेसी । सव्य अपसव्य देखतां सर्वांसी । चिद्गगनचि दाटलें एकरसीं । दुजें अमुक न स्फुरे २०
तेणें मन बुद्धि वेडावली । इंद्रियें बापुडीं भांबावलीं । बोलों जातां बोबडी वळली । कांहीं स्मरेना ॥२१॥
मग ऐसा रविदत्त भांबावला । देखोनि शंकरें आलिंगिला । पाठी थापटूनि म्हणती भला । सावधान होई ॥ २२ ॥
मस्तक हुंगूनि मुखासी । कुरवाळूनी पुशिती नेत्रांसी । म्हणती सांडीं सांडीं वृत्यानंदासी । हें निर्विकल्प नव्हे ॥ २३ ॥
परी रविदत्ता कांहीं स्मरेना । आनंदें फुंजे अश्रु नयना । थरथरां कांपे कांहीं वचना । न फुटे शब्द ॥ २४ ॥
मग वाढवेळां सांवरोनी । वृत्यानंदातें त्यागुनी । उठोनि नमिता जाहला चरणीं । साष्टांग भावें ॥ २५ ॥
प्रदक्षणा करून पुन्हां नमी । सन्मुख बैसोनि बोले अनुक्रमीं । बोलतां बोलतां वृत्ति सुखधामीं । मिळोनि मागुती उठे
तैसेंचि बलात्कारेंकडोनी । विनावितासे हस्त जोडोनी । परी अश्रुधारा चालिल्या नयनीं । कंठ दाटूनी येतसे ॥ २७ ॥
म्हणे जयजय सद्गुरुनाथा । रुपाघना स्वामी समर्था । मज रंक दुर्बळासी अनाथा । साम्राज्यपद दीधलें ॥ २८ ॥
अनंत कल्प या देहबुद्धीची । दरिद्रविपत्ती सुखदुःखाची । भोगिलीच भोगितां विश्रांतीची । सहसा वार्ता नसे ॥ २९

---

त्याप्रमाणें अविद्यारूपी रानामध्यें जीव सुखदुःखरूपीं त्रिविधतापानें तापला, तो भेद सांडून एकरूपानें चिद्रूपीं लीन झाला, तेथून वृत्ती उसळते व पुढें तिची तेथेंच समाप्ति होते व ध्यातृत्व न उमसतां ध्येयाकारच ज्ञप्ति उरते. जसा प्रळयोदकीं वारा घोंटाळतो तशी, वृत्ती स्वरूपीं मिसळते. पुढें हेलावून आनंदानें उफाळते. तरी ती लागलीच नाहींशी होते. व ती किंचित् निर्विकल्पीं स्थिरावते. किंचित् सविकल्पाकार होते. जेव्हां सविकल्पाकार होते, तेव्हां तिला अहंस्फुरण असत नाहीं. याप्रमाणें एक मुहूर्तपर्यंत झाल्यावर आपाप उत्थान पावते. बुद्धि मन ही उत्पन्न होतात. पुढें आपण सुखाकारानें हेलावते. जी वृत्ती निर्विकल्पीं सुखावली तीच वृत्ती सुखासहीत उफाळली. व मन बुद्धीस व्यापून दशधा होऊन इंद्रियांत दाटली. त्या योगानें गात्रें कांपूं लागलीं, आंगावर कांटा उभा राहिला, डोळ्यांत आंसवें येऊन अश्रुधारा वाहूं लागल्या. पुढें पुन्हां वृत्ती स्वरूपीं मिळाली आणि हेलावून, पुन्हा उठली. तेव्हां अधिकाधीकच वृत्यानंदाचें सुख उचंबळूं लागलें. रविदत्त बळेंच नेत्र उघडीत आहे परंतु स्वरूपसुखानेंच वृत्तीव्याप्ती आहे, तिला ह्या दिशा किंवा विदिशा हें कांहींच चिद्रूपावांचून कळेनात. वृत्ति अंतरांत जरी जात होती तरी ती ध्येयाकारानेंच समरसत होती. व बाहेर दृश्याकार जरी होत होती तरी चिद्गगनरूपच होऊन राहिली होती. तिला दाहीदिशा चिद्गगनच दिसत होतें, दुसरें कांहीं स्फुरत नव्हतें; त्यामुळें मनबुद्धि वेडावली, इंद्रियें भांबावलीं, व बोलूं लागला तों बोबडी वळली; कांहीं स्मरेनासें झालें. याप्रमाणें रविदत्त भांबावलेला शंकराचार्यांनीं पाहून त्यास आलिंगन दिलें. आणि पाठी थापटून म्हणालेः भले शाबास बेटा, तूं आतां सावध हो. आणि हा वृत्यानंद सोड. हें निर्विकल्प नव्हे, असे जरी स्वामी बोलले तरी रविदत्तास कांहींच स्मरेना. आनंदानें त्याच्या नेत्रास अश्रु येत होते. व तो थरथरां कांपत होता. त्यास शब्द फुटेनासा झाला. पुढें पुष्कळ वेळानें वृत्यानंदास टाकून सावध होऊन त्यानें गुरूस नमस्कार केला; आणि म्हणतो हे सद्गुरुनाथा, तुम्ही रुपा करून मज रंक अनाथास साम्राज्यपद दिलेंत. मी अनंतकल्पें देहबुद्धीची, व सुखदुःखाची दरिद्रविपत्ती एकसारखा भोगीत होतों. त्यामुळें क्षणभरसुद्धां विसावा मिळाला नाहीं.

ऐशिया अनाथा राज्यपदवी । स्वसुखसंपत्ती नित्य नवी । हे एक सद्गुरुनाथेंचि द्यावी । येर बापुडे देवादि ॥ ३० ॥
धन्य धन्य आजि आमुचें । भाग्य उदेलें वर्णिलें नवचे । एकाएकीं सरिसें रूपेंचें । मेलन जाहलें स्वरूपीं ॥ ३१ ॥
आपआपणा होतों चुकलों । सन्निधचि बहु दिन कीं मुकलों । तो दयाळा सहजीं भेटविलों । एकाएकीं रूपेसरिसा३२
आतां काय व्हावें उतराई । स्तवन करावें तरी काई । माथाचि समर्पावा पायीं । कीं पादुका देहाच्या ॥ ३३ ॥
वृत्तीपासून मजला पुढें । लोटून दिधलें निर्विकल्पीं कोडें । शून्याचेंही फेडून सांकडें । जोडे चिद्रूप चिद्रूपा ॥ ३४ ॥
तया निर्विकल्पा तरी मजसी । वृत्ति जाणेना किमपि आभासी । शून्य तों बापुडें नाहींच त्यासी । काय कळे अभाव
म्यांही मजसी नाहीं जाणिलें । कारण कीं दृश्य नव्हे निजरूप आपुलें । परी लयासी तों म्यां वोळखिलें । आपुले सर्वज्ञपणें
लयसाक्षीचा आठव होतां । वृत्ति निर्विकल्पीं बुडाली तत्त्वतां । तेथोनि उसळतांचि मागुता । आरोळी नेटें दीधली३७
देह उसळून रविदत्ताचा । उडोनि पडला चरणीं साचा । थरथरां कापे नेत्रीं अश्रूंचा । पूरही चालिला ॥ ३८ ॥
तया नेत्रोदकें श्रीचरणांसी । अभिषेक केला आदरेंसी । जयजयकारें गर्जना वाचेसी । हाचि रुद्राध्याय ॥ ३९ ॥
ऐशिया सच्छिष्यासी पाहूनी । सद्गुरुनाथें कळवळोनी । गाढ आलिंगिला हृदयस्थानीं । कुरवाळून बोलती ॥४१४०॥
म्हणती सखया अवस्था सांवरी नांगिकाराव्या वृत्त्यानंदलहरी । आपुल्या स्वानुभवें परत्या सारीं । स्वकीय सुखें असावें
या वृत्तीसीही करीं निवांत । बोले निर्विकल्पत्वाची मात । लयसाक्षी कैसा केवीं अनुभूत । हें सर्व श्रुत करीं मज ४२
मग रविदत्तें श्रीगुरूचें । पादपद्म वंदोनि साचें । हेलावे त्यागोनि वृत्तीचे । बोलतां जाहला ॥ ४३ ॥
वृत्तीलय शून्याचा घात । मज ज्ञानघना स्पष्ट अनुभूत । जरी मज मी न कळे अनंत । परी लय तो स्पष्ट कळे ॥४४
वृत्तीचा लय तो उपकरणेंविण । स्पष्ट जाणतसें मी ज्ञानघन । तोचि मी निर्विकल्प उघडा आपण । लोपलों ना प्रगटलों
डोळा जैसा अंधार देखणा । न पाहतांही नयन नयना । असेचि असे संशयाविना । हे उघड प्रतीति ॥ ४६ ॥
तैसा मी अनंत लयसाक्षीचा । देखणा उपकरणेंविण साचा । हाचि कीं मी उघड प्रतीतीचा । लोप असे कोठें ॥ ४७
हा उघड माझा स्वानुभव । त्रिपुटीविरहित स्वयमेव । लय किंवा उद्भव तीं सर्व । तें मी जाणें स्वप्रकाशें ॥ ४८ ॥

---

अशा अनाथास स्वसुखसंपत्तीची नित्य नवी राज्यपदवी ही एक सद्गुरूवांचून देवादिक दुसरे कोणीही देणारे नाहींत. मी धन्यधन्य आहे आज आमचें भाग्य उदेलें, तें वर्णितां येत नाहीं. सद्गुरूची कृपा होण्याबरावर स्वरूपीं मिळणी झाली. मी सन्निध असतांच आपआपणास चुकल्यामुळें बहुत दिवस मुकलों होतों. त्या माझी मला रूपेसरशी दयाळा तुम्ही भेट केलीत. आतां मी तुमचा काय उतराई व्हावें. स्तवन तरी काय करावें. मस्तक तुमच्या पायांवर समर्पावें किंवा, देहाच्या पादुका तुमच्यापायीं करून घालाव्या. करावें तरी काय, तुम्ही वृत्तीपासून पुढें निर्विकल्पाकडे मला लोटून दिलें. आणि शून्याचें संकट नाहींसें करून चिद्रूप चिद्रूपास जोडलें. त्या मज निर्विकल्पास वृत्ती यत्किंचितूही जाणत नाहीं. व त्या निर्विकल्प मज ब्रह्मात्म्यास शून्य ठाऊकच नाहीं. तेव्हां अभाव कसचा. आपलें निजरूप दृश्य नसल्यामुळें म्या आपणास जाणिलें नाहीं. पण आपल्या ज्ञानानें मी वृत्तीचे लयास जाणिलें. लयसाक्षीची आठवण होण्याबरावर वृत्ती निर्विकल्पीं बुडाली. तेथून जेव्हां उसळली तेव्हां नेटानें आरोळी मी दिली. याप्रमाणें रविदत्ताचा देह उसळून सद्गुरूचे चरणीं पडला. तेव्हां अश्रुपातानें सदगुरूचे चरणीं रविदत्तानें अभिषेक केला. आणि वाचेनें जयजयकार केला. हाच रुद्राध्याय याप्रमाणें, सच्छिष्यास पाहून सद्गुरुनाथांनीं कळवळून गाढ आलिंगन देऊन कुरवाळून म्हणतात. हे सख्या, अवस्था सांवर. वृत्यानंदाच्या लहरी अंगिकारूं नको. आपल्या स्वानुभवानें त्या दूर करून स्वसुखानें रहा. या वृत्तीसही निवांत कर. आणि निर्विकल्पत्वाच्या गोष्टी सांग. तुला लयसाक्षी कसा अनुभवास आला तें मला सर्व सांग. मग रविदत्त सद्गुरूचे चरण वंदून वृत्यानंदाचे हेलावे टाकून म्हणतो. वृत्तीचा लय आणि शून्याचा घात मज ज्ञानघनास स्पष्ट अनुभूत आहे. जरी मला मी कोण हें कळत नाहीं तरी मला लय स्पष्ट कळतो. वृत्तीचा लय उपकरणावांचून मी स्पष्ट जाणत आहें, तोच मी निर्विकल्प आपण, लोपलों नाहीं व प्रगटलों नाहीं, असा उघडा आहें. जसा डोळा अंधार पहाणारा तो न पहातांच डोळ्याचे ठायीं डोळा आहे, ही उघड प्रतिति होय. तसा मी लयसाक्षीचा देखणा अनंतपणानें उपकरणावांचून आहे, हीच माझी उघड प्रतिति. आतां मी कोठें लोपलों आहें सांगा. हा माझा उघड स्वानुभव त्रिपुटिविरहीत स्वयमेव आहे. मी लय किंवा उद्भव झाला म्हणजे लागलाच आपले प्रकाशानें जाणतों.

हेंचि निर्विकल्प ज्ञान चिद्रूप । तिहींकाळीं नव्हे अधिक अल्प । तेंचि त्रिकालाबाधित सद्रूप । आहेचि आहे सर्वदां ४९
वृत्ति बापुडी जेथें आटली । तिजसवें सुखदुःखें मेलीं । केवळ निजानंदता संचली । ग्राह्यग्राहकाविण ॥ ४१५० ॥
ऐसा मी सच्चिदानंदघन । अनंत अपार परिपूर्ण । न कळोनिही प्रतीतीसी गहन । अपरोक्षें आलें ॥ ५१ ॥
लय आणि वृत्तीपासून । जे जे जाहले भ्रमेंकडून । ते ते टळटळीत दिसती संपूर्ण । मज ज्ञानघनासी ॥ ५२ ॥
जे जे दिसती मज प्रत्यक्ष। ते ते मजहून परोक्ष । याचे लयासहित जाणता अपरोक्ष । आत्मा ब्रह्म मी स्वयें ५३
ऐशी प्रतीति माझी मज । यथार्थ बाणली अहो महाराज । परी एक असे संशयासी बीज । तें विनवूं चरणीं ॥ ५४॥
निर्विकल्पीं स्थिरत्व पावतां । निमिष्य एक होतसे तत्त्वतां । तत्क्षणींच उफाळे वहता । वृत्त्यानंद विकल्प ॥ ५५ ॥
मागुती निर्विकल्प जरी व्हावें । तरी तेव्हांचि विकल्पें उसळावें । परी निवांत एकतान समरसावें । ऐसें घडेना ॥ ५६
वृत्ति आनंद उसळतां क्षणीं । सर्व विकारा पावती उठोनि । मज वाटे हा रसास्वाद अझोनी । विघ्न करी समाधीसी
तरी हें विघ्न वृत्त्यानंदात्मक । निरसून अवघें हें सविकल्पक । निवांत उर्वरित उरावें एक । निर्विकल्पत्वें ॥ ५८ ॥
ऐशी कृपा मजवरी करावी । कीं सविकल्पाची वार्ता नुरावी । अखंडैकरसीं स्थिरता व्हावी । निर्विकल्परूप ॥ ५९ ॥
ऐसें विनवून चरण धरिले । इतुकें ऐकूनि सद्गुरु हांसिले । म्हणती तुझें ज्ञान कळलें । जें बाणलें तुजप्रती ॥४१६०॥
तुजला तुझी यथार्थ प्रतीति । जाहली असे बोलिल्या रीतीं । जैसा वृक्षस्थ बैसला सहजगती । तो कळला ज्याचा त्या
अविज्ञात तेंचि विज्ञात । ऐसा जो श्रुतीचा संकेत । आणि ज्ञात्याचा जो त्रिपुटिरहित । अनुभव अनुभवाविण ॥ ६२॥
ऐसा उभय प्रमाणयुक्त । तुज प्रत्यय बाणला निश्चित । लय जाणता तो अपरामित । जाणिला न जाणोनी ॥ ६३ ॥
परी म्हणसी निर्विकल्प । चिरकाळ असावें एकरूप । निःशेष हारावें हें सविकल्प । उद्भवूंच नये ॥ ६४ ॥
जैसावृक्षस्थहामीजोबैसलोंभला । तया न दिसावाकिमापिपाडिला । तैसाचि तूंजाणोनिनिर्विकल्पाला । विकल्पनव्हावाम्हणसी
ऐशिया संशयात्मका तुज । प्रश्न करणें असे सहज । ते ते सांगें बापा मज । विकल्प करून पुसों ॥ ६६ ॥

---

हेंच निर्विकल्प चिद्रूप ज्ञान. हें तिन्ही काळीं अधिक उणें होत नाहीं. तेंच सद्रूप त्रिकालाबाधित सदोदीत आहे तसें आहे. त्या चिद्रूपांत वृत्ती आटली व तिच्या बरोबर सुखदुःखेंही मेलीं; तेव्हां ग्राह्य ग्राहकावांचून केवळ निजानंदताच संचली. असा मी सच्चिदानंदघन अनंत अपार परिपूर्ण तो न कळून प्रतितीस अपरोक्ष आलों. वृत्तीपासून लयापर्यंत जें जें भ्रमान झालें तें तें मज ज्ञानघनास टळटळीत दिसत आहे. जें जें मला प्रत्यक्ष दिसतें तें तें मजहून परोक्ष आहे. त्याचे लयाचा जाणता अपरोक्ष ब्रह्मात्मा मी स्वतः आहे. ही माझी मला प्रतिति गुरुमहाराज यथार्थ बाणली. परंतु मला एक संशय आहे तो आपणास निवेदितों.

**प्रश्न**–निर्विकल्पीं स्थिरत्व एक निमिष्य होत आहे तोंच वर वृत्यानंदविकल्प उद्भवतो. पुढें पुन्हा निर्विकल्पीं स्थिरत्व करावें तों पुन्हा पूर्वीसारखा वृत्यानंदविकल्प उसळतो. पण निवांत एकतान समरसावें असें होत नाहीं. वृत्यानंद उसळताक्षणीं मनबुद्धि इत्यादि सर्व विकार पावतात. तेव्हां मला असें वाटतें कीं, अझून हा रसस्वाद समाधीस विघ्न करीत आहे. तरी हें वृत्यानंदात्मक अवघें सविकल्पात्मक विघ्न निरसून उर्वरीत निवांत एका निर्विकल्पत्वानें रहावें. गुरुमहाराज, माझ्यावर अशी कृपा करावी कीं, सविकल्पाची पुन्हा वार्तासुद्धां कानीं येणार नाहीं.

रविदत्ताचा प्रश्न ऐकून सद्गुरू हंसले, आणि म्हणतातः रविदत्ता, तुला जें ज्ञान बाणलें तें तुझें ज्ञान मला कळलें. तें हें कीं, मी सांगितल्याप्रमाणें तुझी तुला यथार्थ प्रतिति आली आहे. वृक्षस्थ वृक्षावर सहजगति बसलेला असतां त्याचें त्यालाच कळलें कीं, पाण्यांत प्रवाहांत वहावतोसा दिसतों तो मी नव्हे, तर मी वृक्षावरच आहे. याप्रमाणें अविज्ञात तेंच विज्ञात असा जो श्रुतीचा संकेत व ज्ञात्यांचा अनुभवावांचून त्रिपुटिरहित जो अनुभव आहे, याप्रमाणें उभय प्रमाणयुक्त तुला प्रत्यय बाणला. तूं न जाणून लय जाणता जो अपरामित तो जाणलास. पण निर्विकल्प चिरकाळ एकरूप असावें, सविकल्प निःशेष जावें, तें पुन्हा उद्भवूंच नये. असें म्हणतोस हें तुझें बोलणें कसें आहे ? जसा वृक्षस्थ मी वृक्षावरच बसलेला आहें पण मला पाण्यांत पडलेला भास दिसतो तो न दिसावा असें तो म्हणत आहे. त्याप्रमाणें तूं निर्विकल्पास जाणून विकल्प न व्हावा असें म्हणतोस; आणि हा जर खराच तुला संशय आहे तर त्वां प्रश्न विचारिला पाहिजे. आतां मी तुला प्रश्न विचारीन त्याचीं उत्तरें दे.

अरे तुज निर्विकल्परूपासी । विकल्प दिसला जो निजदृष्टीसी । त्या विकल्पें सविकल्पता तुजसी । आली कीं काय
किंवा सविकल्पें त्या निर्विकल्पा । वोढोनि आणिलें आपणपां । अथवा उद्भवतां निमतां खेपा । निर्विकल्पा होती ६८
ऐशिया तिहीं प्रकारें । तुज गमलें तें सांग खरें । निर्विकल्प जाहलें सविकल्पाकारें । तरी वाणीची हानि ॥ ६९ ॥
मुखीं म्हणसी जें निर्विकल्प । तें जाहलें म्हणतांचि सविकल्प । मग निर्विकल्प म्हणणें जें जल्प । व्यर्थचि जाहलें ७०
सविकल्पत्व आलें जयासी । तरी तया निर्विकल्पता कैशी । ऐशियाची प्रतीति जरी तुजसी । तरी सार्थक काय ॥७१
तस्मात् यथार्थ ज्ञान निर्विकल्पाचें । जाहलें नाहीं वाटे साचें । जाहलें तें रूप सविकल्प चें । जें विकारा पावे ॥ ७२ ॥
आतां दुसरा तुझा विकल्प । कीं उठतांचि हा सविकल्प । घेऊन येतसे आपेंआप । तया निर्विकल्पा ॥ ७३ ॥
तरी काय आकाशीं उठोनी । वायु आपुलीये बळेंकडोनी । गगनासी नेतसे उडवोनी । कीं निश्चळ तें चंचळ केलें ७४
तैसें निर्विकल्प जें निश्चळ । तेथें उद्भवून सविकल्प चंचळ । प्रवाहीं वोढी तया बरळ । तरी तें निश्चळ कैसें ॥ ७५ ॥
सविकल्पें निर्विकल्पासी । विकल्परूपता केली आपणाऐशी । तरी विकल्पताचि होणें जयासी । तस्मात् निर्विकल्प कैचें
आतां तिसरिया विकल्पा । कीं सविकल्पास्तव निर्विकल्पा । उद्भव निमणें रूप खेपा । असती तरी ऐकें ॥ ७७ ॥
तरंग उद्भवतां पाणी जन्मलें । कीं तरंग राहतां पाणी राहिलें । अथवा तरंग निमतां पाणी मेलें । हें सांगें बापा ७८
मेघ उद्भवतां गगन जन्मे । कीं मेघ तोंवरी राहणें संभ्रमें । अथवा मेघ वितुळतां गगन निमे । हें पाहें विचारें ॥ ७९ ॥
तैसेंचि सविकल्प उद्भवोनी । निर्विकल्पा जन्ममरण दोनी । होती जरी पूर्वींपासूनी । तरी मुक्ति केवीं साधका ॥ ८० ॥
ऐसे तिहीं प्रकारें विकल्पासी । दोष असती बहु तयासी । तस्मात् स्थिर होणें जे कल्पना ऐशी । सहसा न करावी॥८१
आणीकही पुसूं तुज एक । स्थिरत्व होणें वाटे आवश्यक । तें सविकल्पें व्हावें निश्चयात्मक । किंवा निर्विकल्पें ॥ ८२ ॥
निर्विकल्पें निर्विकल्प व्हावें । ऐसें जरी म्हणसी स्वभावें । तरी आजि काय निर्विकल्पत्व नवें । साधिसी निर्विकल्पा
पाहिलेंचिनिर्विकल्पअसतां। आजिनिर्विकल्पकरिसीकेउता । विचारें आदिमध्य अवसानीं तत्त्वतां । निर्विकल्प तें निर्विकल्प

---

अरे, तुज निर्विकल्पास विकल्प जो दिसला, त्या विकल्पानें तुला सविकल्पता आली कीं काय ? किंवा त्या सविकल्पानें स्वतः तुज निर्विकल्पास ओढून आणिलें ? अथवा सविकल्प उद्भवल्यानें किंवा निमाल्यानें तुज निर्विकल्पास खेपा होतात काय ? वर जे तीन प्रकार विचारिले त्यांपैकीं तुला काय वाटतें तें सांग. जर सविकल्पाकारानें निर्विकल्प झालें असें म्हणावें तर तसें बोलतांच येणार नाहीं. कारण तोंडानें जें निर्विकल्प असें म्हणतोस तेंच सविकल्प झालें असें म्हटल्यानें निर्विकल्प म्हणणेंच व्यर्थ होतें. ज्याला सविकल्पता आली त्याची निर्विकल्पता मग कसची उरली ? आणि अशीच जर तुला प्रतीति असेल, तर निर्विकल्प तूं जाणिलेंस त्याचं काय सार्थक झालें ? तस्मात् तुला अद्याप निर्विकल्पाचें यथार्थ ज्ञान झालें नाहीं असें मला वाटतें. जें विकारास पावतें तें सविकल्पाचेंच रूप तुला निर्विकल्प वाटलें.

आतां तुझा दुसरा विकल्प असा कीं, हा सविकल्प उठतांच त्या निर्विकल्पास तो आपणच घेऊन येतो. जसें वायु आकाशांत उत्पन्न होऊन त्यानें आपल्या बळानें आकाशास उडवून नेलें किंवा जें निश्चळ आकाश होतें, तें त्या वाऱ्यानें चंचळ केलें, हें जसें घडत नाहीं, तसें निश्चळ जें निर्विकल्प त्यास चंचळ सविकल्पानें उत्पन्न होऊन प्रवाहांत ओढून नेलें. मग तें निश्चळ कसचें ? सविकल्पानें निर्विकल्पास आपल्यासारखें सविकल्प केलें, तर मग ज्याला विकल्पता येते तें निर्विकल्प कसचें ? अर्थात् तें सविकल्पच होईल.

आतां तिसरा विकल्प सविकल्पामुळें निर्विकल्पास उद्भवलें आहे, असें म्हणशील तर एक तरंग उद्भवण्याबरोबर पाणी जन्मास आलें किंवा तरंग उत्पन्न होण्याबरोबर पाणी जागच्या जागीं राहिलें, किंवा तरंग जातांच पाणी मेलें. यांतून खरें काय तें सांग. मेघ उत्पन्न होतांच आकाश मेलें किंवा जोंपर्यंत मेघ आहेत तोंपर्यंत मेघ जन्मल्याबरोबर आकाश जन्मास आलें. किंवा मेघ निमतांच गगन मेलें, याचा विचार करून सांग. तसेंच सविकल्प उत्पन्न होऊन निर्विकल्पास जन्ममरण देणें हें पूर्वींपासून असतें, तर साधकास मुक्ति कशी झाली असती ? याप्रमाणें तिन्ही विकल्पांस पुष्कळ दोष आहेत, याकरितां निर्विकल्प स्थीर व्हावें अशी कल्पना करूं नको. आणखी तुला एक विचारितों कीं, स्थीरत्व झालें पाहिजे असें जें म्हणतोस तें सविकल्पानें स्थीर व्हावें किंवा निर्विकल्पानें स्थीर व्हावें. तूं म्हणशील कीं, निर्विकल्पानें निर्विकल्प व्हावें; तर मला तूं असें सांग, निर्विकल्पास आज तूं निर्विकल्पत्व नवें साधितोस काय ?

तथापिनिवांतचिकरूंम्हणसी। तरीनिर्विकल्पकळलेंनाहीं तुजसी। नकळतां वायुरोधजरी करिसी । शतवर्षें तरीअनुपयोग
आतां सविकल्पातें निवांत करावें। ऐसेंचि मानिसील स्वभावें। तरी सविकल्प तें निर्विकल्प नव्हे। उपाधि तोंवरी ॥८६
उखर भूमि मध्यान्हकाळ। तोंवरी दिसेलचि मृगजळ। कोणी सत्य मानोत या बरळ। कीं कोणी खोटें ॥ ८७ ॥
तैसे देहप्राणादि उपाधि जोंवरी। सविकल्पता उठेलाचि तोंवरी। मग तें सत्य मानो कोणी अंतरीं। कोणी निर्धारो असत्य
परी ते उद्भवतां न राहती। ज्ञात्याज्ञात्याची समानगति। परी जे मिथ्या पाहती ते मुक्त होती। सत्य मानिती ते बद्ध
तस्मात् आपुलें निर्विकल्पत्व खरें। विचारें जाणावें साचोकारें। मग हें सविकल्प उठे कीं मरे। तया चाड नाहीं ॥ ९०
मात्र सत्यत्व न यावें तयासी। मग उद्भवेना निमेना आपैसी। हें निमावेंचि जरी मानिसी । तेव्हां तें सत्य जाहलें ॥९१
सत्यत्व देऊनि जरी रोधिसी। तरी बद्धता न चुके कल्पांतेंसी। मिथ्या समजून जरी अव्हेरिसी। तरी ते असतांचि मुक्त
तस्मात् आपुलें निर्विकल्पत्व समजावें। यथार्थज्यारीतींबोलिलेंस्वभावें। मगहेंसविकल्पअसोनसो नुरावें। यासी काज कायी
तूं म्हणसी हा रसास्वादु उठे। समाधीसी विघ्न करी नेटें। तरी ऐकावें वचन गोमटें। यथार्थ सांगों ॥ ९४ ॥
जोंवरी निर्विकल्पाची प्रतीति। बाणली नाहीं यथार्थ निश्चितीं। तोंवरी हें बाधक सहजगती। कीं ज्ञान होऊं नेदी
वृत्ति उसळतां प्रवाहीं पडे। तेणें किमात्मकनिर्विकल्पक न जोडे। म्हणोनि हें सर्वसारोनिएकीकडे। निर्विकल्प साधावें
तें निर्विकल्प यथार्थ एक वेळे। कळती जरी लयसाक्षीचे डोळे। पुढें हें उद्भवे कीं मावळे। परी विघ्नकर नव्हे ॥९७॥
स्फूर्तीपासोन देहापर्यंत। मिथ्यात्वें पहावें सदोदित। हें आपणा निर्विकल्पा अबाधित। उठतां कीं निमतां ॥९८॥
यासी मीपणें जरी घेसी। तरीच बाधक होईल तुजसी। तस्मात् निर्विकल्प तें आपण ऐशी। दृढता करीं ॥९९॥
तुझी तुज निर्विकल्पाची। प्रतीति बाणली हे कळली साची। परी किंचित् न कळून याविकल्पाची। अहंता घेतली

---

तें पाहिलेंच निर्विकल्प आहे. त्यास तूं आज निर्विकल्प नवें कसें करशील ? निर्विकल्प हें आदि मध्य अवसानीं निर्विकल्पच आहे. आतां तें जरी निर्विकल्प आहे, तरी त्यास निवांत करूं असें म्हणशील तर तुला खरें निर्विकल्प कळलें नाहीं असें म्हटलें पाहिजे. अरे, खरें निर्विकल्प न कळून जर शंभर वर्षेंपर्यंत वायु रोधून बसलास तरी निरुपयोगच. आतां तूं असें म्हणशील कीं, सविकल्पास निवांत करावें; तरी जें सविकल्प आहे तें उपाधि आहे तोंपर्यंत निर्विकल्प व्हावयाचें नाहीं. उखर भूमि, माध्यान्ह काळ, हीं जोंपर्यंत आहेत, तोंपर्यंत मृगजळ दिसावयाचेंच. मग त्यास कोणी मूर्खजन सत्य मानोत किंवा कोणी शहाणे मिथ्या मानोत. तशी देहप्राणादिक उपाधि जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत सविकल्प उठावयाचेंच. मग त्यास कोणी अज्ञान सत्य मानोत किंवा कोणी ज्ञाते मिथ्या मानोत. सविकल्प उद्भवल्यावांचून रहावयाचें नाहीं. तें उद्भवत असून जो सत्य मानील तो बद्ध होईल, व मिथ्या मानील तो मुक्त होईल. याकरितां रविदत्ता, आपलें निर्विकल्पत्व खरें कोणतें तें विचारानें जाणावें. जर निर्विकल्प खरें जाणलें आहे, तर मग हें सविकल्प उठो किंवा मरो, त्याची आपणास कांहींच भीति नाहीं. इतकें केलें पाहिजे कीं, सविकल्प उठलें तर तें सत्य मानतां कामा नये. मग तें उद्भवो किंवा निमो; त्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. आतां तूं तें निमवावेंच असें मानिशील तर तें तुला सत्य वाटलें असेंच समजलें पाहिजे, आणि याप्रमाणें त्यास सत्य मानून जर निरोध करशील तर कल्पांतींही बद्धता चुकणार नाहीं, आणि तें सविकल्प असून जर मिथ्या समजशील तर तूं आतांच मुक्त आहेस. याकरितां आपलें निर्विकल्पत्व जसें सांगितलें आहे त्याप्रमाण समजावें, मग हें सविकल्प असो नसो, उरो न उरो, त्याची आपणास कांहीं गरज नाहीं.

तूं म्हणशील कीं, अजून हा रसस्वाद समाधीस उठून विघ्न करीत आहे, तरी याविषयीं सांगतों ऐक. जोंपर्यंत निर्विकल्पाची प्रीति यथार्थ बाणली नाहीं, तोंपर्यंत हें सविकल्प बाधक आहे, म्हणजे हें ज्ञान होऊं देत नाहीं. वृत्ति उसळतांच वृत्तीच्या प्रवाहांत पडतो, त्यामुळें निर्विकल्प कसें आहे हें कळत नाहीं व तें प्राप्त होत नाहीं. याकरितां सर्व एकीकडे ठेवन प्रथम निर्विकल्प साधावें. जें केवळ लयसाक्षीचे डोळेच असें जें निर्विकल्प तें यथार्थ एक वेळ कळलें. तर मग सविकल्प उत्पन्न झालें किंवा मावळलें तरी तें विघ्नकर्तें होत नाहीं. स्फूर्तिपासून देहापर्यंत सर्व सविकल्प मिथ्या असें सदोदीत पहावें. व हें उठलें असतां किंवा निमालें असतां आपणास बाधा करीत नाहीं असें जाणावें. हें सविकल्प मी असें मानून घेशील तर तें तुला बाधक होईल. करितां तें मीपणानें घेऊं नको. व मी निर्विकल्प आहें अशी दृढता कर. तूं जो निर्विकल्प, त्या तुला तुझी प्रतीति बाणली, ही आम्हांस कळली. परंतु किंचित् न कळून या विकल्पाची तूं अहंता घेतोस.

लयसाक्षीची प्रतीति होतां । वृत्तीसी कळलें हें मी तत्वतां । तेणें सुखें उसळली वरुता । हाचि वासनानंद ॥१॥
बहुतां दिवस। वृत्तीचें वृत्तीला । अधिष्ठान कळलें सांडोनि मिथ्याला । तेणें सुखें दाटूनि उसळला । वासनानंद ॥२॥
हा स्वभावचि तरी वृत्तींचा । जरी घेईल आल्हाद सुखाचा । तरीच तिचा संशय बद्धतेचा । फिटोनि मुक्तता वरी
तूं ब्रह्मानंदरूप जैसा । आहेसि त्या रीताच अससी तैसा । परी उठतांचि वृत्तीचे सहवासा । वाटे मीचि उसळलों ४
मीचि जाहलों होतों निवांत । निमिष्यभरी तों मी उत्थान पावत । ऐसा गुप्तत्वें मीपणाचा हेत । होतां प्रवाहीं पडसी
तस्मात् तुझें निर्विकल्पत्व तुजसी।कळलें परीबाणेनास्थितिजैशी। संकल्पाकार होयपूर्वाभ्यासीं । म्हणोनि पावसी उत्थाना
तरी आतां मागुती निरूपण । सांगूं तें ऐकें सावधान । सविकल्प निर्विकल्प हेचि दोन । स्पष्टतर करूं ॥७॥

## सविकल्पक चिद्योहं ब्रह्मैव निर्विकल्पकम्

सविकल्परूप चिति ते मीची । जरीअसो अहं ब्रह्मप्रतीतीची । निर्विकल्पब्रह्मतेंएकरूपची । प्रतीतिअप्रतीति विलक्षण
हें निश्चयेंसी सत्य सत्य प्रणाम । गुरु शास्त्र आत्मप्रतीतीकडून । हेंचि स्पष्ट करूं निरूपण । जेणें यथार्थ कळे ॥९॥

## सविकल्पक चितिः अहं

सविकल्पक अहंतेमुळें । निर्विकल्पत्व सोडोनि उसळे । तेंही सविकल्पचि म्हणोनि चंचळे । निश्चळ तें जैसें तैसें ॥१०॥
लयसाक्षी जो आत्मा ब्रह्म । वृत्तीसी हा मी हें कळलें वर्म । हे हे वृत्यादि देहांत धर्मीधर्म । सहित मी नसे ॥११॥
ऐशी जे हे प्रतीति बाणली । कीं अनुभवेंवीण अनुभाव्यता संचली । तेही सविकल्पताचि स्पष्ट कळली।पाहिजे साधका
आरंभीं निर्विकारीहे मायास्फूर्ती।नहोऊनजाहलीजेव्हां।उत्पत्ति।तेव्हांचिदेहादिकजाहली संतति।तिकडे विस्मृती स्वरूपाची
ऐशिये अज्ञानेंकडून । मीच देह जाहला अभिमान । हें अवघें पूर्वश्लोकीं निरूपण । जाहलें सविकल्पक जीवाचें १४
वृत्तीमाजीं जो नसूनी । उत्पन्न जाहला प्रतिबिंबपणीं । तया जीवाचें रूपही तुजलागूनी । मागां स्पष्ट सांगितलें १५
तया जीवासीच बद्धता । जाहली होती घेतां अहंता । तोचि जीव पावला मुक्तता । अहंब्रह्म साभिमानें ॥१६॥

---

लयसाक्षीप्रातीति होतांच वृत्तीला कळलें कीं, हेंच स्वरूप मी. त्या सुखानें ती वर उसळली हाच वासनानंद होय. वृत्तीला जें मिथ्या तें टाकून आपलें अधिष्ठान काय हें बहुता दिवशीं कळलें. त्या सुखानें मुद्दामच वासनानंद उसळला. वृत्तीचा हा स्वभावच आहे कीं, जर ती सुखाचा आल्हाद घेईल तरच तिचा बद्धतेचा संशय जाऊन ती मुक्तता पतकरील. रविदत्ता, तूं ब्रह्मानंदरूप जसा आहेस तसाच आहेस. परंतु वृत्ती उठतांच तिचे सहवासानें मीच उसळलों असें वाटतें. मीच निमिष्यभर निवांत झालों होतों तों उत्थान पावलों. असा गुप्तत्वानें मीपणाचा हेतू होतांच प्रवाहांत पडतोस. वास्तविक तुझें निर्विकल्पत्व तुला कळलें. पण तशी स्थिति बाणली नाहीं. कारण पूर्वाभ्यासानें वृत्ती संकल्पाकार होते, म्हणूनच उत्थान पावतोस. तें न पावशील असेंच निरूपण आतां सांगतों. तें सावधपणानें ऐक. सविकल्प कोणास म्हणावें, व निर्विकल्प कोणास म्हणावें, हें स्पष्ट कळण्याकरितां त्याचें रूप स्पष्ट सांगतों. तें तूं ऐक.

### सविकल्प निर्विकल्पाचें स्पष्टीकरण.

सविकल्पक रूप चिति ती मीच, मग ती जरी अहंब्रह्म प्रतितीची असली तरी चिंता नाहीं. प्रतिति किंवा अप्रातिति यांहून विलक्षण असें जें निर्विकल्प ब्रह्म, तें एकरूपच आहे, हें गुरु, शास्त्र, आणि आत्मप्रातिति यांचेयोगानें सांगतों कीं, हेंच सत्य आहे. ज्या योगानें हें स्पष्ट कळेल असेंच निरूपण आतां करूं. सविकल्प अहंतेमुळें निर्विकल्पत्व सोडून उसळतो. तें निर्विकल्प निर्विकल्प नव्हे, तर सविकल्प आहे; म्हणून चंचळ होतें. जें निश्चळ तें चंचळ होत नाहीं, तर निश्चळच रहातें. लयसाक्षी जो ब्रह्मात्मा हाच मी असें वृत्तीस वर्म कळलें व हें वृत्तीपासून देहापर्यंत सर्व धर्मधर्मी मी नाहीं अशी जी ही प्रातिति बाणली. म्हणजे अनुभवावांचून अनुभाव्यता संचली ती ही सविकल्पताच आहे हें साधकास कळलें पाहिजे.

प्रथम ज्या वेळेस निर्विकारी मायास्फूर्तीची उत्पत्ती न होऊन झाली, तेव्हांच तिची देहादिक संतती झाली. तेव्हांच स्वरूपाचें विस्मरण झालें. या विस्मरणरूप अज्ञानानें मीच देह हा अभिमान झाला. हें अवघें सविकल्पक जीवाचें निरूपण पूर्वश्लोकीं झालें. जो वृत्तींत नसून प्रातिबिंबत्वानें उत्पन्न झाला त्या जीवाचेंही रूप मागें स्पष्ट सांगितलें आहे. त्या जीवालाच अहंता घेतल्यामुळें बद्धता झाली होती; तोच जीव अहंब्रह्म या अभिमानानें मुक्त झाला.

हा तुज मागें सांगितलें । कीं जागृदादि मोक्षांत जेतुलें । तें तें सर्व जीव विकल्पाकडे आलें । मुख्य निर्विकल्प तें यापरतें
तेंचि मागुतीं स्पष्ट करूं । सविकल्प निर्विकल्पाचा निर्धारु । अतिशय सावधान सह विचरु । असावें रविदत्ता ॥ १८ ॥
जो देहअभिमान घेऊन बैसला । तीं प्रकारें तिहीं अवस्थेला । विश्व तैजस प्राज्ञ नाम पावला । तो हा सविकल्पक जीव
येणेंचि यया अहंतागुणें । आकल्प सोसिलीं जन्ममरणें । सुखदुःखात्मक नाना योनी भोगणें । पडिलें अज्ञानास्तव २०
जैसे दहाजण एका नदीतीरीं । दहा मोजोनि प्रवेशती अंतरीं । निर्विघ्न उतरोनि गेलीं सारीं । परी ते भ्रमले मोजितां २१
एकापासून नवांतें मोजिती । परी दहाविया आपणा सोडिती । ऐशीच दहांसी पडली भ्रांति । आपण दहावा असतां २२
तैसा स्फूर्तीपासून देहापर्यंत । जितुका मिळाला हा संघात । तितुका दशमापरी अधिष्ठानसहित । अविद्यारानीं भ्रमती २
अधिष्ठानसहित म्हणतां । आत्माब्रह्मचि भ्रमेना तत्त्वतां । आकाश जैसें चंचला आंतौता । असोनि अचळ ॥ २४ ॥
असो जन्ममरणरूप संसृति । हेचि नदी पुनःपुनः उतरती । आपण कोण म्हणोनी पहावया जाती । मोजिलियापरी २
परी आपण जो निर्विकल्प अगोचर । कवणासी कळे हें जड समग्र । परी आहे जाणणें तो निरंतर । सतत आहेचि आहे
परी तें असतांही हें जडे । कोणी जाणती ना बापुडे । आहे ऐसें जें वाटतें निवाडें । परी तें देहादिकाभावीं ॥२७॥
तस्मात् आहे तो हा देह । हा प्रत्यय बाणला निःसंदेह । ऐसें विस्मरण जाहलें पाहे । निजात्मत्वाचें ॥२८॥
दहावा असोनि आपणा विसरला । तैसाचि विस्मर आपुला जाहला । हेंचि अज्ञान पडिलें या संघाला । जीवात्मकासी
जीवत्वें आपणचि खरा असे । कारण कीं हा मी मजला दिसे । यापरता आत्मा कोठें नसे । दिसेना म्हणोनि ॥३०॥
ऐसें आत्मयाचें नाहींपण । दुसरें न दिसणें अभान । एवं नास्ति न भाति उभय आवरण । अज्ञानापासून जाहलें ३१

---

हेंही तुला मागें सांगितलें कीं, जागृतीपासून मोक्षापर्यंत जितकें तितकें सर्व जीव विकल्पाकडे आले. मुख्य निर्विकल्प तें याहून निराळेंच आहे. तेंच पुन्हा स्पष्ट करूं. ज्यायोगानें सविकल्प निर्विकल्प याचा निर्धार करितां येईल.

### सविकल्प निर्विकल्पाचें पुनः स्पष्टीकरण.

तिन्ही अवस्थेंत तीन प्रकारानें जो देहाभिमान घेऊन बसला, ज्याला त्या अभिमानामुळें विश्व तैजस प्राज्ञ हें नांव आलें, तो हा सविकल्पक जीव. यानेंच या अहंतेमुळें आकल्पपर्यंत जन्ममरण सोशिलीं व यालाच अज्ञानामुळें सुखदुःखात्मक नाना योनी भोगाव्या लागल्या. जसें कोणी दहाजण गृहस्थ गावांस जात असतां वाटेंत एक नदी लागली, तिचे अलिकडचें कांठीं प्रथम आपण दहाजण आहों असें मोजून पलीकडे जाण्याकरितां नदींत शिरले. व निर्विघ्नपणानें पलीकडे उतरून गेले, आपण दहाजण होतों तितकेच आहोंना, हें पहाण्याकरितां पुन्हा मोजूं लागले, तेव्हां जो मोजणारा तो एकापासून नवांपर्यंत मोजी आणि आपण जो दहावा त्यास मोजीत नसे. याप्रमाणें सर्वजणांनीं मोजणी केली पण दहावा त्यांस आहे असें वाटेना. म्हणून ते विचारांत पडले कीं, आपणापैकीं जो दहावा तो पाण्यांत बुडाला, आतां काय करावें. हे दहाजण गृहस्थ जसे भ्रमले तसा स्फूर्तीपासून देहापर्यंत जो समुदाय तो अधिष्ठानासह अविद्यारानांत भ्रमला. अधिष्ठानासहित म्हटल्यानें आत्मा भ्रमत नाहीं. तो जसें आकाश चंचळांत असून अचळ तसा अचळ आहे. दहाजण जसे नदी उतरले तसा हा संघ जन्ममरणलक्षण संसृति हीच एक नदी, ही नदी पुनःपुन्हा उतरून जातो. आणि दहाजण जसे मोजीत होते तसा हा संघ आपण कोण हें पहावयास जातो. वास्तविक आपण निर्विकल्प अगोचर आहे. तो जर नसता तर हें जड कोणास कळलें असतें ? अथवा मी निर्विकल्प आहें हें तरी जडास कसें कळतें ? जडास न कळतां ज्यापेक्षां जाणणें आहे, त्यापेक्षां निर्विकल्प मी आहेच आहें. याप्रमाणें मी असतांना, हीं जडें मजला जाणत नाहींत. मी आहे असें जें वाटतें तें देहादिकाचे अभावीं वाटतें, देह असतांना वाटत नाहीं. म्हणून जो आहे तो देहच आहे असा निःसंशय प्रत्यय बाणला. तेव्हां हें सांगितल्याप्रमाणें निजात्म्याचें विस्मरण झालें. जसा दहाजणापैकीं दहावा आपण असून आपणास विसरला तसें आपलें आपणास विस्मरण पडलें. हेंच या संघास अज्ञान उत्पन्न झालें आणि संघापैकीं जो जीव तो म्हणतो कीं, जीवत्वानें मीच आहें. कारण, हा मी मला दिसतो. आत्मा असा मजसारखा दिसत नाहीं, म्हणून तो कोठेंही नाहींच. असें आत्म्याचें नाहीं. पण व दुसरें न दिसणें अभान एवं न अस्ति न भाति असें उभय लक्षणाचें आवरण अज्ञानापासून उत्पन्न झालें.

जैसा दहावा नाहीं दिसेना । उभयें रीतीं केली कल्पना । याचि रीतीं पडिलें आवरणा । जीवालागीं ॥३२॥
पहिलें अज्ञान दुसरें आवरण। पडिलें असतां जीवालागून । पुढें देहाचाचि घेतला अभिमान । मी म्हणोनि निश्चयें
तेणें जितुकी क्रिया देहाची । होय ते करीतसें मीची । तेव्हां पापपुण्य । सुखदुःखाची । कृतिभुक्ति मजला ॥३४॥
मागें केलीं जीं पुण्यपापें । तींचि भोगितों आतां अमुपें । आतां जीं करीन अधिक अल्पें । तीं तीं भोगीन पुढें ३५
या नांवें विक्षेप उद्भवला । हें सर्व जन्ममरण मजला । होत असती चुकेना कांहीं केला । उपाय जरी भलतैसा ३६
जैसे दहावियाकारितां दाही । मस्तकें ताडिती रडती पाहीं । टेंगुळें येऊनियां लवलाहीं । व्रण पडोनि रक्त वाहे ॥३७॥
तैसेचि जीव या संसृतींत । पडिले पुनः पुनः मरती जन्मत । सुखदुःख भोगिलेंचि भोगित । उंच नीच योनी ॥३८॥
एवं सुखदुःखात्मक विक्षेप । तिसरी अवस्था बोलिली संक्षेप । हा जीवचि भोगीतसे अमुप । आत्मत्वीं स्पर्शली नाहीं
अज्ञान आवरण विक्षेप ऐसे । बंधनरूप असती आपैसे । हा जीवचि साभिमानें गुंतला असे । यया बंधनीं ४२४०॥
एवं तिन्ही अवस्था बंधकृत। सांगितल्या दशम दृष्टांतयुक्त। जैशिया पूर्व अवस्था जीव भोगित । तैसा मोक्षही जिवासी
बंधन जयासी तोचि सुटला। रोगी तोचि पावे आरोग्यतेला । भ्रमला तोचि जाय उमजला। तैसा मुक्त होय जीव४२
जीवावांचोनियां मुक्तत्वाची। आत्मत्वीं वार्ता तरी कैंची । दृष्टांतासहित ऐका तेंची । उत्तरावस्था मोक्षरूप ॥ ४३ ॥
मोक्षरूपही अवस्था चार । जीवचि भोगीतसे सुखकर । तेंचि ऐकावें सविस्तर । बोलिजे आतां ॥ ४४ ॥
बंधनीं जो जीव पडिला । अनंत जन्में भ्रमें उगला । तो नरदेह कर्में पावला । येथेंही उमजे एखादा ॥ ४५ ॥
अनंत जन्माचें जरी सुकृत । उभें राहिलें अकस्मात । तरीच एखादिया उद्भवत । अनुताप संसारीं ॥ ४६ ॥
तया अनुतापें सर्व कर्मांचा । त्याग करोनि मुमुक्षु होय साचा । पुढें अंकित होऊनि सद्गुरूचा । सेवी दिननिशीं ४७
श्रवण मनन विवेचन । निदिध्यासें करी आपण । तरी तो पावे अपरोक्ष ज्ञान । तीव्रप्रज्ञ जरी ॥ ४८ ॥
मंदप्रज्ञही जरी असला । तरी अभ्यासें पावे अपरोक्षाला । असो सद्गुरूसी जो शरण आला। जीवरूपें साधक४९॥

---

जसा दहाजणांपैकीं दहावा नाहीं म्हणून तो दिसत नाहीं, ही जशी दोन प्रकारें कल्पना केली. याप्रमाणें जीवास आवरण पडलें हें अज्ञानाचें. आवरण पडल्यामुळें जीवानें देह मी असा अभिमान धरिला, तेव्हां देहाची जी जी क्रिया होते ती सर्व मीच करितों. पापपुण्य मीच करितों; म्हणून पापपुण्यानें प्राप्त होणारें सुखदुःख मलाच भोगावें लागतें. मी मागें जीं पापपुण्यें केलीं तीं आतां भोगीत आहें; व आतां जीं पापपुण्यें करीन तीं पुढें भोगीन असें म्हणतो. हा विक्षेप उद्भवला, त्यायोगानें म्हणतो कीं, जन्ममरण हें सर्व मला आहे; तें पाहिजे तो उपाय केला तरी जन्ममरण चुकत नाहीं. जसें ते दहाजण गृहस्थ दहाव्याकरितां मस्तकें फोडतात व रडतात. मस्तकें फोडल्यामुळें टेंगळें येऊन व्रण पडले व त्यांतून रक्त वाहूं लागलें. तसें जीव या संसृतींत पडलेले आहेत ते पुनःपुन्हा जन्मतात व मरतात आणि उंचनीच योनींत सुखदुःख भोगीत असतात. एवं सुखदुःखात्मक विक्षेप ही तिसरी अवस्था सांगितली ह्या तिन्ही अवस्था जीवच भोगितो. आत्म्यास यांचा स्पर्शही होत नाहीं.

अज्ञान, आवरण आणि विक्षेप ह्या तीन अवस्था बंधनरूप आहेत. या बंधनांत जीवच साभिमानानें गुंतलेला आहे. जीव ह्या तीन अवस्था भोगितो, तसा तो मोक्षही भोगितो. कारण जो बांधलेला असेल तोच मुक्त होईल. ज्यास रोग असेल तोच निरोगी होईल. जो भ्रमला असेल तोच उमजेल. तसा जीव बंधन पावला आहे तोच मुक्त होईल. जीवावांचून मुक्ति दुसरें कोणास आहे ! आत्म्याचे ठायीं मुक्तत्वाची वार्ताही नाहीं. जीवास मोक्षरूप उत्तर अवस्था आहे. सुखदायक मोक्षरूप ज्या उत्तर अवस्था चार त्या जीवच भोगितो. तेंच निरूपण आतां करूं.

### मोक्षरूप चार उत्तर अवस्थांचें निरूपण.

जो जीव बंधनांत पडला तो अनंत जन्म भ्रमत आहे, असा तो भ्रमतां भ्रमतां त्यास अवचट मनुष्यदेह प्राप्त झाला. त्या मनुष्यदेहीं आलेल्या प्राण्यांपैकीं एखादाच उमजतो. ज्या मनुष्याचे पदरीं अनेक जन्मींचें पुण्य असेल त्यासच त्या पुण्याईनें संसारीं अनुताप उत्पन्न होतो. त्या अनुतापानें तो सर्व कर्मांचा त्याग करून मुमुक्षु होतो. पुढें तो मुमुक्षु सद्गुरूचा दास होऊन त्याची सेवा करितो. पुढें श्रवणमनन विवेचन निजध्यासन करितो. तेव्हां तो तीव्रप्रज्ञ असला तर अपरोक्ष ज्ञान पावतो. आणि मंदप्रज्ञ असला तर अपरोक्षास अभ्यासानें पावतो. याप्रमाणें जीवरूपानें जो साधक सद्गुरूस शरण गेला तोच मोक्षाचा अधिकारी झाला.

जैसा तया दशमालागीं । अकरावा आप्त भेटला वेगीं । तैसा अनंत सुकृताचिये प्रसंगीं । सद्‌गुरुनाथ भेटले ॥४२५०॥
तया सच्छिष्याचिये कळवळा । बोधिती सद्‌गुरु अवलीळा । कीं विवेचून पाहे जाणता आगळा । ब्रह्मात्मा आहे ५१
जैसा आप्त म्हणे तया दशमासी । दहावा आहेरे निश्चयेंसी । तैसा सदगुरु म्हणे ब्रह्मात्मा अविनाशी । आहे सर्वव्यापी
विश्वास मात्र दशमासी । असतां आहेसा होय तयासी । तैसाचि गुरुवचनीं सच्छिष्यासी । परोक्ष कळे ॥ ५३ ॥
परोक्षज्ञानही मोक्षरूप । होतां असदावरणाचा लोप । नाहींपणें जो होता आक्षेप । तो आहेपणा जाहला ॥ ५४ ॥
दशम आहेसा कळतांक्षणीं । हर्षचि होय शोक भंगोनी । तैसें परोक्षज्ञान साधकालागूनी । सुखदानीच होय ॥ ५६ ॥
परोक्षज्ञान तरी कोठून । कोठवरी तें पहा विचारून । सद्‌गुरुमुखें करितां श्रवण । विश्वासें बाणे ॥ ५८ ॥
देह प्राणादि पंचकोश । जड किंवा परप्रकाश । यांत आहे ब्रह्मात्मा अविनाश । अस्ति भाति प्रियत्वें ॥ ५७ ॥
हें निरूपण पूर्वींच जाहलें । तिहीं काळीं हें लक्षण संचलें । जाणणें सर्वांचें प्रत्यया आलें । भिन्न सर्वांहूनी ॥ ५८ ॥
तेंचि प्रियतर अखंडित । तेंचि सद्रूप सदोदित । येर हें दुःखरूप जड असते । ऐसें खरें कळलें ॥ ५९ ॥
जे वृत्तीस असज्जड दुःखात्मक । तृणादि ईशांत सकळिक । याचा जाणता तो निश्चयात्मक । आहे तो कळे ४२६०॥
विवेचनें किंवा अभ्यासें । देहादि स्फूर्त्यंत हें कोसें । सर्व जाणतसे स्वप्रकाशें । इतुकें कळे प्रत्ययें ॥ ६१ ॥
द्रष्टासाक्षी प्रतीति आला । मात्र लयासाक्षी नाहीं कळला । परोक्ष ज्ञान म्हणावें ययाला । तरी मोक्षकर नव्हे केवीं
हा आत्मा दृश्याचा देखणा । आहे भाससाक्षी पूर्णपणा । आतां कोठें उरला नाहींपणा । तस्मात् मोक्षकर ज्ञान हें
एवं अवस्था परोक्ष ज्ञानाची । सुखकरी असे जीवाची । दैन्यता फिटली सुखदुःखात्मकाची । देहा विलक्षण कळतां
ऐसें परोक्षज्ञान ब्रह्मात्मयाचें । जीवालागीं जाहलें साचें । आतां ऐका अपरोक्ष ज्ञानाचे । सोहळे जीवासी ॥ ६५ ॥
गुरु म्हणती सच्छिष्याप्रती । हे मावळून गेली जरी वृत्ति । तरी लयासी जया अनुभूति । तत्वमेव प्रत्यक्ष ॥ ६६ ॥

त्या दहाजणांस जसा त्यांचा कोणी आप्त अकरावा भेटला तसे अनंत पुण्याईचे शेवटीं सद्‌गुरुनाथ भेटले. पुढें त्या सच्छिष्याचे कळवळ्यानें सद्गुरु त्यास बोध करितात कीं, जो जाणता ब्रह्मात्मा तो निराळाच आहे, हें तूं विवेचून पहा. त्या दहाजणांस जसा त्यांचा आप्त अकरावा सांगतो कीं, दहावा आहेरे आहे. तसे सद्‌गुरु सांगतात कीं, अविनाशी आत्मा सर्वव्यापी आहे. अकराव्या आप्ताच्या बोलण्यावर दहाजणांचा विश्वास असल्यामुळें त्यांस जसा दहावा आहेसा वाटला. तसा ब्रह्मात्मा, गुरुवचनावर विश्वास असल्यानें परोक्ष आहेसा वाटला. असदावरणाचा लोप झाला असतां परोक्षज्ञानही मोक्षरूप आहे. परोक्षज्ञानानें इतकेंच झालें कीं, आत्मा नाहीं असें जें मानीत होता तो आत्म्याचा आहेपणा झाला. जसा दहाजणांपैकीं दहावा आहे असें कळलें तेव्हां त्याचा शोक नाहींसा होऊन त्यांस हर्षच झाला. तसें परोक्ष ज्ञान साधकास दुःख घालवून सुखदायकच होतें. हें परोक्ष ज्ञान कोठपासून कोठपर्यंत आहे त्याचा विचार करून पहा, याविषयीं सद्‌गुरुमुखानें श्रवण केलें असतां हें विश्वासानें बाणेल. देह, प्राणादि पंच कोश, जड, व परप्रकाशक आहेत त्यांत अविनाश आत्मा अस्तिभातिप्रियत्वानें आहे. अस्तिभातिप्रिय हीं लक्षणें तिन्हीं काळीं संचलेलीं आहेत. व सर्वांहून जाणणें म्हणजे चित्प्रभा ही निराळी आहे. हें निरूपण पूर्वींच झालेलें आहे. जें चिद्रूप तेंच अखंडीत प्रिय, तर तेंच सदोदीत सद्रूप. याहून बाकीचें जें तें दुःखरूप असत्, व जड आहे, असें कळलें. वृत्तीस असत्‌जडदुःखात्मक आहेत, व यांचा जाणता परमात्मा आहे हेंही कळेल. विवेचनानें किंवा अभ्यासानें देहापासून तो स्फूर्तिपर्यंत सर्व कोस आहेत, हीं सर्व आपल्या आत्म प्रकाशानें जाणतो, हें प्रत्ययानें कळूं लागतें, ज्या परोक्ष ज्ञानानें लयसाक्षी मात्र कळला नाहीं, पण द्रष्टा साक्षी प्रत्ययास आला, मग हें परोक्ष ज्ञान मोक्षकर कसें नाहीं ? मोक्षकरच आहे. हा आत्मा दृश्याचा पहाणारा द्रष्टा आहे, भास साक्षी आहे, तेव्हां आतां त्याचा नाहींपणा कोठें उरला ? ज्यापेक्षां आत्म्याचें अस्तित्व दाखविणारें हें परोक्ष ज्ञान आहे त्यापेक्षां तें मोक्षकरच आहे. याप्रमाणें परोक्ष ज्ञान जीवास सुखकरच आहे. या ज्ञानानें देहाहून आत्मा विलक्षण आहे, असें कळल्यानें, सुखदुःखाचें दैन्य गेलें. याप्रमाणें परोक्ष ज्ञान ब्रह्मात्म्याचें जीवास झालें व त्याचा उपयोग त्यास काय झाला तोही सांगितला. आतां अपरोक्षज्ञान जीवास झाल्यानें त्याचा काय उपयोग आहे तें सांगतों.

गुरु सच्छिष्यास सांगतात. हे शिष्या, वृत्ती जरी मावळून गेली तरी वृत्तीचे लयाचा ज्याला अनुभव आहे तोच तूं प्रत्यक्ष आहेस.

जैसा द्दा जो नवांतें मोजिता ।तोचि तूं द्दहावा तत्त्वतां । तैसाचि लयाचा प्रत्यक्ष जाणता । शून्यातीत तोचि तूं ६७
विवेकें जेवीं द्दहावियासी । वाटे जरी मोजितां मी नवांसी । भेटलों कीं म्हणे चुकलियासी । या आप्ताच्या रूपें ॥ ६८
तैसा विचारवंत खरा साधक । विचारें पाहतां निश्चयात्मक । हा मी लयसाक्षी स्वप्रकाशक । न जाणोनि जाणे ॥ ६९
ऐसा प्रत्यय खरा बाणतां । आनंदें उसळला वृत्ति उद्भवतां । हा मी कळलों प्रत्यक्ष स्वतां । सद्गुरुप्रसादें ॥ ४२७० ॥
हाचि मी प्रत्यक्ष असोनी । मानिलें देहादिकां मी म्हणोनी । आतां हें मी नव्हे मिथ्यात्वें श्रेणी । मज म्यां वोळखितां
ऐशिया अपरोक्षज्ञानेंकडून । भंगलें अभानरूप आवरण । आपुलें आपणासी जें न कळणें । होतें तें मावळलें ॥ ७२ ॥
द्दहावा मीच असें स्वतां । तरी न दिसणें कोठें उरलें आतां । तैसा स्वतःसिद्ध लयसाक्षी कळतां । न कळणें कोठें॥७३
परोक्षज्ञानें असत् गेलें । आपरोक्षें अभान नष्ट जाहलें । एवं आवरण निःशेष मावळलें । उभय प्रकारेंही ॥ ७४ ॥
ऐसें हें जें आपरोक्ष ज्ञान । भेटला आपणा आपण । हे अवस्था म्हणसी आत्मयालागून । तरी अवधारीं ॥ ७५ ॥
आत्मया ब्रह्मासी न कळणें । कोठें जाहलें होतें विस्मरण । हें जाहलें जें जें उत्पन्न । तया जाणताचि असे ॥ ७६ ॥
जाणतियाचाचि आहेपणा । तोचि प्रिय आपुले आपणा । एवं सच्चिदानंदा अद्वैत पूर्णा । विस्मर ना स्मर ॥ ७७ ॥
जीवचिआभासेंउत्पन्नजाहला । तोचिआत्मयाब्रह्मासीविसरला । ऐशियाअज्ञानेंजन्मलामेला । नाना योनींसाभिमानें ७८
तया जीवासीच ब्रह्मात्मयाचें । अपरोक्षें ज्ञान जाहलें साचें । तेणेंचि जन्ममृत्यु चुकले याचे। हें सत्य सत्य प्रमाण
ऐसें अपरोक्षज्ञान जाहलियावरी । जीवन्मुक्तीचिये अनुकारीं । उत्तर अवस्था दों प्रकारीं । असती जीवासी ॥४२८०॥
आपणाणी आपण जो भेटला। तेणें मागील दुःख विसरला । मी जन्मतों मरतों जो उगला । हा मोडला विक्षेप ॥८१
अज्ञानें मी देहचि होतें मानिलें।तेव्हां पापपुण्य साभिमानें म्यां केलें। तेणें सुखदुःख जें जें देहा जाहलें। तें तें भोगिलें म्यांचि
ऐसाशोकजोजाहलाहोता। तोभंगला अपरोक्षज्ञानेंतत्त्वता । हाआभासइतुकानव्हेचिमी आतां । तरीयाचेंसुखदुःखमजकेंवी

जसा द्दहाजणांपैकीं नवास मोजणारा तोच द्दहावा तसा लयाचा जाणता शून्यातीत तोच तूं. विचारानें जसें द्दहाव्यास वाटलें कीं, मी जो नवांस मोजणारा आपला आपणास चुकलों होतों तो या अकराव्या आप्ताचे रूपेनें आपला आपणास भेटलों. तसा खरा विचारवंत साधक विचारानें निश्चयात्मक पाहील तर हा मी लयसाक्षी स्वप्रकाशक न जाणून जाणत आहे. याप्रमाणें प्रत्यय खरा बाणला तेव्हां आनंदानें वृत्तीबरोबर ती उत्पन्न होतांच आपण उसळला, आणि म्हणतो सद्गुरूप्रसादानें हा मी स्वतां प्रत्यक्ष कळलों. हा मी प्रत्यक्ष असतां देहादिकांस मी मानून बसलों होतों. आतां मी कोण हें आपणास मी जाणलें. तेव्हां हा देहादि सर्व समुदाय मिथ्या असें ठरलें. व हा मी नव्हे हें अनुभवास आलें. याप्रमाणें जें अपरोक्ष ज्ञान त्या ज्ञानानें जीवाचें अभावरूप आवरण भंगलें म्हणजे आपलें आपणास जें न कळणें होतें तें मावळलें. जसें द्दहाजणांपैकीं द्दहावा तो मी स्वतः आहें, मग न दिसणें कोठें उरलें ? तसा स्वतःसिद्ध लयसाक्षी कळतांच मग न कळणं कोठें उरेल ? याप्रमाणें परोक्ष ज्ञानानें असत्पण गेलें व अपरोक्षज्ञानानें अभाव नष्ट झाले. एवं उभय-प्रकारें आवरण नष्ट झालें.

अपरोक्ष ज्ञानानें आपणास आपण भेटला ही अपरोक्षज्ञानाची आत्म्यास अवस्थाच आहे असें कदाचित् तूं मानिशील, तर ही आत्म्यास अवस्था नाहीं. कारण ब्रह्मात्म्यास न कळणेंरूप विस्मरण कधीं झालें होतें ? तो तर जें जें उत्पन्न झालें त्यास जाणतच होता. जो जाणता तोच आहे, जो आहे तोच आपआपणास प्रिय आहे. एवं सच्चिदानंद पूर्ण ब्रह्मास स्मरणही नाहीं व विस्मरणही नाहीं. आभासरूपानें जीवच उत्पन्न झाला तोच ब्रह्मात्म्यास विसरला. या अज्ञानानें व साभिमानानें नाना योनींत तो जन्मतो व मरतो. ज्या जीवास विस्मरण झालें त्याच जीवास अपरोक्ष ज्ञान झालें व त्या ज्ञानानें त्याचे जन्ममृत्यु चुकले. असें अपरोक्ष ज्ञान झाल्यावर जीवन्मुक्तीचे वेळीं जीवास उत्तर अवस्था दोन प्रकारची आहे. आपला आपणास भेटला त्यायोगानें मागील दुःख विसरला. तेव्हां मी जन्मतों मरतों हा जो विक्षेप वाटत होता तो मोडला. अज्ञानानें मीच देह असें मानिलें होतें तेव्हां पापपुण्य मीं केलें असा साभिमान घेत होता व त्या अभिमानानें घेतलेल्या पापपुण्याचे योगानें होणारें सुखदुःखाचा भोगणारा मीच झालों व म्यांच सुखदुःख भोगिलें, असा जो शोक झाला होता, तो अपरोक्ष ज्ञानानें भंगला, आणि म्हणतो कीं, हा इतका आभास आहे. हा मी नव्हे. मग याचें सुखदुःख मला कसें असेल ?

मी सच्चिद्घन आत्मा ब्रह्म । हें मी नव्हेचि बत्तीस रूपनाम । उगाचि मानिला होता जो संभ्रम । तो निमाला या ज्ञानें
आतां जन्ममृत्यु माझे चुकले । बंधनाचें निसंतान जाहलें । ऐसें विक्षेपरूप शोका खंडिलें । ही शोकमोक्ष अवस्था ८५
जैसा दशमाकरितां शोक केला । रडणें बडवणें जें दहांला । जेव्हां दहावा आपणसा कळला । तो भंगला तत्क्षणीं ॥८६
तैसाचि हा जीव अज्ञानेंकडून । सोशीत होता जन्ममरण । तें एकदांचि भंगलें होतां ज्ञान । आत्मया ब्रह्माचें ॥ ८७॥
उत्तर अवस्थेमाजीं पहिली । शोकमोक्षरूप सांगितली । दुसरी निरंकुशा तृप्ति ऐकिली । पाहिजे जीवाची ॥ ८८ ॥
ब्रह्मात्मा जो आपुला आपण । असंग अभंग निजांगें पूर्ण । जाहला अक्षयीं ज्ञानेंकडून । साध्य तें साधिलें ॥ ८९ ॥
आतां कोणतें उरलें पावावयाचें । कीं तें जाऊन साधावें साचें । साध्यचि आपुला आपण तरी न वचे । अमुक पावावें म्हणून
सर्व साधनांचें सफल जाहलें । करणें तेंही समाप्ति पावलें । अमुक करणें नाहीं उरलें । कृतकृत्यता हेची ॥ ९१ ॥
एवं करावयाचें तें संपलें । पावावयाचें तें पावलें । कृतकृत्य प्राप्य तें लाधलें । सद्गुरुप्रसादें ॥ ९२ ॥
जैसा दशमाचा लाभ दशमासी । होतां सांडिती सायासासी । पावणेंही नुरे तयासी । म्हणती कृतकृत्य जाहलों ॥ ९३
तैसा ब्रह्मात्मा साधावा वेगें । ऐसें जीवें धरिलें प्रसंगें । तंव तेंचि जाहला आपण निजांगें । आतां करणें पावणें कोणतें
राजा पाहून संपत्ति वरावी । ऐसें रंकें धरिलें जीवीं । तंव तो राजाचि जाहला तरी पावावी । पदवी कोणती तेणें ॥९५
तैसें जीवाचें करणें संपलें । पावावयाचें नाहीं उरलें । ऐसें समाधान जें बाणलें । होचि तृप्ति निरंकुशा ॥ ९६ ॥
येर तृप्ति ब्रह्मयापर्यंत । अतिशय असती बहुत । एक पाहतां एक विटत । म्हणून ते सांकुश ॥ ९७ ॥
तैशी तृप्ति हे नव्हे पूर्ण । अतिशय कोणी नसे इजहून । इजपुढें सर्व तृणासमान । यास्तव हे निरंकुशा ॥ ४१९८ ॥
एवं शोकभंग निरंकुशा तृप्ति । दोनी अवस्थारूप जीवन्मुक्ति । होत असती जीवाप्रती । अपरोक्षज्ञान जाहलिया ॥९९
आत्मयाचा शोक नाहीं भंगला । आणि आत्मया आत्मा नाहीं पावला । तस्मात् उभय अवस्था जीवाला । जीवन्मुक्तीच्याही
पूर्वीं जीव मग सुटती । तये नांवें जीवन्मुक्ति । ऐशीच यथार्थ हे युक्ति । अनुभवासिद्ध ॥ ४३०१ ॥

---

मी सच्चिद्घन आत्मा ब्रह्म आहे. मी हें नामरूपादि बत्तीस नव्हेच. हें मी हें मी असा जो उगाच संभ्रम मानिला होता तो या ज्ञानानें गेला. आतां माझे जन्ममृत्यु चुकले. बंधनाचें निःसंतान झाले. अशा विक्षेपरूप शोकास खंडिलें. ही शोकमोक्ष अवस्था. जसे दहाजण दहाव्या करितां रडले, देह बडवला पण जेव्हां दहावा मोजणारा तो मी असें कळलें, तेव्हां त्यांचा शोक भंगला. तसा हा जीव अज्ञानानें जन्ममरणें सोशीत होता तें सर्व आत्म्याचें ज्ञान होतांच भंगलें. याप्रमाणें उत्तर अवस्थेपैकीं शोकभंगरूप पहिली अवस्था सांगितली. आतां दुसरी जी निरंकुशातृप्ती तीच सांगतों.

आपला आपण जो ब्रह्मात्मा असंग अभंग तो या वरील अपरोक्ष ज्ञानानें ब्रह्मात्मा झाला; तेव्हां जें साध्य तेंच साधिलें. मग त्यास पावावयाचें काय उरलें आहे कीं तें जाऊन साधावें. साध्यच आपला आपण आहे तेव्हां त्यास अमुक पावावयाचें असें कांहीं उरलेंच नाहीं. सर्व केलेल्या साधनाची सफलता झाली. तेव्हां करणेंही समाप्त झालें. मग त्यास अमुक एक करणें राहिलें असें नाहींच; हीच कृतकृत्यता. जें करावयाचें तें संपलें जें पावावयाचें तें पावलें व जें साध्य तें सद्गुरुप्रसादानें साध्य झालें. जसा दहाजणांपैकीं मोजणाऱ्या दहाव्याना सर्वांस लाभ झाला तेव्हां त्यांनीं दहाव्याच्या शोधाविषयींची खटपट सोडली, व त्यांस दहावा पाहिजे होता तो प्राप्त झाला, तेव्हां ते आपण कृतार्थ झालों असें मानूं लागले. तसा ब्रह्मात्मा साधावा हें जीवानें मनांत आणिलें, पुढें तोच ब्रह्मात्मा झाला. मग त्यास करणें किंवा पावणें काय उरलें ? राजास पाहून रंकांचे मनांत आलें कीं, आपणास राजासारखी संपत्ती असावी. पुढें तोच रंक राजा झाला मग त्यास पुढें कोणती पदवी पावावयाची राहिली ? कोणतीच नाहीं. तसें जीवाचें करणें संपलें त्यास पावावयाचें कांहीं उरलें नाहीं. असें जें समाधान बाणलें, हीच निरंकुशा तृप्ती. या तृप्तीसारखी दुसरी पूर्ण तृप्ती नाहीं. सर्व हिच्यापेक्षां नीच आहेत, म्हणून ही निरंकुशातृप्ती. एवं शोकभंग निरंकुशातृप्ती या दोन अवस्थारूप जीवन्मुक्ति जीवास अपरोक्ष ज्ञान झाल्यावर होते. आत्म्यास शोक नाहीं म्हणून त्यास शोकभंगअवस्था नाहीं. तसेंच आत्म्यास आत्मा पावला नाहीं म्हणून त्यास निरंकुशातृप्ती नाहीं. शोकभंग आणि निरंकुशातृप्तीरूप जीवनमुक्ति आत्म्यास नाहीं, तर जीवास आहे.

पूर्वीं जीव असून मग सुटतात म्हणून त्यास जीवन्मुक्त म्हणतात.

अज्ञान आवरण विक्षेप तिजा । ह्या तीन अवस्था बंधकृत सहजा । जीवासीच असती सुखदुःखजा । अन्यथा नव्हे २
तैसेंचि परोक्षापरोक्ष । उभय रीतीं ज्ञान प्रत्यक्ष । जीवासीच होतसे मोक्ष- । कारक सुखद ॥ ३ ॥
शोकभंग निरंकुशातृप्ति । हे उत्तर अवस्था जीवन्मुक्ति । सविकल्पत्वें जीवरूपाचि ती । तत्संबंधी अवस्था ॥ ४ ॥
अमुक एक म्हणावयाजोगें । निर्विकल्प ब्रह्म नसे अंगें । केवल निर्धारेंसीं अभंगें असंग अनिर्वाच्य ॥ ५ ॥

**ब्रह्म एवं निर्विकल्पकं ॥**

केवल निर्विकल्प ब्रह्म । सहज पूर्णपणें आत्माराम । एवं या अवधारणें संभ्रम । नाहींच अमुकसा ॥ ६ ॥
जेथें मायाचि हे नुद्भवे । तेथें कैंचीं असती जीवशिवें । वाउगींचि सर्वही रूपनांवें । उमटले रज्जु अहि ॥ ७ ॥
तया भुजंगाचे जे विकार । रज्जूसी न स्पर्शती अणुमात्र । तैसे जीवधर्म हे अन्यथा प्रकार । निर्विकल्पीं नसती ॥८॥
मायाचि नसतां उद्भवली । विद्या अविद्या कैशी जाहली । तयेविण प्रतिबिंबें पडलीं । जीवशिवांचीं कोठें ॥ ९ ॥
कोठें ईशें जग निर्मिलें । भूतें भौतिक कधीं जाहलें । पांचा खाणींमाजीं प्रवेशलें । हें बोलणेंचि मिथ्या ॥ ४३१० ॥
प्रवेश जाहलियाही कवणासी । अज्ञान उद्भवे जे विस्मरे आपणासी । कैंचें आवरण उभयरूपेंसी । नास्ति न भाति ११
कवणालागीं विक्षेप जाहला । कवणें देहाचा साभिमान घेतला । कवण पुण्यपाप करूं लागला । कोठें संचित सांचलें
जयाचें प्रारब्ध होऊनी । जीवासी भोग घडे नानायोनीं । उंच नीच आणि मध्यस्थानीं । सुखदुःख भोगिलें ॥१३॥
हा वाउगाचि कल्पित भ्रम । सविकल्पत्वें खरें कैचें रूपनाम । तरी लय अथवा जो उपक्रम । जाहला हें वचन मिथ्या
भ्रमेंकडून जें जें जाहलें । तें काय खरेंपणें उद्भवलें । तेणें अमुक अमुक कर्म केलें । तें भोगितां न चुके ॥१५॥
सर्प हा कधीं खरा जाहला । तेणें अमुकसा डसून मारिला । तो बागुलें येऊन उठविला । क्रीडे गंधर्वनगरीं ॥१६॥
तैसें जीवत्वाचि नाहीं निर्माण । तरी कवणासी अज्ञान आवरण । कवणा विक्षेपरूप साभिमान । कवण जन्मे मरे १७
ऐसा बंधचि नाहीं पावला । तेथें गुरु बागुल कैंचा आला । अज्ञानसह जन्ममृत्यु चुकविला । उतरिला रज्जुसर्प १८

---

१ अज्ञान २ आवरण आणि ३ विक्षेप ह्या तीन अवस्था बंधकृत आहेत व ह्या जीवासच सुखदुःखदेत्या आहेत. हें खोटें नव्हे. तसेंच परोक्षअपरोक्ष अशा दोन प्रकारचें ज्ञान जीवासच मोक्षदायक होतें. शोकभंग निरंकुशातृप्ति ही उत्तरअवस्था जीवन्मुक्ति, सविकल्पत्वानें जी जीवरूप चिति, तत्संबंधींच ह्या अवस्था आहेत. निर्विकल्प ब्रह्म अमक्यासारखें आहे असें ह्मणतां येत नाहीं, तर ते असंग, अभंग, अनिर्वाच्य आहे. केवळ निर्विकल्प ब्रह्म पूर्णपणें आत्माराम आहे. त्यास कसला संभ्रम नाहींच. ज्या ब्रह्माचे ठायीं मायाच उत्पन्न होत नाहीं तेथें जीव, शीव कोठून असतील ? जीव शीव हीं नामरूपें रज्जु अहिप्रमाणें वाउगींच आहेत. रज्जूवर भासलेला सर्प त्या सर्पाचे विकार रज्जूस जसे अनुमात्रही स्पर्शीत नाहींत, तसे हे अन्यथा अनेक प्रकारचे जीवधर्म निर्विकल्पीं नाहींत. जेथें मायाच उद्भवली नाहीं तेथें विद्या अविद्या कोठून होईल ? विद्याअविद्याच नाहीं तेथें जीव शीव हे कोठून असतील ? ईश्वर नाहीं मग तो जग कोठून उत्पन्न करील ? भूतेंभौतिकें कधीं झालीं व चार खाणींत जीवशीव कधीं प्रवेशले; हें बोलणेंच मिथ्या आहे. प्रवेशच झाला नाहीं मग विस्मरणरूप अज्ञान कसें उद्भवेल ? व नास्ति न भाति या उभय लक्षणाचें आवरण तरी कोठून असेल ? जीवत्वच नाहीं मग विक्षेप कोणास झाला ? देहाचा साभिमान कोणी घेतला ? पापपुण्य कोण करूं लागला ? संचित कोठें सांचलेलें आहे ? व त्या संचिताचें प्रारब्ध बनून जीवास उंच नीच मध्यम योनींत सुखदुःखें कधीं भोगावीं लागलीं ? हा सर्व वाउगाच कल्पित भ्रम आहे. सविकल्पत्वानें रूप, नाम खरें कसचें ? जर हें खरें नाहीं तर त्यांचा लय अथवा उपक्रम झाला हेंही बोलणें मिथ्याच. जें जें भ्रमानें झालें तें खरें उत्पन्न कसचें झालें ? जें खरें उत्पन्न झालें नाहीं, त्यानें अमुक कर्म केलें तें भोगिल्यावांचून चुकावयाचें नाहीं हेंही खरें कसचें ? वादीचा सर्प हा कधीं खरा होऊन त्यानें कोणा एकास दंश केला व त्याचे दंशानें तो गृहस्थ मेला, त्यास कोणी एका मंत्र्यानें उठविला, तो आतां गंधर्वनगरींत क्रीडत आहे. हें जसें मिथ्या तसें जीवत्वच निर्माण झालें नाहीं, तर मग अज्ञान, आवरण कोणास असणार ? तसेंच विक्षेपरूप साभिमान तरी कोणास असणार ? कोण जन्मेल व कोण मरेल कोणीच जन्ममरणाचे बंधनांत सांपडला नाहीं. मग त्यास गुरुरूपी मंत्री येऊन अज्ञानसमूह रज्जूसर्प उतरून जन्ममरणापासून कधीं सोडविला ?

पुढें तो जीवन्मुक्त होऊनी । विचरे गंधर्वनगरजनस्थानीं । हें उगेंचि बोलणें होपळपणीं । बंधमुक्तीचें ॥ १९ ॥
हे जीवासी वास्तविक नसती । तरी ब्रह्मात्मत्वीं कैंची वदंती । सर्पासि नसतां गमनादि विकृति । तरी रज्जूसी कैंच्या
आत्मया ब्रह्मासी कैंचा देह । कैंचा अज्ञान आवरणाचा संदेह । कैंचा सुखदुःखाचा समूह । विक्षेपरूप ॥ २१ ॥
या संघामाजीं आत्मा ब्रह्म । कधीं जाजावला पावून भ्रम । त्रिविधतापें तापला परम । अनुतापही कधीं जाहला२२
तेणें साधनचतुष्टयता । अधिकार जो उद्भवला पाहतां । तो ब्रह्मात्मयासी नसे तत्त्वतां शरणही न रिघे ॥२३ ॥
ब्रह्मात्मा गुरुत्वही न धरी । तरी केवीं होईल मोक्षाधिकारी । सेव्यसेवकत्वाची कैंची परी । तस्मात् गुरुशिष्य कैंचे २४
सद्गुरुनाथें जो बोध केला । कीं तूं प्रत्यक्ष ब्रह्मात्मा पहिला । हें न घडेचि ब्रह्मात्मयाला । कवणेही काळीं ॥४३२५॥
ब्रह्म आहेसें परोक्षज्ञान । ब्रह्मात्मया नाहीं जाहलें पूर्ण । तेणें केलेंही नाहीं विवेचन । पंचकोशादिकांचें ॥ २६ ॥
तो मंदप्रज्ञ ना तीव्रतर । तो अभ्यास आणि न करी विचार । तेणें लयसाक्षीचा साक्षात्कार नाहींच जाणिला २७
तो समाधिस्थ नाहीं बैसला । तो समाधान नाहीं पावला । तेणें साभिमानचि नाहीं घेतला । अहंब्रह्मास्मीचा ॥२८॥
पुन्हां उत्थान तो कधीं पावे समाधिसुखें सुखीच न व्हावें । तरी जीवन्मुक्तीचें सुख भोगावें । कासयाचें तेणें ॥२९॥
कचा शोक ब्रह्मात्मयासी । जाहला त्या अपरोक्ष ज्ञानासी । कवण पावला कोणते साध्यासी । तरी कृतकृत्यता कैंची
जीवन्मुक्ति वेदेहस्थिति । अलिप्तपण कैवल्यमुक्ति । सहजस्थिति नित्यमुक्ति । निर्विकल्पा केवीं ॥ ३१ ॥
ऐक्यभक्ति समाधान । असंगस्थिति सहजपण । हें कोणतेंचि अमुक म्हणून ह्मणे कोण निर्विकल्पा ॥ ३२ ॥
केवळपणें आदि अंतीं । तेवींच मध्यें सच्चिन्मूर्ती । निर्विकल्प जेथें वदती । सविकल्पत्वें कैंची ॥३३ ॥
हें जें जें बोलणें पडे । तें तें स्फूर्तीपासून ऐलीकडे । तें तें शोभत असे कोडें । यया सविकल्पासी ॥३४॥
मिथ्यासी मिथ्यात्वें सकळिक । बोलिजे जें जें आवश्यक । तें तें सर्वही सहेतुक । सविकल्पा साजे ॥ ४३३५ ॥
रविदत्ता हें जें निरूपण इतुकें । निवडिलें सविकल्प निर्विकल्पाचें निकें । याचा हेतु सावधान ऐकें । बोलिजे संक्षेपें
तुज वाटलें लयसाक्षीचें । ज्ञान अपरोक्षें होतां साचें । निर्विकल्पचि उरावें सविकल्पाचें । उत्थान न व्हावें ॥ ३७ ॥

---

व सोडविल्यावर तो जीवन्मुक्त होऊन जनस्थानरूपी गंधर्वनगरींत कधीं विचरूं लागला? बंध आणि मुक्ति हे बोलणेंच निष्फळ आहे बंध आणि मोक्ष जीवास नाहीं, मग ब्रह्मात्म्यास कोठून असतील ? सर्पासच जर गमनादि विकृति नाहींत तर त्यांचें अधिष्ठान जी रज्जू तीस ते विकार कोठून असतील ? ब्रह्मात्म्यास देह कसचा ? त्यास अज्ञान आवरण तरी कसचें ? त्यास सुखदुःखात्मक विक्षेप कसचा ? देहादि समुदायांत ब्रह्मात्मा भ्रम पावून त्यास कधीं जाजावला होता व तो त्रिविध तापानें परम ताप पावून त्यास कधीं अनुताप झाला होता? व त्यानें साधनचतुष्टयादि अधिकार कधीं संपादिला ? कधींच संपादिला नाहीं. तो गुरुस शरणही आला नाहीं, तो स्वतःच गुरुत्व पत्करीत नाहीं, मग तो मोक्षाधिकारी कसा होईल? त्याचे ठायीं सेव्यसेवकत्वाचाच अभाव तेव्हां गुरुशिष्य कसचे ? सद्गुरूंनीं बोध केला कीं, तूं पहिलाच ब्रह्मात्मा आहेस, हें ब्रह्मात्म्याचे ठायीं बोलणें लागत नाहीं. ब्रह्म आहे असें परोक्ष ज्ञान ब्रह्मात्म्यास झालें नाहीं व त्या ब्रह्मात्म्यानें पंचकोशाचें विवेचन केलें नाहीं. तो ब्रह्मात्मा मंदप्रज्ञ नाहीं, व तीव्र प्रज्ञ नाहीं. त्यानें अभ्यास अथवा विचार कांहींच केला नाहीं व त्यानें लयसाक्षीचा साक्षात्कार जाणलाच नाहीं. तो समाधीस बसला नाहीं त्यानें अहंब्रह्मास्मीचा अभिमान घेतला नाहीं. तो समाधान पावला नाहीं. तो समाधीसुखानें सुखी झाला नाहीं, व तेथून कधीं उत्थान पावला नाहीं. मग तो जीवन्मुक्तीचें सुख कसें भोगील ? त्यास कशाचा शोक झाला आहे? तो त्याचा शोक अपरोक्ष ज्ञान नाशील ? कोण कोणत्या साध्यास पावला, कोणींच जर साध्यास पावला नाहीं तर त्यास कृतकृत्यता कसची? जिवन्मुक्ति, विदेहस्थिति, आलिप्तपण, कैवल्यमुक्ति, सहजस्थिति, नित्यमुक्ति निर्विकल्पास कसची ? ऐक्यभक्ति, समाधान, असंगस्थिति, सहजपण यांपैकीं अमुक एक निर्विकल्पास आहे असें कोण म्हणेल? जें आदि अंतीं मध्यें सच्चिदानंदमूर्ति आहे, त्यास निर्विकल्पास सविकल्पाचे धर्म कोठून येतील? आपण जें जें बोलणें बोलूं तें तें सर्व स्फूर्तीपासून अलिकडेच आहे. हें बोलणें सविकल्पासच शोभतें. मिथ्यास मिथ्यत्वानें जें जें बोलणें बोलावें तें सर्वही सहेतुक सविकल्पास शोभतें. रविदत्ता, हें जें इतकें निरूपण सविकल्प निर्विकल्प यांचें स्पष्टीकरणांत निवडिलें याचा हेतु काय आहे तो संक्षेपानें सांगतों ऐक.

रविदत्ता, तुला असें वाटलें कीं, लयसाक्षीचे अपरोक्षत्वें ज्ञान झाल्यावर सविकल्पाचें उत्थान न होतां निर्विकल्प उरावें.

तरी तें निर्विकल्पजैसें पूर्ण । तयासीनिर्विकल्प न करी कवण । तरी तें सविकल्पत्वेंपावलेंउत्थान । हेचि तुजला भ्रांति
तो निर्विकल्प ब्रह्मात्मा तूं खरा । अससी एकरूप निर्धारा । परी त्वां मानिलें मी म्हणोनि येरा । तो तूं आभासरूपी
तया आभासरूप सविकल्पानें । सुखदुःख भोगिलें वेगळेपणें । तेणेंचि अभ्यास विचारें वोळखणें । लयसाक्षी निर्विकल्प
बहुतां दिवसां या सविकल्पासी । निर्विकल्प अखंडैकरसीं । मिळणी जाहली प्रतीती ऐशी । सविकल्पत्यागें ॥ ४१ ॥
हें इतुकेंही ईशादि तृणांत । मिथ्यात्वें त्यागिलें येणें समस्त । म्हणिजे हेंमीनव्हेचिसंशयरहित। तें निर्विकल्प आहे स्वयें
बहुत दिन नवतें कळलें । तें माझें मज गुरुनें दिधलें । तेणें आनंदें पुन्हां उफाळलें । जें सविकल्प रूप तेंची ॥४३॥
निर्विकल्प नाहीं विकारलें । निर्विकल्पत्वेंचि असें संचलें । तें निर्विकल्प सविकल्पाकार जाहलें वाटे तेचि भ्रांति ॥ ४४
अरे जेधवां या सविकल्परूपासी।अज्ञानहोतें वेगळेपणेंसी । तेव्हांचि सविकल्पत्वतुजनिर्विकल्पासी।किमपि आलें न होतें
तें आतांअपरोक्ष ज्ञान जाहलिया । सविकल्प जाहलें हें बोलणेंवायां।तस्मात् हाचिभ्रमऐसाटाकेनियां।सविकल्पता सांडी
आहेसी जैसा आदिअंतीं । तैसाचि मध्येंही सहजगती । त्या रीतींच वोळखीं आपणाप्रती । नवी कृति कासया ४७
तेंही वोळखी ऐसें म्हणतां । निर्विकल्प वोळखीना तत्त्वतां । निर्विकल्प सविकल्पेंचि जाणतां । समाधान बाणतें ॥४८॥
सविकल्पासीच होतें अज्ञान । तयासीच निर्विकल्प मी म्हणून । जाहलेंअसें अपरोक्ष ज्ञान । तस्मात् तयासीच कळावें
तेणेंचि अज्ञानें देहाभिमान । घेऊन पावलें होतें बंधन । तरी तेणेंचि घेतां अहंब्रह्म म्हणून । मुक्त होय तेंची ॥५०॥
अहंब्रह्मास्मीचा संकल्प । चंचळरूपें घेतसे सविकल्प । परी निर्विकल्प तें निर्विकल्प । अल्प चंचळेना ॥४३५१॥
तस्मात चंचळें चंचळपणा घेऊनी । मुक्त जाहला बंधनापासोनी । आणि निर्विकल्पाची । तों हानि । किमपि नसे ५२
आपुलें निर्विकल्पत्व न मोडे । आणि सविकल्पा महत् लाभ जोडे । तरी तो सुखें होईना कोडें । काय गेलें तुझें ॥५३
निर्विकल्पासी त्वां निर्विकल्प । अभ्यासें केलें नाहीं अल्प । तें पहिलेंचि असंभाव्य अमुप । परी पूर्ण जैसें तैसें ५४

---

तरी जें पूर्ण निर्विकल्प आहे त्यास निर्विकल्प कोण करीत नाहीं ? सर्व निर्विकल्पच करितात. असें असून सविकल्पत्वानें उत्थान पावलें असें जें तुला वाटतें ही भ्रांति आहे. जो लयसाक्षि निर्विकल्प तोच तूं आहेस. पण तूं त्याहून निराळा जो आभासरूपी तोच मी असें मानिलेंस. जो आभासरूपी सविकल्प तो मी असें मानिलेंस, तोच आभासरूपी सविकल्प वेगळेपणानें सुखदुःख भोगीत आहे. त्यानेंच अभ्यास करून विचारानें लयसाक्षि निर्विकल्प ओळखावें. सविकल्पास निर्विकल्प अखंडैकरशीं बहुतां दिवशीं मिळणी झाली, अशी सविकल्पत्यागानें प्रतिति आली. ईश्वरापासून तृणापर्यंत हें इतकें, यानें मिथ्या समजून त्यागिलें. म्हणजे निःसंशय हें मी नव्हे तर तें निर्विकल्प मी स्वतः आहें. पुष्कळ दिवस कळलें नव्हतें, तें माझें मला गुरूनें दिलें त्या आनंदानें जें उफाळतें तें सविकल्पच आहे. निर्विकल्प विकारलेंच नाहीं, तर तें निर्विकल्पत्वानेंच आहे. असें असतां तें निर्विकल्प सविकल्पाकार झालें असें वाटतें हीच भ्रांति आहे. अरे जेव्हां यास विकल्परूपास वेगळेपणानें अज्ञान होतें तेव्हांच तुज निर्विकल्पास सविकल्पत्व किमपीही आलें नव्हतें; आणि आतां तर अपरोक्ष ज्ञान झालें आहे, तेव्हां आतां निर्विकल्पाचें सविकल्प झालें असें म्हणतोस हें बोलणेंच व्यर्थ आहे. याकरितां हा भ्रम टाकून तूं मानिलेली सविकल्पता सोड. तूं जसा आदिअंतीं आहेस तसाच मध्येंही आहेस. याप्रमाणें आपणास ओळख, त्यास ओळखण्याची नवी कृति कशाला पाहिजे.

ओळख असें म्हटल्यानें निर्विकल्प ओळखीत असेल असें वाटेल. पण निर्विकल्प कांहीं ओळखीत नाहीं. तर सविकल्पानेंच निर्विकल्प ओळखलें असतां समाधान बाणतें. सविकल्पास अज्ञान होतें, त्यालाच मी निर्विकल्प असें अपरोक्ष ज्ञान झालें म्हणून त्या सविकल्पासच कळलें पाहिजे. या सविकल्पानेंच अज्ञानामुळें देहाभिमान घेतला होता व त्यामुळें तें बंधन पावलें होतें. त्यानेंच अहंब्रह्म हा साभिमान धरला असतां तेंच मुक्त होईल. अहंब्रह्मास्मीचा संकल्प चंचळपणानें सविकल्पच घेते. जें निर्विकल्प तें निर्विकल्पच आहे. तें अल्पसुद्धां चळत नाहीं, म्हणून चंचळानेंच चंचळपणा घेऊन तें बंधनापासून मुक्त झालें. निर्विकल्पाची हानी त्याचे योगानें किमपीही झाली नाही. अरे, आपलें निर्विकल्पत्व न मोडतां सविकल्पास महत्लाभ प्राप्त होत आहे, तर त्यास होईना महतलाभ. तुझें काय गेलें. त्वां निर्विकल्पास अभ्यासानें अल्पसुद्धां निर्विकल्प केलें नाहींस, तें पहिलेंच असंभाव्य, अमूप, परिपूर्ण, जशाचे तसेंच निर्विकल्प आहे.

आतां अभ्यासें या सविकल्पासी । स्थिर करून बहु सायासीं । निर्विकल्प आणिलें प्रतीतीसी । कीं लयसाक्षी अहंब्रह्म
तेणेंचि निर्विकल्प जाणिल्याविण । अनुभविलें लयसाक्षीरूप ज्ञान। तत्क्षणीं तेथें होतें तेंचि होऊन । आपुले विकल्पत्यागें
तेंचि होऊन जरी असिलें । तरी तें त्रिपुटीविण अनुभविलें । तें अनुभवणें सविकल्पाकडे आलें । निर्विकल्प नव्हे ५७
हा मी लयसाक्षी निर्विकल्प । न कळोनि कळे जरी अल्प । तरी तें सविकल्पाचेंचि रूप । उत्थानीं अनुमानिजे ॥५८
वृत्तीचें उत्थान होय जेधवां । तो समय आठवीतसे तेव्हां । कीं मी निर्विकल्पचि स्वभावा । ऐक्यत्वें हा काळ होतों५९
ऐसा उत्थानीं प्रत्यय होतां । तेव्हां ते समयीं असे अनुभविता । तोचि सविकल्प सामान्यता । असे तत्समयीं ४३६०
तये समयीं असल्याविण । उत्थानीं नव्हे तेथींची आठवण । परी तो सविकल्पसा नव्हे असून । लीनत्वें होता ॥६१॥
ऐसा जो लीनत्वें सामान्यता । निर्विकल्पाचा निर्विकल्पें अनुभविता । तोचि सविकल्प असे तत्त्वतां । हेतु उत्थानाचा
तेणें निर्विकल्पाची काय जे गोडी । घेत असतां अति आवडी । तेणेंचि उफाळली वृत्ति उघडी । विशेषें उत्थानीं ६३
वृत्ति उसळतांचि मन बुद्धि । उठली घेऊनि अहंब्रह्मशुद्धि । सर्व आनंदली परमानंदीं । तेणें हेलावती ॥ ६४ ॥
परी ते बुद्धि या देहादिकां । मी म्हणूनि नेघे कुतर्का । अहंब्रह्मचि निश्चय करी निका । जो मुक्तीसी कारण ॥ ६५॥
तस्मात् देहबुद्धीचा जो अभिमान । तेणेंचि जीवासी होतें बंधन । तेंचि तुटलें अकस्मात् घेतां भान । अहंब्रह्मास्मीचें
ऐसा सविकल्प तुझिया ज्ञानें । मुक्त जाहला निर्विकल्प साभिमानें । तूं जैसा तैसा पूर्णपणें । हालवला नाहींसी ॥६७॥
क्षणभरी सविकल्पचि निश्चळ । होऊनि मागुती जाहलें चंचळ । तूं जैसा तैसाचि पूर्ण केवळ । असतां होईना सुखें
आणीक एक तुज शंका वाटे । कीं सविकल्प रोधोनि बळें नेटें । केलें होतें निर्विकल्प गोमटें । तरी तैसा कां न स्थिरावे
तेणें भ्रमेंचि बहुदुःख भोगिलें । तयासी अति विश्रांतिस्थळ मिळालें । तरी तेथेंचि निवांत कां नाहीं जाहलें । पावलें कां विकार
महत् लाभ तरी यासी जाहला । तरी तो त्यागून कां उफाळला । तैसाचि तेथें कां नाहीं राहिला । सुखरूपपणें ॥ ७१
तरी याचें अवधारीं उत्तर । हा स्वभावाचि वृत्तीचा निरंतर । वेगें उसळूनियां झडकर । मावळावें तत्क्षणीं ॥ ७२ ॥

---

तूं मोठे सायास करून आतां अभ्यासानें सविकल्पास स्थीर करून निर्विकल्प अनुभवास आणिलें कीं, लयसाक्षी ब्रह्म मी आहें त्यानेंच तत्क्षणीं आपल्या विकल्पत्यागानें तेथें होतें तेंच होऊन निर्विकल्प जाणल्यावांचून लयसाक्षी ज्ञान अनुभविलें. तेंच होऊन जरी असलें, तरी त्रिपुटीवांचून त्यानें अनुभविलें. तें अनुभवणें सविकल्पाचें आहे, निर्विकल्पाचें नाहीं. हा मी लयसाक्षी निर्विकल्प असा न कळून जरी अल्प कळला तरी उत्थानावरून अनुमान करावें कीं, हें सविकल्पाचेंच रूप आहे. कारण वृत्तीचें उत्थान जेव्हां होतें, तेव्हां तो समय आठवतो कीं, इतका वेळपर्यंत मी निर्विकल्प ऐक्यत्वें होतों, असा उत्थानीं प्रत्यय होतो, म्हणून त्यावेळीं अनुभवणारा कोणी तरी होता, तोच सामान्यतः सविकल्प त्यावेळीं होता. तेथें त्यावेळीं जर सविकल्प नसता तर तेथींची आठवण उत्पन्न झाली नसती. ज्यापेक्षां आठवण होते त्यापेक्षां तेथें सविकल्प होता. तो सविकल्प लीनत्वानें होता म्हणून हाच सविकल्प असे म्हणतां येत नव्हते. असा जो लीनत्वानें असणारा सामान्य सविकल्प जो निर्विकल्पाचा अनुभविता तोच उत्थानाचा हेतु आहे. त्यानें निर्विकल्पाची अति आवडीनें गोडी घेतली, त्यायोगानें उत्थानीं विशेषें वृत्ती उफाळली. वृत्ती उफाळतांच मन, बुद्धि ही अहंब्रह्माची शुद्ध घेऊन उठली मग तीं सर्व, परमानंदीं आनंदलीं. त्यायोगानें तीं हेलावूं लागलीं. मग ती बुद्धि या देहादिकांचाही मी असा कुतर्क घेईनाशी झाली, तर जो मुक्तीला कारण अहंब्रह्मास्मिसाभिमान तोच घेऊन होती.

देहबुद्धीच्या अभिमानामुळें जीवास बंधन होतें तेंच बंधन अहंब्रह्मास्मीची शुद्धी घेतांच तुटलें. याप्रमाणें सविकल्प तुझ्या ज्ञानानें निर्विकल्पसाभिमानानें मुक्त झालों. तूं पूर्णपणें जशाचा तसाच आहेस, हालवला नाहींस, क्षणभर सविकल्पच निश्चळ होऊन तेंच पुन्हां चंचळ झालें. तूं जशाचा तसाच पूर्णपणानें आहेस मग तें चंचळ झालें म्हणून तुझें काय गेलें. तुझी एक शंका आहे कीं, मी सविकल्पबळें नेटानें रोधून निर्विकल्प केलें होतें तें तसेंच कां स्थीर रहात नाहीं? त्यानें भ्रमानें बहुत दुःख भोगिलें होतें, त्यास आतां अति विश्रांतिस्थळ मिळालें, तरी तें तेथें निवांत होऊन कां नाहीं राहिलें? विकार कां पावलें? त्यास तर महत्लाभ झाला होता तो टाकून कां उफाळलें. तेथेंच सुखरूपपणानें कां नाहीं राहिलें?

उत्तर-वृत्तीचा असा स्वभावच आहे कीं, उसळावें व मावळावें.

वृत्ति उठतां मन बुद्धि उठती । तया विकल्पें इंद्रियांच्या विकृति । होवोनि सुखदुःखें सर्व भोगिती । प्रारब्धानुकारें ७३
हा प्रारब्धाचाही बळात्कार । वोढोनी काढी असतांही स्थिर । सुषुप्तींतून जैसे सर्व नर । बळें येती जागरा ॥ ७४ ॥
असो जरी उत्थान पावलें । परी तें बाधक नव्हे जरी भोगिलें । मी देह म्हणून साभिमानें घेतलें । तरीच बाधक ७५
अहंब्रह्मास्मि अभिमान घेतां । देहबुद्धीचे होतसे घाता । याकरितांचि विस्मृति न पडतां । स्फुरावें अहंब्रह्म ॥ ७६ ॥
येथेंही तूं संशय मानिसी । कीं ब्रह्म अभिमान होतां वृत्तीसी । विघ्नाचि असे देहबुद्धि जैशी । समाधाना भंग ॥ ७७ ॥
तरी यथार्थ ज्ञान जाहलियावरी । केवल सत्याचा अभिमान धरी । जें निर्विकल्प लयसाक्षी निर्धारी । तें मी म्हणे अहंब्रह्म
जोंवरी लयसाक्षीज्ञान न कळे । आणि अहंब्रह्म म्हणोनि उफाळे । तें भाविलें होतें अज्ञानबळें । वृत्ति कीं शून्यब्रह्म
याची नांवें अयथार्थ । कळलेंचि नाहीं ब्रह्म यथार्थ । जरी अहंब्रह्मास्मीचा घेतां अर्थ । व्यर्थचि जाय ॥ ४३८० ॥
जैसें देहादिकां ब्रह्मत्व नसे । शून्य कीं वृत्तीसी अब्रह्मत्व तैसें । देहासी ब्रह्म म्हणून जरी घेतसे । तरी बंधन न चुके
तैसेंचि शून्यासी कीं वृत्तीसी । ब्रह्म म्हणून कल्पना ऐशी । तेणें घोकितां अहंब्रह्मास्मीसी । फळ कदां नव्हे ॥ ८२ ॥
तस्मात् न कळतां लयसाक्षीब्रह्म । अहंब्रह्मास्मिही बाधक परम । तेंचि कळतां यथार्थ वर्म । साभिमानचि मुक्त करी
याचि हेतु संत सज्जन । बोलताति हें यथार्थ वचन । कीं जो सत्याचा साभिमान । तो निरभिमान जाणावा ॥ ८४ ॥
तस्मात् अहंब्रह्मास्मि विशेष वृत्ति । घेतली पाहिजे साधकें निश्चित्तीं । तरीच क्षीण होईल अवगति । हे देहबुद्धिरूप ८५
जरी लयसाक्षीज्ञान जाहलें । आणि अहंब्रह्म नाहीं स्फुरलें । तरी देहबुद्धीसी क्षीणत्व आलें । न घडे सहसा ॥ ८६ ॥
या वृत्तीसी देहबुद्धि कैशी । सदृढ जाहली नुच्चारितां जैशी । ब्रह्मबुद्धिही व्हावी तैशी । तरीच निःसंशय ॥ ८७ ॥
हें निरूपण पुढें असे । विस्तारें तें कळेल आपैसें । परी दृढ समाधान जें ऐसें । तें खलिल्याविण नव्हे ॥ ८८ ॥
वृत्तीसी खल तो हाचि ऐसा । अहंब्रह्मास्मीचिया उल्हासा । विस्मराचि न पडावा सहसा । साभिमानही घ्यावा ॥ ८९
बुद्धीनें अथवा मनानें । किंवा नुसधिये वृत्तीनें । अहंब्रह्म साभिमान घेणें । तरीच निश्चय दृढ होय ॥ ४३९० ॥
जैसा जैसा अहंब्रह्मास्मीचा । अभिमान वाढत जाय साचा । तैसा तैसा या देहबुद्धीचा । घात होत जाय ॥ ९१ ॥

---

वृत्ती उठतांच मन, बुद्धी उठतात पुढें त्यांच्या विकल्पानें इंद्रियांच्या विकृति होऊन प्रारब्धाप्रमाणें सर्व सुखदुःखें भोगितात. झोंपेंतून जशीं सर्व मनुष्यें बळेंच जागीं होतात, तसाच हा प्रारब्धाचा बलात्कार स्थीर असतां तेथून ओढून काढितो. असो. उत्थान पावलें आणि सर्व जरी भोगिलें, तरी तें बाधक नाहीं. पण मी देह म्हणून सर्व साभिमानानें घेतलें तर तें मात्र बाधक आहे. अहंब्रह्मास्मीचा साभिमान घेतला असतां देहबुद्धीचा घात होतो म्हणून विस्मरण न होतां अहं ब्रह्म स्फुरावें.

शंका--देहबुद्धी जशी बाधक तशी अहंब्रह्म हेंही विघ्नच आहे.

उत्तर-यथार्थ ज्ञान झाल्यावर निर्विकल्प लयसाक्षी जें ब्रह्म, तोच मी ब्रह्मात्मा, असा हा, केवळ सत्याचाच अभिमान आहे, हा बाधक नाहीं. पण जोंपर्यंत लयसाक्षी ज्ञान कळत नव्हतें, आणि अहंब्रह्मास्मि असा साभिमान घेत होता तेव्हां त्या अज्ञानानें शून्यच ब्रह्म मानिलें होतें. हें मात्र अयथार्थ ब्रह्म. कारण त्यास यथार्थ ब्रह्म कळलेंच नाहीं, असें असून जरी त्यानें अहंब्रह्मास्मि जसें मानिलें तरी तें व्यर्थ आहे. जसें देहास ब्रह्मत्व नाहीं तसेंच वृत्तीस किंवा शून्यास ब्रह्मत्व नाहीं. देहास ब्रह्म म्हणून जरी मानिलें तरी बंधन चुकत नाहीं, तसें शून्यास किंवा वृत्तीस मी ब्रह्म म्हणून मानून घोकिलें तरी त्यापासून कांहींच फळप्राप्ति नाहीं, म्हणून लयसाक्षी ब्रह्म न कळतां, अयथार्थ जें अहंब्रह्मास्मि तेंही परम बाधक आहे. तेंच यथार्थ वर्म कळलें असतां तो अहंब्रह्मास्मि जरी साभिमान आहे तरी तो मुक्त करितो, म्हणून संतसज्जन म्हणतात कीं, जो सत्याचा साभिमान तो निरभिमानच समजावा व तो निरभिमान असल्यामुळें साधकानें अहंब्रह्मास्मीचा अभिमान घ्यावा; म्हणजे तेणेंकरून देहबुद्धी क्षीण होईल. लयसाक्षीज्ञान होऊन जर अहंब्रह्मास्मि स्फुरल नाहीं तर देहबुद्धी क्षीणत्व पावत नाहीं. वृत्तीला न उच्चारितां देहबुद्धी कशी सदृढ झाली आहे तशी न उच्चारितां ब्रह्मबुद्धी सदृढ व्हावी, तरच निःसंशय. हें निरूपण पुढें सविस्तर सांगणें आहे तेव्हां कळेल. पण सदृढ समाधान जें तें असें खलल्यावांचून होत नाहीं. वृत्तीला नेहमीं हाच खल असावा कीं मी ब्रह्म आहे. हा अहंब्रह्मास्मीचा तिला कधीं विसर पडूं नये. विसर न पडण्याकरितां तिनें अहंब्रह्मास्मीचा साभिमानही घ्यावा. बुद्धीनें अथवा मनानें किंवा नुसत्या वृत्तीनें अहंब्रह्मास्मि हा साभिमान घ्यावा. तरच केलेला निश्चय दृढ होईल. अहंब्रह्मास्मीचा अभिमान जसा जसा वाढत जाईल तसा तसा या देहबुद्धीचा घात होत जाईल.

मुख्य वृत्तीनें अज्ञानेंकडून । घेतलें होतें अन्यथा भान । तयेसीच दृढ व्हावें खळून । कीं निर्विकल्प अहंब्रह्म ॥ ९२ ॥
तस्मात् रविदत्ता अपरोक्ष ज्ञान । जाहलियाही धरीं साभिमान । निमिष्य एक न पडावें विस्मरण । तरीच देहबुद्धि गळे
तंव रविदत्त करी विनंती । सविकल्प जें उद्भवलें निश्चिती । तें निर्विकल्पाहून भिन्नाचि अति । आकाश वायु जैसे ९३
निर्विकल्पाचें वेगळें रूप । हें त्याहून भिन्न सविकल्प । तरी हें तया अन्यासी आपेआप । मी म्हणोनि घे कैसें ॥ ९५
दुसरियासी मी म्हणोनी । कैसा घेईल वेगळा असोनी । हाचि संशय उद्भवला मनीं । तो फेडावा स्वामी ॥ ९६ ॥
ऐसा प्रश्न ऐकोनि स्वामी । बोलते जाहले अनुक्रमीं । हे अन्यें म्हणसी घेतली ऊर्मि । तरी हा अन्य कोठें ॥ ९७ ॥
अन्य म्हणिजे आपण जैसा । असे तया दुसराही असावा तैसा । ऐसें तो नव्हे प्रतिबिंब आरसां । पडिलें तैसें सविकल्प
दर्पणीं जें कां प्रतिबिंबलें । तें म्हणों नये दुसरें जाहसें । बिंबाचेचि स्वभाव उमटले । अनुकार प्रतिबिंबीं ॥ ९९ ॥
तैसेंचि निर्विकल्प ब्रह्मात्मयाचें । प्रतिबिंब तें सविकल्प साचें । तस्मात् जैसे स्वभाव निर्विकल्पाचे । तैसेचि उमटती येथें
बिंब आणि प्रतिबिंबाचा । सत्यमिथ्या मात्र भेद साचा । परी एकसारिखा साकार दोहींचा । किमपि उणें नसे ४४०१
म्हणोनि हा मी नव्हे मिथ्याभास । तरी तोचि मो असें अधिष्ठान यास । ऐसा भावितां निर्विकल्पाचा ध्यास । असे युक्तसविकल्पा
प्रवाहीं जो पडिला तेणें । वृक्षस्थ मी म्हणून स्वकार करणें । तैसाचि निर्विकल्पा मी म्हणून घेणें । सविकल्प जीवें ३
सविकल्पाचें मुख्य जें रूप । तें यथार्थ असे कीं निर्विकल्प । म्हणोनि तेंचि मी ऐसें साक्षेप । घेतलेंच ध्यावें ॥ ४ ॥
असोनिर्विकल्पअहंब्रह्मास्मि । सविकल्पें घेतां अभिमानें ऊर्मि । सविकल्प जाऊनि स्वकीय निजधामीं । ऐक्य पावे निर्विकल्पीं
येथेंही मानिसी तूं ऐसें । कीं आपुला घात इच्छून कैसें । भावील निर्विकल्पाचें आपैसें । होणें आपणासी ॥ ६ ॥
तरी पाहें पुढें राज्यप्राप्ती । होईल म्हणोनि करवत घेती । तैशी निर्विकल्पाची अविनाश संपत्ति । हा लाभ अधिक पाहिला
हें किंचिज्ज्ञ दरिद्र जावें । तें सचित्सुख प्राप्त व्हावें । ऐशिया हेतू इच्छी स्वभावें । घातही आपुला ॥ ८ ॥

---

मुख्य वृत्तीनें अज्ञानामुळें अन्यथा भान घेतलें होतें तें तिलाच खळून दृढ व्हावें कीं, मी निर्विकल्प ब्रह्म आहे. देहबुद्धि क्षीण होण्याकरितां, रविदत्ता, अपरोक्ष ज्ञान झालें तरी, अहंब्रह्मास्मीचा साभिमान धर. अहंब्रह्मास्मीचें एक क्षणभरसुद्धां विस्मरण पडूं देऊं नको तरच देहबुद्धि गळेल.

**प्रश्न**–वरील निरूपणाचे आधारें रविदत्त प्रश्न करितो कीं, अहो स्वामी, सविकल्प जें उत्पन्न झालें तें आकाशाहून वायु भिन्न त्याचप्रमाणें निर्विकल्पाहून अति भिन्न आहे. तेव्हां सविकल्प आपणाहून जें निर्विकल्प दुसरें त्या दुसऱ्याचा आपणावर आरोप कसा करील ? म्हणजे सविकल्प मीच निर्विकल्प आहे असें कसें म्हणेल; हा संशय मला उत्पन्न झाला आहे तो स्वामी तुम्ही फेडा.

स्वामी उत्तर देतातः हे रविदत्ता, तूं सविकल्प आणि निर्विकल्प यांत सविकल्प निर्विकल्पाहून निराळें आहे असें म्हणतोस पण तें निराळें नाहीं. निर्विकल्प जसें आहे तसेंच जर सविकल्प आहे, तर हें त्यासारखेंच दुसरें आहे असें म्हणतां आलें असतें. पण आरशांत जें प्रतिबिंब पडलें ते मुख्य बिंबाहून निराळें नाहीं. तसेंच सविकल्प हें, निर्विकल्पाचें प्रतिबिंब आहे तेव्हां तें त्याहून निराळें कसें असेल ? निर्विकल्पाचें जे स्वभाव तेच या सविकल्पांत उमटले आहेत. बिंब आणि प्रतिबिंब यांचे आकार कांहीं उणें न दिसतां एकसारखेच आहेत. पण बिंब सत्य, आणि प्रतिबिंब मिथ्या, हा मात्र त्या दोहोंत भेद आहे, म्हणून हा मिथ्याभास सविकल्प मी नाहीं. तर याचें अधिष्ठान जें निर्विकल्प तेंच मी आहें. असा निर्विकल्पाचा ध्यास सविकल्पास युक्त आहे. जसा वृक्षस्थच प्रवाहांत पडलासा भासला, त्या वृक्षस्थास प्रवाहांत पडलेल्या भासानें मानावें कीं, मी प्रवाहांत पडलेला दिसतो तो मी नव्हे, तर जो वृक्षस्थ आहे तोच मी आहें, हा जसा त्या भासास वृक्षस्थाचा स्वीकार करणें इष्ट आहे. तसाच सविकल्प जीवास मी निर्विकल्प ब्रह्म आहे हा भाव मानणें इष्ट आहे. सविकल्पाचें जें यथार्थ मुख्य रूप तेंच निर्विकल्प आहे, म्हणून सविकल्पाचें निर्विकल्प मीच आहे, असें मानिलेंच पाहिजे. सविकल्पानें मी निर्विकल्प आहे हा अभिमान घेतला असतां तें आपलें निजधाम जें निर्विकल्प तेथें ऐक्य पावेल.

**शंका**–सविकल्प आपला नाश इच्छून म्हणजे मी सविकल्प नाहींच. आहे तें सर्व निर्विकल्पच आहे असें कसें मानील ?

**उत्तर**–पुढें तुला राज्यप्राप्ती पाहिजे असेल तर त्या राज्याकरितां तूं आपला देह करवतून ईश्वरास अर्पण कर असें जर कोणी सामर्थ्यानें सांगितलें, तर राज्यप्राप्ती पुढें होईल म्हणून आपला देह करवतीं घालतो. त्याप्रमाणें सविकल्पानें निर्विकल्पाची अविनाश संपत्ती आहे, हा लाभ मोठाच आहे असें जाणून, हें किंचिज्ज्ञ दरिद्र जावें आणि तें सचित्सुख प्राप्त व्हावें, म्हणून आपला त्या सविकल्पानें घात इच्छिला.

तस्मात् तया अहंब्रह्मास्मीचा। विसराचि न पडावा साधका साचा। या स्फूर्तीपासून देहादिकांचा। मीपणा किमपि न घ्यावा
आणीक म्हणसी सर्व व्यापार। होतां मीपण घेईल सत्वर। आणि निर्विकल्पाचा पडे विसर। तरी कैसें करावें ४४१०
याचें उत्तर ऐक आतां। भीति जरी चित्तीं असतां। विस्मरचि न पडे तत्त्वतां। हें मी आठवतां तें स्मरे॥ ११॥
जैसा कोणी एक शुद्ध ब्राह्मण। अंत्यजीं बाटविला बळेंकडून। तो तयापासून निसटून। ब्राह्मणां शरण आला॥ १२
तो ब्राह्मणीं शुद्ध केला। तेव्हां अंत्यजसमुदाय टाकिला। पुन्हां जरी अंत्यज दृष्टीं पाहिला। तरी पळोनियां जाय ब्राह्मणांत
तयासी महार दिसतां नयनीं। तत्क्षणीं मी ब्राह्मण आठवी मनीं। ब्राह्मणसमुदायीं राहे मिळोनी। या रीतींच हें जाणावें
आत्मब्रह्म जो निर्विकल्प। स्वतःसिद्ध आपण निजरूप। असतां अज्ञानें जाहला सविकल्प। तेणें जन्मे मरे॥ १५॥
या यातायाती सुखदुःखाच्या। भोगिल्याचि भोगितां असाच्या। दुःखाहून दुःखात्मकाच्या। भोगिल्या विकृति॥१६॥
तयासी अनुताप जाहला मनीं। कीं चुकाव्या ह्या जन्मश्रेणी। म्हणोनी सद्‌गुरूसी शरण जाऊनी। तारा म्हणे दीनासी
तेव्हां सद्‌गुरुनाथें बोधिला। आपुले निजरूपा पावला। पुन्हां सविकल्पाचा मेळा देखिला। तरी तो स्मरे तेव्हांची १८
म्हणे याकरितांचि मजला बंधन। पडिलें होतें अज्ञानेंकडून। तरी आतां मी न घें याचें मीपण। मी तों ब्रह्म निजांगें
जरी भीति ऐशी अंतरीं। तरी स्मरतसे अति झडकरी। मी ब्रह्म निर्विकल्प निर्विकारी। हा संघ मी नव्हें॥ ४४२०॥
आणीक एक स्मरण व्हावया। प्रयोजन असे शिष्यराया। एकदां अपरोक्ष ज्ञान हें जाहलिया। वृद्धीच होतसे॥ २१
येर विद्या होऊन विसरती। तैशी नव्हे हे आपरोक्ष संपत्ति। एकदां जाहलिया वर्धमान होती। कदां क्षीण नव्हे॥२२॥
अहंब्रह्म जरी यथार्थ कळे। तरी हें प्रतिदिनीं सहज उफाळे। अनायासेंचि देहाभिमान गळे। यदर्थी संशय नाहीं २३
मौंजीबंधनें ब्राह्मण जाहला। तो ब्राह्मणपणा वाढतचि गेला। शूद्रपणा जो होता पहिला। तो गळे आपेंआप॥ २४
तैसा अहंब्रह्मचि साभिमान। वाढत जाय क्षणाहून क्षण। देहबुद्धि हे होईल क्षीण। तैशी तैशीच॥ २५॥

---

साधकास अहंब्रह्मास्मीचा विसरच पडूं नये. व त्यानें स्फूर्तीपासून देहापर्यंत सर्वांचा मीपणा किमपीहि घेऊं नये.

शंका–कोणीही मनुष्य सर्व प्रकारचे व्यापार करीत असतां वारंवार मीपण घेईल, त्या योगानें निर्विकल्पाचा विसर पडेल, तर मग त्याविषयीं साधकानें काय करावें ?

उत्तर–चित्तामध्यें सविकल्पविकाराची जर भीति आहे, तर यास विसरच पडणार नाहीं. व्यापारांत हें मी असें आठवल्याबरोबर तो निर्विकल्प ब्रह्म मी आहें असें स्मरेल. यास उदाहरण कोणी एक शुद्ध ब्राह्मण होता, त्यास अंत्यजांनीं बळेंच बाटविला. पुढें तो ब्राह्मण त्या अंत्यजाचे हातून सुटून ब्राह्मणांत आला, आणि त्या ब्राह्मणास शरण येऊन आपला झालेला खरा वृत्तांत सांगून आपली शुद्धी करविली. पुढें तो ब्राह्मणांत वागत असतां एके दिवशीं त्याजकडे पुष्कळ अंत्यज आले तेव्हां त्यांस पाहून तो भीतीनें ब्राह्मणांतच शिरला; त्यास महार दृष्टीस दिसल्याबरोबर मी पूर्वी भ्रष्ट झालों होतों, तसा आतां भ्रष्ट नाहीं, तर ब्राह्मणच आहें असें जाणून तो ब्राह्मणांतच रहातो. त्याचप्रमाणें निर्विकल्प जो ब्रह्मात्मा तेंच आपलें स्वरूप आहे, असें असतां सविकल्पता अज्ञानानें आली, त्या योगानेंच जन्मतो व मरतो, ज्यानें वाढतच चाललें आहे अशा दुःखाच्या यातायाती पुष्कळ भोगिल्या, त्यालाच मनामध्यें पश्चात्ताप उत्पन्न झाला कीं, ह्या जन्ममरणाच्या आवृत्ती चुकाव्या. व त्याजकरितां तो सद्‌गुरूस शरण जाऊन म्हणतो कीं, अहो महाराज, आपण या दीनास तारा. पुढें सद्‌गुरूंनीं त्यास बोध केला. त्यायोगानें तो आपलें निजरूप पावला, मग त्या सविकल्पाचा समुदाय जरी दृष्टीस पडला तरी लागलेंच आपलें निजरूप आठवलें, आणि म्हणतो मला या सविकल्पामुळेंच बंधन प्राप्त झाले होतें. याकरितां मी या, सविकल्पाचें आतां मीपण घ्यावयाचा नाहीं. मी स्वतः ब्रह्म आहे याप्रमाणें अंतरांत जर सविकल्पाची किंवा मीपणाची भीती आहे, तर हा समुदाय मी नव्हे. मी निर्विकल्प ब्रह्म आहें, असें लागलेंच आठवेल. तसेंच स्मरण होण्यास दुसरें एक कारण आहे तें हें कीं, एकदां अपरोक्ष ज्ञान झालें कीं, त्याची वृद्धीच होऊं लागते. इतर विद्यासारखी ही अपरोक्ष संपत्ती नाहीं. इतर विद्या होऊन विसरतात तशी ही नाहीं. ही अपरोक्ष संपत्ति एकदां प्राप्त झाली कीं, मग पुढें ती क्षीण न होतां वाढतच जाते. अहंब्रह्म जर यथार्थ कळलें आहे, तर हें नेहमीं स्मरण राहील. मग अनायासानेंच देहाभिमान गळेल. याविषयीं संशय नाहीं. जसें मौंजीबंधनानें ब्राह्मणपणा आला तो ब्राह्मणपणा पुढें वाढतच चालला. तेव्हां मौंजीबंधनाचे अगोदर जो शूद्रपणा होता तो आपाप गळत चालला. तसा अहंब्रह्मास्मी साभिमान क्षणोक्षण वाढत चालला. त्याच हिशेबानें देहबुद्धि क्षीण होत जाईल,

तस्मात् अहंब्रह्मास्मि हा निश्चय । साक्षात् निर्विकल्पचि होय । तथापि देहस्फूर्तीचा जरी उदय । तरी नव्हे बाधक २६
देहव्यापारीं मी पाहतों । मी देतों घेतों चालतों । ऐसा प्रकार सर्वही होतो । परी आपण सांपडेना ॥ २७ ॥
कारण कीं निर्विकल्प आपण भिन्न । येरहे सर्व वेगळे मजहून । हें निवाडिलें खरें विचारेंकडून । तें एकत्र कधीं नव्हे २८
ऐसा चिद्चिद्ग्रंथि तुटतां । मीपण उठे जरी व्यापारतां । तें दों रीतीं जाणावें तत्त्वतां । ज्ञानोत्तरकाळीं ॥ २९ ॥
एक शास्त्रीय एक लौकिकी । उठतसे साभिमानता निकी । परी ते दोनी भिन्न भिन्न अवलोकीं । सत्यमिथ्याविभागें ३०
मी असंग निर्विकल्प परिपूर्ण । हा शास्त्ररीतीचा अभिमान । उठे जेधवां सत्यत्वें आपण । निर्विकल्पता स्थापी ॥ ३१ ॥
मी खातों बोलतों या व्यापारीं । लौकिकरीतीं साभिमान धरी । मिथ्या स्मरतसे अंतरीं । कृति हे जीवाची ॥ ३२ ॥
या सविकल्पाचें जें कार्य । तें निर्विकल्पीं आरोपन होय । आणि असंगत्व जें कां शास्त्रीय । आभासा न स्थापी ३३
कार्य जो एकत्र मेळविना । तें एकत्र केवीं करी कारणा । तस्मात् असंगीं न जाय अहंपणा । अहंपणीं असंग नवे
अरे अहंब्रह्मींचा साभिमान । उठे तो सविकल्पीं करी स्थापन । केवळ निर्विकल्प जों आपण । तेथें अहंस्फूर्ति कैंची
ऐसा सत्याचा साभिमान घेतां । निर्विकल्पीं न स्थापी तत्त्वतां । तरी मग देहादिकांची वार्ता । लावी कैशीं निर्विकल्पीं
असो दों रीतीं ऐसा अभिमान । ज्ञान जाहलिया ज्ञात्यालागून । निर्बाध असे सहजेंकडून । म्हणून अमुख्य ॥ ३७ ॥
मुख्य साभिमान अज्ञानाचा । विचाराचि नाहीं या संघाचा । कोणता आत्मा आणि अनात्म्याचा । कैंचा असे शोध ३८
उगाचि या सर्वही संघासी । मीच म्हणून घेतलें दिननिशीं । हाचि मुख्य अहंकार या जीवासी । बंधनीं घाली बळें ३९
ऐसा मुख्य अहंकार ज्ञानिया । नुपजे कदां ज्ञान जाहलिया । म्हणोनि मुख्य ऐसें म्हणावें तया । साभिमान ज्ञात्याचा
तस्मात् रविदत्ता लयसाक्षिज्ञान । तेंचि निर्विकल्प ब्रह्म आपण । इतुकीच हे खूण करीं जतन । निःसंशयेंसी ॥ ४१ ॥
हा साभिमान कदां न म्हणावा । सविकल्पें घेनलाचि घ्यावा । निर्विकल्पीं निर्विकल्प सदैवा । आहेसि तैसा सिद्ध ॥ ४२

म्हणून अहंब्रह्मास्मि हा साभिमान साक्षात् निर्विकल्पच आहे असें असतां देहबुद्धी जरी उदयास आली तरी ती बाधक नाहीं. देह व्यापारांत मी पहातों, देतों, घेतों, चालतों, असा जरी प्रकार घडतो, तरी मीपणानें तो त्यांत सांपडत नाहीं. कारण आपण निर्विकल्प या सविकल्पाहून भिन्न आहे, व हे सविकल्पांतील पदार्थ मजहून निराळे आहेत. असें खरें विचारानें निवाडिलें आहे. मग ते पदार्थ या निर्विकल्पांत कसे मिसळतील, सविकल्पात निर्विकल्प किंवा निर्विकल्पांत सविकल्प कधींही मिसळणार नाहीं, हेंच चिद्चिद्ग्रंथीचे तुटणें समजावें.

चिद्चित्ग्रंथी तुटल्यावर व्यापार करीत असतां मीपण उठलें तरी तें दोन प्रकारचें ज्ञानोत्तर काळीं होतें. १ एक शास्त्रीय व २ दुसरें लौकिकि. हें दोन प्रकारचें मीपण सत्यमिथ्या विभागानें भिन्न भिन्न आहे असें जाण. मी असंग निर्विकल्प परिपूर्ण आहें हा शास्त्ररीती मीपणा. हा मीपणा उठला असतां मी निर्विकल्पच आहें अशी सत्यता स्थापितो. मी खातों, बोलतों, या व्यापारांत लौकिक रीतीनें मीपणाचा अभिमान धरतो, तेव्हां ही जीवकृति, मिथ्या असें अंतरांत स्मरूं लागते, म्हणून साधक, सविकल्पाचें कार्य निर्विकल्पीं आरोपीत नाहीं. व शास्त्रीय जें निर्विकल्पाचें असंगत्व तें आभासास स्थापीत नाहीं. जो कार्य एकत्र करीत नाहीं तो कारणास एकत्र कसें करील ? तें करीत नाहीं म्हणून असंगीं अहंपणा येत नाहीं व अहंपणीं असंगत्व येत नाहीं. अरे, अहंब्रह्मास्मीचा साभिमान जो उठतो तो सविकल्पींच स्थापितो. मग केवळ निर्विकल्प जो आपण तेथें अहंस्फूर्ति कसची ? याप्रमाणें सत्याचा साभिमान घेत असतां तो निर्विकल्पीं स्थापित नाहीं, मग देहादिकांची वार्ता निर्विकल्पीं कसची लागते ? असो. वर सांगितला याप्रकारचा दोन रीतीचा अभिमान ज्ञान झाल्यावर ज्ञात्यास निर्बाध आहे, म्हणूनच हा अभिमान अमुख्य म्हणजे मुख्य नव्हे. ज्यांस या देहसंबंधीं समुदायाचा हीं काय आहेत, मी कोण आहें हा विचार नाहीं त्या अज्ञान्यांचा साभिमान मुख्य आहे. त्यांनीं या देहादि संघास रात्रंदिवस मीच मानिलें आहे. हाच मुख्य अहंकार जीवास बळें बंधनांत घालतो. हा मुख्य अहंकार ज्ञान्यास ज्ञान झाल्यावर उत्पन्न कधींही होत नाहीं, म्हणून त्या ज्ञात्यांचे साभिमानास अमुख्य म्हटलें आहे. याकरितां रविदत्ता, लयसाक्षी ज्ञान तेंच निर्विकल्प ब्रह्म आपण, हीच खूण तूं निःसंशय जतन कर. अहंब्रह्मास्मीचा साभिमान हा साभिमानच नव्हे. सविकल्पानें हा नेहमीं घ्यावाच. निर्विकल्प झाल्यावर तूं जसा निर्विकल्प आहेस तसाच आहेस.

कदां सविकल्प न होसी। तरी तत्स्फूर्ति हे काय तुजसी। तेंचि तुझिया ध्यासें मुक्तता अपेक्षी। पावोन मिळती तुज
तुझें काय गेलें। होईना जें स्वभावेंचि जाहलें। तयाचें मीपण मात्र जरी घेतलें। तरी तें बाधक होय ॥ ४४ ॥
तू तयाचें जें कां मीपण। वाटेल तुज जरी न कळून। तितुकें काढावें निवडून। डोळियाचें हारळ जेवीं ॥ ४५ ॥
असंगत्व जें आपुलें। कदापि न जावें विस्मरलें। तरी तुझें निर्विकल्पत्व संचलें। राहे सविकल्प उद्भवतां ॥ ४६
ाचि संचला असती। सविकल्प कधींही न होसी। परी भ्रांति उद्भवली सविकल्पा ऐशी। ते सांडोनी स्वस्थ राहें
ोळा जेव्हां दीप नसतां। अंधार सहजीं देखत होता। तो दिवा जरी तेथें लागतां। तरी कां पाहणें दुजें होय ४८
पाहण्यानें अंधार पहावा। त्याचि देखण्यानें देखिजे दिवा। गेहें कदापि जुना नवा। न घ्यावा कुतर्क ॥ ४९ ॥
सविकल्पाचा निपटून लय। हा तुज निर्विकल्पा होय प्रत्यय। कीं नाहींच कांहीं उरे अद्वय। शून्य देखणा सहज
णें जैसें निर्हेतुक। केवळ जाणणें निर्विकारक। त्याचि ज्ञानें जाणणें कौतुक। वृत्ति उठली जरी ॥ ५१ ॥
जाणणें तें निर्विकार। वृत्ति उठतां काय जाहला विकार। तें जाणणें होतें जें निर्धार। हें काय दुजें जाहलें
होतां न विकारतां। जाणण्याची एकरूपता। मग लयाचा कीं वृत्तीचा जाणता। असो कैसाही ॥ ५३ ॥
न बुद्धि जरी उठली। अंतर सृष्टि कल्पिती जाहली। ते बुद्धिसृष्टिही जाणिली। तरी तें ज्ञान एकरूप ॥ ५४
ीपामुळें पदार्थ मंदिरींचे। दिसती जरी भिन्न भिन्न साचे। तरी डोळियासी दुजेपण नवचे। देखणें तें पूर्ववत्
ृत्तीमुळें बुद्धिआदि सृष्टि। दिसनसे साक्षित्वाचे दृष्टि। तरी जाणण्यासी दुसरी गोष्टी। उद्भवली नाहीं ॥५६॥
द्रियद्वारा निघोनी। प्रत्यक्ष विषयाचे ग्रहणीं। ऐशी जागृतीसी दशा जे देखणी। ते असे एकरूप ॥५७॥
ासोनि पोथी वाचितां। उपनेत्रांसी होय लाविता। तरीही नेत्रांसी देखण्यापरता। दुजा कोणता भाव ॥५८॥
ीपासून विषयांत। पदार्थ एकले ज्ञान जाणत। मध्यें जीवत्वें जो स्फुरवित। उपनेत्र जैसा ॥ ५९ ॥

ांही सविकल्प होत नाहींस, मग त्या सविकल्पाची ुला कां बाधेल. सविकल्प तुझ्या ध्यासानें मुक्ती तुझ्यांत मिळेल. जें सहजीं होईल तें होईना, त्यावि- ाझें काय गेलें. इतकेंच आहे कीं, त्याचें जर तूं घेशील तरच तें तुला बाधक होईल. सविकल्पाचें न कळून ज घेतलें जाईल, तें डोळ्यांत केर ्हणून जसें शोधून काढितों त्याप्रमाणें तें मीपण काढ. तसेंच आपलें असंगत्व कधींही विसरूं मग सविकल्प उत्थान झालें तरी तुझें निर्विकल्पत्व तसेंच संचलेलें राहील. तूं पूर्वीपासून व निर्वि- नें संचलेला आहेस. सविकल्प कधींही होत पण मी सविकल्प होतों अशी जी तुला भ्रांति सांडून निर्विकल्पत्वानेंच स्वस्थ रहा.

डोळा ज्यावेळीं दिवा नव्हता तेव्हां अंधार सहज ोता. त्या डोळ्याचें दिवा लाविल्यानें पहाणें काय ्लें ? ज्या पहाण्यानें अंधार पाहिला त्याच पहा- दिवा पाहिला. येथें अंधार पहाणें, जुनें दिवा ं एक नवें असा कुतर्क घेऊं नको. अंधाराचा ाणें सविकल्पाच्या लयाचा तुला प्रत्यय येतो ींच उरलें नाहीं. नुसता शून्य अभाव आहे. ्वा तूं निर्विकल्प पहाणारा आहेस. तें तुझें ासें निर्हेतुक व जाणणें निर्विकार आहे, त्याच नें तूं वृत्ती उठली असतां जाणतोस. शून्य जाणणें तें निर्विकारत्वानें आहे. मग वृत्ती उठतांच त्यास कसला विकार झाला ? शून्य जाणणारें ज्ञान, तें काय वृत्तीचें वेळीं दुसरें झालें ? तें दुसरें झालें नाहीं व विकार पावलें नाहीं. याप्रमाणें जाणण्याची एकरूपता आहे, मग तो लय जाणता असो किंवा वृत्तीस जाणता असो, तेथें मनबुद्धि जरी उठली व त्यांनीं मनोमयी सृष्टी जरी कल्पिली, तरी ती याच ज्ञानानें जाणली. हें आ ांचें ज्ञान, व तें ज्ञान एकरूपच आहे. जसें दिव्यामुळें घरांतील पदार्थ निर- निराळे दिसतात. तरी डोळ्याचें दुजेपण येत नाहीं. त्याचें पहाणें सर्व पदार्थांचे ठायीं पूर्ववत् एकच आहे. तशा वृत्तीमुळें बुद्धि व कल्पीत सृष्टी साक्षीत्वाचे दृष्टीनें दिसते तरी जाणणें एकच, तें कांहीं दुसरें नाहींत. तसेंच तेंच जाणणें इंद्रियद्वारानें विषय ग्रहण करूं लागलें अशी जी जागृती अवस्था त्या अवस्थेंतही पहाणें तें एक- रूपच आहे.

दिवा लावून पोथी वाचीत असतां साफ दिसावें म्हणून डोळ्यास आरशी जरी लाविली तरी डोळ्यांस पहाण्यावां- चून दुसरें काय कर्तव्य आहे. तसें वृत्तीपासून विषया- पर्यंत पदार्थ एकटें ज्ञान जाणतें. आतां हें अमुक विषय असें विशेषत्वानें जें जीव स्फुरतें, तें डोळ्याची आरशी जसें अक्षर स्पष्ट दाखविण्याचे उपयोगी, जाणण्याचे उपयोगी नाहीं, तसें जीवत्व विषय स्पष्ट दाखविण्याचे उपयोगी, तें आहे जाणण्याचे उपयोगी नाहीं. आरशी

उपनेत्रें कीं दीपप्रकाशें । पोथी वाची कीं अन्य पाहतसे । परी डोळियाचें देखणें जें असे । तें एकरूप सर्वदा ४४६०
तैशी वृत्ति आणि मनादि संकल्प।मध्यें आभासे जीव स्फुरद्रूप।इंद्रियद्वारा विषय घेती अमुप।परी जाणणें एकरूप सदां
वृत्तिलयाचा जैसा जाणता । तोचि सहजीं जाणे वृत्ति उठतां । जरी मनादि बाह्य आतौता । परी जाणणें समान
लय अथवा उद्भवकालीं । चिद्रूपता नव्हे न्यूनागळी । मग उद्भवो मावळो भलते वेळीं । अकृत्रिम निर्विकल्पता ॥६३॥
ऐशी निर्विकल्पता सहज संचली । मग सविकल्पता उठे कीं मावळली।तयेनें अहंब्रह्मम्हणोनि घेतली।उर्मि साभिमानाची
तरी ते सुखरूप घेवो सदां । अथवादेहव्यापाराचा धंदा । परी मी निर्विकल्प संचलों तो कदां । किमपि सविकल्प नव्हे
रविदत्ता अति सावधान मानसीं । एकादेहाची सविकल्पता जैशी।निर्विकारत्वें जाणतअससी । तेवींच जाणता सर्वांचा
पाहें ब्रह्मादि पिपीलिकावरी । सविकल्पतेचि एकचि परी । लीनत्वें असे मात्र स्थावरीं । परी देखणा तूं लयाऐसा ६७
जंगमीं सविकल्प स्वप्न जागृती । जैशियापरी एक पिंडस्थिति । स्थावरीं जैशी मूर्छा सुषि । परी सविकल्पता गूढ ६८
गूढ म्हणिजे अज्ञानीं लीन । सविकल्पत्व असे अज्ञान घेऊन । जंगमीं तों वृत्त्यादि देहांत संपूर्ण । उघड सविकल्पता
असो ऐशी स्थावरजंगमात्मक । सृष्टीची रचना सकळिक । कीटक किंवा ब्रह्मादिक । एक जिन्नस मासला ॥४४७०॥
एक पिंडीची सविकल्पता । जाणिली असे जीवसहिता । तैशीच सर्वांमाजीं एकरूपता । पाहे सविकल्पाची ॥ ७१ ॥
सविकल्पत्व ज्या ठाईं उद्भवलें । तें अधिष्ठान निर्विकल्प संचलें । तें लयसाक्षित्व जैसें आपुलें । तें वोळखी सर्वीं ७२
सर्वांमाजीं निर्विकल्प भिन्न । कदां न पाहे पिंड भिन्न म्हणून । तूं एकलाचि निर्विकल्पआपण। अससी स्थावरजंगमीं
अरे सर्वांमाजीं सविकल्पता समान।मगनिर्विकल्पताहोईलकेवींभिन्न।जळप्रतिबिंबसर्व घटींअभिन्न तरी गगन वेगळालें कैसें
पंचभूतादि तृणापर्यंत । हें तों स्थावरचि बोलिजेत । तेवींच जंगमाचे देह समस्त । जडरूप समान ॥ ७५ ॥
सजल अथवा विजल घट । आणि भिंती आदि चौफाळे मठ । एकरूप मृत्तिकाचि दाट । इतुकिया माजीं ॥७६॥
तैसें सर्व भौतिकांसहित । आणि ब्रह्मांड पंचभूत । हे जडरूपचि समस्त । एकरूप असती ॥ ७७ ॥

---

लावून किंवा नुसत्या दिव्याच्याच प्रकाशानें पोथी वाचितो, किंवा दुसरें कांहीं पहातो परंतु डोळ्यांचें जें पहाणें तें एकरूप सदां आहे. तशी वृत्ती आणि मनादि संकल्प व मध्यें स्फुरद्रूप जीव आभासतो त्या योगानें इंद्रियद्वारा विषय घेतात. परंतु जाणणें सदां एकरूप. वृत्तीच्या लयाचा जो जाणता तोच वृत्ती उठल्यावर, व तिचें कार्य यांस जाणतो. मग तें जाणणें अंतरदृष्टीचें असो किंवा मनादि बाह्य दृष्टीचें असो. पण जाणणें तें एकच. वृत्तीच्या लयाचे वेळीं किंवा तिच्या उत्पत्तीचे वेळीं चिद्रूपता कमिजास्त होत नाहीं. मग ती वृत्ती लय पावो किंवा उत्पन्न होवो, निर्विकल्पता अकृत्रीम आहे. याप्रमाणें निर्विकल्पता सहज संचलेली आहे. मग सविकल्पता मावळली किंवा उठली व तिनें मी ब्रह्म म्हणून साभिमानाची उर्मी घेतली. तरी ती घेईना, अथवा देह व्यापाराचा धंदा होईना, मी निर्विकल्प जो संचलेला आहें तो कधींही सविकल्प होत नाहीं, असें स्मरण असावें.

रविदत्ता सावध रहा. अरे, एका देहाची सविकल्पता जशी निर्विकारत्वानें जाणत आहेस, त्याचप्रमाणें तूं सर्वांचा जाणता आहेस; ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत सर्वांत सविकल्प एकच आहे. तेंच सविकल्प स्थावरांत लीनत्वानें आहे. पण लयाचा देखणा जसा तूं तसाच याचाही पहाणारा तूंच, निर्विकल्प आहेस. एका पिंडांत जशी स्वप्न, जागृति तशी जंगमांत सविकल्पता स्पष्ट आहे, एका पिंडास मूर्च्छा किंवा झोंप त्याप्रमाणें स्थावरांत सविकल्पता गुढत्वानें आहे. गूढ म्हणजे अज्ञानांत लीन होणें. स्थावरांतील सविकल्पत्व अज्ञानांत लीन आहे व जगमांत वृत्तीपासून देहापर्यंत सर्वांत, सविकल्पत्व उघड आहे. असो. अशी स्थावरजंगमात्मक ही सर्व सृष्टीरचना किड्यापासून ब्रह्मदेवापर्यंत एक जिन्नस मासला एका पिंडांतील सविकल्पता जीवासह जशी जाणलीस, अशीच सर्वांमध्यें सविकल्पाची एकरूपता पहा. जसें आपलें लयसाक्षीत्व निर्विकल्प आहे, तसेंच ज्यावर सविकल्प उत्पन्न झालें तें सविकल्पाचें अधिष्ठान निर्विकल्प सर्वांत पहा. सर्वांचे पिंड भिन्न भिन्न आहेत म्हणून सर्वांत निर्विकल्प भिन्न आहे, असें मानूं नको. तूं एकटाच निर्विकल्प स्थावर जंगमांत आहेस. अरे, सर्वांमध्यें जी सविकल्पता एकच आहे तर सर्वांतील निर्विकल्पता भिन्न कशी होईल ? जसें सर्व घटांतील जळांत प्रतिबिंबलेलें गगन अभिन्न आहे, मग मुख्यबिंब जें गगन तें वेगळालें कसें असेल ?

पंचभूतापासून तृणापर्यंत सर्वांस स्थावर म्हणतात. स्थावर पदार्थ जड, त्याचप्रमाणें सर्व जंगमांचे देह जड, जसें चौ भिंतीचें चौकोनी घर आणि त्या घरांतील जलयुक्त अथवा रिकामे घट, या सर्वांत एक मातीच आहे, तसें पंचभूतात्मक ब्रह्मांड व त्यांतील सर्व भौकिक, हीं सर्वही जडत्वानें एकरूपच आहेत.

जल तेथें आकाश चिंबलें । विजल तेथें अदृश्य ठेलें । तैसें स्फूर्तीपासून प्राणांत उमटलें । तेथें सविकल्पता स्पष्ट ७८
प्राण जेथें गुढत्वें असे । तेथें सविकल्पता गुप्त वसे । मग असोत सानथोर भलतैसे । गगनादि तृणांत ॥७९॥
सप्रमाण कीटकादि विरिंचि । तेथें तों प्रगटतां सविकल्पांची । जैशी घटजलीं गगनाभासाची । प्रतीति स्पष्ट ४४८०॥
असो सविकल्पता सर्वीं व्यापक । तरी निर्विकल्पता तों अधिष्ठान एक । गगन जेवीं घटमठीं सकळिक । पाहती स्पष्ट
एकचि आकाश वेगळाले घटीं । सजलीं निर्जलीं समान दाटी। परी तें गगन अभिन्न जरी राहटी । भिन्न भिन्न घटांची
तैसें निर्विकल्प सच्चिद्रूप । स्थावरजंगमीं हें एकरूप । जरी हें भिन्न भिन्न नामरूप । सान थोर जड चेतन ॥ ८३ ॥
जैसें निर्विकल्प सर्वीं व्यापलें । तैसेंचि सविकल्पही उमटलें । सविकल्प तें अहंनिष्ठ राहिलें । निर्विकल्प तें निर्विकल्प८४
जैसें जलासहित प्रतिबिंब चंचळ । उठे आटे हेलावे बरळ । तैसें सविकल्प तें कदां निश्चळ । नव्हे कवणांतीलही ८५
आणि निर्विकल्प जें सर्वीं संचलें । तें किमपि नाहीं चंचळ जाहलें । जैसें घट मठीं गगन दाटलें । परी उपाधीनें हालेना
एवं पिंड ब्रह्मांडात्मक जड । स्थावर जंगमादि उदंड । हें पंचभूतांचें थोतांड । एक देह तैसें सारें ॥ ८७ ॥
स्फूर्तीपासून प्राणापर्यंत । जैसें आपुले देहीं सविकल्प उमटत । तैसेंचि तृणादि ब्रह्मदेवासहित । एकरूप पाहें सर्वीं८८
निर्विकल्पता तों गगनापरी । एकरूप सर्वांही माझारीं । तुवां अनुभाविली लयसाक्षित्वें अंतरीं । तैशीच अनुभवी सर्वीं
मी निर्विकल्पत्वें सर्वीं समान । एकरूप नानात्वीं अभिन्न । ऐसें आठवी सविकल्पेंकडून । चिद्गगन जेवीं सर्वीं ४४९०॥
हा सर्वत्रीं निर्विकल्प ब्रह्मात्मा । एकरूप लयसाक्षी परमात्मा । परी या सविकल्पात्मक रूपनामा । स्पर्शला नाहीं ॥९१
इतुकियाचीं अनंत कर्मैं । होती जाती धर्माधर्में । परी सविकल्पक रूपनामें । निर्विकल्पा स्पर्शती ना ॥ ९२ ॥
त्या इतुक्यांमाजीं मी असून । नेघें तयाचें पुण्यपाप आवरण । तरी या एक देहउपाधीचें चळण । माथां घेऊं कैसें
सारें देह जैसें परोक्ष । तैसाचि हा देह एक प्रत्यक्ष । आणि लयसाक्षी जो मी अपरोक्ष । तेवीं सर्वांतील निर्विकल्प९४
देह एक असो प्रत्यक्ष जड । परी अहंस्फूर्ति जे घेतसे वाड । ते सविकल्पता चेतनत्वें अजड । या देहांतील तैशी पराची

---

ज्या घटांत जल आहे तेथें आकाश बिंबलेलें आहे व रिकामे घटांत आकाश अदृष्ट आहे. तसें स्फूर्तिपासून प्राणापर्यंतचीं तत्वें ज्या पिंडांत आहेत त्यांतील सविकल्पता स्पष्ट आहे गगनापासून तों तृणापर्यंत प्राण ज्यांत गूढत्वानें आहे तेथें सविकल्पता गुप्त आहे. सप्राण असे जे किडयापासून तों ब्रह्मदेवापर्यंत सर्व प्राणी त्यांचेठायीं सविकल्प प्रगट आहे. जसा सजलघटांत गगनाभास स्पष्ट दिसतो त्याप्रमाणें सविकल्पता सर्वांत व्यापक आहे, तरी त्यास विकल्पाचें अधिष्ठान निर्विकल्प एकच आहे. जसें मठ किंवा भिन्न भिन्न जलयुक्त व रिकामे घटांत गगन एकच आहे. तसें निर्विकल्प सच्चिद्रूप त्यांस हें लहान मोठया जड चेतन भिन्न भिन्न नामरूपात्मक स्थावर जंगमांत एकरूपच आहे. जसें निर्विकल्प सर्वांत व्यापलेलें आहे तसेंच सविकल्प सर्वांत उमटलें. सविकल्प तें अहंनिष्ठ राहिलें. निर्विकल्प तें निर्विकल्पत्वानें आहे. जसें जलासहित प्रतिबिंब चंचळतें, उठतें, आटतें, हेलावतें. तसें सविकल्प उठतें, मावळतें, भासतें. तें कोणत्याही वस्तूंतील सविकल्प कधींही निश्चळ होत नाहीं. तसेंच निर्विकल्प जें सर्वांत संचललेलें आहे तें कधींही चंचल होत नाहीं. जसें घटमठांत गगन दाटलेलें आहे. तें कधींही उपाधीमुळें हालत नाहीं एवं पिंडब्रह्मांडात्मक जड जें स्थावरजंगमादि अनेक प्रकारचें आहे, हें पंचभूतांचें थोतांड. जसा देह एक त्याचप्रमाणें हीं सर्व आहेत. आपले देहांत स्फूर्तिपासून प्राणापर्यंत जसें सविकल्प उमटतें, तसें तृणापासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांत सविकल्प उमटतें, असें जाण. त्वां लयसाक्षित्वानें अंतरांत निर्विकल्पता अनुभविलीस, तशीच निर्विकल्पता गगनाप्रमाणें सर्वांत एकरूप पहा. जसें चिद्गगन सर्वांत आहे तशी सविकल्पाकडून नानात्वीं, सर्वांचे ठायीं अभिन्नपणें निर्विकल्पत्वानें एकरूप समान आहे असें पहा. हा सर्वत्रांचे ठायीं निर्विकल्प ब्रह्मात्मा एक रूप आहे, पण या सविकल्पनामरूपास स्पर्शलाच नाहीं. सर्वांचीं अनंत कर्में धर्मधर्मीसह होतात जातात. पण सविकल्पक नामरूपें निर्विकल्पास स्पर्शत नाहींत. सर्व प्राण्यांत मी असून त्यांचें पापपुण्य मी घेत नाहीं. मग या एक देह उपाधीचें चळण मी माथां कसें घेईन ? जसें मला सारे देह परोक्ष आहेत, तसाच हा प्रत्यक्ष देहही परोक्ष आहे. तसेंच लयसाक्षी जो मी अपरोक्ष त्याचप्रमाणें सर्वांतील निर्विकल्प ब्रह्म आहे. देह हा एक प्रत्यक्ष जड असू द्या, पण अहंस्फूर्ति जी घेतो ती सविकल्पता, चेतनत्वानें अजड, या देहांतील आहे तशीच परांतीलही आहे.

एका देहांतील हे सविकल्पता । मज निर्विकल्पाहून परोक्ष तत्त्वता । तैशीच सर्वांतील उमटे चंचळता । निर्विकल्पाहूनाभिन्न
सर्वी व्यापक जो ब्रह्म प्रत्यगात्मा । निर्विकल्पें अधिष्ठान या रूपनामा । तो मी एकाचि अपरोक्ष महात्मा । येर सविकल्पपरोक्ष
एवं सविकल्प चिद्रूपता समस्तांची । ब्रह्मादि कीटकांत कीं आपुले देहाची । परोक्षचि पाहें वाउगीची । उठे मुरे आपसया
निर्विकल्पत्व सर्वी संचलें । लय जाणे कीं जाणे सर्व उद्भवलें । तेंचि अपरोक्षत्वें रूप आपुलें । तिहींही कालीं समान
ऐसें एकतान अनुसंधान । सर्व तादात्म्याचें राखी स्मरण । कीं लयसाक्षी सर्वत्रीं एक आपण । येर परोक्ष सविकल्पता
ऐसें सविकल्प तें अहंनिष्ठ । निर्विकल्प तो अपरोक्ष स्वयें स्पष्ट । हे उभय एकरूप पाहें अविट । ब्रह्मादि तृणांत ॥५०१
जड गगनादि तृणावरी । जंगमें ब्रह्मादि कीटकांत सारीं । एकरूप पाहें निर्धारीं । भलतेही अवस्थे ॥ २ ॥
निर्विकल्प जो आपण ब्रह्म । ओतप्रोत एकरूप सम । यामध्यें सविकल्पाचा उद्गम । आणि स्थिति लय ॥ ३ ॥
सर्व पिंडांसहित सविकल्पता । निर्विकल्प चिद्गगना आंतौता । किंवा सविकल्पामध्यें अपरोक्षता । व्यापकपणें निर्विकल्प
जैसे घटमठ आकाशाचे पोटीं । कीं घटमठीं आकाशाची दाटी । तैशी आपणामध्यें जगाची राहटी । कीं जगामध्यें आपण
सविकल्प तितुकेंचि हें जग । पाणियावरी जैसे तरंग । तरंगीं पाहतां पाणी अभंग । तैसें सविकल्पीं ब्रह्म ॥ ६ ॥
यापरी जगामध्यें सबराभरित । परिपूर्ण निर्विकल्प अनंत । कीं अनंतामध्यें जग समस्त । उद्भवे राहे मावळे ॥ ७ ॥
सविकल्पउद्भवतां आंत बाहेरी । तैसेंचि सभोंवतें स्थिति जोंवरी । लय होतां एकरूप निर्विकारी । लयसाक्षी ब्रह्म ॥ ८॥
अथवा सविकल्प निर्विकल्प । भिन्न तरी कोठें असती अल्प । जग जें उद्भवलें नामरूप । यासी प्रथक् सत्व कैंचें ९
यासी आहेपणा परब्रह्माचा । भासती व्यापारती चिद्रूपें साचा । प्रियत्व स्वभाव तो आनंदाचा । तरी यासी रूप काय
दोरीवांचोनियां सर्पासी । अथवा शिंप त्यागूनियां रजतासी । किंवा स्थाणूविरहित पुरुषासी । काय रूप असे भिन्न ११
तैसें अस्तिभातिप्रियत्वाविण । काय नामरूपांसी वेगळेपण । असे म्हणून काढावें भिन्न । अमुक म्हणोनी ॥ १२ ॥

---

एका देहांतील ही सविकल्पता मज निर्विकल्पाहून परोक्ष आहे, तशीच सर्वांतील चंचळतारूप सविकल्पता उमटते. ती निर्विकल्पाहून निराळी आहे. निर्विकल्पत्वानें रूपनामास अधिष्ठान जो सर्वव्यापक ब्रह्म प्रत्यगात्मा, तो मी एक अपरोक्ष, मजहून बाकीचें सर्व परोक्ष. याप्रमाणें सर्वांची सविकल्प चिद्रूपता ही ब्रह्मदेवापासून किड्यापर्यंत तसेंच आपल्या देहाची उगाच उमटते व मावळते, ही परोक्ष आहे, निर्विकल्पत्व सर्वांत संचलेलें आहे, तें लय जाणों किंवा सर्वांचा उद्भव जाणो, तेंच अपरोक्षत्वानें आपलें रूप तिन्ही काळीं समान आहे, असें एकतान अनुसंधान सर्व तादात्म्याचें स्मरण राख. कीं मी एकच आपण लयसाक्षी सर्वत्रीं आहें, मजहून बाकीची सर्व सविकल्पता परोक्ष आहे. असें सविकल्प अहंनिष्ठ आणि निर्विकल्प तो अपरोक्ष मीच स्वतः स्पष्ट आहे. असे हे दोन प्रकार सर्वांत पहा. गगनापासून तृणापर्यंत जड व ब्रह्मदेवापासून किड्यापर्यंत जंगम, हीं भलत्याही अवस्थेंत एकरूप पहा. निर्विकल्प तो आपण ब्रह्म, ओतप्रोत एकरूप सम आहे, यांत सविकल्पाचा उदय, स्थिति, व लय होतो. सर्व पिंडासहित सविकल्पता निर्विकल्प चिद्गगनांत आहे, किंवा सविकल्पांत अपरोक्षता व्यापकपणानें निर्विकल्प आहे. जसें घट, मठ आकाशाचे पोटीं आहेत, किंवा घट मठांत आकाश आहे, तशी आपणामध्यें जगाची रहाटी किंवा जगामध्यें आपण आहां. जितकें सविकल्प तितकें हें जग आहे. पाण्यावर तरंग, तरंगांत पाणी तसें सविकल्पांत ब्रह्म आहे. याप्रमाणें सबराभरित परिपूर्ण निर्विकल्प अनंत किंवा अनंतांत सगळें जग उद्भवतें, रहातें व मावळतें. सविकल्प उत्पन्न होतांच त्यास आंत बाहेर व्यापून लयसाक्षी एकरूप निर्विकारी ब्रह्म आहे तसेंच सविकल्प जोंपर्यंत आहे तोंपर्यंत त्या सभोंवतीं निर्विकल्प ब्रह्म व्यापून आहे. तसेंच लयकाळीं लयसाक्षी ब्रह्म आहेच, अथवा सविकल्प आणि निर्विकल्प अल्पसुद्धां भिन्न नाहींत. कारण नामरूपात्मक जग उत्पन्न झालें. यास त्या निर्विकल्पावांचून पृथक् सत्व कोठून असेल? सविकल्पास अहंपणा परब्रह्माचा आहे. ब्रह्माचे चिद्रूपत्वानेंच हें सविकल्प भासतें, व व्यापारकरतें म्हणून यास भातित्व ब्रह्माचेंच आहे. प्रियत्व हा स्वभाव आनंदाचा आहे, व आनंद हें ब्रह्माचेंच लक्षण आहे तेव्हां या सविकल्पांत अस्तीभातिप्रियत्व, हीं ब्रह्माचींच लक्षणें आहेत. हीं लक्षणें वेगळीं करून, सविकल्प काय आहे, हें पाहूं गेलें असतां, सांपडणारच नाहीं. म्हणून सविकल्प, निर्विकल्पाहून भिन्न नाहीं. दोन्ही एकरूपच आहेत. दोरीवांचून सर्पास अथवा शिंपी टाकून रुप्यास किंवा स्थाणुशिवाय पुरुषास दुसरें निराळें रूप आहे काय? तसें अस्तिभातिप्रियत्वावांचून नामरूपास कोणता वेगळेपणा आहे? जर वेगळेपणा असता तर त्या लक्षणाहून अमुक वेगळेपणा आहे असें सांगतां आलें असतें.

हें असो रज्जुसर्पादिक । दृष्टांत असती विवर्तात्मक । परी उद्भवलें जें कां सोपाधिक । तेंही कारणाविण अरूप ॥१३

मृत्तिकेवांचूनियां घटें । कीं कापुसाविण तंतुपटें । अथवा सुवर्णरहित चांगुले वाइटे । नगही रूपा येती ॥ १४॥

पाणियावांचोनि तरंग । कीं आकाशत्यागें उठती मेघ । तैसें निर्विकल्पाहून हें जग । सविकल्पत्वें कोठें असे ॥ १५ ॥

सर्पादि व्यर्थचि भाविलें । घटादि रूपनाम कल्पिलें । परी दोरी कीं मृत्तिकादि संचलें । सर्पघटादि नासती ॥ १६ ॥

तैसें साकारा आलें तें रूप । नामें अमुक अमुक अमुप । परी ते दोनीही असद्रूप । उद्भवले ना राहिले ॥ १६ ॥

हे अवघी अज्ञानाची कल्पना । येऱ्हवीं कोणता यासी आहेपणा । एवं सर्व नाहींच अस्ति हे नाना । किंचितही सर्व

सर्व नाहींच हे बाधा करूनी । सर्व हें ब्रह्म श्रुति वाखाणी । तस्मात् एक निर्विकल्पचि पूर्णपणीं । सविकल्प नाहींच नाहीं

सर्प नोव्हे अवघी दोरी । रजत नाहींच शिंप सारी । तैसें निर्विकल्प एकरूप निर्धारी । सविकल्प नाहींच नाहीं ॥४५२०

स्थाणूचें एक पुरुष हा कोठें । मृत्तिका एक केंचीं घटें । कापुसचि असे तंतु ना पटे । तेवीं निर्विकल्पाचि एक ॥ २१ ॥

अलंकार नसती एक सुवर्ण । केंचें तरंग एकरूप जीवन । तैसें केंचें सविकल्प धर्मधर्मी लक्षण । आहे तें निर्विकल्प २२

घटादिकांच्या ठाईं पाहतां । मृत्तिका आदि भासती तत्त्वता । केवळ मृत्तिकादिकांत अवलोकितां । घटकादिकांचा लेशनुरे

तैसेंसविकल्पत्वींजरीपाहिलें । तरीनिर्विकल्पओतप्रोत संचलें । केवळ निर्विकल्पींसविकल्पआटलें । लयलाक्षीच्या अनुभवें

लयसाक्षी निर्विकल्पामाजीं । सविकल्प नाहींच नाहीं सहजीं । उद्भवतांही नाढळतीच दुजीं । एक निर्विकल्प खरें २५

ऐसें अन्वय व्यतिरेकेंकडून । पाहतां यथार्थ त्रिधा प्रमाण । सविकल्प नाहींच नाहीं काळीं कवण । त्रिकाळ निर्विकल्प

ऐशीं नामरूपें विचारें त्यागितां । अवघे अस्तिभातिरूप समस्ता । तरी केंचें स्थावरजंगम आतां । भूतभौतिकें केंचीं ॥

केंचा ब्रह्मा विष्णु महेश । केंचें कीटकांत पिंड अनेश । एकलें निर्विकल्प अविनाश । नाम रूप नाहीं ॥ २८ ॥

तस्मात् आपुला देह आणि जग । उद्भवलेंच नाहींत हें सांग । तरी स्फूर्त्यादि प्राणांत उमग । राहे कोठें सविकल्पता

एवं सविकल्पत्वाचा अभाव । एक निर्विकल्पचि सर्व दैव । तेथें मीतूंपणाचा कोठें भाव । कोठें परोक्षा परोक्ष ४५ ३०

---

हें असो. रज्जुसर्पादिक दृष्टांत विवर्तात्मक आहेत. परंतु जें सोपाधिक उत्पन्न झालें तेंही कारणावाचून अरूप आहे. जसें मातीवांचून घट किंवा कापसावांचून तंतू किंवा वस्त्र अथवा सोन्यावांचून दागिने हे रूपास येतील काय ? पाण्यावांचून तरंग किंवा आकाशावांचून मेघ तसें निर्विकल्पावांचून हें जग सविकल्पत्वानें कोठें आहे ? सर्पादि कल्पना उगाच केली, घटादि नामरूप कल्पना केली, तरी दोरी किंवा मातीच संचलेली आहे. त्यांवांचून निराळी सर्पघटादिक नाहीं. तसें जें साकारास आलें तें तूं रूप, त्याचीं हें अमुक हें अमुक अशीं नांवें आहेत पण तीं दोन्हीही असद्रूप. तीं उद्भवलीं नाहींत व राहिलींही नाहींत; ही अवघी अज्ञानाची कल्पना आहे; एरव्हीं यांस आहेपणा कोणता आहे ? एवं हें सर्वही नानात्व नाहींच, याप्रमाणें सर्व नाहीं. हें बाधाकरून सर्व ब्रह्मच आहे असें श्रुति सांगते. म्हणून पूर्णपणें एक निर्विकल्पच आहे, सविकल्प नाहींच नाहीं. सर्प नव्हे, अवघी दोरीच. रूपें नाहीं, अवघी शिंपच सारी. तसें निर्विकल्प एकरूप, सविकल्प नाहींच नाहीं. स्थाणूच एक, पुरुष कोठे आहे; मृत्तिकाच एक, घट कोठें आहेत; कापुसच एक, तंतुपट कोठें आहेत; तसें निर्विकल्पच एक, सविकल्प कोठें आहे ? अलंकार नाहींत एक सुवर्णच; तरंग कसचे एक पाणीच; तसें धर्मधर्मीलक्षण सविकल्प कसचें ? एक निर्विकल्पच आहे.

घटादिकांत पाहूं गेलें असतां मृत्तिकादि भासतात, पण केवळ मृत्तिकादिकांत पाहूं गेलें असतां घटादिकांचा लेशसुद्धां उरत नाहीं. तसें सविकल्पांत पाहूं गेलें असतां निर्विकल्पच वोतप्रोत संचलेलें आहे. केवळ निर्विकल्पांत सविकल्प लयसाक्षीच्या अनुभवानें आटलें. लयसाक्षी, जें निर्विकल्प, त्यांत सविकल्प नाहींच नाहीं. मग जरी कांहीं उद्भवलें, तरी एक निर्विकल्पावांचून दुसरें कांहींच नाहीं. याप्रमाणें अन्वयव्यतिरेकानें यथार्थ पाहिलें असतां, त्रिधाप्रमाणांनीं केव्हांही सविकल्प नाहींच नाहीं, तर त्रिकाळीं एक निर्विकल्पच आहे. याप्रमाणें नामरूपें विचारानें त्यागिलीं असतां सर्व अस्तिभातिप्रियरूपच आहे. मग स्थावरजंगम कसचे, भूतभौतिकें कसचीं, ब्रह्मदेव विष्णु व शंकर हेही कसचे, तसेंच कीटकादि अनेक पिंड कसचे ? एकटें निर्विकल्पच अविनाश आहे. तेथें नामरूपें नाहींच, म्हणून आपला देह आणि जग हीं उत्पन्नच झालीं नाहींत. मग स्फूर्तिपासून प्राणापर्यंत सर्वांचा उद्भव कोठें असेल ? एवं सविकल्पाचा अभाव, सदैव एक निर्विकल्पच आहे. तेथें मीतूंपण कोठचें, परोक्षापरोक्ष कोठचें,

ऐसा निश्चयचि बाणून गेला। समाधि उत्थान कैचें त्याला। तथापि सविकल्पा उद्भव जाहला। तरीही समाधि न मोडे
लय होऊन जे का निर्विकल्पता। तो असंप्रज्ञात समाधि तत्त्वतां। आणि उद्भवोनिही स्थिती एकरूपता । तो संप्रज्ञासमाधि
सुवर्णादि आटून जरी पाहे। तरी अलंकारादि लेश न लाहे। तैसें सविकल्प न किमपि राहे । तें निर्विकल्प असंप्रज्ञ
अलंकारादि असतां । नामरूपेंविण सुवर्ण तत्त्वतां । तैसें निर्विकल्प सविकल्प उद्भवतां । हें सविकल्प संप्रज्ञ ॥ ३४
सविकल्प जरी उद्भवलें । तरी तें मिथ्यात्वें प्रतीतीस आलें । त्यामध्यें असून नाहीं हालवलें । निर्विकल्प तें निर्विकल्प
अलंकार होतां सुवर्णपणा । जाहलाचि नाहीं अधिक उणा । मग असोत कीं आटोत नग नाना । सुवर्ण एकरूप ३६
तैसें सविकल्प उद्भवतां कीं निमतां। निर्विकल्प सहज एकरूपता । मग दोनी नामें तरी केउता । दोहींही समयीं ॥ ३७
निर्विकल्पत्वींही निर्विकल्प । आणि निर्विकल्पचि उठतां सविकल्प । मग ते संप्रज्ञ असंप्रज्ञ जल्प । व्यर्थचि न म्हणावें
परी साधकासी दोन भावभासले । कीं निर्विकल्पसविकल्प वेगळाले। म्हणोनिसमाधिसीदोंनांवातें ठेविलें। संप्रज्ञ असंप्रज्ञ
कीं सविकल्प अभावी निर्विकल्पता । ते असंप्रज्ञात समाधि तत्त्वतां । अथवा सविकल्पांत जे एकरूपता । ते संप्रज्ञात
असो उभयकाळींही पूर्ण ज्ञात्यासी । दुजीस्थितिच नव्हेअल्पसी । तेचि निरोपिजेलकांहींसी । साधकानिश्चय व्हावया
सविकल्पही निर्विकल्पावाचोन । काय असे अमुक म्हणून । ऐसा अन्वय जो आतां केला कथन।तेणेंसी युक्त पाहतां
सविकल्प नाहींच आदि अंतीं । मध्येंही नसेचि जरी उद्भवती । आद्यंत निर्विकल्परूप चिती । तेचि मध्येंही परिपूर्ण
ऐसा निश्चयचि होऊन गेला। संशय निपटून मावळला । मग असो भलतिये अवस्थेला । परी तो सह समाधि । ४४॥
सविकल्प चिद्रूपही असे मीचि । निर्विकल्प तो केवळ स्वयेंची । जैसें नग मोडितां घडितां सुवर्णचि । तैसा दुजा भाव नाहीं
ब्रह्मादि तृणांत सारें जग । पाहे जरी तरी तें निजांग । स्पर्शलाचि नाहीं दुसरा भाग । जड कीं चेतन ॥ ४५४६ ॥

---

असा ज्याचा निश्चय बाणून गेला त्याला समाधिउत्थान कसचें ? जरी समाधिउत्थान नाहीं, तरी सविकल्प उत्पन्न झाला असतां त्याची समाधि मोडत नाहीं.

## समाधीच्या प्रकारांचें वर्णन.

लय होऊन जी निर्विकल्पता होते तो असंप्रज्ञात समाधि, व सर्वांचा उद्भव होऊनही एकरूप स्थिति तो संप्रज्ञात समाधि. सुवर्ण आटवून पाहिलें असतां त्यांत अलंकाराचा लेशही प्राप्त होत नाहीं, तसे सविकल्प किमपीहि रहात नाहीं, तेंच निर्विकल्प असंप्रज्ञ. अलंकारादि असून नामरूपावांचून जसें सुवर्ण स्थित असतें तसें सविकल्प उद्भवलें असतां निर्विकल्प उरतें. हें सविकल्प संप्रज्ञ. सविकल्प जरी उद्भवलें तरी तें मिथ्यत्वानें प्रतितीस आलें. त्या सविकल्पांमध्यें असून जें निर्विकल्प हरवलें नाहीं तेंच निर्विकल्प. अलंकार झाले तेव्हां सुवर्णपणा अधिक उणा झालाच नाहीं, मग ते अलंकार असोत अथवा आटोत, सुवर्ण तें एकरूपच आहे. तसें सविकल्प उद्भवलें असतां किंवा निमालें असतां निर्विकल्प सहज एकरूप आहे. आणि असें जर खरें आहे, तर सविकल्पाचे वेळेस सविकल्प, आणि निर्विकल्पाचे वेळेस निर्विकल्प, अशीं दोन नांवें कशाला पाहिजेत ? निर्विकल्पाचे वेळीं निर्विकल्पच आहे. आणि सविकल्प उठलें असतांही निर्विकल्पच, मग संप्रज्ञ, असंप्रज्ञ नांवें व्यर्थ नाहींका होत ? तीं नांवें तर व्यर्थ होतातच, पण साधकास सविकल्प आणि निर्विकल्प असे दोन भाव भासले म्हणूनच समाधीस सविकल्प संप्रज्ञ, व निर्विकल्प असंप्रज्ञ, अशीं दोन नांवें दिलीं; तीं अशीं कीं, सविकल्पाचे अभावीं निर्विकल्पता ती असंप्रज्ञात समाधि व सविकल्पांत जी एकरूपता ती संप्रज्ञात समाधि. पूर्ण ज्ञात्यास सविकल्पाचे वेळीं, व निर्विकल्पाचे वेळीं अल्पसुद्धां दुसरी स्थिति होत नाहीं, तेंच आतां साधकास निश्चय व्हावा म्हणून सांगतों.

सविकल्प निर्विकल्पावांचून निराळें नाहींच, असा अन्वय आतां कथन केला. त्या हिशेबानें पाहिलें असतां, सविकल्प मध्यें उद्भवलेंसे वाटतें, पण आदिअंतीं व मध्यें निर्विकल्परूप चिती आहे, असा निश्चय होऊन ज्याचा संशय निःशेष मावळला, मग तो कोणत्याही अवस्थेंत असला तरी त्याचा तो सहज समाधि आहे.

## सहज समाधि किंवा सहज अवस्थेचें वर्णन.

सविकल्प चिद्रूप तें मीच, निर्विकल्प तें मी स्वतः आहेंच, जसे अलंकार मोडिले किंवा घडविले तरी सुवर्णच आहे, तसा सविकल्प निर्विकल्पाविषयीं दुजा भाव नाहीं. ब्रह्मदेवापासून किड्यापर्यंत सर्व जग पहातों. तरी तें माझें निजांगच मानितो. हें जड किंवा हें चेतन असा दुजाभाव मानीत नाहीं.

सविकल्प निर्विकल्प मात्र दोनी । भाग केले बोलावयालागुनी । परी एकरूपचि सदां ज्ञानी । मीच म्हणून घेती ॥४७
स्फूर्तीपासून देहापर्यंत । हे सविकल्प वस्तुजात । परी ज्ञाता नामरूपाविरहित । एक निर्विकल्प घेतसे ॥४८॥
कीं सविकल्प चिद्रूपही मी पूर्ण । जैसें नगीं एकरूप सुवर्ण । दुसरें किमपि हें नसे भान । नामरूप जगाचें ॥४९॥
विष्णुआदि पुढें आले । कीं कीटकादि समोर देखिले । परी उंच नीच नाहीं कल्पिलें । एक निर्विकल्प स्वयें ४५५०
तैसेंचि गगन थोर तृण हें सान । पाहतां भावीना अमुक म्हणून । एकरूपचि निर्विकल्प आपण । निजांगें असे ५१
जैसा एक देह सर्व संघासहित । मीच म्हणूनि प्रतीति घेत । तैसें ब्रह्मांड समस्त । अपरोक्ष ज्ञानिया ॥ ५२ ॥
सविकल्पकाळीं सर्व सविकल्पा । मीच म्हणून घेतसे निर्विकल्पा । केवळ निर्विकल्पीं तो मी तूं या जल्पा । ठाव कैंचा असे
तें स्वयें निजांगेंचि आपण । अनुभाव्यरूप अनुभवाविण । तेथें कैंचें उद्भवे मीतूंपण । सविकल्पा अभावीं ॥ ५४ ॥
सविकल्पीं मात्र निर्विकल्प । उद्भवतां घेतसे एकरूप । परी उंच नीच हे नामरूप । न स्पर्शती कदां ॥ ५५ ॥
आतां हें सविकल्पत्वें असो । कीं निर्विकल्पीं समरसो । परी दुसरेपणाचा अतिसो । ज्ञातया नाहीं ॥ ५६ ॥
सतरंग अथवा निस्तरंग । सागर जैसा एकरूप अभंग । तैसा सविकल्प निर्विकल्पीं असंग । निर्विकल्प स्वयें ॥५७॥
समेघ अमेघ एक आकाश । न्यूनाधिकाचा नसे लेश । तैसा सविकल्प निर्विकल्पीं अविनाश । निर्विकल्प स्वयें ॥५८॥
ज्वाळा असतां कीं मावळतां । अग्नीसी जेवीं एकरूपता । तैसा सविकल्पीं निर्विकल्पीं तत्त्वतां । निर्विकल्प स्वयें ॥५९॥
मृगजळ पडे किंवा विघडे । परी निजतेजें असावें मार्तंडें । तैसें सविकल्प निर्विकल्पीं उघडें । निर्विकल्प स्वयें ॥४५६०॥
मग सविकल्पता उमटली । किंवा निर्विकल्पता असो संचली । परी दुसरी स्थिति नाहीं आली । तरी भेद तो कोणता
हें जग क्रीडतें कीं पडलें । तेणेंचि रीतीं शरीरही आपुलें । परी निर्विकल्प जें स्वयें संचलें । तें जैसें तैसें ॥ ६२ ॥
स्फुर्तीपासून देहापर्यंत । सर्व व्यापारती जागृतींत । अथवा क्रीडतसे स्वप्नाआंत । कीं सुषुप्तीमाजीं लीन ॥ ६३ ॥

---

बोलण्याकरितां सविकल्प निर्विकल्प असे दोन भाग केले. परंतु ज्ञानी ते प्रकार एकरूप मीच असें मानितात. स्फूर्तिपासून देहापर्यंत हें वस्तुजात सविकल्प आहे. पण ज्ञाता नामरूपावांचून एक निर्विकल्प घेतो. तें असें कीं, सविकल्प चिद्रूपही मीच आहें. जसें नगांत एकरूप सुवर्णच, त्यास दुसरेपणाचें भान नाहीं. तसें ज्ञात्यास नामरूप जगाचें भान नाहीं. त्यापुढें विष्णु आदि करून देव आले, किंवा किटकादि पुढें पाहिले, तेव्हां देव श्रेष्ठ व कीटक नीच हा भाव ज्यानें कल्पिला नाहीं, तर त्यानें सर्व एक मीच निर्विकल्प आहें असें मानिलें. तसेंच आकाश, थोर व तृण लहान हें पहातो, पण त्यांची लहानमोठेपणाची भावना करीत नाहीं, तर मीच एक स्वतः निर्विकल्प आहें. जसा एक देह सर्व संघासहित मीच आहें अशी प्रतिती मनुष्य घेतो. तसें हें सर्व ब्रह्मांड ज्ञान्यास अपरोक्ष ब्रह्मच आहे. सविकल्पाचे वेळीं सर्व सविकल्प मीच निर्विकल्पत्वानें आहे असें मानितो. केवळ निर्विकल्प आपण स्वतः आहेच. तें निर्विकल्प स्वतः निजांगें आपणच अनुभवावांचून अनुभाव्यरूप आहे. तेथें सविकल्पाचे अभावीं मीतूंपण कोठून उद्भवणार ? सविकल्पीं निर्विकल्प एकरूप घेतो. परंतु नामरूप किंवा उंच नी हें त्यास स्पर्शत नाहीं. आतां हें सर्व सविकल्पत्वानें असो किंवा निर्विकल्पत्वानें असो, परंतु ज्याचे ठायीं दुसरेपणाचा भावच नाहीं. तरंग अथवा निःस्तरंग समुद्र जसा एकरूप अभंग तसा सविकल्पीं किंवा निर्विकल्पीं असंग, जो स्वतः निर्विकल्पच आहे. म्हणून मेघयु किंवा मेघरहित एक आकाश, त्याचे ठायीं न्यूनाधिकाचा लेश नाहीं. तसा सविकल्पीं किंवा निर्विकल्पीं अविनाश निर्विकल्पच स्वतः आहे. ज्वाळा असल्या किंवा मावळल्या तरी अग्नीची जशी एकरूपता, तसा सविकल्पीं निर्विकल्पीं जो निर्विकल्पच स्वतः आहे. मृगजळ पडो किंवा मोडो पण सूर्यानें आपल्या तेजानें असावें. तसें सविकल्पीं निर्विकल्पीं स्वतः निर्विकल्पच उघडें आहे. मग सविकल्पता उमटली किंवा निर्विकल्पता संचलेली असो, पण दुसरी स्थिती आली नाहीं. तर मग भेद तो कोणता असणार ? हें जग क्रीडा करीत आहे किंवा पडलेलें आहे, याचे जसें ज्ञात्यास स्मरण नाहीं, तसेंच आपला देह क्रिडत आहे, किंवा पडलेला आहे याचें भान नाहीं, तर आपण जसें निर्विकल्प संचलेला आहे तसाच आहे.

स्फूर्तिपासून देहापर्यंत सर्व जागृतींत व्यापार करितात, अथवा स्वप्नामध्यें सूक्ष्मदेह क्रीडा करितो, किंवा झोंपेंत सर्वच लीन असतात.

मूर्च्छित किंवा मेले । कीं समाधींत एकाग्र जाहले । परी निर्विकल्प एकरूप संचलें । भलतेही अवस्थे ॥ ६४ ॥
भलतैसेंही आचरतां । सुखी दुःखी कीं अभोगी भोगितां । निर्विकल्पाची एकरूपता । हे सहजस्थिति ॥ ६५ ॥
सर्व जगरूप एक आपण । कीं आपणामध्यें जग संपूर्ण । तेथें एक देहाचें कर्तेपण । उरेल कैंचें ॥ ६६ ॥
जग उद्भवलें कीं निमालें । जया निर्विकल्पीं नाहीं स्पर्शलें । तेथें एक शरीराचे व्यापार जाहले । तेणें निर्विकल्प झाले केवीं
आतां उठो कीं राहो सविकल्प । देहादि जगाचा उद्भव कीं लोप । परी ज्ञात्याची स्थिति एकरूप । हे सहज समाधि ६८
अगा रविदत्ता हे चरम स्थिति । एकरूप सहजीं सहज निश्चितीं । चरम म्हणिजे शेवटील इजपरती । वरुती दुजी नसे
जीवन्मुक्ति विदेहस्थिति । अलिप्तस्थिति कैवल्यमुक्ति । इजमाजीं सर्व असती । वेगळें संपादणें नको ॥४५७०॥
बहु कासया बोलणें । नित्य मुक्तिही या स्थितीच्या गुणें । सर्व ज्ञातयांचें घडे वर्तणें । या चरमास्थितीमुळें ॥ ७१ ॥
ब्रह्मा विष्णु आणि शंकर । या स्थितीनें करिती व्यापार । वसिष्ठ नारद सनत्कुमार । आणीकही थोर थोर ज्ञाते ७२
मागें जाहले आतां वर्तमानीं । असती दत्त आदिकरूनी । या स्थितीनेंचि वर्तती जनीं । येथें भेद नाहीं ॥ ७३ ॥
विष्णु शिव हे प्रगट होतां । गुरु विरहित बाणली तत्त्वतां । इतरांसी गुरुमुखें हे अभिन्नता । पावली इतुकाचि भेद ७४
परी स्थितिमाजीं अणुमात्र । भेद हा नसे साचार । एकरूप सहजस्थिति निर्धार । प्राप्त ज्ञानिया ॥ ७५ ॥
दुजा कासयासी अतिसो । याचि स्थितीनें आम्हींही असों । तेचि स्थिति तुजलागीं सांगतसों । प्राप्त व्हावी म्हणोनी ७६
अपरोक्ष ज्ञान जया जाहलें । लयसाक्षित्व अभिन्नत्वें कळलें । ते ज्ञाते या स्थितीसी नाहीं पावले । ऐसें न घडे कल्पांतीं
परी कवणासी ज्ञान होतांच प्राप्ति । विचारनिश्चयें तत्क्षणीं आकळिती । कवण ते वृत्तीच्या ध्यासें दृढ करिती । हळुहळु अभ्यासें
जैसें अपरोक्ष ज्ञान पावावया । दोघे अधिकारी शिष्यराया । ह्या एक विचारेंचि पावे लवलाह्या । एक अभ्यासें हळुहळु
तैसेंचि अपरोक्ष ज्ञान जाहलियावरी । उत्तम कनिष्ठ दोन अधिकारी । उत्तम तो हे चरमस्थितीवरी मंद पावे वृत्तिध्यासें
उत्तमाचा निश्चय ऐसा । कीं मी ब्रह्म निजांगें आपैसा । येर हें सविकल्प तें सहसा । जाहलेंच नाहीं ॥ ४५८१ ॥

---

मूर्च्छित किंवा मेले किंवा समाधींत एकाग्र झाले, परंतु निर्विकल्प भलतेही अवस्थेंत एकरूप संचलेलें आहे. भलतैसें आचरत असतां सुखी किंवा दुःखी किंवा भोग भोगीत असतां निर्विकल्पाची एकरूपता ही सहज समाधी. सर्व जगरूप, एक आपण किंवा सर्व जग आपणांत, तेथें एक देहाचें कर्तेपण कोठून उरेल ? जग उत्पन्न झालें किंवा निमालें हें ज्या निर्विकल्पास स्पर्शलें नाहीं, तेथें एक शरिराचे व्यापार झाले, त्यानें निर्विकल्प कसें होईल ? आतां सविकल्प उठो किंवा राहो देहादि जगाचा उद्भव असो किंवा लोप असो, परंतु ज्ञात्याची स्थिति एकरूप ही सहजसमाधि. हे रविदत्ता, ही चरमस्थिति एकरूप सहजीं सहज आहे. या स्थितीहून श्रेष्ठ दुसरी स्थिती नाहीं. म्हणून इला, चरमास्थिति म्हणतात. जिवन्मुक्ति, विदेहस्थिति, अलिप्तस्थिति, कैवल्यमुक्ति ह्या सर्व स्थिति या चरमस्थितींत आहेत. ही प्राप्त झाली असतां त्या वेगळ्या संपादाव्या लागत नाहींत. फार काय सांगूं नित्यमुक्तिही, इचेचयोगानें आहे. सर्व, ज्ञात्यांचें वर्तन या चरमस्थितीचे योगानें होतें. ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर याच स्थितीनें व्यापार करितात. तसेंच वशिष्ट, नारद, सनत्कुमार, व आणखीही थोरथोर ज्ञाते, मागें दत्तात्रय आदीकरून झाले, व वर्तमानकाळीं आतां आहेत, ते याच स्थितीनें जनांमध्यें वर्ततात. विष्णु आणि शिव हे प्रगट होतांच त्यांस ही स्थिति गुरुवांचूनच बाणली. व रतरांस गुरुमुखानें बाणली. इतकाच विष्णु, शंकर यांत व इतर ज्ञात्यांत भेद आहे. पण स्थितीमध्यें खरोखर अणुमात्रसुद्धां भेद नाहीं. तर ज्ञात्यांस ही एकरूप सहज स्थिति प्राप्त आहे. फार काय सांगूं, रविदत्ता, आम्हींही याच स्थितीनें आहों. तीच स्थिती तुला प्राप्त व्हावी म्हणून सांगत आहों.

ज्याला अपरोक्ष ज्ञान झालें, व लयसाक्षित्व अभिन्नत्वें कळलें, ते ज्ञाते या स्थितीस पावले नाहींत, असें कल्पांतींही व्हावयाचें नाहीं. परंतु कोणी ही स्थिती ज्ञान होतांच विचाराचे निश्चयानें तत्काळ आकाळितात म्हणून तेव्हांच प्राप्त होते. कोणी वृत्तीच्या ध्यासानें हळूहळू अभ्यासानें दृढ करितात. जसे अपरोक्ष ज्ञान पावण्यास दोन अधिकारी आहेत, एक विचारानें लवकर पावतो, व एक मंद अभ्यासानें हळूहळू पावतो. तसेंच अपरोक्ष ज्ञान झाल्यावर उत्तम आणि कनिष्ठ असे दोन अधिकारी आहेत. उत्तमास ही चरमस्थिती लवकर प्राप्त होते व मंदवृत्तीच्या ध्यासानें हळुहळू पावतो. उत्तमाचा निश्चय असा आहे कीं, मी ब्रह्म आपाप आहेच. मजवांचून हें सविकल्प निराळें झालेंच नाहीं.

अज्ञानें होतें वाउगें कल्पिलें । जग सत्य आणि भिन्नत्व आपुलें । तें ज्ञान होतांचि दोन्ही गेले । अज्ञानासहि ८२
आत्मा ब्रह्म अभिन्न आपण । पहिलाचि असे केला नाहीं नूतन । देहासहित जग मिथ्या संपूर्ण । पहिलेंचि असे ॥८३॥
ऐसा निश्चय दृढतराचि केला । अभिन्न तो भिन्न नवचे पडिला । सत्यत्व येऊंच नेदी सविकल्पाला । भिन्नत्वें जितुकें जग
ऐशिये निश्चयें देहादि जगाची । वर्तणूक जितुकी होय सविकल्पाची । त सुखी होईना संशयाची । मुळी खांदिली ८५
याचि नांवें सहजस्थिति । अपरोक्ष जाहली याही वरुति । पूर्ण विचारवंत तत्क्षणीं लाहती । ऐसें मंदासी न घडे ॥८६॥
यासी अभ्यासाच्या सायासें । अपरोक्ष ज्ञान जाहलें असे । परी तैसाचि निश्चय नसे । संशयामुळें ॥ ८७ ॥
क्षणां निर्विकल्प दृढ करावें । क्षणां सविकल्पाकडे ढांसळावें । क्षणां वृत्तीनें समाधानें असावें । क्षणां तळमळ ॥८८॥
ऐसें व्हावया काय कारण । म्हणसी अपरोक्ष जाहलिया ज्ञान । तरी ऐकावें एकाग्र होऊन । हा पूर्वील ध्यास ॥८९॥
अपरोक्ष ज्ञान जरी जाहलें । परी दृढ अपरोक्षा नाहीं पावलें । तेणें वृत्तीसी पूर्वाध्यास उमटले । जे पहिलें दृढ होतें
वृत्तीसी मीच देह म्हणून । दृढ अभ्यास जाहला पुरातन । आतां संदिसें जाहलें अपरोक्ष ज्ञान । अहंब्रह्मास्मीचें ९१
इकडे उदय होतां ज्ञानाचा । अहंब्रह्मास्मि निर्विकल्प साचा । निमिष्य एक जरी राहतां देहाचा । ध्यास उफाळे तिकडे
ऐसा क्षणक्षणां विक्षेप उठे । पूर्वाध्यासाचिये परिपाठें । तें दृढ अपरोक्ष न म्हणावें गोमटें । लयसाक्षित्व मात्र कळलें
ऐशिया मंद अधिकारियासी । अभ्यास पाहिजे दृढ अपरोक्षासी । तरी हळुहळु दृढावे देहबुद्धि जैशी । ब्रह्मात्मबुद्धि सदृढ
तस्मात् तयासी वृत्तीचा अभ्यास । पाहिजे स्मरणरूप निदिध्यास । वाढवावें ब्रह्मात्म निश्चयास । देहबुद्धि क्षीण करावी
संकल्प उठो कीं राहो जावो । परी त्या सत्यत्व न द्यावें येवो । आणीकदुसरा नाहींच उपावो । स्मरणअसावें मिथ्याचें
इकडे स्मरावा ब्रह्मात्माआपण ।जो लयसाक्षी निर्विकल्पपरिपूर्ण।आणि तिकडे उठतांचिसंकल्पस्मरण मिथ्यात्वाचें असावें
ऐसा अभ्यास चिरकाळ होतां । वृत्तीची गळे अहंममता । देहबुद्धीचा विक्षेप नुठे तत्त्वतां । ब्रह्मात्म निश्चय बाणे ९८
ऐसें ऐकतांचि रविदत्त । नेणपणें असे प्रश्न करीत । कीं दोहींकडील स्मरणाचा संकेत । कासया पाहिजे ॥९९॥
इकडे ब्रह्मात्मत्वाचें स्मरण । तिकडे सविकल्पाचें मिथ्या दर्शन । ऐसें दोहींकडे वोडगस्तपण । करावें कासया ४६००

---

अज्ञानानें जग सत्य आणि आपलें भिन्नत्व कल्पिलें होतें, तें वाउगें आहे. तें ज्ञान झाल्यावर अज्ञानासह सर्व गेलें. मी आत्मा ब्रह्म आपण पहिलाच आहे. नूतन कांहीं केला नाहीं. तसेंच देहासह जग संपूर्ण मिथ्या पहिलेंच आहे, असा निश्चय ज्यानें दृढतर केला, तो अभिन्न कधींही भिन्न व्हावयाचा नाहीं व भिन्नत्वानें जितकें जग आहे, त्या सविकल्पास तो सत्यत्व येऊं देत नाहीं. अशा निश्चयानें देहादि जगाची वर्तणूक जितकी या सविकल्पाची होईल ती होईना, यानें त्याविषयीं संशयच खणून टाकला, हीच सहजस्थिती. ही स्थिति अपरोक्ष ज्ञान झाल्यावर पूर्ण विचारवंतास तत्क्षणीं प्राप्त होते. तशी मंदास लवकर प्राप्त होत नाहीं. कारण त्यास अपरोक्ष ज्ञान अभ्यासाचे साहाय्यानें झालेलें आहे. त्याचा संशयामुळें तसा निश्चय एकाएकी होत नाहीं.

शंका—क्षणभर निर्विकल्प दृढ करावें, क्षणभर सविकल्पाकडे यावें, क्षणभर वृत्तीनें समाधानानें असावें, क्षणांत तळमळ वाटावी, असें अपरोक्ष ज्ञान झाल्यावर कां व्हावें, असें म्हणशील तर ऐक. सांगतों —

उत्तर–हा पूर्वीचा ध्यास असें करतो. अपरोक्ष ज्ञान जरी झालें तरी दृढ अपरोक्षास पावलें नाहीं, म्हणून पूर्वी जे दृढ अभ्यास होते ते वृत्तींत उमटले. वृत्तीस मी देह असा पुरातन दृढ अभ्यास झालेला आहे, पण अहंब्रह्मास्मीचें ज्ञान आतांच झालें आहे. त्या योगानें ज्ञानाचा उदय होतांच अहंब्रह्मास्मि निर्विकल्प होऊन एक निमेष जों राहतो आहे तों तिकडे देहाचा ध्यास उफाळतो. असा पूर्वाध्यासाचे परिपाठानें क्षणोक्षण विक्षेप उठतो, तोंपर्यंत तें ज्ञान दृढ अपरोक्ष झालें असें म्हणूं नये. तर त्यास लयसाक्षित्व कळलें, इतकेंच समजावें. असा जो मंद अधिकारी त्यास दृढ अपरोक्षाचा अभ्यास केला पाहिजे, तेव्हांच देहबुद्धि जशी दृढ झाली आहे तशी ब्रह्मात्मबुद्धि दृढ होईल. म्हणूनच त्या अधिकाऱ्यास वृत्तीचा अभ्यास म्हणजे स्मरणरूप निजध्यास पाहिजे. या अभ्यासानें देहबुद्धि क्षीण करून ब्रह्मात्मनिश्चय वाढवावा. संकल्प उठो, राहो किंवा जावो परंतु त्यास सत्यत्व येऊं देऊं नये. तर मिथ्याचें स्मरण असावें, हाच उपाय आहे. याखेरीज दुसरा उपाय नाहीं. इकडे लयसाक्षी ब्रह्मात्मा जो आपण, तो स्मरावा व तिकडे संकल्प उठले असतां त्यांचें मिथ्यत्वाचें स्मरण असावें. याप्रमाणें चिरकाळ अभ्यास झाला असतां वृत्तीची अहंममता गळते, देहबुद्धीचा विक्षेप उठत नाहीं व ब्रह्मात्मनिश्चय बाणतो. हें बोलणें ऐकून रविदत्त नेणतपणानें प्रश्न करितो.

प्रश्न–इकडे ब्रह्मात्म्याचें स्मरण, तिकडे सविकल्पाचें मिथ्या दर्शन, असें दोहोंकडे वोढगस्तपण कां करावें ?

यापरी सर्व सविकल्पाचा । निरोधचि कां न करावा साचा।उर्वरित उरेल जोसाक्षी लयाचा । तो निर्विकल्प आपण स्वतः
तस्मात् सर्व निरोधून सविकल्प । अखंड स्थिर व्हावा निर्विकल्प । जो असंप्रज्ञात समाधि अल्प । उत्थान न व्हावें ॥२॥
ऐसें रविदत्तावें उत्तर ऐकतां । हांसोनि स्वामी बोलती तत्त्वतां । हा काय गा प्रश्न करिसी आतां । विरोधात्मक ॥३॥
मागें त्वां पुसिलें होतें । कीं देहबुद्धि न स्पर्शावी मातें । मग दिसेनात मिथ्याभूत समस्तें । मृगजलप्राय ॥ ४ ॥
तें विसरून आतां म्हणसी । कीं निरोध व्हावा सर्व संकल्पासी । तरी हें न घडे कल्पांतीसी । कोंडितां जरी वायु ॥५॥
मागुतीं रविदत्त म्हणतसे । जी जी मज तें विस्मरण नसे । परी आपण बोलिला कीं असे । समाधीचें लक्षण द्विविध
एक सविकल्प तें संप्रज्ञ । दुजा निर्विकल्प असंप्रज्ञ । हे दों रीतीं समाधीची संज्ञ । असे वेगळाली ॥ ७ ॥
म्हणोनि मीं केली विनंती । कीं निर्विकल्पचि असावी स्थिति । तरी ते सांगावी रूपामूर्ति । समाधि असंप्रज्ञ ॥८॥
ऐसें म्हणोनि चरण धरिले । मग श्रीगुरु बोलते जाहले । म्हणती वत्सा आम्हीं जें बोलिलें । तो भाव वेगळा ॥९॥
तया असंप्रज्ञात समाधीचें । यथार्थ निरूपण करूं साचें । केवळ निर्मूल करणें सविकल्पाचें । ऐसें नव्हे ॥४६१०॥
हे देहउपाधि असतां । वृत्ति उठेल निर्विकल्पता । तिजसवें मनबुद्ध्यादिकां समस्तां । उत्पत्ति होय ॥ ११
हें मागेंचि तुजला निरोपिलें।आणिज्ञानाज्ञानवृत्तीकडेआलें।अनुभवणें जेंनिर्विकल्पाचेंउमटलें। स्मरण विस्मरण ही वृत्तीशी
परोक्ष अपरोक्ष शोकभंग । आनिरंकुशा तृप्ति अभंग । ह्या मोक्षरूप अवस्था सांग । सविकल्पाच्या असती ॥ १३ ॥
तया वृत्तीसीं निरोधितां । उरे अखंडित जे निर्विकल्पता । तयासी अज्ञान तरी असे केउता । कीं आतां ज्ञान व्हावें१४
निर्विकल्प तें निर्विकल्प । तेथें कोणताचि नसे आरोप । ज्ञानाज्ञान कीं स्मरणास्मरण । अल्प नसेचि तेथें ॥१५॥
तस्मात् ज्ञानादि अवस्था वृत्तीच्या । होतां मावळती अज्ञानाच्या । ज्याकाकृति बंधनात्मकाच्या । आवरणविक्षेपादि
तया वृत्तीसी जें निरोधन । तरी ज्ञानाभूतीचें कवण स्मरण । स्मरणावांचून । अज्ञानबंधन । फिटेना सहसा ॥१७॥
अज्ञानवृत्तींत तैसेंचि उरलें । उगेंचि बलात्कारें तयेसी रोधिलें।तयासी ज्ञान ऐसें कवण बोले।ते समाधि नव्हे झोंप १८

---

यापेक्षां सर्व सविकल्पाचा निरोध कां करूं नये ? सविकल्पाचा निरोध केला असतां उर्वरीत जो लयाचा साक्षी उरेल तोच निर्विकल्प आपण स्वतः उरतो. याकरितां सर्व सविकल्प निरोधून जो असंप्रज्ञ समाधी निर्विकल्प तो अखंड स्थिर व्हावा; सविकल्पाचें अल्पसुद्धां उत्थान होऊं नये.

वर सांगितलेला रविदत्ताचा प्रश्न ऐकून स्वामी हंसून म्हणतात. हे रविदत्ता, आतां तूं हा विरोधात्मक प्रश्न कसा करतोस ? अरे मागें त्वां विचारिलें होतें कीं, देहबुद्धि मला स्पर्शूं नये, मग मृगजलवत् सर्व मिथ्याभूत दिसेनात तें विसरलास, आणि आतां म्हणतोस कीं, सर्व संकल्पाचा निरोध व्हावा. पण रविदत्ता, हें वायु कोंडला तरी कल्पांतींही घडावयाचें नाहीं. तेव्हां रविदत्त म्हणतो; मला त्याचें विस्मरण नाहीं, पण आपण बोललां कीं, समाधीचीं लक्षणें दोन प्रकारचीं आहेत. एक सविकल्प तें संप्रज्ञ व दुसरें निर्विकल्प तें असंप्रज्ञ. याप्रममाणें दोन प्रकारचीं समाधीचीं लक्षणें आहेत म्हणून मी विनंती केली कीं, एक निर्विकल्पच स्थिति असावी. मला असंप्रज्ञ समाधी यथार्थ कळली नाहीं, करितां स्वामी तुम्ही मला ती समाधी सांगा. तेव्हां स्वामी सांगतातः हे वत्सा, आम्ही दोन प्रकारचा समाधि सांगितला, त्याचा भाव वेगळाच आहे.

## असंप्रज्ञात समाधीचें यथार्थ निरूपण.

हा असंप्रज्ञात समाधि साधण्याकरितां सविकल्पाचें केवळ निर्मूळ केलें पाहिजे असा आमचे सांगण्याचा भाव नाहीं. कारण देहउपाधि आहे तोंपर्यंत सविकल्पता उठेल, व ती उठली असतां तिजबराबर मनबुद्धि इत्यादिकांचा उद्भव होईल. हें मागेंच आम्हीं तुला सांगितलें आहे, कीं ज्ञान अज्ञान वृत्तीकडे आलें, निर्विकल्पाचें अनुभवणें उमटलें, तें स्मरण किंवा विस्मरण, हें वृत्तीलाच आहे. परोक्ष, अपरोक्ष, शोकभंग, आणि निरंकुशातृप्ति, ह्या मोक्षरूप अवस्था सविकल्पाच्याच आहेत. त्या वृत्तीचा निरोध केला असतां अखंडीत जी निर्विकल्पता उरते तिला कसचें अज्ञान आहे, कीं तें घालविण्यास आतां ज्ञान व्हावयास पाहिजे. निर्विकल्प तें निर्विकल्प. तेथें ज्ञान किंवा अज्ञान स्मरण किंवा विस्मरण अशा प्रकारचा कोणताच आरोप नाहीं. वृत्तीच्या ज्ञानादि अवस्था झाल्या असतां, अज्ञानाच्या आवरण-विक्षेपादि बधनाच्या कृति त्या मावळतात, त्या वृत्तीचा निरोध केला असतां ज्ञानानुभूतीचें स्मरण कोणी राखावें? ज्ञानानुभूतीचें स्मरण असल्यावांचून अज्ञानबंधन सहसा फिटावयाचें नाहीं. अज्ञान न फिटतां वृत्तीचा निरोध केला तर तो काय उपयोग! त्याला कोणी ज्ञान म्हणणार नाहीं. ती समाधी नव्हे तर झोंपच समजावी.

सर्व वृत्तीचें अज्ञान जावें । अखंड निर्विकल्प ज्ञान स्फुरावें । तेंचि ज्ञान तेणेंचि मुक्त व्हावें । तया निरोधितां व्यर्थ
आणीक हे ईशें जितुकें निर्मिलें । ते जीवें काढितां जातील लोपले । मनबुद्ध्यादि तों ईशें उभविले । ते निमती कैसे
यावरी जीवाची कल्पना । असेल बाधक रूपरचना । ते त्यागिलीव त्यागितां समाधाना । पात्र होय साधक ॥२१॥
तस्मात् स्वतःसिद्ध जे जीवाचे विकल्प।साधकें निरोधावे जे बाधकरूप।तेंचि निरोपिजेल आधींअल्प। पुढें निर्विकल्प कळेल

## स्वतःसिद्ध विकल्पास्ते निरोधव्याः प्रयत्नतः

स्वतःसिद्ध जे जे बाधक विकल्प । ते ते निरोधावे नुरावे अल्प । जैसा जैसा प्रयत्नाचा साक्षेप असेल तेणें तेणें रीतीं
येर धर्मधर्मीसहित । मनबुद्ध्यादि इंद्रियें समस्त । हे दिसेनात कां मिथ्याभूत । यासी निरोध नको ॥ २४ ॥
मागें तुजला जीवसृष्टीचें । निरोपण केलें प्रांजळ साचें । तितुकेंही बाधक असे कैंचें । त्यांतीलही मोक्षा उपयोगी २५
जागृतीपासून मोक्षापर्यंत । हें अवघेंचि असे जीवकृत । परी शास्त्रीय जें कां मोक्षासी देत। तें त्यागितां मोक्ष कैंचा॥
श्रवण मनन निदिध्यास । अहंब्रह्मास्मीचा जो अभ्यास । ह्याचि मोक्षद होय साधकास । विचारासहित ॥ २७ ॥
वृत्तीचा लय करूनि पाहणें । लयसाक्षीत्वाची प्रतीति बाणणें । हेंही सविकल्प जीवाचे गुणें । अन्यथा न घडे कधीं॥
एवं श्रवणापांसूनलयसाक्षित्वापर्यंत । हेंशास्त्रीयजीवाचेंजनित । हें अज्ञाननासूनमोक्षदानीहोत । तरीहेंनिषेधितांनये ॥२९॥
ययाची तो अपेक्षा साधका । तरी हे सापेक्षिती देहादिका । तस्मात्रोधजोंकरावानिका । तो सांगें कवणाचा ४६३०
मुख्य शरीर तों सांग पाहिजे।तरी घडेलसाधन केलें जें जें। श्रोत्रादि ज्ञानेंद्रियें श्रवण कीजे । प्रश्नासी वाणी असावी
मननासी मन बुद्धि चित्त । पाहिजे तरीच मनन घडत । निदिध्यासासी वृत्ति अपेक्षित । अहंब्रह्मास्मिरूपें ॥३२॥
सामान्य अथवा विशेषवृत्ति । परी साभिमानें असावी अहंकृति । जरी दृढतर अहंब्रह्म प्रतीति । तरीच देहबुद्धि गळे ३३
तस्मात् वृत्तीपासून देहादि सकळ । या ईशसृष्टीचें पाहिजे बळ । त्यांत प्रतिबिंबत्वें जीव हा केवळ । अपेक्षिजे साधकें
याचि हेतु वृत्त्यादिकांचा । निरोध करावा किमपि साचा । अशास्त्रीय स्वतःसिद्ध विकल्पाचा । निरोध केलाच पाहिजे
कामादिक हे बाधक असती । आणि मी माझेपणाची प्रीति । अथवा कृष्यादिकांची कृति । बळें निरोधिली पाहिजे

---

सर्व वृत्तीचें अज्ञान जावें व अखंड निर्विकल्प ज्ञान स्फुरावें तेंच ज्ञान. त्यानेंच मुक्त व्हावें. असें असतां त्या वृत्तीचा निरोध करणें हें व्यर्थ आहे. दुसरें असें आहे कीं, ईश्वरानें जें जें उत्पन्न केलें तें तें जीवानें काढून टाकिलें तरी तें लोपलें जात नाहीं. मन बुद्धि हीं ईश्वरानें उत्पन्न केलीं हीं कशीं निमतात. त्यांचें तर निमणें नाहींच, पण ईश्वरानें केलेल्या सृष्टीवर जीवाचे कल्पनेनें जी बाधकरचना झाली असेल, ती त्यागिली असतां, साधक समाधानास पात्र होतो. म्हणून साधकानें स्वतःसिद्ध, जे जीवाचे विकल्प बाधकरूप असतील ते निरोधावे. तेच अल्प येथें सांगतों त्यायोगें पुढें निर्विकल्प सहज कळेल.

स्वतःसिद्ध जे जे बाधक विकल्प ते ते अल्प न उरतां मोठ्या प्रयत्नानें निरोधावे. त्यावांचून धर्मधर्मीसहित मनबुद्ध्यादि सर्व इंद्रियें हीं मिथ्याभूत दिसेनात, त्यांचा निरोध नको. मागें तुला जीवसृष्टीचें प्रांजळ निरूपण केलें, त्यांत सर्वच बाधक आहे असें नाहीं, तर कांहीं मोक्षाचे उपयोगी आहे. जागृतीपासून मोक्षापर्यंत हें सर्व जीवकृतच आहे, पण त्यांत मोक्ष देणारें ज शास्त्रीय, याचा त्याग केला असतां मोक्ष कसा प्राप्त होईल ? श्रवणमनननिदिध्यास व अहंब्रह्मास्मीचा अभ्यास, हा विचारासह साधकास मोक्ष देणारा आहे. वृत्तीचा लय करून पहाणें, लयसाक्षित्वाची प्रतीति बाणणें, हेंही सविकल्प जीवाचेच योगानें होतें. एवं श्रवणापासून लयसाक्षित्वापर्यंत जें शास्त्रीय तें जीवाचेंच कर्तृत्व. हें अज्ञान घालवून मोक्ष देते होतें, म्हणून याचा निषेध करितां येत नाहीं. याची तर साधकास अपेक्षा आहे, म्हणून देहादिकांचीही साधक अपेक्षा करितो. आतां तूं जो रोध करावा असें म्हणतोस तो कोणचा करावा तें सांग, साधन करण्याकरितां शरीर पाहिजे. श्रवणादि व्यापाराकरितां श्रोत्रादि ज्ञानेंद्रियें पाहिजेत. प्रश्न करण्याकरितां वाचा पाहिजे. मनन करण्याकरितां मन, बुद्धि, चित्त पाहिजे. अहंब्रह्मास्मिरूप निदिध्यासास वृत्तीची अपेक्षा आहे. सामान्य अथवा विशेषवृत्ती परंतु साभिमानानें अहंकृति असली पाहिजे. अहंब्रह्मप्रतीति दृढतर असली तरच देहबुद्धि गळेल. याकरितां वृत्तीपासून देहापर्यंत सर्व या ईशसृष्टीचें साह्य पाहिजे. तसेंच बुद्धींत प्रतिबिंबणारा जीव हाही पाहिजे. हीं सर्वही पाहिजेत. म्हणूनच यांचा निरोध करूं नये. पण अशास्त्रीय स्वतःसिद्ध जो विकल्प त्याचा निरोध केलाच पाहिजे. कामादिक बाधक आहेत त्यांचा, तसाच मी व माझेपणा यांचा व कृष्यादि व्यापारांचा बळें निरोध केलाच पाहिजे.

ऐसे हे बाधक स्वतःसिद्ध विकल्प । मार्गे त्यांचें केलें स्पष्टरूप । ययासी उरों न देतां अल्प । यत्नें निरोधावे ॥३७॥
निरोध म्हणिजे विवेकेंकडून । लयचि व्हावयाचा संपूर्ण । कीं उद्भवचि न व्हावा फिरून । घोर मूढ वृत्तीचा ॥३८॥
हे माझे हे हे तुझे असती । हे चांगले वाईट भाविजेती । हेही असे जीवाची कृती । म्हणोनि निरोधावे ॥३९॥
हे द्वेष्य हे उपेक्ष्य हे प्रिय । यापासून होतसे असुक कार्य । हेंहें कांहींच उपेगा न नये । हें जीवकृत निरोधावें ४६४०
बहुत कासयासी बोलणें । देहबुद्धि वाढेल जेणें गुणें । तो स्वधर्म असतांही त्याग करणें । शास्त्रीय अथवा लौकिक
जेथें जेथें साभिमान उपजे । पुण्यपापात्मकाचीं उमटती बीजें।तें तें अवश्य बळें त्यागिजे । स्वतःसिद्ध बाधक म्हणोनि
हे बोलतां कधींही न सरे । परी अल्प संकेतें जाणावें सारें। स्वतःसिद्ध बाधक असेल साचारें । तितुकें खांदून काढावें
येर हे जीवकृतही असतां । जे बाधक न होती असती सानुकूलता।ते ते व्यापारही न येती त्यागितां । स्नानभोजनादिक
आणि वृत्तीपासून प्राणापर्यंत । जितुकें हें असे ईशकृत । ययाचें निरोधन नको किंचित । साधना उपयोगी ॥४५॥
येथेंही कोणी मानील मंद । कीं जोंवरी लयसाक्षिज्ञान नव्हतें शुद्ध । तोंकाल हे वृत्यादि विशद । साधना अपेक्षिजे
तें लयसाक्षिज्ञान जाहलियावरी । आतां साधनअपेक्षा कासया तरी । वृत्यादि न लगतां ज्ञानोत्तरीं ।रोधितां बाध काय
ऐशिये आशंकेचे उत्तर । देऊं तें ऐकावें निरुत्तर । अज्ञान होत तेव्हां विकार । वृत्यादिकांचा नव्हता ॥४८॥
आतां ज्ञानजाहलिया बाधकवाटती।तरी हेंज्ञानचिनव्हे केवळभ्रांति ।हे मिथ्याअसूनसत्यजाहलीप्रतीति । आणि त्यागूं म्हणे तो साभिमान ॥ ४९ ॥
इकडे सत्यत्व आलें यया समस्तां । तिकडेबळावलीद्वैतअहंता । तरी तें अपरोक्षज्ञान असे केउता । हे केवळ भ्रांति ४६५०
सर्वांसी सत्यबुद्धि केली दृढ । त्यागितांअभिमान हा भिन्न द्वाड । असतां निरोधूनबैसतां भ्याड । तो मुक्त नव्हे कल्पांतीं
रोगी झांकून मारिले । उपचारें आरोग्य नाहीं केलें । तैसें असतां मिथ्यात्व नाहीं कळलें । कोंढून बैसे मूढ ॥ ५२ ॥
घरासी अग्नि लागला । आणि कपाट देऊन आंत ठेला । तैसा जीवत्व साभिमानें बांधला । रोधून बैसे तो आत्मघ्न

---

याप्रमाणें बाधक जे स्वतःसिद्ध विकल्प, त्यांचें मार्गें रूप केलेंच आहे. यांस अल्पसुद्धां उरूं न देतां यत्नानें निरोधावें. निरोध म्हणजे विचारानें घोर, मूढ, वृत्तीचा पुन्हा उद्भव न होई असा लयच व्हावा. तसेंच माझें तुझें, चांगलें वाईट, द्वेष्य उपेक्ष्य, प्रिय हें सर्व जीवकृतीचें आहे. फार काय सांगूं, ज्यांचेयोगानें देहबुद्धि वाढेल ती जीवकृति शास्त्रीय अथवा स्वधर्मरूप लौकिकी कां असेना तिचा त्याग करावा. पुण्यपापाचीं बीजें उमटतील असा जो जो साभिमान उत्पन्न होईल तो तो स्वतःसिद्ध बाधक आहे, म्हणून त्याचा बळें त्याग करावा. कोणकोणाचा त्याग करावा हें सांगूं लागलें असतां संपणार नाहीं, पण अल्प संकेतानें समजावें कीं, जे स्वतःसिद्ध बाधक असेल, तितकें समूळ काढून टाकावें. जे बाधक नाहींत, उलटे अनुकूलच आहेत, ते ते जीवकृतही स्नानभोजनादि व्यापार टाकितां येत नाहींत. तसेंच वृत्तीपासून प्राणापर्यंत जितकें ईश्वरनिर्मित आहेत हे सर्व साधनाचे उपयोगी आहे, करितां यांचा किंचित्ही निरोध करूं नये.

शंका—कोणी मंदमति म्हणेल कीं, जोंपर्यंत शुद्ध लयसाक्षि ज्ञान झालें नव्हतें, तोंपर्यंत वृत्त्यादि सर्व साधनाचे उपयोगी होती. आतां तर तें लयसाक्षि ज्ञान झालें आहे, मग साधनांची अपेक्षा कां असावी ? वृत्त्यादिक ज्ञानोत्तरीं लागत नाहींत, तेव्हां त्यांचा निरोध केला असतां बाध काय आहे ?

उत्तर–अरे, अज्ञान जेव्हां होतें तेव्हां वृत्त्यादिकांचा विकार नव्हता आणि आतां तर ज्ञान झालें आहे, या वेळेस जर वृत्त्यादिक बाधक वाटतील तर तें तुमचें ज्ञानच नव्हे, तर केवळ भ्रांति आहे. कारण हीं वृत्यादिक मिथ्या असतां तुम्हास त्यांची सत्यत्वाची प्रतिति आली, म्हणून त्यांचा त्याग करावा म्हणणें हा साभिमान आहे. या योगानें इकडे ईशसृष्टीस सत्यत्व आलें, तिकडे द्वैत अहंता बळावली, आतां येथें अपरोक्ष ज्ञान कोठें आहे ? आहे ती सर्व भ्रांति आहे. सर्व सत्य आहेत, अशी दृढबुद्धि झाली; म्हणून त्यांचा त्याग करिता, त्याग करण्याचा अभिमान हा अभिन्न व द्वाड उरला असतां, भ्याडहो, तुम्ही सर्वांचा निरोध करून बसणारे जे ते कोणीही कल्पांतिसुद्धां मुक्त व्हावयाचे नाहींत. जसें उपचार करून आरोग्य करावें, तें न करितां रोगी झांकून मारावें. तसें ज्यास हें सर्व असतांच मिथ्या कळलें नाहीं, म्हणून कोंडून बसतो तो मूढ समजावा. घरास अग्नी लागला असतां दार लावून आंत बसावें, त्याप्रमाणें जीव साभिमानानें बांधलेला आहे, असें असतां रोध करून बसतो तो आत्महत्यारा समजावा.

अरे अपरोक्षज्ञानजोंवरीनवर्ते।तोंवरीमिथ्यात्वें क्षीण केलींसमस्तें।तरीज्ञानजाहालिया बाधिती । केउतें कीं मेले विवेकादि
अथवा आणिक एक परिहार । सर्वांचा लय करोनि साचार । जीवन्मुक्तीचा सुखानुकार । कवणे भोगावा ॥५५॥
प्रजा अवघीच मारावी । तरी केवीं भोगिजे राज्यपद्वी । तैशी सर्व हे निःशेष लय पावावी । तरी जीवन्मुक्ति कवणा
आणि ज्ञान जाहलिया साधन नलगे । म्हणसी हेंचि मुळीं अयोग्य । देहबुद्धि जे बैसली अव्यंग । ते अभ्यासेंविण न मरे
वृत्तीसी अभ्यास देहबुद्धीचा । पडिला असे बहु कल्पांचा । ब्रह्म मी म्हणून घेतला जो साचा । भाव तो होपळ ॥५८॥
इतुकेनें कृतकृत्य मानोनी । बैसतां सर्व हें निरोधूनी । पुढें उत्थान पावतांचि क्षणीं । देहबुद्धि आधीं उठेल ॥५९॥
किंचित् भाव जो ब्रह्मास्मीचा । लय होवोनियां समूळ तयाचा । साभिमान उफाळेल देहाचा । अनावर पूर्ववत ॥४६०॥
म्हणसी उत्थान होईल कासया । तरी ऐसें न घडे कल्पीं कवणीया । उर्वरित प्रारब्ध भोगावया । व्यापारा येणेंचि लागे
तेव्हां हें सर्व सत्य प्रतिपादून । कर्म भोगील देहाभिमान घेऊन । जाहलें ज्ञान तें सर्व निमून । अज्ञानें बंधनीं पडे ॥६२॥
म्हणसी उत्थान पावतां क्षणीं । विवेक करावा मिथ्या म्हणोनी । तरी पुढें जो प्रवर्तसी विवेचनीं । तो आतांचि कां न करिती
निरोधून उत्थानीं जरी विवेचन केलं । तरी तें विचाराचेंचि फळ पावलें । निरोधानें अधिक काय जाहलें । अति कष्ट करोनी
तस्मात् सर्व हें असतां वृत्तीनें । खलून ब्रह्मबुद्धि वाढवणें । तरीच देहबुद्धि क्षीण होणें । येरव्हीं निरोधें नव्हे ॥ ६५ ॥
देहबुद्धि बळकट जैशी जाहली । तैशी ब्रह्मबुद्धि पाहिजे दृढ केली । हे होईल जरी चिरकाल वृत्ति खलिली । नुसध्या निरोधें नव्हे
अपरोक्षज्ञान जरी जाहलें । एकदां लयसाक्षी प्रतीती आलें । तरीही वृत्तीनें पाहिजे घोकिलें । दृढ आपरोक्ष व्हावया
दृढ अपरोक्ष तया म्हणावें । कीं त्रिधा परीही उत्थान न व्हावें । सत्यासी मिथ्यात्व न यावें । आणि मिथ्यात्वा सत्यत्व
देहाऐशी ब्रह्मात्मबुद्धि । दृढ व्हावी स्वप्नाहीमधीं । भलतैसा देह व्यापारो परी कधीं । अहंस्फूर्ति होऊं नये ॥ ६९ ॥
ऐसें दृढ अपरोक्ष होय तोंपर्यंत । दृढ अभ्यास पाहिजे स्मरणयुक्त म्हणोनि वृत्यादि हे अपेक्षिजेत । लयसाक्षित्व कळताही

---

अरे, जोंपर्यंत आत्मज्ञान नव्हतें, तोंपर्यंत सर्व मिथ्या समजून क्षीण केलीं, मग तें सर्व ज्ञान झाल्यावर कसें बाधा करील ! तें बाधा करूं लागलें तर विवेकादिक का मेले ?

याविषयीं दुसरा एक परिहार आहे. जर सर्वांचा लय करून बसलें तर जिवन्मुक्तीचें सुख कोणी भोगावें, सर्व प्रजा मारावी मग राज्य पद्वी कशी भोगावी, तशीं हीं सर्व लय पावावीं मग जीवन्मुक्ति कोणास प्राप्त होणार ? तूं म्हणतोस कीं, ज्ञान झाल्यावर साधनाची गरज नाहीं, हेंच तुझें बोलणें अयोग्य आहे. कारण देहबुद्धि जी अव्यंग बसली आहे, ती अभ्यासावांचून मरावयाची नाहीं. वृत्तीस पहिलाच देहबुद्धीचा बहु कल्पांचा अभ्यास आहे. आतां मी ब्रह्म म्हणून जो भाव घेतला तो व्यर्थ. कारण मी ब्रह्म मानणें हीच कृतकृत्यता मानून सर्वांचा निरोध करून बसलें असतां, पुढें उत्थान होतांच देहबुद्धि उठेल. मी ब्रह्म आहे हा जो किंचित् भाव त्याचा समूळ लय होऊन पूर्ववत् देहाचा साभिमान अनावर उफाळेल. तूं म्हणशील कीं, उत्थान कां होईल, तें व्हावयाचेंच नाहीं. तर बापा, असें कल्पांतीही कधीं घडावयाचें नाहीं. कारण ज्ञान झाल्यावर उर्वरीत प्रारब्ध आहे तें भोगण्याकरितां व्यापारास यावेंच लागेल. व्यापारास आला म्हणजे हें सर्व खरें आहे असें मानून देहाभिमान घेऊन कर्म भोगील मग झालेलें ज्ञान सर्व निष्फळ होऊन अज्ञानानें बंधनांत पडेल. तूं म्हणशील कीं, उत्थान झाल्याबरोबर हीं मिथ्या आहेत असा विवेक करावा. उत्थान झाल्यावर जो विवेक करणार तो आतांच कां करिनास निरोध करून उत्थान झाल्यावर जर विवेचन केलें, तर तें विचाराचेंच फळ प्राप्त झालें, असें समजलें पाहिजे. मग तूं जो अति कष्ट करून निरोध केलास, त्याचें अधिक फळ काय प्राप्त झालें ? कांहींच अधिक फळ प्राप्त होत नाहीं, म्हणून निरोध करूं नको. तर हें सर्व असतांच वृत्तीनें खलून ब्रह्मात्मबुद्धि वाढवावी. तेणेंकरून देहबुद्धि क्षीण होईल. एरव्हीं निरोधानें होणार नाहीं. जशी देहबुद्धि बळकट झाली आहे, तशी ब्रह्मात्मबुद्धि दृढ केली पाहिजे. ती ब्रह्मात्मबुद्धि वृत्तीचा चिरकाल खल केल्यानें होईल, नुसत्या निरोधानें होणार नाहीं.

अपरोक्ष ज्ञान जरी झालें, लयसाक्षित्व एकदां प्रतितीस आलें, तरी वृत्तीनें मी ब्रह्म, असें दृढ अपरोक्ष होण्याकरितां घोकिलें पाहिजे. तीन ठिकाणींही उत्थान होत नाहीं, त्यासच दृढापरोक्ष म्हणावें. पहिलें सत्यास मिथ्यत्व येऊ नये, दुसरें मिथ्यास सत्यत्व येऊं नये, तिसरें देहासारखी ब्रह्मात्मबुद्धि स्वप्नांतही दृढ व्हावी. देह भलतसा व्यापारो परंतु अहंस्फूर्ति उत्पन्न होऊं नये. याप्रमाणें दृढ अपरोक्ष होई तोंपर्यंत स्मरणयुक्त दृढ अभ्यास पाहिजे. हा अभ्यास करणें आहे तोंपर्यंत लयसाक्षित्व कळलें, तरी वृत्यादिकांची अपेक्षा आहे.

ऐसें असतां या वृत्त्यादिकांचें। लयसाक्षित्व कळतां काज नवचे । हेंचि बोलणें नव्हे ज्ञातयाचें । भ्रामक बोलावें ॥७१॥
अरे दृढापरोक्षही विज्ञान जाहलिया। सर्व अपेक्षिती वृत्त्यादिका या। श्रवण संवाद करोनि संत समुदाया। आनंदा पाववितो
साधक मुमुक्षुसीही उपदेश । करणें लागे अति सायास । तस्मात् ज्ञानोत्तरीं नलगे ऐसें फोस । बोलणें जाहलें ॥ ७३
वृत्त्यादिकांची अपेक्षा नलगे । ऐसें घडेना कवण्याही प्रसंगें । म्हणोनि हे असतांचि लागवेगें। मिथ्यात्व स्मरून असावें
मिथ्यात्वचि दृढ या सर्वांसी । आणि आपण तें नव्हेचि अविनाशी । स्वयें आत्मा ब्रह्म अखंडैकरसीं। हें स्मरण विसरूं चनये
येथेंही म्हणसी कीं स्वभावें । हें सर्व जरी पूर्ववतचि असावें । तरी कामादिक उठती आघवे । स्वतःसिद्ध विकल्प ॥ ७६
मनबुद्ध्यादि हे जीवंत असतां । विषयरूप देखेल समस्तां । तया विषयांचें चिंतन घडतां । काम हा संभवे ॥ ७७ ॥
कामाभावीं क्रोध उपजे । क्रोधें मोहसमुद्रीं बुडिजे । तेणें स्मृतिभंगातें पाविजे । स्मृतिभंग तोचि नाश ॥ ७८ ॥
ऐसा परंपरेनें घात होय । म्हणोनि विकल्प हा उपेगा न ये । ऐसा कवणासी जरी संशय । तरी अवधारा एकाग्र ॥७९
इतुका परंपरा अनर्थरूप । उद्भवून येईल जोंवरी संकल्प । तोंवरी विवेकादिकां येईल झोंप । कीं ब्रह्मात्मज्ञान लोपलें
अरे विषयचिंतनचि उद्भवतां । आधीं मिथ्यात्व स्मरेल तत्वतां। इकडे जन्मलाचि नाहीं भोक्ता। तरी इच्छी विषय कवण
इकडे भोक्ताही जन्मेना । तिकडे विषया सत्यत्व संभवेना।। तरी काम हा उद्भवून होय तरणा । हें कैसें घडेल ॥ ८२
इतुकाअवसरपडेलकैसा । कींविस्मरणहोईलजाहलियाअभ्यासा। तस्मात् भेद उठतांही जरी आभासा। स्मरे अहंब्रह्मम्हणोनी
मी स्वयें ब्रह्मात्मा पूर्ण । भोक्ता नोव्हेचि जीवत्वें आपण ।आणि हे दृश्यभास संपूर्ण । मिथ्यात्वें स्मरे झडकरी ॥ ८४ ॥
जयासी अभ्यासाची उणीवता। तयासी श्रुतिमाउली सांगे तत्वतां। कीं आमरण आसुप्ति न विसरतां । स्मृति सदृढ राखावी
किंचित्‌ही या कामादिकांसी । अवसर न द्यावा सत्यत्वबुद्धीसी। एकतान स्मरावें दिवानिशीं । ब्रह्म सत्य जग मिथ्या
हेंचि बोलणें बहुधा पुढें । असे तें कळेल साधका कोडें। कीं तच्चिंतनीं तत्कथनीं जो पवाडे । तया विस्मरण नव्हेल

---

असें असतां लयसाक्षित्व कळल्यावर वृत्त्यादिकांचें काम नाहीं, असें ज्ञाते बोलावयाचे नाहींत; तर भ्रामकच बोलतील. अरे, लयसाक्षित्व झाल्यावर वृत्त्यादिकांची अपेक्षा आहे हें म्हणणें तर काय, पण अपरोक्ष विज्ञान झालें तरीही सर्व वृत्ती शरीर इत्यादिकांची अपेक्षा करितात. आणि त्यांचे योगानें श्रवण संभाषण करून संतसमुदायास आनंद देतात. तसेंच साधक, मुमुक्षु यांस उपदेश करावा लागतो, तेव्हां ज्ञानोत्तर काळीं वृत्त्यादिकांची गरज नाहीं, असें जें मंदमतीचें बोलणें, तें व्यर्थ आहे. वृत्त्यादिकांची अपेक्षा नाहीं असें कधींही घडावयाचें नाहीं, म्हणून हीं असतांच यांचें मिथ्यत्व स्मरून असावें. या सर्वांस मिथ्यत्वच जाणून, आपण ते नाहीं, तर आपण अखंडैकरस आत्माच आहों, हें स्मरण विसरूं नये.

शंका–रविदत्ता, तूं म्हणशील कीं, हें सर्व पूर्ववत् असल्यानें स्वतःसिद्ध विकल्प जे कामादिक ते सर्व उत्पन्न होतील; मन बुद्धि जिवंत असल्यानें सर्वांस विषयरूपानें ग्रहण करील; पुढें त्या विषयांचें चिंतन होऊं लागले म्हणजे काम उत्पन्न होईल; अपूर्ण कामानें क्रोध उत्पन्न होईल; क्रोध उत्पन्न झाल्यानें तो मोहांत पाडील; मोहांत पडलें असतां स्मृतिभंग होईल; स्मृतिभंग तोच नाश. याप्रमाणें परंपरेनें घात होईल, म्हणून हा विकल्प उपयोगीं नाहीं.

उत्तर–वर सांगितलेल्या परंपरेनें अनर्थरूप संकल्प उत्पन्न होऊन जों येई, तोंपर्यंत विवेकादिकांस, झोंप का लागेल, आणि ब्रह्मात्म ज्ञान जें दृढ होत आहे तें का लोपेल ? अरे, ब्रह्मात्मज्ञान झालें आहे तर विषयचिंतन होऊं लागलें असतां आधीं त्याचें मिथ्यत्व स्मरेल. याप्रमाणें स्मरण झाल्यावर विषयभोक्ताच उत्पन्न होणार नाहीं. तो उत्पन्न झाला नाहीं तर मग विषयांची इच्छा कोण करील ? याप्रमाणें इकडे भोक्ता जन्मला नाहीं, व तिकडे विषयांस सत्यत्व संभवत नाहीं, मग काम उत्पन्न होऊन तो अनर्थ करील असें कसें होईल ? झालेल्या अभ्यासाचें विस्मरण होऊन काम अनर्थ करील, इतकी अवधी कोठून मिळेल ? भेद उत्पन्न झाला तरी सर्व मी ब्रह्म आहे, असें स्मरण होईल. मी स्वतः ब्रह्मात्मा आहे असें जेथें स्मरण आहे, तेथें तो जीवत्वानें आपण भोक्ता कसा होईल ? त्यास सर्व दृश्यभास मिथ्या आहेत असें आठवेल. ज्याला अभ्यासाची उणीव आहे, त्यास श्रुति सांगते कीं, आमरण आसुप्ती न विसरतां स्मरण दृढ राखावें. या कामादिकांस किंचित्‌ही उद्भव व्यास अवकाश देऊं नये. म्हणजे त्यांचें सत्यत्व बुद्धीस होऊं नये, तर रात्रंदिवस एकतानें ब्रह्म, सत्य. जग, मिथ्या. असें स्मरावें. हेंच पुढें सांगणें आहे, तें जेव्हां सांगूं, तेव्हां साधकास कळेल कीं, तच्चिंतनीं तत्कथनीं जो पहुडेल त्यास विस्मरण होणार नाहीं.

प्रस्तुत येथें स्मरण राखावें । स्फूर्तीपर्यंत मिथ्यात्वें पहावें । स्मरणमात्र असतां निरोधावें । नलगे सविकल्पा ॥ ८८ ॥
सविकल्प पूर्ववतही असतां । अभ्यासाची होतां दृढता । निर्विकल्पही असंप्रज्ञाता । समाधि प्राप्त होय ॥ ८९ ॥
केवळ सविकल्प रोधोनियां । पावेल असंप्रज्ञ समाधीसी तया । ऐसें नव्हे वृत्त्यादि सर्व असोनियां । निर्विकल्पता प्रगटे
परी अभ्यास मात्र केला पाहिजे । तरी असंप्रज्ञातता लाहिजे । तेही सविकल्प समाधीचे व्याजें । घडेल निःसंशय ९१
तेचि आधीं सविकल्प संप्रज्ञ । समाधीसी नाम जें सज्ञ । निरोपिजेल यथारीतीं मान्य । जें सर्व ज्ञातयां ॥ ९२ ॥
सविकल्प समाधीचीं हीं लक्षणें । दोन असती ते वोळखणें । एक दृश्यानुविद्ध साधका बाणे । दुजा शब्दानुविद्ध ९३
दृश्यानुविद्ध आधीं अवधारा । जो अभ्यास पाववीतसे त्वरा । अचुक निर्विकल्पत्वा एकसरा । चंचलत्वा उरों नेदी ९४
येथेंही शंका मानील कोणी । कीं चंचलत्व मुळीं सविकल्पालागोनी । तयाचीं लक्षणें हे असतां दोनी । तरी तेही चंचळरूप
ऐशिया चंचळ समाधियोगें । निर्विकल्प केवीं होय अंगें । ऐसें मानील कोणी प्रसंगें । तरी याचें उत्तर देऊं ॥ ९६ ॥
जैसा शरें शर निरोधावा । मृगेंचि मृगही आकळावा । अथवा कांट्यानें कांटा फेडावा । कीं मोडावा शब्दें शब्द ॥९७
तैसाचि सविकल्प सविकल्पासी । मोडून दोनी निमती अपैसी । पुढें उरेल जें कां एकरसीं । तें निर्विकल्प असंप्रज्ञ ९
तस्मात् सविकल्प समाधीसी । सविकल्प कल्पूं नये मानसीं । जें मेळवील निर्विकल्पासी । तें आधीं आदरावें ॥ ९९ ॥
दृश्यानुविद्ध तो असे कैसा । तो बोलिजेल यया रीतीं अभ्यासा । पुढें शब्दानुविद्ध असेल जैसा । निरोपितां कळेल ४७००
हा दृश्यानुविद्ध समाधि ध्यावया । नलगे एकांत आसनादि तया । जें जें दिसेल तें तें पहावें क्रिया । सर्व देहाचि होत्साता
सर्व मिथ्या हें पूर्वींच कळलें । विवेचनें नामरूप विसर्जिलें । जैसे सर्प रज्जुवरी नाहींच जहाले । होतें तें गेलें दीपें २
तैसे नसून वाउगें अज्ञानें । कल्पिलें होतें रूपनामाभिधानें । तें यथार्थ सत्यस्वरूपज्ञानें । निमालें सर्व ॥३॥
वृत्तीचा लय होऊन उर्वरित । जें परब्रह्म उरे सदोदित । जें सच्चिदानंद लक्षणें युक्त । यथार्थ कळलें ॥ ४ ॥
त्रिकाळीं कदापि नासेना । तें सद्रूप असे पूर्णपणा । तें असे परी सहसा दिसेना । घेववेना या जडा ॥ ५ ॥
परंतु लयाचा जो जाणता असे । तो असे म्हणोनि जाणतसे । परी तो वृत्त्यादिकासी न गवसे । अदृश्य म्हणोनि ६

---

प्रस्तुत येथें स्मरण राखावें. देहापासून स्फूर्तिपर्यंत सर्वांस मिथ्यत्वानें पहावें. याप्रमाणें स्मरण असलें म्हणजे सविकल्प निरोधावयाची गरज नाहीं. सविकल्पता पूर्ववत् असली तरी अभ्यासाची जर दृढता झाली आहे, तर निर्विकल्प असंप्रज्ञाता समाधि प्राप्त होईल. केवळ सविकल्प निरोधून असंप्रज्ञ समाधीस पावेल, असें कधींच घडावयाचें नाहीं. म्हणून वृत्त्यादि सर्व असून निर्विकल्पता प्रगटते. पण वर सांगितल्याप्रमाणें अभ्यास मात्र केला पाहिजे. तरच असंप्रज्ञता प्राप्त होईल. तीही सविकल्प समाधीचे निमित्तानें घडेल. करितां तीच सविकल्प संप्रज्ञ समाधि ज्ञात्यांस ज्याप्रमाणें मान्य आहे तशीच सांगूं.

## सविकल्प समाधीचे प्रकार.

१ शब्दानुविद्ध २ दृश्यानुविद्ध असे दोन प्रकार सविकल्प समाधीचे आहेत. त्यांत जो चंचलत्वास उरूं न देतां अचुक निर्विकल्पास पाववितो असा जो दृश्यानुविद्ध समाधीचा अभ्यास तोच प्रथम सांगतों.

शंका—सविकल्प हें स्वतः चंचल आहे. त्याचेच हे शब्दानुविद्ध व दृश्यानुविद्ध असे दोन प्रकार आहेत, हेंही चंचलरूपच. अशा चंचल समाधीयोगानें निर्विकल्प कसें होईल, असें कोणी मानील, तर याचें उत्तर ऐका.

उत्तर—जसा बाणानें बाण निरोधावा, मृगानें मृग आकळावा, अथवा कांट्यानें कांटा काढावा किंवा शब्दानें शब्द छेदावा. तसा सविकल्प सविकल्पास मोडून दोन्ही आपाप मावळतात. पुढें जें उरेल तें निर्विकल्प असंप्रज्ञ. याप्रमाणें निर्विकल्प असंप्रज्ञ प्राप्त होतें, म्हणून सविकल्प समाधीस ती सविकल्प आहे असें म्हणूं नये, तर जी निर्विकल्पास प्राप्त करून देईल तीच आधीं स्वीकारावी. आतां दृश्यानुविद्ध समाधी सांगतों.

हा दृश्यानुविद्ध समाधी ध्यावयास एकांत, आसनादि साधनें नकोत. तर देहाची क्रिया होत असतां जें जें दिसेल तें तें पहावें सर्व मिथ्या हें पूर्वींच कळलेलें आहे. पुढें विवेचनानें नामरूप विसाजले आहेच. जसा सर्प, रज्जूवर झालाच नाहीं, जो भास वाटत होता तो दीपानें गेला; तसें नसून अज्ञानानें नामरूपें वाउगीं कल्पिलीं तीं यथार्थ सत्यस्वरूप ज्ञानानें निमालीं. वृत्तीचा लय होऊन उर्वरीत जें सदोदित परब्रह्म उरतें, तेंच सच्चिदानंद असें यथार्थ कळलें. जें त्रिकाळीं नासत नाहीं तें सद्रूप. तें आहे, पण सहसा दिसत नाहीं व या जडास घेववत नाहीं, पण लयाचा जो जाणता, तो आहे; म्हणूनच जाणतो; पण तो वृत्यादिकांस सांपडत नाहीं. कारण अदृश्य आहे.

एवं आहेपणें स्वतःसिद्ध सद्रूप । लय जाणणें तेंचि चिद्रूप । तेंहि कळलें नाहीं यया अल्प । तेंचि ज्ञाणें सर्वां ॥७॥
तैसाचि आनंदरूपही सदोदित । परी तें सुख न घेववे किंचित । ग्रहणकर्तेंचि जड अशाश्वत । तरी न घेतां स्वतःसिद्ध
ऐसें सच्चिदानंद ब्रह्मलक्षण । वृत्तिअभावीं पूर्णपण । यथार्थ कळलें या नांव ज्ञान । जें मागां निरोपिलें ॥ ९ ॥
मग वृत्तीसहित सर्व उठतां । रूपचि नाहीं या आकारा समस्ता।नामें ठेविलीं व्यापाराकरितां । परी अद्यापि नाहीं जन्मलीं
आहेपणा तो सद्रूपाचा । दिसणेंपणा चिद्रूपाचा । प्रियपणा तो आनंदाचा । या तिहींविण यांत काय ॥ ११ ॥
तस्मात् नामरूपात्मक सर्व जग । जाहलेंचि नाहीं सर्वथा सोंग । आहे तें ब्रह्मचि अभंग । ऐसें सर्वपण विवेचिलें १२
मिथ्या म्हणिजे जाहलेंचि नाहीं । नाहीं तें नसेचि कदापिही । आतां दिसतें म्हणून सहसाही । भावचि नुद्भवे ॥१३॥
ऐसा निश्चय दृढ मिथ्यात्वाचा।निःसंशयपणें बाणला साचा।मग या ब्रह्मादि तृणांत दृश्याचा। दिसणेंपणा जो साधक
तें दिसेना हा सर्वथा पाहे । कारण कीं अमुकशी भावनाचि न लाहे । आहे तें सच्चिदानंद ब्रह्म आहे । नामरूपेंविण
एवं दृश्यही पाहत असतां । नामरूपें उद्भवतीना तत्त्वतां । हाचि दृश्यानुविद्ध समाधि पाहतां । असे एकरूप ॥१६॥
कीटकही दृष्टीपुढें आलें । तरी सच्चिदानंदत्वें घेतलें । अथवा ब्रह्मा विष्णु शिवादि भेटले । तेही तद्रूपेंची ॥ १७ ॥
कीटक म्हणोनि सानसा भाव । विष्णु म्हणोनि महान् अपूर्व । हा उत्पन्नचि नाहीं कदा गौरव । स्वयमेव सच्चिदानंद
मुळींच समष्टिरूप सर्व जग । मृगजळवत् सर्वही सोंग । त्यांतील मासोळे सान थोर भाग । शिवकीटकादि ॥१९॥
जो जग मृगजळा सत्यत्व देखेना । तो त्यांतील मासोळिया सानथोरपणा । देखेल कैसा सत्यत्वें नाना । नामरूपांसी
एवं विष्णु तैसाचि कीटक । आकाश तैसेंचि तृणही एक । जरी दृष्टीसी पडतांही अनेक । परी सच्चिदानंद ब्रह्म २१
सर्वपणा सहसा उमसेना । सर्वही दिसतां पदार्थ नाना । हाचि दृश्यानुविद्ध समाधि पूर्णा । ज्ञातयासी ज्ञानोत्तरीं २२
तस्मात् साधकें ऐसा योग । समाधीचा घ्यावा निजांग । ऐसा एकरूप न राहतां लाग वेग । हळूहळू अभ्यासावा २३
कदाचित नामरूपाची भावना । होती जाहली अंतःकरणा । तरी तत्क्षणींच विवेचना । पुनःपुन्हां करावी ॥ २४ ॥
नामरूप भासतांचि त्यागावें । सच्चिदानंदत्व सर्व स्थापावें । दिसेल तें तें सहज पहावें । आग्रहही टाकोनी ॥४७२५॥

---

याप्रमाणें आहेपणानें आहे तें सद्रूप, जें लय जाणतें तेंच चिद्रूप, तेंच आनंदरूप आहे. तें सुखग्रहणकर्ते जड असल्यामुळें त्यास घेववत नाहीं. असें सच्चिदानंद ब्रह्मलक्षण वृत्तीअभावी आहे. असें यथार्थ कळलें, हेंच ज्ञान. हें ज्ञान मागें सांगितलेंच आहे. याप्रमाणें ज्ञान असून मग वृत्तीसहित सर्व उरलें, तरी त्या आकारास रूपच नाहीं असें समजावें. त्यास व्यापाराकरितां नांवें ठेविलीं आहेत, तीं अद्याप जन्मलींच नाहींत. तेव्हां आतां जो आहेपणा राहिला, तो सद्रूपाचा आहे. दिसणेंपणा जो उरला तो चिद्रूपाचा आहे. प्रियपणा तो आनंदाचा आहे. तेव्हां या तीहींवांचून यांत काय उरलें आहे? कांहींच उरलें नाहीं. म्हणून नामरूपात्मक जग झालेंच नाहीं, आहे तें ब्रह्म. याप्रमाणें सर्वपणाचें विवेचन झालें. मिथ्या म्हणजे झालेंच नाहीं. नाहीं तें कधींही नाहींच. मग दिसतें, असा भास सहसा उद्भवूं नये, असा मिथ्यत्वाचा दृढ निश्चय बाणला. मग या ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत सर्व दृश्याचा जो दिसणेंपणा तो साधकास दिसेना व तो पाहीना; जरी तो पहात असला तरी पहात नाहीं असेंच समजावें. कारण त्यास हें अमुक अशी भावनाच होत नाहीं. तर जें आहे तें सर्व सच्चिदानंद ब्रह्म नामरूपावांचून आहे. याप्रमाणें दृश्य पहात असतां नामरूप उद्भवत नाहीं, हाच दृश्यानुविद्ध सर्व पहात असतां एकरूप समाधी आहे.

किडा दृष्टीस दिसला, तरी तो सच्चिदानंदरूपच समजून पहाणें; त्याचप्रमाणें ब्रह्मा विष्णु शंकर हे देव दिसले तरी तेही सच्चिदानंदरूप पहाणें. त्याचे ठिकाणीं किडा हा प्राणी नीच, विष्णु आदिकरून देव श्रेष्ठ, असा लहान मोठा भाव उत्पन्न होत नाहीं; तर तो सर्वांस सच्चिदानंदरूपच पहातो. मुळींच समष्टीरूप सर्व जग, सर्वही मृगजलवत् सोंग आहे, त्या मृगजलांतील लहान मोठे मासोळे शिव कीटक इत्यादि आहेत. जो मृगजल जलास खरें मानीत नाहीं, तो त्यांतील मासोळ्यांचा लहानमोठेपणा व नामरूपादि नानात्व भाव सत्यत्वानें कसा पाहील? एवं विष्णु तसाच कीटक, आकाश तसेंच तृण, याप्रमाणें नानाप्रकारचे पदार्थ दृष्टीस पडले तरी लहानमोठेपणाचा किंवा नामरूपाचा भाव किंवा सर्वपणा उत्पन्न न होतां ज्यास ते सर्व सच्चिदानंद ब्रह्मच आहेत; हाच ज्ञान्यास ज्ञानोत्तरीं दृश्यानुविद्ध समाधी आहे. म्हणून साधकानें अशा समाधीचा योग घ्यावा. हा त्वरीत एकरूप होणार नाहीं, म्हणून हळूहळू अभ्यासावा. नामरूपाची भावना अंतःकरणास झाली, तर तत्क्षणीं पुनःपुन्हा विवेचन करावें. आणि नामरूप भासलें, तरी तें त्यागावें आणि सर्वांस सच्चिदानंदत्व स्थापावें. आणि पहाण्या न पहाण्याचा आग्रह टाकून जें दिसेल तें सहज पहावें.

स्थावर कीं जंगम ह्मणूं नये । जड कीं चेतन असतां उभय । एक सच्चिदानंद ब्रह्म अद्वय । नामरूप नाहींच ॥२६॥
देव दैत्य किंवा दानव । पशू पक्षी कीं मानव । एक सच्चिदानंद स्वयमेव । दुजा भाव नाहीं ॥२७॥
ऐसें दृश्य पाहतां सानथोर । त्यांतचि आपुलेंही शरीर । नामरूपाचा नाहींच विकार एक सच्चिदानंद ॥२८॥
सच्चिदानंद आपण एक । सर्व हे नाहींत नामरूपक । ऐसें दृश्य पाहतां निश्चयात्मक । ब्रह्मभावना अखंड ॥२९॥
हाचि दृश्यानुविद्ध समाधि । साधक जो अभ्यासें साधी । तयासी कवणे अवस्थे कधीं । एकांतचि सर्वदा ॥४७३०॥
तुझें माझें कीं तूं तो हा मी । तुमटेचि कदापि ऐशी उर्मी । सदां एकतान सुखधामीं । विश्रांति पावे ॥३१॥
ऐसा समाधि एकरूप निश्चिती । सहजींच होतसे ज्ञात्याप्रती । साधकें अभ्यासावा लागे वृत्ती । दृढ होतां एकरूप ३२
एवं दृश्यानुविद्ध समाधिप्रकार । सांगितला होत्साता व्यापार । याचि प्रकारें शब्दानुविद्ध साचार । तोही निरोपिजेल
शब्दानुविद्धासीही एकांत । बैसणें नको आसनीं निवांत । भलतैसा देह जरी वर्तत । तरी अभ्यास घडे ॥ ३४ ॥
अंतरीं उठे जे मूळस्फूर्ति । जये नामें सामान्यवृत्ति । आरंभीं दचकसी आठवाकृति । भलतेही प्रकारें ॥३५॥
भयरूप अथवा हर्षरूप । उगाचि आठव उठे निर्विकल्प । शब्द ऐकतां कीं देखतां रूप । उमटे अंतःकरणीं ॥ ३६ ॥
अथवा उगेंचि निवांत असतां । उगाचि आठव होय आंतौता । मनबुद्धीचाही उद्भव नसतां । सहजगती उठे ॥३७॥
हेचि जाणावी परा वाचा । सामान्य हेलावा अंतःकरणाचा । अमुकसा विकार नव्हेचि साचा । परी नुसधा आठव स्फुरे
पुढें किंचित उद्भवतां मन । पुरता संशय ना निश्चय पूर्ण । कांहीं न कळे अमुक म्हणून । परी भास होय ॥ ३९ ॥
तया नाम पश्यंती वाचा । कोमळरूप अंकुर मनाचा । परिणाम तरी होय अंतःकरणाचा । परी संशयही स्पष्ट नव्हे ४०
ते पश्यंती वाचा दुसरी । ओळखी पडे पाहतां अंतरीं । पुढें मध्यमा वाचा तो तिसरी । स्पष्ट कळे मननरूप ॥४१॥
अंतरीं कल्पना मननाची । संशय निश्चयात्मक मनबुद्धींची । स्वप्नाकारता जे अंतरींची । हेचि मध्यमा वाचा ॥४२॥
वैखरी तो स्पष्ट बोलणें । मातृकांचा उच्चार करणें । गुप्तभाव तो प्रगट होणें । अन्य अन्यासीही ॥ ४३ ॥

---

जड किंवा चेतन असतांनाहीं हें स्थावर आहे, हें जंगम आहे असा भाव मनांत न आणितां नामरूप नाहींच तर एक सच्चिदानंद आहे असें पहावें. देव दैत्य किंवा दानव पशु पक्षी किंवा मानव सर्वही एक सच्चिदानंद मी आहे, त्यावांचून दुसरा भावच नाहीं. याप्रमाणें लहान मोठें दृश्य पहात असतां त्यांत आपलेंही शरीर निराळें कांहीं आहे, असें न पहातां, एक सच्चिदानंद पहाणें. सर्वही नामरूपात्मक दृश्य पहात असतां त्यांचा सर्वपणा व नामरूपें हें कांहीं निराळें पहात नाहींच, तर एक आपण सच्चिदानंद आहों असें पहाण्यानें ब्रह्मभावना अखंड झाली हाच दृश्यानुविद्ध समाधि. हा समाधी जो साधक अभ्यासानें साधील त्यास कोणत्याही अवस्थेंत कधींही एकांत नाहीं असें व्हावयाचें नाहीं, तर त्याचा सर्वच एकांत. त्यास तुझें, माझें, मी, तूं, तो, हा, मी अशी उर्मीच उत्पन्न होत नाहीं; तर तो सदा एकतान सुखधामीं विश्रांति पावतो. असा एकरूपसमाधी ज्ञात्यास सहजच होतो साधकास त्याचा अभ्यास केला पाहिजे. त्याची वृत्ती दृढ झाली म्हणजे त्यासही हा एकरूपसमाधि होतो. याप्रमाणें व्यापार होत असतांही, दृश्यानुविद्ध समाधि कसा घडतो, तें सांगितलें. आतां शब्दानुविद्ध जो दुसरे प्रकारचा समाधी, तो सांगतों.

**शब्दानुविद्ध समाधि.**

या शब्दानुविद्ध समाधीस एकांत नको आसनादि साधनें नकोत. देह कसा जरी वागला तरी हा समाधी-अभ्यास घडतो. अंतरांत जी मूळ स्फूर्ति उठते, तिला सामान्यवृत्ति असें म्हणतात. तूं भलतेही प्रकारें आरंभीं आठवाकृति दचकतोस म्हणजे भयरूप अथवा हर्षरूप उगाच निर्विकल्प आठव उठतो, त्या योगानें शब्द ऐकला असतां किंवा रूप पाहिलें असतां तें अंतःकरणांत उमटतें, अथवा उगीच निवांत असतां उगाच आंत आठव होतो, त्या वेळेस केव्हां केव्हां मन बुद्धि हीं नसतात; असा जो सहजगति उठणारा आठव त्यास परा-वाचा म्हणतात. हा आठव अमुक प्रकारचा आहे हें न स्मरतां, अथवा त्या आठवांत दुसरें कांहीं न स्फुरतां जो सामान्य अंतःकरणाचा हेलावा तो नुसताच स्फुरतो. पुढें किंचित् मन उद्भवलें असतां पुरता संशय नाहीं व पुरता निश्चय नाहीं यामुळें हें अमुक असें कळत नाहीं, पण भास होतो, त्यास पश्यंति वाचा म्हणतात. हींत अंतःकरणाचा परिणाम जो मनाचा कोंवळा अंकूर आहे, ज्यास स्पष्ट संशयही होत नाहीं; पुढें मन स्पष्ट उद्भवून स्पष्टपणें मनन होऊं लागतें हीच मध्यमा वाचा. हींत अंतर्यामीं संशयात्मक कल्पना मनाची आहे व निश्चयात्मकता बुद्धीची आहे याप्रमाणें दोघां मिळून अंतरांत जी स्वप्नाकारता होते हीच मध्यमा वाचा. मातृकांचा उच्चार करून जें स्पष्ट बोलणें त्यास व एकाचा गुप्त भाव तो दुसऱ्यास प्रगट होई असें बोलणें हीच वैखरी वाचा.

एवं परा पश्यंती मध्यमा वैखरी । ऐशिया उमटती वाचा चत्वारी । इतुके ठायीं शब्द एक निर्धारी । बहुधा परी उमटे
वृत्तीपासूनि प्राणापर्यंत । तत्त्व सामग्री शब्द हा अपेक्षित । आणि स्थूलदेहीं यथायुक्त । पाहिजे उच्चारा ॥ ४५ ॥
ऐसा शब्दरूप हा व्यापार । चारी वाचांचाही गजर । बरा वाईट समान विकार । जीवभावनेनें होतसे ॥ ४६ ॥
मुखजिव्हायोगें प्रगट होय । तोचि श्रोत्रद्वारा अंतरीं जाय । उपेक्ष्य द्वेष्य किंवा प्रिय । भाव उठती अंतरीं ॥ ४७ ॥
ऐशिया शब्दाकारामाजीं । सच्चिदानंद ब्रह्म सहजीं । हे वाउगीचि कल्पना उमटली दुजी । नामरूपाची चंचलत्वें ४८
शब्दही एक उपलक्षणें । परी पाहणें स्पर्शणें वास घेणें । जिव्हेनें रसही चाखणें । आणि क्रिया कर्मेंद्रियांच्या ॥ ४९ ॥
एकेक व्यापारा पांच पांचे । तत्त्वें मिळतां होय येरव्हीं न वचे । तें मागां निरूपण जाहलें पंचीकृताचें । त्यारीती समजावें
ऐसे पंचतत्वांचे पांच व्यापार । एकेकाचे दोन दोन प्रकार । मिळून जितुका सूक्ष्माचा व्यवहार । स्थूळीं राहूनि होय ५१
तितुकीं तत्त्वें आणि शब्दादि विषय । आणि वचनादि जे क्रिया होय । इतुका हा चंचल समुदाय । सर्व मायाजनित ५२
माया जैशी नामरूपात्मक । तैसेंचि चंचळ तत्त्वही सकळिक । या सर्व तत्त्वांसी अधिष्ठान एक । सच्चिदानंद ब्रह्म ५३
आहेपणा सर्वांसी ब्रह्मींचा । चिद्रूपेंही ब्रह्माचि साचा । तयाविण प्रियपणा तरी कैंचा । असे नुसध्या नामरूपा ॥५४॥
मृद्गोळीं मृत्तिका व्यापली । तैशीच घट गाडगियांत आली । जैशीमायेंतअस्तिभाति प्रियता दाटली । तेवींचं बुद्ध्यादिकीं
मृद्गोळियाही मृत्तिकेविण । किमपीही रूप नसे भिन्न । तैसेंचि घट गाडगे संपूर्ण । या कार्यासीही रूप काय ॥५६॥
जैसें मायेसी नामरूप असेना । तैसाचि बुद्ध्यादिकां निस्तत्त्वपणा । अस्ति भाति प्रियत्वेंविण दिसेना । अमुक एक पदार्थ
हेंही निरूपण मागां जाहलें । सर्व हेंबुद्ध्यादिनिस्तत्वेंकोलें । उगेंचि नामातें मात्र भिन्नभिन्न ठेविलें । परी हें सच्चिदानंद ब्रह्म
या सर्वां शब्दादिकांमाजीं । अस्ति भाति प्रियरूप सहजीं । केवळ सच्चिदानंद ब्रह्मीं दुजीं । उद्भवतीना नामरूपें ॥५९॥
जैशी घटगाडगियांत मृत्तिका असे । केवळ मातींत घटादि नसे । अन्वय व्यतिरेक हे ऐसे । पाहतां नामरूप मिथ्या ६०
एवं चंचळ तत्त्वें शब्दादि सर्व । वाउगें भासलें जें रूपनांव । यांत सच्चिदानंद ब्रह्म स्वयमेव । पहाणें तो शब्दानुविद्ध ६१
कवणेही अवस्थेसी सहसा । व्यापारही होत्साता भलतैसा । उद्भवेचना नामरूप ठसा । एकरूप ब्रह्मात्मा ॥ ४७६२ ॥

परा, पश्यंति, मध्यमा, वैखरी अशा चार वाचा उमटतात. त्यांत शब्द उमटतो या शब्दास वृत्तीपासून प्राणापर्यंत सर्व तत्वसामग्रि व स्थूळदेह उच्चार करावयास लावतो. असा हा शब्दरूप व्यापार जो चारी वाचांचा गजर, ज्याचा बरावाईट किंवा समान विकार जीवभावनेनें होतो. जो शब्द, मुख व जीभ यांचेयोगानें प्रगट होतो तोच शब्द श्रोत्रद्वारानें अंतरांत जातो. मग त्यापासून अंतरांत उपेक्ष्य, द्वेष्य किंवा प्रिय हे भाव उठतात, अशा शब्दाकारामध्यें दुसरी नामरूपाची चंचलत्वानें उगीच कल्पना उठली. वास्तविक हींत सच्चिदानंद ब्रह्मावांचून दुसरें कांहीं नाहीं.

शब्द या उपलक्षणानें पंचतत्वांचे पांच व्यापार व एकेका व्यापाराचे दोन दोन प्रकार मिळून दहा प्रकारचा सूक्ष्म देहाचा व्यापार स्थूळांत राहून होतो. त्या सर्व क्रिया त्या क्रियांस लागणारीं तत्वें व शब्दादि पंचविषय इतका हा चंचळ समुदाय मायाजनीत आहे. माया जशी नामरूपात्मक आहे, तसेंच हा चंचल समुदाय नामरूपात्मक आहे. व या सर्व तत्वांस अधिष्ठान एक सच्चिदानंद ब्रह्म आहे. तें असे —सर्वांस आहेपणा ब्रह्माचा आहे, देखणेपणा ब्रह्माचाच आहे, तसेंच या नामरूपास प्रियपणाही ब्रह्माचाच आहे, मातीचे गोळ्यांत मातीच व्यापलेली आहे तशीच घटगाड्यांतही मातीच व्यापलेली आहे. त्याचप्रमाणें मायेंत अस्तिभातिप्रियता आहे ती या बुद्ध्यादि तत्वांत आलेली आहे. मातीचे गोळ्यास मातीवांचून जसें दुसरें रूप नाहीं, तसेंच त्या मातीचे गोळ्याचें कार्य जीं घटगाडगीं, त्यांस तरी मातीवांचून दुसरें रूप कोठून असणार, त्याचप्रमाणें मायेस अस्तिभातिप्रियत्वावांचून दुसरें कांहीं नसल्यामुळें नामरूपें नाहींत. तद्वत् तिचें कार्य जें बुद्धि आदिकरून तत्वें यांस तरी नामरूपें कोठून असतील ? कारण त्यांनही अस्तिभातिप्रिय हेंच संचललेलें आहे. त्यांवाचून तीं कोणतेच प्रकारें दिसत नाहींत. याप्रमाणें बुद्धिआदिकरून तत्वें फोस आहेत. असें मागें निरूपण झालेंच आहे. त्या फोस बुद्ध्यादिकांस उगीच भिन्न भिन्न नांवें ठेविलीं; वास्तविक तीं सच्चिदानंद ब्रह्मावांचून निराळीं नाहींत. त्या सच्चिदानंदावर नामरूपें हीं कल्पित आहेत. जसें घटगाड्यांत माती आहे, पण केवळ मातींत घटगाडगीं नाहींत. याप्रमाणें अन्वयव्यतिरेकानें पाहिलें असतां नामरूपें हीं मिथ्या आहेत; एवं चंचळ तत्वें शब्दादि सर्व जें वाउगें रूपनांव भासलें त्यांत सच्चिदानंद ब्रह्म आहे, असें पहाणें, हाच शब्दानुविद्ध समाध. या समाधीचा अभ्यास होत असतां कोणत्याही अवस्थेंत भलतसा व्यापार होत असतां नामरूप ठसा उद्भवत नाहीं, तर एकरूप ब्रह्मात्माच कळतो. आपण

आपण बोले किंवा ऐके । हुंगे चाखे स्पर्शे निकें । देखे कीं क्रियारूपीं अनेकें । नामरूपा न पाहे ॥ ६३ ॥
अथवा अन्याचें ऐकणें बोलणें। पाहणें चालणें वास घेणें। सर्व जितुकी क्रिया होणें। परी नामरूपा स्मरेना ॥ ६४ ॥
एकरूप सच्चिदानंद ब्रह्म । दुजा भेदचि नाहीं रूप कीं नाम । एकतान बोळखे आत्माराम । तूं मी हेंही नाठवे ॥ ६५
ऐसा निःसंशय ज्ञाता होऊनी । सहजगती एकरूप पूर्णपणीं । परी करणें लागे साधकालागुनी । स्मरण धरूनी सर्वदां
नामरूप कीं तूं मी हें उद्भवतां । माझें कीं संभवे द्वैतता । तत्क्षणीं विचारें सारोनि परता । अस्ति भाति प्रिय पहावें ॥६७॥
जो जो वृत्तीसी ध्यास लागे । अभ्यासपाटवाचे लागवेगें । नामरूप द्वैतचि नुमगे । देखे सच्चिदानंद ॥ ६८ ॥
आधींच लयसाक्षीचें ज्ञान । जाहलें विवेचनें अभ्यासेंकडून । त्याहीवरी वृत्तीचा खल होणें । तरी काय एक नव्हेल६९
पहिले पहिले अभ्यासितां । वारंवार उठेल हे विक्षेपता । पुढें पुढें अभ्यासपाटव होतां । मोडे विक्षेप ॥ ४७७० ॥
मग असो दृश्यानुविद्ध समाधि । किंवा शब्दानुविद्धाचा विधि । हा निश्चयचि वाढत जाय बुद्धि । नामरूपें क्षीण होती
सर्व दृश्य सान थोर न स्मरतां । अखंडएकरूप तेदृश्यानुविद्धता । शब्दादिचंचलकिमपिनाठवता । ब्रह्मरूप तो शब्दानुविद्ध
ऐसे प्रकार दोनी समाधींचे । अभ्यासावया सांगितले साचे । दृढ अभ्यास होतां कधीं नवचे । नामरूपाचा विक्षेप ७३
मूळपद्मीं प्रयत्नेंकडून बोलिलें निरोधावें बळें आपण । स्वतःसिद्ध बाधक जे विकल्प संपूर्ण । नुरतां किमपि ॥ ७४ ॥
अतिप्रयत्नतोचिहाअभ्यास । दृश्यानुविद्ध शब्दानुविद्ध वृत्तिध्यास । तेणें स्वतःसिद्ध बाधकरूप विकल्पास । घात निःशेष होय
मुख्य बाधक आपुलें विस्मरण । जें ब्रह्मात्मयाचें निःशेष अज्ञान । यया बीजें अन्यासी मी म्हणून । सदृढ बंधनीं पडे
मग हीं नामरूपें खरींचि जाहलीं । मी माझें कीं वाईट चांगुलीं । या साभिमानें कामादि बैसलीं । घरें बांधोनी ॥७७॥
एवं हेचि स्वतःसिद्ध विकल्प । निरोधी तरीच होय सुखरूप । परी हे निरोधितां न जाती अल्प । अज्ञान बीज असतां
तस्मात् अज्ञान जें आपुलें विस्मरण। निःशेषचि काढावें खांदून । हे जावया हेचि उपाय दोन । विचार किंवा अभ्यास

---

आपण बोलतो किंवा ऐकतो, हुंगतो, चाखतों, स्पर्श करितो, पहातो इत्यादि अनेक क्रिया करितो तरी तेथें नामरूप पहात नाहीं. तसेंच दुसऱ्याचें बोलणें, पहाणें, चालणें, वास घेणें इत्यादि सर्व क्रिया होत असल्या तरी जो नाम पास स्पर्शत नाहीं, म्हणजे ब्रह्मावांचून त्यास नामरूपादि दुसरा भेदच दिसत नाहीं; तो तूंमी हें न आठवितां एकतान आत्मारामच पहातो. याप्रमाणें ज्ञाता निःसंशय सहजगति एकरूप पूर्णपणें असतो परंतु साधकास स्मरण धरून अभ्यास करावा लागतो. नामरूप व मी तूं हें उद्भवलें असतां माझें तुझें हें द्वैत उत्पन्न होतें. द्वैत उत्पन्न होण्याबरोबर अस्तिभातिप्रिय हें आठवावें. वृत्तीला अभ्यासपाटव्यतेच्यायोगानें जो जो ध्यास लागतो त्या योगानें नामरूप द्वैत त्यास दिसत नाहीं, तर तो साधक ब्रह्मच पहातो. त्यास आधीं लयसाक्षीचें ज्ञान विवेचनानें व अभ्यासानें झालें. पुढें वृत्तीचा खल झाला मग काय होणार नाहीं. अभ्यासाचे आरंभीं वारंवार विक्षेपता उठेल. तो विक्षेप जसजसा अभ्यास दृढ होईल तसतसा मोडत जाईल. मग दृश्यानुविद्ध समाधि असो किंवा शब्दानुविद्ध समाधि असो. नामरूपें क्षीण होऊन बुद्धीस ब्रह्मनिश्चय वाढत जाईल. दृश्यानुविद्ध समाधी लहान-मोठें सर्व दृश्य न स्मरतां अखंड एकरूप असणें ती दृश्यानुविद्ध समाधि. व शब्दादि किंचितूही चंचलता न आठवितां ब्रह्मरूप जाणणें तो शब्दानुविद्ध समाधि. याप्रमाणें सविकल्पसमाधीचे दोन प्रकार, अभ्यास करण्याकरितां सांगितले. तो अभ्यास दृढ झाला असतां नामरूपाचा विक्षेप कधींही उत्पन्न होत नाहीं. मूळपद्मीं स्वतःसिद्ध बाधक जे विकल्प ते किमपीही न उरतां आपण बळें प्रयत्नानें निरोधावे असे सांगितलें. त्यांत अति प्रयत्न जो सांगितला तोच हा दृश्यानुविद्ध शब्दानुविद्ध समाधि अभ्यास. म्हणजे वृत्तीध्यास. त्या ध्यासाचे योगानें स्वतःसिद्ध बाधकरूप सविकल्पाचा घात निःशेष होतो.

आपलें विस्मरण हें मुख्य बाधक आहे. म्हणजे ब्रह्मात्म्याचें अज्ञान बाधक आहे. या अज्ञानानें अन्यास मी असें मानून सदृढ बंधनांत पडतो. मग त्यास हीं नामरूपें खरींच वाटतात. पुढें मी व माझें वाईट किंवा चांगलें या साभिमानानें कामादिक देहांत घरें करून बसले आहेत. व हेच स्वतः विकल्प निरोधावे, हे निरोधिशील तेव्हांच तूं सुखरूप होशील. पण हे विकल्प अज्ञान बीज आहे तोंपर्यंत निरोधिल्यानेंही जात नाहींत; म्हणून आपलें विस्मरणरूप जें अज्ञान तें निःशेष खणून काढावें. अज्ञान निःशेष जाण्यास हेच दोन उपाय आहेत. एक विचार व दुसरा अभ्यास.

विचारें लयसाक्षित्व जाणावें । अभ्यासें तेंचि आपण स्मरावें । सदृढ होतां विस्मरणचि नव्हे । मग अन्यां मी मी म्हण
मुळीं स्फूर्तीपासून या सर्वांसी । सत्यत्वचि नये या अभ्यासी । मीपणाचि नव्हे देहादिकांसी । आणि माझेपण न स्फुरे
तरी कामादि कैंचे उठती । अर्थात् स्वतःसिद्ध विकल्प निरोधती। निरोधन म्हणिजे लयचि पावती। अज्ञानबीजास
तस्मात् प्रयत्न तो हाचि असेएकांकीं विस्मरणाचिन पडावेंमनाक। येणें स्वतःसिद्ध विकल्पतकळिक। नासती हेंचि निरो
तया स्मरणरूप अभ्यासासी । नावें दोन समाधिरूपासी । एक तो दृश्यानुविद्ध । दुजियासी शब्दानुविद्ध बोलती
दृश्य पाहतां दृश्य न स्फुरावें । हें दृश्यानुविद्धाचें रूप जाणावें । यासी हेतु एक वैराग्य असावें । विवेकासहित ॥८
तया विवेकवैराग्येंकडून । नामरूपें उद्भवती आनान । अर्थात अस्ति भाति प्रिय दर्शन । दृढ होय दृश्यानुविद्ध ८
स्फूर्त्यादि चंचळ हे सर्व उठतां । हें मी आणि न यावी या सत्यता । मी यांत असून स्मरे यापरता । हा शब्दानु
यासीही हेतु एक उपरम । म्हणिजे सदा निश्चळ अहंब्रह्म । गगन जैसें एक प सम । वायूनेंही हालेना ॥८८॥
ऐसा या वृत्यादिकें आपण । ब्रह्मात्मा पावना चंचळपण । ऐशिया निश्चयासी नामाभिधान । उपरम बोलिजे ॥८
या उपरमेंकडून स्वतःसिद्ध । सदृढ होय हा शब्दानुविद्ध।शब्दादि उठनांही नानाविध । निश्चळ ब्रह्मात्म्या स्मरे ४५
एवं दृश्यानुविद्ध शब्दानुविद्ध दोन । वैराग्य उपरमें सदृढ होणें । मुख्य लयसाक्षिज्ञान प्रयोजन । वरी स्मरणरूप अभ
यारीतीं बाह्यव्यापारीं जागृतींत।स्मरणरूपअभ्यासघडे यथायुक्त।हेचि उभयरीतीं समाधि अंतरांत। साधकें अभ्यासावे
उगेंचि निवांत बैसतां क्षणीं । विकल्प उठती अंतरांतूनी । मनबुद्धियोगें ध्यास दृश्यपणीं । दिसती साचाऐसे ॥९
ते ध्यासरूपही विषय दिसतां । नामरूपें सारोनि परता । अस्ति भाति स्मरावें अखंडिता । हा दृश्यानुविद्ध ॥९४॥
कल्पित दृश्यामाजीं शब्दही उठे । आणि चंचलत्वही उमटे । या इतुक्या व्यापारामाजीं नेटें । स्मरावें अस्तिभाति
अथवा कल्पनाही नानापरी । मध्यमेपर्यंत उठती सारी । तत्क्षणीं ते सारोनि दुरी । अस्तिभातित्वें स्मरावें ॥९६॥

---

विचारानें लयसाक्षित्व जाणावें. आणि अभ्यासानें तेंच आपण स्मरावें. स्मरण सदृढ झाल्यावर विस्मरण होत नाहीं व अन्यास मी असें म्हणत नाहीं. मुळीं स्फूर्तिपासून सर्वांस सत्यत्व या अभ्यासानें येत नाहीं. तसेंच देहादिकांस मीपण येत नाहीं व माझेंपणही स्फुरत नाहीं मग कामादिक कोठून उठतील ? कामादिक उठले नाहीं म्हणजे अर्थातच स्वतःसिद्ध विकल्प निरोधिले जातात, म्हणजे त्यांचा अज्ञानासहित लय होतो. म्हणून प्रयत्न करा असें जे साधु सांगतात, कीं, कधींही मनास आपलें विस्मरण होऊं नये, त्या योगानें स्वतःसिद्ध विकल्प नाश पावतील हेंच त्यांचें निरोधन समजावें.

स्मरणरूप अभ्यास दोन नांवें–एक दृश्यानुविद्ध दुसरा शब्दानुविद्ध. दृश्य पहात असतां दृश्य स्फुरूं नये हें दृश्यानुविद्ध समाधीचें स्वरूप आहे. हें साधण्यास विवेकासह वैराग्य पाहिजे. विवेक वैराग्य असल्यानें अनेक प्रकारचीं नामरूपें उद्भवत नाहींत. तीं उद्भवलीं नाहींत म्हणजे सहजच अस्तिभातिप्रिय हीं ब्रह्मलक्षण दृश्यानुविद्धानें दृढ होतात. त्याचप्रमाणें स्फूर्तिपासून सर्व चंचळ उत्पन्न झालें असतां हें सत्य आहे व हेंच मी असें न स्मरतां आपण त्यांत असून मी यांहून निराळा आहें असें जाणणें हा शब्दानुविद्ध समाधि. हा समाधि साधण्यास, उपरम म्हणजे अहंब्रह्मास्मीची निश्चळता पाहिजे. वायूनें आकाश हालत नाहीं, तसें ब्रह्मात्मा जो अ तो वृत्यादि चंचळानें चंचळ होत नाहीं. याप्रमाणे उपरमानें शब्दानुविद्ध समाधि सदृढ होतो; म्हणजे प्रकारचे शब्द उठले तरी ते न स्मरतां ब्रह्मात्म्या स्मरतो. याप्रमाणें दृश्यानुविद्ध व शब्दानुविद्ध दोन समाधीचे प्रकार वैराग्य आणि उपरम सदृढ होतात.

साधकास प्रथम लयसाक्षि ज्ञानाची गरज आहे पुढें स्मरणरूप अभ्यास पाहिजे. वर सांगितल्याप्र यथायुक्त स्मरणरूप अभ्यास जागृतींत–बाह्य व्याप घडतो. हा अभ्यास ज्यांचे योगानें होतो तो दोन प्र रचा. समाधिअभ्यास साधकानें अभ्यासावा. तो अस उगाच निवांत बसलें असतां अंतरांतून विकल्प लागतात, पुढें त्यांचे ध्यास मनबुद्धि यांचे योगानें खर दृश्यासारखे दिसूं लागतात. याप्रमाणें ध्या विषय दिसले असतां त्यांचीं नामरूपें दूर सारून जो अस्ति, भाति, प्रिय आत्मा त्यास स्मरावें. दृश्यानुविद्ध समाधि. कल्पित दृश्यांत शब्द उत्पन्न हे व चंचलत्वही उत्पन्न होतें. त्या व्यापारांतही अस्ति प्रिय स्मरावें, अथवा परा वाचेपासून मध्यमेपर्यंत प्रकारच्या कल्पना उठतात, त्या दूर करून स्ति प्रिय जो आत्मा त्यास आठवावें.

तें तें नामरूप कीं चंचळपण । नाठवावें किमपि आपण । एकरूप ब्रह्मात्मयाचें स्मरण । या नांव शब्दानुविद्ध ॥९७॥
ऐसें अंतरी आणि बाहेरी । दृश्यानुविध्द शब्दानुविध्दाचे परी । अभ्यासें साधी जो साधक निर्धारी । तो निर्विकल्पाही पावे
जो समाधि निर्विकल्प असंप्रज्ञ । सर्वपणाचा लय होऊन पूर्ण । नोहीं घडे याचि अभ्यासेंकडून । अति सदृढ होतां ९९
परी आधीं सविकल्प दृढ व्हावा । अभ्यासें विकल्पचि नुद्भवावा । तस्मात् सविकल्पचि पुरता साधावा ।हरप्रयत्नें साधकें
दृश्यानुविद्ध शब्दानुविद्ध हेचि दोन । सविकल्प समाधीचें लक्षण।परी या दोहींपरता सविकल्प संप्रज्ञ । असे तो स्पष्ट करूं
वृत्ति होतां चिद्गनाकार । अनुभवीतसे ध्येयमात्र । लयही पावोनियां सत्वर । उठोनि चिद्गगनीं मिळे ॥२॥
हाचि सविकल्प समाधि थोर । ब्रह्मसुखें सुखी तदाकार । स्वानुभवी सामान्यवृत्ति गोचर । मागां निरोपिल्यापरी ३
तेथें सहज असतां तेंचि होऊनी ।सहजींच उठे अहंब्रह्म म्हणोनी । तो शब्द उद्गार उठतां क्षणीं । तया शब्दानुविद्ध नाम
तो शब्द नसतां सहज । सामान्यवृत्तीनें सुख घे अचोज । तोचि सविकल्प समाधि निज । रूपीं स्थिरावे ॥ ५ ॥
शब्देंविण ध्येयाकारता । सविकल्पची होतसे अनुभवितां । ध्यान भिन्न आाणि भिन्न नव्हे ध्याता । परी सुख घे सविकल्प
हा समाधि मुख्य सविकल्प । निर्विकल्पीं होऊनि निर्विकल्प। तेथें शब्द कीं दृश्य नस अल्प । म्हणोनि भिन्न दोहींहूनी
एवं शब्दानुविद्ध दृश्यानुविद्ध । तिसरा समाधिस विकल्प शुद्ध । या तिहींच अभ्यासें नामरूपें अशुद्ध। नुद्भवती कदा ८
देहही व्यापारो भलतैसा । किंवा सूक्ष्म देहाचा वळसा । परी नामरूपाचा नुमसे ठसा एकतान ब्रह्मात्मा ॥ ९ ॥
बाह्यव्यापारीं कीं निवांत स्थानीं । दुसरी ऊर्मीच नसे अंतःकरणीं । एकतान ब्रह्म चिद्घनीं । समरसे सदां ॥४८१०॥
ऐसा दृढ होय अखंडैकरसें । यया समाधिचे अभ्यासें । दुसरें किमपिही नसे पिसें । द्वैत नामरूपाचें ॥ ११ ॥
संकल्पही कदां रोधीना । दृश्यही परतें सारीना । एकरूप ब्रह्मात्मया अभिन्ना । त्यामाजींच पाहे ॥ १२ ॥
दृश्यामाजीं दृश्यभान नसे । शब्दांमाजीं शब्द हा नुमसे । आपणाचि ब्रह्मात्मा एकरसें । अवस्थे भलतेही ॥ १३ ॥
एवं सर्व असतां कीं मावळतां । ब्रह्मात्मयाची एकरूपता । दुजेपणाच किमपि न येतां । ऐक्यता सहज ॥ १४ ॥

---

जें जें नामरूप किंवा चंचळपण त्यास आपण न आठवितां एकरूप ब्रह्मात्म्यास स्मरणें यास शब्दानुविद्ध समाधि म्हणतात. याप्रमाणें अंतर-बाह्य दृश्यानुविद्ध व शब्दानुविद्ध समाधि जो साधक साधितो तो निर्विकल्पास पावतो. जो दोन प्रकारचा सविकल्प समाधि तो सदृढ झाला असतां सर्वपणाचा लय होऊन पूर्णपणें असणारा निर्विकल्प असंप्रज्ञसमाधि घडतो. सविकल्प समाधि सदृढ होण्याकरितां अभ्यासानें विकल्प उत्पन्न होऊं देतां कामा नये. सविकल्पानें निर्विकल्प समाधि साधतो, म्हणून साधकानें प्रयत्नानें हा सविकल्प समाधि पुरता साधावा. सविकल्प समाधीचीं दृश्यानुविद्ध आणि शब्दानुविद्ध अशीं दोन प्रकारचीं लक्षणें आहेत; परंतु या लक्षणांहूनही सविकल्प संप्रज्ञ आहे तो स्पष्ट करूं.

## सविकल्प समाधिप्रकार.

वृत्ति चिद्गगनाकार होते तेव्हां ती ध्येय मात्र अनुभविते. पुढें लय पावून चिद्गगनांत मिळते. हाच थोर सविकल्प समाधि. ब्रह्म सुखेंसुखी तदाकार स्वानुभवी सामान्य वृत्तिगोचर आहे, हा मार्गे सांगितलाच आहे. तेथें तेंच होऊन असतांना सहजच अहंब्रह्म असें स्मरण होतें. पुढें शब्दउद्गार झाला म्हणजे त्यास शब्दानुविद्ध म्हणतात. शब्द नसतां सामान्य वृत्तीनें सहज सुख घेतो तोच सविकल्प समाधि निजरूपीं स्थिरावतो. शब्दावांचून ध्येयाकारता सविकल्पच अनुभवितो, त्या वेळीं ध्यान व ध्याता निराळा न होतां सविकल्प सुख घेतो. हा मुख्य सविकल्प समाधि. हा निर्विकल्पीं निर्विकल्प होऊन रहातो. त्यांत शब्द किंवा दृश्य अल्प सुद्धां नसतें, म्हणून हा शब्दानुविद्ध व दृश्यानुविद्ध याहून निराळा आहे. याप्रमाणें शब्दानुविद्ध, दृश्यानुविद्ध तिसरा शुद्ध सविकल्प या तिहींचे अभ्यासानें नामरूपें कधींही उत्पन्न होत नाहींत. देह भलतैसा कसाही व्यापारो, तरी किंवा सूक्ष्म देह व्यवहार करीत असला, तरी नामरूप उत्पन्न होत नाहीं; तर एकतान ब्रह्मात्माच स्मरतो. याप्रमाणें बाह्य व्यापारांत किंवा निवांतस्थळीं अंतःकरणांत दुसरी उर्मीच नाहीं, तर एक ब्रह्मात्माच स्मरतो. असा हा या सविकल्प समाधी अभ्यासानें ब्रह्मात्मा दृढ होतो. हा ब्रह्मात्मा दृढ होण्यास संकल्पाचा रोध करावा लागत नाहीं, तसेंच दृश्य नाहींसें करावें लागत नाहीं; तर संकल्पांत किंवा दृश्यांत अभिन्नपणानें एक ब्रह्मात्माच पहातो. त्यामुळें दृश्यांत दृश्यभास नाहीं, शब्दांत शब्दत्व उत्पन्न होत नाहीं, तर भलतेही अवस्थेंत आपण ब्रह्मात्माच असतो. याप्रमाणें सर्व असतांना किंवा मावळतांना दुजेपणाचा भाव उत्पन्न न होतां, ब्रह्मात्म्याची एकरूप ऐक्यता सहजच आहे.

सर्व निरोधाचें जें फळ । ऐक्यरूपें निर्विकल्प केवळ । होत असे तें ऐका प्रांजळ । आणि प्रियकर ज्ञानिया ॥ १५ ॥

**ऐक्यं सर्व निरोधश्च समाधिर्योगिनां प्रियः ॥**
**तदशक्तौ क्षणं रुध्वा श्रध्दालु ब्रह्मतात्मनः ॥ १५ ॥**

सर्व पूर्ववत तैसेंचि असतां ।सर्व निरोधरूप पावे ऐक्यता।। हाचि समाधि प्रियकर तत्त्वतां । योगि शब्दें ज्ञानिया १६
येरव्हीं निग्रह करूनि जें रोधन । तो अप्रिय अर्थात ज्ञानियालागून।आणि नघडेचि कदा उपाधिअसून।येविशीं अशक्त सर्व
तस्मात क्षण एक रोधोनियां । लयसाक्षी पूर्ण जाणोनियां । आपुली ब्रह्मता सर्व असोनियां । दृढ करावी सर्वामाजीं
अभ्यासें सर्वदां वृत्ति खलावी । द्वैताचि ऊर्मिच नुठावी । आपुली ब्रह्मता दृढ करावी । श्रद्धावंत जो येणें ॥ १९ ॥
हाचि अर्थ जो संकलित । प्रांजळचि करूं यथायुक्त । असावें सावधान बहुत । श्रोतीं यया निरूपणीं ॥ ४८२० ॥

**ऐक्यं सर्व निरोधश्चेति ॥**

सर्व हें असतां ब्रह्मादि तृणांत। आणि स्फूर्ति आदि प्राणांत समस्त । परी नामरूपाचा जाहला घात । हाचि निरोधयाचा
निरोध म्हणिजे लयचि पाहीं । आधींच जें उत्पन्न जाहलें नाहीं । उद्भवलें जें नामरूप सर्वेही । ते रज्जुअहि निमाले
विचारें अस्तिभातिप्रियाविण ।नामरूप कधीं जाहलें उत्पन्न । जाहलें होतें जें अज्ञानेंकडून । तें ज्ञानेंचि नष्ट जाहलें
आहे तें ब्रह्म एकरूप । दिसे तें ब्रह्म चिद्रूप । प्रिय तें तें ब्रह्मचि निर्विकल्प । सविकल्प नाहीं नाहीं ॥ २४ ॥
नग घडिले कीं मोडिले । परी सुवर्ण एकरूप संचलें। दुजेपण केव्हां कधीं आलें । कल्पित नामरूपासी ॥ २५ ॥
तैसें ब्रह्मात्मत्वचि परिपूर्ण । नामरूप नाहींच जाहलें उत्पन्न । जरी वृत्त्यादि मावळती उठोन । परी अमुकसें नव्हे २६
पहिलेंचि आधीं जाहले नसती । वरी खलून दृढ केली वृत्ति । त्रिविधा समाधीचिये रीती । विस्मरण न होतां ॥ २७॥
जैसा पाहिला पडिला न होता । वृक्षस्थ वृक्षींच असे ऐता । त्यावरी समजून जाहलाघोकिता। मी पडिलों नाहीं म्हणूनी
तयासी मी पडिलों म्हणनि मागुति । कासया उत्पन्न होईल भ्रांति। मी वृक्षींच बैसलों हे प्रतीति । विसरे ना सहसा २९
तैसेंचि हें स्फूर्तिपासून सर्व जग। जाहलेंच नसे नाना सोंग। त्याहीवरी जाणूनि लयसाक्षि असंग । पुढें मिथ्यात्व दृढ केलें

सर्व निरोधाचें फळ ऐक्यरूपानें निर्विकल्पच आहे व तेंच ज्ञान्यास प्रियकर आहे, हेंच आतां प्रांजळपणें सांगतों.

सर्व पूर्ववत् तसेंच असून सर्व निरोधरूप ऐक्यता पावतो हाच समाधि योग्यास म्हणजे ज्ञान्यास प्रियकर आहे. या समाधीवांचून निग्रह करून निरोधन करणें अशा प्रकारचा जो समाधि तो ज्ञान्यास अप्रिय आहे. व हा समाधि उपाधि असतां घडत नाहीं. हा घडविण्याविषयीं कोणी समर्थ नाहीं, म्हणून सर्वकाळ निरोध करण्याची इच्छा न करितां क्षणभर रोध करून, लयसाक्षी पूर्णपणें जाणून, आपली ब्रह्मता सर्वांत सर्व असून दृढ करावी. अभ्यासानें नेहमीं वृत्ति खलावी. ती अशी कीं, द्वैताची उर्मीच उठणार नाहीं. याप्रमाणें आपली ब्रह्मता श्रद्धावंतानें दृढ करावी. हा संकलित अर्थ प्रांजळ यथायुक्त सागतों.

### वृत्तीच्या खलाचें वर्णन.

ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत तसेंच स्फूर्तीपासून प्राणापर्यंत हें सर्वही असलें तरी चालेल; पण नामरूपाचा घात झाला पाहिजे. हाच या सर्वांचा निरोध समजावा. निरोध म्हणजे लय, जें आधीं उत्पन्नच झालें नाहीं, पण उत्पन्न झालेंसें वाटतें, तें नामरूप रज्जुसर्पवत् निमालें; हाच निरोध. विचारानें पाहिलें असतां अस्तिभातिप्रियावांचून नामरूपें निराळीं कधीं उत्पन्न झालीं आहेत ? कधींच झालीं नाहींत. पण अज्ञानानें उत्पन्न झालीशीं वाटत होतीं, तीं ज्ञानानें नाहींशीं झालीं, मग जें आहे तें ब्रह्म सद्रूप. जें दिसतें तें ब्रह्म चिद्रूप. जें प्रिय तें ब्रह्म आनंदरूप. याप्रमाणें सर्व निर्विकल्प आहे. तेथें सविकल्प मुळींच नाहीं. नग घडलेले असोत किंवा मोडलेले असोत, पण सोनें हें सदोदित एकरूपच आहे. तसें एकरूप जें ब्रह्म त्यावर जें कल्पीत नामरूप त्यास दुजेपण कसें येईल ? दुजेपणा येत नाहीं म्हणूनच नामरूप झालें तरी एकरूप ब्रह्मच आहे. त्यावर वृत्तीआदिकरून उठली तरी तिला स्वरूप नाहीं, किंवा तिचियोगानें तें जाणलें जात नाहीं. वृत्तीआदिकरून नामरूपें अगोदर झालींच नाहींत. त्यांत वृत्ती खलून ती दृढ केली मग त्रिविधा समाधीचे योगानें विस्मरण नाहींसें होतें. जसें वृक्षस्थ तर पडला नाहींच, तो वृक्षावर होता तसाच आहे, तरी मी पडलों नाहीं हें घोकीत आहे, मग त्यास मी पडलों अशी भ्रांति कां उत्पन्न होईल ? ती भ्रांती तर उत्पन्न होणार नाहींच, पण मी वृक्षींच आहे हेंही तो सहसा विसरत नाहीं. त्याचप्रमाणें स्फूर्तीपासून हें सर्व जग नानाप्रकारें सोंग झालेंच नाहीं, तशांत लयसाक्षी जाणून सर्व जगाचें मिथ्यत्व दृढ केलें,

दृश्यानुविद्ध शब्दानुविद्ध । तिसरा सविकल्प समाधि शुद्ध । या अभ्यासें निरोधिलें अशुद्ध । नामरूप भेदात्मक ॥ ३१ ॥
मी हा देहादि आपण । आणि हें सत्य जग संपूर्ण । ऐशिये विक्षेपाचें उत्थान । होऊंच नाहीं दिधलें ॥ ३२ ॥
ऐसा अभ्यास समाधीचा । खलून दृढभाव केला वृत्तीचा । आपण ब्रह्मात्मा या सर्व जगाचा । सत्यमिथ्या प्रकार ३३
ऐशिया अभ्यासें स्वप्न आंत । मी असंग हें सर्व मिथ्याभूत । स्फुरूं लागलें अभ्यासरहित । मग जागरीं भेद कैंचा ३४
स्वतां परतां उत्थान राहिलें । भलते अवस्थे एकत्व संचलें । ऐसें समाधान दृढ बाणलें । या नांव समाधि ॥ ३५ ॥

## समाधियोंगिनां प्रिय इति ॥

हाचि एक पूर्ण समाधि । जे नामरूप नुद्भवती कधीं । हाचि योगियासि प्रियतर बुद्धि । भूत भावी वर्तमानीं ॥ ३६ ॥
नामरूपें स्वप्नीं उठतीना । असंग ब्रह्मात्मत्व पूर्णपणा । जागरीं तो अभ्यास क्षणक्षणा । वाढताचि आला ॥ ३७ ॥
इतुका निश्चय दृढ बाणला । कीं दुजा भाव नसे भलते अवस्थेला । संशय ब्रह्मांडाबाहेरी गेला । मूलाज्ञानासहित ३८
आतां स्फूर्ति उठोनि पसरो । कीं मनबुद्ध्यादि उभारो । अथवा निर्विकल्पीं जाऊनि विरो । परी समाधि अभंग ॥ ३९
मनबुद्धि अंतरीं विहारती । स्वप्नाभासातें उद्भविती । कीं इंद्रियद्वारा निघोनि क्रीडती । परी समाधि अभंग ॥ ४८४० ॥
अलभ्य विषयांची प्राप्तता । भोग घडो इंद्रियां समस्तां । अथवा न घडो बुडो हे वार्ता । परी समाधि अभंग ॥ ४१ ॥
निचेष्टित किंवा चेष्टतो । उपवासी किंवा बहु खातो । बोलतो कीं मौनें पाहतो । परी समाधि अभंग ॥ ४२ ॥
समुदायीं किंवा एकला । चालतो किंवा उगाच बैसला । हांसतो कीं शिव्या दे भलत्याला । परी समाधि अभंग ॥४३॥
समाधिस्थ किंवा देवतार्चनीं । श्रवणीं पठणीं कीं निरोपणीं । अथवा जडपडे कीं पळे उठोनी । परी समाधि अभंग
बहु कासयासी बोलावें । जे जे तयाचे प्रारब्धें घडावे । ते तेही सुखदुःखभोग भोगावे । परी समाधि अभंग ॥ ४५ ॥
हें असो दुजे तयालागीं । पूजिती कीं गांजिती प्रसंगीं । स्तविती कीं निंदिती लागवेगीं । परी समाधि अभंग ॥ ४६ ॥
हाही तया निंदी कीं स्तवी । दूरी धरी कीं सलगी करी सर्वी । हे आपुले हे परकी जरी म्हणवी । परी समाधि अभंग

---

दृश्यानुविद्ध शब्दानुविद्ध तिसरा शुद्ध सविकल्प, या तीनप्रकारच्या सविकल्प समाधि अभ्यासानें भेदात्मक नामरूपें निरोधिलीं, म्हणजे देहादि हा मी, आणि हें जग सत्य, असा विक्षेप उत्पन्नच होऊं दिला नाहीं. याप्रमाणें समाधीचा अभ्यास खलून वृत्तीचा दृढ भाव केला कीं आपण ब्रह्मात्मा एक आहे; त्या मजखेरीज सर्व जग मिथ्या आहे. असा भाव स्वप्नांतसुद्धां मी असंग परमात्मा व मजहून जग जें मानणें तें मिथ्याभूत असें स्फुरूं लागलें; मग जागृतींत भेद कोठून राहील? त्यास स्वतःखेरीज दुसरें उत्थानच नाहीं. याप्रमाणें भलतेही अवस्थेंत एकत्व संचलेलें आहे असें समाधान दृढ बाणलें यालाच समाधि म्हणतात.

ज्यांत नामरूपें कधींही उत्पन्न होत नाहींत, हाच एक पूर्ण समाधि. हाच ज्ञान्यास प्रियतर आहे व योगी जे तिन्हीकालचे त्यांसही हाच प्रियतर आहे. एक ब्रह्मात्म्यावांचून दुसरी स्वप्नांतसुद्धां उत्पन्न होत नाहीं. मग जागृतींत कशीं उत्पन्न होतील? तेथें क्षणक्षण अभ्यास वाढतच गेलेला आहे. इतका निश्चय दृढ बाणला कीं, भलतेही अवस्थेंत ब्रह्मावांचून दुसरा भाव नाहीं. याप्रमाणें मूलअज्ञानासहित संशय ब्रह्मांडाबाहेर गेला.

१ आतां स्फूर्ति उठून पसरो किंवा मनबुद्धि उत्पन्न होवो किंवा तीं निर्विकल्पांत जाऊन विरोत परंतु समाधि अभंग.

२ मन बुद्धि अंतरांत विहारोत, स्वप्नाभासास उत्पन्न करोत, किंवा इंद्रियद्वारानें बाहेर येऊन विषयांत क्रिडा करोत परंतु समाधि अभंग.

३ अलभ्य विषय प्राप्त होऊन सर्व इंद्रियांस भोग घडो, अथवा तो भोग नाहींसा होवो पण समाधि अभंग.

४ वर सांगितलेल्या लक्षणाचा योगी निचेष्टित पडो, किंवा व्यापार करो, उपवाशी राहो, किंवा बहु खावो, बोलत असो, किंवा मुका राहो पण समाधि अभंग.

५ तो योगी समुदायांत असो, किंवा एकटा असो, चालत असो, किंवा उगाच बसो, हंसो, किंवा भलत्याला शिव्या देवो पण समाधि अभंग.

६ तो योगी समाधिस्थ असो, किंवा देवतार्चन करीत असो, किंवा श्रवण, पठण, निरूपण करीत असो, अथवा जड होऊन पडो, किंवा पळून जावो पण समाधि अभंग.

७ फार काय सांगूं, त्या योग्याचे प्रारब्धानें जें जें घडावयाचें तें तें घडो व त्यायोगानें सुखदुःख भोगो पण समाधि अभंग.

८ त्या योग्यास कोणी पुजोत, किंवा प्रसंगीं गांजोत, स्तवोत, किंवा त्याची निंदा करोत पण समाधि अभंग.

९ हा योगी लोकांची निंदा किंवा स्तुति करो, त्यांस दूर धरो, किंवा त्याशीं सलगी करो, हे आपले. हे परकी, असें मानो पण समाधि अभंग.

एकें राज्यपदीं राजा बैसतां । येर राजचिन्हें बाणती अप्रयत्नता । तैसें यथार्थ ज्ञान दृढतर होतां । आपैसा वोळगति चिन्हें
सहजस्थिति जीवन्मुक्ति । विदेहस्थिति अलिप्त स्थिति । संप्रज्ञ असंप्रज्ञ समाधि म्हणती । हीं सर्वेही चिन्हें ॥ ८३ ॥
हीं चिन्हें देह आहे तंवचिवरी । म्हणोनि देह संबंधचि हा निर्धारी । नातरी केवळ निर्विकारीं । अमुक म्हणून कौणतें ८४
असो सहजस्थिति प्राप्त होतां । संप्रज्ञ असंप्रज्ञ येती त्या आंतौता । तेचि अल्पसे निवडोनि आतां । कळावया निरोपूं
उठे कीं निमे जरी संकल्प । परी नामरूप न स्फुरे कदा अल्प । एकरूप ब्रह्मात्मा सच्चिद्रूप । भलतेही अवस्थे ॥ ८६ ॥
नामरूप कीं किंचित् भेदभान । न होणें या नांव सर्व निरोधन । सर्वीं एकरूप हेंचि ऐक्यपण । हेंचि फल निरोधाचें ८७
मुख्य हेचि सहजस्थिति । कीं भेदाची किंचित् न व्हावी स्फूर्ति । परी संप्रज्ञासी आठवे सच्चिन्मूर्ति । ब्रह्मास्मि सामान्यत्त्वें
नामरूपभेद न स्फुरतां । ब्रह्मात्मत्वाचि प्रतिति घेतां । तयासी नांव सविकल्प संप्रज्ञता । समाधि समाधान ॥ ८९ ॥
तोही ब्रह्म प्रतीतीचा अनुभव । ग्रासोनियां उरे स्वयमेव । तयासी असंप्रज्ञ निर्विकल्प नांव । बोलिजेत असे ॥४८९०॥
नामरूपभेदभान न स्फुरावें । हें तों उभयांचें समानचि जाणावें । परी ब्रह्मसुख प्रत्ययें स्फुरावें । संप्रज्ञामाजीं ॥ ९१ ॥
असंप्रज्ञ समाधि आंतौता । ब्रह्मसुखही न स्फुरे तत्त्वतां । इतुकाचि भेद यया उभयतां । असे म्हणोनि दोन ॥ ९२ ॥
नामरूपें दोहींसी न स्फुरती । येथें भेद नसे संप्रज्ञाप्रति । संप्रज्ञसमाधीसी ब्रह्मस्फूर्ति । तेही न स्फुरे तो असंप्रज्ञ ९३
येरव्हीं निरोध नको जेवीं सविकल्पा । तेवींच नलगे रोधावें निर्विकल्पा । वृत्ति आभ्यासें नुद्भव नामरूपा । तेवीं घडे ययासी
सविकल्पीं ब्रह्मास्मि स्फूर्ति स्फुरे । ते प्रतीति निर्विकल्पीं वोसरे । एकलें एकरूप अद्वय निर्धारें । हा असंप्रज्ञ समाधि ९५
वृत्ति उद्भवली किंवा निमाली । हे वार्ताचि स्मृतीची बुडाली । परी स्वकीय ब्रह्मताही नाहीं स्फुरली । हा असंप्रज्ञ समाधि
मनबुद्धीचें संकल्प होती । न जाणोचि अमुक एक रीति । परी हे ब्रह्म कीं नेणें विकृति । हा असंप्रज्ञ समाधि ॥ ९७ ॥
मनादि इंद्रियद्वारा निघोन । विषय घेती पूर्ववत संपूर्ण । परी हें ब्रह्म कीं जग नुद्भवे भान । हा असंप्रज्ञ समाधि ॥ ९८

---

राजा एकदां राज्यपदीं बसला असतां त्यास राजचिन्हें प्रयत्नावांचून बाणतात. तसें यथार्थ ज्ञान दृढतर झालें असतां चिन्हें आपाप वोळगतात. सहजस्थिति, जिवन्मुक्ति, विदेहस्थिति, अलिप्तस्थिति, संप्रज्ञ, असंप्रज्ञ, हीं चिन्हें देह आहे तोंपर्यंतच आहेत, म्हणून यास देहसंबंध आहे. देह नसला तर निर्विकारी आत्म्यास हीं चिन्हें कोठून असणार ? असो. सहजस्थिति प्राप्त झाली असतां त्यांत संप्रज्ञ असंप्रज्ञ येतात; हें कळण्याकरितां निवडून दाखवितों.

संकल्प उठला किंवा निमाला तरी नामरूप अल्पसुद्धां स्फुरत नाहीं, तर सच्चिद्रूप एकरूप ब्रह्मात्मा भलतेही अवस्थेंत स्फुरतो. नामरूप किंवा किंचित् भेदभान न होणें यास सर्व निरोधन म्हणतात व सर्वांचे ठायीं एकरूपता हेंच ऐक्य. हेंच निरोधाचें फळ आहे. भेदाची किंचितूही स्फूर्ति होऊं नये हीच मुख्य सहजस्थिति आहे. पण ब्रह्मास्मि सामान्यत्वें संप्रज्ञास सच्चिन्मूर्ति आठवते. नामरूप भेद न स्फुरतां ब्रह्मात्म्याची प्रतिति घेणें त्यास सविकल्प संप्रज्ञता समाधी-समाधान म्हणतात. सविकल्प संप्रज्ञात जो ब्रह्मप्रतितीचा अनुभव आहे, तो नाहींसा होऊन जो उरतो, त्यास असंप्रज्ञ निर्विकल्प म्हणतात. सविकल्प संप्रज्ञ व निर्विकल्प असंप्रज्ञ या दोहोंत नामरूप भेदभान हें स्फुरूं नये, पण सविकल्प संप्रज्ञात समाधीमध्यें ब्रह्मसुख स्फुरतें, व निर्विकल्प असंप्रज्ञात तें स्फुरत नाहींत. इतकाच फरक असल्यामुळें एक सविकल्प संप्रज्ञ व दुसरा निर्विकल्प असंप्रज्ञ असे दोन भेद झाले. सविकल्प संप्रज्ञात ब्रह्मस्फूर्ति आहे. ती स्फुरली नाहीं म्हणजे तोच असंप्रज्ञ समाधि होतो. सविकल्प संप्रज्ञास जसा निरोध नको तसाच निर्विकल्प असंप्रज्ञासही नको. सविकल्प संप्रज्ञांत वृत्तीचे अभ्यासानें नामरूपाचा उद्भव होत नाहीं, तसाच निर्विकल्प असंप्रज्ञांतही नामरूपाचा उद्भव होत नाहीं. १ सविकल्प संप्रज्ञांत ब्रह्मात्मस्फूर्ति स्फुरते, तिची प्रतिती निर्विकल्प असंप्रज्ञांत नाहींशी होते, मग एकटे अद्वय एकरूप उरतें, हा असंप्रज्ञात समाधि. २ वृत्ती उत्पन्न झाली किंवा निमाली ही स्मृतीस वार्तासुद्धा नाहीं व स्वकीय ब्रह्मताही स्फुरत नाहीं हा असंप्रज्ञात समाधि होय.

३ ज्यांत मन बुद्धीचे संकल्प होतात पण ते कोणत्या प्रकारचे कसे व हे विकल्प आहेत किंवा ब्रह्म आहे हें कळत नाहीं हा असंप्रज्ञात समाधि.

४ मन बुद्धि इत्यादि अंतःकरण चतुष्टय इंद्रियद्वारानें बाहेर निघून पूर्वीप्रमाणें विषय ग्रहण करितात, पण हें जग आहे किंवा हें ब्रह्म आहे हें भान नाहीं हा असंप्रज्ञात समाधि.

हा देह क्रीडला कीं पडिला । बोलका कीं मुका निवांत ठेला । परी ब्रह्म कीं विकार नाहीं स्फुरला । हा असंप्रज्ञ समाधि
देहबुद्धि जैशी निपटून गेली । तिजसवेंचि ब्रह्मबुद्धिही मेली । उपरी जे जे वर्तणूक जाहली । हा असंप्रज्ञ समाधि ॥९
स्फूर्तीपासून देहादि जग । मिथ्यात्वें निश्चयचि जाहला-अभंग । पुढें मिथ्यात्वही स्मरेना अंग । हा असंप्रज्ञ समाधि १
ब्रह्मात्मा एक निजांगें स्वयें । ऐसा होऊनीच गेला निश्चय । मग स्मृतीवांचोनिया अद्वय । हा असंप्रज्ञ समाधि ॥ २
एवं मिथ्यासि मिथ्यात्वें स्मरेना । परी सत्यता स्वप्नींही उमसेना । हें सर्व ब्रह्मही आठवीना । हा असंप्रज्ञ समाधि ॥३
ओतप्रोत ब्रह्माचि चिद्घन । निजांगेंचि परी किंचित् नव्हे स्मरण । स्वप्नींही नव्हेचि भेदभान । हा असंप्रज्ञ समाधि ४
एवं हा असंप्रज्ञात समाधि । स्मरणेंविण निजांगें त्रिशुद्धि । परी हा सविकल्प अभ्यासेंविण कधीं । केवळ निरोधें साध्य नव्हे
सविकल्प ध्यासें मिथ्यासी मिथ्यापणें । वृत्तीनें खलून सदृढ करणें । तेव्हांचि सत्यत्व न येतां स्मरल्याविणें । निर्विकल्प दृढ जाहलें
सर्व नाहींचि ब्रह्मात्मा स्वता । ऐसें वृत्तीचे अभ्यासें खलितां । निश्चयचि बाणून गेला न स्मरतां । उत्थाना अभावींही
तस्मात् सविकल्प अभ्यासें कडून । निर्विकल्प दृढ जाहला संप्रज्ञ । नातरी वाउगें करितां निरोधन । सहसा साध्य नव्हे
कारण कीं मिथ्यात्व दृढ न होतां । आणि असंगहि निश्चय नव्हे पुरता । उगेंचि निरोधोनियां बैसतां । उत्थानींपूर्ववत उठती
स्फूर्त्यादि सत्य मिथ्या संशय उठे । ब्रह्मात्मा भेदावे केव्हां भेटे । ऐसें उत्थानीं ज्ञान स्फुरे कीं ओहटे । हें ज्ञान ना समाधि
तस्मात् सविकल्प अभ्यासद्वारा । पावावें निर्विकल्पाचें निर्धारा । सर्व असोनिया एकसरा । नामरूप भेदचि नव्हे ११
पाहें पाहें सविकल्प निर्विकल्पा । कोणता भेद तरी असे बापा । एकरूप असोनिही अभ्यास सोपा । संप्रज्ञातेचा ॥ १२
सर्व उद्भवतां सर्वपणा त्यागावा । मग सर्व ब्रह्मात्माचि आठवावा । ऐशी सर्वात्मता बाणे स्वभावा । हा संप्रज्ञात समाधि
सर्व म्हणोनि कांहीं नाठवावें । ब्रह्माचि असे हेंही न स्मरावें । उगेंचि नाठवितां अंगें असावें । हा असंप्रज्ञात समाधि

---

५ देह क्रीडा करीत आहे किंवा उगाच निचेष्टित आहे, बोलका आहे किंवा मुका आहे अशा प्रकारें विकारी आहे किंवा ब्रह्मरूप आहे हें स्मरत नाहीं हा असंप्रज्ञात समाधी.

६ जशी देहबुद्धि निःशेष गेली तशीं तिच्याबरोबर ब्रह्मबुद्धिही मावळली नंतर जी वर्तणूक होत आहे हा असंप्रज्ञात समाधि.

७ स्फूर्तीपासून देहापर्यंत सर्व जग मिथ्या असा निश्चय झाला, पुढें मिथ्यत्वही आठवेनासें झालें हा असंप्रज्ञात समाधि.

८ मीच एक स्वतः ब्रह्मात्मा आहें असा निश्चय होऊन गेला मग स्मृतिवांचून जो अद्वय हा असंप्रज्ञात समाधि.

९ वर सांगितल्याप्रमाणें मिथ्यास मिथ्यत्वानें स्मरत नाहीं व सत्यत्वासही स्वप्नीं पहात नाहीं. व हें सर्व ब्रह्म आहे हेंही आठवत नाहीं हा असंप्रज्ञात समाधि.

१० स्वतःच आपण ब्रह्मचिध्दन वोतप्रोत आहे परंतु त्या गोष्टीचें किंचितूही स्मरण होत नाहीं, व स्वप्नांतही भेदभान दिसत नाहीं हा असंप्रज्ञात समाधि.

याप्रमाणें हा असंप्रज्ञात समाधि स्मरणावांचून स्वतःच आहे पण हा सविकल्प आभ्यासावांचून केवळ निरोधानें साध्य नाहीं. सविकल्प ध्यासानें मिथ्यास मिथ्यत्वानें वृत्तीनें खलून दृढ करावें. तेव्हांच सत्यत्व न येतां स्मरल्यावांचून निर्विकल्प दृढ होतें. हें दृश्य सर्व नाहींच तर मी स्वतः ब्रह्मात्मा आहें. असा वृत्तीनें खलून अभ्यास केला म्हणजे न स्मरतां उत्थानाचे अभावी निश्चय बाणून जातो, म्हणून सविकल्प अभ्यासाचे योगानें निर्विकल्प असंप्रज्ञ दृढ झाला हा सविकल्प अभ्यासावाचून उगाच निरोध केल्यानें सहसा साध्य व्हावयाचा नाहीं. कारण मिथ्यत्व दृढ झाल्यावांचून व असंग मी आहें हा पुरतां निश्चय झाल्यावांचून उगाच निरोधून बसलें असतां उत्थानी पूर्ववत संशय उठतो प्रथम स्फूर्ति आदिकरून जीं तत्वें तीं सत्य किंवा मिथ्या हा संशय उत्पन्न होतो. तसेंच या सर्व भेदभावसृष्टींत ब्रह्मात्मा केव्हां भेटेल, याप्रमाणें उत्थानीं ज्ञान स्फुरतें व वोहटतें, हें ज्ञान नव्हे व हा समाधिही नव्हे; म्हणून सविकल्प अभ्यासाचे योगानें निर्विकल्प निर्धारास पावावें. मग सर्व असून नामरूपाचा भेद दिसत नाहीं. वास्तविक सविकल्प आणि निर्विकल्प यांत कांहीं भेद नाहीं. एकरूप असून संप्रज्ञतेचा अभ्यास सोपा आहे. तो असाः सर्व उद्भवलें असतां त्याचा सर्वपणा टाकावा आणि सर्व ब्रह्मात्माच आहे असें आठवावें. याप्रमाण केल्यानें सर्वात्मता बाणते. हा संप्रज्ञात समाधि.

सर्व कांहीं आठवूं नये तसेंच सर्वांचे अभावी ब्रह्म आहे हेंही स्मरूं नये तर उगेंच न आठविता असावें हा असंप्रज्ञात समाधि.

सर्व आपणाचि होणें नामरूपाविण। हा समाधि सविकल्प संप्रज्ञ। हें कांहींच न होतां दोनी विस्मरण। हा असंप्रज्ञ निर्विकल्प
कांहींच न स्मरावें ब्रह्म ना जग । उगेंचि निश्चयें असावें अभंग । या समाधीचा केव्हां तरी भंग । होईल बापा ॥१६
तैसें नव्हे सविकल्पासी । स्मरे तरी ब्रह्मता सर्वीं अविनाशी । न स्मरे तरी अखंडैकरसीं । समाधिस्थ परिपूर्ण ॥ १७ ॥
म्हणोनि कांहींच न होणयापरिस । सर्व होणें तेंचि एकरस। जेथें भेदाचि नव्हे भलते अवस्थेस । हेचि सहजस्थिति १८
या सविकल्पयोगेंही कधीं कधीं। निर्विकल्पही दृढ होय समाधि। वृत्ति उठे तरी सविकल्पाचा विधि । परी कदा उत्थान नव्हे
तस्मात् सविकल्प समाधि साधकानें। निरोपिल्या रीतीं दृढ करणें । मग निर्विकल्पही त्यांतचि बाणे । निश्चय दृढतरहोतां
असो वृत्ति अभ्यासें जो खलून । सदृढ केला उत्थानाविण । तो असो असंप्रज्ञ कीं संप्रज्ञ। परी दोनीही प्रिय ज्ञानिया
वृत्तीचा अभ्यास न करितां । निरोधून जाहला समाधि घेता। तो अप्रिय असे ज्ञानियां समस्ता । म्हणोनि तो निकृष्ट
तस्मात वृत्तीचा अभ्यासदिननिशी। खलून पावावें पूर्ण समाधानासी । संप्रज्ञता असंप्रज्ञताकायसी।नव्हेलसहजस्थितिपुढें
वृत्तीसीअज्ञानेंअन्यदेहादिकांचा।ध्यास बैसोनिगेलादृढचि साचा।तोजाईलतेव्हां हाखल होईल वृत्तीचा।अहंब्रह्मास्मि म्हणोनी
सर्व व्यापारीं विशेषेंकडून । दृश्य नव्हे मी ब्रह्मचि म्हणून । वर्णासहित करावें उच्चारण । द्वैत स्फूरूंच न द्यावें २५
अंतरीं कल्पना स्वप्नरूप होतां । चंचळ भास सारोनि परता।ब्रह्मात्मा पहावा त्या बाह्य आंतौता । दुजा भाव न स्फुरावा
नुसधी अंतःकरणाची वृत्ति । स्तब्धत्वें स्फुरे सहजगती । मग ते असो गाढ सुषुप्ति । अथवा उगेपणा ॥२७॥
अथवा समाधि घेतां तेचि वृत्ति । चिद्गगनाकारें आत्मप्रतीति । ते सामान्य कीं चंचळ विकृति ।नामेंसहित निषेधिजे
तिचिया ओतप्रोत चहूंकडे । तये अंतरींही ब्रह्मत्व उघडे । घेऊनि येर तयेचे धर्म जे बापुडे । समाधिसहित त्यागावे
समाधि आत्मप्रतीति वासनानंद । स्तब्धता सामान्यता विशद । हे सर्व सविकल्पाचे छंद।त्यागून चिद्रूप ध्यावें॥२९।३०
तया वृत्तीचाही लय होतां । ते शून्यत्वें त्यागावी लयाकारता । त्यांतील साक्षिरूपमात्र अनंता । ग्राहकाविण ध्यावें
ऐसें करितां स्मरणपूर्वक । समाधिभंगाचा केव्हां नसे धाक । भलते प्रसंगीं निश्चयात्मक । एकरूप समाधि ॥३२॥

---

नामरूपावांचून सर्व आपणच व्हावें हा सविकल्प संप्रज्ञ समाधि.

सर्व आहे किंवा मी ब्रह्मात्माच आहें या दोहोंचें विस्मरण हा निर्विकल्प असंप्रज्ञ समाधि.

निर्विकल्प असंप्रज्ञ समाधींत जग आहे किंवा ब्रह्मात्मा आहे याचें स्मरण नसतां उगेंच निश्चयानें असणें या समाधीचा कधीं तरी भंग होईल काय ? जसा निर्विकल्प समाधीचा भंग होत नाहीं, तसा सविकल्प समाधि नाहीं. सविकल्प समाधींत जर स्मरील तर सर्वांत ब्रह्मात्मा आहे, आणि न स्मरेल तर तो अखंडैकरसीं समाधिस्त आहे म्हणून कांहींच न होण्यापेक्षां सर्व होणें हेंच एकरस स्थिति. जेथें भलतेही अवस्थेंत भेद उत्पन्न होत नाहीं म्हणून हीच सहजस्थिति आहे.

सविकल्प समाधीचे योगानें निर्विकल्प समाधि कधीं कधीं दृढ होतो. जेव्हां वृत्ति उठते तेव्हां सविकल्पाचा विधि योजावा, मग केव्हांही उत्थान नाहींच, म्हणून साधकानें सविकल्प समाधि दृढ करावी. मग निश्चय बाणल्यावर त्यायोगानें निर्विकल्प दृढ होतो. असो. वृत्तीच्या अभ्यासानें जो खलून दृढ केला, ज्यास कधींही उत्थान नाहीं तो समाधि संप्रज्ञ असो अगर असंप्रज्ञ असो, ते दोन्हीही ज्ञान्यास प्रिय आहेत. वृत्तीचा अभ्यास न करितां निरोध करून समाधि घेणें हा ज्ञान्यास अप्रिय आहे, म्हणून हा कनिष्ट. कनिष्ठ समाधीपेक्षां वृत्तीचा अभ्यास करून तिचे खलानें पूर्ण समाधानास पावावें. याप्रमाणें सहजस्थिति प्राप्त झाली असतां संप्रज्ञ असंप्रज्ञ हे समाधि साधणें अवघड नाहीं.

वृत्तीस अज्ञानानें अन्य देहादिकांचा दृढ ध्यास बसलेला आहे, तो जेव्हां वृत्तीचा अहंब्रह्मास्मि असा खल होईल तेव्हां जाईल. सर्व व्यापारांत विशेषेंकरून दृश्य नाहींच, तर मी ब्रह्म आहें असें तोंडानें बोलून स्मरणही ठेवावें म्हणजे तेणेंकरून द्वैत स्फुरणार नाहीं. स्वप्नरूप अंतरांत कल्पना होऊं लागल्या म्हणजे चंचळभास टाकून त्यांच्या आंत बाहेर ब्रह्मात्माच पहावा. नुसती अंतःकरणाची वृत्ति स्तब्धत्वानें सहजगति स्फुरते, ती गाढ झोंप असो अगर उगेपणा असो, अथवा तीच वृत्ति समाधि घेत असतां चिद्गगनाकारानें आत्मप्रतीति, ती सामान्य किंवा चंचळ विकृति ती नांवासह टाकावी, आणि तिच्या आंत बाहेर ओतप्रोत चोहोंकडे ब्रह्मत्व आहे, तरी तिचे धर्म न घेतां समाधिसहित टाकावे. समाधि, आत्मप्रतीति, वासनानंद, स्तब्धता, सामान्यता, हे अनेक प्रकारचे सविकल्पाचे भेद आहेत, ते टाकून चिद्रूप ध्यावें.

वृत्तीचा लय झाला असतां जी लयाकारता होते ती लयाकारता शून्यत्वानें टाकावी, आणि त्यांतील साक्षिरूप अनंतास ग्राहकावांचून ध्यावें. असें स्मरणपूर्वक करीत असतां समाधिभंगाची केव्हांही भीति नाहीं. हा एकरूप समाधि पाहिजे त्या प्रसंगीं निश्चयानें घडतो.

लय अथवा वृत्ति उठतां।समाधिउगेपणाकीं झोंपलागतां।अथवाबुद्धयादिउठूनस्वप्नाकारता। कीं इंद्रियासहित जागर घडो
इतुके ठायींही ते ते विकार । न होतां ब्रह्मात्मा निर्विकार । स्मरणरूप सविकल्प ब्रह्माकार । संप्रज्ञात समाधि ॥३४॥
ऐसें निर्विकल्प ब्रह्मरूपाचें । स्मरणें सविकल्प सुख घे साचें । आपुलें तों निर्विकल्पत्व न वचे । आणिमहालाभ सविकल्पा
तस्मात् रविदत्ता जागृति कीं स्वप्न।वृत्तीसीसमाधि झोंप कींउगेपण।परीतूं स्मरें ते ते भावत्यागून। आपुलें सच्चिद्घनानंद
हें स्मरण अभ्यासें बलात्कारें । साधका करणें लागे निर्धारें । नामरूपादि सांडावे भेद सारे । ब्रह्मत्व खरें निवडावें ३७
हे सहजगति ज्ञानिया होती । नामरूपेंही नुद्भवती । आपुली ब्रह्मता दृढ प्रतीति । स्मरतां न स्मरतां बाणे ॥३८॥
साधक तेचि सिद्ध होऊन । सहजस्थितीसी होती पावन । तोंवरी साधका अभ्यास करणें । लागे स्मृतीचा ॥ ३९ ॥
तस्मात् ऐसाचि हा अभ्यास करीं।सदां भलते अवस्थेमाझारीं।याविण सविकल्पगेधाची चाड न धरीं । कवणेही काळीं
सविकल्प समाधि तो हें सर्व असतां। सहजगतीघडतसे तत्त्वतां।आणिनिर्विकल्पहीअसंप्रज्ञता। मागें निरोपिल्यापरी घडे
सर्वांचे मिथ्यात्वाचें स्मरण । आणि ब्रह्मात्मत्वाची आठवण । हाचि समाधि एकतान संप्रज्ञ । सर्वदां राहे ॥४२॥
हें सर्व मिथ्यात्वेंही न स्मरतां । स्वकीय ब्रह्मात्मत्वही नाठवितां ।निजांगें निश्चय तरी एकरूपता । हा असंप्रज्ञ समाधी
उभयरीतीही सर्व निरोधाचें । फल तों एक ऐक्यत्वाचें । हेचि स्थिति सर्व ज्ञानियां रुचे । तस्मात् हेचि साधावी ४४
रविदत्ता तूं येथें कल्पना । करिसी कीं मागिल्या निरोपणा । विरोध आला जे वृत्ति लयाविना । असंप्रज्ञ नव्हे ॥४५॥
वृत्तिलय तोचि असंप्रज्ञ । ऐसें असतां प्रस्तुत भाषण । कीं सर्व हें पूर्ववत असून । असंप्रज्ञता घडे ॥४६॥
ऐसा विरोध जरी तुज वाटला । तरीसावध असावेंनिरूपणाला।आम्हीं हेतूही प्रगटिलाआपुला । परी त्वां जाणिला नाहीं
तस्मात् तोचि हेतु आतां मागुती।स्पष्ट करून दावूं तुजप्रती।आमुचाभावकदांनोव्हे निश्चिती । कीं लय व्हावा वृत्तीचा
परी लय व्हावा बोलणें । तें असे इतुकियाच कारणें । कीं सर्व असून नामरूप न स्फुरणें । हाचि लय ॥ ४९४९ ॥

---

लय अथवा वृत्तीचें उत्थान झालें असतां, समाधि लावीत असतां, उगेपणा असतां, झोंप लागली असतां, बुद्धि आदिकरून उत्पन्न होऊन स्वप्नाकार होत असतां, किंवा इंद्रियांसहित जागृति घडत असतां, सर्वांचे ठायीं त्यांचे विकारास न पावतां ब्रह्मात्मा निर्विकार स्मरणरूप असतो. हा सविकल्प संप्रज्ञात समाधि. याप्रमाणें निर्विकल्प ब्रह्मरूपाचे स्मरणानें सविकल्प सुख घेतें, आणि तशानें आपलें निर्विकल्पत्व कमी न होतां सविकल्पास मोठा लाभ होतो. म्हणून हे रविदत्ता, जागृति किंवा स्वप्न, वृत्तीला समाधि किंवा झोंप असो अथवा उगेपणा असो, पण तूं ते ते भाव टाकून आपलें सच्चित्घनानंदत्व आठव. हें स्मरण साधकास अभ्यासानें बलात्कारानें करावें लागतें. याप्रमाणें नामरूपादि सारे भेद टाकून ब्रह्मत्व खरें निवडावें. असें करणें ज्ञान्यास सहज होतें. त्यांस नामरूपादि उत्पन्न न होतां आपली ब्रह्मतेची दृढ प्रतीति स्मरल्या न स्मरल्यावांचून बाणते. याप्रमाणें साधकास स्थिति बाणण्यास स्मृतीचा अभ्यास केला पाहिजे.

रविदत्ता, तूं साधकच आहेस म्हणून वर सांगितल्याप्रमाणे सदां भलत्याही अवस्थेंत स्मृतीचा अभ्यास कर. अभ्यासावांचून सविकल्प रोधाची कल्पना कधींही करूं नको. सविकल्प समाधि, हें सर्व असतां सहज गती घडत आहे. त्याचप्रमाणें असंप्रज्ञ निर्विकल्पता मागें सांगितल्याप्रमाणें तीही घडत आहे.

सर्वांचे मिथ्यत्वाचें स्मरण आणि निर्विकल्प ब्रह्मात्मत्वाची आठवण, हाच एकतान संप्रज्ञ समाधि सदा रहातो. सर्व मिथ्यात्व आहे हें न स्मरतां तसेंच आपल्या ब्रह्मत्वाची आठवण न होतां आपला आपणास निश्चय असणें हाच एकरूप असंप्रज्ञ समाधि. दोन्ही समाधींत सर्व निरोधाचें फळ, एक ऐक्यत्व व्हावें हें आहे. ही स्थिति सर्व ज्ञान्यांस रुचते म्हणून हीच साधावी.

शंका–रविदत्ता, तूं अशी कल्पना करशील कीं, मागल्या निरूपणास विरोध आला. कारण वृत्तिलयावांचून असंप्रज्ञ समाधि घडत नाहीं, वृत्ति लय तोच असंप्रज्ञात समाधि. असें असतां आतां तुम्हीं हें सांगतां कीं, सर्वही पूर्ववत् असून असंप्रज्ञात समाधि घडतो, तरी हें कसें ?

उत्तर–आम्ही आतां जें निरूपण केलें, त्यांत आमचा हेतु प्रगट केला. तो तूं जाणला नाहींस म्हणूनच ही तुला शंका उत्पन्न झाली. आतां तो हेतु काय आहे तो तुला स्पष्ट करून सांगतों ऐक. वृत्तीचा लय व्हावा असा आमचा हेतु नाहीं. पण लय व्हावा हें जें सांगितलें तें इतक्याच करितां कीं, सर्व असून नामरूप स्फुरूं नये.

कवणेही अवस्थेशी नामरूपाचा । उद्भवचि न व्हावा सर्वपणाचा ।हाचि लय स्मरणेंविणही साचा । हा असंप्रज्ञ समाधि
याविण निःशेष वृत्ति निमावी । हे शंकाचि कवणें न करावी । जरी लयचि व्हावा ऐसें भावी । तरी बहुत विरोध ॥
लय जाहलिया जीवन्मुक्तीचें । सुख कोणें भोगावें साचें । सुखग्राहका तों सविकल्पाचें । निर्मूळ जाहलें ॥ ५२ ॥
निर्विकल्पाचें सुख निर्विकल्प । नेघे कदापिही अल्प । तस्मात् सुखग्राहक तें सविकल्प । ते निमितां सुख कैंचें ॥ ५३
जीवन्मुक्तीचें सुखही बुडालें । आणि पुढें परंपरा केवीं चाले।ज्ञाते तो निर्विकल्प होऊन गेले।तरी उपदेशावें कोणें कोणा
एक ज्ञाता जो होऊन गेला । तो निर्विकल्पें जड पडिला । तरी उद्धरावें कोणें दुजियाला । हा केवढा विरोध ॥५५॥
निर्विकल्प तोचि ज्ञाता एक । तरी आचार्य याज्ञवल्क्यादिक । उपदेशिते जाले एकासी एक । ते काय सर्व अज्ञान५
मागील सर्व अज्ञान जाहले। कारण कीं निर्विकल्प नाहीं पडिले । तरी आतां हें ज्ञान कोठोनि आलें । हा तो अति विरोध
आणि श्रुति ज्ञाना देव बोलिली। या वचनासीही व्यर्थता आली। निर्विकल्पता तों क्रियेनें केली । तरी ज्ञानाचें कारण काय
म्हणसी ज्ञान होऊन लय व्हावा। तरी श्रुतीसी विरोध न यावा। येणेंही बोलें योग अपेक्षावा। नुसध्या ज्ञानें मोक्षनोव्हे
ज्ञानासीअपेक्षाजरींक्रियेची। तरीज्ञानादेवयावचनाव्यर्थतासाची। म्हणोनिसर्वदानिर्विकल्पत्वाची। गोष्टीसहसानचलावी॥
मुख्य आचार्य जे जे मागें जाहले। ते ते निर्विकल्प नाहीं पडिले। तस्मात् ते पूर्णज्ञाना नाहीं पावले । सर्वां आलें अज्ञान
या विरोधासी उत्तर कोणतें । विचारूनियां बोलें निगुतें । जरी म्हणसी उपदेशापुरतें । सविकल्प असावें ॥ ६२ ॥
तरीनिर्विकल्पहोतांज्ञानापावती। सविकल्पकाळींपडेअज्ञानभ्रांति। तस्मात्उपदेशकरण्यायोग्यनहोती। उभयअवस्थेही ६३
निर्विकल्पीं तों ज्ञान असोनी । बोलतां नये विराल्यावाणी ।सविकल्पीं तों अज्ञान कैसेनी । उपदेशा योग्य होय ॥ ६४
तथापि आणीक एक कल्पना। करिसी कीं विकल्प निर्विकल्प पूर्णा । उभयकाळींही आहेपणा । ज्ञानासी असे ४९६५
ऐसें बोलतां तो विरोध थोर । सविकल्प स्फूर्ति आणि जड समग्र । हे उभयतांही जाहले साचार । अर्ध अर्ध विभागी

---

हाच लय सर्वपणाच्या नामरूपाचा कोणत्याही अवस्थेंत उद्भव होऊं नये, हाच लय खरोखर स्मरणावांचून आहे, हाच असंप्रज्ञ समाधि. याखेरीज निःशेष वृत्तीचा लय झाला म्हणजे असंप्रज्ञ समाधि होतो, असें कोणी म्हणेल तर यास बहुत विरोध आहेत. लय झाल्यावर जिवन्मुक्तीचें कोणी सुख भोगावें ? कारण सुख ग्रहण करणारा जो सविकल्प त्याचें निर्मूळ केलें आहे. निर्विकल्पाचें सुख निर्विकल्प स्वतः घेऊं शकत नाहीं. म्हणून सुख घेणारें सविकल्पच आहे. तें सविकल्प निमालें म्हणजे मग सुख कसें प्राप्त होईल ? सविकल्प घालविल्यानें जिवन्मुक्तीचें सुख बुडालें, व पुढें परंपराही चालावयाची राहिली कारण ज्ञाते निर्विकल्प होऊन गेले मग कोणी कोणास उपदेश करावा ? एक ज्ञाता होऊन गेला तो निर्विकल्प जड होऊन पडला. मग कोणी कोणास उद्धरावें ? हा मोठाच विरोध आहे. जो निर्विकल्प झाला तोच एक ज्ञाता, असें म्हटलें असतां आचार्य किंवा याज्ञवल्क्य इत्यादि उपदेशकर्ते ते अज्ञान ठरतात. हे निर्विकल्प झाले नाहींत, म्हणून अज्ञान झाले; तर आतांचें ज्ञान त्यांवांचून कोणापासून प्राप्त झालें. हा एक विरोध, तसेंच श्रुति, 'ज्ञानात् एव' म्हणते, या वचनासही व्यर्थता येते. कारण जर क्रियेनें निर्विकल्पता येते, तर ज्ञानाची काय गरज आहे ? तूं म्हणशील कीं, ज्ञान होऊन मग लय व्हावा, तरी अशा म्हणण्यानें श्रुतीस विरोध येतो. कारण योगावांचून नुस्त्या ज्ञानानें मोक्ष होत नाहीं. ज्ञानास जर क्रियेची अपेक्षा आहे तर 'ज्ञानात् एव' या वचनास व्यर्थता येते. म्हणून सर्वदां निर्विकल्प असावें अशी कल्पनाच करूं नको.

पूर्वी जे आचार्य झाले ते निर्विकल्प होऊन पडले नाहींत, म्हणून ते तुझ्या म्हणण्याप्रमाणें ज्ञानी होत नाहींत तर सर्व अज्ञानीच ठरतात. तूं म्हणशील कीं, त्यांनीं उपदेशापुरतें सविकल्प व्हावें आणि मग निर्विकल्प होऊन पडावें. पण तुझ्या या म्हणण्यानें असें होतें कीं, तें निर्विकल्प असतां ज्ञानी आहेत व सविकल्प काळीं अज्ञानभ्रांत आहेत. जर सविकल्प काळीं त्यांस अज्ञानभ्रांति आहे, तर ते त्या काळीं भ्रांत असल्यामुळें उपदेशास योग्य नाहींत. व एरवी निर्विकल्प असतां तर वृत्ती नसल्यामुळें उपदेश करणें घडत नाहीं. म्हणून तेव्हांही ते उपदेशास योग्य नाहींत व त्या काळीं जरी तुझ्या म्हणण्याप्रमाणें ज्ञान आहे तरी तें बोलतां येत नाहीं. कारण ते विराल्याप्रमाणें निर्विकल्पीं आहेत. आतां तूं असें म्हणशील कीं, सविकल्पीं व निर्विकल्पीं दोन्हीही काळीं ज्ञान आहेच. तरी तुझ्या या अशा म्हणण्यानें मोठाच विरोध येतो. कारण सविकल्प स्फूर्ति आणि सर्व जड पदार्थ या दोघांत ज्ञान आहे, म्हणून ज्ञानाचा अर्धा वांटेकरी सविकल्प स्फूर्ति आहे व अर्धा वांटेकरी जडपदार्थ आहे.

जड म्हणिजे घटादिकांसी । ज्ञानाचा अर्धभाग आला त्यासी । कारण कीं तेथें कदां सविकल्पासी । रूप नसे म्हणूनी
सविकल्प स्फूर्तीसी जो अर्धभाग । आला तोही वाटे नसे अभंग । कारण कीं संशयें पावतसे भंग । क्षणक्षणा विक्षेपें
साधक कोणी समाधि घेतां । पुरती नव्होचि निर्विकल्पता । श्रवणीं चिलट जरी गुणगुणितां । विक्षेपाचि उठे ४९६९
निर्विकल्पता तरी नव्हे खरी । तस्मात् अर्ध भागाचा नसे वांटेकरी । अर्धभाग जो सविकल्पाचा निर्धारी । तोही विक्षेपें बुडाला
घट तरी जड निर्विकल्प खरा । ज्ञानाचा अर्धविभागी जाहला पुरा । हा साधक पडे संशया माझारा । सरी अर्धभागही नाहीं
ऐसे अनेक प्रकारचे विराध । होती निर्विकल्पा म्हणतां बोध । तस्मात् साधकें करावा वृत्तिरोध । ऐसें सहसा अपेक्षूं नये
हें असो पर्वील विरोधाचें । बोलणें राहो अन्यअन्याचें । परी साधकासी ज्ञानचि नवचे । नुसधें निर्विकल्प साधितां ७३
जया सविकल्पाज्ञान व्हावें । तया वृत्तीसी तों रोधून ठेवावें । तरी कवणें निश्चयेंसी स्थापावें । अमुकसें ज्ञान म्हणोनी ७४
अज्ञान न जातां देहबुद्धीसहित । तो मुक्त तरी कवणें बोलिजेत । आणि ज्ञाता म्हणावा कासयांत । वृत्ति तों निमग्न अज्ञानी
जरी उगाचि लय करून बैसला । तरी लयसाक्षी कदा न जाय कळला । येविशीं विचाराचि पाहिजे केला । वृत्ति उत्थानी
वृत्तीविना लय साक्षीचा । अनुमान कोणें करावा साचा । तस्मात् ब्रह्मानुभवाचि असे कैचा । नुसध्या निरोधें ॥ ७७
आणीक म्हणसी कीं लयसाक्षीचें ज्ञान । जाहलिया यथार्थ विचारेंकडून । पुढें बैसावें वृत्ति रोधून । तरी याचें उत्तर ऐकें
ज्ञान जाहलियाही लयसाक्षीचें । पुढें अभ्यासेंविण दृढतर कैंचें । निर्मूल नव्हेचि देहबुद्धीचें । जें बहु दिसांचें दृढ जाहलें
जैशी देहबुद्धि सदृढ जाहली । ऐशी ब्रह्मात्मता पाहिजे केली । ते वृत्ति अभ्यासें जरी खलिली । तरीच खरी अपरोक्षता
येथें निरोधाचें काज कायी । निरोधें ज्ञान नव्हे निःसंशयी । हेंही असो कवणा कालत्रयीं । निःशेष लय कदा नव्हे ८१

## तदशक्तो ॥

जो सप्राण उपाधीसहित । तो ज्ञानी असो कीं अज्ञानयुक्त । परंतु सर्व लय करावया अशक्त । महाप्रयत्नी जरी ४९८२

---

घटादिक जे जडपदार्थ त्यांस ज्ञानाचा अर्धा वांटा आला कारण तेथें कधींही सविकल्प नाहीं. आतां सविकल्प स्फूर्तीच्या वांट्यास जो ज्ञानाचा वांटा आला तोही अभंग नाहीं. कारण तें संशयानें व विक्षेपानें क्षणक्षण भंग पावतें. तें असेः कोणी साधक समाधि घेत असतां पुरति निर्विकल्पता घडत नाहीं, कारण कानाशीं चिलटानें गुणगुण केली कीं, विक्षेप उत्पन्न होतो. विक्षेपामुळें निर्विकल्पता खरी होत नाहीं. म्हणून तो अर्धभागाचा वांटेकरी नाहीं. कारण सविकल्पाचा जो अर्धभाग तो विक्षेपामुळें बुडाला. आतां निर्विकल्प जड जो घट तो ज्ञानाच्या अर्धभागाचा वांटेकरी आहे, पण साधकास संशय उत्पन्न होतो म्हणून घटासारखा निर्विकल्प साधक झाला तरी त्यास ज्ञानाचा अर्धभाग मिळत नाहीं. याप्रमाणें निर्विकल्पीं ज्ञान आहे असें म्हटल्यानें बहुत विरोध येतात. म्हणून साधकानें वृत्तीनिरोधाची अपेक्षा करूं नये. पूर्वी विरोध दाखविले ते असूंद्या. पण साधकास नुसत निर्विकल्प साधिल्यानें ज्ञान प्राप्त होत नाहीं. ज्या सविकल्पास ज्ञान व्हावयाचें, त्या सविकल्प वृत्तीस रोधून ठेविलें असतां हें ज्ञान, असा निश्चय तरी कोणी करावा व देहबुद्धिसह अज्ञान जर गेलें नाहीं आणि निर्विकल्पासारखा निचेष्टित झाला तर तो मुक्त असें कोण म्हणेल व त्याची वृत्ति निचेष्टीतपणामुळें अज्ञानांत लीन झाली आहे, तेव्हां तो ज्ञाता असें त्यास कसें म्हणतां येईल ? वृत्तीचा लय करून उगा बसला तरी त्यास लयसाक्षी कळला जात नाहीं. तो कळण्यास वृत्तीची गरज आहे. ती वृत्ती उत्पन्न झाली म्हणजे विचार केला पाहिजे. तो विचार करून वृत्तीवाचून लयसाक्षी आहे असें अनुमान कोण करील ? तें अनुमान होत नाहीं म्हणून नुसत्या निरोधानें ब्रह्मानुभव प्राप्त होत नाहीं. तूं असें म्हणशील कीं, विचारानें लयसाक्षीचें ज्ञान यथार्थ झाल्यावर मग वृत्तीचा रोध करून बसावें. जर वृत्तीचा रोध करून बसावें, तर झालेलें लयसाक्षीचि ज्ञान अभ्यासावांचून दृढ होत नाहीं. व पुष्कळ दिवसांची देहबुद्धी तिचें निर्मूळ होत नाहीं. देहबुद्धि जशी दृढ झाली आहे अशीच ब्रह्मात्मबुद्धि दृढ केली पाहिजे. ती ब्रह्मात्मबुद्धि वृत्तीच्या अभ्यासानें खलल्यावाचून खरी अपरोक्षता होत नाहीं व खरी अपरोक्षता होण्याकरितां खल करण्यास वृत्तीची अपेक्षा आहे. असें असतां तिचा निरोध केला तर निःसंशय ज्ञान प्राप्त व्हावयाचें नाहीं. हें तर राहूंद्या, पण कालत्रयीं कोणासही तिचा विशेष लय करितां येत नाहीं. जो उपाधीसह प्राणी आहे, तो ज्ञानी असो अथवा अज्ञानी असो त्यानें सर्वांचा लय करण्याविषयीं जरी मोठा प्रयत्न केला तरी त्यास सर्वांचा लय होणार नाहीं.

वायु मस्तकीं जो चढवूनी । बैसेल तो मात्र राहे चिरकाल रोधोनी । परी तो शून्यामाजीं पडे अज्ञानी । तरी उपयोग कैंचा
ऐशिया हटयोगारहित । कोण असे निरोधा सशक्त । मागें जाहले ना पुढें होणार महुन । परी ऐसा न देखों नायकों ८४
कीं सर्वदा वृत्तिलयाचि करूनी । बैसेल एकरूप निशिदिनीं । मग तो असो अज्ञानी कीं ज्ञानी । परी समर्थ नव्हे ८५
वृत्ति स्फूर्तिरूप उठतां राहे । न घडे कदापि सर्वथा हें । जैसा बंबांतून वायु न वाहे । ऐसा नसे प्रकार ॥ ८६ ॥
तथापि मनबुद्धि उठूं न देणें । प्राणासि तरी असे वाहणें । तेणें क्षुधा तृषा होती अचुकपणें । तेव्हां व्याकुळ करील
त्या व्याकुळीनें घाबरून । उठेल सविकल्प बुद्धि मन । तथापि बळें बैसे निग्रह करून । तरी प्रांणांत होय ॥ ८८ ॥
तेणें नुठतां प्राणही दिधला । कासाविस होऊन व्यर्थ मेला । तरी कोणते सार्थकासी पावला । आत्महत्यारा ॥ ८९ ॥
तो म्हणे म्यां मनादि रोधिले । किंचित् उत्थान होऊं न दिधलें । परी त्या कासाविशीमाजीं भ्रमले । पुरता लय ना व्यपार
ऐसा वृत्तिरोधें होय अनर्थ । कोणी निरोधासी नसे समर्थ । आणि कोणताचि न साधे अर्थ । व्यर्थ देह पीडितां ॥ ९१
मागेंही ज्ञान ते उदंड जाहले । सनकादिक याज्ञवल्क्य महा भले । परी कोणी निर्विकल्पीं जड पडिले । ऐसें नायकों
ते पूर्ण ज्ञानी समाधानी । सुखें विचरती कर्मानुसार जनीं । परी निचेष्टित राहिले पडोनी । ऐसा एकही नायकों ॥ ९३
जरी विदेही नांव जनकासी । परी पडिला नाहीं निर्विकल्पत्वेंसी । विचरे सदा प्राप्त भोगासी । वनीं भुवनीं जनीं ९४
तस्मात् कोणता जड पडिला । प्रारब्धानुसार नाहीं क्रीडला । परी अज्ञान ऐसें म्हणे जो तयाला । त्याची जिव्हा झडेल
ते पूर्णज्ञानी सहजस्थिति । उत्थानरहित सर्वदा क्रीडती । तयांचें तेंचि यथार्थ जाणती । येरांसी काय कळे ॥ ९६ ॥
सर्वदा निर्विकल्प जाहालियाविण । न पावती जरी पूर्णसमाधान । तरी काय राहती ते केलियावाचून । हरप्रयत्नें साधिती
परी तयांसी काज असेना । म्हणोनि निर्विकल्पीं प्रवर्तेतीना । सर्व असतां दृढबोधें समाधाना । पावले निःसंशयें ९८

आतां जो योगसाधनानें प्राण ब्रह्मांडीं नेऊन बसेल तो मात्र चिरकाळ रोध करून बसला असें समजावें. परंतु तो शून्य अज्ञानांत राहिला. तेव्हां त्यास तसें करण्याचा काय उपयोग झाला ? वर सांगितल्याप्रमाणे हटयोगाखेरीज दुसऱ्या कोणत्याही योगानें निरंतर सर्वांचा निरोध मागें केला नाहीं व पुढेंही करूं शकणार नाहीं. वृत्तीचा लय करून एकरूप होऊन रात्रंदिवस बसेल, असा ज्ञानी किंवा अज्ञानी कोणीच समर्थ नाहीं. जसा बंबांतून वारा वाहणार नाहीं हें घडावयाचेंच नाहीं तशी स्फूर्तिरूप वृत्ति उत्पन्न झाली असतां ती कधींही स्थीर रहावयाची नाहीं. आतां मन बुद्धि यांस उठूं न देण्याचा निश्चय केला, तर तीं उठणार नाहींत; तरी प्राण वहात असले पाहिजेत. ते प्राण वहात असल्यामुळें क्षुधा तृषा लागतील. त्या लागल्या असतां प्राण्यास त्या व्याकूळ करतील. त्या व्याकुळतेनें घाबरून विकल्पानें मन बुद्धि उठेल. तथापि बळेंच पुन्हां त्यांचा निग्रह करून बसेल तर प्राणांत होईल. याप्रमाणें अति निग्रहानें कासावीस होऊन मेला तर त्या आत्महत्यारानें आपलें काय सार्थक केलें ? तो म्हणेल कीं, मी मन बुद्धि यांचें किंचित् उत्थान होऊं न देतां रोध केला कीं नाहीं ? वर सांगितल्याप्रमाणें त्यानें रोध करण्याचा प्रयत्न केला, व आपले म्हणणें यथार्थ केलें पण तें त्याचें म्हणणें व्यर्थ आहे. कारण मन, बुद्धि हीं भ्रमलेपणानें त्या कासाविशींत पुरता व्यापार किंवा लय न होतां आहेत. तरी या प्रकारचा वृत्तिरोध केला असतां अनर्थच होईल. म्हणून वृत्तीचा रोध करण्याविषयीं कोणी समर्थ नाहीं. असें असतां देहास पिडा देऊन वर सांगितल्याप्रमाणें रोध केला असतां कांहींच फायदा नाहीं.

पूर्वीं याज्ञवल्क्य, सनकादिक मोठमोठे ज्ञाते होऊन गेले परंतु कोणी निर्विकल्प, जड होऊन पडले असें कधींही ऐकिलें नाहीं. ते पूर्ण समाधानी ज्ञानी, जगांत कर्मानुसार सुखानें वागत होते, ते निचेष्टित पडून राहिले असें कधींही ऐकिलें नाहीं. जनकास जरी विदेही असें नांव होतें तरी तो निर्विकल्पत्वानें जड होऊन निश्चेष्टीत न पडतां भोक्तृत्वाप्रमाणें जनांत, वनांत, भुवनांत, विचरत होता. त्यास अज्ञानी असें कोण म्हणेल ? जो अज्ञानी म्हणेल त्याची जिव्हा झडेल. असा कोणता मनुष्य ज्ञानी आहे कीं, जो प्रारब्धाप्रमाणें न क्रीडतां जड होऊन पडलेला आहे. जरी तो तसा जड होऊन पडला नाहीं तरी त्या जनकादिक ज्ञान्यास अज्ञानी कोण म्हणेल ? ते तर पूर्ण ज्ञानी असून सहजस्थितीनें उत्थानरहित नेहमीं क्रीडतात. ती त्यांची स्थिति ज्ञानीच जाणतील. इतरांस ती स्थिति कळावयाची नाहीं.

जर नेहमीं निर्विकल्प होऊन पडून राहिलें असतां पूर्ण समाधान होतें तर ते हर प्रयत्न करून उगेच न रहातां ते समाधान साधिते; परंतु तसें केल्यानें पूर्ण समाधान होत नाहीं, म्हणून ते निर्विकल्प होण्याची इच्छा करीत नाहींत. तर सर्व असतांच दृढ बोधानें समाधान पावले आहेत.

हेही निःसंशय खरे जाहले । त्यावरी याज्ञवल्क्य गुरुत्वें बोले । हे जनक पूर्ण अभय तुज पावलें । हें वचन वेदामाजीं
तस्मात् ते निर्विकल्प नसतां । काय म्हणोन येती ज्ञाते तत्त्वतां । तथापि न मानील कोणी तो ऐसा । अधमाहूनि अधम
यास्तव ते ज्ञाते पूर्ण समाधानी । सत्य सत्य वेद ज्यातें वाणी । म्हणूनि मुमुक्षूनें आदरें करूनी । तदनुसार वर्तावें ५००१
मागें कोणी जडत्वें पडिला । ऐसा देखिला ना ऐकिला । येथें कोणी भावील कीं जडभरताला । निर्विकल्पस्थिति होती
परी जडभरत तो निर्विकल्प न होतां । तो पूर्वील दुःसंगा जाहला स्मरता । म्हणोनि भिऊन जाहला अवलंबिता । जडचर्या जनी
तयाही अशनपान चालणें बोलणें । होत असे देहाचें करणें । रहूगणासी उपदेश होणें । निर्विकल्प तरी कैसा ॥ ४ ॥
वरुनी जडपणा जरी दाखवी । परी मननादि सर्व संपादी बरवीं । तस्मात् सर्वदा निर्विकल्पता असावी । ऐसें पूर्वी ना घडे पुढें
निःशेष वृत्तिलय करावया । कोणी समर्थ नव्हे गा शिष्यराया । म्हणोनि तो सर्वथा घेऊं नये थाया । कवणेंही साधकें
तंव रविदत्त घाली लोटांगण । बोलता जाहला हस्त जोडून । जी जी वृत्तीचा लय निःशेष होणें । न घडे कल्पांतीं ७
परी वृत्ति सर्वदा तदाकार । होऊन असावी ब्रह्माकार । या परतें नसावें अन्य येर । साधकां कदा ॥ ८ ॥
ऐसें ऐकतांचि गुरु म्हणती । सुखी असावें बापा येणें रीतीं । हें तों आह्मांसी इष्टचि अति । हा तों आमुचाचि पक्ष ९
कीं नामरूप भेदाचें दर्शन । होऊंच नये सर्व पूर्वरीतीं असून । एक ब्रह्मात्मत्व सच्चिदानंदघन । एकतान अवलोकावें
वृत्ति उठो कीं मन बुद्धि उठोनी । इंद्रियद्वारा प्रवर्तो विषयग्रहणीं । परी पाहूं नये सच्चिद्घनावांचोनी । नामरूपादि भेद
हेंचि एकाकारता खरी । विसरूंचि नये निमिष्यही अंतरीं । हेंचि साधका साधन निर्धारीं । सहजस्थिति बाणे तों १२
हें तों अवश्याचे असे साधकासी । परी लय जो बोलिला यथा रीतीसी । तोही जाहला पाहिजे निश्चयेंसी । क्षण एक निःशेष
लयसाक्षीचा बाणावा प्रत्यय । शून्य संदेह मोडला जाय । म्हणोनि क्षण एक स्वीकार होय । आम्हासीही लयाचा १४
क्षणरुच्या ॥
तस्मात् वृत्तीचा लयही क्षणभरी । करूनि लयसाक्षीची प्रतीति खरी । शून्य सांडूनि केवल निर्धारीं । आपरोक्षता बाणावी
पूर्वी सांगितल्या रीतीं । चारी विघ्नांची होऊन समाप्ति । वृत्तीचा लय होय जो सहजगतीं । तो स्वकीय ज्ञानें जाणावा

हें निःसंशय खरें आहे व वेदांत याज्ञवल्क्यानें गुरुत्वानें जनकास दृढ बोधानें समाधान पावावें निर्विकल्प होण्याची गरज नाहीं असें सांगितलें आहे. तेव्हां निर्विकल्प होऊन पडलें नाहीं तर त्यास ज्ञाता म्हणतां येणार नाहीं, असें कोण म्हणणार आहे? जो तो ज्ञाता नाहीं असें म्हणेल तो अधमापेक्षां अधम समजावा.

जे पूर्ण समाधानी ते ज्ञाते आहेत असे वेद वर्णन करितो. म्हणून मुमुक्षूनें पूर्वींच्या ज्ञात्याप्रमाणें वागावें. मागें निर्विकल्प होऊन कोणीही ज्ञाता राहिला नव्हता. आतां कोणी म्हणतील कीं, जड भरत निर्विकल्प स्थितीनें राहिला होता. पण तें त्याचें म्हणणें खोटें आहे. कारण तो पूर्वजन्मींचे वाईट संगतीचे स्मरणानें आतां तशी संगत घडावी म्हणून भीतीनें जनांत त्यानें जडचर्या मुद्दाम धरिली. तो इंद्रियांचे व्यापार करितच होता त्यानें रहूगणांस उपदेश केला. तो जर निर्विकल्प असता तर ह्या गोष्टी कशा करिता? जनाची उपाधी आपणांस होऊं नये म्हणून वरवर जडपणा दाखवून तो अंतर्यामीं मनादि सर्व साधनें संपादित होता, म्हणून तोही सदा निर्विकल्प होऊन पडला नव्हता. म्हणून कोणीही साधक निःशेष वृत्ति लय करण्याविषयीं समर्थ नाहीं.

प्रश्न—रविदत्त विनंती करितो कीं, कोणीही सदा निर्विकल्प स्थितीनें रहाणार नाहीं, परंतु साधकाची वृत्ति ब्रह्माकार होऊन सदोदित असावी. ब्रह्माला सोडून तिनें दुसरें कांहीं घेऊं नये.

उत्तर—गुरु सांगतात हे रविदत्ता, आम्ही तरी तुला हेंच सांगत आहों कीं, नामरूप भेदाचें दर्शन न होतां, पूर्व रीतीनेंच असून एक सच्चिदानंद ब्रह्मात्मत्व एकतान पहावें. वृत्ति किंवा मन, बुद्धि, इंद्रियद्वारानें विषय घेवो. परंतु आपण नामरूपादि भेद न पहातां एक सच्चिदानंद ब्रह्म पहावें, ही खरी एकाकारता. ही एक निमिषसुद्धां विसरूं नये. साधकास सहजस्थिति बाणेपर्यंत हेंच साधन केलें पाहिजे. हें साधन करून पूर्वी सांगितल्याप्रमाणें क्षणभर निःशेष लयही केला पाहिजे. तो ह्याचकरितां कीं शून्य संदेह मोडून लयसाक्षीचा अनुभव बाणावा. क्षणभर वृत्तीचा लय करून व शून्य निरास करून लयसाक्षीची अपरोक्षता अनुभवानें खरी बाणली पाहिजे.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें चार विघ्नें उत्पन्न न होतां सहज गतीनें वृत्तीचा लय होतो तो आपल्या ज्ञानानें जाणावा.

ळय होऊन जें शुद्ध जाणणें । तेंचि चिद्रूप केवळपणें । आणि सद्रूप आनंदरूप अनुभवणें । अनुभवियाविण ते समयीं
ऐशी यथार्थ प्रतीति बाणतां । मग पुढें वृत्तीही उद्भवतां । अथवा मनादिही व्यापार होतां । तेंचि पहावें यामध्यें १८॥
नामरूप परतेंचि सारावें । भेदाचें निःसंतानाचि व्हावें । एकरूप सच्चिद्घनाचि स्मरावें । किमपि विस्मर न होतां ॥१९॥
एकदां लयसाक्षीचा प्रत्यय घेतला । क्षणभरी तदाकारत्वें राहिला । पुढें वृत्तीमाजीही अवलंबिता जाहला । तोचि प्रत्यय
मागुतीही लयसाक्षी क्षणभरी । अनुभवून यावें वृत्तीवरी । वृत्तिसुखही घेऊन अंतरीं । पुन्हां लयप्रत्यय घ्यावा ॥ २१॥
ऐसा क्षणक्षण वृत्तीचा अभ्यास । क्षणक्षण लयसाक्षी एकरस । वारंवार घडावा साधकास । भलतेही अवस्थे ॥ २२॥
एकदांचि लयसाक्षी जाणिला । क्षण एक प्रतीति घेऊन आला । पुन्हां जाऊंचि नये लयसाक्षित्वाला । ऐसें नव्हे नव्हे
कस्मात् क्षण एक वृत्तीचा लय करून । लयसाक्षीचा प्रत्यय घेऊन । वृत्ति उठतां तदाकारत्वें राहणें । पुन्हां क्षणभरी लयकीजे
ऐसा क्षणक्षण लयरूप निरोध । क्षणक्षण उद्भवतां स्मरणीं सावध । हाचि अभ्यास एकरूप द्विविध । साधका अवश्य

## श्रद्धालुर्ब्रह्मतात्मनः ॥

प्रारंभीं अभ्यासें किंवा विचारता । आपुली व्यतिरेकें ब्रह्मात्मता । जाणिली लयसाक्षी जे अपरोक्षता । तेचि दृढतर पुढेंकरावी
श्रद्धालु साधक जो अधिकारी । लयसाक्षी जाणोनि निर्धारीं । तेंचि दृढतर व्हावया अभ्यंतरीं । अभ्यासचि पाहिजे
श्रद्धा हे म्हणावें आवडीसी । ते आपुली आवडी प्रियतम जैशी । आणिका देहादिकां नव्हे तैशी । हें पूर्वींच विवेचन जाहलें
न जाणतां आवडी अकृत्रिम । दुसरिया पदार्थी नसे निजसम । आतां जाणिलिया अपरोक्षें प्रियतम । बोलणेंचि नको
विवेचनें बत्तीस परते केले । अभ्यासें लयसाक्षित्वा जाणिलें । तेंचि अपरोक्षें निजरूप आपुलें । त्रिविधाही प्रतीतिनें ३०
ऐसें खरेखरेंपणें निवडितां । मिथ्यासी मिथ्यात्वें त्यागितां । आतां तया मिथ्यासी कैंची प्रियता । एक आपुली प्रियतमता करी
ऐशी प्रियतमता जे आपुली । येर प्रियता होपळ जाहली । ययाचि नांवें श्रद्धा बोलिली । अन्य यागादि श्रद्धा नव्हे
ऐशी आवडी अकृत्रिम जया । श्रद्धालु ऐसें म्हणावें तया । तोचि साधक जेणें ब्रह्मात्मया । अपरोक्षें जाणिलें ॥ ३३ ॥
अपरोक्ष जाणिलिया साधक कैसा । मानिसी संशय अंतरीं ऐसा । तो पुढें कळेल निरोपिजे जैसा । अवघी साधकत्वाचा
असो यारीतीं अपरोक्ष तत्वतां । श्रद्धालु साधकें आपुली आत्मता । जाणिली यथार्थ तेणेंचि मागुता । दृढतरता करावी

---

लय होऊन जें शुद्ध जाणणें अनुभवणारा उरतें, तेंच चिद्रूप जें चिद्रूप तेंच सद्रूप व आनंदरूप आहे. याप्रमाणें यथार्थ अनुभव झाला असतां मग वृत्ती, मन हीं व्यापार करूं लागलीं तरी त्यांत तेंच सच्चिदानंद ब्रह्म विस्मरण न होतां नामरूपादि भेद दृष्टीस न आणितां पहावे. एकदां लयसाक्षीचा अनुभव घेऊन क्षणभर तदाकारत्वानें पहावें व पुढें वृत्ति उत्पन्न झाली असतां तोच अनुभव घ्यावा. पुन्हां लयसाक्षीचा अनुभव घेण्याकरितां वृत्तीचा लय करावा. वृत्ति उठल्यावर तिचें सुख घेऊन पुन्हा लय करावा. याप्रमाणें क्षणक्षण वृत्तीचा अभ्यास व क्षणक्षण लयसाक्षीचा अनुभव घ्यावा. यायोगानें साधकास भलतेही अवस्थेंत एकता अखंड राहील. एकदां लयसाक्षीचा अनुभव घेतला म्हणजे पुन्हां तो अनुभव घेऊं नये असें नाहीं, तर एकदां लयसाक्षीचा अनुभव घ्यावा, तोच वृत्ति उठतां स्मरावा पुन्हां लयसाक्षीचा अनुभव घेऊन वृत्ति उठल्यावर तो स्मरावा. याप्रमाणें क्षणक्षण लयरूप निरोध व वृत्ति उत्पन्न झाली असतां क्षणक्षण सावध रहावें हाच साधकास दोन प्रकारचा अभ्यास योग्य आहे.

जो अधिकारी श्रद्धालु साधक असेल त्यानें लयसाक्षी जाणून तोच दृढतर होण्याकरितां वर सांगितल्याप्रमाणें अभ्यास करावा.

श्रद्धा म्हणजे आवड, इतर देहांवर जी आवड आहे त्यापेक्षां आपल्या देहावरची आवड प्रियतम आहे ही आपल्या देहावरची आवड जशी न जाणतां अकृत्रिम प्रियतम आहे. तशीच आपण जो लयसाक्षी अपरोक्ष परमात्मा त्यावर ती आवड राहील असें करावें.

विवेचनानें बत्तीस तत्वांपैकीं मी कोणीही नाहीं, तर अभ्यासानें जो लयसाक्षी जाणिला तेंच त्रिविधा प्रतितीनें आपलें निजरूप आहे, असा खरा निवाडा केला असतां, मिथ्या आहे तें मिथ्याच, त्यांवर प्रीति कोण करितो, म्हणून त्याचा त्याग करावा. आणि आपण जो लयसाक्षी अपरोक्ष, त्यावर प्रीति करावी. त्यावांचून इतरावर केलेली प्रीति ती व्यर्थ समजावी. आपणावर जी प्रीति तीच श्रद्धा. इतर यज्ञयागादिकांत जी श्रद्धा ती श्रद्धा नव्हे. ज्याला अकृत्रिम आवड आहे त्यालाच श्रद्धालु असें म्हणावें. ज्यानें ब्रह्मात्म्यास अपरोक्षत्वानें जाणिलें तोच साधक होय. तो अपरोक्षत्वानें जाणणारा तोच साधक कसा, हें पुढें साधकत्वाची अवधी सांगूं तेव्हां कळेल. असो. याप्रमाणें श्रद्धालु साधकानें आपली आत्मता यथार्थ जशी जाणली असेल, तशी तिची दृढतरता करावी.

दृढतर म्हणिजे आपण स्वयें ब्रह्म । येविषयीं न यावा संशय भ्रम । मिथ्यात्वें त्यागिलें जें रूपनाम । तया आत्मता नयावी
येर बत्तिसां सत्यत्वाचि न यावें । जरी दिसत असतांही आघवें । मा आत्मत्व तरी कैंचें संभवे । तोंचि मी म्हणोनी ३७
आपण ब्रह्मात्मा परिपूर्ण । तो परोक्ष केवीं होय आपण । ऐसें नुद्भवे कदा जें भेदभान । हेचि दृढतरस्थिति ॥ ३८ ॥
परी ऐशी स्थिती दृढतर व्हावया । अभ्यासचि पाहिजे शिष्यराया । तरीच सशय जाती निरटूनियां । वृत्तीच्या अभ्यासें
तस्मात् तोचि अभ्यास वृतीचा । सांगिजेल यथारीतीं साचा । त्या रीतींकरून दृढ अपरोक्षाचा । पावावा प्रत्यय ५०४०
अगा रविदत्ता पूर्वींपासोन . जाहलें तें विचारीं निरूपण । यथासांग जाहलें विवेचन । कांहीं आशय नुरतां ॥ ४१ ॥
तयाहीवरी अभ्यासद्वारा । भेटविलें ब्रह्मात्मया निर्विकारा । अमुक एक संशय उठे माघारा । ऐसें उरलें नाहीं ॥ ४२ ॥
मध्यें तुवां प्रश्न केले होते । ते ते सांग सांगितले तमस्ते । सविकल्प निर्विकल्पत्वही ऐते । निवडिले हातींचे आंवळे४३
आतां तुझा प्रश्न एक उरला । त्याचा तुज असेल विसर जाहला । परी तो स्मरत असे आम्हाला । तो प्रगट करूं ४४
तुवां पुसिलें होतें ऐसें । कीं सर्व देहादि असोत पूर्वरीतीं जैसे । परी यासी आत्मत्व न यावें अल्पसें । आपुलें ब्रह्मत्व दृढव्हावें
हा इतुका मात्र प्रश्न उरला । अन्याचें उत्तर दिधलें तुजला । लयसाक्षी अपरोक्षें भेटविला । जीवही दिधला निवडूनी
असो देहबुद्धि मागुती न जडावी । आपली ब्रह्मात्मता दृढ व्हावी । ऐशी तुझी प्रश्नाची उठाठेवी । फेडावी लागे ॥४७
निरूपणाचाही प्रसंग तोची । आला आलोढून एकदांची । श्रद्धालू साधकें स्वब्रह्मत्वाची । अपरोक्षता दृढ करणें ४८
तस्मात् देहादिबुद्धि निरटून जावी । स्वकीयब्रह्मता दृढतर व्हावी । येरासी आत्मता न संभवावी । आणि परोक्षत्व ब्रह्मात्मया
ऐसा अभ्यास घडावा वृत्तीसी । तोचि सांगूं यथारीतीसी । हेचि उपासना म्हणावी ऐशी । सगुणनिर्गुणरूप ॥५०५०॥
केवळ विचारेंचि अपरोक्ष जया । आणि लयसाक्षि जाणतांचि अद्वया । पावेल एकरूप निःसंशया । ऐसे अधिकारी थोडे
तस्मात् मंदप्रज्ञ अधिकारीयानें । विचारें अभ्यासें लयसाक्षी जाणणें । तैसेंचि पुढें वृत्तीनें खलणें । दृढतर व्हावया ५२
हेचि उपासना तूं करीं जाईं । मागें बोलिलों होतों ते समयीं । तस्मात् उपासना अभ्यास निःसंशयीं । एकरूपाचे असे५३
आतां साधकें असावें सावधान । अभ्यासरूप हेंचि उपासन । तेंचि दृढतर ऐकोनी निरूपण । तैसेंचि केलें पाहिजे५४

---

दृढतर म्हणजे आपण स्वतां ब्रह्म आहों याविषयीं संशय येऊं नये व भ्रम होऊं नये, व मिथ्यत्वानें जें रूपनाम टाकिलें, त्यास सत्यता येऊं नये. आत्म्याहून निराळीं जीं बत्तीस तत्वें, तीं दिसत असलीं तरी त्यांस सत्यता येऊं नये. त्यास जर सत्यता आली नाहीं तर मग, त्यांचे ठायीं हा मी अमूक अशी आत्मता तरी कशी उत्पन्न होईल? आपण ब्रह्मात्मा परिपूर्ण आहे. तो परोक्ष कसा होईल? याप्रमाणें भेदभान कधींही उत्पन्न होत नाहीं. हीच दृढतर स्थिति. अशी दृढतर स्थिति होण्यास अभ्यास केला पाहिजे. तो वृत्तीचा अभ्यास केला म्हणजे निःशेष संशय जातात, म्हणूनच आम्ही जसा अभ्यास सांगूं तसा करून दृढ अपरोक्षाचा अनुभव घे.

रविदत्ता, पूर्वींपासून जें निरूपण झालें त्याचा विचार कर. तें संशय न उरतां निःसंशय निरूपण झालेलें असून अभ्यासद्वारा तुला निःसंशय ब्रह्मात्मा भेटविला व तूं मध्यें प्रश्न केलेस ते सर्व यथासांग सांगितले. तसेंच सविकल्प, निर्विकल्प स्पष्ट करून दिलें. आतां तुझा एक प्रश्न उरलेला आहे त्याची तुला आठवण नाहीं, परंतु मला तो आठवत आहे तोच प्रश्न तुला सांगतों.

प्रश्न–देहादिक पूर्वींप्रमाणें जसे आहेत तसे असूं द्या. त्यांस किंचितही आत्मत्व येऊं नये तर आपलें ब्रह्मत्व दृढ व्हावें हा एकच प्रश्न उरलेला आहे. बाकीच्या प्रश्नाचीं उत्तरें दिलीं. लयसाक्षी अपरोक्षत्वें भेटविला व जीव स्पष्ट दाखविला.

उत्तर–तुझ्या प्रश्नांतील मतलब हाच आहे कीं, देहबुद्धी जडूं नये, व आपली ब्रह्मात्मता दृढ व्हावी. तेंच निरूपण आतां सांगण्याचा समय आहे, तरी श्रद्धालु साधकानें आपल्या ब्रह्मात्मत्वाची अपरोक्षता दृढ करावी, म्हणून वृत्तीचा अभ्यास सांगतों. ज्यानें देहबुद्धी निःशेष जाईल, आपली आपणास ब्रह्मात्मता दृढ होईल, इतरांस आत्मता संभवणार नाहीं, व ब्रह्मात्म्यास परोक्षत्व येणार नाहीं, तोच अभ्यास सांगतों.

## वृत्तीचा अभ्यास.

अभ्यास म्हणजे सगुण निर्गुण उपासना. केवळ विचारानें अपरोक्षास जाणणारे, व तो लयसाक्षी जाणून त्या एकरूप निःसंशय अद्वय परमात्म्यास पावणारे असे अधिकारी थोडे, म्हणून मंदप्रज्ञ अधिकाऱ्यानें विचारानें व अभ्यासानें लयसाक्षी जाणावा, व तो दृढ होण्याकरितां वृत्तीनें खलावा. हिचेंच नांव उपासना. रविदत्ता, तूं ही उपासना कर जा. मागें तुला उपासना म्हणजे अभ्यास असें सांगितलें होतें. उपासना आणि अभ्यास हीं दोन्हीही एकरूप आहेत, म्हणून साधकानें ही अभ्यासरूपी उपासना निरूपण ऐकून दृढतर करावी.

## श्रद्धालुर्ब्रह्मतास्वस्य चिंतयेद्बुद्धि वृत्तिभिः ॥
## वाक्यवृत्त्या यथाशक्त्या ज्ञात्वातव्भ्यस्यतां सदा ॥

श्रद्धालु जो येणें आपुली । स्वकीय ब्रह्मता यथार्थ निवडिली । लयसाक्षित्वाची प्रतीति जे बाणली । ते चिंतावी बुद्धिवृत्तीनें
हेचि ऐशी वाक्यवृत्ति । तेणें कडून यथाशक्ति । अनुक्रमें जाणून यथारीतीं । सदां अभ्यासावी ॥ ५०५६ ॥

### श्रद्धालुर्ब्रह्मतास्वस्य ॥

श्रद्धालु जो लयसाक्षीज्ञाता । जो निरोपिला पूर्वश्लोकी आतां । तेणें जाणिली जे स्वकीय ब्रह्मता । विचारें कीं अभ्यासें
तेचि अपरोक्ष जरी जाणिली । तरी ते दृढ अपरोक्षता नाहीं बाणली । कारण कीं संशयाची मुळी खांदली । नाहीं निपटुनी
क्षणां ब्रह्मता आठवे वृत्ति । अहंब्रह्म लयसाक्षीची प्रतीति । क्षण एक उठेल मागुती । अहं देह म्हणोनी ॥ ५९ ॥
आणि स्फूर्तीपासून जे बत्तीस । मिथ्यात्वें विवेचिले असतां फोस । तयां मागुतां नामरूपास । सत्यता येतसे ॥५०६०॥
म्हणसी अनात्मत्वें जें त्यागिलें । तें स्वात्मत्वें केवीं जाय घेतलें । आणि मिथ्यात्वें विवेचून अव्हेरिलें । तया सत्यत्व ये कैसें
तरी अवधारीं देह व्यापारतां । वृत्तीनें इंद्रियद्वारां विषय घेतां । उठेल किंचित देहादि अहंता । तेणें सत्यत्वही ये सर्वा ६२
अमुक एक पुण्यात्मक घडलें । तेव्हां सहजच वाटे म्यां चांगुलें केलें । हेंच कीं देहबुद्धीसी घेतलें । स्वयें ब्रह्मत्व त्यागुनी
अमुक एक पापात्मक घडे । तेव्हां सहज दुश्चितपणा जोडे । हेंचि कीं देहबुद्धीचें सांकडें । घेतलं ब्रह्मत्व त्यागूनी ६४
हें असो वृत्तीचा अभ्यास जया । ऐसें गुप्तत्वें उत्थान होय तया । परी नूतन अभ्यासी जाणें जरी लया । तया तो विशेषे उठे
विशेष म्हणजे देह व्यापारतां । मीच असें पापपुण्याचा कर्ता । हें भोगणेंच लागे आवश्यकता । केलें तें न चुके ॥६६॥
ऐसा संशय जरी कर्तेपणाचा । तो जन्माचि पावेल अवश्य साचा । ब्रह्मत्व जाणोनीही अज्ञानाचा । सहसा पाश तुटेना
विशेषें अहंता जन्मास घाली । हें तों बोलणेंचि नको बोली । परी गुप्तत्वें जे अहंता घेतली । तेही प्रवाहीं पाडी ॥६८॥
ऐशी गुप्त अथवा विशेष अहंता । उठल जरी ब्रह्मत्व जाणतां । तेणेंचि मिथ्यासी येतसे सत्यता । आणि भेदही नामरूपा
ऐसाविक्षेपाचापडेलघाला । कारण वृत्तीसीअभ्यासनाहींजाहला । म्हणोनिसाधकेंअगत्य पाहिजे केला । अभ्यासबोलिजेतैसा

### चिंतयेद्बुद्धि वृत्तिभिः ॥

जे ब्रह्मता लयसाक्षी देखणी । जे विलक्षण सर्व सविकल्पांहूनि । तेचि एकतान बुद्धि वृत्तीकडूनी । अविस्मर चिंतावी ७१

---

श्रद्धालु साधकानें आपली ब्रह्मात्मता निवडिली आहे, व लयसाक्षीत्वाची जी प्रतीति ती बाणलेली आहे. तीच प्रतीति बुद्धिवृत्तीनें चिंतावी, हिलाच वाक्यवृत्ति असें म्हणतात. या वाक्यवृत्तीचे योगानें यथाशक्ति अनुक्रमानें जाणून सदां अभ्यासावी, आपली ब्रह्मात्मता अपरोक्ष जरी जाणिली तरी ती दृढ अपरोक्षता बाणिली नाहीं. कारण कीं, संशय निःशेष घालविला नाहीं, त्यामुळें क्षणभर बुद्धीस व वृत्तीस ब्रह्मता आठवेल, क्षणभर अहंब्रह्म लयसाक्षीची प्रतीति आठवेल, व क्षणभर मी देह असें आठवेल. तसेंच स्फूर्तीपासून जीं बत्तीस तत्त्वें मिथ्यत्वानें फोस आहेत असें विवेचन केलें असतांही त्या नामरूपास पुनः सत्यता येईल.

शंका—तूं म्हणशील कीं, अनात्मा समजून ज्याचा त्याग केला त्याच मी असें मानून कसें घेतलें जाईल, तसेंच विवेचनानें जें मिथ्या समजून टाकिलें त्यास सत्यता कशी येईल ?

उत्तर—देहव्यापार होत असतां इंद्रियद्वारा वृत्ति विषय घेईल, तेव्हां तेथें किंचित् देहअहंता उत्पन्न होईल, तेणेंकरून सर्वास सत्यता येईल. कांहींएक पुण्यात्मक झालें म्हणजे सहज वाटेल कीं, हें मीं चांगलें काम केलें. कांहींएक पापात्मक झालें म्हणजे सहज वाटेल कीं, हें मीं वाईट काम केलें. हीच स्वतांचें ब्रह्मत्व टाकून देहबुद्धि घेतली जाईल. हें असो, ज्याला वृत्तीचा अभ्यास आहे त्याचें असें गुप्तत्वानें उत्थान होतें; परंतु नवीनच जो लयाचा अभ्यास करणारा त्याचें विशेष उत्थान होतें. म्हणजे देहव्यापार होत असतां तो पापपुण्याचा कर्ता मीच असें मानितो. याप्रमाणें जे केलें तें मला अवश्य भोगावें लागेल चुकणार नाहीं. असा कर्तेपणाचा जर त्याला संशय आहे तर तो अज्ञान, ब्रह्मत्व जाणूनही अज्ञानच राहील. त्याच्या अज्ञानाचा पाश सहसा तुटणार नाहीं. त्याची विशेष अहंता त्यास जन्मास घालील, हें तर सांगावयासच नको. पण तो जी गुप्तत्वानें अहंता घेईल तीही त्यास जन्ममरणांत घालील. याप्रमाणें गुप्त अथवा विशेष अहंता जर उत्पन्न झाली तर ती ब्रह्मात्मत्व जाणूनही, मिथ्या पदार्थांस सत्यत्व आणून नामरूपाचा भेद उत्पन्न करील. याप्रमाणें विक्षेपाचा घाला वृत्तीस अभ्यास झाला नसल्य मुळें पडेल, म्हणूनच साधकानें आम्ही सांगूं तसा अभ्यास केला पाहिजे.

लयसाक्षित्व पहाणारी ब्रह्मात्मता जी सर्व सविकल्पाहून विलक्षण आहे तीच एकतान बुद्धिवृत्तीनें न विसरतां चिंतावी.

वृत्तीचीं अथवा मनबुद्धीची । भलती अवस्था या उपाधीची । तरी आपुली ब्रह्मता जे लयसाक्षित्वाची । कदांविसरूंचिनये
मनबुद्धि जरी नुद्भवतां । नुसधी वृत्ति उठे निर्विकल्पता । तरी या वृत्तीचा मी आत्मा जाणता । हे वृत्ति मिथ्या स्मरावी
अथवा वृत्तियोगें मनबुद्धि उठे । तेव्हां मननरूप स्वप्न अंतरीं उमटे । तें असो वाईट कीं गोमटें । परी अहमात्मा विसरूं नये
मी आत्मा ब्रह्मसाक्षी साचा । त्याहूनीभिन्नथार्तेंउभारायाचा । वृत्ति मनबुद्धि आणि आभासाचा । वाउगा रज्जुसर्पभ्रम
तेचि प्रारब्धभोगाचिये बळें । मन बुद्धि इंद्रियद्वारा उडळे । शुभाशुभ घेतां विषयसोहळे । परी विस्मरण पडूं नये॥५०७६॥
वृत्ति मनबुद्धि प्राण इंद्रिय । आणि गोलकासहित स्थूलकाय । शब्दस्पर्शादि नानाविषय । हे विवेचिले जैसे ॥७७॥
या इतुकियाही नामरूपासी । पृथक सत्व नव्हेचि सर्वांसी । आहे तें अस्ति भाति प्रियरूपेंसी । एकलें ब्रह्म विराजे ७८
तस्मात् तेंचि ब्रह्मात्मत्व आपुलें । विसरूंचि नये कांहीं केलें । नामरूप जाहलेंचि नाहीं पहिलें । त्यावरी उमसूंच न द्यावें
मग आवस्था यया बुद्ध्यादिकांची । भलतैशीअसोयथारुची । जागृत्स्वप्नसुषुप्तियाप्रवृत्तीची । कींनिवृत्तिसमाधीरूप ऐशी
प्रवृत्ति म्हणिजे बहिर्मुखता । निवृत्ति म्हणिजे अंतर्मुखता । परि हे मिथ्या आणि सत्य ब्रह्मात्मता । कदां विसरूं नये
अत्यंत सुखानें असो सुखी । कीं अत्यंत दुःखानें होवो दुःखी । अथवा प्राणांत जरी होतां शेखीं । विस्मरण न पडावें८२
क्षणएक विस्मर जरी होतां । बलात्कारें स्मरावें तत्त्वतां । इतुक्या विस्मरणें वाटावें चित्ता । कीं काय घात जाहला असे
येथवरी प्रतिज्ञा वृत्तीनें करावी । कीं निमिषार्ध जरी विस्मृति व्हावी । तरी मज गुरुहत्या संभवावी । ब्रह्महत्यादि तों अनंत
पुन्हां करुणा भाकावी गुरुसी । कीं म्यां प्रतिज्ञा केली जे ऐशी । हे दयाळुवा न्यावी सिद्धीसी । आपुलिया कृपें ८५
निमिषार्ध विस्मरण न पडावें । आणि हे गुरुहत्यादि न घडावे । ऐसें प्रार्थूनियां स्मरत जावें । भयातुर होऊनी ॥ ८६
ऐसा व्यापार आणि ब्रह्मात्मा स्मृति । एकतान असावी भलते अवस्थेप्रती । जागें जाहलियापासून गाढ लागे सुप्ति ।
तोंवरी विस्मृति न व्हावी ॥ ८७ ॥
जागरीं अथवा कल्पनेआंत । स्मृतीचा लोटे जरी विस्मृतीरहित । तरी सुप्तीमाजींही अकस्मात् । स्मरणाचेंचि फळ घडे

---

वृत्तीची अथवा मनबुद्धीची म्हणजे या उपाधीची भलती अवस्था असो, परंतु आपली लयसाक्षित्वाची जी ब्रह्मात्मता ती कधींही विसरूं नये. मनबुद्धि उत्पन्न झाली नसतां नुसती निर्विकल्प वृत्ति उठली तरी त्या वृत्तीचा मी जाणता आत्मा आहे व ही वृत्ति मिथ्या आहे असें स्मरावें. अथवा वृत्तीच्या योगानें मनबुद्धि उत्पन्न झाली तर अंतरांत मननरूप स्वप्न उत्पन्न होईल. तें स्वप्न चांगलें किंवा वाईट असो, पण मी आत्मा आहे हा विसर पडूं नये. मी ब्रह्मात्मा साक्षी खरा आहे. मजखेरीज निराळीं मन, बुद्धि, वृत्ति, आभास हीं दिसतात, परंतु तीं रज्जुसर्पभ्रमाप्रमाणें मिथ्या आहेत. तींच प्रारब्धभोगबलाचे योगानें मनबुद्धि इत्यादि उठून इंद्रियद्वारानें विषय घेत असतां शुभाशुभ जें घडेल तें मनांत न आणितां आपली आठवण ठेवावी.

वृत्ति, मन, बुद्धि, प्राण, इंद्रियें आणि गोलकासहित स्थूल देह, शब्द स्पर्शादि विषय या सर्व नामरूपास पृथक् सत्व नाहीं, तर जें आहे तें अस्तिभातिप्रियत्वानें एकटें ब्रह्म आहे. म्हणून तेंच आपलें ब्रह्मात्मत्व कांहीं झालें तरी विसरूं नये. वास्तविक नामरूपें पूर्वी झालेलीं नाहींत, म्हणून तीं आतां भासलीं तरी आहेत असें मानूं नये. मनबुद्धि इत्यादिकांची जागृति, स्वप्न किंवा झोंप किंवा प्रवृत्ति म्हणजे बहिर्व्यापार व निवृत्ति म्हणजे अंतरमुखता, भलत्याही जशा असतील तशा अवस्था असोत, परंतु त्या मिथ्या, व माझी ब्रह्मात्मता सत्य आहे हें कधींही विसरूं नये. अति सुखानें सुखी असो किंवा अति दुःखानें दुःखी असो अथवा शेवटीं प्राणांतही होवो, परंतु आपलें विस्मरण पडूं देऊं नये. क्षणभर जर विस्मरण झालें तर बलात्कारानें आपलें स्मरण करावें आणि क्षणभर विस्मरण झाल्याचें चित्तास वाटावें, कीं केवढा हो हा मोठा घात झाला. वृत्तीनें अशी प्रतिज्ञा करावी कीं, जर मला निमिषार्ध विस्मृति पडेल तर गुरुहत्त्या घडल्याप्रमाणें होईल. तसेंच ब्रह्महत्या तर अगणितच घडल्याप्रमाणें होतील. असें झाल्यावर गुरूची प्रार्थना करावी, आणि म्हणावें कीं, मीं जी वर सांगितल्याप्रमाणें प्रतिज्ञा केली आहे ती आपल्या कृपेनें सिद्धीस न्या. निमिषार्ध विस्मरण पडल्यानें गुरुहत्या घडेल ती न घडावी म्हणून भयभीत होऊन प्रार्थना करून आपणास स्मरत असावें. याप्रमाणें व्यापार आणि ब्रह्मात्मस्मृति हीं भलत्याही अवस्थेंत एकतान असावी. जागे झाल्यापासून गाढ झोंप लागेपर्यंत आपणास विस्मृति होऊं देऊं नये. जागृतींत किंवा कल्पनेंत अविस्मर अखंड स्मृतीच मुळीं असेल तर झोंपेंतही तेंच स्मरण राहील, म्हणजे स्मरणाचें फळ घडेल.

कारण कीं तेथें अन्याभाव नसे । सामान्य एकरूप निर्विकल्प असे। नेणीव कल्पिली होती ते नासे। अभ्यासें स्मृतीच्या
एवं स्वप्न जागृति सुप्ती समाधि । मृत्यु मूर्च्छा कीं आधि व्याधी । परी हे विस्मृतचि न पडावी कधीं । ब्रह्मात्मत्वाची
ऐशिया ब्रह्मात्मत्व अनुसंधाना । संतीं नाम ठेविलें उपासना । जेथें उपास्य उपासक असेना। भेद कल्पांतीं ॥ ९१ ॥
याचि उपासनेचे प्रकार दोन । एक सगुण एक निर्गुण। हें साकल्य पुढें करूं वर्णन । परी श्लोकार्थ आधीं अवधारा

**वाक्यवृत्त्या यथाशक्त्या ज्ञात्वात्वभ्यस्यतां सदा ॥**

वाक्यवृत्तीच्या योगेंकडून । साकल्य जाणावें लयसाक्षिज्ञान । तेंचि स्मरणरूप अनुसंधान । सदा अभ्यासावें ॥ ९३ ॥
यथाशक्त्या ऐसें जें वचन । येथें भावील कोणी भिन्न । कीं जितुकें कळेल तितुकेंचि जाणून । स्वस्थ रहावें ॥ ९४ ॥
तरी ऐसा याचा अर्थ नव्हे। यथार्थ जाणिल्याविण समाधान न संभवे। तस्मात् साकल्यत्वें लागे जाणावें। अभ्यासेंकीं विचार
यथा म्हणिजे जैसा असे तैसा। जाणावाचि लागे लयसाक्षी सहसा । शक्ति म्हणिजे सामर्थ्य अभ्यासा। असाध्य तें साधावें
सामाथ्र्यांविणहेंलयसाक्षिज्ञान। प्रतीतीसनयेयेरहोपळालागून । तस्मात् सामाथ्र्य पाहिजे तीव्रप्रज्ञ। तोचि आकळी विचारें
मंदप्रज्ञ पूर्वीं जरी असे । परी तया अभ्यासे प्रज्ञा येतसे । तया प्रज्ञेच्या सामर्थ्येंचि होतसे । लयसाक्षिज्ञान ॥ ९८ ॥
तस्मात् ऐशिया प्रज्ञेच्या शक्तीकडून। जैसा असे लयसाक्षी सच्चिद्घन। तैसा यथारीतीं साकल्य जाणून। पुढें अभ्यासावा दृढ
आतां वाक्यवृत्ति ते हे ऐशी। मागाहून निरूपणाचे सारांशीं। आलोढून आली जे तोचि अल्पशी । प्रतीति पुन्हां निरोपूं
वेदांतींचा मुख्य विषय । प्रत्यगात्मा ब्रह्माद्वय । हाचि अर्थ सांगती निश्चय । चहूं वेदांचीं वाक्यें ॥ १ ॥
सामवेदाचें वाक्य सच्छिष्यासी । श्रीगुरु सांगती तें तूं आहेसी । तेंचि साधकें श्रमणमननेंसी। प्रत्यया आणावें ॥ २ ॥
तिन्ही अवस्था ज्या होती । आणि बत्तिसांसी जाणे ते चिती । तेंचि प्रज्ञानब्रह्म निश्चितीं । ऋग्वेदाचें विचारावें ३
अहंकारादि बत्तीस निरसून । अनुभवावें तें स्वयें आपण । तेंचि वाक्य अहंब्रह्मास्मि म्हणून । एजुर्वेदाचें ॥ ४ ॥
विचारें कीं अभ्यासेंलयवृत्तीचा। करोनिस्वप्रकाशअपरोक्षसाक्षी साचा। हाचिअयमात्माअथर्वणाचा। अर्थबोले महावाक्य

---

कारण झोंपेंत सामान्य एकरूप निर्विकल्पावांचुन दुसरा भाव नाहीं. एक नेणीव कल्पिली होती ती स्मृतीच्या अभ्यासानें नाहींशी झाली.

स्वप्न, जागृति, झोंप, समाधि, मृत्यु किंवा मूर्छा किंवा आधिव्याधि असो, या सर्व अवस्थेंत कधींही ब्रह्मात्मत्वाची विस्मृति पडूं देऊं नये. या ब्रह्मात्मत्व अनुसंधानास संतांनीं उपासना हें नांव ठेविलें आहे. ज्या उपासनेंत उपास्य उपासक असा भेद कल्पांतींही नाहीं. ही उपासना सगुण आणि निर्गुन अशा दोन प्रकारची आहे. वाक्यवृत्तीच्या योगानें लयसाक्षी ज्ञान साकल्य जाणावें. आणि तेंच स्मरणरूप अनुसंधान नेहमीं यथाशक्त्या अभ्यासावें. यथाशक्त्या म्हणजे जितकें कळेल तितकेंच जाणून स्वस्थ रहावें असें कोणी मानील, तर याचा असा अर्थ नव्हे. यथार्थ जाणल्यावांचून समाधान होत नाहीं, म्हणून अभ्यासानें किंवा विचारानें साकल्यत्वें जाणावें लागतें. यथा म्हणजे जसा असेल तसा साक्षी जाणावा लागतो, शक्ति म्हणजे सामर्थ्य. त्या सामर्थ्यानें अभ्यासास जें असाध्य तें साधावें. हें लयसाक्षी ज्ञान सामर्थ्यावांचून इतरांस तीं मिथ्या असल्यामुळें अनुभव येत नाहीं. म्हणून तीव्रबुद्धीचें सामर्थ्य पाहिजे. ज्याची तीव्रबुद्धी असेल तोच विचारानें लयसाक्षी ज्ञान जाणेल. पूर्वीं मंदबुद्धि असून जर तो अभ्यास करील तर त्यास तीव्र बुद्धी होऊन तो त्या बुद्धीच्या सामर्थ्यानें लयसाक्षी ज्ञान जाणेल. याकरितां अशा बुद्धीच्या शक्तीनें लयसाक्षी असेल तसा यथा रीति साकल्प जाणून पुढें अभ्यास वाढवावा, म्हणजे दृढता करावी. आतां वाक्यवृत्ति जिला म्हणतात ती मागाहून निरूपणाचे सारांशानें आलोढून आली आहे तिचा थोडासा अनुभव पुन्हा सांगूं.

### वाक्यवृत्तीचा अनुभव.

वेदांताचा मुख्य विषय प्रत्यगात्मा ब्रह्म अद्वय आहे हाच अर्थ चार वेदांचीं चार महावाक्यें निश्चयानें सांगतात. सामवेदाचे महावाक्य श्रीगुरु शिष्यास सांगतात कीं, तें तूं आहेस तें साधकानें श्रवण-मननानें प्रत्ययास आणावें. तिन्ही अवस्था व बत्तीस तत्वांस जाणणारी जी चिती तेंच प्रज्ञान ब्रह्म. असें ऋग्वेदाचें महावाक्य सांगत आहे. अहंकारादि बत्तीस निरसून जें उरेल तें आपण ब्रह्म आहे, असा अनुभव घ्यावा. हेंच यर्जुर्वेदाचें महावाक्य सांगत आहे. विचारानें किंवा अभ्यासानें वृत्तीचा लय करून स्वप्रकाश अपरोक्ष साक्षी त्याचा अनुभव घ्यावा. हाच अथर्वण वेदाचें अयमात्मा हें महावाक्य सांगत आहे.

ऐशीं महावाक्यें चारी एकार्थी । वेदांतविषय मुख्य परमार्थी । येर निरूपण बहूधा परी यदर्थी । साधावया उपकरणें
नाना युक्ति नाना दृष्टांत । इतुक्या विषयांसी करी निश्चित । गुरुशास्त्रविचारें श्रवणमननयुक्त । दृढ अनुभवावें ॥७॥
ऐसें अनुभवून यथारीतीं । साधकें प्रज्ञेचिये शक्ती । भलतेही अवस्थेप्रती । एकतान अभ्यासावें ॥ ८ ॥
स्फुर्तीपासून तृणांत नामरूप । विसर्जावें हें सर्व सविकल्प । एक सच्चिदानंद केवळ निर्विकल्प । अहंब्रह्मरूप स्मरावें ९
सामान्य वृत्तीनें हेंचि ध्यावें । सच्चिद्घन स्मृतीनें अवलंबावें । अथवा बुद्धीनें दृढ निश्चया आणावें । स्मरावें विशेषेंही
हें असो अंतरींचें स्मरण । करणें हें विहिताचि एकतान । परी वाणीसीही करावें उच्चारण । अहंब्रह्मास्मि म्हणोनि ११
वाक्यार्थीचें जें का व्रत । वाणी बुद्धि किंवा वृत्तींत । ठेवावें म्हणोनि हे वाक्यवृत्ति निश्चित । नाम ठेविलें असे १२
तस्मात् ऐशिये वाक्यवृत्तीचें । आवर्तन कीजे साधकें साचें । मग सामान्य विशेष कीं वाणीचें । असो उच्चारण १३
कवणेही प्रकारें आठवावें । अहंब्रह्मास्मीतें न विसरावें । नामरूप सर्वांसी नुद्भवावें । सर्व पूर्ववत असतां ॥ १४ ॥
हेंचि ध्यान हाचि निदिध्यास । हाचि साधका सर्वदा अभ्यास । बहु बोलणें तरी कासयास । हेंचि भजन वाणीचें १५
अगा रविदत्ता हेचि उपासना । सगुण निर्गुण उभयही लक्षणा । ज्ञानासी इसी सहसा । असेना भेद किमपि ॥ १६ ॥
अहंब्रह्मास्मिरूप अनुसंधान । अविस्मर साधका एकतान । भेद नुठावा अमुक म्हणून । हेचि अभेदभक्ति ॥१७॥
नामरूपाचा उद्भवचि न होतां । सर्व आहे कीं नाहीं न स्मरतां । सच्चिद्घनाकार एकरूपता । हेचि निर्गुण उपासना१८
हे बत्तीस मिथ्यात्वें आठवणें । यामाजीं सच्चिद्घनानंदा स्मरणें । किंचितही विस्मृति न होणें । हे सगुण उपासना
व्यतिरेकें लयसाक्षित्वें प्रतीति । निःसंशय द्वैताची गेली भ्रांति । हेचि निर्गुण उपासना निश्चितीं । घडे साधका ॥२०॥
सर्वांमाजीं अस्ति भाति प्रिय । सहजीं असे पूर्ण अन्वय । नामरूप नाहींच एक अद्वय । स्मरणें हे सगुण उपासना २१
सर्वपणाचे गुण निरसले । एक अनिर्वाच्य ब्रह्म उरलें । म्हणोनि तें निर्गुण ब्रह्म बोलिलें । तेंचि स्मरणें हे निर्गुण उपासना
सर्व हे गुणरूप असतां । या समवेत हे म्हणून नुद्भवतां । एकरूप सच्चिद्घनचि तत्त्वतां । हे सगुण उपासना ॥ २३ ॥

---

अशीं चार महावाक्यें परमार्थास मुख्य विषय जो वेदांत त्यांतील प्रतिपाद्य जो ब्रह्मात्मा तोच एक अर्थ दाखविणारीं आहेत. त्यांखेरीज पुष्कळ निरुपणें आहेत तीं हाच अर्थ साधावयास साहित्यें आहेत. हाच विषय खरा असें दाखविण्याकरितां अनेक युक्ति व अनेक दृष्टांत घ्यावे. तसेंच गुरु आणि शास्त्र यांच्या विचारानें श्रवणमननयुक्त होऊन दृढ अनुभवावें. याप्रमाणें अनुभव यथारीति साधकानें बुद्धीच्या शक्तीनें भलत्याही अवस्थेंत एकतान अभ्यासानें घ्यावें. स्फूर्तिपासून तृणापर्यंत नामरूपादि सर्व सविकल्प टाकावे. आणि केवळ निर्विकल्प एक सच्चिदानंद अहंब्रह्मरूप आठवावें. सामान्यवृत्तीनें हेंच ध्यावें. स्मृतीनें सच्चिद्घन स्वीकारावें. अथवा बुद्धीनें दृढ निश्चयास आणून विशेषेंकरून आठवावें. एकतान अंतःकरणांत स्मरण ठेवणें हें योग्यच आहे, परंतु वाचेनेंही अहंब्रह्मास्मी असा उच्चार करावा.

**वाक्यवृत्ति**–वाणी, बुद्धि, वृत्ति यांचे ठायीं नेहमीं वाक्यार्थीचें व्रत असणें त्यास वाक्यवृत्ति म्हणावें.

साधकानें वर सांगितल्याप्रमाणें वाक्यवृत्तीचें आवर्तन सामान्य विशेष किंवा वाणीचे उच्चारानें ज्यानें साधेल त्यानें करावें. रविदत्ता, तूं कसेंही आठव परंतु अहंब्रह्मास्मी हें विसरूं नको व सर्व पूर्ववत् असतांही नामरूप उत्पन्न होऊं देऊं नको, ह्यास ध्यास म्हणतात व हाच निजध्यास समजावा. हा निजध्यासरूप अभ्यास नेहमीं साधकास असावा. फार काय सांगूं, साधकानें वाचेनेंही हेंच भजन करावें. हे रविदत्ता, हीच सगुण निर्गुण दोन प्रकारची उपासना ह्यिच्यांत व ज्ञानांत थोडाही फरक नाहीं.

**अभेदभक्ति**–साधकास अहंब्रह्मास्मिरूप अनुसंधान विस्मृतिवांचून एकतान असावें हें अमुक असा भेद होऊं नये हीच अभेद भक्ति.

**निर्गुणउपासना**–नामरूपाचा उद्भव न होतां सर्व आहे किंवा नाहीं हें न आठवितां सच्चित्घनाकार एकरूपता हीच निर्गुण उपासना.

**सगुणउपासना**–बत्तीस तत्वें मिथ्या आहेत असें आठवणें किंचित् विस्मृति न होतां बत्तिसांत सचित्घन आहे असें आठवणें ही सगुण उपासना.

व्यतिरेकानें निःशेष द्वैताची भ्रांती जाऊन लयसाक्षित्वाचा अनुभव घेणें हीच साधकास निर्गुण उपासना घडते. सहजीं सर्वांत अस्तिभातिप्रिय आहे. तेथें नामरूप इत्यादि दुसरें कांहीं नाहीं असें आठवणें ही सगुण उपासना. सर्वपणाचे गुण घालवून जें उरलें तें अनिर्वाच्य ब्रह्म, म्हणून त्यास निर्गुण ब्रह्म असें म्हणतात. त्या निर्गुण ब्रह्मास आठविणें ही निर्गुण उपासना. गुणरूपादि हे सर्व असतां त्यास हें गुणरूप असें आठवित नाहीं, तर एक सच्चित्घन आहे असा अनुभव रहातो ही सगुण उपासना.

यागुणासहवर्तमानब्रह्मस्मरावें । म्हणोन हें सगुणउपासन म्हणावें । या गुणाविरहित ब्रह्मात्मत्व ध्यावें । हे निर्गुण उपासना
एवं सगुण अथवा निर्गुण । हे वाउगेंचि कल्पावे दोन । परी एकरूप अभेद परिपूर्ण । अद्वय उपासना ॥२५॥
सर्वदा विस्मृति न व्हावी । म्हणोनि उपासना म्हणावी । परी देवभक्त भिन्नता नाढळावी । कवणेही काळीं ॥ २६ ॥
हें सर्व कधीं उत्पन्न जाहलें । न होतां सगुण कवण बोले । तेणेंविण निर्गुण शब्द फोले । होती अनायासीं ॥ २७ ॥
मृगजल पाडिलें तेव्हांचि नसे । मग आटतां नाहीं म्हणणें काईसें । तेवीं हें उद्भवे कीं नासे । परी एकरूप ॥ २८ ॥
हें सर्व निरूपण मागें जाहलें । यथासांग साकल्यत्वें विवेचिलें । तेणेंचि रीतीं पाहिजे घेतलें । साधकें विचारें ॥ २९ ॥
आतां प्रस्तुत मिथ्या या बत्तिसां । सत्यत्वें आरोप न व्हावा अल्पसा । आणि स्वयें ब्रह्मात्मया अखंडरसा । मिथ्यात्व सहसा न यावें ॥ ३० ॥
ब्रह्मात्मा भेदाचि न व्हावा । मीपणा देहादिकांसी न यावा । इतुका वृत्तीसी दृढ अभ्यास रहावा । स्मरणरूप सदा ॥३१॥
हेचि स्मरणरूप उपासना । सगुण निर्गुण उभयलक्षणा । विस्मरण न होतां सचिद्घना । ध्यावें उभय काळीं ॥ ३२ ॥
येथें कैंचें ध्येय कैचा ध्याता । कचें साध्य कैंची साधकता । उपास्य उपासक नाढळतां । ब्रह्म ब्रह्मीं विलसे ॥ ३३ ॥
सर्व तरंगांसहित सागर । किंवा निस्तरंगरूप गंभीर । दोहीं काळीं एकचि प्रकार । सागर सागरीं ॥ ३४ ॥
तैसेंचि माये आदि तृणांत जग । हे ब्रह्मात्मचित्सागरीं तरंग । उद्भवतां निमतां चिद्घन अभंग । विलसे एकरूप ॥ ३५
ब्रह्मादि कीटकांत जंगम । गगनादि तृणांत स्थावर नाम । हे इतुकेही ब्रह्मात्मत्वीं सम । नग सुवर्ण जेवीं ॥ ३६ ॥
ब्रह्मरूप तोचि हा आत्मा । आत्मरूप ब्रह्म परमात्मा । नामरूपादि नाहींच अनात्मा । जड कीं चंचळ ॥ ३७ ॥
कीटक तोही ब्रह्मात्मा आपण । विष्णु तोही आपणाचि पूर्ण । बहु कासया तृणही नव्हे भिन्न । ब्रह्मात्मया रहित ३८॥
आपुला देह आणि विष्णु कीटक । गगन तृणादिक हीं समान एक । दुजा भाव नाहींच निश्चयात्मक । ब्रह्मात्माचि परिपूर्ण
ऐसा एकरूप आपण आपणांत । आपुलेपणें एक सबराभरित । उपास्य उपासकाविण उपासीत । हे घबाड उपासना॥४०॥

---

गुणासहवर्तमान ब्रह्म आठवणें तीस सगुण उपासना म्हणतात. गुण टाकून ब्रह्मात्मत्वास ध्यास असणें ही निर्गुण उपासना. सगुण आणि निर्गुण हे उपासनेचे दोन प्रकार उगाच मानितात. वास्तविक ही एकच उपासना आहे. कारण यांत एक रूप अभेद अद्वय उपासना होते.

उपासना—कधींही ब्रह्माचा विसर पडूं नये म्हणून तीस उपासना असें म्हणतात.

उपासनेंत देव आणि भक्त अशी भिन्नता कधींही आढळूं नये.

हें सर्व कधींही उत्पन्न झालें नसतां मग सगुण असें कोण म्हणेल ? हें सर्व नसल्यामुळें निर्गुण शब्दही मृगजलाप्रमाणें निष्फळ झाला. जसें मृगजल पडलें तेव्हांच जर नाहीं तर तें आटल्यावर नाहीं हें बोलावयासच नको. तसें हें सर्व जग उत्पन्न होवो किंवा नासो पण एकरूप ब्रह्म आहे तसें आहे. हें सर्व निरूपण मागें यथासांग साकल्यत्वानें विवेचिलेलें आहे तसेंच साधकानें घेतलें पाहिजे. मिथ्या बत्तीस तत्वांस सत्यत्व थोडेंही येऊं नये, व आपण जो ब्रह्मात्मा त्यास कधींही मिथ्यत्व येऊं नये. ब्रह्मात्म्याचे ठायीं भेद वाटूं नये. देहादिकांस मीपण येऊं नये. इतका वृत्तीस नेहमीं दृढ अभ्यास स्मरणरूप रहावा. हीच स्मरणरूप सगुण निर्गुण दोन प्रकारची उपासना. या उपासनेनें विस्मरण न होतां सचित्घनास ध्यावें. वास्तविक वर सांगितलेल्या उपासनेंत ध्येय नाहीं, ध्याता नाहीं, साध्य नाहीं, साधकता नाहीं, उपास्य नाहीं, उपासक नाहीं; हें कांहींच भेद लक्षण नसतां एकटें ब्रह्म ब्रह्माचें ठायीं विलसत आहे. सर्व तरंगासह समुद्र किंवा तो निस्तरंगरूप गंभीर समुद्र आहे. या दोन काळीं किंवा स्थितींत एकच प्रकार, समुद्र समुद्राचे ठायीं आहे, तसें मायेपासून तृणापर्यंत सर्व जग हें ब्रह्मात्मचित्सागरीं तरंगवत् आहे. तें उत्पन्न होवो किंवा लय पावो चित्घन अभंग एकरूप विलसत आहे.

ब्रह्मदेवापासून किड्यापर्यंत जंगम, व गगनापासून तृणापर्यंत स्थावर, हें ब्रह्मात्म्याचे ठायीं जसें सोन्याचे ठायीं नग तद्वत् आहे. ब्रह्मरूप तोच हा आत्मा, आत्मरूप ब्रह्म परमात्मा. जड चंचळ नामरूपादि अनात्मा मुळींच नाहीं. किडा तोही आपण ब्रह्मात्मा. विष्णु तोही आपण ब्रह्मात्मा. फार काय सांगावें ब्रह्मात्म्यावांचून गवतही निराळें नाहीं, तेंही ब्रह्मात्माच आहे. आपला देह, विष्णु, कीटक, गगन, तृण इत्यादि सर्व समान एक ब्रह्मात्मा आहे, तेथें दुसरा भावच नाहीं. असा एकरूप आपण आपणांत आपलेपणानें सबराभरीत उपास्य उपासकावांचून उपासित आहे. ही घबाड उपासना.

ऐशी अभेद भक्तीची उपासना। घडेल साधका ज्ञानसंपन्ना । हे पाववील सहजस्थितीसी पूर्णा । ऐसें बोलणें नको ४१
तो आधींच सर्वपणासहित । निजांगें ब्रह्म होऊन विचरत । तयासी बंधमोक्षाचा संकेत। उरलाचि नाहीं ॥ ४२ ॥
तो साधकही सहसा म्हणों नये। तो सर्वात्मा एकरूप अद्वय । ध्याता ज्ञाताही म्हणणें काय । जरी स्मरे साधकत्वें ४३
ऐशी हे घबाड उपासना। इजसम दुजी असे कवणा । कवण मेळवील कैवल्या पूर्णा । इसी अव्हेरूनी ॥ ४४ ॥
साकार ध्यान ज्ञानेंविण । सर्व ब्रह्मात्मा नेणतां परिपूर्ण । तयेसी उपासना नामाभिधान । परी कैवल्यमुक्ति अप्राप्य
हें साधकें मौनेंचि समजावें। उगोंचि कासया विस्तारावें। एकदेशी तें नलगेचि बोलावें । अल्प म्हणोनी ॥ ४६ ॥
असो सर्वात्मत्व सबराभरित । अकृत्रिम द्वैतेंविण उपासीत । तयासी बैसणें नको निवांत । नेत्र झांकोनी ॥ ४७ ॥
नलगे एकांत आसनविधि । नलगे प्राणायाम समाधि । नलगे माळ गवाळें सोडबांधी । पुस्तकादि संबळीची ॥ ४८ ॥
नलगे पूर्वोत्तर ब्राह्मी मुहूर्त। नलगे काश्यादि देश शुचिष्मांत। नलगे स्नानादि उपकरणें बहुत । नको आचार कर्मठाचा
नलगे उपोषण तांबूलवर्जन । नलगे व्रत नियम देह समान । नलगे जप हवन तर्पण । पुरश्चरणरूप विधि ॥ ५१५० ॥
ऐसें कोणतें नको निर्बंधन । वाणीसिही नलगे मौन । आणि एकाग्रही नको मन । रोध वृत्तीचा ॥ ५१ ॥
चालतां बैसतां भाषण करितां । कीं अन्य भोजनादि क्रिया समस्ता । शयनीं कीं पाहतां ऐकतां । स्मरण मात्र असावें
म्हणसी अन्य व्यापारीं विस्मर पडे । तरी ऐसें कदापिही न घडे । ध्यासें स्मरतसे धडफुडें । अभ्यासें पूर्वापर ॥ ५३ ॥
तथापि निमिषार्ध जरी विस्मरतां। हें जीवन्मुक्तिव्रत नव्हे तत्त्वतां । कीं भंगेल फळ नव्हेल आतां । ऐसें तों नव्हे ॥ ५४
आणि निमिषार्ध विस्मृतीनें । देहादिकां नेघे अहंपणें । इतुका अवसर कदा न होणें । स्मरे झडकरी ॥ ५५ ॥
विस्मृति कांहीं बाधक नसे । देहबुद्धि घेतां बाधक असे । तरी ते देहबुद्धि निश्चया येतसे । इतुका कैंचा ॥ ५६ ॥
तस्मात् बोलतां चालतां । सर्व व्यापार होत असतां । सदा स्मरावें अखंडिता । नामरूपा त्यागूनी ॥ ५७ ॥

---

अशी अभेद भक्तीची उपासना ज्या ज्ञानसंपन्न साधकास घडेल त्यास ही उपासनारूप सहजस्थितीच पाववील, हें सांगावयासच नको. तो आधींच सर्वपणासह निजांगें ब्रह्म होऊन विचरत आहे, म्हणून त्यास बंधमोक्ष हें कांहींच उरलें नाहीं व त्यामुळेंच त्यास साधक असेंही म्हणूं नये. तो सर्वात्मा एकरूप अद्वय आहे. तो जरी साधकत्वानें स्मरत असला तरी त्यास ध्याता किंवा ज्ञाता हेंही म्हणूं नये. या घबाड उपासनेसारखी दुसरी कोणतीच उपासना नाहीं, कीं जी पूर्ण कैवल्यास मिळवील. परिपूर्ण सर्व ब्रह्मात्मा न जाणतां ज्ञानावांचून साकार ध्यान करणें त्यास उपासना असें नांव मात्र आहे, परंतु तिच्या योगानें कैवल्य मुक्ति प्राप्त होत नाहीं. उगीच फार कशाला सांगूं, हें साधकानें मुकाट्यानेंच जाणावें. साकार ध्यानादि उपासना एकदेशी आहेत, म्हणून त्या अल्प आहेत, हें सांगावयासच नको. असो. सबराभरीत जें सर्वात्मत्व त्याची अकृत्रीम द्वैतावांचून उपासना जो करितो त्यास नेत्र झांकून निवांत बसण्याची गरज नाहीं. त्यास एकांत नको. आसनविधी नको. प्राणायाम नको. समाधि नको. गळ्यांत माळ नको. गवाळें नको. संबळी नको. पुस्तक नको. पूर्वोत्तर ब्राह्मी मुहूर्त नको. काशीआदि-करून पवित्र देश नको. स्नान आदिकरून बहुत उपकरणें आहेत तींही नको. कर्मठपणा नको. उपोषण नको. तांबूल वर्ज्य नको. व्रत नियम नको. जप नको. हवन नको. तर्पण नको. पुरश्चरण नको. वाणीस मौन नको. मन एकाग्र नको. वृत्तीचा रोध नको. याप्रमाणें कोणतेंच निर्बंधन नको. तर चालतां बोलतां भाषण करीत असतां किंवा भोजनादिक दुसऱ्या क्रिया करीत असतां पहात असतां ऐकत असतां किंवा निजतांना मी ब्रह्म असें स्मरण मात्र असलें पाहिजे. तूं म्हणशील कीं, वर सांगितल्याप्रमाणें अन्य व्यापार करूं लागलें असतां विस्मृति पडेलच, तर असें कधींहीं व्हावयाचें नाहीं. ध्यासानें साधारण स्मरण होतेंच त्यावर अभ्यासानें पूर्वापरही स्मरण होतें. तथापि निमिषार्ध जर विस्मृति पडली तर तशानें मोठासा दोष घडत नाहीं. कारण हें कांहीं जीवन्मुक्तीचें व्रत नव्हे. जिवन्मुक्तीचें व्रत मोडिल्यानें फळाचा नाश होतो. तसें हें नव्हे. निमिषार्ध विस्मृति झाल्यानें देह अहंता घेत नाहीं. देहाभिमान येई इतका अवकाशच मध्यें जाऊं देत नाहीं, तर लागलेंच तो अहंब्रह्मास्मि हें स्मरण करितो. देहबुद्धी घेतली नाहीं तर नुसतें विस्मरण बाधक नाहीं. देहबुद्धि घेतली असतां ती मात्र बाधक आहे. देहबुद्धी येईपर्यंत तो साधक मध्यें अवधीच जाऊं देत नाहीं. याप्रमाणें चालतांना बोलतांना सर्व व्यापार करीत असतांना नामरूप टाकून नेहमीं ब्रह्मास्म्यास आठवावें.

मनबुद्धीसीही नसे बलात्कार । त्याचें रंजाविणोंचि होय वारंवार । जैसे कवणासी गारुडादि प्रकार । पाहतां सीण नव्हे५८
किंवा लेंकुरासी खेळतां । आल्हादावरी आल्हाद तत्त्वतां । तैसा वृत्तीसि अधिक आधिकता । स्मरतां सुखाचि दुणावे ५९
लयासी रोध जरी असावा । तरीच स्मरणाचा त्रास घ्यावा । येथें लळाही पूर्ण व्हावा । आणि ध्यासही सुखाचा ५१६०
केव्हां एकतान तदाकार होणें । केव्हां मननरूप कीजे चिंतन । केव्हां तत्सुखाचें कीजे भाषण । परस्परें उभयानें ६१

**तच्चिंतनं तत्कथनमन्योन्यं तत्प्रबोधनं ॥**

**एतदेक परत्वं च ब्रह्माभ्यासं विदुर्बुधाः ॥ १७ ॥**

तेंचि स्मरणरूप घडावें चिंतन । तेंचि अधिकारीया करावें कथन । अथवा ज्ञात्यासी परस्परें संवादन । जेणें प्रबोध दुणावे
हेंचि एक परत्व समाधानरूप । मग असो सविकल्प कीं निर्विकल्प । हाचि अभ्यास जेथें उत्थान नसे अल्प । जाणतीपूर्ण ज्ञाते
आतां चिंतन जें कां मननात्मक । कैसें करीत असती साधक । तेंचि श्रवण करून निश्चयात्मक । तैसोंचि अभ्यासावें ६४

**तच्चिंतनं ॥**

तत् म्हणिजे तेंचि लयसाक्षि ब्रह्म । जें अनुभविलें अभ्यासें परम । वृत्ति आणि सांडोनि शून्याचा भ्रम । अपरोक्षें निजांगें
तेंचि मागुती मायादि तृणांत । स्फूर्ति उठतांही समस्तांत । नामरूप विसर्जून सबराभरित । अनुभाविलें ब्रह्म ॥ ६६ ॥
ऐसें जें ब्रह्म तेंचि स्वयें आपण । त्रिविधा परी प्रतीतीकडून । बाणलें तया ब्रह्मात्मयाचें चिंतन । सदा ध्यासें करी ॥६७
अहो अहोजी सदगुरुनाथ । केवढा मोक्षध्वजरूप परमार्थ । गगनीं उंचावला किंचित अनर्थ । जेथें उरला नाहीं ६८ ॥
धन्य धन्य आम्हीं परमार्थी । लागलों पावलों वेदांत सार्थी । अन्य मायादिकांचा अर्थाअर्थी । संबंध उरला नाहीं ॥ ६९
अहो कायहो शास्त्र वेदांत । संशयाचि दवडिला अज्ञानासहित । एकाएकीं सर्वात्मा मी अनंत । तया चुकलिया भेटविलें
मी केवढा किती हो परिपूर्ण । जयातें जाणेना वृत्यादि मन । शेखीं स्वयें आपणासी आपण । जाणावया दृश्य नव्हे७१
परी सर्वज्ञ मी सर्व वृत्तीसहित । अकृत्रिमपणें असें जाणत । शेखीं लयही शून्यरूप प्रकाशित । माझिया प्रकाशें होय
तोचि मी स्वप्रकाशरूप अपरोक्ष । न जाणोनि जाणतसें स्वयें प्रत्यक्ष । ऐशिया मज ब्रह्मात्मया मोक्ष । तरी कोठें बंधाभावी

---

अशानें मनबुद्धि यांस बलात्कार करावा लागत नाहीं, तर त्यास वारंवार रंजविणेंच होतें. जसें कोणासही गारुडादि प्रकार पहात असतां श्रम वाटत नाहींत, तसा मनादिकांस याचा त्रास वाटत नाहीं. तसेंच मुलांस खेळत असतां विशेष आनंदाची वृद्धीच होते, त्याचप्रमाणें वृत्तीस स्मरणानें अधिकाधिक सुखच वाटतें. स्मरण करण्यास रोधाची गरज असती तर त्याचा त्रास आला असता; परंतु त्यांत रोध करावा लागत नसल्यामुळें त्रास न वाटतां उलटा त्यांचा लाडच वाढतो, आणि सुखाचा ध्यास लागतो. केव्हां एकतान तदाकार व्हावें किंवा केव्हां मननरूप चिंतन करावें किंवा केव्हां त्या सुखाचें एकमेकांशीं संभाषण करावें.

तेंच स्मरणरूप चिंतन व्हावें. तेंच अधिकारी साधकास सांगावें. अथवा ज्ञात्याबरोबर परस्पर संभाषण करावें. तें असें कीं, जेणेंकरून प्रबोध वाढेल. हेंच एक परत्व समाधान. ज्यांत अल्पही उत्थान सविकल्प किंवा निर्विकल्प असतांहीं नाहीं असा हाच एक अभ्यास पूर्ण ज्ञाते जाणतात. आतां मननात्मक चिंतन साधक कसें करीत असतात तें ऐकून तसेंच अभ्यासावें. जें लयसाक्षी परब्रह्म, अभ्यासानें वृत्ति आणि शून्याचा भ्रम टाकून अपरोक्षत्वें अनुभाविलें आहे, तेंच पुन्हा स्फूर्ति उठून मायेपासून तृणापर्यंत सर्वांत नामरूप टाकून सबराभरीत अनुभविलेलें जें ब्रह्म, तेंच आपण स्वतां त्रिविधा प्रतितीनें आहें असें वर्णिलें आहे. त्या ब्रह्मात्म्याचें चिंतन सदा ध्यासानें करितो.

रविदत्त सद्गुरूची प्रार्थना करून म्हणतो. आमचा मोक्षध्वजरूप परमार्थ गगनास लागे असा वाढला आहे; ज्यांत किंचितही अनर्थ उरला नाहीं. आम्ही परमार्थ करण्यास लागून वेदांताचे अर्थास पावलों. आम्हांस त्यांखेरिज मायादिकांचा अर्थाअर्थीसंबंध राहिला नाहीं, म्हणून आम्ही धन्य. कायहो हें वेदांत शास्त्र ! यानें अज्ञानासह संशयच नाहींसा केला. आणि सर्वात्मा जो मी अनंत त्याला मी चुकलों होतों तो एकाएकीं भेटलों ! ज्याला वृत्ति, मन जाणूं शकत नाहींत तसेंच तें दृश्य नसल्यामुळें तो ब्रह्मात्मा जो मी त्या मला मी जाणूं शकत नाहीं. असा हा मी केवढा किती परिपूर्ण आहे ! मी सर्वज्ञ सर्व वृत्तीसहीत सर्वांस अकृत्रिमपणें जाणत आहें. तसेंच वृत्यादिकांचा शून्यरूप लय मी आपल्या प्रकाशानें प्रकाशित आहें. तोच मी स्वप्रकाशरूप अपरोक्ष न जाणून प्रत्यक्ष जाणत आहें. अशा मज ब्रह्मात्म्यास बंधाच्या अभावीं मोक्ष कोठें आहे !

ऐसामीअनंतकल्पकजरीहोतां । तरीस्पर्शलीचनव्हतीमजद्वैतवार्ता । वाउगीचकींधरिलीहोती अहंता । देहबुद्धीचीअज्ञानें
तेंचिसद्गुरुनाथेंमाझेंमजला । निजरूपदाऊनीभ्रमनिवारिला । आतांमजम्यांजाणतांस्वकीयत्वाला। अज्ञान निपटून गेलें
तें अज्ञान हें सर्व ब्रह्मांड धुंडितां। आढळेना कीं कोठें तत्त्वतां। हेंही बोलणेंचि न शोभे आतां। नवतें तें गेलें कैसें ७६
हेंअसोअज्ञानतोंनाहींच नाहीं। परी या ब्रह्मांडीं दुजें नसेचि कांहीं। नामरूप नाढळोचि सर्वथाही। मज ब्रह्मात्मयावांचूनी
मी ब्रह्मात्मा स्वयमेव उघडा। जेथें दुजेपणाचा न ये शिंतोडा। ओतप्रोत सबराभरित रोकडा। अनुभाव्य परिपूर्ण ७८
ऐसा उघड परिपूर्ण असोनी। जाणवेना कवणा लागोनी। न जाणवे परी परता सारी कोणी। ऐसा त्रिभुवनीं नाहीं
तस्मात् लोपलों ना प्रगटलों। परिपूर्ण आद्यंत तैसाच संचलों। अनंत अनंतत्वीं दाटलों। एकरूप तिहीं काळीं ॥५१८०
मेरु आदि जंबुद्वीपीं असे। अथवा काश्यादि तीर्थीं वसे। आणि अन्य द्वीपीं कीं कुग्रामीं नसे। ऐसा देशपरिच्छेद नाहीं
कृतयुगाच्याठायींप्रगटे। अथवाशीतकाळाकींपर्वणीसीउमटे। आणिकलियुगींकींदुर्दिनीं वोहटे। ऐसा कालपरिच्छेद नाहीं
उत्तम पदार्थीं कीं शिवादिकांचे देहीं। वसून राहिलों सर्वदाही। हीन पदार्थीं कीं कीटकीं नाहीं। ऐसा वस्तुपरिच्छेद नसे
सर्व देशांसहित पिंडब्रह्मांड। व्यापोनि उरलों असें उदंड। भलतेकाळीं असोंचि अखंड। आणि सानथोरा पदार्थीं ॥८४
अमुक एक पदार्थ असे रिता। ऐसा नाढळे अणुही धुंडितां। क्षण एक लोटेना मज परता। आणि देश कैंचा उरे ८५
ऐसा मी त्रिधा परिच्छेदविहीन। परिपूर्ण अनंत एक चिद्घन। कोण तो दुजा असे मजसमान। सच्चिदानंदरूपी॥ ८६
चेतनाविशीं जरी जीवशिव। चिद्रूपें दिसती एक स्वभाव। परी ते माझीं प्रतिबिंबें स्वयमेव। वास्तविक कैंचे मजऐसे
तरी सजातीय भेद मजवरी। कोण बलात्कारें आरोप करी। मी एकलाचि एकपणें चराचरीं। आद्यंत तैसाचि मध्यें
जड चंचळही पदार्थ दोनी। सत्यत्वें नसतीच मजहूनी। तरी विजातीय भेद कल्पील कोणी। कैसा तो नेणवे ॥ ८९ ॥

---

याप्रमाणें जरी अनंत कल्पें झालीं तरी मला द्वैताची वार्ता स्पर्शली नव्हती. वास्तविक मी देहअहंता अज्ञानानें उगीच धरिली होती. माझें जें निजरूप तें सद्गुरूंनीं मला दाखवून भ्रम घालविला. आतां माझा मी आपल्या स्वकीयत्वाला जाणत असतां अज्ञान निःशेष गेलें. तें अज्ञान सर्व ब्रह्म धुंडिलें तरी त्याचेठायीं मिळावयाचें नाहीं; हेंही बोलणें संभवत नाहीं कीं जें नव्हतें तें कसें गेलें. हें असो. अज्ञान तर नाहींच नाहीं परंतु या ब्रह्मांडांत मज ब्रह्मात्म्यावांचून नामरूपादि दुसरें कांहींच नाहीं. ज्याचे ठिकाणीं दुजेपणाचा स्पर्शसुद्धां नाहीं असा मी ब्रह्मात्मा स्वयमेव उघडा आहें व वोतप्रोत सबराभरीत परिपूर्ण अनुभाव्यरूप आहे. असा मी परिपूर्ण उघडा असून कोणासही जाणवत नाहीं, व जाणवत नाहीं म्हणून कोणी मला दूर केला असेंही होत नाहीं. म्हणून मी लोपलों नाहीं व प्रगटलों नाहीं, तर परिपूर्ण आद्यंत जशाचा तसाच संचलेला आहे. तिन्ही काळीं अनंतत्वानें अनंतत्वांत एकरूप दाटलेला आहे.

## त्रिधा परिच्छेद.

**देशपरिच्छेद**—मेरुआदिकरून जंबुद्विपांत आहे किंवा काशीआदिकरून तीर्थीं आहे आणि अन्य द्वीपांत किंवा कुग्रामांत नाहीं असा देशपरिच्छेद नाहीं.

**कालपरिच्छेद**—कृतयुगांत प्रगटतों अथवा शीतकाळीं किंवा पर्वणीस प्रगटलेला दिसतो आणि कलीयुगांत वाईट दिवशीं नाहींसा होतों असा कालपरिच्छेद नाहीं.

**वस्तुपरिच्छेद**—उत्तम पदार्थांत किंवा शंकरादिकांचे देहांत नेहमीं बसलेला आहे आणि वाईट पदार्थांत किंवा कीटकादि प्राण्यांचे देहांत नाहीं असा वस्तुपरिच्छेद नाहीं.

सर्व देशासहित पींडब्रह्मांड व्यापून मी उदंड उरलेला आहें, लहान थोर पदार्थांत व भलतेही काळांत व्यापलेला आहे अमूक एक पदार्थ मजवांचून रिता आहे असें शोधून पाहिलें असतां अणुरेणुही रिता नाहीं. मजवांचून देश रिता नाहीं तसेंच मजवांचून काळाचा एक क्षणसुद्धां जाऊं शकत नाहीं. असा मी त्रिधापरिच्छेदरहित परिपूर्ण अनंत एक चित्घन आहे मजवांचून दुसरा मजसारखा सच्चिदानंदरूपी कोणता पदार्थ आहे ? कोणताच नाहीं.

## त्रिविधभेद.

**सजातीय भेद**—जीवशीव जरी चेतनत्वानें चिद्रूपत्वें एक दिसतात परंतु तीं माझीं प्रतिबिंबें आहेत म्हणून ते वास्तविक मजसारखे कसे असतील. ते मजसारखे नाहींत म्हणून मजवर सजातीय भेदाचा आरोप होत नाहीं.

**विजातीय भेद**—मी एकटाच एकपणानें चराचरांत आदीं अंतीं मध्यें आहें मजवांचून जड चंचळ असे दोन प्रकारचे पदार्थ सत्यत्वानें नाहींत म्हणून मजवर विजातीय भेदाचा आरोप होत नाहीं.

मायादि तृणांत माझींच अंगें । नाना प्रकारें उमटलीं सोंगें । परी तें जाहलेचि नाहींत रज्जुभुजंगें । तरी स्वगतभेद कैंचा
जीवेश मिथ्यात्वें सजातीय । जड जग नसतां भेद विजातीय । मायादि नुद्भवतां स्वगतभेद जाय । ऐसे भेदत्रय नसती
एवं त्रिधा भेदरहित आद्यंत । त्रिधा परिच्छेदेंविण ओतप्रोत । आणि कवणासीच नलगे अंत । म्हणोनि अनंत मी पूर्ण
मज व्याप्याविण व्यापकता । दृश्याविण द्रष्टा देखता । तैसीचि साक्ष्याविण साक्षित्व आतां । सहसा बोलूं नये ॥ ९३ ॥
तस्मात् कोणताचि निर्देश मज । नव्हेच असे तैसा असे सहज । परोक्षापरोक्षही म्हणणें अचोज । ऐसा अनिर्वाच्यस्वयें
हे मायादि उद्भवती कीं नासती । संबंधचि नाहीं मजप्रती । जैसा परीपूर्ण आदिअंतीं । तैसाचि पूर्ण मध्येंही ॥ ९५ ॥
ब्रह्मात्मा मी केवळ चित्सागर । मायादि तृणांत तरंगाकार । उद्भवो कीं नासो सर्व प्रकार । परी मज उद्भव ना हानी
ब्रह्मात्मा स्वयें एकरूप चिद्घन । मायामेघें जग वर्षे जीवन । अतिवृष्टि अनावृष्टि होतां परिपूर्ण । त्या मज हानि ना लाभू
तस्मात् हें सर्व उद्भवे कीं नासे । अथवा होईना कां भलतैसें । मी जैसा असे तैसाचि असे । अखंड परिपूर्ण ॥ ९८ ॥
ऐसा ब्रह्मात्मा स्वयें एकरसें । आपण आपणामाजीं विलसे । स्मरतां न स्मरतां असेचि असे । भलतैसे प्रसंगीं ॥ ९९ ॥
नेत्र झांकितां ओतप्रोत । उघडितां अंतर्बाह्य सबराभरित । शब्द ऐकदा ब्रह्मीं ब्रह्म विलसत । नायकतां तेंचि तें ५२००
स्पर्शतां ब्रह्मसुख उचंबळे । न स्पर्शतां केवळत्वें निवळे । रसीं सुगंधीं निजात्म सोहाळे । अभावीं एकरस ॥ १ ॥
बोलतां कीं अन्य क्रिया करितां । ब्रह्मीं ब्रह्म विलसे तत्त्वतां । अक्रियकाळीं तों ब्रह्मात्मैक्यता । सहजीं सहज ॥ २ ॥
मन बुद्धिआदि जेव्हां उद्भवे । तेव्हां ब्रह्मात्मरूपत्वेंचि हेलावे । जेवीं ज्वाळेसहित अग्नीनें भडकावें । तेवीं अभेदरूपीं ३
मनबुद्ध्यादि जेधवां मावळती । तेधवां निर्विकारचि निश्चितीं । जैसा ज्वाळेविण गार्हपति । तेवीं स्वयंज्योति एकट ॥ ४
वृत्ति उठतां कीं पसरतां निमतां । ब्रह्मात्मा ब्रह्मात्मत्वीं ऐता । तिहींकाळीं जरी एकात्मता । तरी उठो कीं निमो ॥५
एवं वृत्ति मन बुद्धि इंद्रिय । प्राणासहित उद्भवे समुदाय । आपुलाले घेतांहि विषय । परी द्वैतभाव न स्पर्शे ॥ ६ ॥

**स्वगत भेद**—मायेपासून तृणापर्यंत सर्व माझींच अंगें आहेत नानाप्रकारानें जगतरूपानें सोंगें उमटलीं तरी तीं रज्जुसर्पवत् झालींच नाहींत म्हणून मजवर स्वगत भेदाचा आरोप होत नाहीं.

जिवेश मिथ्या आहेत म्हणून सजातीय भेद, जड चंचल सत्य नाहीं म्हणून विजातीय भेद, मायादि उत्पन्न झालींच नाहींत म्हणून स्वगत भेद; हे तिन्ही भेद मजशीं घडत नाहींत. म्हणून मी त्रिधाभेदरहित आद्यंत व त्रिधापरिच्छेदावांचून वोतप्रोत आहे. माझा कोणास अंत लागत नाहीं असा परिपूर्ण अनंत मी आहे. मला व्याप्यावांचून व्यापकता आहे. मी दृश्यावांचून द्रष्ट आहे. तसाच साक्ष्यावांचून साक्षी आहे. मी अमुक प्रकारचा आहे असें दाखवितां येत नाहीं. मला परोक्षापरोक्ष हेंही शब्द लागत नाहींत. असा मी अनिर्वचनीय आहें.

हे मायाआदिकरून पदार्थ उत्पन्न होवोत किंवा लयास जावोत त्यांचा मजशीं संबंध नाहीं. मी आदि अंतीं मध्यें परिपूर्ण आहें. मी केवळ ब्रह्मात्मा चिद्सागर आहें. त्या मजवर मायेपासून तृणापर्यंत सर्व पदार्थ जळीं तरंगाप्रमाणें आहेत. सर्व पदार्थ उत्पन्न होवोत किंवा, लय पावोत परंतु त्यांबरोबर माझा उद्भव किंवा लय होत नाहीं. मी स्वतः ब्रह्मात्मा एकरूप चित्घन आहे त्या मजमध्यें मायारूपी मेघ जगरूपी पाण्याचा वर्षाव करीत आहेत. त्यांच्या अती वृष्टीनें किंवा अनावृष्टीनें माझा नाश नाहीं किंवा फायदाही नाहीं. म्हणून हे सर्व जग उत्पन्न होवो किंवा नाश पावो. किंवा भलतसें कां होईना मी जसा आहें तसा अखंड परिपूर्ण आहे. असा ब्रह्मात्मा मी स्वतः एकरूप आपआपणांत विलसत आहें. म्हणून स्मरन असतां किंवा न स्मरत असतां भलतेही अवस्थेंत व भलते प्रसंगीं मी आहेंच आहें. नेत्र झांकिले असतां किंवा उघडे ठेविले असतां अंतरबाह्य सबराभरीत भरलेला आहे तो मी शब्द ऐकिला असतां व न ऐकिला असतांही ब्रह्म ब्रह्मांत विलसत आहे. याप्रमाणें दश इंद्रियांच्या क्रिया होत असतां किंवा न होत असतां ब्रह्म ब्रह्मांत विलसत आहे. इंद्रियांच्या क्रिया न होत असतां ब्रह्म ब्रह्मांत सहजच आहे परंतु क्रिया होत असतांही ब्रह्म ब्रह्मांत आहे.

मन बुद्धिआदिकरून सर्व जेव्हां उत्पन्न होतात; तेव्हां ब्रह्मात्मरूपानेंच मी हेलावतों. जसें ज्वालेसहित अग्नी भडकला असतां ज्वाला आणि अग्नी एकरूप तसें मन बुद्धि उद्भवली असतां अभेदरूपीं ब्रह्मच आहे. मन बुद्धि मावळला असतां तेंच निर्विकार परब्रह्म आहे, जसा ज्वाळेवांचून गार्हपती अग्नी तसा स्वयंजोती ब्रह्म मी आपण आपला एकटा आहे. वृत्ती उठून पसरो किंवा मावळो ब्रह्माची तिन्ही काळीं एकात्मता आहे. याप्रमाणें वृत्ति मन बुद्धि इंद्रियें प्राण इत्यादि समुदाय उत्पन्न होऊन आपआपला व्यापार करीत असतांही ब्रह्मास द्वैतभाव स्पर्शत नाहीं.

जेव्हां जेव्हां वृत्यादि उद्भवत । तेव्हां तेव्हां सहज मिथ्याभूत । नामरूप नाहींच मी सबराभरित । तरी समानाचि उद्भव लय
कवणही काळीं मज ब्रह्मात्मया । द्वैताचि न स्पर्शे अवस्थे भलतिया । एकला एकचि पूर्ण अद्वया । माजीं अद्वय सघन
मी ब्रह्मात्मा येवढा घनदाट । कीं अणुसी द्वैतपण नव्हे वाट । सर्व नामरूप तों नामरूपाचि अविट । जळलहरी जेवीं ।९॥
ऐसा मी परिपूर्णत्वें एकला । आदि मध्य अवसानीं संचलों भला । आहा अज्ञानाचा कैसा घाला । गमावलों होतों कीं ॥
ऐसा असून होतों हारपलों । तो सद्गुरुरूपें मज मी गवसलों । आहा आतां केवढा किती संचलों । तो अंत नसे माझा मज
अहो आश्चर्यसा मी अनंत असोनी । बैसलों होतों देहाएवढा होवोनी । तया अज्ञानाचा मी घोट भरोनी । उरलों परिपूर्ण
ऐशी मागील संकोचता आठवे । प्रस्तुत जाहलें ज्ञान तें हेलावें । तेव्हां वृत्ति खळबळून रडूंच यावें । कीं हसावें गद्गदूनी
भेदें शिणविलें होतें म्हणूनी । रडूं लागे दीर्घ निर्लज्ज जनीं । आहा आतां मी मजमाजीं पूर्णपणीं । तेव्हां हांसे निःशंक
अहो धन्य मी सद्गुरुरूपें । भवसिंधु हा मारिला थापें । मायेसहित ब्रह्मांड लोपे । माझिये वृत्तीमाजीं ॥ ५२१५ ॥
विद्या अविद्या ऐशिया दोनी । निःशेष बैसलों मी गिळूनी । त्यांतील प्रतिबिंबें तों मिळोनी । गेलीं माझीं मजमाजीं
येर हे बापुडे वृत्यादिक । निस्तत्वें उठती निमति सकळिक । परी मी द्वैतेंविण एकला एक । सर्वात्मा सर्वरूपीं १७
अहो ऐसा जो मी तया ऐशिया । माझें नमन सर्वस्वीं सर्वात्मया । माझेंमजचिआलिंगनअद्वया । गगनींगगनास्थितिजेवी
धन्य शास्त्र धन्य विचारु । धन्य आम्ही धन्य सद्गुरु । धन्यचि धन्य धन्य निर्धारु । धन्य समाधान ॥ १९ ॥
अहो कैसें होतें कैसें जाहलें । जें कधीं देखिलें ना नव्हते ऐकिलें । तेंचि एकाएकीं गुरूनें केलें । कांहींच्याबाहीं ५२२०
देवपद धुंडावयासी गेलों । तंव देवांचा देवचि होऊन बैसलों । शेखीं देवत्वत्यागें सहज संचलों । अनिर्वाच्य अद्वय
येर लोक उगेचि कष्टती । देवदेव म्हणून प्रयत्न करिती । वाउगेचि एकदेशी असेल म्हणती । वैकुंठीं कीं कैलासीं २२
परी तो एकदेशी देव कैंचा । वाउगाचि स्वभाव या मायेचा । अज्ञानें भ्रमले तया ज्ञानाचा । लेश कदा नुद्भवे २३
असो परोपदेशीं बापा मज । काय हो किंचित् असे काज । माझें मज सद्गुरूनें गुज । यथार्थ तें दिधलें ॥२४॥

---

वृत्त्यादिक समुदाय जेव्हां जेव्हां उद्भवतो तेव्हां तेव्हांच तो मिथ्याभूत आहे. नामरूप नाहींच तर सबराभरीत मी ब्रह्म आहे. मग सहजच त्यांचा उद्भव किंवा लय सारखाच, म्हणजे उद्भवकाळीं किंवा लय काळीं मीच एकटा आहे, द्वैत नाहींच. मी ब्रह्मात्मा एकटा घनदाट आहे कीं, मजमध्यें शिरण्यास अणुलाही द्वैतपणानें वाट नाहीं, सर्व नामरूप एकरूपच. जसें जल आणि त्याच्या लहरी त्याप्रमाणें आहे. असा मी आदि मध्य अवसानीं एकटा परिपूर्ण संचलेला असतांना मजवर अज्ञानाचा कसा घाला पडला कीं तेणेंकरून मी गमावलों होतों असा गमावलेला जो मी तो सद्गुरूच्या रूपेनें मजला मी सांपडलों. आतां मी केवढा किती संचलेला आहे याचा माझा मला अंतच लागत नाहीं. अहो कायहो हें आश्चर्य एवढा मी अनंत असून देहा एवढा होऊन बसला होतो, त्या अज्ञानास गिळून मी परिपूर्ण उरलेला आहे. याप्रमाणें मागची संकोचता आठवून सध्यां झालेलें ज्ञान हेलावत आहे. तेव्हां वृत्ती खळबळून रडें यावें किंवा गद्गद हंसावें. भेदानें शीण पावलों होतों म्हणून दीर्घ स्वरानें निर्लज्ज होऊन रडूं लागलों होतों तो आतां माझा मी पूर्णपणानें आपल्या मध्यें आहें असें समजल्यामुळें मला हंसूं येत आहे अहो मी सद्गुरुरुपेनें धन्य झालों. भवसिंधूस एका थापेनें उडविलें तेव्हां मायेसहित ब्रह्मांड माझ्या वृत्तींत लोपलें. विद्याविद्या मी गिळून बसलों, तेव्हां त्यांतील माझी प्रतिबिंबें मजमध्यें मिळालीं. विद्याअविद्या जीवेश यांखेरीज राहिलेलीं सर्व तत्वें निःस्तत्व आहेत. मग तीं उत्पन्न होवोत किंवा लय पावोत मी एकटा द्वैतावांचून एक सर्वांत सर्वात्मा सर्वरूपी आहें. अहो असा जो मी, त्या सर्वात्म्यास माझें सर्वस्वीं नमन आहे. व त्या अद्वयास आलिंगन म्हणजे जसें आकाशांत आकाश त्याप्रमाणें माझी मलाच भेट आहे.

शास्त्र, विचार, आम्हीं शिष्य, सद्गुरु, समाधान, हीं सर्व धन्य आहेत. अहो पूर्वी कसें होतें हल्लीं कसें झालें. जें कधीं पाहिलें नव्हतें ऐकिलें नव्हतें तेंच कांहींच्या बाहीच गुरूनें एकाएकीं केलें. देवपण पहावयास गेलों तों देवाचा देवच होऊन बसलों. पुढें देवत्वाचा त्याग केल्यामुळें मी अनिर्वाच्य अद्वय सहज संचलेला आहें. इतर लोक, देवदेव करीत उगाच कष्टी होतात व देव वैकुंठी किंवा कैलासीं असेल असें मानून तो मिळण्याचा प्रयत्न करितात. परंतु तो देव एकदेशी नाहीं. मायेचा हा स्वभाव उगाच आहे. ती जनास ठकविते. अज्ञानानें जे भ्रमले त्यांस ज्ञानाचा लेश कधींही प्राप्त होत नाहीं. अहो दुसऱ्याला उपदेश करण्याची गरज काय आहे. माझें मला सद्गुरूंनीं यथार्थ गुज ते दिलें.

आतां द्वैत कोठेंचि आढळेना । माझा मी मजमाजीं पूर्णपणा । तिहींकाळीं नव्हे अधिक उणा । जैसा तैसा सहज
अनंत ब्रह्मांडें माझिये पोटीं । मजमाजी सर्वांची राहटी । आणि सर्वांमाजीं माझीच दाटी । निर्विकारत्वें पूर्ण २६
ऐसा मी एकपणेंविण एकला । समष्टिरूपें सर्वात्मा संचला । अनुभूतीविण । आपआपणाला आपुलेपणें असें ॥२७॥
ऐसें अनेकाप्रकारें जैसें जैसें । जें जें आठवेल प्रसंगाऐसें । तें तें चिंतावें तैसें तैसें । विस्मृति न होतां ॥ ५२२८ ॥
मुख्य ऐक्यत्व कदा न भंगावें । नामरूपादि भेव न व्हावे । मग स्मरेल त्या युक्तीनें स्मरावें । ब्रह्मात्मत्व दृढ व्हावया
ऐसा प्रकार ज्ञानिया सहजगती । अपैसाहोयतेचिसहजस्थिति । परी बळेंकरणेंलागेसाधकाप्रती । यारीतींब्रह्मचिंतनिका
ऐशीब्रह्मचिंतनिकाअल्पसांगितली । यारीतींचसाधकेंपाहिजेसाधली ।येथमानिशीलकींनबोलतांबोली । तरी मौनेंचिंतनघडे
कवणासी जरी बोलणें लागे । अनेकधा व्यापारप्रसंगें । तरी कैसें चिंतावें लागवेगें । तरी येविषयीं बोलूं ॥ ५२३२ ॥

## तत्कथनं.

कवणासी जरी बोलणें पडे । तरी तेंचि कथन करावें कोडें । ब्रह्मात्मत्व न विसरावें रोकडें । द्वैतभाव नुठतां ॥ ३३ ॥
नाना दृष्टांत युक्तीकडून । बहुधा श्रुतीचें घेऊन वचन । तेंचि साधकाप्रती करावें कथन । ब्रह्मात्मा ऐक्यरूप ॥ ३४ ॥
सयुक्तिक दृष्टांताचि योजना । श्रुति अनुभवा योग्य सांग रचना । करावी जेणें संतोष साधुजना । होय ब्रह्मानुभवाचा
कवणेंही प्रकारें द्वैत नुद्भवावें । ब्रह्मात्मत्वचि सदृढ दुणावे । ऐसेंचि सदृष्टांत सर्व बोलावें । अन्य त्यागावें बाष्कळ ३६
दृष्टांताकारणें ब्रह्मांड विवरावें।मनें कल्पून युक्तसे योजावे।परी वक्तृत्वाचेंसाहित्य न भंगावें । आणि विरोधही न यावा
मागील प्रसंगीं एक बोलिला । दुजियाविषयीं त्या विरोधा आला।ऐसें न बोलावें पूर्वापर निरूपणाला। एकरूपता असावी
साधकासी जया निरूपणें । अधिकाधिक समाधान बाणे । आणि पूर्ण ज्ञात्यासी संतोष जेणें । ऐसें सांग बोलावें ३९
म्हणसी साधक कीं ज्ञात्यासी बोलतां।ब्रह्मानुभव बोलावा जो तत्त्वतां।परी अन्य अज्ञानासी प्रसंग पडतां कैसें बोलावें
तरी अवधारी तया अज्ञानासी । प्रसंगें बोलावें प्रस्ताविकासी । ब्रह्मज्ञानही कथितां सारांशीं बाधही नाहीं ॥५२४१॥

---

माझा मी मजमध्यें पूर्णपणें आहें. आतां मला द्वैत कोठेंच आढळत नाहीं. मी तिन्हीं काळीं अधीक किंवा उणा न होतां जशाचा तसा सहज आहें. अनंत ब्रह्मांडें माझ्या पोटांत आहेत. मजमध्यें सर्वांची रहाटी आहे. आणि सर्वांमध्यें निर्विकारत्वानें मीच भरलेला आहें. याप्रमाणें मी एकपणानें एकटा समष्टी रूपानें सर्वात्मा आपला आपणास न अनुभवितां आपलेपणानें संचलेला आहें. असें अनेक प्रकारानें जें जें प्रसंगीं जसें जसें आठवेल तें तें विसर न पडतां तसें तसें चिंतावें. ऐक्यत्व कधींही भंगूं नये व नामरूपादि भेद होऊं नये. मग जसें आठवेल तसें ब्रह्मात्मत्व दृढ होण्याकरितां आठवावें. असा प्रकार ज्ञान्यास सहजगती होतो. हीच सहज स्थिति आहे. परंतु साधकास याप्रमाणें सांगितलेली ब्रह्मचिंतनिका बळें करावी लागते. ही ब्रह्मचिंतनिका अल्प सांगितली आहे. याप्रमाणें साधकानें ब्रह्मचिंतनिका केली पाहिजे.

**शंका**–वर सांगितलेली ब्रह्मचिंतनिका न बोलतांच घडेल, एरव्हीं घडणार नाहीं.

**उत्तर**–प्रसंगीं अनेक प्रकारचे व्यापार होत असतां कोणाशीं बोलावें लागलें, तर तेथें वरील चिंतन कसें करावें तें सांगतों. आपणास बोलण्याचा प्रसंग आला असतां, ब्रह्मचिंतनेंतील गोष्टी सांगाव्या. याप्रमाणें द्वैतभाव उत्पन्न न होतांच ब्रह्मात्मत्व न विसरतां तें आठवावें. अनेक प्रकारचे दृष्टांत, युक्ति व श्रुति यांचे योगानें ब्रह्मात्मत्व ऐक्यरूप आहे, हेंच साधकास सांगावें. जेणेंकरून साधुजनास ब्रह्मानुभवाचा संतोष होईल अशा प्रकारें दृष्टांताची योजना व श्रुती अनुभवाची सांग व योग्य रचना करावी. केव्हांही कोणत्याही प्रकारें द्वैत उत्पन्न होणार नाहीं आणि ब्रह्मात्मत्व सदृढ वाढेल असें दृष्टांतयुक्त बोलावें व अन्य बाष्कळ बोलण्याचा त्याग करावा. दृष्टांताकरितां ब्रह्मांड शोधावें. अनेक कल्पना करून मनास युक्त दिसेल तो दृष्टांत योजावा. वक्त्याचें साहित्य कोणत्याही प्रकारें भंगूं नये व बोलण्यास विरोध येऊं नये. मागें एक बोलला व पुढें दुसरे वेळीं त्या बोलण्याचा निषेध केला असें बोलूं नये. निरूपणाला पूर्वापार एकरूपता असावी. ज्या निरूपणानें साधकास अधिकाधिक समाधान बाणेल आणि पूर्ण ज्ञात्यास संतोष होईल असें यथासांग बोलावें.

**शंका**–साधक किंवा ज्ञाता यांच्याशीं बोलावयाचें झालें तर ब्रह्मानुभव बोलावा. परंतु ज्ञात्यावांचून राहिलेले जे अज्ञानी त्यांच्याशीं बोलण्याच्या प्रसंग पडला असतां कसें बोलावें ?

**उत्तर**–अज्ञान्याशीं बोलण्याचा प्रसंग पडला असतां प्रस्ताविक बोलणें बोलावें. किंवा सारांशानें ब्रह्मज्ञान सांगितलें असतां चालेल.

तयासी मात्र नव्हे ग्रहण । नव्हे तरी व्यर्थ जाय निरूपण । परी स्वयें आपुलें तों दृढ समाधान । दुणावें बोलतां ४२
तथापि तया अज्ञान जनासी । बोलूंचि नये सांग स्थिति जैशी । बोलणें पडे तरी रूपकेंसी । वर्णून बोलावें ॥ ४३ ॥
तयासी तों कांहीं न कळे।आणि आपुला तरी स्वानुभव उफाळे।मुख्य भलतैसे प्रसंगीं ऐक्य निवळे । तैसें घडावें आपणा॥
बहुधा अज्ञानासी संवादन । घडूंच नये वेदांतनिरूपण । तयापुरतें तयास बोलून । उगें मौनें असावें ॥ ४५ ॥
मुख्य ज्ञात्यासी किंवा साधकासी। बोलावें सांग स्वानुभवासी । अथवा बोधावें अधिकारी मुमुक्षुसी । प्रबोधशक्तीच्या बळें
मुख्य मिळतां प्रतीतीचा संत । तो तरी एकांतापरीस एकांत । तेथें निःशंक बोलावें यथायुक्त । गोप्य तेंही ५२४७ ॥

**अन्योन्यं धत्प्रबोधनं ॥**

आपण तयासी स्पष्ट बोलावें । नातरी तयाचें निरूपण ऐकावें । ऐसें परस्परें प्रबोधन घडावें। जेणें दुणावें समाधान४८
प्रबोधन म्हणिजे बोध आपुला । प्रकर्षें पाहिजे दुणावला । ऐसाचि पाहिजे संवाद जाहला । उभयपक्षींहीं ॥ ४९ ॥
आपणाहून उणीवतां असतां । तयाची प्रबोधून करावी पूर्णता। अथवा समान असालिया तत्त्वतां । तैसेंचि परस्परें बोलावें
त्याचें समाधान आपण घ्यावें। आपुलें तयासी निरूपावें । त्याचें उणेंपण उरों न द्यावें । आणि आपुलें त्यामुळें ॥५१
जैसे दोन दीप असतां समोर । फेडिती तळींचा अंधःकार । तैशीं गुप्त उत्थानें परस्पर फिटतीं एकमेकांची ॥ ५२ ॥
आपणाहून जे ज्ञाते अधिक । उत्थानरहित निश्चयात्मक । तयांचा होऊनियां सेवक । सहजस्थिति आकळावी ॥ ५३
ऐसें परस्परें प्रबोधासी । संवादसुख होतां दिननिशीं । वृद्धीच होय अखंडैकरसीं । त्रिकालीं उत्थानरहित ॥ ५४ ॥
एवं एकट असतां घडावें चिंतन। दुजें मिळतां करावें कथन । ज्ञाते साधक तरी संवादन । परस्परें प्रबोधावें ॥५२५५

**एतदेकपरत्वंच ब्रह्माभ्यासं बुधाः विदुः ॥**

ऐशियापरी चिंतन कथनात्मक । सदा होणें जरी निश्चयात्मक । हाचि ब्रह्माभ्यास एकपरत्वें एक । पूर्ण ज्ञाते जाणती
सदा श्रवण अथवा मनन । एकरूप चिंतनें अनुसंधान । यापरतें साधन असे कवण । मुमुक्षु साधकासी ॥ ५७ ॥
तस्मात् हेंचि साधन हाचि अभ्यास। हाचि योगध्यानही असे नामयास । मात्र विस्मरण न व्हावें बुद्धीस । हेंचि एक परत्व

---

त्यांस असल्या बोलण्याचें ग्रहण व्हावयाचें नाहीं, यामुळें सांगितलेलें निरूपण व्यर्थ जाईल. परंतु आपलें स्वतःचें समाधान बोललें असतां दुणावेल. अज्ञान्याशीं ब्रह्मज्ञान सांगितलें असतां चालेल म्हणून सांगितलें परंतु जशी ब्रह्माची स्थिति आहे तशी यथासांग सांगूं नये. जर सांगणेंच झालें तर रूपकानें सांगावें. त्यास कांहींच कळत नाहीं आणि आपला स्वानुभव उफाळतो म्हणून मुख्य इतकेंच करावें कीं भलतेही प्रसंगीं आपण ऐक्य निवळेल. अज्ञानास बहुधा वेदांत निरूपणाचा संवाद घडूंच नये त्यांच्या पुरतें तितकेंच बोलून उगाच निमूट असावें. मुख्य ज्ञात्याबरोबर किंवा साधकाबरोबर सांग स्वानुभव बोलावा. मुमुक्षूस, प्रबोधशक्तीच्या बळानें बोध करावा. मुख्य अनुभवाचा संत मिळाला असतां तो एकांतापेक्षां एकांत आहे. त्या बरोबर निःशंकपणानें यथायुक्त गोप्य असेल तेंही बोलावें. किंवा त्याचें निरूपण ऐकावें जेणेंकरून समाधान दुणावेल असें परस्पर प्रबोधन व्हावें. प्रबोधन म्हणजे आपला जो बोध तो प्रकर्षानें दुणावला पाहिजे म्हणून तो दुणावेल असाच उभयपक्षीं संवाद झाला पाहिजे. आपणापेक्षां त्याची उणीवता असेल तर त्यास बोध करून पूर्णता करून घ्यावी. अथवा परस्परांची समानता असेल तर असेंच परस्परांनीं बोलावें. त्याचे समाधान आपण घ्यावें आपलें समाधान त्यास सांगावें. त्याचे उणेंपण आपण राहूं देऊं नये व आपलें उणेपण त्याच्यामुळें राहूं देऊं नये. जसें दोन दिवे समोरासमोर असले म्हणजे तळाशीं पडलेला अंधार ते घालविनात. तशीं गुप्त उत्थानें परस्पर एकमेकांचीं नाहींशीं होतात.

जे आपणापेक्षां अधीक ज्ञाते आहेत ज्यांस कधींही निश्चयानें उत्थान होत नाहीं. त्यांचा सेवक होऊन सहजस्थिति धरावी. याप्रमाणें परस्पर प्रबोधाचा संवाद रात्रंदिवस झाल्यानें सुख होतें व अखंडैकरशीं त्रिकाळीं उत्थान न होतां वृद्धीच होते. याप्रमाणें एकटें असतां चिंतन व्हावें. दुसरा मिळाला असतां कथन करावें. ज्ञाते किंवा साधक मिळाले तर प्रबोधाचा संवाद परस्पर करावा. याप्रमाणें निश्चयानें चिंतनरूप कथन सदां होईल तर हाच एकपरत्वें अभ्यास असे ज्ञाते जाणतात. मुमुक्षु किंवा साधक यांस सदा श्रवण अथवा मनन किंवा एकरूप चिंतनानें अनुसंधान यापेक्षां त्यास दुसरें साधन नाहीं. म्हणून हेंच साधन हाच अभ्यास हाच योग हेंच ध्यान बुद्धीस कधींही विस्मरण होऊं नये हेंच एक परत्व

ऐसाचि अभ्यास साधका जरी। तरीच सहजस्थिति अपैसा वरी । ऐशिया अभ्यासा मानवती अंतरीं । पूर्ण ज्ञाते सहज
म्हणती भला भला त्या साधका। ब्रह्माभ्यास आरंभिला निका । अपरोक्षें जाणोनियां तवका। तच्चिंतनादि करिसी ६०
यापरतें साधनचि नलगे । येणेंचि वस्तुतंत्र होय निजांगें । ऐसेंचि अनुमोदन देती वेगें । ययाभ्यासा ॥ ६१ ॥
तस्मात् पूर्ण ज्ञाते याचि अभ्यासा । जाणत असती एक परत्व सहसा। येर रोधादिकां साधनां फोसां। अनुमोदन न देती
एक पूर्ण ज्ञाते किंवा साधक। जे स्मरण अभ्यासा प्रवर्तक । तेचि ऐशिये अभ्यासा निश्चयात्मक। एक परत्व म्हणती
येर उपासक कर्मी कीं योगी । हा अभ्यास नावडे तयांलागीं । परंतु जे ज्ञाते ब्रह्मात्मसंयोगी ।त्यांसी हाचि आवडे ६४
स्नानसंध्या यागादि नसतां । होपळ वाटे कर्मियां समस्ता । भजन पूजन मूर्तिध्यान न होतां । उपासका अनावडी ६५
तस्मात् सर्व कर्मही त्यागूनी । भजन पूजन अव्हेरूनी । आणि निरोधादि उपेक्षूनी । श्रवणादि करिती ॥ ६६ ॥
श्रवण चिंतन कथन ध्यान ।एकरूप सर्व अनुसंधान । हा ब्रह्माभ्यास साधका पूर्ण । असतां आवडे ज्ञानिया ॥ ६७ ॥
अगा ऐशिया सदा अभ्यासापुढें । देहबुद्धि राहील कोणीकडे । प्रज्वल अग्नीत जेवीं न दडे । कापूसपणें कापूस ॥६८
देहबुद्धि जाळावया जगीं । हेचि ब्रह्मचिंतनिका दांडुगी । या अभ्यासें निसंतान होऊच वेगीं । सहजस्थिति बाणे ६९
त्रिविध अभिमाना सगट । मूळाज्ञानाचा भरी घोट । सर्व असतांचि समाधान अविट । उत्थानरहित बाणे ॥ ७० ॥
तेंचि समाधान कैसें निर्धारा। देहबुद्धि सदृढ जैशी येरा । तैशी ब्रह्मबुद्धि सदृढ अंतरा । हेचि ज्ञानाची पराकाष्ठा ७१
हेचि आतां एका श्लोकीं । दृढापरोक्षता बोलिजे निकी । जेथें सिद्धसाधकता सकौतुकीं । भेद निपटूनि जाय ॥ ७२
आणि ध्वनितार्थें मुमुक्षुत्वाची । अथवा अवधी साधकत्वाची । प्रसंगें कळेल स्थिति पूर्णतेची । बाणतां दृढ ॥ ७३ ॥
इतुकें एका श्लोकाचें निरूपण । सांग साकल्यत्वें करून । वक्तृत्व आटोपूं अवधारा संपूर्ण । एकाग्रभावें साधक ॥ ७४

**देहात्मधीवद् ब्रह्मात्मधी दाढर्ये कृतकृत्यता ॥**
**यदा तदायं म्रियतां मुक्तो नास्त्यत्र संशयः ॥ १८ ॥**

इति श्रीमच्छंकराचार्यविरचिता लघुवाक्यवृत्तिः समाप्तः

---

असा जर साधकास अभ्यास असेल तरच तो सहजस्थितीला पावेल. हा अभ्यास पूर्णज्ञात्यास मानतो. ते असें म्हणतात कीं, या साधकानें ब्रह्माभ्यास आरंभिला आहे. व तो अपरोक्ष जाणून तत्चिंतनादि करीत आहे, हें फार चांगलें आहे. साधकास याखेरीज दुसरें साधन नको. तो यानेंच वस्तुतंत्र होईल. पूर्ण ज्ञाते या अभ्यासानें एकपरत्व जाणतात. या अभ्यासाखेरीज रोध करणें इत्यादि अनेक अभ्यास कळकट आहेत असें ते म्हणतात. व तसले अभ्यास करण्याविषयीं ज्ञाते अनुमोदन देत नाहींत. जे स्मरणअभ्यासास प्रवर्तले ते पूर्ण ज्ञाते किंवा साधक वर सांगितलेल्या अभ्यासास एकपरत्व म्हणतात. ज्ञात्याखेरीज व साधकाखेरीज जे कर्मउपासक, किंवा योगी त्यास हा अभ्यास आवडत नाहीं. परंतु जे ब्रह्मात्मसंयोगी ज्ञाते आहेत त्यांस हाच अभ्यास आवडतो. स्नान संध्या याग हें नसेल तर कर्मठांस सर्व करणें व्यर्थ वाटतें. भजनपूजन, मूर्तिध्यान नसेल तर तो उपासकास अनावर आहे. मुद्रादि साधनें किंवा प्राणायाम अथवा मूळ बंध, धारणा, नेम व अभ्यासानें बुद्धीचा रोध हीं नसलीं तर हा परमयोग असतांही तो योग्यांस आवडत नाहीं. ज्ञात्यांस आवडतो. म्हणून ते सर्व कर्म टाकून भजन पुजन टाकून तसेंच बुद्धी निरोधादिक खटपटी टाकून म्हणजे तें तांत्रिक कर्म करून श्रवण चिंतनादि करितात. श्रवण, चिंतन, कथन, ध्यान सर्वदा एकरूप अनुसंधान हाच पूर्ण साधकास ब्रह्माभ्यास असला तर तो ज्ञान्यास आवडतो.

हे रविदत्ता, अशा अभ्यासापुढें देहबुद्धी कशी राहील ? जसा अग्नी प्रज्वलीत झाला असतां कापूस कापूसपणानें दडून रहात नाहीं. तशी देहबुद्धी या अभ्यासानें निःशेष जाते व सहजस्थिति बाणते. देहबुद्धि जाणण्याविषयीं जगांत ह्या ब्रह्मचिंतनिकेसारखी समर्थ दुसरी विद्याच नाहीं. तीन प्रकारच्या अभिमानासह मूळाज्ञानास ही ब्रह्मचिंतनिका गिळून टाकिते. मग सर्व असतांना उत्थान न होतां अवीट समाधान बाणतें तें समाधान कसें म्हणशील तर ज्ञान्याखेरीज इतरांस जशी देहबुद्धी दृढ आहे, तशी ब्रह्मबुद्धि सदृढ होईल. हीच ज्ञानाची पराकाष्ठा आहे. ज्यांत सिद्ध, साधक हे भेद निःशेष जातील, आणि सक्षेपानें मुमुक्षुत्वाची अथवा साधकत्वाची अवधी, प्रसंगानें पूर्णतेची स्थिति बाणली असतां कळेल. हीच दृढापरोक्षता, एका श्लोकानें साकल्यें करून सांगूं आणि वक्तृत्व आटोपूं.

देह आपण जैसें सर्वत्रांसी । सदृढाचि बैसलेंसे बुद्धीसी । ब्रह्मात्मत्व सदृढबुद्धि जरी ऐशी । तरी कृतकृत्यता जाहली
ऐशी दृढबुद्धियोगे कृतकृत्यता । उत्थानराहित जाहली असतां । मग तो जेधवां मरे कर्म सरतां । तेधवा मरो सुखें ७६
परंतु तो जन्ममरण संसृतीपासून । मुक्त जाहला निःसंशयेंकडून यद्‌र्थी संशयरूप अनुमान । सहसा कवणें न करावें
अगा रविदत्ता सावध असर्सी । निरूपण आकळिलें कीं मानसीं । स्मृतिरूप साधनाचे अभ्यासीं । ब्रह्मात्मत्व दृढ होय

**देहात्मधीवद्‌ब्रह्यात्मधीदार्ढ्यें कृतकृत्यता ॥**

पाहें तुजला जैशी देहबुद्धि । सदृढाचि बैसली अनवधि । ऐशीच अभ्यासें ब्रह्मात्मसिद्धि । बुद्धि निश्चया येतसे ॥ ७९ ॥
प्रथम अभ्यासें कीं विचारें । लयसाक्षिज्ञान जाहलें साचारें । त्यावरी वृत्तीचा खल होतां निर्धारें । निश्चय दृढ होय बुद्धीचा
वृत्तीचा खल येथवरी केला । कीं निमिषार्ध अवसर नाहीं दिधला । एकतान ब्रह्मात्मत्व वृत्तीला । विस्मृतिविण दृढ केलें
ब्रह्मात्मत्वाचेंचि चिंतन । ब्रह्मात्मत्वाचोंचि कथन । परस्परें अन्योन्य संवादन । जें बोलिलें पूर्वश्लोकीं ॥ ८२ ॥
तेंचि एकपरत्वरूप अनुसंधान । भलते अवस्थेसि राखिलें स्मरण । तेणेंचि अभ्यासें देहात्मभान । तुटोनि जाय ॥ ८३ ।
पहिला बुद्धीशी निश्चय जाहला । अज्ञानें नेणून ब्रह्मात्मयाला । मी हा देहाचि अभिमान धरिला । असे सदृढ ॥ ८४ ।
अनंत कल्पांमाजीं अनंत । सान थोर देह जाहले बहुत । तितुकींयाही देहांसी मी मी कारिति । आभमान वाहताचि आला
एका देहीं अवस्था तीन । जागृति सुषुप्ति आणि स्वप्न । या तिहींमाजींही देहाचें मीपण । बळकट धरिलेंसे ॥ ८६ ॥
या तिहीं अवस्थेंत तीन आभिमान । हें जाहलें असे मागां निरूपण । परी मागुतीं तेंचि आतां अल्प कथन । कीजे कळावया
जागृतींत जोंवरी व्यापारत । प्रत्यक्ष देहासी प्रत्यक्ष भोग घडत । तेव्हां या सर्व संघासी मी म्हणून धरित । सदृढ साभिमानें
ऐसा देह आपण सदृढ जाहला । न विसरेचि ऐशिया अभिमानाला । आणि संपादित सर्व विषयांला । माझें माझें म्हणे ॥८९॥
एवं देहाचें मीपण हें हें माझें । बळकट घेऊन बैसला वोझें । ऐसा हा उभयरूपी साभिमान बुझे । विश्व नाम पावला ॥९०॥
तेचि प्रत्यक्ष विषय नसतां । इंद्रियद्वारा बहिर्मुख न होतां । स्वप्नअवस्था होतसे आंतौता । ध्यासें जागृतीच्या ॥ ९१ ॥
मागें केलें तितुकें स्मरे । पुढें अमुक करीन साचोकारें । ऐसा कर्तेपणें उगा हुंबरे । एकरूप सदा ॥ ९२ ॥
पुण्यपाप जें जें केलें । तें तें भोगीन अवश्य पाहिलें । येथूनही करीन सामर्थ्यें आपुले । पुढें सुख भोगावया ॥ ९३ ॥

---

जशी देह हाच मी अशी सर्वांस दृढ देहबुद्धी बाणली आहे, अशीच जर ब्रह्मात्मबुद्धि दृढ होईल तर कृतकृत्यता जाहली असें समजावें. याप्रमाणें कृतकृत्यता उत्थानरहीत जाहली असतां मग कर्म सरल्यावर जेव्हां तो मरेल तेव्हां मरो, पण तो जन्ममरणसंसृतीपासून निःसंशय मुक्त झाला याविषयीं कोणीही संशय मनांत आणूं नये. रविदत्ता, तुला जशी देहबुद्धि दृढ जाहली आहे, अशीच अभ्यासानें ब्रह्मात्मबुद्धि दृढ होईल. प्रथमतः अभ्यासानें किंवा विचारानें लयसाक्षी ज्ञान तुला खरें जाहलेलें आहे व त्यांत त्याचा खलही झाल्यानें ब्रह्मात्म बुद्धीचा दृढनिश्चय होतो. वृत्तीचा इतका खल केला पाहिजे कीं, मध्यें निमिषार्धसुद्धां अवकाश जाऊं देतां कामा नये, तरच एकतान विस्मृतीवांचून ब्रह्मात्मत्व वृत्ती सदृढ होईल. ब्रह्मात्मत्वाचें चिंतन, त्याचेंच कथन, पूर्व श्लोकांत जें परस्पर संवादन सांगितलें आहें, असें संवादन, तेंच भलतेंही अवस्थेंत स्मरणरूप एकपरत्व अनुसंधान राहून याच अभ्यासानें देहात्मभाव तुटून जातो.

प्रथमतः अज्ञानामुळें ब्रह्मात्म्यास न जाणून मी देह असा दृढ अभिमान अनंत कल्पांत अनंत देहाचा बुद्धीनें धरलेला आहे. एका देहास जागृत स्वप्न सुशुप्ति अशा तीन अवस्था आहेत. त्या तीन अवस्थेंतही देहबुद्धी दृढ झाली आहे त्या तीन अवस्थेंचे तीन अभिमान पूर्वीं सांगितलेले आहेतच, आतां ते स्पष्ट कळण्याकरितां पुन्हा सांगतों.

## तीन अभिमानांचें विवेचन.

जागृतींत प्रत्यक्ष देहाचा प्रत्यक्ष विषयाशीं जेव्हां भोगरूपीं व्यापार घडतो, तेव्हां ह्या बत्तीस तत्वाचे संघास सदृढ अभिमानानें मी असें म्हणतो. आणि त्याचा अभिमान विसरत नाहींसा झाला, म्हणजे मग इतरांस माझें माझें म्हणून सर्व विषय संपादितो. याप्रमाणें देहाचें मीपण व हें हें माझें असा बळकट ओझें घेऊन बसला या मी व माझ्या अशा दोन प्रकारच्या अभिमानास विश्वाभिमान म्हणतात.

प्रत्यक्ष विषय नसून ज्यागृतीच्या ध्यासानें इंद्रियद्वारा बहिर्मुख न होतां आंत स्वप्नावस्था होते. तींत मागें केलेलें सर्व आठवतें व पुढें अमूक करीन असा कर्तेपणानें उगाच गर्जत असतो. जें जें पुण्य अथवा पाप केलें तें तें भोगीन व पुढेंही आपल्या सामर्थ्यानें सुख भोगण्याकरितां पापपुण्य करीन.

ऐसा कर्तेपणा कीं भोक्तेपणाचा । अंतरीं ध्यास सदृढ साचा । हाचि तैजस अभिमान जन्ममृत्यूचा । दायक होय ॥९४॥
मुख्य नेणपणाचा अभिमान । लयही पावतां जागर स्वप्न । सुषुप्तिकाळीं उरे तोचि प्राज्ञ । बीज उत्पत्तीचें ॥ ९५ ॥
एवं जागरीं मी माझेपणें विश्व । स्वप्नीं कर्ता भोक्ता तैजस नांव । सुषुप्तींत मी नेणता प्राज्ञ स्वयमेव । ऐसे अभिमान तीन
हे साभिमान कदाही त्यागीना । देहाचा सदृढ धरिला मीपणा । तेणेंचि नसतां पावे जन्ममरणा । कोटि कोटि कल्पें ९७
हे असो अज्ञानाची वार्ता । परी अभ्यासें कीं विचारें तत्त्वतां । जरी लयसाक्षिज्ञान जाहलें आतां । तरी पूर्वाध्यास न सोडी
देह प्राण इंद्रियें मन बुद्धि । मूळस्फूर्ति विद्या अविद्यासंबंधीं । जीवेशही प्रतिबिंबें त्यामधीं । इतुकेंही विवेचिलें ॥ ९९ ॥
हा इतुकाही सर्व समुदाय । मिथ्यात्वें विवेचिला कीं मी न होय । मी ब्रह्मात्मा एकरूप अद्वय । त्रिधा प्रतीतीनें कळला
तरीही एकाएकीं पूर्वाध्यास । न सोडी यया देहादिकास । भलते प्रसंगें अहंदेहबुद्धीस । घेत प्रगट कीं गुप्तत्वें ॥५३०१॥
ऐसाही दुस्तर साभिमान । निःशेष निमे जरी घडे साधन । जें निरोपिलें स्मरणरूप अनुसंधान । तच्चिंतनादि सदा २
अहंब्रह्मास्मि हें चिंतन । जें जाणिलें लयसाक्षिज्ञान । तेंचि निश्चयेंसी ब्रह्म आपण । न विसरतां स्मरावें ॥ ३ ॥
आणि देहादि आपण कदा नव्हे । याचेंही विस्मरण न पडावें । एकतान अनुसंधान असावें । ब्रह्म सत्य जग मिथ्या
बत्तीस प्रकार हें जग । सर्व मिथ्याचि रज्जुभुजंग । ब्रह्मात्माचि सत्य सत्य अभंग । आपणही तेंचि ॥ ५ ॥
इतुक्या निश्चयाचें सदा स्मरण । एकतान राखावें अनुसंधान । निद्रा लागे तों जागे जाहलियापासून । यावत्प्राणही राखावें
केव्हां मननरूप चिंतन । केव्हां वाणीनें घडावें कथन । मुख्य कारण कीं न पडावें विस्मरण । लयसाक्षित्वाचें ॥ ७ ॥
नुसधी ध्येयाकारवृत्ति असावी । तदाकारेंचि उठोनि निमावी । परी तथापि उद्भवतां स्मृति असावी । ब्रह्मात्मयाची बुद्धीसी
ऐसा ध्यास सदृढ लागतां । कोठें उरेल देहबुद्धीची वार्ता । निपटून पूर्वाध्यासाचे होय घाता । ब्रह्मात्मत्वचि दृढ होय
जैशी जैशी ब्रह्मात्मबुद्धि वाढे । तैशी तैशी देहबुद्धि मोडे । निःशेष निमतां सहजस्थिति जोडे । जे पूर्ण ज्ञातया सदा
परी अभ्यास मात्र स्मरणाचा । केलाचि करावा साधकें साचा । पूर्वाध्यास होतांचि देहादिकाचा । मोडून ब्रह्मात्मत्व स्मरावें
देहादिक आपण नव्हेचि नव्हे । मग कासया त्याचें वर्तन घ्यावें । भलते अवस्थेंत असेना स्वभावें । आपुलें काय गेलें १२

---

याप्रमाणें कर्तेपणाचा किंवा भोक्तेपणाचा अंतरीं सदृढ ध्यास असतो हाच जन्ममृत्युदायक तैजस अभिमानी समजावा.

जागृती व स्वप्न यांचा लय झाल्यावर सुषुप्ती काळीं नेणतपणाचा अभिमान धरणारा तोच उत्पत्तीचें बीजरूप प्राज्ञ अभिमान आहे.

याप्रमाणें जागृतींत मी माझें हा विश्वाभिमान; स्वप्नांत कर्ता भोक्ता हा तैजस अभिमान; सुषुप्तींत नेणता तोच प्राज्ञ अभिमान; हे असे तीन अभिमान देहाचा सदृढ मीपणा धरल्यामुळें आहेत. हे तीन अभिमान प्राणी टाकीत नाहीं म्हणून नसतें जन्ममरण पावतो. ही अज्ञान्याची गोष्ट जाहली. परंतु अभ्यासानें किंवा विचारानें जरी आतां लयसाक्षी ज्ञान झालें आहे, तरी पूर्वाध्यास सोडीत नाहीं. देह प्राण इत्यादि बत्तीस तत्त्वें मी नव्हे, तीं सर्व मिथ्या आहेत. व मी अद्वय एक ब्रह्मात्मा आहें. असें तीन प्रतितीनें कळलें असतांही एकाएकी या देहादिकांचा पूर्वाध्यास सोडीत नाहीं. तर भलतेही प्रसंगीं मी देह अशी देहबुद्धि गुप्त किंवा प्रगट घेतो; तेंच पुढें वर्णितों आहों.

**अभिमान घालविण्याचा उपाय.**

वर सांगितलेले दुस्तर साभिमान हे तत्चिंतनादी स्मरणरूप अनुसंधान मागें सांगितलें आहे. ते साधन घडेल तरच निःशेष निमतील. अहंब्रह्मास्मी हें चिंतन जें लयसाक्षी ज्ञान जाहलेलें आहे तेंच ब्रह्म आपण न विसरतां आठवावें. तसेंच देहादिक आपण नाहीं त्याचा विसर पडूं देऊं नये व ब्रह्म सत्य जग मिथ्या याचें एकतान अनुसंधान असावें. बत्तीस प्रकारानें हें सर्व जग रज्जुसर्पवत् मिथ्या व आपण ब्रह्म सत्य, इतक्या निश्चयाचें सदां स्मरणरूपी एकतान अनुसंधान, जागे झाल्यापासून झोंप लागेपर्यंत किंवा प्राण आहेत तोंपर्यंत राखावें. केव्हां मननरूप चिंतन व्हावें केव्हा वाणीनें कथन घडावें. याचें मुख्य कारण हेंच कीं, लयसाक्षित्वाचें विस्मरण पडूं नये. नुसती ध्येयाकारवृत्ति असावी ती तदाकारत्वानेंच उठून मावळावी. व जर बुद्धी उत्पन्न झाली तर तिला ब्रह्मात्म्याची स्मृती असावी. असा सदृढ ध्यास लागला असतां पूर्वाध्यासासह निःशेष बुद्धि कोठेंही न उरतां जाते, व ब्रह्मात्मबुद्धी दृढ होते. जशी जशी ब्रह्मात्मबुद्धी दृढ होते तशी तशी देहबुद्धी मोडते, व पूर्ण ज्ञात्यास देहबुद्धी निःशेष गेली असतां सहज स्थिति प्राप्त होते. परंतु स्मरणाचा अभ्यास साधकानें केलाच पाहिजे. देहादिक आपण नाहींच मग त्यांचें वर्तन आपण कां घ्यावें. तें वर्तन भलत्याही अवस्थेंत असेना, त्याबद्दल आपलें काय जातें.

ऐसा निश्चय केलाचि करावा । ब्रह्मात्मा स्वयें स्मरलाचि स्मरावा । हा समुदाय त्यागिलाचि त्यागावा । बलात्कारें स्फुरतांचि
ऐशिया स्मरणरूप अभ्यासें । त्रिविधा मीपण गळे आपैसें । देहात्मत्व बुद्धीसी होतें जैसें । तैसें ब्रह्मात्मत्व होय ॥ १४ ॥
परंतु हळ हळु साधेल सर्व । एकदांचि न मोडे पूर्व स्वभाव । विश्वतैजस प्राज्ञाचाहि ठाव । अशेषें मोडे अनुक्रमें ॥ १५ ॥
आधीं विश्वाभिमानी हा मरे । त्यामागून तैजसही वोसरे । पुढें प्राज्ञ अभिमान एकसरें । मावळून उरे ब्रह्मात्मा ॥ १६ ॥
परी स्मरणरूप जो अभ्यास । सोडूंच नये ब्रह्मात्मध्यास । तच्चिंतनादि एक परत्वास । केलेंचि करावें ॥ १७ ॥
हें साधकासी भाष्य आमुचें । देत असों हें मानोनि करा साचें । निसंतान होऊन तिन्ही अभिमानांचें।ब्रह्मात्मत्व दृढ होय
हें सत्य सत्य सत्यत्वें प्रमाण । अन्यथा नव्हे आमुचें वचन । परी केलें पाहिजे एकतान । अनुसंधान सर्वदा ॥ १९ ॥
अभ्यासाविण न घडे कदा । न तुटे देहबुद्धीची आपदा । न जोडे वस्तुतंत्रत्वें संपदा । हेंही सत्य सत्य ॥ ५३२० ॥
तस्मात् खरें जयासी तरणें । तेणें सदा असावें अनुसंधानें । तरी ब्रह्मत्व दृढ होऊन जाणें । गळून देहबुद्धि ॥ २१ ॥
आतां असावें सावधान । अनुक्रमें गळती तिन्ही अभिमान । तयांचे अवधीची वोळखण । बोलिजे अवधारा ॥ २२ ॥
आरंभीं मी माझेंपण जें असे । जयासी विश्वाभिधान ठेविलेंसे । तेंचि क्षीण होय या अभ्यासें । ध्यासें ब्रह्मात्मयाच्या २३
अपरोक्षें ज्ञान ब्रह्मात्मयाचें । जाहलें विचारें लयसाक्षित्वाचें । तत्क्षणींच निर्मूळ मी माझेपणाचें नव्हे सहसा ॥ २४ ॥
पूर्वीलि ध्यासें देहासी मीपण । घेऊन उठेल वृत्ति उद्भवून । जरी कळलें अहंब्रह्म म्हणून । तरी घेतां न राहे ॥ २५ ॥
हाचि विक्षेप आवरणही गेलिया । उद्भवेल गुप्त कीं प्रगट तया । देह मी म्हणून उठता आपसया । माझेपणा धरील ॥२६॥
अमुक कुळीं अमुक आश्रमाचा । अमुके स्थळीं अमुक वर्णाचा । ऐसा उद्गार होय जरी बद्धीचा । हा प्रगट विक्षेप ॥२७॥
ऐसाही उद्गार न होतां । सहजगतीं चांगुलपणा तत्वतां । देहादिकांचा वाटे जरी आंतौता हा गुप्तत्वें विशेष ॥ २८ ॥
गुप्त अथवा प्रगट मीपण । होतां ब्रह्मात्मबुद्धीचें होय हनन । आणि मीपणें धरीतसे माझेंपण । जें संपादित पूर्वापर ॥२९॥
माझेपणींही दोनचि प्रकार । एक प्रगट उठे माझें म्हणून उद्गार । एक सहजगतीं कळवळे अंतर । हेंचि गुप्तत्वें उठे ॥३०॥

---

असा निश्चय एकसारखा करीत असावें. तसेंच ब्रह्मात्म्यास एकसारखें आठवावें व बत्तीस तत्वांचा समुदाय स्फुरलातर त्याचा बळेंच त्याग करावा. याप्रमाणें स्मरणरूप अभ्यासानें अपाप तीन प्रकारचें मीपण नाहींसें होतें. मग जशी देहबुद्धी दृढ होती तशी ब्रह्मात्मबुद्धी दृढ होते. हें सर्वही एकदांच साधत नाहीं हळू हळू साधतें. मग पूर्व स्वभाव सोडून विश्व तैजस प्राज्ञ यांचें निर्मूळ होतें. प्रथम विश्वाभिमान नाहींसा होतो मग तैजस नाहींसा होतो मग प्राज्ञाभिमान नाहींसा होतो. व ब्रह्मात्मा उरतो. म्हणून ब्रह्मात्मध्यासरूपी स्मरणरूप अभ्यास न सोडतां तत्चिंतनादि एक परत्व करावें म्हणजे तिन्ही अभिमान जाऊन ब्रह्मात्मत्व दृढ होतें हें आमचें बोलणें प्रतिज्ञेचें आहे. परंतु नेहमीं अनुसंधान एकतान केलें पाहिजे त्यावांचून वर सांगितलेल्या गोष्टी घडत नाहींत; व पार देहबुद्धी जात नाहीं; आणि वस्तुतंत्रानें पारमार्थिक संपदा मिळत नाहीं म्हणून खरें ज्यास तरणें असेल त्यानें अशा अनुसंधानानें असावें म्हणजे मग देहबुद्धी जाऊन ब्रह्मबुद्धी दृढ होते व तिन्ही अभिमान गळतात.

**तिन्ही अभिमान निःशेष गळाले त्यांची अवधी.**

मी व माझेंपण अशा दोन प्रकारच्या विश्वाभिमानाचा क्षय ब्रह्मात्म्याच्या ध्यासानें म्हणजे स्मरणरूप अभ्यासानें होतो. अपरोक्षत्वानें ब्रह्मात्म्याचें म्हणजे लयसाक्षीत्वाचें विचारानें ज्ञान झालें तरी मी व माझेपण यांचें निर्मूळ एकाएकीं होत नाहीं व मी ब्रह्म आहें असें जरी कळलें तरी वृत्ती उत्पन्न होऊन पूर्वध्यासानें देहास मीपण घेतल्यावांचून रहाणार नाहीं हा त्यास गुप्त किंवा प्रगट मीपणारूपी विक्षेपआवरण गेलें तरीही उत्पन्न होईल, मी देह असें मानिलें कीं आपाप माझेपणा घेईल.

**प्रगट विक्षेप**–मी अमुक कुळांतील अमुक आश्रमी अमके गांवांत रहाणारा अमुक वर्णाचा आहें. असा बुद्धीपासून जर उद्गार निघेल तर तो प्रगटविक्षेप समजावा.

**गुप्त विक्षेप**–प्रगट विक्षेप न होतां सहजगती अंतर्यामीं देहादिकांचा चांगलेपणा वाटतो म्हणून हा गुप्तविक्षेप समजावा.

गुप्त किंवा प्रगट मीपणा उत्पन्न झाला असतां ब्रह्मात्मबुद्धीचा नाश होतो मग जे पूर्वीपासून संपादिलेलें [illegible] त्यास माझें मानितो, माझेपणाही गुप्त व प्रगट असा दोन प्रकारचा आहे.

**प्रगटमाझेपणा**–माझें अमुक आहे-असा प्रगट उद्गार निघतो हाच प्रगटमाझेपणा.

**गुप्तमाझेपणा**–सहजगती अंतर कळवळतें हा गुप्त माझेपणा.

असो ऐसें मीपण कीं माझेपण । गुप्त अथवा प्रगट उद्भवण । हे गळती या अनुसंधानेंकरून । चिरकाल अभ्यासें ॥ ३१ ॥
ब्रह्मात्म्याहून जें जें वेगळें । तें तें मिथ्यात्वें विवेचिलें सकळें । यावरी स्मरतसें मिथ्यात्वें निर्फळें । तरी येणें गळे माझेपण
माझें म्हणून विक्षेपें स्फुरतां । मिथ्या ऐसें स्मरतसे तत्त्वतां । तत्क्षणीं मावळे परी मागुता । माझेपण उफाळे ॥ ३३ ॥
पुन्हां उठतांचि मिथ्यात्वें स्मरावें । तयासी पुरतें उठोंचि न द्यावें । ऐसेंचि सदा अभ्यासावें । निःशेष निमे तोंवरी ॥ ३४ ॥
निःशेष निमाल्याची वोळखण । कळावया बोलिजे सावधान । अलभ्य पदार्थ जाती नासून । परी अंतर कळवळेना ॥ ३५ ॥
अति दुःखरूप होतें तें गेलें । अति सुखकर इंद्रपद प्राप्त जाहलें । तरी हर्षेना गुप्तत्वेंही पहिलें । जैसें अंतःकरण ॥ ३६ ॥
अथवा अति सुखकर पद जातां । अति दुःखकर पदार्थ मीनतां । खेद उद्भवेना अंतरा आंतौता । गुप्तत्वेंही ॥ ३७ ॥
जैसा पांथस्थ राहिला पराचे घरीं । त्याचें द्रव्य हरोन नेलें तस्करीं । अथवा मृत्यु पावली पद्मीनी नारी । आपण दृष्टीनें पाहतसे
परी किमपि खेद न वाटे जैसा । स्वस्थ निवांत असे मानसा । तैसें निजधन कीं स्वकुटुंबहानि सहसा । होता न कळवळावें
अथवा परस्थळीं एखादिया अलभ्य लाभ जाहला भलतिया । तो पहात असतांही जैसा यया । हर्ष आटेना ॥ ४० ॥
तैसाचि हर्ष जरी इंद्रसंपत्ति । मीनतांही उद्भवूं नये चित्तीं । एवं परकीयापरी पहावें आपणाप्रती । तरी हर्ष खेद कैंचे ॥ ४१ ॥
बहु कासयासी विस्तार । कळवळाचि नुठावा अणुमात्र । जो कां पिळतसे सहज अंतर । देंठ नाभीचा ॥ ४२ ॥
मग असो महालाभ कीं हानि । परी कळवळीच ना अंतःकरणीं । जैशी पराची देखतांही नयनीं । तैशीच सहज स्वदेहाची
ऐशी दृढता जरी आपुली । खरेपणें असेल जाहली । तरी जाणावी निःशेष तटली । मुळी माझेपणाची ॥ ४४ ॥
ऐशी प्रतीति जयाची तेणें । वोळखावी आपुले अंतःकरणें । जरी कळवळीच ना दृढ समाधानें । असतां माझेपण गळालें
नातरी माझें कांहीं नाहीं वरी वरी । बोलतसे परी कळवळे अंतरीं । तोचि जाणावा आत्महत्यारी । जो न तारी आपणा
तरी ऐसें साधकें न करावें । अंतरींचें यथार्थ वोळखावें । कीं हानिलाभें न कळवळावें । सहसा गुप्तही ॥ ४७ ॥
तथापि कळवळा जरी उठे । तरी अभ्यास करावाचि नेटें । जेव्हां निपटून हर्षविषाद तुटे । तेव्हांचि निवांत व्हावें ४८

---

### विश्वाभिमान गेल्याची खूण.

वर सांगितल्याप्रमाणें माझेपणा किंवा मीपणा गुप्त अथवा प्रगट उत्पन्न झाला तरी तो चिरकाळ अभ्यासानें नाहींसा होतो. ब्रह्मात्म्याखेरीज जो जो पदार्थ तो तो मिथ्या असें विवेचन झालें असून तें सर्व पदार्थ मिथ्या निष्फळ आहेत असें स्मरत आहे तर त्यायोगानें माझेपणा जातो. विक्षेपानें माझेपणाचें स्फुरण झालें तरी मिथ्या असें जर आठवत आहे, तर तो लागलाच मावळतो, व पुन्हां उत्पन्न होतो. तरी पुन्हा माझेपणा उठला असतां तो पुरता उठला नाहीं तोंच त्याचें मिथ्यत्वाचें स्मरण करावें. याप्रमाणें माझेपणा निःशेष जाईपर्यंत वर सांगितल्याप्रमाणें स्मरणरूप अभ्यास करावा.

### माझेपणा निःशेष गेल्याची खूण.

अलभ्य वस्तूचा नाश झाला असतांही अंतर कळवळत नाहीं अति दुःखरूप होतें तें नाहींसें झालें व अति सुख देणारें इंद्रपद प्राप्त झालें तरी गुप्तपणें हर्ष न मानितां जसें पहिलें अंतःकरण होतें तसेंच निर्विकार आहे. व अती सुख देणारे पदार्थ जाऊन अती दुःख देणारे पदार्थ प्राप्त झाले असतां गुप्तपणेंही अंतरांत खेद उत्पन्न होत नाहींत. जसा पांथस्थ पराचे घरीं असतां घरवाल्याचें चोरांनीं द्रव्य नेलें असतां अथवा त्याची पद्मिणी स्त्री मृत्यु पावली हें तो आपण दृष्टीनें पहात आहे परंतु त्याबद्दलचा त्यास किमपीही खेद न वाटतां जसें त्याचें मन स्वस्थ असतें, तसें आपलें द्रव्य किंवा कुटुंब यांची हानी झाली असतां न कळवळतां मन स्वस्थ असावें. अथवा दुसऱ्या जागीं असतां दुसऱ्याला अलभ्य लाभ झाला हें तो गृहस्थ पहात असतांही त्यास हर्ष वाटत नाहीं. त्याचप्रमाणें इंद्राचीही संपत्ती आपणास प्राप्त झाली तरी चित्तांत हर्ष होऊं नये. याप्रमाणें आपला पदार्थांशीं परक्याप्रमाणें संबंध ठेविला असतां मग हर्ष खेद कसा उत्पन्न होईल ? फार काय सांगावें, जो नाभीचा अंतर देंठ कळवळारूप पिळत असतो तो पिळूं देऊं नये. तो पिळला नाहीं तर महालाभ किंवा हानी झाली असतांही, अंतःकरणांत कळवळा उत्पन्न होत नाहीं. जसें परक्याच्या देहाचा नाश झाला असतां वाईट वाटत नाहीं, तसेंच आपल्या देहाचा नाश होत असतां वाईट वाटूं नये. याप्रमाणें आपली खरी दृढता झाली असेल, तरच माझेपणाची मुळी निःशेष निमाली असें समजावें. याप्रमाणें ज्याचा त्यानें अंतरांत अनुभव पहावा. जर दृढ समाधानानें अंतःकरण कळवळत नाहीं, तर माझेपण गेलें असें समजावें. कोणी वरवर माझें कांहीं नाहीं असें म्हणतात व पदार्थांच्या हानीनें अंतःकरणांत कळवळतात ते आत्मघाती समजावे. त्यांचा खरा माझेपणा जात नाहीं, म्हणून साधकानें त्यांच्यासारखें मानूं नये, तर हानी किंवा लाभ यांचे योगानें आपलें अंतःकरण कळवळतें कीं काय हें पहावें. व तें गुप्तपणें न कळवळेल असा अभ्यास करावा. जेव्हां हर्ष खेद निःशेष जातील तेव्हां निवांत व्हावें.

ऐसा माझेपणा निपटून गेलियाचा। अवधि सांगितला असे साचा। परी मीपणा जाईल जेव्हां देहाचा। तेव्हांचि माझेपणागळे
मीपण गुप्तलें जरी देहाचें। तरी माझेपण निमालें नवचे। परंतु आधीं सांगितलें अवधीचें। लक्षण कळावया ॥ ५० ॥
तस्मात् आधीं मीपण तुटावें। तरी माझेपण अपैसया गळावें। तें मीपण जावया अभ्यासावें। अहंब्रह्मास्मि स्वयें ॥ ५१ ॥
वृत्तीनें लयसाक्षित्व लक्षावें। बुद्धीनें तेंचि निश्चया आणावें। मनेंही तेंचि आपण चिंतावें। उच्चारावें वाणीनें ॥ ५२ ॥
स्फूर्तीपासून देहापर्यंत। हा मी नव्हेचि सर्व संघात। अहमात्मा मी स्वयें अनंत। एकतान स्मरावा ॥ ५३ ॥
पूर्वाध्यासें जरी देहाचें। मीपण गुप्त कीं प्रगट उठूं लागे साचें। तरी तें विवेचून त्यागावें अंतरींचें। अहंब्रह्मास्मि स्मरोनी
अहंब्रह्मास्मीचा विरस। पडोंचि नये निमिषमात्र। मग कैंचा होईल यया अवसर। देहाचे मीपणासी ॥ ५५ ॥
अहंब्रह्मात्मा निश्चय वाढे। अहंदेहात्मा निःशेष मोडे। परी साधकें अभ्यासावें कोडें। बोलिल्या रीतीं ॥ ५६ ॥
आतां मीपण गेलियाची खूण। बोलिजे अंतरीं पहावी वोळखून। भलते अवस्थेसी देहाचें वर्तन। परी मी म्हणून स्फुरेना
जागरीं व्यापार होत असतां। परी मी अमुकवर्णाश्रमी तत्त्वतां। अथवा सुखीदुःखी कीं नावें वाहतां। मी म्हणून स्फुरेना
ऐसा जागृतींत दृढ जाहलिया। स्वप्नींही मीपण स्फुरेना तया। अहंब्रह्मास्मीच येतसे प्रत्यया। भास देहाचे ठाईं ॥ ५९
बहु कासया गाढ झोंपेआंत। लयसाक्षित्व उरे नेणीवरहित। ते समयीं कोणीही रविदत्त। म्हणोनि बाहे ॥ ६० ॥
तेव्हां उठोनि बोले तयासी। परी मी नव्हे हा नामरूपी आकारेंसी। अहंब्रह्म प्रतीति कीं अविनाशी। स्मरोनि व्यापारही संपादी
ऐसें भलते अवस्थे भलते व्यापारीं। देहादि वर्ततां त्या त्या अनुकारीं। परी गुप्तही स्फुरेना अंतरीं। मी देह म्हणोनि
स्वप्नीं कीं सुषुप्तीचे अंतीं। जरी न स्फुरे देहादि अहंस्फूर्ति। मा जागरीं तों प्रबोधाची उन्नति। तेव्हां तो अवसर कैंचा
या रीतीं जेधवां देहबुद्धीचा। मीपणा मावळेल निपटून साचा। ऐसा अंतरीं प्रत्यय जयाचा। तेणेंचि पहावा ॥ ६४ ॥
निःशेष मीपण उठूं राहिलें। आणि देह तरी वर्ते रीतीं पहिलें। तरी मग जाणावें मीपण गेलें। माझेपणासहित ॥ ६५

---

याप्रमाणें माझेपणा निःशेष गेल्याचा अवधी सांगितला. परंतु देहाचा मीपणा जेव्हां जाईल तेव्हांच माझेपणा नाहींसा होईल. जर देहाचें मीपण गुप्तपणें आहे तर माझेपणा नाहींसा होत नाहीं. पण माझेपणाचे अवधीचें लक्षण कळण्याकरितां तें आधीं सांगितलें, वास्तविक आधीं मीपण गेलें तरच माझेपण सहज जाईल. करितां मीपण जावें म्हणून मी स्वतां ब्रह्म आहें असा स्मरणरूप अभ्यास करावा. वृत्तीनें लयसाक्षित्व पहावें व बुद्धीनें त्याचाच निश्चय करावा, मनानें तेंच चिंतावें वाणीनें त्याचाच उच्चार करावा, स्फूर्तिपासून देहापर्यंत सर्व समुदाय मी नव्हे, तर मी आत्मा आहे, असें एकतान आठवावें. जर पूर्वाध्यासानें देहाचा गुप्त किंवा प्रगट मीपणा उठूं लागेल, वर विवेचन करून अहंब्रह्मास्मी स्मरून त्या मीपणाचा त्याग करावा. अहंब्रह्मास्मीचा विसर एक क्षणभरसुद्धां पडूं देऊं नये. तो जर विसर पडला नाहीं तर मग देहाचा मीपणा उत्पन्न होण्यास अवधींच सांपडणार नाहीं. मी ब्रह्म असा निश्चय वाढला असतां मी देह हा भाव मोडतो. म्हणून साधकानें वर सांगितल्याप्रमाणें प्रीतीनें अभ्यास करावा.

**मीपणा निःशेष गेल्याची खूण.**

मीपण निःशेष गेल्यावर भलतीही अवस्था असली तरी मी देह असें आठवत नाहीं. जागृतींत व्यापार होत असतां मी अमुक वर्णाचा अमुक आश्रमी सुखी दुःखी किंवा अमुक नांवाचा आहे. असें जरी वर्तन होतें, तरी त्यांत मीपणा स्फुरत नाहीं. याप्रमाणें जागृतींत दृढता झाली असतां त्यास स्वप्नांत मीपणा आठवत नाहीं. तर भासदेहांत अहंब्रह्मास्मीचा अनुभव येतो. फार काय सांगावें, गाढ झोंपेंत नेणीवरहित लयसाक्षित्व उरतें, तेव्हां कोणी रविदत्त या नांवानें हाक मारिली असतां त्याशीं उठून बोलतो, परंतु मी नामरूप आकारी नाहीं तर मी अविकारी ब्रह्म आहें. हा अनुभव आठवून व्यापार करितो. याप्रमाणें भलतेही अवस्थेंत किंवा भलतेही व्यापारांत देहादिक वागत असतां त्यांस अनुसरतो, परंतु मी देह असें अंतरांत गुप्तपणेंही आठवीत नाहीं. जर स्वप्नाच्या किंवा झोंपेच्या अंतीं देहादिक अहंस्फूर्ति आठवत नाहीं, मग जागृतींत तर बोधाचा उत्कर्ष आहे, तेव्हां तेथें मीपण स्फुरण्यास अवकाश कोठचा सांपडेल? त्याप्रमाणें जेव्हां देहबुद्धी निःशेष मावळेल तेव्हां देहबुद्धीचा लय अंतरीं झाला असें ज्याचें त्यानें पहावें. देह पूर्वीप्रमाणें वागत असतांना जर मीपणा अगदीं उठण्याचा राहिला तर समजावें कीं माझेपणासह मीपणा गेला.

मीपणाचि जरी न स्फुरे देहाचा। तरी मग माझेपणा उद्भवे कैंचा। एवं मी माझें या उभयात्मकाचा। विश्वाभिमान एक
ऐसा विश्वाभिमानी निमाल्याचा। अंतरीं प्रत्यय पहावा साचा। मग वरुती बोलेना वाचा। मी माझेंही म्हणोनि ॥ ६७
अंतरींचें मात्र निपटूनि जावें। देहात्मबुद्धीचा मोडही नुद्भवे। तरी मग पराकाष्ठेसी साधक जाणावें। कीं निमाला विश्वाभिमान ॥ ६८ ॥
ऐसें न घडतां उगा वरी वरी। मी माझें म्हणून कदा नुच्चारी। परी म्यां सुखीं असावें वाटे अंतरीं। तो निरभिमानी न म्हणावा
तस्मात् साधकें खरोंचि तरावें। मी माझेपण खांडून काढावें। नातरी पूर्वरीतींच अभ्यासावें। निशेःष निमेल तोंवरी ७०
निःशेष मीपण उठतां राहिलें। ऐसें खरेपणें प्रत्यया आलें। तरी मग जाणावे निःसंतान जाहलें। विश्वाभिमानाचें ॥ ७१
ऐसा विश्वाभिमान जेव्हां निमाला। तरी जाणा स्थूल वोलांडिला। अन्नमय देहापासून सुटला। अहंब्रह्म अभ्यासें ७२
जरी विश्वाभिमानही निमतां। तैजस अभिमानी उरे आंतौता। ध्यासें स्फुरतसे मी कर्ता भोक्ता। गुप्त किंवा प्रगट ७३
या देहादिकांचे संघेंकडून। सर्व होतां न राहे वर्तन। आणि चतुष्टयाचें उगें चिंतन। कदापि न राहे ॥ ७४ ॥
हें तों सहजगतींच होत असे। परी साधक संकोचून मानसें। म्हणे हें होतां न राहे तरी आपैसें। केलें तें भोगा येईल
केलें तें कदापि चुकेना। ऐसें बोलती शास्त्रें नाना। तरी भोगा येतील अवश्य आपणां। तस्मात् क्रिया राहावी ॥ ७६
पुण्यात्मक घडतां उत्तम गति। पापात्मक होतां अधम गती। ऐसें स्फूरू लागेल जरी स्फूर्ति। हाचि प्रगट तैजस ७७
जरी ब्रह्मज्ञानही जाहलें। सर्वांवेगळें लयसाक्षित्व कळलें। तरीही पूर्वाध्यासें शुभाशुभ घडलें। घेईल माथां ॥ ७८ ॥
कांहीं पुण्यात्मक घडतां। पापात्मकासी अव्हेरिता। आल्हादें हर्ष होय चित्ता। हाही प्रगट तैजस ॥ ७९ ॥
पुण्यात्मक कांहीं न घडलें। कर्मबळें पापाचि घडून आलें। तेव्हां अति खेदासी चित्त पावलें। हाही प्रगट तैजस ॥ ८०

---

जर मीपणा देहाचा आठवत नाहीं तर माझेपणाही आठवणार नाहीं. याप्रमाणें मी व माझेपणा अशा दोन प्रकारचा जो विश्वाभिमान तो गेला असा अनुभव पहावा. त्याची गेल्याची पूर्ण खात्री झाल्यावर मग वाचेनें मी व माझें, असें म्हटलें तरी बाधा नाहीं. वरवरचा मी माझेपणा असला तरी चालेल परंतु अंतर्यामीं देहात्मबुद्धीचा मोड उत्पन्न होणार नाहीं; असा निपटून मी व माझेपणा गेला पाहिजे. व असा मी व माझेपणा गेला म्हणजे साधकानें समजावें कीं विश्वाभिमान निमाल्याची पराकाष्टा झाली. असा अंतरापासून विश्वाभिमान न जातां उगीच वरवर मीमाझेपणाचा वाचेनें मात्र कधीं उच्चार करीत नाहीं आणि अंतर्यामीं मी सुखी असावें असें जर आठवीत आहे तर तो निरभिमानी आहे असें समजूं नये. साधकानें जर खरें तरणें आहे तर मी व माझेपणा, वर सांगितल्याप्रमाणें अंतरापासून निःशेष घालावावा. तसें होत नसेल तर पूर्वी सांगितल्याप्रमाणें विश्वाभिमान निःशेष नाहींसा होईपर्यंत अभ्यास करावा. मीपण उठण्याचें निःशेष राहिलें, असा त्याचा खरेपणा अनुभवास आला, तर समजावें कीं विश्वाभिमानाचें निःसंतान झालें. याप्रमाणें अहंब्रह्म या अभ्यासानें विश्वाभिमान जेव्हां निःशेष नाहींसा झाला तेव्हां स्थूल दे ओलांडिला म्हणजे, ता अन्नमयदेहापासून कोशापासून सुटला असें समजावें. विश्वाभिमान गेला तरी तैजस अभिमान उरतो. तो ध्यासानें मी कर्ता भोक्ता असें गुप्त किंवा प्रगटपणें स्फुरतो. तो कसा तें सांगतों.

## तैजस अभिमान निःशेष गेल्याची खूण.

देहादिक समुदायाच्या योगानें सर्व प्रकारचें वर्तन झाल्याशिवाय रहात नाहीं. तसेंच चतुष्टयाचें चिंतनही झाल्यावांचून उगीच रहात नाहीं. हें सर्व सहजच होतें. परंतु साधक मनांत संकोचून म्हणतो कीं, हें होण्याचें रहात नाहीं, त्यापेक्षा तें केलेलें कर्म सर्व आपाप भोगावें लागेल. जें केलें तें भोगिल्यावांचून चुकत नाहीं असें अनेक प्रकारचीं शास्त्रें सांगतात, तेव्हा तें आपणास भोगिलेंच पाहिजे. करितां सर्वांची क्रिया रहावी, म्हणजे मग आपणास कांहींच भोगावें लागणार नाहीं.

**प्रगट तैजस**—पुण्यात्मक घडलें तर उत्तम गती मिळेल, आणि पापात्मक घडलें तर अधम गती मिळेल, असें जर अंतर्यामीं स्फुरत आहे, तर तो प्रगट तैजस समजावा.

ब्रह्मज्ञान होऊन सर्वांहून लयसाक्षित्व निराळें आहे असें कळलें, तरीही पूर्व अभ्यासानें जें शुभाशुभ घडेल ते माथीं घेईल. पापात्मक टाकून पुण्यात्मक घडूं लागलें, तर आल्हादानें चित्तास हर्ष होईल; हा प्रगट तैजस समजावा.

क्षण एक वाटे मी असंग । अकर्ता निर्विकार अभंग । क्षणा एका चित्तासी लागे डाग । अहंकर्तृत्वाचा ॥ ८१ ॥
असो ऐसा प्रगट अभिमानी । जन्मासी होईल चिदानी । परी गुप्तत्वें उठे जो अंतःकरणीं । तोही संसृतींत पाडी ॥ ८२
तया गुप्तरूपें तैजसाचें । रूप बोलिजे संकेतें वाचे । मनबुद्धीसी तो विशेषें नवचे । परी सामान्यवृत्तीसी स्फुरे ॥ ८३ ॥
सहजगतीं पुण्यात्मकासी । अथवा पापात्मका न घडतां वृत्तीसी । पिशेषें न घेतांही सहजत्वेंसी । हर्षाकारता उठे ८४
कर्मबळें पापात्मक घडलें । पुण्यात्मक नाहीं घडून आलें । विशेषें बुद्धीसी नाहीं स्पर्शलें । परी सहज खेदावे वृत्ति ॥ ८५
एवं विशेषें निश्चया तरी न येतां । हर्षखेदात्मक स्फुरतां । हाचि गुप्त साभिमान तत्त्वतां । तैजस सूक्ष्म देहाचा ॥ ८६ ॥
म्हणसी प्रगट विशेषें नव्हे जरी । तरी बाधक असेल कवणे परी । परंतु विचारून पाहें अंतरीं । हेंचि बीज उत्पत्तीसी ८७
हें बीज जरी गुप्तत्वें उरतां । विशेषासी उद्भव होय तत्त्वतां । तस्मात् गुप्तत्वेंही हर्षखेदाकारता । वृत्तीसी नुरावी ॥८८॥
यासी अभ्यास हाचि करणें । अहंब्रह्मास्मि एकतान स्मरणें । येर हें मिथ्यात्वें स्मरावें वृत्तीनें । किमपि विस्मर न होतां
अगा ऐशिया अभ्यासापुढें । तैजस अभिमानाचें होय मढें । कदाही गुप्तत्वें नुठे सांकडें । सहजचि हर्ष खेदाच ॥ ९० ॥
तस्मात् अभ्यास वास्तविक करावा । निपटून तैजस अभिमान दवडावा । तरीच हा भवपाश तुटावा । लयसाक्षीही कळल्यावरी
जरी लयसाक्षिज्ञान होऊनी । गुप्तत्वें उरे तैजसाभिमानी । तरी कैवल्य पावेल बोले जो वाणी । तयाचा गुरुही लटिका ९२
यास्तव खरें जयासी तरणें । तरी तेणें यथार्थ अभ्यास करणें । अभ्यासें निपटून नाश होणें । हें सत्य सत्य त्रिवाचा ९३
निःशेष तजसाभिमान निमाला । याची अवधी सांगूं साधकाला । तैशी वोळख न पहावी अंतराला । गुप्तत्वेंही उठे कीं नुठे
भलतैसा देह हा वर्तो । पुण्य कीं पापात्मका प्रवर्तो । मनबुद्धीही पाहिजे तें चिंतो । वाणी बडबडो भलतैशी ॥ ९५ ॥
बहु कासया जग सर्व संहारो । आपुलें हातें निपटून मारो । अथवा सर्वां वांचवो कीं निर्माण करो । परी हर्ष खेद नुठे

---

क्षणभर वाटावें कीं, मी असंग, अकर्ता, निर्विकार, अभंग आहे; क्षणभर वाटावें कीं, मी कर्ता, भोक्ता आहे. जेव्हां पुण्यात्मक घडावयाचें राहून कर्मबळानें पापच घडून आलें तर चित्तास अती खेद वाटेल, हाही प्रगट तैजस. याप्रमाणें जो प्रगट तैजस अभिमान, तो जन्ममरण देईलच; परंतु जो गुप्तरूपें अंतःकरणांत तैजस अभिमान उठतो, तोही जन्ममरण दिल्यावांचून रहात नाहीं या गुप्त तैजसाचे रूप सांगतों.

**गुप्त तैजस**—गुप्त तैजस हा मनबुद्धीस विशेषत्वानें कळत नाहीं; परंतु तो सामान्य वृत्तीस स्फुरतो. तो असाः कांहीं पुण्यात्मक अथवा पापात्मक घडलें नसतांही सहजगती वृत्तीनें विशेषत्वानें घेतलें नाहीं, तरी हर्षाकरता सहज उठते. तसेंच कर्मबळानें पुण्यात्मक न घडतां पापात्मक घडून आलें, तें बुद्धीस विशेषत्वानें कळलें नाहीं, परंतु वृत्तीस सहज खेद वाटतो. याप्रमाणें विशेषत्वानें निश्चयास न येतां हर्ष खेद स्फुरले, तर तो गुप्त तैजस अभिमान समजावा.

**शंका**—तूं म्हणशील कीं, जर तैजस विशेषत्वानें प्रगट नाहीं तर बाधक कसा होईल ?

उत्तर—रविदत्ता, तूं विचार करून पहा. सर्वांचे उत्पत्तीचें बीज हा गुप्त तैजस आहे. हें बीज जर गुप्तत्वानें उरलें आहे, तर विशेष उत्पन्न होईलच. याकरितां गुप्तत्वानेंही हर्षखेदाकारता वृत्तीस वाटूं नये, व तीं न वाटण्याकरितां अभ्यास केला पाहिजे.

अहंब्रह्मास्मी एकतान स्मरावें. त्यावांचून इतर सर्व मिथ्या. हें विस्मृती न होतां वृत्तीनें आठवावें. याप्रमाणें अभ्यास केला असतां गुप्तत्वानें तैजस अभिमान उठत नाहीं. म्हणूनच अभ्यास करून तैजस अभिमान निःशेष घालविला म्हणजे लयसाक्षी कळेल. तो लयसाक्षी कळल्यावर भवनाश होईल. लयसाक्षी होऊनही जर गुप्त तैजस राहील, तर त्यास मोक्ष प्राप्त होत नाहीं; पण कोणी गुरुत्वानें सांगतील कीं, गुप्त तैजस उरला तरी मोक्ष होतो, तर असें सांगणारे जे गुरु ते खोटे समजावे. ज्याला खरें तरणें असेल त्यानें यथार्थ अभ्यास करावा. अभ्यासानें तैजस अभिमानाचा निःशेष नाश होतो. त्या तैजस अभिमानाची अवधी सांगतों.

### तैजस अभिमान निःशेष गेल्याची अवधी.

आम्ही तैजस अभिमान गेल्याची खूण सांगतों, त्याप्रमाणें गुप्त किंवा प्रगट असा तैजस उठतो किंवा नाहीं हें साधकानें अंतर्यामीं ओळखून पहावें. हा देह भलतैसा वागो, तो पुण्य किंवा पाप करण्यास तयार होवो, मनबुद्धि पाहिजे तें चिंतो, वाणी पाहिजे तें बडबडो, फार काय सांगूं, सर्व जग आपल्या हातानें संहारो, अथवा सर्वांस वांचवो किंवा सर्वांस उत्पन्न करो; परंतु त्यास हर्षखेद उत्पन्न होत नाहीं.

कायहो हें मी पाप करिता जाहलों। कायहो पुण्य नाहीं आचरलों। अथवा पापासि नाहीं स्पर्शलों। पुण्यचि केलें उदंड
ऐसा खरखरा हर्षशोकाचा । गुप्तही नुठे अंतरीं साचा । उगाचि सहजगतीं वर्तणुकीचा । परोक्षरीतीं तमाशा पाहे ॥ ९८॥
स्फूर्तीपासून देहापर्यंत । जैसा परकीय कोणी असे वर्तत । आणि हें स्वपर जग समस्त । कळसूत्रापरी पाहे ॥ ५३९९ ॥
अथवा भिंतीवरील चित्रें सर्व । त्यांताचि आपुले देहाचा गौरव। काढिले कीं मोडिले अपूर्व । तरी पापापुण्या ठाव कैंचा
आपुले देहासी मी म्हणेना । हें जग सर्व मिथ्यात्वें गंधर्वरचना । तरी कोण मारी कोण पावे मरणा । कोण जीवे कोण जिववी
ऐसा कर्तेपणाच किमपि नुद्भवे । केलें ऐसेंही कदा न संभवे । सर्व व्यापार तरी होती स्वभावें । शुभ किंवा अशुभ ॥ २॥
कर्तेपण कीं केलें ऐसें। नुद्भवेचि वर्ततांही भलतैसें । मग हर्ष खेद उद्भवतील कैसे । गुप्त कीं प्रगट ॥ ३ ॥
ऐसा खरखरा कर्तेपणाचा। वर्ततांही निपटून जावा साचा । गुप्तही थारा हर्षखेदाचा। मोडोनि जावा ॥ ४ ॥
कर्तेपणा जरी निपटून गेला । तरी भोक्तेपणा अर्थात् निमाला । पुढीलही सर्व धोका हरला । आणि प्रस्तुत भोग माईक
एवं कर्तृत्व भोक्तृत्व उभयरूपी । तैजस अभिमान विक्षेपी । याचें निसंतान जाहलें किमपि । लेशं उरला नाहीं ॥ ६ ॥
ऐसा निःशेष निमाला खरा । तो जयाचा तेणें पहावा अंतरा । कीं भलतैसे होत्साता व्यापारा । अहंस्फूर्ति स्फुरूं नये ७
व्यापारहोतअसतांचिनव्हावी । व्यापारनहोतांरोधस्थितिनसावी । कारणकींजोंवरीनिर्व्यापारताबरवी।तोंवरीदेहात्मत्वनस्फुरे
निर्व्यापार समाधि विसर्जून । होईल जेव्हां बुद्धीचें उत्थान । तेधवां उठेल मी देह म्हणून । तस्मात् नसावा निरोध ॥ ९ ॥
जे पाहिजे ते व्यापार व्हावे । बुद्ध्यादि देहांत आघवे । तिहींही अवस्थांमाजीं न स्फुरावें । देहात्मत्व गुप्तही ॥ ५४१० ॥
किंचितही न स्फुरेसें जाहलें । तें जयाचें तयाशी प्रत्यया आलें । म्हणिजे जाणावें क्षयातें पावलें। उत्थान तैजसाचें ११
नातरी अभ्यासाविरहित । उगाचि एखादा अकर्तेपणा दावित । अंतरीं अहंस्फूर्ति असे उठत । तो मुक्त कदा न म्हणावा

---

अहो, हें मी काय पाप करूं लागलों, मी पुण्य मुळचि आचरलों नाहीं, किंवा पाप न करितां उदंड पुण्यच केलें, असा 'खरखरा' अंतरयामीं गुप्तपणेंही उत्पन्न होत नाहीं, तर उगीच सहजगती वर्तणुकीचा परोक्ष रीतीनें तमाशा पहातो. स्फूर्तीपासून देहापर्यंत सर्व समुदाय परकीपणानें कोणीएक वागत आहे. तसेंच आपलें शरीर किंवा आपले आप्त व परक्याचें शरीर व परक्याचे आप्त मिळून जें हें सर्व जग कळसूत्री बाहुल्याप्रमाणें पहातो; तसेंच भिंतीवरील काढिलेलीं चित्रें त्यांतच आपला देह काढला आहे. तेव्हां त्या सर्व चित्रांस काढिलें किंवा मोडिलें याचें अपूर्वच नाहीं. मग पापपुण्य कोठें उरेल? आपल्या देहास मी म्हणत नाहीं व हें जग सर्वही गंधर्वनगराप्रमाणें मिथ्या आहे. तेव्हां कोण मारतो, कोण मरतो, कोण जगवतो, कोण जगतो. याप्रमाणें कर्तेपणा यत्किंचितही उत्पन्न होत नाहीं. शुभ किंवा अशुभ सर्व व्यापार सहज होत आहेत. पण आतां अमुक व्यापार चालला आहे असें ज्यास वाटतच नाहीं, तो भलतसे व्यापारांत वर्तत असतां कर्तेपणा किंवा मी कांहीं केलें असें ज्यास वाटतच नाहीं, मग गुप्त किंवा प्रगट हर्षखेद कसे उत्पन्न होतील? सर्व व्यापारांत वागत असतां वर सांगितल्याप्रमाणें कर्तेपणाचा खरखरा निःशेष जावा, व गुप्त उठणारा हर्ष खेद यास थारा मिळूं नये, म्हणजे गुप्त हर्षखेद उत्पन्न होऊं नये. कर्तेपणा जर निःशेष गेला आहे तर भोक्तेपणा सहजच नाहींसा होतो. याप्रमाणें दोन्हीही नाहींसे झाले, तर पुढील धोका हरला असें समजावें व सध्या जो भोग घडत आहे तो मायिक आहे. याप्रमाणें कर्ता भोक्ता अशा दोन प्रकारचा जो विक्षेप करणारा तैजस अभिमान त्याचें लेश न उरतां निःसंतान झालें असें समजावें. व तैजस अहंस्फूर्ति न स्फुरता भलताही व्यापार होत असतां निःशेष गेला; हें ज्याचें त्यानें अंतरयामीं पहावें.

शंका—अहंस्फूर्ति व्यापार होत असतां उत्पन्न होऊं नये व ज्यावेळीं व्यापार होत नसेल तेव्हां तिचा रोध असावा.

उत्तर—रविदत्ता, तूं घेतलेली शंका निरर्थक आहे. कारण जेव्हां व्यापार नसतो तेव्हां देहाभिमान उत्पन्न होत नाहीं. असें असतां जर रोध करील तर निर्व्यापाररूपी समाधी विसर्जिल्यावर जेव्हां बुद्धी उठेल, तेव्हां मी देह असा देहाभिमान घेईल. करितां निर्व्यापारांत अहंस्फूर्तीचा निरोध नको. बुद्धीपासून देहापर्यंत जे व्यापार होतील ते होवोत, परंतु तिन्हीही अवस्थेंत गुप्तरूपानें अहंस्फूर्ति उठूं नये. अहंस्फूर्ति किंचितही उठत नाहीं असें ज्याचें त्यालाच कळलें म्हणजे समजावें कीं, तैजसाचें उत्थानाचा क्षय झाला.

कोणी अभ्यासावांचून अंतरीं अहंस्फूर्ति उठत असतां उगाच अकर्तेपणा दाखवितात; तो अकर्तेपणा दाखविणारा पुरुष मुक्त नाहीं असें समजावें.

तस्मात् तैजस निमाला असे खरा। ऐसा प्रत्यय बाणावा अंतरां । बोलिल्या रीतीं भलतैसे व्यापारा । नुद्भवावा गुप्तही १३
तोंवरी अभ्यास कदा सोडूं नये । निःसंशयेंसी पावेल क्षय । वास्तविक निमाल्याचा आला प्रत्यय । तरी साध्यरूप जाहला
एवं ऐसा तैजस जरी निमाला। सर्व व्यापारीं विक्षेप नाहीं स्फुरला । तरीजाणावासूक्ष्मदेहवोलांडिला । स्वप्नासहित साधकें
जरी तैजस निःशेष सरे । तरी प्राज्ञ अभिमान उरे । कैसा म्हणसी तरी अति आदरें । श्रवण करावें ॥ ५४१६ ॥
अकर्तेपण वास्तविक जहालें । तैजसाचें स्फुरण मावळलें । सहजस्थितीनें वर्तू लागलें । हे सहज समाधि ॥ १७ ॥
सदा एकतान ब्रह्माकार । दुजा स्फुरेना किंचित् उद्गार । हें जग कीं हा मी नव्हेचि अनुकार । ओतप्रोत ब्रह्मात्मा १८
ऐशिया सहज समाधिमाजीं । किंचित् स्फूर्ति नसतांही दुजी । परी तेथें मूळाज्ञान असे सहजीं । ध्येय ध्यान त्रिपुटीरूपें
तें मूळाज्ञान कोणतें म्हणसी । तरी आवधारावें निश्चित मानसीं । मी अकर्तेपणें अखंडैकरसीं । समाधान पावलों ५४२०
ऐसा समाधानरूप अनुभवाचा । स्फुरत असे मीपणा साचा । तो ब्रह्मात्मा नव्हे प्रत्यक्ष देहादिकांचा । अभ्यास घेतला
आपण अनुभाव्यरूप स्वतां असोनी । अनुभविता जाहला वेगळेपणीं । हेंचि विस्मरणें ब्रह्मात्मयालागूनी । हेंचि मूलाज्ञान
येरव्हीं ब्रह्मात्मा या मायेकडून । केव्हां जाहला होता निर्माण । तरी पावला अनुभवरूप समाधान । हें सहसा न घडे
तस्मात् अन्याचा ध्यास घेतला । मी पावलों ब्रह्मसुखाला । हेंचि विस्मरणरूपें भिन्न पडिला । कारणाभिमानी प्राज्ञ
या प्राज्ञाचेही प्रकार दोन । एक गुप्त एक प्रगट पावे उत्थान । जो मी सुखी ऐसें वृत्तीचें भान । हा अभिमान प्रगट २५
मी धन्य जाहलों मुक्त आतां । विसर्जूनियां सर्व संघाता । धन्य मीच पावलों अभिन्नता । हा प्रगट कीं प्राज्ञ ॥ २६ ॥
ऐसा विशेष भाव नसतां जरी । उगी समाधानाची तृप्ति वरी । सामान्यवृत्ति ब्रह्मसुखानुकारी । हा गुप्तत्वें प्राज्ञ ॥२७
ऐसा उभयरूपी प्राज्ञ असतां । ते म्हणूं नये पूर्ण अभिन्नता । केवळ अभिन्न जे वस्तुतंत्रता । होणें उरली असे ५४२८
आणि हें मूलाज्ञान उत्पत्तीसी । कारण असे कीं बीजरूपेंसी । या प्राज्ञापासून जन्म उभयांसी । तैजसविश्वाचा ॥ २९

---

आपणास अंतर्यामीं तैजस खरा नाश पावला असा अनुभव बाणला पाहिजे. भलतेही व्यापारांत तो गुप्त रूपानें उठत नाहींसा होईपर्यंत अभ्यास कधींही सोडूं नये, अभ्यास सोडिला नाहीं तर निःसंशय तैजसाचा क्षय होईल. जर तो वास्तविक निमाला असा अनुभव येईल, तर तो साध्यरूप झाला असें समजावें. वर सांगितल्याप्रमाणें सर्व व्यापार होत असतां त्याचा विक्षेप स्फुरला नाहीं, असा निःशेष तैजस निमाला, तर समजावें कीं, साधकानें स्वप्नासह सूक्ष्मदेह ओलांडिला. याप्रमाणें तैजस निःशेष नाहींसा झाला तरी प्राज्ञ अभिमान उरतो त्याचें लक्षण सांगतों.

### प्राज्ञाभिमान निःशेष गेल्याची खूण.

जेव्हां वास्तविक अकर्तेपण होतें तेव्हां तैजसाचें स्फुरण मावळतें व सहज स्थितीनें वर्तू लागतो, ही सहज समाधी. सदा एकतान ब्रह्माकार दुसरा किंचित्‌ही उद्गार स्फुरत नाहीं व हें जग किंवा हा मी असा अनुकारही होत नाहीं, तर ओतप्रोत एक ब्रह्मात्मा उरतो अशा सहज समाधीमध्यें किंचित्‌ही दुसरे प्रकारची स्फूर्ति नसते; परंतु तेथें ध्येय ध्यान त्रिपुटीरूपानें सहजी मूळाज्ञान रहातें. तें कोणतें तें सांगतों.

### मूळाज्ञान.

मी अकर्तेपणानें अखंडैकरशीं समाधान पावलों असा समाधानरूप अनुभवाचा मीपणा स्फुरतो, तो ब्रह्मात्मा नव्हे, तर प्रत्यक्ष देहादिकांचा ध्यास घेतलेला आहे, स्वतां आपण अनुभाव्यरूप असून वेगळेपणानें अनुभवणारा झाला, हेंच ब्रह्मात्म्याचें विस्मरण समजावें. हेंच मूलाज्ञान. मुळाज्ञानाखेरीज ब्रह्मात्मा मायेनें केव्हां उत्पन्न झाला व तो अनुभवरूप समाधान पावला हें सहसा घडत नाहीं. पण यानें दुसऱ्याचा ध्यास घेतला, व मी ब्रह्मसुख पावलों असा मीपणा घेतला. हेंच विस्मरणरूप भिन्नपण झालें. यासच कारणाभिमानी प्राज्ञ म्हणतात. हा प्राज्ञही गुप्त व प्रगट अशा दोन प्रकारानें उत्थान पावतो.

**प्रगट प्राज्ञ**—मी सुखी असें जें वृत्तीचें भान हा प्रगट प्राज्ञ. तसेंच मी धन्य, सर्व संघास टाकून मुक्त झालों, मीच अभिन्नता पावलों, म्हणून धन्यता मानणें, हा प्रगट प्राज्ञ समजावा.

**गुप्त प्राज्ञ**—वर सांगितल्याप्रमाणें विशेष भाव नसतांही सामान्यवृत्ति ब्रह्मसुखास अनुकुल होऊन उगीच समाधानाची तृप्ती घेतो हा गुप्तत्वानें प्राज्ञ समजावा.

वर सांगितल्याप्रमाणें दोन प्रकारचा प्राज्ञ असल्यामुळें जी अभिन्नता होते, ती पूर्ण अभिन्नता आहे असें समजूं नये, तर केवळ अभिन्न जी वस्तुतंत्रता, ती होणें राहिली आहे. वास्तविक हें मूळाज्ञानच बीजरूपानें उत्पत्तीस कारण आहे. या प्राज्ञ अभिमानापासून विश्वतैजस यांची उत्पत्ति आहे.

हें मूळबीज तैसेंचि उरलें । आणि विश्व तैजस जरी निमाले । तरीं ते जाणावे उद्भवतील पहिले । रीतीं मागुतींही
तस्मात् ऐशिया मूलाज्ञानासहित । प्राज्ञ अभिमानाचा व्हावा घात । तरीचवस्तुंतत्रत्वेंकैवल्यापावत । साधकत्वत्यागेंसाध्या
ऐसें हें मूलाज्ञान जावया । वस्तुतंत्र अभिन्न व्हावया । अभ्यासचि पाहिजे शिष्यराया । चिरकाळ ब्रह्मास्मीचा ॥३२॥
हा जो ब्रह्मींचा अनुभविता । पावला सहज सुखाकारता । तो मी ब्रह्म नव्हेचि स्वतां । केवळ निर्विकार ॥ ३३ ॥
यापरता जो स्वयें निर्विकार । लयसाक्षी अभंग निर्धार । ध्याता ज्या सुखें सुखाकार । तो मी ब्रह्मात्मा स्वयें ॥३४॥
त्या माझा मज कैंचा अनुभव । सुख सुखी हे दोन कैंचें नांव । तस्मात् हा अवघा मायिक समुदाव । देहाध्यासरूप
समाधियोगें ब्रह्मानुभव होणें । जेणें लयसाक्षी ज्ञानें वोळखणें । ते सर्वही अभ्यासाचीं लक्षणें । निरोपिलीं मागां ३६
ब्रह्मसुखें सुखी जाहला । ज्ञाता ज्ञानें मुक्तीतें पावला । तो हा जीव ऐक्यरूपें ठेला । ब्रह्मीब्रह्माभिन्न होऊनी ॥३७॥
तस्मात् हें सर्व आभासाचें रूप । केवळ ब्रह्मात्मा नव्हे सच्चिद्रूप । निर्विशेष जें पूर्ण निर्विकल्प । तें आपण स्वयें ॥३८॥
जाणिलें अनुभविलें असे जेणें । तें कदा आपण ऐसें न स्फुरणें । यापरतें अनुभाव्य ज्ञेय जें संचलेपणें । तेंस्वयेंनिश्चयव्हावा
समाधिसुख ब्रह्मानुभव । ध्यान तरी असावें सर्वथैव । ब्रह्मचिंतनिका स्मरणरूप आठव । वृत्तीसी सदा असावा ५४४०॥
परी ज्ञाता ध्याता आठविता । स्मरता चिंतिता अनुभविता । हा मी नव्हे आभासरूप तत्त्वतां । यापरता मीं ब्रह्मात्मा
ब्रह्म तरी सदा अनुभवावें । परी अनुभवितें आपण न व्हावें । हेंचि मुख्यत्वें वर्म जाणावें । समाधानाचें ॥ ४२ ॥
हें सर्व असे आभासकार्य । हें मी नव्हेंचि ब्रह्म अद्वय । मुख्य आभासचि मिथ्या तरी धर्म होय । त्याचा सत्य कैसा
एवं अनुभविता आपण नव्हे । आणि स्वतां ब्रह्म तें निजांगें व्हावें । ऐशियापरी सदा आठवावें । विस्मरण न होतां४४
हाचि अभ्यास सदा असतां । गळून जाय द्वैताची वार्ता । निपटून मूलाज्ञानाचे होय घाता । प्राज्ञाभिमानासहित ॥४५॥
हे निपटून गेलियाची अवधि । अंतरीं साधकें वोळखावी आधीं । कीं ब्रह्म अनुभवित असतांही कधीं । अनुभविता आपण न वाटावा ॥ ४६ ॥
जैसा आरसा पाहात असतां । आभासचि मी ऐशी कदां वार्ता । कवणासीही नुद्भवेचि तत्त्वतां । यारीतीं आठवावें ४७

त्याचें मूळ बीज जें प्राज्ञ तें तसेंच उरून जर विश्वतैजस गेलें तर असें समजावें कीं, ते पूर्वीप्रमाणें पुन्हां उत्पन्न होतील. म्हणूनच बीजरूप मूलअज्ञानासह प्राज्ञ अभिमानाचा अंत झाला तरच साधक साधकत्व टाकून साध्यास म्हणजे वस्तुतंत्रानें मोक्षास पावेल. करितां हें मूल अज्ञान घालविलें पाहिजे. तें जाण्यास वस्तुतंत्र अभिन्नता झाली पाहिजे. ती होण्यास ब्रह्मास्मीचा चिरकाळ अभ्यास झाला पाहिजे. ब्रह्मींचा जो अनुभव घेणारा तो सहज सुखाकारता पावला. तो मी ब्रह्म नव्हे, तर त्याखेरीज मी स्वत: केवळ निर्विकार लयसाक्षी आहे व ध्याता ज्या सुखानें सुखाकार होतो तो मी ब्रह्मात्मा आहें; त्या माझा मला अनुभव कसचा? सुख आणि सुखी हीं दोन नांवें तरी कसचीं उरतात? ज्यापेक्षां हें मला कांहींच, नाहीं त्यापेक्षां देहाध्यासरूप हा सर्व समुदाय मायिक आहे असें समजावें.

मागें समाधीचे योगानें ब्रह्म अनुभवणें, लय साक्षीज्ञानानें ओळखणें हीं अभ्यासाचीं लक्षणें आहेत असें सांगितलें होतें. ब्रह्म सुखानें सुखी झाला, ज्ञाता ज्ञानानें मुक्त झाला. तो हा जीव ब्रह्माहून आपण निराळा नाहीं; तर ऐक्यरूपानें ब्रह्माशीं अभिन्न आहे म्हणून वर सांगितलेलीं लक्षणें किंवा रूप आभासाचें आहे. तो आभास केवळ सच्चिदानंद ब्रह्मात्मा नव्हे, तर आपण स्वतः निर्विशेष जें पूर्ण सच्चिद्रूप निर्विकल्प आहे असें ज्यानें जाणिलें किंवा अनुभविलें, तें आपण असें कधींही स्फुरूं नये. तर त्याहून जें अनुभाव्यरूप ज्ञेय संचलेलें आहे तें मी स्वतः आहें असा निश्चय व्हावा. समाधीसुख, ब्रह्मानुभव, नेहमीं ध्यान, ब्रह्मचिंतनिका, स्मरणरूप आठवण हीं वृत्तीला सदा असावीं; परंतु जाणणारा ध्यान करणारा आठविणारा स्मरणारा चिंतिणारा अनुभविणारा जो आभास तो मी नव्हे. तर त्याहून मी ब्रह्मात्मा निराळा आहे. ब्रह्मानुभव नेहमीं घ्यावा; परंतु अनुभविणारा मी आहें, असें मानूं नये. हेंच समाधानाचें मुख्य वर्म आहे. हें सर्व आभासाचें कार्य आहे. तें कार्य मी कसें होईन ? मुख्य आभासच खोटा तेव्हां त्याचा धर्म खरा कसा होईल ? अनुभव घेणारा आपण नव्हे, आपण स्वतः ब्रह्म आहे, असें स्मरण न होतां नेहमीं आठवावें. हाच नेहमीं अभ्यास असल्यानें द्वैत नाहींसें होईल व प्राज्ञासह मूलाज्ञानाचा निःशेष नाश होईल.

### मूलाज्ञानासह प्राज्ञ गेल्याची अवधी.

ब्रह्म अनुभवीत असतां अनुभव घेणारा मी आहें, असें वाटूं नये. जसें आरसा पहात असतां आरशांत दिसणारा प्रतिभास तो मी असें कधींही कोणी तरी म्हणतो काय, तें जसें तो म्हणत नाहीं तसेंच ब्रह्म चिंतीत असतां चिंतणारा मी नव्हे, असें आठवावें.

भलते समयींही चुकूनी । अनुभवितां स्फूरूं नये मी म्हणोनी । अनुभाव्य जें कां पूर्णपणीं । तें निःसंशयें आपण ॥ ४८
ऐशी दृढता उत्थानरहित । जरीजाहली एकरूप सदोदित । तरी जाणावा जाहला असे घात । प्राज्ञ अभिमानाचा ४९
हाही प्रत्यय जयाचा तेणें । जाहला तो ओळखूनी पाहणें । निपटून प्राज्ञ मावळतां होणें । वस्तुतंत्र निश्चयेंसी ॥ ५० ॥
प्राज्ञ अभिमान निःशेष निमाला । तेणें कारणदेहही ओलांडिला । पुढें साधकही म्हणूं नये तयाला । साध्य जाहला निःसंशयें
जोंवरी श्रवणादि संपादी । विवेचून लयसाक्षित्व अनादि । वोळखी जाहली तोंवरी विषदी । तो पूर्वांग मुमुक्षु ॥ ५२॥
पुढें अभ्यासें मी माझेंपण । गळाला हा विश्वाभिमान । तेव्हां मुमुक्षुत्व संपलें पूर्ण । तोंवरी उत्तरांग मुमुक्षु ॥ ५३ ॥
त्यापुढें कर्तृत्व भोक्तृत्व निमे जोंवरी । पूर्वांग साधक म्हणावा तोंवरी । उत्तरांग साधकता असे निर्धारी । प्राज्ञ निमे तोंपर्यंत ॥ ५४ ॥
प्राज्ञ निःशेष जेव्हां निमाला । मूलाज्ञानाचा घात जाहला । तेव्हां तो साधकत्वापासून संचला । साध्यरूप वस्तुतंत्र ५५
त्रिपुटी क्षीण होय तोंपर्यंत । कर्तृतन्त्रत्वें साधक म्हणवित । मूलाज्ञानरूपी प्राज्ञाचा घात । होतां साध्य ब्रह्म अंगें ॥ ५६
ब्रह्म न ब्रह्मवित् स्वयें अंगें । ब्रह्मवेत्ता नव्हे ऐसें श्रुति सांगे । तरी तो केवळ ब्रह्मचि अभंगें । सिद्धत्वें विराजे ॥ ५७ ॥
ऐसा तिहीं देहांसी वोलांडूनी । तिहीं अवस्थांतें त्यागूनी । तिहीं अभिमानांतें विसर्जूनी । निजांगें ब्रह्म जाहला ॥ ५८ ॥
अभ्यासें इतुकें दृढ जाहलें । कीं देहादि भलते अवस्थे व्यापारले । परी आपुलें ब्रह्मात्मत्व तें संचलें । देहात्मभावा त्यागूनी
समाधिकाळीं कीं जागृती आंत । स्वप्नीं असो कीं सुषुप्तींत । या संघातासी मी म्हणून न स्फुरत । ब्रह्म अंगें त्या विसरूनी
जैसा देहचि आत्मादृढजाहला । तैसाब्रह्मात्मनिश्चयसदृढकेला । भलतेअवस्थेदेहभावनाहींगेला । तैसा ब्रह्मात्मभाव सदृढ
देहात्मबुद्धि ऐसा म्हणोनी । दृष्टांत जो दिधला पूर्णपणीं । तो अति युक्त असे जाणती ज्ञानी । निश्चयरूप ॥ ६२ ॥
जो देह जया प्राप्त जाहला । तो जैसा मीम्हणून बैसला । भलते अवस्थेसहि पालटला । न जाय किंचित् ॥ ६३ ॥

---

भलत्याही वेळीं चुकून अनुभविणारा जो तो मी असें स्फुरूं नये. तर जें अनुभाव्यरूप ब्रह्म तें मीं आहें अशी उत्थानरहित दृढता जर सदां एकरूप झाली, तर समजावें कीं, प्राज्ञाभिमानाचा नाश झाला. हा प्राज्ञाचे नाशाचा अनुभव ज्याला झाला त्यानें तो स्वतः ओळखून पहावा. जर प्राज्ञ निःशेष मावळला आहे तर वस्तुतंत्र आपण निश्चयानें झालों असें समजावें. ज्याचा प्राज्ञ अभिमान निःशेष गेला त्यानें कारण देह ओलांडिला असें समजावें. मग त्या साधकास साधक म्हणूं नये. कारण तो निःसंशय साध्यच झाला आहे.

## मुमुक्षुत्व, साधकत्व, सिद्धत्व याची अवधी.

**पूर्वांगमुमुक्षु**–जोंपर्यंत अनादि साक्षित्व विवेचून अनादी ओळखी झाली नाहीं तोंपर्यंत श्रवणमननादि सर्व संपादित आहे, त्यास पूर्वांग मुमुक्षु म्हणतात.

**उत्तरांगमुमक्षु**—वर सांगितलेलीं लक्षणें संपादून पुढें आभ्यासानें ज्यानें मी व माझेपण हा विश्वाभिमान घालविला, तेव्हां त्याचें मुमुक्षुत्व संपलें तें मुमुक्षुत्व संपेपर्यंत तो उत्तरांग मुमुक्षु.

**पूर्वांगसाधक**–मुमुक्षुत्व सरल्यावर पुढें कर्तृत्व भोक्तृत्वरूपी तैजस अभिमान जाईपर्यंत अभ्यासरूपी साधन करणारे साधकास पूर्वांगसाधक म्हणतात.

**उत्तरांगसाधक**–प्राज्ञ नाहींसा होईपर्यंत साधनकर्त्या साधकास उत्तरांग साधक म्हणतात.

जेव्हां निःशेष प्राज्ञ गेला व मूलाज्ञानाचा नाश झाला तेव्हां, तो साधकत्वापासून सुटला आणि साध्यरूप वस्तुतंत्र झाला. जोंपर्यंत त्रिपुटी क्षीण होईतोंपर्यंत कर्तृतंत्रत्वानें आपणांस साधक म्हणवितो; तोच मूलाज्ञानरूपी प्राज्ञाचा घात झाल्यानर आपण स्वतः साध्य ब्रह्म होतो. ‘ ब्रह्मनब्रह्म वितस्वतः ’, परंतु तो ब्रह्मवेत्ता नाहीं असें श्रुती सांगते. तरी तो केवळ ब्रह्मच सिद्धत्वानें विराजत आहे. तिन्ही देहांस ओलांडून व तिन्ही अवस्थेस टाकून व तिन्ही अभिमानास विसर्जून निजांगें ब्रह्म झाला.

अभ्यासानें इतकें दृढ झालें कीं, देहादिक भलतेही अवस्थेंत व्यापारले तरी देहात्मभाव टाकून आपलें ब्रह्मत्व संचललें आहे असें जाणतो. समाधी काळीं किंवा जागृतींत स्वप्नांत किंवा झोंपेंत असो, परंतु त्या ब्रह्मास विसरून या समुदायास मी असें मानीत नाहीं. जसें देहच आत्मा दृढ झाला होता तसा ब्रह्मात्मनिश्चय दृढ झाला. जसा भलतेही अवस्थेंत देहभाव गेला नाहीं, तसा ब्रह्मात्मभाव सदृढ झाला आहे. तो असा कीं, जो ब्रह्मात्मभाव भलतेही अवस्थेंत जात नाहीं. देहात्मबुद्धि अशीच ब्रह्मात्मबुद्धि दृढ करावी.

ज्याला जो देह प्राप्त झाला त्याला तो जसा मी म्हणून बसतो, तो मीपणाचा भाव त्याचा भलतेही अवस्थेंत पालटत नाहीं.

बाल तारुण्य कीं वृद्धपणीं । गर्भी किंवा मरणावसानीं । श्रीमान कीं करंटा असो जनीं । परी मीपण न त्यागी किंचित्
पांचाही व्यापारीं जागृतींत । न स्मरता अबाधित । देहाचें मीपण असे सदोदित । विसरूनही त्यागीना ॥ ६५ ॥
हे असो जागृतीची कथा । परी मी म्हणून भोगी स्वप्नावस्था । सुषुप्तीमाजींही सर्वथा । नेणिवाभिमान न त्यागी ॥ ६६ ॥
समुदायीं कीं असो एकला । जरी मदिरादि पानें भ्रमला । तरीही मी म्हणेना भलत्याला । हा इतुकाचि आपण दृढ
ऐसी देहात्मबुद्धि सर्व जनांसी । आणि असे ज्ञानापूर्वी आपणा जैशी । ज्ञान जाहलिया बुद्धि व्हावी तैशी । ब्रह्मात्मा आपण म्हणोनी ॥ ६८ ॥
जागृतीचे दशधा व्यापार । होताति देहाचे जैसा कोणी पर । त्याचें मीपण स्फुरेना अणुमात्र । आपण ब्रह्मात्मा स्वयें ६९
हें असो स्वप्नीं स्वप्नभासातें । मी म्हणून स्फुरेना देहातें । लयसाक्षित्व जें सर्वांपरतें । तें स्वयें निश्चय जाहला ॥ ७० ॥
सुप्तीमाजीं तों देहाची विस्मृति । परी निश्चयें जाणतसे नेणिवेप्रती । समाधि घेतांही सुखानुभूति । अनुभविता मी न स्फुरे
असो भलतैसे व्यापार देहाचे । वर्तणें घडो शुभाशुभ कर्मांचें । परी मी म्हणून यचा संघाचें । गुप्तही स्फुरण नसे ॥७२॥
मी ब्रह्मात्मा निश्चय सदृढ । वृत्तीनें खलून जाहला अतिदृढ । जैसा इतरांसी देहाचा मीपणा वाढ । निश्चय सुदृढ बुद्धीसी
देहात्म निश्चयचि जयासी । तो कदा मी म्हणेनाअन्यासी।तैसा ब्रह्मात्मनिश्चयजया ज्ञात्यासी। तो देहादिकां मीम्हणेना
ऐशियें देहात्मबुद्धीचे परी । ब्रह्मात्मबुद्धि जाहली खरी । भलतैसेही देहाचे व्यापारीं । देहात्मबुद्धि नव्हे ॥ ७५ ॥
ऐशी दृढता जे होणें तत्त्वतां । हेचि साफल्यता गा रविदत्ता । यथार्थचि जाहली कृतकृत्यता । प्राप्य तें प्राप्त जाहलें ७६
जाहली साधनाची पराकाष्ठा । कांहीं उरली नाहीं कृतीचीक्लिष्टा।चरमास्थिति प्राप्त जाहली स्पष्टा।जे भूतभविष्यज्ञा त्याची
नवतें तें जन्ममरण चुकलें । लटिके बंधनपाश गळाले । भवभय मृगजळवत् तें आटलें । धोका स्थाणुपुरुष मेला ॥७८
अजन्माचा चुकला जन्म । अमराचा मरोनि गेला यम । निष्कर्माचें तुटलं कर्म । संचित क्रियमाण प्रारब्ध ॥ ७९ ॥
अज्ञान मायारूप भुली । खपुष्पवत् ते जीवें मेली । तिची संतति तेही निमाली । विद्याविद्यारूप ॥ ८० ॥

---

बाळपणांत तारुण्यांत किंवा वृद्धपणांत गर्भांत किंवा मरतेवेळीं श्रीमंत किंवा करंटा असतां किंचितूही मीपण टाकीत नाहीं. जागृतीमध्यें पांच व्यापारांत स्मरत असतां किंवा न स्मरत असतां देहाचें अबाधित सदोदित मीपण असतें, तें विसरून सुद्धां टाकीत नाहीं. ही जागृतीची गोष्ट राहूं द्या. स्वप्नांतही मीपणा टाकीत नाहीं. तसेंच सुषुप्तिअवस्थेंत नेणीव अभिमान टाकीत नाहीं. तो समुदायांत असो किंवा एकटा असो किंवा मदिरादि प्राशनानें भ्रमलेला असो; पण तो भलत्याला मी म्हणत नाहीं. हा इतकाच आपण दृढ अशी देहात्मक बुद्धि सर्व लोकांस ज्ञान होण्याचे अगोदर आपणास आहे, तशी ज्ञान झाल्यावर आपण ब्रह्मात्मा ही बुद्धि दृढ व्हावी.

जागृतीचे दहा प्रकारचे व्यापार होतात, ते परक्याचे तसेच आपल्या देहाचे समजावे. परक्याचें मीपण जसें अणुमात्र स्फुरत नाहीं, त्याप्रमाणें आपण निर्विकार ब्रह्मात्मा स्वतः आहे असें जाणावें. हें जागृतीचें जाणणें झालें. आतां स्वप्नांत स्वप्नभासरूपी देहास मी म्हणून म्हणत नाहीं. कारण सर्वांपरतें जें लयसाक्षीत्व तें मी असा निश्चय झालेला आहे. झोंपेंत देहाची विस्मृती आहे परंत निश्चयानें नेणिवेस जाणतो, समाधी घेत असतां सुखाचा अनुभव घेणारा मी आहें, असें स्फुरत नाहीं; शुभाशुभादिक देहाचे भलतैसे व्यापार होत असतां मी कर्ता किंवा मी अमूक असें गुप्तसुद्धां स्फुरण होत नाहीं. मी ब्रह्मात्मा असा सदृढ निश्चय वृत्तीनें खलल्यानें अति दृढ झाला. जसा इतरांस देहबुद्धीच्या मीपणाचा निश्चय बुद्धीला विशेष बसलेला आहे, तसा देहात्मा हा निश्चय ज्याला आहे तो कधींही दुसऱ्यास मी म्हणून म्हणत नाहीं. तसा ब्रह्मात्मा असा निश्चय ज्या ज्ञात्याला झाला तो देहादिकांस मी म्हणून आठवीत नाहीं. अशी देहात्म बुद्धीप्रमाणें ब्रह्मात्मबुद्धी खरी झाली पाहिजे. मग भलतेही व्यापारांत देहात्मबुद्धी उत्पन्न होत नाहीं अशी जी दृढता होणें हीच साफल्यता होय.

वर सांगितल्याप्रमाणें यथार्थ कृतकृत्यता झाली. प्राप्य तें प्राप्त झालें. समाधानाची पराकाष्ठा झाली. कृतीची कांहीं क्लृप्ति उरली नाहीं. भूतभविष्य ज्ञात्याची जी चरम स्थिती ती सहजच प्राप्त झाली. नव्हतें तें जन्ममरणच चुकलें. लटकें बंधनपाश गेले. मृगजलवत् भवभय तें आटलें. धोका हाच स्थाणु पुरुष मेला. अजन्माचा जन्म चुकला. अमराचा यम गेला. निष्कर्माचे संचितक्रियमाणप्रारब्ध असें तीन प्रकारचें कर्म तुटलें. अज्ञान मायारूप भुली ती नाहींशी झाली. त्या भुलीची संतती विद्या अविद्यारूप तीही नाहींशी झाली.

जीवशिव प्रतिभास ते हारपले।कीं प्रतिबिंब मुख्यात्मत्वीं मीनलें।सर्व सृष्टीचे कर्ते भोक्ते मेले। आतांउत्पत्ति स्थिति कैंची असंगासी केलें असंग । अभंगासी केलें अभंग । अरोगियाचा गेला रोग । ज्ञानमात्रा मीनतां ॥ ८२ ॥
अज्ञानतमीं आत्मा सूर्य । पडिला होता द्वैतीं अद्वय । त्याचे निज प्रकाशाचा दाऊनि प्रत्यय । काढिला पावे स्वस्थळा ऐशी कृतकृत्यता खरी जाहली । पावावयाची ते स्थिति लाधली । वरुती देहाची क्रीडा ते असे बोलिली। जीवन्मुक्तदशा तयाचा देहवर्तो भलतैसा । अमुक करणें हा विधि नसे सहसा । अमुक न करणें हा निषेध आमासा। नसे तयाप्रती ८५
तो करील तोचि विधि त्याचा । न करील तोचि निषेध साचा । तयासी नेम करील ऐसा वेदाचा । बडिवार नसे ८६
तो नियम कवणासी असेना । प्रेरकाचाही प्रेर्य होईना । बहुत कासयासी हो वल्गना । काळासीही न गवसे ॥ ८७ ॥
ब्रह्मात्मया कोठें असे काळ । तोचि काळाचाही महाकाळ । तथापि देहाचा अंत जो होणें बरळ । तो प्रारब्ध क्षयीं होईल

**यदातदायं म्रियतां ॥**

ज्या क्षणीं प्रारब्धकर्म विघडे । त्या क्षणीं देहाचें पडे मढें । तेव्हां हा मरेना कां सांकडें । असे ब्रह्मात्मया केवीं ॥ ८९
कल्पवरी कर्मवशें राहिला । कीं आजचि कर्म क्षयें मेला । तरी संबंध काय असे तयाला । जो निजांगें ब्रह्म ॥ ९० ॥
जैसें आकाशींचिये सूर्याप्रती । मृगजल आटलें कीं आली भरती । हा संबंध नसे येणेंचि रीतीं । देहादिक ब्रह्मात्मया पाहिजे तेव्हां कर्म हें सरो । पाहिजे तेव्हां प्राणवियोगें मरो। अथवा चिरकाळ कर्माधारें वावरो । शेवटीं महाकल्पीं जळो परी ब्रह्मात्मा जो निजांगें। अनिर्वाच्य संचला अभंगें । तयासीही न स्पर्शती सोंगें । जे अज्ञानजानित ॥ ९३ ॥
देह हा केवळ प्रारब्धाधीन । कर्म तोंवरी होय वर्तन । कर्म सरतांचि पावेल मरण । असा मरे तेव्हां मरो ॥ ९४ ॥
कर्म पाहतां त्रिधा प्रकारें। त्यांत ज्ञान जाहलिया द्वय वोसरे । तिजें प्रारब्ध देहासी उरे । तेंही सरे भोगोनी ॥ ९५ ॥
अपरोक्ष ज्ञान जेधवां जाहलें । तेधवांचि संचित निपटून जळालें।जैसें जागें होतांचि स्वप्न मावळलें।भासलें जें शुभाशुभ

जीवशिव प्रतिभास ते नाहींसे झाले, किंवा हें ज्याचें प्रतिबिंब त्या मुख्य आत्म्यांत मिळालें. सर्व सृष्टीचे कर्तेभोक्ते मेले. आतां उत्पत्ति स्थिति कसची! ज्ञान प्राप्त झाल्यावर असंगास असंग केलें. अभंगास अभंग केलें. आरोग्याचा ज्ञानमात्रा मिळाल्याबरोबर रोग गेला. अज्ञानरूपी अंधकारांत आत्मा हा सूर्य म्हणजे द्वैतांत अद्वय पडला होता, त्याचे निजप्रकाशाचा अनुभव दाखवून त्यास बाहेर काढिलें; मग तो आपल्या स्थानीं गेला अशी कृतकृत्यता खरी झाली. पावावयाची ती स्थिति प्राप्त झाली. पुढें मग जी देहाची क्रीडा होत असते ती जिवनन्मुक्त दशा असें समजावें.

## जीवन्मुक्ताची स्थिति.

जीवनन्मुक्त झाल्याचा देह भलतैसा वागो त्यास अमुक एक करणें हा विधी, व अमुक एक न करणें हा निषेध, हें कांहीं नाहीं. तो जें करील तोच त्याचा विधी. तो न करील तोच त्याचा निषेध. अशा ज्ञात्यास विधिनिषेध लावण्यास वेदही समर्थ नाहीं. त्यास नियमही कोणी लावूं शकत नाहीं. तो ईश्वराचे प्रेरणेंत सांपडला जात नाहीं. फार काय सांगावें तो काळालाही जुमानीत नाहीं व काळाचें त्याजवर कांहीं चालत नाहीं. ब्रह्मात्म्यास काळ कसचा, तो स्वतःच काळाचा महाकाळ आहे. त्याचे कल्पीत देहाचा क्षय करण्यास काळ नको. त्याचा देह प्रारब्धानें क्षय पावेल. तो प्रारब्ध कर्म बिघडल्यानें क्षय पावला, तरी त्याचें ब्रह्मात्म्यास कांहींच संकट नाहीं. ब्रह्मात्म्याचा देह कर्मवशें कल्पपर्यंत राहिला किंवा कर्मक्षयानें आजच क्षय पावला, तरी त्यांचा संबंध ब्रह्मात्म्यास राहिला नाहीं. कारण तो स्वतः ब्रह्म आहे. जसें आकाशांतील सूर्यास मृगजळ आटलें किंवा त्यास भरती आली हा कांहींच संबंध नाहीं, त्याचप्रमाणें देहादिकांचे स्थितीचा संबंध ब्रह्मात्म्यास नाहीं. त्यांचें पाहिजे तेव्हां कर्म सरो, पाहिजे तेव्हां प्राण वियोगानें मरो, अथवा चिरकाळ कर्माधारें वावरो, किंवा शेवटीं महाकल्पीं जळो, त्याजबद्दल ब्रह्मात्म्यास कांहींच वाटत नाहीं.

हीं वास्तविक अज्ञानापासून झालेलीं सर्व सोंगें आहेत. त्यांचा यास कांहीं स्पर्श होत नाहीं. कारण हा अनिर्वाच्य संचलेला आहे. देह हा केवळ प्रारब्धाधीन आहे त्याचें कर्म आहे तोंपर्यंत वर्तणें होतें. तो कर्म सरल्यावर मरतो. कर्म तीन प्रकारचे आहे. त्यांत ज्ञान झाल्यावर संचित आणि क्रियमाण अशा दोन प्रकारचें कर्म नाहींसें होतें. तिसरें प्रकारचे कर्म प्रारब्ध. हें देह आहे तोंपर्यंत असतें. त्याचा भोग घडल्यावर तेंही नाहींसें होतें. जेव्हां अपरोक्ष ज्ञान झालें तेव्हांच संचित जळून गेलें; जसें जागें होतांच शुभाशुभ जें स्वप्न दिसलें होतें तें मावळून गेलें. तसेंच सर्व संचित ज्ञान झाल्यावर जळून गेलें.

कर्तेपणा जरी उद्भवेना । तरी व्यर्थत्व येतसे क्रियमाणा । तथापि घडे जें शुभाशुभ नाना । त्याचे विभागी केले ॥ ९७
ज्ञातयानें जें शुभाशुभ करावें । प्रारब्धानुकारें बळें घडावें । त्याचे अकर्तेपणें संचित नव्हे । तें भोगा यावें दोघांच्या९८
ज्ञात्यासी निंदिती गांजिती । व्यर्थ दुराग्रहें हेळसिती । ते पापाचे वांटेकरी होती । ज्ञाता अकर्ता अलेप ॥ ९९ ॥
जे स्तविती पूजिती एकभावें । सदा प्रवर्तले असती सेवे । तयांसी ज्ञात्याचें पुण्य जें आघवें । प्राप्त होतसे ॥ ५५०० ॥
ऐसा श्रुतीनें नेमचि केला । विभागी ज्ञात्याचे पापपुण्याला । संबंध नाहीं ज्ञातयाला । क्रियमाणाचा ॥ १ ॥
एवं संचित क्रियमाण दोनी । ज्ञातयाचे गेले निपटूनी । प्रारब्धमात्र तयालागूनी । भोगार्थ उरलें ॥ २ ॥
तेंही अज्ञानजनाचे बोधास्तव । उरलेंसे श्रुति सांगे गौरव । कीं अरे मूर्ख हो ज्ञात्याचें वर्तणें जें अपूर्व । शेष प्रारब्धामुळें
येऱ्हवीं ज्ञाता तो नव्हे देहादिक । तो केवळ निजांगें ब्रह्म एक । तेथें प्रारब्धाचा कैंचा कुतर्क । स्थापावया अन्यासी ४
तया ज्ञातयासी श्रुति सांगे । अशेष कर्मा नाश जाला वेगें । बहुवचनें त्रिविधाही प्रसंगें । भस्मोनी गेले ॥ ५ ॥
देह मात्र उरला असे म्हणोनी । प्रारब्धास्तव बोलिलें वचनीं । हेंही मुमुक्षूच भाग्य उदेलें गगनीं । उपदेशास्तव उरले ६
जरी सुखदुःखें देहा घडती । तरी काय उणीवता ज्ञानाप्रती । आपेंआप भोग देऊन मावळती । तरी बाध काय उरता ७
प्रारब्धें देहासी भोग द्यावे । ज्ञानासी नासावया सामर्थ्य नव्हे । मिथ्या बाहणें तेंही न नासावें । तरी ज्ञान विरोधी नसे ॥ ८ ॥
ज्ञानही प्रारब्धकर्मासी । विरोधी असेना स्वभावेंसी । म्हणोनि प्रारब्धातें न नाशी । तस्मात् भोगून सरे ॥ ९ ॥
ऐसा परस्परें अविरोध दोहींचा । यावरी निश्चय असे ज्ञातयाचा । म्हणोनि घात करिती ना प्रारब्धाचा । भूतभाविज्ञाते
आणि भोगिल्याविणही न सरे । ऐसें जाणोनियां विचारें । उगे वर्तती प्रारब्धानुकारें । आग्रह त्यागूनी ॥ ११ ॥
ऐसें असतां कोणी अविचारी । प्रारब्ध नासावें इच्छी अंतरीं । तरी काय तो शाहणा जाहला त्यावरी । मागील काय सर्व गेले

---

जर कर्तेपणाच उत्पन्न होत नाहीं तर क्रियमाणास सत्यत्व कसें येईल ? जरी तें सत्यत्व येत नाहीं तरी जें शुभाशुभ झालें त्याचे वांटेकरी दोघेजण आहेत. ज्ञात्याचे हातून प्रारब्धाचे बलात्कारानें जें शुभाशुभ घडेल तें तो अकर्ता असल्यामळें संचीत होत नाहीं तर तें कर्म दोघेजण भोगतात. जे ज्ञात्यास निंदितात, गांजितात, व्यर्थ दुराग्रहानें हेळेशीतात ते पापाचे वांटेकरी होतात. व जे एकभावें स्तवितात, पुजितात, सदा त्यांची सेवा करितात त्यांस ज्ञात्याचें सर्व पुण्य मिळतें. याप्रमाणें ज्ञात्याचे पापपुण्याचे वाटेकरी श्रुतीनेंच योजिले आहेत. ज्ञात्यास क्रियमाणाचा संबंध नाहीं. याप्रमाणें संचित व क्रियमाण हीं दोन्हीं कर्मे ज्ञात्याचीं गेलीं. प्रारब्ध मात्र देह भोगाकरितां उरलें आहे. वास्तविक ज्ञात्यास तिहींचाही संबंध नाहीं; परंतु अज्ञानास बोध व्हावा म्हणून दोहोंचीही व्यवस्था सांगून तिसरें भोगार्थ उरलें आहे असें श्रुती सांगते. वास्तविक ज्ञाता देहादिक नाहीं. तो केवळ निजांगे ब्रह्म आहे. तेथें प्रारब्धाचा कुतर्क कसचा लागू होतो ! ज्ञात्याचीं सर्व कर्में जळून गेलीं आहेत. पण देह उरला आहे म्हणूनच प्रारब्ध भोगण्यास उरलें आहे असें म्हटलें. ज्ञात्याचा प्रारब्धामुळें देह उरला आहे हें मुमुक्षूचें भाग्य उदयास आलें असें समजावें. जर ज्ञात्याचा देह न उरता तर मुमुक्षूस उपदेश कोण करिता ? उपदेश करण्याकरितांच तो ज्ञात्याचा देह उरला आहे असें म्हटलें तरी चालेल. ज्ञात्याच्या देहास जरी सुखःदुखें होतात तरी त्यांचेयोगानें ज्ञात्याचें काय उणें होत आहे ? सुखदुःखें हीं स्वतः येऊन भोग देऊन आपणच मावळतात. मग देह उरल्यानें कोणती बाधा आहे ? प्रारब्ध देहास भोग देतें त्याच्यानें ज्ञानाचा नाश करितां येत नाहीं. जें मिथ्या त्याचाही नाश प्रारब्धास करितां येत नाहीं, मग तें ज्ञानाचा विरोध करण्यास समर्थ कसें होईल.

शंका–ज्ञानानें प्रारब्धाचा नाश कां होऊं नये.

उत्तर–ज्ञान प्रारब्ध कर्मास विरोधी नाहीं म्हणून त्याच्यानें प्रारब्धाचा नाश होत नाहीं.

प्रारब्धाचा नाश होत नाहीं म्हणून तें भोग दिल्यावांचून सरत नाहीं. याप्रमाणें प्रारब्ध व ज्ञान हीं एकमेकांचीं विरोधी आहेत. असा ज्ञात्यांचा निश्चय आहे म्हणून भूत व भविष्य जाणणारे पूर्वीचे व पुढें होणारे ज्ञाते प्रारब्धाचा नाश करीत नाहींत. व प्रारब्ध भोगिल्यावांचून सरत नाहीं असें विचारानें जाणून आग्रह टाकून प्राधब्धानुसार निमूटपणें वागतात. वास्तविक असेंच वर्तलें पाहिजे. परंतु कोणी अविचारी प्रारब्धाचा नाश व्हावा अशी इच्छा करितात, ते इच्छा करणारे आतां शहाणे झाले आणि मागें जे ज्ञाते झाले ते काय वेडे होते, ते वेडे नसतां शहाणेच असून जर आग्रह धरीत नव्हते.

तस्मात् साधकें आग्रह त्यागूनी । प्रारब्धें वर्तावें सुखें जनीं । सर्व सरतांचि देह पावे मरणीं । तेव्हां विदेह कैवल्या मिळे १३
म्हणसी प्रारब्धाचे प्रकार तीन । इच्छितां न इच्छीता परापेक्षेंकडून । भोग घडती त्यांत अबाधक दोन । परी इच्छून भोगणें बाधक ॥ १४ ॥
तरी याचें उत्तर अवधारावें । इच्छून भोगी तरी बाधक नव्हे । काय सत्यत्वें स्थापिल भोग्य आघवें । कीं भोक्ता खरा जाहला
जरी मिथ्यासी सत्यत्व स्थापिलें । अथवा भोक्तेपण सत्यत्वें उद्भवलें । तरी मग जाणावें बाधक जाहलें । इच्छारूपही कर्में
चिदचिद् ग्रंथि जेधवां तुटली । तेधवांचि भोक्तेपणाची मुळी खांदिली । आणि सर्वांसी मिथ्यता सदृढ जाहली । सत्यता कल्पांतीं न ये ॥ १७ ॥
भोक्ता ठाईंचि उद्भवेना । सत्यता भोग्यासी संभवेना । तरी मग कोटि इच्छा कां करीना । ते इच्छाचि नव्हे ॥ १८ ॥
असो इच्छितां कीं न इच्छितां । अथवा भोग घडती परापेक्षता । ते सुखें घडोत देहासी आतां । ज्ञातया संबंध नाहीं १९
ऐसें कर्मेंकडून देह वर्तत । तरी सुखें वर्तो कल्पपर्यंत । अथवा आजचि कर्मांचा होऊन घात । मरण पावो ॥ २० ॥
तो मृत्युही होवो भलते स्थळीं । सुक्षेत्रीं कीं कुग्रामीं लेंड वोहळीं । ऐकट किंवा बहु स्वजनमंडळी । दिवा किंवा रात्रीं २१
देह हा काश्यादि क्षेत्रीं पडावा । उत्तरायणीं शुक्ल पक्ष दिन असावा । स्मरण करीत समुदायांत मरावा । हें अज्ञानाचें मत
पहा पहा जन कैसे आंधळे । म्हणती पिंडासी जरी शिवले काउळे । तरीच तो उत्तम गतीसी मिळे । नातरी अधमगति २३
असो जनाचे अनुभव पाहतां । ज्ञात्यासी विरोधचि तत्त्वतां । आणि ग्रंथासी विस्तार बहुतां । प्रकारें जाहला ॥ २४ ॥
म्हणोनि अन्य कांहीं नुच्चारितां । ज्ञात्याचा अनुभव जो तत्त्वतां । बोलावा साधका संशयाचि वार्ता । नुरावी यास्तव २५
जयासी स्वर्गाप्रति जाणें । उत्तरायण दिन शुक्लपक्ष अपेक्षावे तेणें । ज्ञाता स्वरूपीं स्वरूप तरी होणें । इत्यादि कासया
उपासक सालोक्यादि इच्छिती । म्हणोनि अंतीं देवासी स्मरती । हा निजांगें देवाचा देव तरी अंतीं । कवणा स्मरावें २७

---

म्हणून साधकानें आग्रह न धरितां सुखानें जनामध्यें वर्तावें. सर्व पापपुण्य सरल्यावर देह मरण पावेल तेव्हां विदेहकैवल्य मिळेल.

शंका–प्रारब्धाचे प्रकार तीन. १ इच्छा प्रारब्ध. २ अनिच्छा प्रारब्ध. ३ परापेक्षा प्रारब्ध. यांत दोन अबाधक आहेत, परंतु इच्छून भोगणें हा प्रकार बाधक आहे.

उत्तर–इच्छून भोगिलें तरी तें बाधक नाहीं. कारण ज्ञाता सर्व भोग्यजातास तें सत्य आहे असें मानीत नाहीं व मी भोक्ता आहें असेंही मानीत नाहीं. मग त्यास इच्छाप्रारब्ध बाधक कसें होईल ? भोग्यजात सत्य मानिलें व भोक्ताही खरा आहे असें कल्पिलें तरच इच्छाप्रारब्ध बाधक आहे. तेव्हां चिदचित्ग्रंथी तुटली तेव्हांच भोक्तेपणा गेला व सर्व भोग्यजात मिथ्या अशी दृढता झाली. त्यास आतां कल्पांतींही सत्यता येणार नाहीं. भोक्ता मुळींच उत्पन्न होत नाहीं व भोग्यजातास सत्यता संभवत नाहीं. मग कोटी इच्छा केल्या तरी त्यानें काय होणार आहे ? वास्तविक त्या त्याच्या इच्छाच नव्हत.

प्रारब्धाचे जे तीन प्रकार त्यांचेयोगानें देहास भोग घडेनात त्यांचा ज्ञात्यास संबंध नाहीं. ज्ञात्याचा कशाही प्रकारच्या कर्मानें देह कल्पपर्यंत सुखानें वागो अथवा आजच कर्मांचा घात होऊन देह मरण पावो त्याचा ज्ञात्यास बाध नाहीं. त्याच्या देहास मृत्यु सुक्षेत्रीं, कुग्रामांत किंवा लेंड ओहोळ अशा भलत्याही स्थळीं येवो, तसेंच तो एकटा असतांना किंवा पुष्कळ लोकांमध्यें रात्रीं किंवा दिवसास त्याचे देहास मृत्यु येवो, त्याबद्दल ज्ञात्यास कांहीं बाध नाहीं. अज्ञान्यांचें असें मत आहे कीं, आपला देह काशी आदिकरून चांगल्या क्षेत्रीं पडावा. देह पडत असतां उत्तरायण शुक्लपक्ष दिवसास तो प्राणी स्मरण करीत समुदायांत मरावा. पहा जन कसे आंधळे व वेडे आहेत ते. ते असें म्हणतात कीं, जर कावळा पिंडास शिवला तरच उत्तम गती मिळते. तो न शिवला तर अधम गतीच प्राप्त होईल. असो. जनाचा अनुभव पाहिला असतां तो ज्ञात्यास विरोधच करील व ते त्यांचे अनुभव सांगावयास लागले तर ग्रंथ उगाच वाढेल, म्हणून ते अनुभव न सांगतां साधकाचा संशय जावा याकरितां ज्ञानाचा अनुभव सांगतों.

ज्याला स्वर्ग लोकांस जाणें असेल त्यानें उत्तरायण शुक्लपक्ष दिवस इत्यादिकांची मृत्युकाळीं इच्छा करावी, ज्ञाता स्वस्वरूपच आहे मग त्यास उत्तरायणादिकांची इच्छा कशाला होईल ? उपासक सलोकता मुक्ति इच्छितात, म्हणूनच ते मरण समयीं देवास आठवितात. ज्ञाता स्वतःच देवाचा देव आहे मग त्यानें अंतीं कोणास आठवावें.

सत्यलोकादि वास इच्छूनी । योगी जाती ब्रह्मरंध्र भेदोनी । पूर्ण ब्रह्म निजांगें ज्ञानी । तरी प्राण उत्क्रामतीना ॥ २८ ॥
आणीक जनाच्या नाना कल्पना । काश्यादि क्षेत्रीं पावावें मरणा । इत्यादि नलगे वाउग्या वल्गना । अज्ञानाच्या ज्ञानियां
ज्ञात्याचा देह भलतेही देशीं । भलत्या निमित्तें भलते समयासी । पडो प्रारब्धाची गति जैशी । परी ते निश्चयेंसी मुक्त ३०
असो मृत्यु तयाचा भसतैसा । परी वर्तणुकीचा प्रकार असे जैसा । शुभ कीं अशुभ वर्ततां सहसा । विकल्प न करावा कोणे

**मुक्तो नास्त्यत्र संशयः ॥**

तयाचा सदाचार कीं दुराचार । पाहों नये भलतैसा विहार । तो मुक्त येविशीं संशय अणुमात्र । नसावा सहसा ॥ ३२
जयाचा ग्रंथिभेद खरा जाहला । अभ्यासें अभिन्नत्वीं समरसला । मीपण न स्फुरे भलते अवस्थेला । जयासी देह जाहला परोक्ष
देहात्मबुद्धीचिये परी । ब्रह्मात्मबुद्धि जाहली खरी । तयाची क्रिया जरी यथेष्टाचारी । परी मुक्त निःसंशय ॥ ३४ ॥
यथेष्टाचारीं जरी तो वर्ते । परी नाचरे कदा प्रारब्धापरतें । अथवा सदाचरणही लोकरीतीतें । घडे प्रारब्धानुसार ॥ ३५
असो देह वर्तो भलतैसेपरी । सदाचरणीं कीं दुराचारीं । परी तो मुक्त निःसंशयें अंतरीं । साधकें वोळखावा ॥ ३६ ॥
ज्ञानियासी संशय असेना । ते न पाहती कवणाचेही आचरणा । मग अभ्यासें पावला जो अभिन्न ज्ञाना । त्याचें आचरण केवीं पाहती ॥ ३७॥
म्हणोनि साधकाप्रति सांगितलें । कीं देहात्मवत् ब्रह्मात्मत्व जाहलें । तयाचें वर्तणें अशुभ किंवा भलें । परी तो मुक्त निःसंशयें
तयाचे आचरणावरूनी । उणीवता मानील साधक कोणी । तरी तयाचीच होईल हानि । दृढापरोक्षा न पावे ॥ ३९ ॥
म्हणोनि साधकासीच सांगितलें । कीं संशय न करावा ठायीं आपुले । जयाचें ग्रंथींचें भेदन खरें जाहलें । तेही मुक्त होती ४०
येर जे अज्ञानी सदा भ्रांत । देहात्मबुद्धीचे ठायीं रत । तयांप्रति बोलिलें तरी जात । व्यर्थचि अवघें ॥ ४१ ॥
ते तयाचें आचरणाचि पाहती । शुभ तरी वाहवा वाहवा म्हणती । अशुभ तरी उगे नाक मोडिती । परी न पाहती आपुलीक्रिया

---

योगी सत्यलोकाचा वास इच्छून ब्रह्मरंध्र भेदून जातात. ज्ञानी स्वतः पूर्ण ब्रह्म असल्यामुळें त्याचे प्राण उत्क्रमण करीत नाहींत. मरण येणें तें काशी आदिक-क्षेत्रीं आले पाहिजे, अशा लोकांच्या अनेक प्रकारच्या वाउग्या कल्पना आहेत. त्या ज्ञान्यास लागू नाहींत. ज्ञान्याचा देह भलत्या देशांत भलते कारणानें भलत्या वेळीं जशी प्रारब्धाची गती असेल त्याप्रमाणें पडला तरी तो मुक्त आहे याविषयीं संशय नाहीं. त्याचे देहास जसा भलतसाही मृत्यु आला तरी तो मुक्त आहे, तसेंच त्याची वर्तणूक शुभ किंवा अशुभ यापैकीं कोणत्याही प्रकारची घडो, त्याविषयीं कोणीही विकल्प मनांत आणूं नये. ज्ञात्याचा सदाचार आहे किंवा दुराचार आहे हें कांहींएक पाहूं नये, कारण त्याचा कशाही प्रकारचा विहार झाला तरी तो मुक्त आहे, याविषयीं अणुमात्र संशय नाहीं. ज्याचा खरा ग्रंथीभेद झाला, जो अभ्यासानें अभिन्न परमात्म्यांत समरसला. ज्याला भलतेही अवस्थेंत मीपण स्फुरत नाहीं. ज्याला आपला देह परोक्षासारखा झाला. ज्याची देहात्मबुद्धीप्रमाणें ब्रह्मात्मबुद्धी खरी झाली. त्याची क्रिया जरी यथेच्छ असली तरी तो मुक्त आहे याविषयीं संशय नाहीं.

ज्ञानी जरी यथेच्छ वागला तरी तो प्रारब्धाला सोडून वागत नाहीं, मग त्याचें वर्तन सदाचाराचें होवो किंवा दुराचाराचे होवो. भलतें कां वर्तन होईना, परंतु तो मुक्त आहे, ह्याविषयीं शंका नाहीं, असें साधकानें ओळखावें. ज्ञान्यास स्वतः संशय नसल्यामुळें ते कोणाचेही आचरण पहात नाहींत. मग जो अभ्यासानें अभिन्न ज्ञानास पावला त्याचें आचरण कशाला पहातील? साधक कदाचित् संशय कल्पील, करितां त्यास सांगत आहों कीं, ज्याचें देहात्मवत् ब्रह्मात्मत्व झालें त्याचे शुभ किंवा अशुभ भलतेसें आचरण होवो पण तो मुक्त आहे ह्याविषयीं शंका नाहीं. जो कोणी साधक त्याचें आचरण पाहून उणीवता मानील तर त्याचा तोटा होईल, तो हा कीं, त्यास दृढापरोक्षता साधूचे ठिकाणीं दोषदृष्टि धरिल्यामुळें होणार नाहीं. हा त्याचा तोटा न व्हावा म्हणूनच त्यास निःसंशय होण्याकरितां हें कथन केलें. ज्यांचा ग्रंथीभेद जाहला ते मुक्त होतात. त्यांखेरीज जे अज्ञानी भ्रांत नेहमीं देहात्मबुद्धी घेऊन बसलेले आहेत, त्यांस आम्ही हें कथन केलें नाहीं. कारण त्यांना ही गोष्ट सांगितल्यानें ते विश्वास न ठेवितां निंदाच करितील. त्या योगानें आमचें सांगणें व्यर्थ जाईल. सर्व जनाची रीत अशी आहे कीं, ज्ञात्याचें आचरण शुभ असल्यास ते त्याची वाहवा करितात आणि अशुभ असल्यास त्यास वाईट मानून नाक मुरडितात. परंतु आपण काय करीत आहों हें ते विचार करून पहात नाहींत.

आपण तरी भलतैसें वर्तावें। परी अन्याप्रति नांव ठेवावें। शास्त्रसंपन्न जरी असावें। परंतु हेचि रीती सर्वांची ॥ ४३
ऐसे जे भ्रांत अज्ञान लोक। तयांसी काय कळे अंतरविवेक। देहाचीच पाहती वर्तणूक। शुभ अथवा अशुभ ॥ ४४ ॥
पूर्ण ज्ञात्याची निंदा करिती। साधक मुमुक्षूसी हेळसिती। म्हणती पापी जन्मले भूमीवरुती। यांची गति काय नेणों ४५
ऐसा द्रोहचि अंतःकरणा। गांजिती भलत्या करिती वल्गना। तरी तयाच्या वाणीसी कीं मना। कोणें अर्गळा घालावी
असो तयाप्रति काज काय। द्रोहें उत्तम गतीचा होतो क्षय। परी साधकें असावें निःसंशय। कीं ज्ञाता मुक्त सर्वदा ४७
जैसा आकाशामाजीं वृक्ष विरूढला। कोणी एक पुरुष त्यावरी बैसला। तो वृक्ष कवणें समूळ उपडिला। तो पडेल भूमीवरी
त्या वृक्षासीच भूमीपरती गति। नाहीं नाहीं बापा कल्पांतीं। मा तो पुरुष राहेल गगनीं निश्चितीं। हें केवीं घडेल ४९
हाचि दृष्टांत पहा विवरून। माया द्वैतरूपी शून्य गगन। कांहीं आधार नसतां देहवृक्ष विस्तीर्ण। वाढला अपार ५०
अज्ञानाचें आळें केलें। त्यांत कल्पनेचें जळ भरिलें। कर्मवासनें बीज पेरिलें। तेव्हां देहवृक्ष सरसावला ॥ ५१ ॥
तया वृक्षाची परिपक्वता। हेचि उद्भवली खरी मुमुक्षुता। सद्गुरु सच्छास्त्र तया मीनतां। आयुष्य त्याचें तरलें ५२
सद्गुरूनें सच्छास्त्र कुठारी घेऊन। यांचे मुमुक्षुतेचा दांडा बैसवून। विवेचन घाव घातिला योजून। तेणें देहवृक्ष उन्मळला
अज्ञान आळें निःशेष फोडिलें। वासना समूळबीज उपडिलें। मीपणाचें जुंबाडें होतें गुंतलें। तें खांदिलें अभ्यासें ५४
ऐसा देहवृक्ष निराधार जाहला। तो मायागगनीं न राहे स्थिरावला। वरीजीवरूपेंहापुरुषबैसला। तरीतो द्वैतीं राहे केवीं
ब्रह्मात्मा हे निजकैवल्य भूमी। येथेंचि येऊन पडेल अनुक्रमीं। म्हणिजे देहाची क्रीडा ते संभ्रमीं। खरीजीवन्मुक्तदशा
ऐसा देहवृक्ष कैवल्यातें पावला। तरी केवीं गति होय अन्य जीवाला। अभिन्नज्ञानें स्वरूपीं समरसला। हेचिकैवल्यमुक्ति

आपण भलतेसें वागलों तरी चालेल, परंतु ज्ञानी किंवा दुसरे कोणी भलतेसे वागले तर त्यास नांवें ठेवितात. इतर जनांप्रमाणें कोणी शास्त्रीही असला तरी तोही साधूंचें आचरण पहातो, असे जे भ्रांत अज्ञान लोक त्यांस अंतरविवेकाची गोष्ट काय कळणार? ते देहाचीच वर्तणूक शुभ किंवा अशुभ पाहून पूर्ण ज्ञात्याची निंदा करितात. तसेच साधक व मुमुक्षूस हेळशितात, आणि म्हणतात कीं, हे भूमीवर पापी जन्मलेले आहेत, त्यांची काय गति होईल कोण जाणे, असा त्यांच्या अंतःकरणांत ज्ञान्याविषयीं द्रोहच आहे. त्या योगानें ते भलभलत्या वल्गना करून ज्ञात्यास गांजितात. त्यांच्या तोंडास कोणी हात द्यावा. असो. त्या लोकांची आम्हाला गरज नाहीं. जे द्रोह करतील त्यांच्या उत्तम गतीचा क्षय होईल. साधकाच्या गतीचा क्षय न व्हावा म्हणून त्यास हें निरूपण सांगत आहों कीं, ज्ञाता सर्वदा मुक्त आहे.

जसा आकाशामध्यें एक वृक्ष वाढला. त्यावर कोणी एक गृहस्थ बसलेला आहे, पुढें एका गृहस्थानें तो वृक्ष मुळासकट उपटिला, तेव्हां अर्थातच तो वृक्ष भूमीवर पडेल, भूमीवांचून त्याला पडण्याला दुसरें ठिकाणच नाहीं. आतां वृक्ष भूमीवर पडल्यावर वृक्षावर बसलेला गृहस्थ आकाशांत अधांत्री राहिला हें बोलणें कसें संभवेल?

हा वर जो दृष्टांत दिला याचा विचार करून पहावा. व या दृष्टांतांत वृक्ष कोण कल्पिलेला आहे व वर कोण पुरुष बसलेला आहे हें ओळखावें. मायाद्वैतशून्यरूपीं आकाशामध्यें ज्यास कांहीं आधार नाहीं, असा देहवृक्ष मोठा विस्तीर्ण वाढला. त्या वृक्षाला अज्ञानाचें आळें केलेलें आहे व त्या आळ्यांत कल्पनारूपी पाणी भरून ठेवून त्यांत कर्मवासनेचें बीज पेरिलें, तेव्हां देहरूपी वृक्ष मोठा सरसावून वाढला. त्या वृक्षाची परिपक्वता हीच समजावी कीं, सद्गुरु व सच्छास्त्र यांच्या योगानें मुमुक्षुता उत्पन्न झाली. हीच त्याची पूर्ण वाट होऊन त्याचें आयुष्य सरलें असें समजावें. कारण सद्गुरूंनीं सच्छास्त्ररूपी कुऱ्हाड, जीस मुमुक्षुतेचा दांडा बसविलेला आहे, ती कुऱ्हाड घेऊन तिचा विवेचनरूपी ध्यान योजून त्यावर घातला. तेव्हां तो देहरूपी वृक्ष समूळ उपटला. त्याचें अज्ञानरूपी आळें निःशेष फोडिलें. वासनारूपी बीज तें समूळ उपटिलें. मीपणाचें जुंबाडें गुंतलेलें होतें तें अभ्यासानें तोडून टाकिलें, तेव्हां देहरूपी वृक्ष निराधार झाला. तो मग मायारूपी गगनामध्यें स्थीर न रहातां, खालीं ब्रह्मावर पडला. मग त्या वृक्षावर बसलेला जो जीवरूपी कोणी गृहस्थ तो द्वैतामध्यें निराधार कसा राहील, त्यास आधार नसल्यामुळें तो ब्रह्मात्मा, ही निजकैवल्यभूमि तीवर येऊन सहजच पडेल. म्हणजे त्याचे देहाची जी क्रीडा होईल तीच खरी जिवन्मुक्त दशा. देहरूपी वृक्ष कैवल्यास पावला, मग त्याजवर बसलेला जो जीवरूपी पुरुष जो अभिन्न ज्ञानानें स्वरूपीं समरसलेला आहे, त्यास दुसरी कैवल्यावांचून कोणती गती प्राप्त होणार आहे? तीच गति त्यास मिळावयाची.

जैसा वृक्षासहित पुरुष भूमीवरी । तुटून पडे न स्थिरे अंबरीं । तैसा ज्ञाता अभिन्न भक्तिभूमीवरी । सदेह जीवपुरुष ५८
वृक्ष तुटोनि भूमीवरी न पडे । ऐसा संशय नुद्भवेचि कोडें । तैसाचि नसावा जयासी जोडे । अभिन्न ज्ञान ॥५४५९॥
येथें संशय सहसा न करावा । ज्ञानें मुक्त जाहला असे बरवा । देहाचा आचार असेना स्वभावा । प्रारब्धानुकारें ६०
देहात्मबुद्धीचिये समान । ब्रह्मात्मबुद्धि दृढ जाहली पूर्ण । हेंचि बापा दृढ अपरोक्षज्ञान । निःसंशयें जाहलें ॥ ६१ ॥
अगा रविदत्ता मंद कीं तीव्रतर । अभ्यासें कीं सूक्ष्म विचार । पावले जेव्हां अपरोक्ष निर्विकार । आतां भेद नुरे किंचित्
हा पहिला अभिन्नतेसी पावला । दिसंदिसा त्या स्थितीसी आला । ऐसा भेद किमपि न जाय उरला । मुक्तस्थितीसमान
तस्मात् तुजशीं विवेचन जाहलें । लयसाक्षित्व ज्ञानही ठसावलें । त्यावरी अभ्यासें खलणें निरोपिलें । आतांउठींकरींनैसें
अवधी ही विश्वतैजसादिकांची । सांगितली निपटून गेलियाची । तोंवरी अभ्यास करूनी अपरोक्षाची । दृढता संपादावी
देहाचीवर्तणूकअसोभलतैसा । हेंपाहोंचिनकोसोडूनअभ्यासासी । पावशीलपूर्णसमाधानसहजस्थितीसी । आमुचेआशिर्वादें
ऐशी आज्ञा वदोनी स्वामी । निवांत ठेले अंतर्यामीं । सअभ्यास निरूपण अनुक्रमीं । आकळिलें रविदत्तें ॥६७॥
आनंदें टाळी पिटूनियां । मस्तकीं आज्ञा वंदोनियां । साष्टांग नमितसे पायां । वारंवार प्रदक्षिणा ॥ ६८ ॥
पुन्हां साष्टांग पुन्हां प्रदक्षिणा । आनंदाश्रु भरले नयना । बहु प्रकारें करूनि स्तवना । मागील चरणा निघाला ॥६९॥
प्रारब्धानुकारें देह वर्ते । परी स्मरेना दुजें लयसाक्षीपरतें । भलते अवस्थेसी नामरूप हें तें । उद्भवूं नेदी सहसा ॥७०॥
ऐसा चिरकाळ अभ्यास करूनी । निर्दाळिले तिन्ही अभिमानी । पावला पूर्ण समाधानीं । जे चरमस्थिति ज्ञात्याची
ऐसा मंदाधिकारी रविदत्त । अभ्यासद्वारा जाहला मुक्त । सहजस्थितीनें असे वर्तत । भूतभविष्यज्ञात्यापरी ॥ ७२ ॥
हें ऐसें वाक्यवृत्तिचें निरूपण । आकळून आचार्य गुरूपासून । अभ्यास विचारें होती पावन । रविदत्ता ऐसे बहु ७३
श्रोते साधक मुमुक्षु अधिकारी । तीव्रप्रज्ञ कीं मंदप्रज्ञ अंतरीं । परी जयां तरावें ऐशी आवडी खरी । ते तरती अभ्यासें

---

जसा वृक्षासहीत पुरुष वृक्ष तुटला असतां आकाशांत स्थीर न राहतां भूमिवर पडतो, तसा ज्ञाता, अभिन्नभक्ति मुक्ति वरतो. वृक्ष तुटून भूमिवर पडणार नाहीं असें कोणीही म्हणावयाचें नाहीं. तसा अभिन्नज्ञान ज्यास आहे तो कैवल्यमुक्ति पावणार नाहीं असें कोण म्हणेल, त्याविषयीं संशयच करूं नये. ज्ञानानें मुक्त झाला त्यांच्या देहाचा आचार कसा कां असेना तो प्रारब्धानुसार कसा तरी वागेल. देहात्मबुद्धीप्रमाणें ब्रह्मात्मबुद्धी दृढ झाली आहे, हेंच दृढ अपरोक्ष ज्ञान हे रविदत्ता, कोणी मंदबुद्धी किंवा तीव्र बुद्धि अभ्यासानें किंवा सूक्ष्म विचारानें जेव्हां अपरोक्ष निर्विकारास पावेल, तेव्हां त्यांस किंचित्‌ही भेद उरला नाहीं म्हणजे जो तीव्र बुद्धि तो प्रथम अभिन्नतेस पावला आणि जो मंदबुद्धी तो अभ्यासकालगतीनें अभिन्नस्थितीस आला, असा किमपीही भेद उरत नाहीं. कारण दोहोंची मुक्तस्थिति एकच आहे

हे रविदत्ता, वर सांगितल्याप्रमाणें तुला विवेचन झालेलें आहे, व लयसाक्षित्व ज्ञानही ठसावलेलें असून अभ्यासानें खल कसा करावा हें सांगितलेलें आहे. त्याप्रमाणें तुला विश्व तैजसाची निपटून गेल्याची अवधी सांगितली आहे, तेथपर्यंत ऊठ आणि अभ्यास करून अपरोक्षाची दृढता संपाद. तूं अभ्यास सोडून देहाची वर्तणूक भलतशी होत असली तरी तिकडे पाहूं नको. याप्रमाणें सर्व आमचें सांगणें वागलें असतां सहजस्थितीस पावून आमचे आशिर्वादानें तूं पूर्ण समाधान पावशील. याप्रमाणें आज्ञा करून स्वामी अंतरयामीं निवांत राहिले. इकडे रविदत्तानें अभ्यासासह अनुक्रमानें सर्व निरूपण आकळिलें. आणि आनंदानें टाळी पिटून स्वामीची आज्ञा मस्तकीं वंदून त्यास वारंवार प्रदक्षणा करीत साष्टांग नमस्कार घालून त्यांचे पायांवर मस्तक ठेविलें. तेव्हां त्याचे नेत्रीं आनंदाश्रु आले आणि त्यानें बहुत प्रकारानें स्वामींची स्तुती करून मागें परतला. देह प्रारब्धानुसार वर्तत असतां लयसाक्षी होऊन त्यास दुसरें कांहीं भलत्याही अवस्थेंत आठवत नव्हतें व तो भलत्याही अवस्थेंत नामरूपादिकांचा उद्भव होऊं देत नव्हता. अशा प्रकारें त्या रविदत्तानें चिरकाळ अभ्यास करून तिन्ही अभिमानाचा नाश केला, आणि पूर्णसमाधान पावला. तीच ज्ञात्यांची चरम स्थिति आहे. याप्रमाणें मंद अधिकारी जो रविदत्त तो अभ्यासाचे योगानें मुक्त झाला. आतां तो भूतभविष्य ज्ञात्यांप्रमाणें सहजस्थितीनें वर्तत आहे.

वर सांगितल्याप्रमाणें वाक्यवृत्तिचें निरूपण आचार्य गुरुपासून अभ्यासानें व विचारानें आकळून रविदत्तासारखे बहुत लोक पावन होतात. श्रोते, साधक, मुमुक्षु अधिकारी तीव्र बुद्धीचे किंवा मंदबुद्धीचे असले तरी त्यांत ज्यांस तरावें अशी खरी आवड असेल ते अभ्यासानें किंवा विश्वासानें तरतील.

येथें कोणीएक रविदत्त असे । कोणीएक आचार्यांचे कृपेसरिसें । पावला समाधान परोक्ष ऐसें । सहसा मानूं नये ॥७५
जयासी वास्तविक अधिकार प्राप्त । तोचि आपण कीं स्वयें रविदत्त । उपदेष्टा गुरु तोचि विख्यात । शंकराचार्य स्वामी
निजगुरूची जे सहज वचनोक्ति । हे वेदांतसार वाक्यवृत्ति । आकळोनियां सर्व सअभ्यासयुक्ति । वृत्तीनें खल करावा७७
विवेचन यथासांग करावें । अभ्यासें सविकल्प निर्विकल्प साधावें । पूर्ण विचारें लयसाक्षित्व आणावें । स्वानुभवें प्रतीतीसी
पुढें देहबुद्धीची क्षीणता व्हावया । अभ्यासें वृत्तीचा खल करोनियां । तिन्ही अभिमानातें वधोनियां । पावावें सहजस्थितीसी
ऐसाचि अनुक्रम साधोनी । जो मुमुक्षु आदरील अंतःकरणीं । तो मुक्त होईल निःसंशयपणीं । येथें संदेह नाहीं ५४८०
हे वाक्यवृत्ति वेदांतसार । असे तो कैसा ऐका प्रकार । सर्व सारांशरूप वाक्यें चार । चहूं वेदांची ॥ ५४८१ ॥
प्रत्यगात्माचि ब्रह्म परिपूर्ण । हाचि सारार्थ चहूंमाजीं गहन । तोचिअर्थअष्टादशश्लोकेंकडून । विवेचन अभ्यासें बोलिला
हा अर्थ वेदांतरहस्याचा । लोपला होता आजवरी साचा । वाउगाचि गलबला जाहला परोक्षाचा । नाना मतें वाढिलीं
हें सदाशिवें पूर्ण पाहोनी । अवतार धरिला मानवी जनीं । नाना मतें सर्वही खंडोनी । वेदांत प्रतिपादिला ॥ ५४८४ ॥
शारीरभाष्य गीताभाष्य । मुख्य सार उपनिषद्भाष्य । ऐसें प्रस्थानत्रय सरहस्य । वाक्यार्थाचें काढिलें ॥ ८५ ॥
परी ते समुद्रा ऐसे ग्रंथ थोर । कवण आकळितील मंद नर । म्हणोनि आदि करूनी सदाचार । सुलभ ग्रंथ केले॥८६॥
सान ग्रंथ म्हणोनी कधीं । अर्थ सान नव्हे त्रिशुद्धि । वाक्यार्थ रूप चहूं वाक्यांची प्रसिद्धी । सर्वांमाजीं सारिखी॥८७
त्यामाजीं ही लघुवाक्यवृत्ति । चहूं महावाक्याची सार अनुभूति । विवेचन आणि अभ्यासरीती । बहु स्पष्ट येथें असे ८८
इतर सदाचार आत्मबोधादि । उत्तम अधिकारिया ज्ञानसिद्धि । परी मंद अधिकारियाची बुद्धि । येथें पवाड ॥८९॥
तस्मात् हे वाक्यवृत्ति अतिसुलभ । मंदप्रज्ञासीही अलभ्य लाभ । कारण कीं अभ्यासद्वारा स्वप्रभ । निजांगें ब्रह्म होती
अभ्यास आणि विवेचन । केवळ स्पष्ट असे परिपूर्ण । अष्टादश श्लोकही सघन । ब्रह्मात्मरसें भरले ॥९१॥
अठराश्लोकींहीसारसंकलित । वाक्यार्थअसेविस्तारेंविणगुप्त । तोहीनिघेनामंदजयाचेचित्त । म्हणोनिप्राकृतींविस्तारिले ॥

---

या ग्रंथांत जो रविदत्त शिष्य कल्पिला आहे तो कोणी एक गृहस्थ होता. तो आचार्यांच्या कृपेनें परोक्ष समाधान पावला, असें सहसा मानूं नये. तर ज्यास वास्तविक अधिकार प्राप्त झाला आहे, तोच मी स्वतः रविदत्त आहें. असें मानून आपला उपदेशक जो गुरु, तेच शंकराचार्य स्वामी आहेत असें समजावें, आणि आपल्या गुरुचें जें सहज सांगणें तीच वेदांतसार वाक्यवृत्ति समजावी. ह्या वाक्यवृत्तीचा अभ्यास आकळून करावा. आणि वृत्तीनें त्याचा खल करावा व यथासांग त्याचें विवेचन करावें आणि अभ्यासानें सविकल्प निर्विकल्प साधावें पूर्ण विचारानें लयसाक्षित्व स्वानुभवानें प्रतितीस आणावें. मग देहबुद्धीची क्षीणता होण्याकरितां अभ्यासानें वृत्तीचा खल करून तिन्ही अभिमानांचा नाश करून सहजस्थितीस पावावें.

वर सांगितल्याप्रमाणें अनुक्रम साधून जो मुमुक्षु तसें करण्याचें मनांत आणून करूं लागेल तो निःसंशय मुक्त होईल. ही सांगितलेली वाक्यवृत्ती वेदांतसार कशी आहे तें सांगतों. ऐकः सर्व सारांशरूप चार वेदाचीं चार महावाक्यें प्रत्यगात्मा परिपूर्ण आहे, हाच सारा अर्थ चोहोंमध्यें आहे. तोच अर्थ अठरा श्लोकांनीं विवेचन व अभ्यास अशा दोन प्रकारांनीं सांगितला. हा वेदांत रहस्याचा अर्थ आजपर्यंत लोपून उगाच परोक्षाचा गलबला झाला होता व त्यामुळें अनेक मतें वाढलीं होतीं हें शंकरांनीं पाहून मनुष्यामध्यें अवतार धरिला. आणि सर्व मतांचें खंडण करून वेदांत प्रतिपादिला. आचार्यांनीं शारीरभाष्य, गीताभाष्य मुख्य सार उपनिषद् भाष्य, अशा तीन प्रकारानें वाक्यार्थाचें रहस्य काढिलें, परंतु ते ग्रंथ समुद्रासारखे मोठे आहेत, त्यांतील अर्थ मंदबुद्धी आकळूं शकणार नाहीं. म्हणून आचार्यांनीं सदाचार आदिकरून सुलभ ग्रंथ केले. ते सदाचारआदिकरून ग्रंथ लहान आहेत म्हणून त्यांतील अर्थही तितपतच असेल असें मानूं नये. कारण चहूंवेदांच्या चार महावाक्यांचा अर्थ त्या सर्वांत प्रतिपादिला आहे. सदाचार आदिकरून लहान ग्रंथांपैकींच ही लघुवाक्यवृत्ति आहे. हींत चार महावाक्यांचा अनुभव विवेचनानें व अभ्यासानें स्पष्ट केलेला आहे. इतर सदाचार आत्मबोधादि ग्रंथ उत्तम अधिकाऱ्यास ज्ञानसिद्धीकरितां आहेत, परंतु त्यांत मंदअधिकाऱ्याची बुद्धि प्रवेशत नाहीं म्हणून ही अति सुलभ वाक्यवृत्ति मंदअधिकाऱ्याकरितां केलेली आहे. हा त्यांस अलभ्यलाभ आहे. कारण या ग्रंथाचे योगानें तो अभ्यासद्वारें स्वतः ब्रह्म होईल. अठरा श्लोकांतील सार–भावार्थ–संकलित वाक्यार्थानें दर्शविला आहे; तोही ज्या मंद अधिकाऱ्यास कळेना त्यांकरितां त्याच वाक्यवृत्तीचा विस्तार प्राकृतांत केलेला आहे.

वटबीजतरीअल्पप्राय। परीविस्तारहोतसेशाखाविटपमय। तैसाचिअठराश्लोकांचाअभिप्राय। विस्तीर्णजाह्लाप्राकृतीं
प्राकृत भाषेंत आला जरी। तरी अर्थी नव्हे सानथोर परी। तो अनादि जैसा तैसा निर्विकारी। तया हेळसी कवण ॥९४
सुवर्णाचे जरी नग केले। वरी भूषणार्थ व्याघ्र सिंह काढिले। तरी तें सुवर्ण नवचे उणें जाह्लें। परीक्षवंत जाणती ९५
तैसा अर्थ जो संस्कृताचा। तोचि प्राकृतीं विस्तारला साचा। हें जाणती ज्ञाते अन्य येरांचा। भाव असे भलतैसा॥९६॥
प्राकृत भाषारूप सुवर्ण नगीं। अठरा श्लोकरत्नें जडलीं अभंगीं। हे सुशोभित होतील गुरुपुत्रालागीं।शंकरस्वामीचे प्रसादें
शके सत्राशें एकाह्त्तरीं। सौम्यनामक संवत्सरीं। अश्विन शुक्ल सौम्यवासरीं। विजयादशमीसी संपूर्ण ॥५५९८॥
आकाश गगन रसबाण। इतुकें प्राकृत ओंवीचें गणन। श्लोकतरी नागधरा पूर्ण। संख्या प्रसिद्ध ॥ ५५९९ ॥
इति श्रीशंकराचार्य उक्ति। अष्टादशी लघुवाक्यवृत्ति। विस्तारें कथिली असे प्राकृतीं। टीका पदबोधिनी ॥५६००॥

॥ इति वाक्यवृत्ति समाप्तः श्रीमत्सद्गुरुचरणारविंदार्पणमस्तु ॥

---

वडाचे बीज लहान असून त्याचा विस्तार जसा मोठा होतो, तसा अठरा श्लोकांचा भावार्थ प्राकृतांत वाढला आहे. जरी मूळ वाक्यवृत्तीचा अर्थ प्राकृत भाषेंत आला आहे. तरी तो ग्रंथ मूळवाक्यवृत्तीहून कमी अर्थाचा आहे असें समजूं नये. जसें सोन्याचे दागिने करून त्यांवर भूषणांकरितां सिंह व वाघ काढिले तरी तें सोनें उणें झालें नाहीं, असें परिक्षक जाणतात. तसा संस्कृताचा अर्थ प्राकृतांत विस्तारिला तरी तो कमी नाहीं असें ज्ञाते म्हणतात. इतरांचा भावार्थ कसा कां असेना. असो. हा भावार्थ पद्यात्मक प्राकृत भाषारूप सुवर्णाचे अलंकारांत अठरा श्लोक हींच रत्नें जडलेलीं आहेत असा हा रत्नजडित दागिना शंकराचार्य स्वामीचे प्रसादानें गुरुपुत्रास सुशोभित होवो, असें हंसस्वरूप स्वामी म्हणतात. हा ग्रंथ शके १७७१ सौम्य नामसंवत्सर अश्विन शुद्ध १० सौम्यवासरीं संपूर्ण जाहला.




## वाक्यवृत्तीची आरती.

जयदेवी वाक्यवृत्ति। देशी ब्रह्मात्मप्रतीति। अज्ञान निरसूनी। पाववीशी स्वयंज्योति ॥ ध्रु० ॥
वाक्यवृत्ति दृढाभ्यास। महावाक्य उपदेश। तेथील गुढार्थाचा। प्रगटाचे जो सारांश ॥ २ ॥ ज०
व्यर्थचि जीव भ्रमले। निजरूपा विसरले। सावध त्यांशी करूनी। दुःखविक्षेप वारिले ॥ ३ ॥ ज० ॥
आचार्य शंकरोक्ति। वरीहंसराजकृति। सुबोध टीका तेणें। अगणित उद्धरती ॥ ४ ॥ जयदेवी० ॥

---

## हंसराजस्वामीची आरती.

जयजयजयजय आरति सद्गुरु नारायणहंसा। आरति ओंवाळिनांचि देहबुद्धि नुरे सहसा ॥ ध्रु० ॥
मायाविपिनीं बहु जीव भ्रमले उमजेना कोणा। व्यवहारें सुखदुःख कष्ट भोगिती नाना ॥
या तळमळिची सद्गुरुलागीं आली बहु करुणा। म्हणुनी समर्थ व्यक्ति धरोनी उपदेशिति ज्ञाना ॥ १ ॥
दर्शनमात्रें अधिकारानें पावती सकळ। व्यतिरेकानें निजरूप दाउनि तोडिति भवजाळ ॥
तेंचि अन्वयें पाहतां विरती सर्वही तळमळ। यास्तव निजपदकमळीं लोळे चिमणेंसें बाळ ॥ २ ॥

---